N. A.

Navanathbhaktisar (chapter 1-40)

नवनाथ भक्तिसार (अध्याय 1-40)

Marathi

Paper- Printed

178 Folio

1934 Sambat (141 years old)

13.2" X 8.3"

Complete

॥ श्रीः ॥

# ॥ मंगलाचरणम् ॥



स जयति सिन्धुरवदनो देवो यत्पादपङ्कजस्मरणम् ॥ वासरमणिरिव तमसां राशिं नाशयति विघ्नानाम् ॥ १ ॥ या कुन्देन्दुतुषारहारधवला या शुभ्रवस्त्रावृता या वीणावरदण्डमण्डितकरा या श्वेतपद्मासना ॥ या ब्रह्माच्युतशंकर-प्रभृतिभिर्देवैः सदा वन्दिता सा मां पातु सरस्वती भगवती निःशेषजाड्यापहा ॥ २ ॥ मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम् ॥ यत्कृपा तमहं वन्दे परमानन्दमाधवम् ॥ ३ ॥ नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ॥ देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥ ४ ॥ वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम् ॥ देवकीपरमानन्दं कृष्णं वन्दे जगद्गुरुम् ॥ ५ ॥ गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः ॥ गुरुरेव परं ब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ॥ ६ ॥ ॥

---

॥ श्रोता वक्ता श्रीपाण्डुरङ्गः समर्थः ॥ पुंडलीकवरदा हरि विठ्ठल ॥ पार्वतीपते हर हर महादेव ॥ सीताकांतस्मरण जय जय राम ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ श्रीपांडुरंगाय नमः ॥ श्रीकुलदेवतायै नमः ॥ श्रीमातापितृभ्यां नमः ॥ ॥ ॐनमो जी हेरंबमूर्ती ॥ वक्रतुंडा गणाधिपती ॥ [1]विद्यार्णवा [2]कळासंपत्ती ॥ भक्तसंकट वारीं गजानना ॥ १ ॥ सदैव धवला श्वेतपद्मा ॥ विद्याभूषित कलासंपन्नधामा ॥ तुझ्या वंदितों पादपद्मा ॥ ग्रंथाक्षरां बोलवीं ॥ २ ॥ तूं निश्चळ [3]निरंजन निर्विकार ॥ परी [4]भक्तरज्जुबंधनाधार ॥ प्रेमें संभवोनि मूर्ति साकार ॥ आम्हां दासां मिरविसी ॥ ३ ॥ तरी वक्रतुंडा पाशांकुशधरा ॥ [5]किंकिणीमंडिता [6]ग्रंथादरा ॥ येऊनि स्वामी वदनसुंदरा ॥ [7]मम रसनारस सेवीं कां ॥ ४ ॥ अगा [8]अर्थ-लिंग-प्रकरण-ह्रस्व- ॥ दीर्घ शृंगार धारणा सुरस ॥ छंद ताल नवरसरस ॥ ग्रंथामाजी आदरीं कां ॥ ५ ॥ हे गणाधिपते गणराज ॥ मी [9]अबुध वर्णना आहें सहज ॥ परी कृपा करोनि सकळां [10]भोज ॥ [11]विकळआपदा हरीं आतां ॥ ६ ॥ हे मोरेश्वरा गणाधिपती ॥ सर्वविषयाधीशमूर्ती ॥ मंगळारंभीं मंगळाकृती ॥ आरंभीं स्तुती प्रार्थितों ॥ ७ ॥ तरी सरस्वती [12]कळामांदुस ॥ सवें घेऊनि वहन हंस ॥ या [13]संतांगणीं येऊनि सभेस ॥ विराजावें महाराजा ॥ ८ ॥ जी मंगलदायक वाग्भवानी ॥ [14]चातुर्यसरिता ब्रह्मनंदिनी ॥ ती महाशक्ती हंसवाहनी ॥ घेऊनि येईं महाराजा ॥ ९ ॥ जीचेनि कृपें वांकुडे दृष्टी ॥ [15]वाचस्पतीच्या मिरवती कोटी ॥ ती माय तूं सवें गोरटी ॥ घेऊनि येईं महाराजा ॥ १० ॥ असो ऐसें पाचारणवचन ॥ [16]ग्लानित भावना सम्यक् पाहून ॥ ग्रंथासनीं मूर्तिमंत येऊन ॥ वरालागीं ओपिजे ॥ ११ ॥ सकळसिद्धी पूर्णपणा ॥ पावोत ऐशा विनीतवचना ॥ [17]वरद मौळीं हस्तकंजना ॥ स्पर्शोनि ज्ञाना मिरविलें ॥ १२ ॥ म्हणे महाराजा [18]कळोत्तमा ॥ सिद्धि पावेल काव्यमहिमा ॥ ऐसें बोलोन सुशीलधामा ॥ रसने स्थापिली सरस्वती ॥ १३ ॥ यापरी नमितों श्रीगुरुराज ॥ जो अज्ञानतमीं सविता विराजे ॥ जो मोक्षपदातें [19]वरवूनि काज ॥ साधकातें विराजवी ॥ १४ ॥ तो ज्ञानेश गुरु ज्ञानदिवटी ॥ [20]संजोगोनि बैसला मम पृष्ठीं ॥ लेखणी कवळोनि करसंपुटीं ॥ ग्रंथालागीं आदरीतसे ॥ १५ ॥ वरदहस्तें स्पर्शोनि [21]मौळी ॥ फेडिली सकळ अज्ञानकाजळी ॥ यापरी तया बद्धांजुळीं ॥ अनन्यभावें नमितों मी ॥ १६ ॥ जो नरहरिवंशीं विजयध्वज ॥ धुंडिराज नाम तयाचें साजे ॥ तोही पृष्ठीं बैसोनि सहज ॥ ग्रंथालागीं आदरीतसे ॥ १७ ॥ आतां नमूं ज्ञानशक्ती ॥ जी सत्तामयी चिद्भगवती ॥ अनन्यभावें चरणावरती ॥ भाळ तिचिये अर्पोनियां ॥ १८ ॥ यापरी नमितों श्रोते संत ॥ कीं तुमच्या गृहींचा मी अतीत ॥ तरी ग्रंथांतरीं सुरस [22]नितांत ॥

---

१ विद्येच्या समुद्रा. २ चौसष्ट कळांची संपन्नता. ३ निर्मळ. ४ भक्तांना प्रेमपाशरूप रज्जूंनीं वांधण्याला आधार. ५ घागऱ्यांनीं भूषित. ६ ग्रंथांची आवड धरणारा. ७ माझ्या जिव्हेंतून निघणाऱ्या रसाला [ माझ्या शब्दांना ]. ८ यांतील वर्णनीय अर्थ, पुल्लिंगादि भेद, व आरंभिलेलें प्रकरण या सर्वांचें रहस्य. ९ अज्ञान. १० गौरव. ११ विकळ[अज्ञान]पणाची आपत्ति. १२ एकंदर कलांची पेटी [ आश्रयस्थान ] अशी. १३ साधूंच्या समुदायांत. १४ कौशल्यपूर्ण नदी. १५ बृहस्पतीच्या. १६ दीनवाणी. १७ वरद असें हस्तकमल मस्तकावर ठेवून. १८ उत्तम कलांनीं मंडित. १९ कार्यसिद्धि करून. २० सहज येऊन. २१ मस्तक. २२ अत्यंत.

प्रेमभरित दाटवा ॥ १९ ॥ अहो प्राज्ञिक संत श्रोतीं ॥ प्रत्यक्ष तुम्ही महेशमूर्ती ॥ तुम्हां वर्णावया अबुध शक्ती ॥ मजमाजी केवीं मिरवेल ॥ २० ॥ परी धन्य तुम्हीं भक्तिवाडें ॥ स्वीकारितां बोल बोबडे ॥ जड बाळा उभवोनि कोडें ॥ जगामाजी मिरवितां ॥ २१ ॥ कीं पहा जैसें कांचमण्यास ॥ सोमकांत नांव ठेविलें त्यास ॥ तेणेंचि शब्दें लाज सोमास[1] ॥ वरवूनि बुंदां ढाळीतसे ॥ २२ ॥ तेवीं तुमचा शरणागत ॥ नरहरि मालु धुंडिसुत ॥ तस्मात् महंत श्रोते संत ॥ कैरा सरतें आपणांतरीं[2] ॥ २३ ॥ यापरी पूर्वी कथासारामृत ग्रंथ ॥ वदविला तुम्हीं श्रद्धायुक्त ॥ आतांही ओपूनि[3] वरद हस्त ॥ भक्तिसार वदवा हा ॥ २४ ॥ जे संत झाले जगद्विख्यात ॥ तयांचें माहात्म्य वदविलें समस्त ॥ परी सारसारकथा[4] त्यांत ॥ उरल्या असती महाराजा ॥ २५ ॥ जया संतांच्या पायीं रत ॥ गुरुमूर्ती प्रतापवंत ॥ कीं ज्यांनीं सांप्रदाय[5] जगद्विख्यात ॥ जगामाजी स्थापिले ॥ २६ ॥ तरी त्याची सर्व कथा ग्रंथीं ॥ स्वीकारावया अवधान[6] द्यावें श्रोतीं ॥ असो कलिप्रारंभीं रमापती[7] ॥ नवनारायणां[8] पाचारी ॥ २७ ॥ उद्धवास बैसवोनि सन्निध ॥ कनकासनीं यादववृंद ॥ तंव ते नवनारायण प्रसिद्ध ॥ प्रविष्ट झाले द्वारके ॥ २८ ॥ कवि प्रथम हरि दुसरा ॥ अंतरिक्ष तृतीय होय चतुर ॥ महाप्राज्ञिक प्रबुद्ध नर ॥ नारायण चतुर्थ तो ॥ २९ ॥ पंचम महाराज पिप्पलायन ॥ सहावा आविर्होत्र नारायण ॥ सातवा द्रुमिल आठवा चमस जाण ॥ करभाजन नववा तो ॥ ३० ॥ ऐसे नवनारायण महाराज ॥ द्वारकेंत पातले सहजासहज ॥ रमापतीचें पाचारणचोज ॥ दृश्य झाले धवळारीं ॥ ३१ ॥ हरीनें पाहतांच नारायण ॥ सोडिता जाहला सिंहासन ॥ परम गौरविले आलिंगून ॥ कनकासनीं बैसविले ॥ ३२ ॥ सकलवैभवभूषणाकार ॥ मेळवोनि सकळ अर्चासंभार[10] ॥ सारिता झाला सपरिकर ॥ षोडशोपचारें पूजेसी ॥ ३३ ॥ हरीचा गौरव पाहोन ॥ बोलते झाले नारायण ॥ कवण अर्थीं पाचारण ॥ आम्हांसी केलें श्रीरंगा ॥ ३४ ॥ हरि म्हणे जी महाराजा ॥ कीं मनीं काम[11] वेधला माझ्या ॥ कलींत अवतार घेणें ओजा[12] ॥ तुम्हीं आम्हीं चलावें ॥ ३५ ॥ जैसे समुच्चय[13] एकमेळीं ॥ राजहंस जाती उदधिजळीं[14] ॥ तेवीं तुम्हीं कृपाकल्लोळीं ॥ अवतारदीक्षा मिरवावी ॥ ३६ ॥ येरु म्हणती जनार्दना ॥ अवतार घ्यावा कवणे स्थाना ॥ कोण नामीं कवण लक्षणा ॥ जगामाजी मिरवावें ॥ ३७ ॥ यावरी बोले द्वारकाधीश ॥ कवि नारायण जो कां प्रत्यक्ष ॥ तेणें मच्छिंद्र होऊनि दक्ष ॥ जगामाजी मिरवावें ॥ ३८ ॥ यावरी हरी जो महादक्ष ॥ तो तंव शिष्य होऊनि प्रत्यक्ष ॥ महाराज नामें तो गोरक्ष ॥ जगामाजी मिरविजे ॥ ३९ ॥ यापरी अंतरिक्ष नारायण नाम ॥ तो जालिंदर मिरविजे प्रकाम[15] ॥ तयाचा शिष्य भक्तिद्रुम[16] ॥ प्रबुद्ध नामें कानिफा ॥ ४० ॥ यापरी पंचम पिप्पलायन प्रकाम ॥ मिरविजे जगीं चरपटी नाम ॥ आविर्होत्र जो

१ चंद्राला. २ आपल्यां मंडळींत मिळवा. ३ अर्पण करून. ४ सारभूत अंश. ५ शिष्यपरंपरापद्धति. ६ लक्ष. ७ श्रीकृष्ण. ८ नवयोगीश्वरांना. ९ मंदिरांत. १० पूजासामग्री. ११ इच्छा. १२ आवश्यक. १३ समुदायानें. १४ समुद्राच्या पाण्यांत. १५ यथेच्छ. १६ भक्तिरूपी वृक्षच.

योगद्रुम ॥ मिरविजे जगीं नामें नागेश ॥ ४१ ॥ यापरी द्रुमिल अतिसमर्थ ॥ जगीं मिरविजे भरतनाथ ॥ आणि चमस नारायण जगीं विख्यात ॥ रेवणनामें मिरविजे ॥ ४२ ॥ नववा जो करभाजन ॥ तो गहिनी असें मिरविजे नाम ॥ ऐसे अवतार महीकारणें[1] ॥ दीक्षेप्रति मिरवावे ॥ ४३ ॥ म्हणाल एकटपणीं वास ॥ करणें सांगतां आम्हीं कलीस ॥ तरी तुम्हांसवें अवतारास ॥ बहुत येतील महाराजा ॥ ४४ ॥ प्रत्यक्ष कवि वाल्मीक सुरस ॥ तो पुढें होईल तुलसीदास ॥ आणि शुक महाराज जो ब्रह्माभास ॥ कबीर भक्त होईल तो ॥ ४५ ॥ यापरी जो व्यास मुनी ॥ तो जयदेव होईल महाप्राज्ञी ॥ आणि उद्धव माझा प्राणाहुनी ॥ आवडता होईल नामा[2] तो ॥ ४६ ॥ आणि भक्तिप्रौढीं जांबुवंत ॥ तो नरहरि होईल नितांत ॥ प्रत्यक्ष जो बलराम भ्रात ॥ पुंडलीक होईल तो ॥ ४७ ॥ मीही प्रत्यक्ष जन्मोन ॥ ज्ञानदेव नामें मिरवीन ॥ आणि धवलारी[3] जो पंचानन[4] ॥ निवृत्तिनाथ होईल कीं ॥ ४८ ॥ आणि सत्यनाथ[5] चतुरानन ॥ तो स्वनामीं मिरवील सोपान ॥ जी योगमाया मानसमोहन ॥ मुक्ताबाई विराजेल ॥ ४९ ॥ यापरी प्रौज्ञिक[6] हनुमंत ॥ तो रामदास होईल महाभक्त ॥ आणि कुब्जा दासी मातें रमत ॥ जनी जनांत होईल कीं ॥ ५० ॥ असो ऐसें समुच्चयेंकरोन ॥ कलींत वाढवावें भक्तिमाहात्म्य जाण ॥ मग अवश्य म्हणोनि नारायण ॥ पुढें बोलत प्रश्नातें ॥ ५१ ॥ म्हणती महाराजा सर्वज्ञमूर्ती ॥ आम्हां सांगतां जन्मस्थिती ॥ परी कवण स्थानीं केउंते[7] युक्तीं ॥ व्यक्त होणें तें सांगा ॥ ५२ ॥ यावरी बोले प्रत्यक्ष नारायण ॥ कीं दीक्षेचें भविष्यपुराण ॥ पूर्वींच कथिलें पराशरनंदनें[8] ॥ महामुनि व्यास तो ॥ ५३ ॥ अगा पूर्वीं अठ्यायशीं सहस्र ऋषी ॥ निर्माण झाले विधिवीर्यासीं ॥ तें वीर्य चुकोन ठायाठायासी ॥ आपाप कांहीं उरलें असे ॥ ५४ ॥ तें जीवदशेवांचोन सत्य ॥ महाराजा न पावे उदय ॥ तरी तें ठायीं ठायीं केउतें वीर्य ॥ त्याचे ठाय ऐकावे ॥ ५५ ॥ उपरिचर[9] वसु यानीं[10] असतां ॥ वीर्य गळलें उर्वशी पाहतां ॥ तें शरस्तंबीं[11] दुरोन द्रवतां ॥ आदळतां झालें त्रिभाग ॥ ५६ ॥ यमुनेंत वीर्यबिंदु द्रोणाकांठीं ॥ पडतांच झाले त्रिभाग शेवटीं ॥ दोन भाग द्रोणापोटीं ॥ एक जळीं पडियेला ॥ ५७ ॥ असो पर्णद्रोणांत जो भाग पडिला ॥ तो तत्काळ द्रोण कूपीं जन्मला ॥ परी जळांत जो भाग पडिला ॥ तो ग्रासिला मत्स्यीनें ॥ ५८ ॥ तरी तें मत्स्युदरीं वीर्य ॥ नारायण प्रत्यक्ष आहे ॥ परी जीवदशेविण गर्भवंशोदय ॥ होत नाहीं महाराजा ॥ ५९ ॥ तरी प्रौज्ञिक[12] कवि नारायण ॥ तेणें मत्स्युदरीं जन्म घेणें ॥ मच्छिंद्र ऐसें जगांत नामानें ॥ मिरवावें महाराजा ॥ ६० ॥ यापरी शिव कामावरी[13] कोपोन ॥ तृतीयनेत्रींचा काढोन अग्न[14] ॥ महास्मर केला भस्म तेणें ॥ ऐसें ग्रंथ बोलती ॥ ६१ ॥ परी तो काम द्विमूर्धनी ॥ बैसला आहे वीर्य प्राशन करोनी ॥ तरी तयाचे जठरीं अंतरिक्ष जाउनी ॥ जालिंदर नामें मिरवेल

१ पृथ्वीवर. २ नामदेव. ३ शुभ्ररजततुल्य कैलासावर राहाणारा. ४ शंकर. ५ सत्यलोकाचा प्रभु ब्रह्मदेव. ६ महाबुद्धिवान्. ७ कोणत्या. ८ व्यासानें. ९ निरंतर वरून जाणारे. १० विमानांत. ११ दर्भांच्या विस्तारावर. १२ महाज्ञाता. १३ मदनावर. १४ अग्नि.

 

॥ ६२ ॥ यापरी कुरुवंशीं जनमेजयें ॥ नागसत्रीं आवाहन केलें आहे ॥ तया वंशीं महान पाहें ॥ बृहद्रथ राणा मिरवेल ॥ ६३ ॥ तो महीलागीं करील हवन ॥ तेव्हां गर्भ सांडील द्विमूर्धन ॥ यज्ञकुंडीं देदीप्यमान ॥ जालिंदरें जन्मावें ॥ ६४ ॥ यापरी ब्रह्मवीर्य सहस्रेंसीं ॥ ऋषि निर्मिले सहस्र अठ्यायशीं ॥ तेव्हां वीर्य रेवातीरासी ॥ रेवेमाजी पडियेलें ॥ ६५ ॥ तें महीचे परम कुशीं ॥ वीर्य आहे रेवातीरासी ॥ तेथें व्यापोनि जीवदशेसी ॥ देहालागीं मिरवावें ॥ ६६ ॥ तो महाराजा चमस नारायण ॥ रेवणसिद्ध मिरविजे नामानें ॥ रेवेंरेवेंत झाला जन्म ॥ म्हणोनि नाम हें त्याचें ॥ ६७ ॥ तेच वेळीं आणिक रेत ॥ सर्पिणीमौळीं अकस्मात ॥ पडतां प्राशिलें तिनें नेमस्त ॥ भक्ष्य म्हणोनि जाण पां ॥ ६८ ॥ ते जनमेजयाचे नागसत्रांत ॥ नागआहुती विप्र देत ॥ तये वेळीं आस्तिकें निश्चित ॥ सर्पिणीतें लपविलें ॥ ६९ ॥ ब्रह्मवीर्य उदरांत ॥ अंडजाशुक्तिरत्नमुक्त ॥ पुढें होईल महानाथ ॥ भविष्य जाणोन आच्छादी ॥ ७० ॥ महातरूच्या पोखरीं ॥ तक्षकात्मजा पद्मिनी नारी ॥ ठेवितां प्राज्ञिक ऋषीश्वरीं ॥ नवमास लोटले ॥ ७१ ॥ असो त्या अंडजाशुक्तिकायुक्त ॥ जीवदशा सकळ होऊनि मुक्त ॥ तरी आविर्होत्र नारायण तेथ ॥ संचरिजे महाराजा ॥ ७२ ॥ वीर्य अंडजपात्र सांडोनी ॥ गेली आहे तक्षकनंदिनी ॥ तो वडाच्या पोखरस्थानीं ॥ अद्यापि आहे महाराजा ॥ ७३ ॥ तरी तेथें आविर्होत्र ॥ प्रवेश करितां सत्पात्र ॥ वट सिद्धनाथ स्वतंत्र ॥ तया देहीं मिरवावें ॥ ७४ ॥ यापरी मित्रेरत मंत्रसंपत्तीं ॥ कृपें कुरवाळील मच्छिद्रजती ॥ ती वरदहस्ताची उकरडा विभूती ॥ साचोकार मिरवेल ॥ ७५ ॥ तें मंत्रप्रतापें सूर्यवीर्य ॥ सविताराज सांडिता होय ॥ परी तें भविष्यकारणीं उकरडामय ॥ वरदभस्म मिरवेल ॥ ७६ ॥ तेथें हरि जो नारायण ॥ शीघ्र संचरोनि दीक्षाकारण ॥ गोरक्ष ऐसें प्रतिष्ठानामानें ॥ जगामाजी मिरवावें ॥ ७७ ॥ यापरी मृडानीकारणीं ॥ सुरवर आलिया दक्षसदनीं ॥ ते कमलोद्भव पीकशासनी ॥ समारंभें पातले ॥ ७८ ॥ परी दक्षात्मजेची रूपरहाटी ॥ नेत्रकटाक्ष पाहतां परमेष्ठी ॥ तेणें धडाडोन कामपाठीं ॥ इंद्रियद्वारा द्रवला तो ॥ ७९ ॥ परी तो चतुराननी ॥ बैसला होता सभास्थानीं ॥ काम द्रवतां इंद्रियवदनीं ॥ परम चित्तीं लाजला तो ॥ ८० ॥ मग रगडोनि चरणटांचें ॥ छिन्नत्व केलें रेताचें ॥ तें एक आगळें साठसहस्रांचें ॥ रेतभाग वहियेलें ॥ ८१ ॥ ते साठसहस्र रेतप्रमाणासी ॥ जीवदशा अपत्य वालखिल्यऋषींसीं ॥ झाले परी एक भागासीं ॥ वीर्य आहे तैसेंच ॥ ८२ ॥ तें लज्जायुक्त होउनी ॥ केरासह सांडिलें भागीरथीजीवनीं ॥ तयांतून एक भाग जाउनी ॥ कुशबेटीं स्थिरावला ॥ ८३ ॥ तरी ते कुशदरीचे निखळीं ॥ रेतभगाची आहे वेली ॥ ती पिप्पलायन माउली ॥ संचारावें तेणें तेथें ॥ ८४ ॥ टांचे चेंपटलें आहे रेत ॥ म्हणोनि नाम चरपटनाथ ॥ जगांत

१ नर्मदातीरीं. २ वाळूंत. ३ नर्मदाकांठच्या वाळूंत. ४ सर्पिणीचे मस्तकावर. ५ नागिणी हीच शुक्ति=शिंपल्यांतील मोतीं. ६ कोटरांत, ढोलींत. ७ तक्षकाची कन्या. ८ पार्वतीकरितां. ९ देव. १० ब्रह्मदेव. ११ इंद्र. १२ पार्वतीची. १३ गंगेच्या उदकांत. १४ दर्भांच्या बेटामध्यें. १५ खोटेला चिकटलेलें.

मिरवोनि जगविख्यात ॥ दीक्षेलागीं विराजावा ॥ ८५ ॥ यापरी कुंभोद्भवाचा उदय झाला ॥ तों मित्रकामशराचा लोट लोटला ॥ तो गगनपंथें विमुक्त झाला ॥ अतिबळेंकरोनियां ॥ ८६ ॥ एक भाग घटीं पडतां ॥ अगस्तिउदय झाला तत्त्वतां ॥ एक भाग महीवरता ॥ कैलिकसदनीं पातला ॥ ८७ ॥ तो महाराज कैलिकऋषी ॥ भिक्षाभरतरी ऊर्ध्वशी ॥ भरतरी म्हणती भिक्षापात्रासी ॥ आंगणीं तें ठेविलें ॥ ८८ ॥ तों मित्ररेत अकस्मात ॥ येऊनि पडिलें भरतरीआंत ॥ तें कैलिकें पाहोनि भविष्यातें ॥ भरतरीं तैसें रक्षीतसे ॥ ८९ ॥ तरी ते भरतरीरेतसंगीं ॥ द्रुमिल नारायण प्रसंगीं ॥ संचरोनि रेतअंगीं ॥ भरतरी नामें मिरविजे ॥ ९० ॥ यापरी हिमाद्रीच्या विपिनस्थानीं[1] ॥ दिग्गज ठेला महीतें[2] शयनीं ॥ तें सरस्वतीचे उद्देशेंकरोनी ॥ विधि[3] वीर्यास ढासळला ॥ ९१ ॥ तें वीर्य गैंजकर्णांत[4] ॥ पडतांच झालें बिंदुयुक्त ॥ तरी कांहींसें वीर्य होऊनि विभक्त ॥ महीवरती पडियेलें ॥ ९२ ॥ तयावरोनि व्याघ्र चाली ॥ चालतां भेदलें पाउलीं ॥ तया पादसंधींत तनु ओतिली ॥ जीवदशा अत्रीची ॥ ९३ ॥ तैसा गैंजकर्णसूतिकारण[5] ॥ प्रबुद्ध मिरविजे रेतरत्न ॥ तया नामाभिधानीं प्रयत्न ॥ कर्णकानिफा मिरविजे ॥ ९४ ॥ यापरी गोरक्षाची हतवटी ॥ पडतां वाळवंटाचे पोटीं ॥ कर्दमपुतळा करितां जेठी ॥ अभिमंत्रोनि भविष्यांतर ॥ ९५ ॥ मंत्रशक्तीं विष्णुवीर्य ॥ आव्हानिलिया पुतळामय ॥ तें करभाजनें संचराया ॥ जीवदशा मिरवावी ॥ ९६ ॥ ऐसें सांगोनि रैंमारमणें[6] ॥ संतुष्ट केले नवनारायण ॥ मग परस्परें नमनानमन ॥ करोनियां उठले ते ॥ ९७ ॥ असो भगवंतेंशीं नवनारायण ॥ पाहती मंदराचळमौळिंस्थान[7] ॥ श्रीशुकाचार्यसमाधीपासीं जाऊन ॥ समाधीतें वरियेलें ॥ ९८ ॥ नव समाधी मेरुपाठारीं[8] ॥ दहावी समाधी शुकऋषीश्वरीं ॥ असो ते दाही स्थूळशरीरी ॥ पुढें तेथोनियां निघाले ॥ ९९ ॥ यापरी शुकवीर्याचें कथन ॥ बद्रिकाश्रमीं सोमब्राह्मण ॥ रंभाउद्देशें झालें पतन ॥ कबीर तेथें जन्मला ॥ १०० ॥ ही कथा भक्तिकथामृतांत ॥ वदविली आहे जगन्नाथें ॥ आतां नवनारायण झाले व्यक्त ॥ त्यांची कथा ऐकावी ॥ १ ॥ असो वसुवीर्य दोन्ही भाग झाला ॥ एक मच्छीनें प्राशिला ॥ तंव कवि नारायण संचरोनि वहिला ॥ गर्भ लागला वाढीसी ॥ २ ॥ दिवसानुदिवस नवमास ॥ मच्छीनें लोटिले जैलोदरास[9] ॥ पुढें प्रसूत अंडज सुरस ॥ यमुनाजळीं व्हावें जों ॥ ३ ॥ तों तेथें एक कथा वर्तली ॥ श्रीकैलासीं अंपर्णा[10] माउली ॥ शिवास म्हणे कृपासाउली ॥ अनुग्रह मज द्यावा जी ॥ ४ ॥ तुम्ही जपतां जो मंत्र ॥ तो मज द्यावा जी पवित्र ॥ तेणेंकरोनि मी चिर ॥ सैनाथपणें[11] मिरवेन जी ॥ ५ ॥ शिव म्हणे उमे ऐक ॥ मी मंत्र उपदेशीन सकळिक ॥ परी एकांत ठाव अँलोलिक[12] ॥ ऐसा जाण पाहिजे गे ॥ ६ ॥ अपर्णा म्हणे एकांतस्थान ॥ तरी महीवरी शोधूं आपण ॥ ऐसें ऐकतां दयाघन ॥ अवश्य तीतें म्हणतसे ॥ ७ ॥ मग

---

१ अरण्यांत. २ पृथ्वीवर. ३ ब्रह्मदेव. ४ हत्तीच्या कानांत. ५ हत्तीच्या कानांत उत्पत्ति झाली असतां. ६ विष्णूनें. ७ शिखर. ८ मेरूच्या पाठीवर. ९ पाण्यांत. १० पार्वती. ११ पतीसह. १२ मजेचा.

सिद्ध करोनि नंदिकेश्वर ॥ हिंडतां स्थानें महीवर ॥ श्रमोनि वर्ततां [1]उमा [2]ईश्वर ॥ यमुनेतटीं येऊनि पोंचले ॥ ८ ॥ मग उतरोनि नंदिकेश्वरावरूनि तीं ॥ नंदी ठेवोनि तटावरती ॥ उभयतां उतरोनि यमुनेसरितीं ॥ जवळ कांठीं बैसले ॥ ९ ॥ तंव तो यमुनातटएकांत ॥ तेथें मनुष्याची न मिळे जात ॥ ऐसें पाहोन शुद्ध एकांत ॥ तें स्थान ईश्वरास मानलें ॥ ११० ॥ परी तो मच्छोदरांत ॥ कवि नारायण नेणोन त्यांत ॥ पार्वतीतें उपदेशीत ॥ मंत्रसंजीवनीस नाथ ॥ ११ ॥ तीतें तो मंत्र उपदेशितां ॥ मच्छी तेथें होती सत्यता ॥ तो उपदेशशब्द गर्भीं तत्त्वतां ॥ मच्छिंद्रानें ऐकिला ॥ १२ ॥ ऐकिलें परी ग्रहणचि झालें ॥ तेणेंकरोनि ज्ञान प्रगटलें ॥ मीतूंपण सर्व सरलें ॥ सर्वचि ब्रह्म [3]सनातन ॥ १३ ॥ असो शिव पार्वतीतें पुसत ॥ कीं कैसें [4]चोज उपदेशांत ॥ तूतें सांपडेल खूण ते मातें ॥ बोलोनि दावीं अपर्णे तूं ॥ १४ ॥ ऐसें शिव तीस पुसतां ॥ तों आधींच मच्छेंद्र झाला बोलता ॥ म्हणे महाराजा आदि-नाथा ॥ [5]ब्रह्मचोज मिरवेल ॥ १५ ॥ आतां किंबहुना चराचर ॥ असे स्वरूपीं वृत्ति साकार ॥ [6]नग नोहे [7]हेमचि सार ॥ आब्रह्म भुवनापासोनी ॥ १६ ॥ ऐसें शिव ऐकतां वचन ॥ जळीं पाहे [8]चाकाटोन ॥ तों मच्छोदरीं नारायण ॥ कवि महाराज समजला ॥ १७ ॥ मग शंकर बोलते झाले त्यातें ॥ म्हणती महाराजा तूं आहेस येथें ॥ तरी मम उपदेशाचा तूतें ॥ लाभ झाला कविराया ॥ १८ ॥ परी हें फारचि झालें अपूर्व ॥ पुढें ऐक [9]आनंदपर्व ॥ मंत्रउपदेशगौरव ॥ दत्तमुखीं करवीन मी ॥ १९ ॥ तरी तुज जन्म झालियापाठीं ॥ बद्रिकाश्रमीं यावें शेवटीं ॥ तेथें तूतें देईन भेटी ॥ सर्व सामग्री सचिन्ह ॥ १२० ॥ ऐसें बोलोनि [10]आदिनाथ ॥ स्वस्थाना गेला अपर्णेसहित ॥ येरीकडे गर्भ मच्छोदरांत ॥ तोचि मंत्र घोकीतसे ॥ २१ ॥ यापरी भरतां पूर्ण दिवस ॥ मच्छीनें प्रसूतकळा-समयास ॥ अंड सांडोनि जळतटास ॥ मच्छी गेली जळोदरीं ॥ २२ ॥ असो अंड सांडोनि तीरास ॥ मच्छी गेली जळोदरास ॥ त्यास कांहीं लोटल्या दिवस ॥ यमुनातीरीं महाराजा ॥ २३ ॥ तंव तेथें समयकाळीं ॥ बकपक्ष्यांची उतरली मंडळी ॥ [11]मीन वेंचावया यमुनाजळीं ॥ निजगणासहित संचरले ॥ २४ ॥ तों अकस्मात [12]मित्रात्मजातटीं ॥ अंडज[13]शुक्तिका पाहिली दृष्टीं ॥ मग सर्व मिळोनि [14]चंचुपुटीं ॥ खाद्य म्हणोनि भेदिती ते ॥ २५ ॥ चंचुपुटांचा [15]भेदवज्र ॥ तेणें अंड झालें जर्जर ॥ [16]द्विशकल होऊनि सत्वर ॥ महीवरी आदळलें ॥ २६ ॥ परी वरील शकल पडिलें महीं ॥ खालील शकलांत बाळ विदेही ॥ जैसा [17]अर्के उदकप्रवाहीं ॥ एकाएकीं उतरला ॥ २७ ॥ रुदनशब्द कडकडाट ॥ बाळतेजाचा बोभाट ॥ तें न्याहाळितां चकचकाट ॥ पाहोनियां पळाले ते ॥ २८ ॥ असो सकळ शुक्तिका रत्नाकर ॥ आंत मुक्तमुक्तिकेचा भद्र मच्छेंद्र ॥ असतां तमारिकन्यातीर ॥ पावला [18]धीवर त्या काळीं ॥ २९ ॥ तो धीवर

१ पार्वती. २ शंकर. ३ अनादि. ४ महत्त्व. ५ ब्रह्मसाक्षात्कार. ६ अलंकार. ७ सुवर्ण. ८ आश्चर्य पावून. ९ आनंदाचा पर्वकाळ. १० शंकर. ११ मासे. १२ यमुनेच्या तीरावर. १३ शुक्तिका=शिंप. १४ चोंचीनें. १५ घाव. १६ दोन तुकडे. १७ सूर्य. १८ कोळी.

कामिकनाम सुभट ॥ पाहतां अंडजशुक्तिका प्रकट ॥ तों आंत रत्नतेज स्फुट ॥ बाळ रम्य देखिला ॥ १३० ॥ देखिला परी जो [1]सविता ॥ मग चित्तीं द्रवली मोहममता ॥ म्हणे बाळ हें कोमळ तत्त्वतां ॥ यातें भक्षील कोणी सावज ॥ ३१ ॥ ऐसा उदय होतां चित्तीं ॥ देव [2]शब्दकुसुमां सांडिती ॥ कीं हे महाराजा कामिकमूर्ती ॥ बाळ नेईं वो सदनातें ॥ ३२ ॥ अरे हा कवि नारायण ॥ मच्छोदरीं पावला जनन ॥ तरी मच्छेंद्र असें यातें नाम ॥ जगामाजी मिरवीं कीं ॥ ३३ ॥ अरे हा दक्ष योगींद्रजेठी ॥ तारक नौका महीपाठीं ॥ तरी तूं संशय सोडोनि पोटीं ॥ सदना नेईं महाराजा ॥ ३४ ॥ ऐसें [3]देववागुत्तररत्न ॥ कर्णपुटिके होतां भूषण ॥ मग तें दृढ करोनि जतन ॥ हृदयसंपुटीं पाळीतसे ॥ ३५ ॥ महाविश्वासाचे पाठीं ॥ आधींच मोह नांदेल पोटीं ॥ आनंदाची अपार दाटी ॥ आनंदपात्रीं हेलावे ॥ ३६ ॥ जैसे [4]पयाचेनि पात्रीं ॥ घृतशर्करा होय मिश्रिती ॥ तो गोडपणाचा भाग अमृतीं ॥ वाढला कां जाईना ॥ ३७ ॥ कीं दरिद्राचे [5]सुरवाडास ॥ मनीं [6]पेटली राजहौस ॥ ते गजशुंडींची माळा [7]ग्रीवेस ॥ सुख कां वाटलें जाईना ॥ ३८ ॥ कीं वंशवृद्धि ते शून्यमय ॥ चिंताकाळिमा निशा आहे ॥ तैसा सुतमित्राचा होतां उदय ॥ मग तेथ चिंता कासया ॥ ३९ ॥ कीं कवडीसाठीं वेंचितां प्राण ॥ ते [8]मांदुसचि लाधली सुखधन ॥ कीं मृत्युभयाचें असुख मानून ॥ चित्त जडे चिंतासांकडीं ॥ १४० ॥ तों [9]पीयूषाची अनुकूलता ॥ गोडी सुखाचा उदय होतां ॥ मग चिंतानिशीचा आनंदसविता ॥ प्रभेलागीं हेलावे ॥ ४१ ॥ मग स्नेहकवचें करसंपुटीं ॥ तोयें न्हाणिला [10]बाळजेठी ॥ हृदयीं वाहून [11]कामिक पोटीं ॥ सदनीं आणिलें तयातें ॥ ४२ ॥ शारद्वता नामें सुंदरा नारी ॥ ओपिता झाला तिचे करीं ॥ म्हणे साजणी वंशाधारी ॥ सुत मिरवीं लोकांत ॥ ४३ ॥ कीं पाहें पां पूर्ण भरंवसा ॥ कीं राधातनय कर्ण जैसा ॥ तरी तो पुढें [12]राजमांदुसा ॥ जगामाजी आव्हानी ॥ ४४ ॥ तन्न्यायें भाग्योदयें ॥ सर्व सुखशयनीं पहुडावें ॥ अहाहा बाळ अवतार होय ॥ कवि नारायण मच्छेंद्र ॥ ४५ ॥ मग कामिकाहातीं [13]सुढाळ सुता ॥ नवरत्नांच्या सम पाहतां ॥ परम आनंदली शारद्वता ॥ बाळ कवळिला स्नेहमेळीं ॥ ४६ ॥ स्नेहें धरितांच [14]पयोधरीं ॥ पय दाटलें अतिपाझरीं ॥ जैसें [15]सोमतेजकरीं ॥ सोमकांत द्रवतसे ॥ ४७ ॥ असो कुशांचें मंडन ॥ स्नेहभावें होतां संगोपन ॥ मग बाळजठरपिंडींचा अन्न ॥ पय पाहोनि स्वीकारी ॥ ४८ ॥ तैं स्नेहाचा ओघ बाणे ॥ बाळ अंगिकारोनि मार्जनें ॥ तप्तोदकीं घालोनि स्नानें ॥ पालखातें हालवीतसे ॥ ४९ ॥ आधींच नामें शारद्वता ॥ त्यावरी अपत्यकामी कांता ॥ तेथें बाळमोहकाम द्रवतां ॥ कवण रीतीं वर्णावें ॥ १५० ॥ आधींच असतां [16]अमरवेली ॥ त्यावरी पर्जन्यवृष्टि झाली ॥ मग तो हेलावा लवलव पाउलीं ॥ कवणासी वर्णवे ॥ ५१ ॥ ऐसेपरी आनंदस्थितीं ॥

१ सूर्याप्रमाणें तेजःपुंज. २ शब्दरूपी फुलें. ३ आकाशवाणी. ४ दुधाच्या. ५ सुकाळाला. ६ उद्भवली. ७ मानेला. ८ धनाची पेटी. ९ अमृताची. १० मुलांत श्रेष्ठ. ११ अभिलाष किंवा त्या धीवराचें नांव कामिक. १२ क्षत्रियांला. १३ तेजःपुंज. १४ स्तनांस. १५ चंद्रकिरणांनीं. १६ कल्पलता.

दिवस लोटले कांहींसे मिती ॥ पांच वरुषें वयावरुती ॥ मच्छिंद्रनाथ मिरवला ॥ ५२ ॥ तंव कोणे एके दिवसीं ॥ सुदिनीं उदईक भूमीसी ॥ पिता म्हणे तंमारिकन्येसी ॥ चला जाऊं ये मच्छिंद्रा ॥ ५३ ॥ अवश्य म्हणे मच्छिंद्रनाथ ॥ कृतांतभगिनीतीरा येत ॥ मग जळोदरीं संचरोनि तात ॥ मच्छबाळां आव्हानीतसे ॥ ५४ ॥ तंव जाळ्यासवें मीनधाडी ॥ आंतुल्या ओढी करसंपुटीं ॥ बाहेर काढितां कामिक जेठी ॥ महीं मीनांतें सोडीतसे ॥ ५५ ॥ मच्छिंद्रास म्हणे सुतोत्तमा ॥ वेंचोन सांठवीं या मीनां ॥ ऐसें वदोन कामिक पुन्हां ॥ जळामाजी संचरे ॥ ५६ ॥ येरीकडे मच्छिंद्रनाथ ॥ मीन देखतां म्हणे हो तात ॥ अहा मातुळकुळा घात ॥ कामिका ताता मांडिला ॥ ५७ ॥ तरी आपण असतां ऐसी राहटी ॥ बरवेपणें पाहतां दृष्टीं ॥ हें योग्य नव्हे कर्म पाठीं ॥ उपकारा मिरवावें ॥ ५८ ॥ पूर्वीं आस्तिकें मातुळकुळा रक्षिलें ॥ आपुले तपाचेनि बळें ॥ रौंव बोधोनि सत्रपाळ ॥ नागकुळा वांचविलें ॥ ५९ ॥ मग एक एक मत्स्य वेंचोनी ॥ प्रवाहा मेळवी जीवनालागोनी ॥ तें कामिकतातें दृष्टीनें पाहोनी ॥ परम चित्तीं क्षोभला ॥ १६० ॥ जैसा परम सबळ ॥ पेटला मिरवी वडवानळ ॥ तेवीं कामिकक्रोधाग्निप्रबळ ॥ हृदयामाजी धडाडी ॥ ६१ ॥ कीं मेघमंडळाचे दाटीं ॥ चंपळा पळती तेजावटी ॥ तैसा धडाडोनि क्रोध पोटीं ॥ बाहेर आला तत्क्षणीं ॥ ६२ ॥ लक्षोनि मच्छिंद्राचें मुखमंडन ॥ स्वकरपुटीं केलें ताडन ॥ म्हणे जळोदरींचे काढितां मीन ॥ बहु श्रम जाणसी ॥ ६३ ॥ तरी पुन्हां जळोदरीं ॥ मच्छ सोडितोस कैसा भिकारी ॥ खासील काय उदरांतरीं ॥ भीक मागों जाशील ॥ ६४ ॥ ऐसें ऐकोनि कामिकवचन ॥ मनांत मच्छिंद्र करी बोलणें ॥ सर्वांत पवित्र भिक्षान्न ॥ दोष त्यास कांहीं नसे ॥ ६५ ॥ तरी हाच आतां उपदेश ॥ आरंभावें भिक्षान्नास ॥ येरीकडे जळोदरास ॥ कामिक तेव्हां संचरला ॥ ६६ ॥ येरीकडे मच्छिंद्रनाथ ॥ दृष्टी चुकवोनि गमन करीत ॥ भ्रमण करितां अद्वैतवनांत ॥ सुढाळ जागा दिसेना ॥ ६७ ॥ मग उत्तरदिशा बद्रिकाश्रम ॥ पाहता झाला योगद्रुम ॥ तेथें द्वादशवर्षें उत्तमोत्तम ॥ योगालागीं आचरला ॥ ६८ ॥ तें तीव्र तप गा शुचिस्मित ॥ मंत्रदृष्टी अद्वैतवनांत ॥ लोहकंटक पादांगुष्ठांत ॥ देऊनि तप करीतसे ॥ ६९ ॥ ऊर्ध्ववायूचें करून भक्षण ॥ दृष्टि अर्का देऊनि दान ॥ वाचा करोनि कृष्णार्पण ॥ हरिभजनीं मिरवला ॥ १७० ॥ शरीर क्लेशा देऊनि दान ॥ ईश्वरीं वेध तनुमनप्रमाणें ॥ तेणें अस्थिपंजरावरोन ॥ त्वचा तितुकी मिरवतसे ॥ ७१ ॥ तपें भक्षिलें सकळ मांस ॥ परी लाग न लागे अस्थित्वचेस ॥ मांस भक्षोनि सकळ भागास ॥ वृद्धिरस सकळ आटिले ॥ ७२ ॥ नेत्र फिरोन झाल्या वाती ॥ दिसों लागली कार्पासरीती ॥ सकळ तेजाची आटली ज्योती ॥ महाघोर तपानें ॥ ७३ ॥ अस्थि त्वचा व्यक्त होउनी ॥ शिरा दिसती चांगुलपणीं ॥ सर्व अंग गेलें वाळोनी ॥ काष्ठापरी मिरवितसे ॥ ७४ ॥ ऐसे क्लेश असंभावित ॥ मच्छिंद्रअंगीं जाणवत ॥ तों तेथें अकस्मात ॥ अंत्रिनंदन पातला ॥ ७५ ॥ संचरोनि



१ यमुनेला. २ बोलावी. ३ जनमेजय. ४ पाण्यांत. ५ विजा. ६ मासे. ७ काशीक्षेत्रांत. ८ सुखकारी. ९ सूर्याला. १० दत्तात्रेय.

देवालया ॥ स्तविता झाला उमाराया ॥ हे दक्षजामाता करुणालया ॥ दिगंबरा आदिपुरुषा ॥७६॥ कामांतका फणिवेष्टका ॥ रुंडभूषणा कैलासनायका ॥ अपर्णानिधाना कामांतका ॥ वृषभारोहणा महाराजा ॥७७॥ हे सकळ दानवांतका ॥ देवाधीशा उमाकांता ॥ प्रळयरुद्रा त्रिपुरांतका ॥ शूळपाणी महाराजा ॥७८॥ हे शंकरनामाभिधानी ॥ पंचवक्त्रा त्रिनयनी ॥ भस्मधारणा उमारमणी ॥ नरकपाळा विराजवीं ॥७९॥ ऐसें स्तुतीचें वाग्रत्न ॥ दत्त अर्पितां माळा करोन ॥ तेणें तोषोनि[1] कामदहन ॥ प्रत्यक्षपणें मिरवला ॥ १८० ॥ प्रत्यक्ष होतां उमाकांत ॥ नयनीं यजिता झाला दत्त ॥ मग आलिंगोनि प्रेमभरित ॥ निकट आपण बैसला ॥ ८१ ॥ योगक्षेमाची सकळ वार्ता ॥ शिव पुसता झाला दत्ता ॥ तेणेंही सांगोन क्षेमवार्ता ॥ शिवसुखा पूसिलें ॥८२॥ यापरी बोलता झाला दत्त ॥ कीं बद्रिकाश्रमीं कानन बहुत ॥ तरी महाराजा दृष्टी व्यक्त ॥ माजी करा कृपाळुवा ॥ ८३ ॥ मग अवश्य म्हणोनि उमारमण ॥ उभयतां पाहूं चालले कानन ॥ परी ही वासना दत्ताकारणें ॥ मच्छिंद्रदैवें उद्भवली ॥८४॥ जैसा लाभ असतो पदरीं ॥ तो सहज वळून येत घरीं ॥ लघुशंके मूत्रधारीं ॥ मांदुसघट लागतसे॥८५॥ कीं उष्णत्रासें मही चाली ॥ आतुडे[3] कल्पतरूची साउली ॥ तेवीं दत्तवासना उद्भवली॥ मच्छिंद्रदैवप्रकरणीं॥८६॥ कीं याजव्रता टाकिल्या बाहेरी ॥ हिरा ठेवोन नेत गारी ॥ तेवीं दत्तात्रेयवासनालहरी ॥ उदेली मच्छिंद्रदैवानें ॥८७॥ असो ऐशा लाभभावना ॥ उभयतां रमती बद्रिकाश्रमा ॥ नाना तरुप्लवंगमां ॥ अपार चिन्हें पाहती ॥ ८८ ॥ सुरतरु[4] पोफळी ॥ बकुळ चंपक कर्दळी ॥ गुलछबु गुलाब केळी ॥ नारळी सोनकेळी शोभल्या ॥८९॥ कीं सहज पाषाण ढाळितां महीसी ॥ दैवें आतुडे हस्तपादासीं ॥ तेवी मच्छिंद्रदैवउद्देशीं ॥ दत्तवासना उद्भवली॥१९०॥ ऐसे वर्णितां अपारतरू ॥ तरी बद्रिकेचा[5] फार शेजारू ॥ कानना महा निकट मंदारू ॥ मंदराचळ शोभला ॥९१॥ तया वरोन वर्षत तोयधर[6] ॥ मणिकर्णिके अपार नीरँ[7] ॥ ती भागीरथी उत्तमतीर ॥ निजदृष्टीनें पाहिली ॥९२॥ मग तेथ ओघ धरोन ॥ उभयतां करिते झाले गमन ॥ असो मच्छिंद्राकारणें ॥ निजदृष्टीं पाहातील ॥ ९३ ॥ तेथें जी जी होईल वार्ता ॥ श्रीगुरु ज्ञानें होय सांगता ॥ निमित्तमात्र धुंडीसुता ॥ ग्रंथामाजी मिरविलें ॥ ९४ ॥ धुंडीसुत नरहरिवंशीं ॥ मालू वदे कवित्वासी ॥ निमित्तमात्र नरहरिकृपेसी ॥ तोच बोलवी ज्ञानेश ॥ ९५ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ प्रथमोऽध्याय गोड हा ॥ १ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

१ शंकराला. २ शंकर. ३ प्राप्त होते. ४ देवदारवृक्ष. ५ बोरीच्या झाडांचा. ६ मेघ. ७ पाणी.

## ॥ नवनाथभक्तिसार प्रथमाध्याय समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी मूळपीठवासिनी[1] ॥ पुंडलीकाच्या गोंधळालागोनी ॥ भक्तवरदे भवानी ॥ उभी अससी माये तूं ॥ १ ॥ संत गोंधळी विचक्षण ॥ कंठीं मिरविती तुळसीभूषण ॥ तेचि माळा सुलक्षण ॥ जगामाजी मिरविसी ॥ २ ॥ घालिती तुझा प्रेमगोंधळ ॥ कामक्रोधांचे देती बळ[2] ॥ गीतसंगीत सबळ ॥ गुण गाती माये तुझे ॥ ३ ॥ असो ऐशा गोंधळप्रकरणीं ॥ संतुष्ट होसी माय भवानी ॥ तरी या ग्रंथगोंधळीं येऊनी ॥ साह्य करीं जननीये ॥ ४ ॥ मागिल्या अध्यायीं रसाळ कथन ॥ गणादि सकळांचें केलें नमन ॥ उपरी मच्छिंद्राचें जनन ॥ यथाविधी कथियेलें ॥ ५ ॥ आतां पुढें श्रवणार्थी ॥ बैसले आहेत महाश्रोती ॥ तयांची कामना[3] भगवती ॥ पूर्ण करावया येईं कां ॥ ६ ॥ तरी श्रोतीं सिंहावलोकनीं कथन ॥ श्रीदत्तदेव आणि उमारमण ॥ भागीरथीविपिनाकारण ॥ पहात पहात चालिले ॥ ७ ॥ जैसे फलानिमित्त पक्षी ॥ फिरत राहती वृक्षोवृक्षीं ॥ त्याचि न्यायें उभयपक्षी ॥ गमन करिती तीरातें ॥ ८ ॥ सहज चालती [4]विपिनवाटीं ॥ तों मच्छिंद्र देखिला त्यांनीं दृष्टीं ॥ बाळतनू पाठपोटीं ॥ अस्थि त्वचा उरल्या पैं ॥ ९ ॥ जटा पिंगट नखें जळमट ॥ कंटकारी पादांगुष्ठ ॥ कार्पासमय झाली दृष्ट ॥ त्वचा लिपटली अस्थींसी ॥ १० ॥ सर्वांगें शिरा टळटळाट[5] ॥ दिसती अवनीं नामपाठ ॥ ध्वनिमात्र शब्द उठे ॥ चलनवलन नयनांचें ॥ ११ ॥ ऐसा पाहून तपो-जेठी ॥ विस्मयो करिती आपुले पोटीं ॥ म्हणती ऐसा कलीपाठीं ॥ तपी नेणों कोणीच ॥ १२ ॥ अहो विश्वामित्रप्रकरणीं ॥ दिसतो तपी हा मुगुटमणी ॥ तपार्थ कामना अंतःकरणीं ॥ करणी कोण यातें उदेली ॥ १३ ॥ मग दत्तासि म्हणे आदिनाथ[6] ॥ मी स्थिरता राहतों महीं येथ ॥ तुम्हीं जाऊन कामनेतें ॥ विचारावें तयातें ॥ १४ ॥ कवणा अर्थीं कैसा भाव ॥ उचंबळला कामार्णव ॥ तरी लिप्सेचा[7] समूळ ठाव ॥ काय तोही पहावा ॥ १५ ॥ येऊन त्यापरी अत्रिनंदन ॥ शिवानंदसूक्तिक सुढाळ रत्न ॥ श्रवणपुटीं स्वीकारून ॥ तयापासीं पातला ॥ १६ ॥ उभा राहोन समोर दृष्टी ॥ म्हणे महाराजा तपोजेठी ॥ कवण कामना उदेली पोटीं ॥ तें वरदवरातें मिरवावें ॥ १७ ॥ ऐसे वरदाचे वागवट[8] ॥ मच्छिंद्र श्रवण करितां झगट ॥ नम्रभाव धरून प्रकट ॥ तयालागीं बोलत ॥ १८ ॥ कर्णीं शब्द पडतां सुखस्थिती ॥ दृष्टी काढोनियां वरती ॥ पहाता झाला दत्ताप्रती ॥ महाराज योगी तो ॥ १९ ॥ भ्रूसंकेतें करोनि नमन ॥ दाविता झाला निजनम्रपण ॥ जो कीं ईश्वरी आराधन- ॥ प्राप्तीलागीं उदेला ॥ २० ॥ बोले महाराजा कृपासरिता ॥ तुम्ही कोण तें सांगावें आतां ॥ द्वादश वर्षें काननीं लोटतां ॥ मानव नातळे दृष्टीसी ॥ २१ ॥ तरी त्वचित्त सदैव भवानी ॥ प्रत्यक्ष झाली मम प्रारब्धें धरणीं[9] ॥ तरी प्रसादनग[10] अभ्युत्थानीं ॥ स्थापून जाईं महाराजा ॥ २२ ॥ ऐसें तयाचें वागुत्तर ॥ ऐकोनि तोषला अनसूयाकुमर ॥ म्हणे बा रे नामोच्चार ॥ दत्त ऐसें मज म्हणती ॥ २३ ॥ जो व्याघ्रपदीं ऋषिजनन ॥

१ विटेवर उभा अशा पांडुरंगा. २ बळी. ३ इच्छा. ४ रानांत. ५ लखलखित. ६ शंकर. ७ इच्छेचा. ८ शब्द. ९ पृथ्वीवर. १० प्रसादरूपी अलंकार.

अत्रि ऐसें तया नाम ॥ तयाचा सुत मी दासोत्तम ॥ महीलागीं आराधलों ॥ २४ ॥ तरी असो ऐशी गोष्टी ॥ कवण कामना तुझ्या पोटीं ॥ उदेली जे तपोजेठी ॥ शब्दसंपुटीं मिरवीं कां ॥ २५ ॥ येरु म्हणे वरदोस्तु ॥ कामना वरीं एक भगवंतु ॥ ऐसें वदता झाला अतीतु ॥ पदावरी लोटला ॥ २६ ॥ जैसी सासुऱ्यां बाळा असतां ॥ अवचट दृष्टीं पडे माता ॥ हंबरडोनि धांवोनि येतां ॥ ग्रीवे मिठी घालीतसे ॥ २७ ॥ किंवा अवचट वत्सा भेटतां गाय ॥ मग प्रेम लोटी चित्त सदैव ॥ तेणेपरी मच्छिंद्र मोहें ॥ पदावरी लोटला तो ॥ २८ ॥ द्वादश वर्षें तपाचे श्रम ॥ ते आजि फळले मानून उत्तम ॥ सांडोनि सकळ आपुला नेम ॥ पदावरी लोटला तो ॥ २९ ॥ परी तपश्रमाचे बहुत क्लेश ॥ हृदयीं गहिंवरले दुःखलेश ॥ नेत्रींचे झरे विशेष ॥ पदावरी लोटले तैं ॥ ३० ॥ तेणें झालें पादक्षालन ॥ पुढती बोले करी रुदन ॥ हे महाराजा तूं भगवान ॥ महीमाजी मिरविशी ॥ ३१ ॥ रुद्र विष्णू [2]विरिंची सदय ॥ त्रिवर्गरूपी देह ऐक्यमय ॥ ऐसें असोनि सर्वमय ॥ साक्षी महीं अससी तूं ॥ ३२ ॥ तरी येऊनि सर्वज्ञमूर्ती ॥ असोनि माझा विसर चित्तीं ॥ पडलासे किमर्थ अर्थीं ॥ अपराध गळीं सेवोनियां ॥ ३३ ॥ ऐसें म्हणोनि वारंवार ॥ ग्लानींत करी नमस्कार ॥ [3]क्लेशनगींचे चक्षुद्वार ॥ सरितालोट लोटवी ॥ ३४ ॥ तरी तो अत्यंत शांत दाता ॥ म्हणे बा हे न करीं चिंता ॥ प्रारब्धमंदिराचळाची सरिता ॥ ओघ ओघील आतांचि ॥ ३५ ॥ मग वरदहस्तें स्पर्शोनि मौळी ॥ कर्णीं ओपीत मंत्रावळी ॥ तेणें अज्ञानदशाकाजळी ॥ फिटोन गेली तत्काळ ॥ ३६ ॥ जैसें माहात्म्य भारती ॥ उदयदृष्टी करितां गभस्ती ॥ मग अंधकाराची व्याप्ती ॥ फिटोनि जाय तत्काळ ॥ ३७ ॥ तेवीं दत्त [6]वरदघन ॥ वोळतां गेलें सकळ अज्ञान ॥ मग चराचर सकळ जीवन ॥ जैसे हेलावले दृष्टीसी ॥ ३८ ॥ नाठवे कांहीं दुजेपण ॥ झालें ऐक्य ब्रह्मसनातन ॥ जैसें उदधीं सरिताजीवन ॥ जीवना जीवनसम दिसे ॥ ३९ ॥ ऐशी झालिया जीवनसम दृष्टी ॥ [7]आत्रेय धरिता झाला पोटीं ॥ म्हणे बा रे योगीधूर्जटी ॥ इंदिरावर कोठें तो सांग ॥ ४० ॥ येरू म्हणे जी ताता ॥ ईश्वरावांचोन नसे वार्ता ॥ जळीं स्थळीं काष्ठीं महीं पर्वता ॥ ईश्वर नांदे सर्वस्वीं ॥ ४१ ॥ ऐसें ऐकोन वागुत्तर ॥ ग्रीवा तुकावी अत्रिकुमर ॥ मग सच्छिष्याचा धरोनि कर ॥ चालता झाला महाराज तो ॥ ४२ ॥ सहज चालतां चाले नेटीं ॥ आले आदिनाथ प्रेमदृष्टीं ॥ मच्छिंद्र मूर्धकमळधाटी ॥ पदावरी वाहातसे ॥ ४३ ॥ शिवें पाहून मंददेहीं ॥ म्हणे हा पूर्वीं नारायण कवी ॥ मग प्रेमसरितेच्या लोटप्रवाहीं ॥ धरिला हृदयीं तत्काळ ॥ ४४ ॥ मग त्रिवर्ग येऊन त्या स्थानीं ॥ दत्तास म्हणे [9]पंचमूर्धनी ॥ या शिष्यातें [10]अभ्यासोनी ॥ सकळ सिद्धी मिरवीं कां ॥ ४५ ॥ जें वेदकारणाचें निजसार ॥ जें सर्वोपकाराचें गुहागर ॥ सकळ सिद्धींचें अर्थमाहेर ॥ निवेदीं तूं महाराजा ॥ ४६ ॥ जारण मारण उच्चाटण ॥ [11]शापादपि निवारण ॥ 

१ मानेला. २ ब्रह्मदेव. ३ क्लेशरूप पर्वताचे. ४ मस्तक. ५ सूर्य. ६ वररूप उदक देणारा मेघ. ७ श्रीदत्त. ८ योग्यांमध्यें शिरोरत्न. ९ शिव. १० पढवून. ११ शापापासून.

शरादपि [1]अस्त्रादिनिबर्हण ॥ मंत्रशक्ती त्या वरत्या ॥४७॥ जो जैसा कर्मविजे पाठ ॥ होती दैवतें वरतीं भेट ॥ वंशवरद वाक्पट ॥ मस्तकीं स्थापोनी जाताती ॥ ४८ ॥ वरुण आदित्य सोमस्वामी ॥ भौमशक्रादि यमदमी ॥ शिवशक्ति कामतरणी ॥ वर देऊनि उठविले ॥ ४९ ॥ विष्णु विरिंची कृपाकृती ॥ वरदबीजे देऊन शक्ती ॥ ते मंत्रअस्त्रें अपारगती ॥ हृदयामाजी हेलावला ॥ ५० ॥ असो सद्विद्येचा मंदराचळ ॥ उभवोनियां अत्रिबाळ ॥ क्षणमात्र वेंचूनि केला सबळ ॥ [2]सिद्धतरणी जेउता ॥ ५१ ॥ नागबकादि वातास्त्र ॥ नगनागादि महावज्र ॥ [3]पावक जलधी अस्त्र पवित्र ॥ सांगोपांग तो झाला ॥ ५२ ॥ ऐसें सांगोनि सांगोपांग ॥ जाता झाला योगमार्ग ॥ परी सांप्रदाय योजून योग ॥ कानफाडी मिरवला ॥ ५३ ॥ पुढील भविष्य जाणोन ॥ सांप्रदाय केला निर्माण ॥ षड्रूप जोगीदर्शन ॥ कानफाडी मिरवले ॥ ५४ ॥ नाथ ऐसें देऊनि नाम ॥ शिंगी शैली देऊनि भूषण ॥ ऐसें परिकरोनि प्रमाण ॥ अत्रिनंदन पैं गेला ॥ ५५ ॥ यापरी तो मच्छिंद्रनाथ ॥ नमोनि निघाला आदिनाथ ॥ महीवरी नानातीर्थें ॥ शोध करीत चालिला ॥ ५६ ॥ तों भ्रमण करितां सप्तशृंगीं ॥ येता झाला महायोगी ॥ अंबिका वंदोन मनोमार्गीं ॥ सप्रेम स्थितीं गौरविली ॥ ५७ ॥ करीत [4]वैखरीं अंबास्तवन ॥ तों आलें कल्पने मन ॥ कीं कांहीं तरी कवित्वसाधन ॥ लोकांमाजी मिरवावें ॥५८॥ कवित्व तरी करावें ऐसें ॥ कीं उपयोगीं पडे सर्व जगास ॥ मग योजोनियां [5]शाबरीविद्येस ॥ मनामाजी ठसविली ॥५९॥ यापरी अनेक कल्पना करीत ॥ कीं शाबरीविद्येचें करावें कवित ॥ परी वरदगुंतीं वश्य दैवत ॥ केउते रीतीं होतील ॥ ६० ॥ मग अंबेपासीं अनुष्ठान ॥ करिता झाला सप्तदिन ॥ वेदबीजाचें अभिषिंचन ॥ अंबेलागीं करीतसे ॥ ६१ ॥ तेणें जागृत महिषमर्दिनी ॥ होऊनि बोले तयालागोनी ॥ बा रे कवण कामना मनीं ॥ वेधली तें मज सांग ॥ ६२ ॥ येरू म्हणे वो जगज्जननी ॥ शाबरी विद्येचें कवित्व कां मनीं ॥ वेधक परी वरालागोनी ॥ उपाय कांहीं मज सांग ॥ ६३ ॥ उपरी बोले चंडिका भवानी ॥ पूर्णता पावशी सकळ कामनीं ॥ मग त्या सिद्धाचा हात धरोनी ॥ मार्तंडपर्वतीं पैं नेला ॥ ६४ ॥ तेथें नागवृक्ष [6]अचिंत्य थोर ॥ [7]तरु नोहे तो सिद्धीचें माहेर ॥ दृश्यादृश्य केलें पर ॥ महातरु नांदतसे ॥ ६५ ॥ तेथें करोन [8]बीजीं हवन ॥ तरु केला दृश्यमान ॥ तो कनकवर्ण देदीप्यमान ॥ निजदृष्टीं देखिला ॥ ६६ ॥ त्या तरूच्या शाखोपांतीं ॥ नानादैवतें विराजती ॥ मग नामाभिधानें सकळ भगवती ॥ देवतांचीं सांगे त्या ॥ ६७ ॥ तीं दैवतें धुरंधर बावन्न वीर ॥ मूर्तिमंत असती तरुवर ॥ नरसी काळिका महिषासुर ॥ हांमदा झोटिंग वीरभद्र ॥ ६८ ॥ वेताळ मारुती अयोध्याधीश ॥ श्री[9]कोदंडपाणी रामेश ॥ सूर्य नामीं तेथ द्वादश ॥ मूर्तिमंत नांदतसे ॥ ६९ ॥ पायरी जलदेवता असती नव ॥ कुमारी धनदा नंदा नांव ॥ विमळा मंगळा ज्ञानप्राप्तिव ॥ लक्ष्मी आणि विख्याता

---

१ अस्त्रादिकांचें निवारण. २ सिद्ध सूर्य. ३ अग्नि. ४ वाणीनें. ५ मंत्रविद्येला. ६ कल्पनेहून मोठा. ७ वृक्ष. ८ बीजमंत्रानें. ९ धनुष्य हातांत धारण करणारा.

॥ ७० ॥ यापरी चंडा मामुंडा ॥ रंडा कुंडा महालंडा ॥ अप्सरा जोगिनी शंडवितंडा ॥ तरुभागीं विराजल्या ॥ ७१ ॥ काळ व्याळ वीरभैरव ॥ भस्मकेत सिद्धभैरव ॥ रुद्र ईश्वरी गण भैरव ॥ अष्टभैरव हे असती ॥ ७२ ॥ यापरी शस्त्रअस्त्रयामिना ॥ दमि धूमि कुचित भामिना ॥ सातवी ज्वाळा शुभानना ॥ वृक्षावरी त्या असती ॥ ७३ ॥ यापरी शंखिनी डंखिनी यक्षिणी ॥ त्या समुच्चयें असती बारा जणी ॥ अष्टसिद्धी महाप्रकरणी ॥ वृक्षावरी विराजल्या ॥ ७४ ॥ प्राप्ति प्राकाम्या अणिमा गरिमा ॥ ईशित्व वशित्व प्रथिमा महिमा ॥ एवंच अष्टसिद्धी नामा ॥ तरूवरी विराजल्या ॥ ७५ ॥ अष्टसिद्धींसमवेत ॥ बावन्न वीर सकळ दैवत ॥ तया तरूच्या शाखा व्यक्त ॥ करोनियां बैसले ॥ ७६ ॥ ऐसें दृष्टीं पाहिलें सर्वेही ॥ तीं पहाती न बोलती कांहीं ॥ यावरी अंबिका करी काई ॥ निवेदोन नाथातें ॥ ७७ ॥ बा रे ऋषिमुखपर्वतस्थानीं ॥ ब्रह्मगिरीच्या निकटवासनीं ॥ अंजनपर्वत तयास म्हणीं ॥ नदी काचित् आहे बा ॥ ७८ ॥ दक्षिणओघीं सरिता जात ॥ ते कांठीं महाकाळी दैवत ॥ स्थानें असती जाण तेथ ॥ भगवतीतें नमावें ॥ ७९ ॥ तेथोन पुढें दक्षिणपंथीं ॥ सरितापात्रें जावें निगुती ॥ परी बा तेथें श्वेतकुंडें असती ॥ तोयभरित महाराजा ॥ ८० ॥ तरी शुक्लवेल कवळून हातीं ॥ एकएक सोडावी कुंडाप्रती ॥ ऐशीं कुंडें एकशतीं ॥ हस्तिपदसमान आहेत ॥ ८१ ॥ परी तितुकें पूजन कोरडे वेलीं ॥ सकळ सरल्या परत पाउलीं ॥ पाहात यावें ती वल्ली ॥ सकळ कुंडांमाझारी ॥ ८२ ॥ जया कुंडांत सजीव वेल ॥ दृष्टिगोचर बा होईल ॥ तया कुंडीं स्नान वैहिलें ॥ करोन जीवन प्राशिजे ॥ ८३ ॥ तें जीवन प्राशितां निश्चित ॥ मूर्च्छा येईल एक मुहूर्त ॥ तैं बारा नामीं जपावे आदित्य ॥ मूर्च्छेमाजी असतां पैं ॥ ८४ ॥ मग प्रत्यक्ष होईल तमांतक ॥ मौळीं घ्यावा तो हस्तक ॥ पुढें काचकूपिका भरोन उदक ॥ येथें यावें महाराजा ॥ ८५ ॥ मग बारा नामीं करोनि सिंचनीं ॥ तरु न्हाणावा तया जीवनीं ॥ तेव्हां दैवतें प्रसन्न होउनी ॥ वरदान तूतें देतील बा ॥ ८६ ॥ परी एक वेळा न घडे ऐसें ॥ खेपा घालाव्या षण्मास ॥ एक एक दैवत एक खेपेस ॥ प्रसन्न होईल महाराजा ॥ ८७ ॥ ऐसें सांगोन माय भगवती ॥ गेली आपुले स्थानाप्रती ॥ येरु पावला अंजनपर्वतीं ॥ सरितापात्रीं ओघातें ॥ ८८ ॥ काळी महाकाळी देवतांस ॥ नमोनि निघाला काननास ॥ करीं कवळोनि शुक्लवेलास ॥ कुंडालागीं शोधीतसे ॥ ८९ ॥ असो एकशत कुंडें पाहोन ॥ तितुक्यांत शुक्लवेल स्थापोन ॥ पुन्हा पाहे परतोन ॥ सकळ कुंडांमाझारी ॥ ९० ॥ तों आदित्यनामें कुंडीं तीव्र ॥ ते वेल पाहे साचोकार ॥ तों दृष्टीं पडले पल्लवाकार ॥ स्नान तेथें सारिलें ॥ ९१ ॥ स्नान झालिया उदकपान ॥ होतांच व्यापिलें अतिमूर्च्छेन ॥ परी द्वादश नामीं मंत्रसाधन ॥ सोडिलें नाहीं तयानें ॥ ९२ ॥ परी मूर्च्छा ओढवली अतितुंबळ ॥ शरीर झालें अतिविकळ ॥ स्वेद नेत्रें गेला अनिळ ॥ देह सांडोन तयाचा ॥ ९३ ॥

१ नदीच्या कांठानें. २ पांढरी वेल. ३ हत्तीच्या पावलाएवढ्या आकाराचीं. ४ तत्काल. ५ पाणी. ६ दोन घटिका. ७ सूर्य. ८ नदीच्या पात्रांत. ९ खरोखर.

ब्रह्मांडांतोनि अन्तर्ज्योती ॥ तीही वेंघों पाहे अंतीं ॥ तरी आदित्यनांवें जाण हो तीं ॥ जपालागीं नित्य करीत ॥ ९४ ॥ जैसें जागृतीं घडोनि येत ॥ तेंच स्वप्नीं जीव घोकीत ॥ त्याच न्यायें उरला हेत ॥ जीव जपी अर्का तो ॥ ९५ ॥ ऐसें संकट घडतां थोर ॥ खालीं उतरला प्रभाकर ॥ कृपें स्पर्शोनि नयनीं कर ॥ सावध केला महाराज ॥ ९६ ॥ मग कामनेचा पुरवोनि हेत ॥ मस्तकीं ठेविला वरदहस्त ॥ म्हणे बा रे योजिला अर्थ ॥ सिद्धी पावसी येणें तूं ॥ ९७ ॥ ऐसें बोलोन आदित्य गेला ॥ तेणें कांच-कूपिका भरोनि वहिला ॥ पुन्हां मार्तंडपर्वतीं आला ॥ येऊनि नमी अश्वत्थ ॥ ९८ ॥ आदित्यनामें करोन सिंचन ॥ आदित्य तेथें झाला प्रसन्न ॥ म्हणे महाराजा काय कामना ॥ निवेदावी मज आतां ॥ ९९ ॥ येरू म्हणे कवित्व करीन ॥ तया साह्य तुवां होऊन ॥ मंत्रविद्या तव नामानें ॥ फळास येवो महाराजा ॥ १०० ॥ अवश्य म्हणून तमभंजन ॥ मंत्रविद्या साध्य करून ॥ बांधला गेला जलजलोचन ॥ मंत्रशक्तिकार्यार्थ ॥ १ ॥ ऐसा सप्त मास येरझारा करून ॥ दैवतांस करोन घेतलें प्रसन्न ॥ मग शाबरीविद्येचा ग्रंथ निर्मून ॥ बंगालदेशीं चालता झाला ॥ २ ॥ असो ऐसी गोरक्षकथा ॥ वदला आहे किमयागिरिग्रंथा ॥ तेथें किमयांचीं स्थानें सर्वथा ॥ सांगीतलीं आहेत जीं ॥ ३ ॥ परी प्रथम अवघड करणें ॥ तें मानवातें न ये घडोन ॥ ते अवतारी असती परिपूर्ण ॥ म्हणोनि घडलें तयांसी ॥ ४ ॥ परी सांगावया कारण ॥ स्वमुखें गोरक्ष वदला आहे कथन ॥ त्या ग्रंथाचा आश्रय पाहून ॥ नवही योगी वर्णिले ग्रंथीं ॥ ५ ॥ तरी श्रोतीं तया ग्रंथा ॥ दोष न ठेवावा सर्वथा ॥ संशय आलिया किमयागिरिग्रंथा ॥ विलोकावें विचँक्षणी ॥ ६ ॥ मुळावेगळें कांहीं कथन ॥ येत नाहीं जी घडोन ॥ म्हणोन सकळ संशय सांडोन ॥ ग्रंथ श्रवणीं स्वीकारा ॥ ७ ॥ यापरी बळेंच चाळवोनि दोष ॥ निंदोनि जो कां मोडील हरुष ॥ विकल्पपंथीं मिरवितां जगास ॥ पावेल वंशबुडी तो ॥ ८ ॥ आणिक वाणी जाईल झडोन ॥ नरकीं पचेल सप्त जन्म ॥ आणि जन्मोजन्मीं शरीरेंकरोन ॥ क्षयरोग भोगील तो ॥ ९ ॥ असो आतां तीर्थ-उद्देशीं ॥ मच्छिंद्र गेला बंगालदेशीं ॥ तेथें फिरत तीर्थवासीं ॥ हेळे समुद्रीं पातला ॥ ११० ॥ तये देशीं चंद्रगिरि ग्राम ॥ तेथें नर-सिंहाचा झाला जन्म ॥ सुराज पिता विप्रोत्तम ॥ कृतिदेवीकुशीं झाला तो ॥ ११ ॥ असो तेथें जाऊनि नाथ ॥ सहज भिक्षेस हिंडतां गांवांत ॥ तों तेथें भविष्य उत्तरकथेंत ॥ काय वर्तलें तें ऐका ॥ १२ ॥ तया गांवीं गौडब्राह्मण ॥ सर्वोपदयाळ तया नाम ॥ वसिष्ठगोत्रीं आचारनेम ॥ सकळ धर्म पाळी तो ॥ १३ ॥ आधीं तंपन यंजन याजन ॥ स्नानसंध्यांमाजी निपुण ॥ तयाची कांता गुणोत्तम ॥ सरस्वती नामें मिरवतसे ॥ १४ ॥ सदा सुशीळ लावण्यखाणी ॥ कीं नक्षत्रपातीं विराजे मांडणी ॥ वाटे काम इच्छा धरूनि मनीं ॥ तेथें येऊन बैसला ॥ १५ ॥ कीं स्वर्गीं मेघांचें मंडळ पाहीं ॥ तेथोनि चंपळा उदया ये ही ॥ कीं अर्क होऊनि गृहीं गोसावी ॥ तेजभिक्षा

१ आंतील तेज. २ आलिंगूं. ३ सूर्याला. ४ वाटली. ५ कमलनेत्र. ६ या नांवाचा ग्रंथ. ७ शहाण्यांनीं. ८ वंशक्षय. ९ सहज. १० तप करणें. ११ यज्ञ करणें. १२ वीज.

मागतसे ॥ १६ ॥ जियेचे अधरपंवळदेठीं ॥ द्विज[2] विराजती वरती थाटीं ॥ जैसें रत्न हेमीं[3] शेवटीं ॥ स्वतेजें तगटीं मिरवतसे ॥ १७ ॥ भाळ विशाळ सोगयांजन[4] ॥ कुंकुमरसें शोभलें गहन ॥ मुक्तानक्षत्रकविर संगीन ॥ चंद्रबिजोरा विराजवी ॥ १८ ॥ नासिक सरळाकृती ॥ ते शुक्तिकारत्नहेमगुप्ती ॥ मुक्तनळे जैसे गभस्ती[5] ॥ नासिकपात्रीं विराजले ॥ १९ ॥ कर्णीबिंदी वलयाकृती ॥ हेममुगुटीं ढाळ[6] देती ॥ रत्नताटंकें नक्षत्रपातीं ॥ करूं वश्य ती पातले ॥ १२० ॥ असो ऐसी शृंगारखाणी ॥ सकळ संपत्ति नटली कामिनी ॥ रूपवंती सकळ गुणीं ॥ जगामाजी मिरवतसे ॥ २१ ॥ परी उदरीं नाहीं संतान परम ॥ तेणें उंचबळोनि योगकाम ॥ न आवडे धंदा धामाश्रम ॥ सदा वियोग बाळाचा ॥ २२ ॥ देवदेव्हारे उपाय अनेक ॥ करिती झाली कामनादिक ॥ परी अर्थ कोठें उदयदायक ॥ स्वप्नामाजी आतळेना ॥ २३ ॥ नावडे आसन वसन गात्र ॥ विकळ मिरविती निराशगात्र ॥ शून्यधामीं चित्त पवित्र ॥ नांद्णुकीं नांदतसे ॥ २४ ॥ प्रपंच मानिती अतिहीन ॥ जैसें दीपावीण शून्य सदन ॥ कीं सकळस्वरूपीं दाराहरण ॥ परी नासिकहीन मिरवतसे ॥ २५ ॥ कीं व्रजाउपरी गिरे गोमट ॥ परी वसतीस दिसे तळपट ॥ तेथें पाहतां दानवी पिष्ट ॥ कांडिती असें वाटे कीं ॥ २६ ॥ कीं तरुवीण अरण्य कर्कश ॥ कीं सरितांवीण जैसें विरस ॥ मग तें क्षणैक पशुमात्रास ॥ भयंकर दरी वाटतसे ॥ २७ ॥ कीं शरीरीं चांगुलपण ॥ परिधानिलें वस्त्रानें भूषण ॥ परी चतुःस्कंधीं शवदर्शन ॥ सुगम कांहीं वाटेना ॥ २८ ॥ तें शरीर प्राणावीण ॥ आप्तवर्गातें वाटे हीन ॥ तेवीं सर्व उपचार कांतेलागोन ॥ संसार हीन वाटतसे ॥ २९ ॥ असें असतां भावस्थिती ॥ गृहीं दर्शिली योगमूर्ती ॥ नाथ मच्छिंद्र अंगणाप्रती ॥ अलक्ष[7] सवाल वदतसे ॥ १३० ॥ तंव ते कांतेनें पाहून त्यातें ॥ चरणीं लोटली शोकभरितें ॥ आणोनि शीघ्र वस्त्र आसनातें ॥ विराजविला महाराज ॥ ३१ ॥ आपण बैसोनि नाथानिकट ॥ सांगती वियोग शोक उल्हाट ॥ हृदयीं भरोनि नेत्रपाट ॥ क्लेशांबु मिरवलें ॥ ३२ ॥ म्हणे महाराजा अनाथनाथा ॥ तुम्ही सर्वगुणी विद्येस जाणतां ॥ तरी मम हृदयीं शोकसरिता ॥ नाशजळा वाटतसे ॥ ३३ ॥ म्हणे तरी यातें उपाव कांहीं ॥ सांगा म्हणोन लागते पायीं ॥ पुन्हां स्पर्शोनि मौळि प्रवाहीं ॥ कवण शब्दा वाढवीतसे ॥ ३४ ॥ पुढें ठेवोनि भिक्षान्न ॥ पुन्हां कवळी मोहें चरण ॥ आणि नेत्रां घनाची वृष्टि जीवन ॥ पद महीतें सिंचीतसे ॥ ३५ ॥ तेणें मच्छिंद्रचित्तसरिते ॥ मोहसराटे अपार भरुते ॥ शब्दें तोयओघ मिरवत ॥ हातें सुखसरितेसी ॥ ३६ ॥ म्हणे वो साध्वी क्लेशवंत ॥ किमर्थ कामनीं चित्त ॥ तें मज वद कीं चित्तार्थ ॥ सकळां मुक्ती लाहील कीं ॥ ३७ ॥ ऐसे शब्दवर्गउगमा ॥ ऐकोनि बोले द्विजरामा[8] ॥ म्हणे महाराज योगद्रुमा ॥ संतती नाहीं वंशातें ॥ ३८ ॥ तेणें वियोगें खदिरांगार[9] ॥ झगट करितो अतितीव्र ॥ तेणेंकरोनि चित्त शरीर ॥ दाह पावे महाराजा ॥ ३९ ॥ ऐसे क्लेश चित्तशक्ती ॥ कदा न वसे धैर्यपाठी ॥ दुःख गोंधळी शोकपातीं ॥ नृत्य करी कवळूनी

१ पोंवळ्याप्रमाणें लाल ओंठावर. २ दांत. ३ सुवर्णाच्या कोंदणांत. ४ सुरम्याचें अंजन. ५ सूर्य. ६ शोभा, प्रकाश. ७ 'अलख' शब्द. ८ ब्राह्मणपत्नी. ९ खैराचे निखारे.

॥ १४० ॥ तरी हा शोकवडवानळ ॥ जाळूं पाहे धैर्यजळ ॥ त्यांत स्वामींनीं होऊनि दयाळ ॥ शोकाग्नीतें विझवावें ॥ ४१ ॥ ऐसी वदतां वाग्भगवती ॥ प्रेमा उदेला नाथचित्तीं ॥ मग आदित्यनामें मंत्रविभूती ॥ महाशक्ती निर्मीतसे ॥४२॥ नाथाकरीं भस्म चिमुटी ॥ तेथें वीर्य करी राहाटी ॥ मग तें भस्म तपोजेठी ॥ तिये हातीं वोपीतसे ॥ ४३ ॥ म्हणे माय वो शुभानननी ॥ हे भस्मचिमुटी करीं कवळुनी ॥ घेईं सेवीं आपुले शयनीं ॥ निशीमाजी जननीये ॥ ४४ ॥ म्हणसील भस्म नोहे पूर्ण गभस्ती ॥ जो हरिनारायणउदयो कीर्ति ॥ प्रभा मिरवोनि त्रिजगतीं ॥ मोक्ष मांदुसा मिरवेल ॥ ४५ ॥ तरी तूं सहसा हेळवटपणीं ॥ कामना न वरीं भस्मासनीं ॥ म्यांही पुढील भविष्य जाणुनी ॥ चिद्धवानी वदविली ॥ ४६ ॥ या भस्माची प्रतापस्थित ॥ तव उदरीं होईल जो सुत ॥ तयातें अनुग्रह देऊनि स्वतः ॥ करीन सरस ब्रह्मांडीं ॥ ४७ ॥ मग तो सुत न म्हणें माय ॥ सकळ सिद्धींचा होईल राय ॥ जैसा खगीं नक्षत्रमय ॥ शशिनाथ मिरवेल ॥ ४८ ॥ मग तो न माय ब्रह्मांडभरी ॥ कीर्तिरश्मीचे तेजविवरीं ॥ आणि वंद्य होईल चराचरीं ॥ मानवदानवदेवादिकां ॥ ४९ ॥ तरी माये संशयो न धरितां ॥ भक्षीं भस्म सांडोनि चिंता ॥ ऐसी सांगोन सकळ वार्ता ॥ नाथ उठे तेथूनी ॥१५०॥ यावरी बोले शुभाननी ॥ कीं महाराजा योगधामीं ॥ तुम्ही केव्हां याल परतोनी ॥ सुता अनुग्रह वोपावया ॥ ५१ ॥ नाथ ऐकोनि बोले तीतें ॥ म्हणे ऐक वो सद्गुणसरिते ॥ पुन्हां येऊन देईं उपदेशातें ॥ द्वादशवर्षांउपरांतीं ॥ ५२ ॥ ऐसे वदोनि शब्द सुढाळ ॥ निघता झाला सिद्धपाळ ॥ तीर्थउद्देशीं नानास्थळ ॥ महीलागीं लंघीतसे ॥५३॥ येरीकडे भस्मचिमुटी ॥ सदृढ बांधोन ठेविली गांठीं ॥ परी हरुष न राहे पोटीं ॥ उचंबळोनि दाटलासे ॥ ५४ ॥ मग ती सवेंचि नितंबिनी ॥ जाऊनि बैसे शेजारसदनीं ॥ तेथें सात पांच व्रजवासिनी ॥ येऊनि त्या स्थानीं बैसल्या ॥ ५५ ॥ ते त्या जायाशब्दरहाटीं ॥ सहज बोलती प्रपंचगोष्टी ॥ त्यांत ही जाया हर्ष पोटीं ॥ कथा सांगे ती आपुली ॥ ५६ ॥ म्हणे माय वो ऐका वचन ॥ चित्त क्षीण झालें संततीविण ॥ परी आज आला सर्वार्थ घडोन ॥ तो श्रवणपुटें स्वीकारा ॥ ५७ ॥ एक अकस्मात माझ्या सदनीं ॥ बोवा आला कान फाडोनी ॥ कानफाडी केवळ तरणी ॥ मातें दिसून आला तो ॥ ५८ ॥ मग म्यां त्यासी स्तवोन भक्तीं ॥ प्रसन्न केली चित्तभगवती ॥ मग प्रसाद वोपून माझे हातीं ॥ गमन करिता झाला तो ॥ ५९ ॥ तरी तो प्रसाद भस्मचिमुटी ॥ मातें दिधली पुत्रवृष्टी ॥ परी सांगोन गेला स्वयें होटीं ॥ भक्षण करीं शयनांत ॥ १६० ॥ तरी माय वो सांगा नीती ॥ तेणें वाढेल काय संतती ॥ येरी ऐकोनि न मानिती ॥ तेणें काय होईल गे ॥ ६१ ॥ अगे ऐसीं सोंगें महीवरती ॥ किती एक ते ठक बहु असती ॥ नाना कंवटाळें करून दाविती ॥ जग भोंदिती जननीये ॥ ६२ ॥ आणि दुसरा त्यांत आहे अर्थ ॥ कानफाडे कवटाळे व्यक्त ॥ नानापरींच्या विद्या बहुत ॥ तयांपासीं असती वो ॥ ६३ ॥ काय वो सांगूं शुभगात्री ॥

१ पेटींत. २ कोत्या मनानें. ३ महिमा. ४ जगत्पूज्य. ५ राजा. ६ आकाशांतील ग्रहांमध्यें. ७ स्त्री. ८ कानांनीं. ९ सूर्य. १० चेटकें. ११ फसवितात.

कानफाडे कृत्रिम मंत्री ॥ जाया पाहोन शुभगात्री ॥ करिती कुत्री मंत्रानें ॥ ६४ ॥ मग ते तयांतें सर्वे घेउनी ॥ हिंडती वस्ती क्षेत्रमेदिनी ॥ रात्रीमाजी कांता करोनी ॥ सुखशयनीं भोगिती ते ॥ ६५ ॥ तरी दिवसा कुत्री रात्रीं जाया ॥ करिती त्यासी जाण माया ॥ तूं कोणीकडोन भ्रमांत या ॥ पडली आहेस जननीये ॥ ६६ ॥ परी हें आम्हांस दिसतें वोखट ॥ तूं शुभानन जाया[१] अतिबरवंट ॥ पदरीं बांधोन घेतलें कपट ॥ यांत बरवें दिसेना ॥ ६७ ॥ ऐसे बोल बोलतां युवती ॥ भयव्याघ्राची झाली वस्ती ॥ मग ती परम विटून चित्तीं ॥ सदनाप्रती आलीसे ॥ ६८ ॥ मग ती कवळोनि भस्मचिमुटीसी ॥ येती झाली गोठ्यापासीं ॥ तेथें गोरजकेरांसीं ॥ मिरवलीसे उकरडां ॥ ६९ ॥ तयामाजी भस्मचिमुटी ॥ सांडिती झाली ते गोरटी ॥ तयामाजी हरिजेठी ॥ संचार करी महाराज ॥ १७० ॥ जो नवनारायण कीर्तिध्वज ॥ प्रत्यक्ष विष्णु तेजःपुंज ॥ हरिऐसें नाम साजे ॥ कीर्तिरत्नामाझारीं ॥ ७१ ॥ असो ऐशी अदैवराहटी[४] ॥ करोन जाती झाली गोरटी ॥ सदनीं येऊन प्रपंचदिठी ॥ सदा सर्वदा मिरवतसे ॥ ७२ ॥ असो ऐशी कथाअवसर ॥ पुढें निवेदूं ग्रंथ सादर ॥ तरी श्रोतीं क्षीरोदकसार ॥ पुढिले अध्यायीं स्वीकारणें ॥ ७३ ॥ भक्तिसार हा कथार्थ ग्रंथ ॥ शुक्तिकानवरत्नमुक्त ॥ तुम्हां श्रोत्यांचे कर्णग्रीवेंत ॥ भूषणातें शृंगारूं ह्ये ॥ ७४ ॥ यापरी निंदक खळ दुर्जन ॥ असो त्यांचें कांजीपान ॥ तयांचें निंद्य वचन ऐकोन ॥ सोडों नका क्षीरोदका ॥ ७५ ॥ धुंडीसुत मालूचें वचन ॥ नरहरि वदे जग सुगम ॥ भावार्थगुणीं गुंफोन ॥ माळ स्वीकारी श्रोत्यांसी ॥१७६॥ स्वस्तिश्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागार ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ द्वितीयाध्याय गोड हा ॥ २ ॥ अध्याय ॥ २ ॥ ओंव्या ॥ १७६ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ शुभं भवतु ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

१ सौंदर्ययुक्त. २ वाईट. ३ सुरेख. ४ दुर्दैवाची रीत.

## ॥ नवनाथभक्तिसार द्वितीयाध्याय समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी पंढरीशा ॥ रुक्मिणीवरा आदिपुरुषा ॥ पुंडलीकवरदा पुंडरीकाक्षा ॥ सर्वसाक्षी जाणता तूं ॥ १ ॥ हे जगत्पालका जगन्नायका ॥ ब्रह्मांडावरी यादवकुळटिळका ॥ आतां भक्तिसारीं दीपिका ॥ ग्रंथार्थदृष्टीं मिरवावी ॥ २ ॥ मागिले अध्यायीं सिद्धसाधन ॥ श्रीमच्छिंद्रनाथा आलें घडोन ॥ उपरांतिक भस्मदान ॥ सरस्वतीतें तेणें केलें ॥ ३ ॥ केलें परी दैवहत[1] ॥ तिनें टाकिलें गोमहींत[2] ॥ परी फार ठकली अदैववंत ॥ अतिहीन प्रारब्धीं ॥ ४ ॥ घर पुंसत[3] लाभ आला ॥ तो निर्दैवपणें पदीं लोटिला ॥ कीं पुढें मांदुस[4] येतां वहिला ॥ अंध[5] होय आवडीनें ॥ ५ ॥ कीं अवचट[6] लाधला चिंतामणी ॥ तो आवडीं गोंवी गोफणीं ॥ कीं खडा म्हणोनि देतो झोंकोनी ॥ कृषिशेतीं[8] टाकीतसे ॥ ६ ॥ कीं अवचट लाधतां पीयूषघट[9] ॥ विष म्हणोनि करी वीट ॥ तेवीं विप्रजाया अदैवें पाठ ॥ नाडलीसे सर्वस्वीं ॥ ७ ॥ सहज काननीं[10] फिरतां फिरतां ॥ जाऊनि बैसे कल्पतरूखालता ॥ परी दैवइच्छें भूत खाईल आतां ॥ तन्न्यायें नाडली ॥ ८ ॥ कीं कामधेनु गृहीं आली ॥ ती बाहेर बळेंचि दवडिली ॥ तन्न्यायें परी झाली ॥ नाडलीसे सर्वस्वें ॥ ९ ॥ किंवा बाण ढाळितां[11] खेळींमेळीं ॥ निधान[12] लाधला हस्तकमळीं ॥ तो गार म्हणोनि सांडिला जळीं ॥ महाडोहीं निर्दैवें ॥ १० ॥ कीं सहज आतुडे[13] हातीं परीस ॥ खापर म्हणोनि टाकीतसे त्यास ॥ कीं घरा आला राजहंस ॥ वायस म्हणोन दवडिला ॥ ११ ॥ कीं हार देऊं देव उदितें[14] ॥ परी त्यास भासलें परम भूत ॥ तन्न्यायें विप्रकांतेस ॥ घडोन आलें महाराजा ॥ १२ ॥ येरीकडे मच्छिंद्रनाथ ॥ पूर्वसमुद्रीं जगन्नाथ ॥ करोनि सेतुबंधा येत ॥ रामेश्वरदर्शनीं ॥ १३ ॥ तो श्वेतीं[15] येऊन करी स्नान ॥ अवचट देखिला वायुनंदन[16] ॥ क्लेशशरीरा जरा[17] व्यापून ॥ सान[18] शरीरीं बैसला ॥ १४ ॥ तया संधींत मेघ वर्षाव ॥ करिता झाला सहजस्वभाव ॥ दरडी उकरोनि गुहा यास्तव ॥ करिता झाला मारुती ॥ १५ ॥ वरून वर्षाव पर्जन्य करीत ॥ येरू इकडे दरडी उकरीत ॥ तें पाहोनि मच्छिंद्रनाथ ॥ विस्मयातें पावले ॥ १६ ॥ पावला परी हटकोन बोलत ॥ म्हणे मर्कटा तूं मूर्ख बहुत ॥ आतां करिसी सदन[19] निश्चित ॥ स्वशरीर रक्षावया ॥ १७ ॥ पर्जन्य वर्षे विशाळधार ॥ यांत कधीं करसील घर ॥ जैसें तस्करीं[20] लुटलियावर ॥ दीपा तेल भरीतसे ॥ १८ ॥ कीं बाईल गेलिया झोंपा केला ॥ तैसा न्याय घडोन आला ॥ कीं स्वसदनातें पावक[21] लागला ॥ कूप खणी विझवावया ॥ १९ ॥ कीं ग्रीवे पडतां काळफांस ॥ मग वाचिता होय अमरस्तोत्रास ॥ कीं परम पीडितां तृषार्तास ॥ कूप खणूं म्हणतसे ॥ २० ॥ कीं हृदयीं पेटला जठरानळ ॥ कामधेनूचें इच्छिती फळ ॥ किंवा ओसरल्या बीजें रसाळ ॥ महीलागीं पेरीतसे ॥ २१ ॥ तन्न्याय पर्जन्यकाळ ॥ सदन करिसी उतावीळ ॥ तस्मात् मूर्ख मर्कट वाचाळ ॥ मिरवूं आलासी

---

१ दुर्दैवी. २ गोवर टाकण्याच्या उकिरड्यांत. ३ विचारीत. ४ पैशांची पेटी. ५ डोळे मिटतो. ६ एकाएकीं. ७ फेंकून देई. ८ नांगरलेल्या जमिनींत. ९ अमृताची घागर. १० रानांत. ११ सोडितां. १२ ठेवा. १३ सांपडला. १४ तयार. १५ सेतुबंधांत. १६ मारुति. १७ म्हातारपण. १८ आंखडून. १९ घर. २० चोरांनीं. २१ अग्नि.

पुढारां ॥ २२ ॥ ऐसें ऐकोन वायुनंदन ॥ म्हणे चतुर आहेस कोण ॥ येरू म्हणे जतीं पूर्ण ॥ मच्छिंद्र असें मज म्हणती ॥ २३ ॥ येरू म्हणे तूतें जती ॥ कोणेअर्थी लोक म्हणती ॥ नाथ म्हणे प्रतापशक्ती ॥ आहे म्हणोन वदतात ॥ २४ ॥ यावरी बोले वायुसुत ॥ आम्ही आयिकतों जती हनुमंत ॥ तुम्ही नूतन जती महींत ॥ एकाएकीं उदेलां ॥२५॥ तरी आतां असो कैसें ॥ मी मारुतीच्या शेजारास ॥ भावें राहोन एक वेळेस ॥ वरिलें आहे महाराजा ॥ २६ ॥ तेही कला सहस्रांशीं ॥ मातें लाधली महापरेशी ॥ ते तुज दावितों या समयासी ॥ तयापासाव जे प्राप्त झाली ॥ २७ ॥ तरी त्या कळेचें निवारण ॥ करोनि दावीं मजकारण ॥ नातरी जती ऐसें नाम ॥ सोडोनियां जाईं कां ॥ २८ ॥ यावरी बोले मच्छिंद्रनाथ ॥ कोणती कळा ती दावीं मातें ॥ तिचें निवारण श्रीगुरुनाथ ॥ करील जाण निश्चयें ॥ २९ ॥ जैसा श्रीराम असतां शयनीं ॥ पाहे मारुती वृक्षावरोनी ॥ नाना पर्वत टाकी उचलोनी ॥ रामशरीरा योजोनियां ॥ ३० ॥ परी रामें न सोडितां शयन ॥ सज्ज करोन चापबाण ॥ सकळ पर्वतांकारण ॥ निवारण करी तो ॥ ३१ ॥ तन्न्यायें श्रीगुरुराज ॥ सकळ अर्थी पुरवील चोज ॥ सकळ ब्रह्मांडांचें ओझें ॥ नखाग्रीं धरील तो ॥ ३२ ॥ तेथें तुझी मर्कटा कथा ॥ किती असे दावीं आतां ॥ फार करिसील पोषंडता ॥ झोंकसील कवळीनें ॥ ३३ ॥ तरी आतां कां करिसी उशीर ॥ मर्कटा दावीं चमत्कार ॥ ऐसें ऐकतां वायुकुमर ॥ पूर्ण चित्तीं क्षोभला ॥ ३४ ॥ उड्डाण करोनि जाय एकांता ॥ तेथें धरी भीमरूपता ॥ न कळतां त्यातें सात पर्वतां ॥ उचलोनियां फेंकिले ॥ ३५ ॥ नभमंडपीं ढगासमान ॥ पर्वत येतसे पंथीं गगन ॥ तें मच्छिंद्रनाथें दृष्टीं पाहोन ॥ स्थिर स्थिर म्हणतसे ॥ ३६ ॥ वातप्रेरक मंत्रशक्ती ॥ वाटेंत कोंदली पर्वतीं ॥ तों येरीकडे आणिक मारुती ॥ दुसरा पर्वत फेंकीतसे ॥ ३७ ॥ तों दुसरा म्हणतां तिसरा येत ॥ चवथा पांचवा शतानुशत ॥ मग एकाच मंत्रेंकरोनि वात ॥ ठायींचे ठायीं रोधिला ॥ ३८ ॥ जैसे कंदुक बाळ खेळती ॥ मध्यें अटकतां परते पंथीं ॥ तन्न्याय झाला पर्वतीं ॥ ठायींच्या ठायीं जाती ते ॥ ३९ ॥ येरीकडे वायुनंदन ॥ पर्वत परततां दृष्टीं पाहोन ॥ पूर्ण क्षोभला जेवीं कृशान ॥ महाप्रळयकाळींचा ॥४०॥ मग महापर्वत एक विस्तीर्ण ॥ उचलोनि बाहुमस्तकीं अर्पून ॥ फेंकावा तों मच्छिंद्रनाथानें ॥ निजदृष्टीनें देखिला ॥ ४१ ॥ मग अब्धिउदक घेऊनी ॥ वायुआकर्षणमंत्र म्हणोनी ॥ सबळ झुगारोनि पाणी ॥ वायुनंदन सिंचिला ॥ ४२ ॥ तेणें भरोनि शरीरीं वात ॥ चलनवलन सर्व सांडीत ॥ ऊर्ध्व झाले दोन्ही हात ॥ मौळीं पर्वत राहिला ॥ ४३ ॥ मग ते जैसी स्तंभावरी ॥ रचिली म्हणती द्वारकापुरी ॥ तेवीं मारुती शिरावरी ॥ पर्वतातें मिरवीतसे ॥ ४४ ॥ खालीं टाकावया न चले बळ ॥ जेवीं विरला हस्त विकळ ॥ पदीं चालावयाही बळ ॥ कांहीं एक न चाले ॥ ४५ ॥ तें पाहोनियां दीनबाळ ॥ हृदयीं कवळी तांत अनिळ ॥ मग प्रत्यक्ष होऊन वदे रसाळ ॥ सोडीं सोडीं बाळातें



१ कशाकरितां. २ व्यर्थ बडबड. ३ भयंकर स्वरूप. ४ आकाशरूपी मंडपांत. ५ चेंडू. ६ अग्नि. ७ खांद्यावर. ८ मलूल. ९ दीन (मारुती). १० पिता वायु.

॥४६॥ तैं अवश्य म्हणोनि मच्छिंद्रनाथ ॥ पुन्हां प्रेरिला मंत्रवात ॥ मग मौळींचा उतरोनि पर्वत ॥ ठायींचे ठायीं ठेवीतसे ॥ ४७ ॥ मग चलनवलन वातशक्ती ॥ [1]संगीत झाली देहस्थिती ॥ मग समीप येऊन नाथाप्रती ॥ धन्य धन्य म्हणतसे ॥ ४८ ॥ यावरी बोलता झाला [2]अनिळ ॥ बा मारुती तुझें न चले बळ ॥ तुज मज अतिनिर्बळ ॥ बांधोन केलें [3]सिद्धानें ॥ ४९ ॥ जेणें तुझिया बापा बांधिलें ॥ त्यास तुझें भय काय आलें ॥ त्याचें आचरण तैसें झालें ॥ भक्तिशक्ति अघटित ॥ ५० ॥ म्हणसी सिद्धाची मंत्रस्थिती ॥ अघटित असे वदतां उक्ती ॥ तरी माझी भक्ति गुरूची शक्ती ॥ [4]ईश्वरी वांचा म्हणतात ॥ ५१ ॥ येतुल्या पांच शक्ति क्रियावंतासी ॥ सकळ देवता होती दासी ॥ ऐसें ऐकोन अंजनीसुतासी ॥ परम आनंद मिरवला ॥ ५२ ॥ याउपरांतिक मच्छिंद्रनाथ ॥ मारुत मारुती यांच्या चरणीं लागत ॥ म्हणे येथोन तुमचें सख्य उचित ॥ मजवरती असो कां ॥ ५३ ॥ मग प्रसन्न चित्तीं समीर मारुती ॥ म्हणती बा रे त्वत्कार्यार्थी ॥ आम्ही वेंचोन आपुली शक्ती ॥ सुखसंपत्ति तुज देऊं ॥ ५४ ॥ जैसें दानवांच्या काजा ॥ कविमहाराज [5]उशना वर्ते ओजा ॥ तेवीं त्वत्कार्यार्थ [6]भोजा ॥ शक्ती आपुली वेंचूं आम्ही ॥ ५५ ॥ कीं सागरीं टिटवी अंड्यांकरितां ॥ आपुल्या शक्ती झाला वेंचिता ॥ तेवीं महाराजा त्वत्कार्यार्था ॥ शक्ती आपुली वेंचूं कीं ॥ ५६ ॥ कीं [7]विधीच्या संकटांत ॥ विष्णु मत्स्यावतार घेत ॥ तन्यायें त्वत्कार्यार्थ ॥ शक्ती आपुली वेंचूं कीं ॥ ५७ ॥ कीं अवश्य ऋषीचे शापपृष्ठीं ॥ स्वयें विष्णु झाला कष्टी ॥ तन्यायें तुजसाठीं ॥ शक्ती आपुली वेंचूं कीं ॥ ५८ ॥ कीं रामाच्या उपयोगासी ॥ कपि गेले सीताशुद्धीसी ॥ तन्यायें तुजसी ॥ शक्ती आपुली वेंचूं कीं ॥ ५९ ॥ ऐसें वरदवाग्रत्न ॥ ओपून प्रीतीं वायुनंदन ॥ म्हणती बा रे तीर्थागमन ॥ जती नाम मिरवीं कां ॥ ६० ॥ यावरी बोले मच्छिंद्रनाथ ॥ जती नामें होईन विख्यात ॥ परी एक कल्पना उदेली चित्तांत ॥ त्या भ्रांतीतें निवटीं कां ॥ ६१ ॥ येरु म्हणे कल्पना कोणती ॥ उदेली कामना तुझे चित्तीं ॥ नाथ म्हणे तूं सर्वज्ञमूर्ती ॥ आयुष्यभविष्य जाणसी ॥ ६२ ॥ ऐसी सर्वज्ञा असोन नीती ॥ विवाद केला कां मजप्रती ॥ आणि भेटी झाली नागाश्वत्थीं ॥ तुझी माझी पूर्वींच ॥ ६३ ॥ तें शाबरी विद्येचें कवित्व ॥ करवोनि वर दिधला त्यांत ॥ ऐसें असोनि सखया माहीत ॥ [8]रळी व्यर्थ कां केली ॥ ६४ ॥ यावरी बोले वायुनंदन ॥ बा तूं करितां [9]श्वेतीं स्नान ॥ तेव्हां तूतें ओळखोन ॥ तुजपासीं मी आलों ॥ ६५ ॥ तूं कविनारायणाचा अवतार ॥ जननीं भेदिलें मच्छोदर ॥ हें माहीत परी कल्पनेवर ॥ चित्त कांहीं उदेलें ॥ ६६ ॥ कीं नागपत्रीं अश्वत्थासीं ॥ वर ओपिला देवें तुजपासीं ॥ परी त्या सद्विद्येचे सामर्थ्यासी ॥ पाहूं ऐसें वाटलें ॥ ६७ ॥ यावरी पुढें कार्य आणिक ॥ पडलें तूतें अलोलिक ॥ तेथें टिकाव धरणें कौतुक ॥ म्हणोनि शोध शोधिला ॥ ६८ ॥ तरी बा आतां येथोनि गमन ॥ स्त्रीराज्यास करावें मज [10]लक्षोन ॥ तेथें नातळे पुरुष-

१ बरोबर, योग्य. २ वायु. ३ मच्छिंद्रानें. ४ मंत्र. ५ शुक्राचार्य. ६ संतोषानें. ७ ब्रह्मदेवाच्या. ८ भांडण. ९ सेतुबंधरामेश्वरीं. १० माझ्याकरितां.

प्रवेश पूर्ण ॥ परत्रभुवनीं तो पावे ॥ ६९ ॥ बा रे झालें तुझें दर्शन ॥ तुजसीं आहे माझें कारण ॥ मज मस्तकींचें ओझें उतरणें ॥ तुझे हातें होईल ॥ ७० ॥ यावरी बोले मच्छिंद्रनाथ ॥ कैसा झालासी ऋणी व्यक्त ॥ सर्व कामातें वायुसुत ॥ सांगोपांग निरोपी ॥७१॥ येरू म्हणे योगद्रुमा ॥ रामाचें घडलें दास्य आम्हां ॥ सीताशुद्धि पाहोनि उगमा ॥ लंकापति मारविला ॥ ७२ ॥ तैं सीता घेऊनि अयोध्ये जातां ॥ परी सीतेच्या कामना वेधली चित्ता ॥ आहे दासत्व मारुती करितां ॥ महीलागीं हा एक ॥ ७३ ॥ तरी हा असो बा संपूर्ण संपन्न ॥ कांता धन सुत एक सदन ॥ जरी वितुळे सुख संसारीं साधन ॥ कांतेमार्गें होतसे ॥ ७४ ॥ तरी या मारुतीस कांता करोन ॥ भोगवूं सर्वसुखसंपन्न ॥ परी ब्रह्मचारी मम भाषण ॥ मान्य करील कीं नाहीं ॥ ७५ ॥ तरी यातें वचनीं गोंवून ॥ गृहस्थाश्रमी करावा वायुनंदन ॥ ऐसें सीतेनें कल्पोन ॥ पाचारिलें आम्हांतें ॥ ७६ ॥ जवळी बैसवोन स्नेहानें ॥ स्वकरें मग मुख कुर्वाळोन ॥ म्हणे बा मारुती तूं धन्य ॥ तिहीं लोकीं अससी पैं ॥ ७७ ॥ तरी बा माझें एक मागणें ॥ देसील तरी फार उत्तम मानीन ॥ यावरी तूंही नकार मजलागोन ॥ देणार नाहीं सहसाही ॥ ७८ ॥ उदार वेंचिती आपुला प्राण ॥ परी नकार न देती वाचेकरोन ॥ शिबिरायानें कपोताकारणें ॥ मांस दिधलें रती रती ॥ ७९ ॥ पाहें श्रियाळ उदारकीर्ती ॥ बाळ दिधलें याचकाहातीं ॥ तन्यायें त्याच पंक्तीं ॥ तूंही अससी कपींद्रा ॥ ८० ॥ ऐसें ऐकतां जननीवचन ॥ परम तोषला वायुनंदन ॥ म्हणे माय वो कामना कोण ॥ [2]उदित [3]करीं देईन मी ॥ ८१ ॥ येरी म्हणे [3]करतलभाष्य ॥ देसी आपुल्या सद्भावास ॥ तरी मम कामनेची हौस ॥ दृश्य करीन तुज बा रे ॥ ८२ ॥ मग करीं कर ओपोनि शेवटीं ॥ म्हणे मागाल ते कामना होटीं ॥ ते मी देऊन चित्तसंतुष्टी ॥ मिरवीन जननीये ॥ ८३ ॥ येरी म्हणे मम कामना ॥ तुवां आचरावें गृहस्थाश्रमा ॥ कांता करोन संसारउगमा ॥ सर्व सुख भोगावें ॥ ८४ ॥ ऐसी ऐकतां [4]वागवटी ॥ सप्रेम खोंचला आपुल्या पोटीं ॥ म्लानवदन चित्त [5]हिंपुटी ॥ परम संकटीं पडियेला ॥ ८५ ॥ मग न देतां मातेसी कांहीं उत्तर ॥ येऊनि बैसला रामासमोर ॥ परी चित्तवृत्ति [6]कोमीत मुखचंद्र ॥ श्रीरघूत्तमें पाहिला ॥ ८६ ॥ मग जवळी पाचारोनि हृदयीं ॥ धरित आली दयाळ आई ॥ म्हणे बा रे तुझा व्यर्थ केवीं ॥ मुखचंद्र वाळला ॥ ८७ ॥ मग प्रांजळीं सर्व कथन ॥ श्रीरामातें निवेदून ॥ नेत्रीं अश्रु म्लान वदन ॥ मी करोनियां बैसलों ॥ ८८ ॥ परी अतःसाक्ष रघुकुळटिळक ॥ म्हणे वायां न मानीं दुःख ॥ स्त्रीराज्याच्या स्त्रिया सकळिक ॥ कांता असती तुझ्याचि ॥ ८९ ॥ तरी बा याचें ऐक कथन ॥ कृत त्रेत द्वापार कलि पूर्ण ॥ या चोहों युगांतें म्हणतीं निपुण ॥ चौकडी एक ही असे ॥ ९० ॥ तरी बा ऐशा चौकड्या किती ॥ तीनशें शहाण्णव बोलती मिती ॥ तूतें मातें चोहों चौकड्यांप्रती ॥ जन्मा येणें आहेचि ॥ ९१ ॥ मी नव्याण्णवावा राम [7]क्षितीं ॥ तूंही नव्याण्णवावा मारुती ॥ आणि

१ रावण. २ बोलून दाखव. ३ हातावर प्रमाण. ४ भाषण. ५ कष्टी. ६ कोमेजली. ७ पृथ्वीवर.

लंकाधीश याच नीतीं ॥ नव्याण्णवावा असे तो ॥ ९२ ॥ यावरी चौदा चौकड्यांचें राज्य रावण ॥ करील ऐसें बोलती वचन ॥ परी चौदा अंकींचा आंकडा मागोन ॥ आंख नेला विधीनें तो ॥ ९३ ॥ मग उरला वरील एक चतुर्थ ॥ तितुक्या चौकड्या राज्य करीत ॥ परी सांगावया कारण त्यांत ॥ आपण मारोनि येतसे ॥ ९४ ॥ मग आल्यावर स्त्रीराज्यांत ॥ जाणें लागे मारुती तूतें ॥ तरी बा पाळी तुझी निश्चित ॥ आली आहे ती भोगीं कां ॥ ९५ ॥ ऐसें म्हणतां श्रीराम वेहिला ॥ मग म्यां त्यातें प्रश्न केला ॥ कीं दृढ कासोटी आहे मजला ॥ भेटी केवीं कामरती ॥ ९६ ॥ मग राम म्हणे बा ऊर्ध्वरेती ॥ आजपासोनि असे मारुती ॥ तयाच्या भुभुःकारें श्वाससंगतीं ॥ गरोदर होती त्या स्त्रिया ॥ ९७ ॥ तरी तूं सकळ संशय सांडोन ॥ शैल्यदेशीं करीं गमन ॥ तुझें ब्रह्मचारिपण ॥ ढळत नाहीं महाराजा ॥ ९८ ॥ ऐशी वार्ता होतां निश्चितीं ॥ मग म्यां स्वीकारिलें शैल्यदेशाप्रती ॥ यावरी तेथेंही स्त्रिया नृपती ॥ मेनाका नामें विराजली ॥ ९९ ॥ तीतें पृथ्वीची देशवार्ता ॥ ऐकींव झाली कीं पुरुषकांता ॥ देशोदेशीं उभयतां ॥ रमत आले स्वइच्छें ॥ १०० ॥ देवदानवमानवांसहित ॥ पशुपक्षिनागजात ॥ सकळ स्त्रीपुरुष उभयतां ॥ इंद्रियसुखें सुखावती ॥ १ ॥ कामरती मंथनाकार ॥ रतीस अर्पिती कामिक नर ॥ ऐसा जाणोनि मनीं विचार ॥ परम चित्तीं क्षोभली ॥ २ ॥ मग तिनें मांडिलें अनुष्ठान ॥ मनामाजी काम वरोन ॥ कीं प्रत्यक्ष होऊनि वायुनंदन ॥ रतिरत्न अर्पू त्या ॥ ३ ॥ ऐसा काम वरोनि चित्तीं ॥ बैसलीसे दृढ तपापरती ॥ मांसा तोडोन यज्ञकुंडीं आहुती ॥ मम नामीं अर्पीतसे ॥ ४ ॥ ऐसे लोटले द्वादशवर्ष ॥ सकळ आटिलें शरीरमांस ॥ मग ती पाहोनि अति कृश ॥ प्रसन्न झालों मी तीतें ॥ ५ ॥ परी तीतें होतां माझी भेटी ॥ पदीं मौळी घालोनि मिठी ॥ म्हणे अर्थ जो उद्भवला पोटीं ॥ तो सिद्ध करीं महाराजा ॥ ६ ॥ मग मी विचारिता झालों तीतें ॥ कीं कवण कामनासरिताभरिते ॥ मज सांगोन अर्थरसातें ॥ सुखसमुद्रा मेळवीं ॥ ७ ॥ ऐसें ऐकतां वचनोत्तर ॥ म्हणे महाराजा वायुकुमर ॥ तुझेनि स्त्रिया गर्भिणी समग्र ॥ होऊन मिरवती महाराजा ॥ ८ ॥ तरी तूं सकळांचा प्राणेश्वर ॥ स्मरा ओपीं भुभुःकार ॥ तरी ते नादें रतिनार ॥ सुख पावे सकळांसी ॥ ९ ॥ तरी नादबुंदा सुखासना ॥ मैथुनरतीं धरीं कामना ॥ हे मार्ग सकळ देशकारणा ॥ स्वर्गमृत्युपाताळीं ॥ ११० ॥ तरी कां कर्म आमुचेंच ओखट ॥ स्वप्नीं दिसेना ऐसा पाठ ॥ तरी तूं स्वामी आमुचा अलोट ॥ तें सुख आम्हां मिरवीं कां ॥ ११ ॥ ऐसें वदतां स्त्रिया भूषणीं ॥ मग मी बोलिलों तियेलागोनी ॥ कीं ऊर्ध्वरेता जन्माहूनी ॥ दृढकांसोटी विराजिलों ॥ १२ ॥ जेथें उदय झालों जठरीं अंजनी ॥ ते उदरां दृढकौपिनी ॥ मातें प्राप्त शुभाननी ॥ कनककासोटी ती असे ॥ १३ ॥ तस्मात् दृढ इंद्रियसंपत्ती ॥ ढाळे लागले भांडारग्रंथीं ॥ तेणें इंद्रियव्यवहारशक्ती ॥ जगामाजी मिरवेना ॥ १४ ॥ म्हणून कामा ऊर्ध्वगमन ॥ श्वासोक्त रतिकामद्रुम ॥ तुम्हां स्त्रियांचा रति-

१ रावण. २ मागचा आंकडा (एक). ३ सत्वर. ४ मारुति. ५ केवळ तप स्वीकारून. ६ खपलें. ७ मस्तक. ८ हेतू. ९ इष्ट हेतु. १० दे. ११ वाईट.

आश्रम ॥ शांत तेणें पावतसे ॥ १५ ॥ तरी त्वत्तपाच्या श्रमध्वजा ॥ मच्छिंद्र नगरीं विराजवूं ओजा ॥ तें चित्तदैव रतिकाजा ॥ कामभक्तीं तुष्टेल ॥ १६ ॥ म्हणोन मच्छिंद्र आहे कोण ॥ तरी तो प्रत्यक्ष कविनारायण ॥ त्वत्तपाच्या कामीं बैसोन ॥ फलद्रुम होईल कीं ॥ १७ ॥ ऐसें बोलोन तीर्थावर्ती ॥ तुष्ट केली सकाम अर्थीं ॥ तरी तूं जाऊन मनोरथीं ॥ तुष्ट करीं महाराजा ॥ १८ ॥ येरू म्हणे ऊर्ध्वरेता ॥ मातें कार्य हें निरोपितां ॥ तरी ब्रह्मचर्यत्व समूळ वृथा ॥ आंचवलें जाईल ॥ १९ ॥ मी तों उदास कामशक्ती ॥ नोहे म्हणतील नाथपंथी ॥ जती नामीं जगविख्याती ॥ जगामाजी मिरवलों ॥ १२० ॥ तरी ऐसी कुकर्मराहटी ॥ मातें घडोन येतां जेठी ॥ मग वाग्देवतानिंदादिवटी ॥ येऊन जगीं मिरवेल ॥ २१ ॥ यावरी आणिक सिद्ध जगीं ॥ नागपंथी आहेत योगी ॥ तेही योगपंथ ते प्रसंगीं ॥ विटाळ माझा करतील ॥ २२ ॥ एवं स्त्रीसंग अश्लाघ्य फार ॥ अपकीर्तीचें दृढ भांडार ॥ सर्वविनाशी मोहनास्त्र ॥ स्वीकारावें हें वाटेना ॥ २३ ॥ स्त्रियांसंगें बहु नाडले ॥ अपकीर्ती जगीं मिरवले ॥ आणि सर्व सुकृता आंचवले ॥ रितें पोतें तें वाताचें ॥ २४ ॥ पाहें अमरेंद्र झाला भग्न ॥ चंद्र मिरवला कलंकेंकरून ॥ समूळ राज्यविनाश रावण ॥ स्त्रीलोभें नाडला तो ॥ २५ ॥ विधिसुताची ब्रह्मकासोटी ॥ तीही क्षणमात्रें झाली सुटी ॥ साठ पोरें निर्मून पोटीं ॥ दैन्यभाजा वरियेली ॥ २६ ॥ याच नीतीं तदा तात ॥ अकर्मप्रवाहीं कन्ये रत ॥ विधि ऐसें नाम उचित ॥ अविधिपणें बुडविलें ॥ २७ ॥ पहा तपी तो त्र्यंबक ॥ तपियांमाजी असे अर्क ॥ परी कामदरीं अस्तोदक ॥ भिल्लिणीउदधीं लुब्धला ॥ २८ ॥ तन्न्याय तपोजेठी ॥ काम रंभेच्या करोन पोटीं ॥ आंचवोन तप घे नरोटी ॥ तन्न्यायचि मिरवतसे ॥ २९ ॥ ऐसा विश्वामित्र तो अमित्र झाला ॥ याच नीतीं वदसी मला ॥ तरी वन्ही कामदरीला ॥ व्याघ्रभया नांदविसी ॥ १३० ॥ ऐसें ऐकोन मच्छिंद्रवचन ॥ म्हणे बा रे योगद्रुमण ॥ ही अनादि राहटी पूर्ण ॥ भोग भोगितां निर्दोष ॥ ३१ ॥ जैसें रामें मजला कथिलें ॥ नव्याण्णव मारुती असे वदले ॥ तन्न्यायें तुम्ही भले ॥ नव्याण्णवावा अससी तूं ॥ ३२ ॥ तरी अनादि राहटी ॥ भोगिता झाला भामिनी वीस कोटी ॥ मौनिनाथ येऊनि पोटीं ॥ कीर्तिअर्क मिरवेल ॥ ३३ ॥ तव तात जो उपरिचरवसु ॥ तो तव उदरीं येईल वसु ॥ कीर्ति ते महीप्रकाशु ॥ महाप्रचंड मिरवेल ॥ ३४ ॥ ऐसें सांगोन वायुसुत ॥ प्रसन्न केलें चित्तदैवत ॥ मग वरप्रदानवाणी रुकारवंत ॥ मच्छिंद्रनाथा देतसे ॥ ३५ ॥ जैसें शुक्रें अमित्रसुता ॥ प्रसन्न होऊन चित्तसविता ॥ देऊनि मंत्रसंजीवनीअर्था ॥ प्रभुलागीं मिरवेल ॥ ३६ ॥ तेवीं अमित्रकुळजा ॥ राज्य स्थापिलें भक्तिकाजा ॥ नेणूं बिभीषण शत्रु अनुजा ॥ केला सरता चिरंजीव ॥ ३७ ॥ तन्न्यायें घातक वसु ॥ नेणोन कामशरा पासु ॥ रुकार ते समयासु ॥ अंजनीसुत पैं केला ॥ ३८ ॥ मग करोनि नमनानमन ॥ अवश्यपणें करितां गमन ॥ अदृश्य पाहोन वायुनंदन ॥

१ नाश पावेल. २ निंद्य. ३ पुण्याला. ४ नारदाची. ५ ब्रह्मदेव [ नारदाचा बाप ]. ६ मच्छिंद्राचा पिता. ७ शत्रूच्या मुलाला [ कचाला ].

मच्छिंद्रनाथ चालिला ॥ ३९ ॥ सहज चालिला महीपाठीं ॥ अर्थी हिंगळा द्यावी भेटी ॥ ऐसें गमोन तया वाटीं ॥ येऊनियां पोंचला ॥ १४० ॥ तंव ते शक्तिद्वारीं ॥ रक्षक असती दक्षाचारी ॥ अष्टभैरव कृतांत संगरीं ॥ जिंकूं पाहती कृतांता ॥ ४१ ॥ आणि शतकोटी चामुंडा ॥ शंखिनी डंखिनी प्रचंडा ॥ त्याही तीव्र ब्रह्मांडा ॥ ग्रासूं पाहती कृतांतपणीं ॥ ४२ ॥ यावरी अर्णव[1] बहु कर्कश ॥ नाना पर्वत विशेष ॥ त्यांत व्याघ्रादि सावजें रीस ॥ येऊं येऊं म्हणताती ॥ ४३ ॥ म्हणे ते अर्णव सहज बोली ॥ परी नोहे कृतांताची बैसे पाली ॥ कीं पूर्वीं दानवांनीं आणोन ठेविली ॥ भयें माया त्या ठायीं ॥ ४४ ॥ कीं ते अर्णव पाहतां सहज ॥ तेंचि देवतांचें तेज ॥ विरून जाय मोडे माज ॥ नको नको म्हणवूनी ॥ ४५ ॥ कंटकवन जाळिया संधी ॥ भयानक सावजें अपार मांदी[2] ॥ पाहतांक्षणीं कामनाबुद्धी ॥ विरोन जाय तत्काळ ॥ ४६ ॥ तेथें न पावे वायुनंदन ॥ परम भयभीत मन ॥ कृतांतपत्नीचें कानन ॥ भक्षील म्हणोन पळतसे ॥ ४७ ॥ असो ऐसी वातगोष्टी ॥ मित्र उदेल परम पाठीं ॥ कीं येथें संचरतां रश्मिदाटी ॥ ग्रासील मग काय करूं ॥ ४८ ॥ येऊन तेपरी कानन पाहतां ॥ रश्मी संचारून देई सविता ॥ असो ऐशी काननवार्ता ॥ संकट भयाचें स्थान चित्तातें ॥ ४९ ॥ तेथें सिद्धमुनि राव ॥ संचरेल आपुल्या प्रतापें गौरव ॥ ती कथा रसज्ञ ज्ञानदेव ॥ श्रीगुरुज्ञान माझा वदेल कीं ॥ १५० ॥ तरी स्मृतीं ठेवोन हेत ॥ प्राशन करा कथामृत ॥ मग भवरोगाचें अपार भरितें ॥ दुःखलेश नांदेना ॥ ५१ ॥ हा ग्रंथ केवळ चिंतामणी ॥ हरेल चित्ताची काळजी मुळींहूनी ॥ जैसें वृश्चिकदंशालागोनी ॥ विष शोषी महाराजा ॥ ५२ ॥ तरी होऊन सद्विवेक ॥ सांडा कुटिलपणीं[3] तर्क ॥ निंदा दोष विघ्न भातुक ॥ सेवूं नका सहसाही ॥ ५३ ॥ निंदाशक्ती परम पापिणी ॥ अतिरंजक नीचवदनी ॥ परी आमुची मायबहिणी ॥ पवित्र करील आम्हांतें ॥ ५४ ॥ जो या निंदेस प्रतिपाळील ॥ तो सखा अद्भुत आमचा स्नेहो विपुळ ॥ पातकमळाचें क्षालन करील ॥ वारंवार इच्छीतसे ॥ ५५ ॥ धुंडीसुत नरहरवंशीं ॥ माल्र स्नेह करी निंदकासीं ॥ बहुत आयुष्य इच्छी त्या मानवासी ॥ उपकारी म्हणोनी ॥ ५६ ॥ तरी असो आदर श्रोतीं ॥ तुम्हीं न बैसावें तया पंगतीं ॥ माल्र तुम्हांतें हीच विनंती ॥ वारंवार करीतसे ॥ ५७ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागार ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ तृतीयाध्याय गोड हा ॥ १५८ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

१ समुद्र. २ समुदाय. ३ नास्तिकपणानें.

## ॥ नवनाथभक्तिसार तृतीयाध्याय समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी करुणानिधे ॥ आगमअगोचर[1] विशाळबुद्धे ॥ सकळमुनिमानसहृदयवृंदे ॥ उद्यान[2] वाटे आनंदाचें ॥ १ ॥ हे योगिमानसरंजनी ॥ पंढरीशा मूळपीठणी ॥ पुंडलिकाचे आराध्य स्वामिणी ॥ उभी अससी विटेवरी ॥ २ ॥ सौम्य दिससी परी नीटक ॥ बहुत ठक चित्तचालक ॥ भक्तमानस भावहारक ॥ छिनाल सुकृत[3] उरों नेदीं ॥ ३ ॥ पहा कैसी बकासमान ॥ नासाग्रभागीं दृष्टी देऊन ॥ कोणी म्हणेल गरीबावाण ॥ चांगुलपण मिरवीतसे ॥ ४ ॥ परी ही अंतरींची खूण ॥ नरहरि मालु एकचि जाणे ॥ भक्तीविषयीं लंपट वासना ॥ मनामाजी हुटहुटी ॥ ५ ॥ सुकर्म हृदया घालून हात ॥ युक्तिप्रयुक्तीं काढून घेत ॥ पुढेंपुढें होऊन कार्यार्थ ॥ आपुले त्यां संपादीं ॥ ६ ॥ पहा दामाजीचें दायधन ॥ गटकन गिळिलें अभिलाषून ॥ कंगालवृत्ती सोंग धरून ॥ देव महार झाला असे ॥ ७ ॥ नरहरि सबळ सुवर्णकर्म[4] ॥ तयाच्या विषयीं वरिला काम ॥ भांडावें तों जन्मोजन्म ॥ शिवमौळीं राहतसे ॥ ८ ॥ कुब्जादादुला[5] वांकुडातिकुडा ॥ नाहीं म्हणे तिला झाला पुंडा ॥ वृंदा पुरुषही जाडा ॥ स्मशानवस्ती केलीसे ॥ ९ ॥ ठकवोनि मारिला काळयवन ॥ सोळा सहस्र दादुला होऊन ॥ शेवटीं न पावे समाधान ॥ ब्रह्मस्थिती वरिलीसे ॥ १० ॥ चक्षुगोचर[6] होत जें जें ॥ तें मागूं शके अति निर्लज्जें ॥ सुदामाचें सुकृत साजे ॥ कोरडें म्हणे सहसाही ॥ ११ ॥ काय वरिला मृत्यु दुकाळानें ॥ द्रौपदीचीं खाय भाजीपानें ॥ हात वोडवून लाजिरवाणें ॥ मिटक्या मारून भक्षितसे ॥ १२ ॥ शबरीचीं बोरें उच्छिष्ट पाहून ॥ न म्हणे भक्षी मन लावून ॥ चोखियाचा पदार्थ गोड पाहून ॥ ऱ्हदासहित सारितसे ॥ १३ ॥ नामा बाळ ठकवूनी त्वरित ॥ नैवेद्य भक्षित हातोहात ॥ तस्मात् किती दुर्गुणांत ॥ सद्गुणांतें आणावें ॥ १४ ॥ असो ऐसे परम ठकणी ॥ येऊन बैसली ग्रंथश्रेणी[7] ॥ मम चित्तातें समूळ घेउनी ॥ पायांपासीं ठेवीतसे ॥ १५ ॥ असो तिचे वरदेंकरून ॥ श्रोते ऐका आतां कथन ॥ श्रीमच्छिंद्र योगी पूर्ण ॥ हिंगळाकारणीं संचरला ॥ १६ ॥ मागिले अध्यायीं कथन ॥ मच्छिंद्रमारुतीचें युद्ध होऊन ॥ शेवटीं प्रीति विनटून ॥ हिंगळाख्यस्थाना पावले ॥ १७ ॥ ती ज्वाळामुखी भगवती ॥ महाप्रदीप्त आदिशक्ती ॥ तेथें जाऊन द्वाराप्रती ॥ मच्छिंद्रनाथ पोंचले ॥ १८ ॥ तंव तें द्वार पाहतां क्षितीं[8] ॥ उंचबाहु सार्धशत ॥ औरस चौरस षंडशत[9] ॥ विराजलेंसे द्वार तें ॥ १९ ॥ ते द्वारीं प्रचंड ॥ अष्टभैरव महाधेंड[10] ॥ त्यांनीं नाथपंथ पाहून वितंडं ॥ चित्तांत कामना उदेली ॥ २० ॥ नागपत्रअश्वत्थठायीं ॥ मच्छिंद्रनाथ हा गोसावी ॥ नेमाचरणीं विद्याप्रवाहीं ॥ प्रसन्न केलें देवातें ॥ २१ ॥ तरी शाबरीविद्याकवित ॥ येणें केलें वरदस्थित ॥ तरी तें प्रांजळ कायस्थ ॥ केवीं झालें तें पाहूं ॥ २२ ॥ ऐसा काम धरून पोटीं ॥ युद्धरीतीच्या सुखालोटीं ॥ अष्टही भैरव एकथाटीं ॥ प्रत्यक्ष झाले द्वारातें ॥ २३ ॥ अंगें नमूनी संन्यासरूपा ॥ देहपंकजा दावून तद्रूपा ॥ म्हणती महाराजा योगदीपा ॥ कोठें जासी तें सांग ॥ २४ ॥ येरू म्हणे

१ वेदाला न सांपडणाऱ्या. २ बाग. ३ वाईट पुण्य. ४ सोनार. ५ कुब्जेचा नायक. ६ डोळ्यांला प्रत्यक्ष. ७ ग्रंथपंक्ती. ८ पृथ्वीवर. ९ सहाशें. १० मोठा.

शक्तिदर्शन ॥ न घेणें उदेलें अंतःकरण ॥ तरी तुम्ही आहांत संन्यासधाम ॥ तुम्हा जाणें आहे कां ॥२५॥ तंव ते म्हणती जोगिया ऐक ॥ आम्ही येथेंचि स्थायिक ॥ भगवतीकाजा वरदायक ॥ द्वारपाळ म्हणवितों ॥ २६ ॥ तरी येथें कामनास्थित ॥ दर्शनार्थ कोणी येत ॥ तरी पापपुण्य पुसोनी त्वाग्रत ॥ मार्गापरी योजीतसों ॥ २७ ॥ अगा पुमांसा प्राणी शब्दरचनें ॥ दिसून येतां चित्तकामनें ॥ त्या प्रसादून अंबादर्शनें ॥ सिद्ध करितों महाराजा ॥ २८ ॥ आणि पापकलह अर्थ धूर्जटी ॥ आमुतें दिसून येतां दृष्टी ॥ त्यास मागें परतवून राहटी ॥ तो पुरुष दर्शनास मिरवेना ॥ २९ ॥ तस्मात् वागोत्तराचे देठीं ॥ प्रसाद मिरवला हो शेवटीं ॥ तरी त्वत्कामना उदेली पोटीं ॥ अंबादर्शनीं मिरवावें ॥ ३० ॥ तरी महाराजा योगद्रुमा ॥ पापपुण्यांचा झाडा आम्हां ॥ दर्शवोनि दर्शनकामा ॥ स्वस्थ करीं रतिसुखा ॥ ३१ ॥ नंतरीं आला अर्थकंदर्प ॥ येथें करितां कांहीं लोप ॥ तरी संचार करितां द्वारमाप ॥ मध्यें अटक महाराजा ॥ ३२ ॥ द्वार सांकडें होतें अतिसान ॥ गुंते करितां अनृत भाषण ॥ मग त्यातें मागें वोढून ॥ पूर्ण शिक्षा दावितों ॥ ३३ ॥ तस्मात् तुमची कर्मराहटी ॥ झाली जैसी महीपाठीं ॥ तीतें दर्शवून वाग्दिवटीं ॥ दर्शनातें दर्शिजे ॥ ३४ ॥ येरू म्हणे द्वारस्थ बापा ॥ आम्ही नेणों पुण्यपापा ॥ कर्मसुकर्म अर्थकंदर्पा ॥ ईश्वरी अर्थी केलें असे ॥ ३५ ॥ जैसेया लहराभास ॥ उभय नातळे त्या सुखास ॥ हर्षदरारा सावधपणास ॥ ठायीं ठायीं स्फुरतसे ॥ ३६ ॥ तो नौकासरितातोयीं जात ॥ दों थडीं रुंख दिसती पळत ॥ दों थडींचा बा एक साक्षिवंत ॥ सुखा पळ नेणेचि ॥ ३७ ॥ कीं तो व्यक्त बहु घटक्षितीं ॥ अंतरदिवटा बहु गभस्ती ॥ परी त्याची सदा दीप्ती ॥ नयनीं मिरवे महाराजा ॥ ३८ ॥ तुटून नीतिपुण्यद्रुमा ॥ आम्ही नेणों पाउलीं उगमा ॥ तंव ते म्हणती नरेंद्रोत्तमा ॥ बोल बोलसी हे काय ॥३९॥ जगीं जन्मोदय देह धरिल्या पोटीं ॥ कर्माकर्म उभे राहटी ॥ मिरवले हे प्रपंचहाटीं ॥ पदार्थसवें हे दोन्ही ॥ ४० ॥ तरी बा तयाच्या गृहैकपाटीं ॥ ना तळपे ना मिरवे शक्ती ॥ तरी आतां लोपून कर्माप्रती ॥ अर्थ तुझा सरेना ॥ ४१ ॥ जैसें वेंचिल्यावांचून धन ॥ नातळे कदा हाटींचे कण ॥ तरी कर्माकर्म जल्पल्यावीण ॥ अर्थ तुझा सरेना ॥ ४२ ॥ तरी प्रांजळवचनप्रवाहीं ॥ कामा सरिता मिरवल्याही ॥ तेणें दर्शनें अंबापायीं ॥ संगमातें मिरवेल ॥४३॥ नातरी गौण धरून पोटीं ॥ वदतां अर्थ न लाधे जेठी ॥ प्रांजळ वद कीं शेवटीं ॥ फिरून जाशील माघारा ॥४४॥ तुवां प्रांजळ वदल्यावीण ॥ करूं न देऊं तुझें गमन ॥ बहुचावटी जल्पल्यान ॥ शिक्षा पावसी येथें तूं ॥४५ ॥ ऐसें ऐकतां मच्छिंद्रनाथ ॥ म्हणे शासनीं उदेला आदित्यसुत ॥ तेथें तुमची शक्ति अद्भुत ॥ केवीं वर्णूं मशक हो ॥ ४६ ॥ जो महाप्रळय भद्ररुद्र ॥ तो ग्रासून बैसला मुखचंद्र ॥ तेथें तुमची कथा महींद्र ॥ काय असे मशक हो ॥४७॥ ऐसी ऐकतां मच्छिंद्रगोष्टी ॥ परम क्रोधाची झाली दाटी ॥ मग ते अष्टभैरव थाटीं ॥ एकदांचि उठावले ॥ ४८ ॥ जैसें अपार

१ हिंगळजामातेचें दर्शन. २ संन्यासी. ३ अडचणीचें. ४ खोटें. ५ वृक्ष. ६ घरांत. ७ बाजारांतील धान्यादि. ८ सांगितल्यावांचून. ९ यम. १० मोठ्या वेगानें.

विधानथाटी ॥ अबळां सांडून उबलाकोटी ॥ प्रदीप्त होऊन सांगे गोष्टी ॥ महाखगीं जाऊनियां ॥ ४९ ॥ तन्यायें अष्टभैरव ॥ मांडिते झाले युद्धपर्व ॥ कोणी त्रिशूळ परशु गांडीव ॥ टणत्कारिलें ते समयीं ॥ ५० ॥ तों परजोनि असिलता ॥ मुद्गलगुरू ज्या परम-कठिणता ॥ अंकुश बरची मांडू अस्ता ॥ चक्रें चालती उद्देशें ॥ ५१ ॥ गदा दारुकायंत्र अचाट ॥ भाले गुप्ती कुठार बोथट ॥ ऐसीं शस्त्रें तीव्र अचाट ॥ करीं कवळूनी उठावले ॥ ५२ ॥ तें पाहून मच्छिंद्रनाथ ॥ भस्मझोळीं घोपिला हस्त ॥ जय जय श्रीगुरुराजदत्त ॥ म्हणूनि भस्म करीं कवळूनी ॥ ५३ ॥ दाही दिशा मंत्रगौरव ॥ बिभूती चर्चूनी आपुला भाव ॥ म्हणे मित्रावरुण देव ॥ सिद्ध असोत मम काजा ॥ ५४ ॥ अश्विनी वरुण अग्नि वात ॥ धेरामरादि वज्रनाथ ॥ गण गंधर्व तरंगिणीवंत ॥ सिद्ध असोत आम्हांतें ॥ ५५ ॥ बुद्धि सिद्धि योगी अपार ॥ ब्रह्मांडांत नांदणार ॥ त्या सर्वांतें नमस्कार ॥ साह्य असोत आमुतें ॥ ५६ ॥ ऐसी जल्पून मंत्रशक्ती ॥ प्रेरितां दृढ झाली विभूती ॥ युद्धसमारंभ क्षितीं ॥ आमंत्रिलें सर्वांसी ॥ ५७ ॥ मग वज्रपंजर प्रयोगभूती ॥ धरास्त्रें नेमून शक्रदैवतीं ॥ मंत्रप्रयोग सबळशक्ती ॥ भाळीं विभूती चर्चीतसे ॥ ५८ ॥ तेणें शरीर वज्राहून ॥ ते समयीं झालें अतिकठिण ॥ मग म्हणे मच्छिंद्रनाथ पूर्ण ॥ कार्य साधा आपुलें ॥ ५९ ॥ यावयातें कराल आळस ॥ तरी मातृपितृशपथेस ॥ गुरु धिक्कारून निर्बळ यश ॥ मुखा काळें कराल कीं ॥ ६० ॥ मग जिंणें संदेहरूपी ॥ मिरवणें येथें मम कंदर्पीं ॥ उडी सांडून कोरडे कूपीं ॥ प्राण त्यजावा हें बरेंच ॥ ६१ ॥ ऐसी ऐकतां वज्रवाणी ॥ पेटला सबळ जेवीं अग्नी ॥ मग शस्त्रें शिखा नाथविधानीं ॥ कवळूं पाहाती ग्रासावया ॥ ६२ ॥ जे अष्टभैरव भद्रकाळ ॥ शस्त्रें सोडिती उतावेळ ॥ म्हणे येथें यांचा काळ ॥ चिताभस्मीं मेळवा ॥ ६३ ॥ मग नाथशरीरा लक्षूनि अष्ट ॥ शस्त्रें प्रेरिती प्रहार अनिष्ट ॥ त्रिशूळ फरश ते नीट ॥ दणाणिती अंगातें ॥ ६४ ॥ अंकुश परज गूर्ज मुद्गर ॥ मांडू गदा भालचक्र ॥ गुंफी खंजीर बरची असिल ॥ सबळ प्रहारें भेदिती ॥ ६५ ॥ परी तो शस्त्रें मच्छिंद्रनाथ ॥ तृणप्राय सकळ मानित ॥ शस्त्रवृष्टी घन वर्षत ॥ मच्छिंद्र पर्वत झालासे ॥ ६६ ॥ ऐसें होतां ते अवसरीं ॥ निर्विघ्न दिसती ते शस्त्र ॥ मग परम कोपें गांडी-वास्त्र ॥ सज्ज करिते पैं झाले ॥ ६७ ॥ एकीं निर्मिला वातशर ॥ दुजीं निर्मिला कामास्त्र तीव्र ॥ तिजें निर्मिलें वासव अस्त्र ॥ महाशक्ती आगळी ते ॥ ६८ ॥ चौथीं योजिलें नागास्त्रबंधन ॥ जें महातक्षकाहून दारुण ॥ पांचवें ब्रह्मास्त्र प्रवीण ॥ शापादपि विराजे ॥ ६९ ॥ सहावें रुद्रास्त्र प्रळयकाळ ॥ कीं भक्षूं पाहे ब्रह्मांड सकळ ॥ सातवें दानवास्त्र सबळ ॥ असंख्य राक्षस मिरवती ॥ ७० ॥ आठवें कृतांतास्त्र कठिण ॥ प्रेरितां पावती मृत्यु काळ नाम ॥ प्रचंड हस्तपाश कवळून ॥ असंख्य स्थिती मिरवती ॥ ७१ ॥ ऐसें योजून शरार्णव ॥ मांडिते झाले प्रळयपर्व ॥ शस्त्रास मंत्रगौरव ॥ दैवतशक्तीआराधिल्या ॥ ७२ ॥ ऐसें योजून गांडीवा गुंणीं ॥

१ तरवार. २ ब्राह्मण वगैरे. ३ कपाळाला. ४ वांचणें. ५ आदळं लागले. ६ वायुवेगानें जाणारा बाण. ७ मोठी. ८ बाणसमुद्र. ९ दोरीचे ठिकाणीं.

प्रेरिते झाले अष्टही क्षणीं ॥ मग तें अस्त्र भ्रमतां गगनीं ॥ प्रळयकाळ वोढवला ॥ ७३ ॥ वातास्त्राची प्रळयगती ॥ महापर्वत स्वर्ग-पंथीं ॥ वायुचक्रीं भ्रमण करिती ॥ अर्कीं कार्पास जेउता ॥ ७४ ॥ वर्मअस्त्र परम कठिण ॥ उर्वशीचें चांगुलपण ॥ अन्य दारा करवीत गमन ॥ मच्छिंद्रजती ये कृती ॥ ७५ ॥ त्याही परम सुंदर खाणी ॥ पाहतां काममूर्च्छनीं ॥ देव दानव मानव ध्यानीं ॥ जपी तपी लागती ॥ ७६ ॥ वासवशक्ती अतिप्रौढी ॥ तेज प्रवेशतां पडे ब्रह्मांडीं ॥ मित्रता पाहून घालणें उडी ॥ उरली नाहीं मागुती ॥ ७७ ॥ ती शक्ती होतां प्रगट ॥ शब्द करी कडकडाट ॥ तेणें उचलूं पाहे ब्रह्मांडपीठ ॥ धराकंप दाटला ॥ ७८ ॥ शेष दचकला आपुले मनीं ॥ उंचावीतसे ग्रीवा मूर्धनी ॥ कूर्म पृष्ठी सरसावूनी ॥ भयें कांपे चळचळां ॥ ७९ ॥ वराह उंचावोनि दंत ॥ म्हणे धरा होती रसा व्यक्त ॥ दिग्गज भयभीतचित्त ॥ सैरा धांवती दशदिशां ॥ ८० ॥ अस्त्रें नोहे प्रळय अचाट ॥ कीं प्रळय-रुद्राचा हळहळाट ॥ विमानयानीं पाहे सुभट ॥ त्या पळतां समजेना ॥ ८१ ॥ तेज पाहतां सत्य अद्भुत ॥ गंधर्व झाले मूर्च्छागत ॥ तार तारांगण होत ॥ चंद्र लपवी मुखातें ॥ ८२ ॥ सूर्य वरुणा करी दाटी ॥ म्हणे राहें खगापोटीं ॥ वेगीं प्रळय जेठी ॥ जगामाजी मिर-वला ॥ ८३ ॥ शिव झाला भयातुर ॥ रक्षी कपाटें गिरिकंदर ॥ ऐसा प्रळय होतां अपार ॥ ठायीं ठायीं पडताती ॥ ८४ ॥ त्यांत नागास्त्रविषवल्लीसरणी ॥ प्रगटतां विषाची प्रेरणी ॥ अघटित तेथें जाहली करणी ॥ आली विषाची मूर्च्छना ॥ ८५ ॥ होतां ब्रह्मास्त्र शापादिक ॥ त्यांत प्रवेशला रुद्रास्त्रपावक ॥ तो क्षणें जाळूं पाहे सकळिक ॥ ब्रह्मांड ग्रासीन म्हणे ॥ ८६ ॥ त्यातें साह्यार्थ दानवास्त्र झालें ॥ भयानक बहुधा रक्षक धांवले ॥ तशांत काळास्त्र परम शिरलें ॥ प्राण हरूं लोकांचा ॥ ८७ ॥ ऐसी प्रळयाची होतां मांडणी ॥ मच्छिंद्र देखतां नयनीं ॥ मग नव अस्त्रशक्तिमंत्र जपूनी ॥ विभूतीतें सोडीतसे ॥ ८८ ॥ तेणें अस्त्रविचक्षणीं ॥ कैसें ऐका प्रतापखाणी ॥ वातअस्त्राचे पुढें जाउनी ॥ पर्वतास्त्र विराजलें ॥ ८९ ॥ यावरी कामास्त्रापुढें जाउनी ॥ संचरलें अस्त्र विरक्त धडपडूनी ॥ तेणें कामास्त्र बापुडें होउनी ॥ पाठी देऊन पळतसे ॥ ९० ॥ वासवशक्ती अतिदारुण ॥ तियेचे पुढें झालें मोहन ॥ तेणें महंता गेली पळून ॥ वासवशक्तीची सर्वस्वें ॥ ९१ ॥ नागास्त्राचे पडिपाडीं ॥ खगेंद्रास्त्र घाली उडी ॥ सकळ नागांची जुपडी ॥ दाढेखालीं रगडी तें ॥ ९२ ॥ यावरी ब्रह्मास्त्र प्रळयानळ ॥ यास्तव अस्त्र उरों नेदी केवळ ॥ शांति वरुण वाचे सफळ ॥ आशीर्वचन नाथातें ॥ ९३ ॥ यावरी रुद्रास्त्र उरों नेदी केवळ ॥ तयापुढें धाडिलें कार्तिकेयास्त्र बाळ ॥ येतांच सर्व अंग झालें शीतळ ॥ कोप शांताब्धींत बुडाला ॥ ९४ ॥ दानवास्त्रा नाहीं मिती ॥ त्याची मच्छिंद्राचें देवास्त्र करी शांती ॥ सकळ त्याला पाहून जाती ॥ अंतरिक्षस्थानीं आपुल्या ॥ ९५ ॥ यावरी काळास्त्र गहन ॥ तेणें संजीवनी अस्त्र पुढें पाहून ॥ मागोमागें पाश घेऊन ॥ निर्लज्जपणें पळताती ॥ ९६ ॥

१ सूर्याचे ठिकाणीं. २ कापूस. ३ डोकें. ४ रुद्रास्त्रासंबंधीं अग्नि. ५ शांतिरूप समुद्रांत.

ऐसी अष्टांची अष्टनिवृत्ती ॥ करून पावली सकळ शांती ॥ यावरी जें अस्त्र उरलें नववें मिती ॥ तयाची ख्याती परिसावी ॥ ९७ ॥ तें वातास्त्र अर्कप्रचंड ॥ प्रवेश करितां भैरवपिंड ॥ तेणें विकळ झाले अष्टखंड ॥ चलनवलन विसरले ॥ ९८ ॥ प्रथम वासवशक्ती प्रगट होतां ॥ दणाणा उठला ब्रह्मांडीं समस्तां ॥ तो प्रळयनाद अंबा ऐकतां ॥ परिचारिका धाडितसे ॥ ९९ ॥ त्या परिचारिका एकएकाकिनी ॥ कोटी चामुंडा लावण्यखाणी ॥ शंखिनी डंखिनी योगिनी ॥ जळदेवता पातल्या ॥ १०० ॥ चंडा रंडा मुंडा कुंडा ॥ मंडा वंडा आणि वितंडा ॥ ऐशा वर्णिल्या किती तोंडा ॥ अष्टराष्ट्रीं धांविन्नल्या ॥ १ ॥ परी पूर्वीं पांचसाती ॥ समाचारा आल्या असती ॥ त्यांनीं पाहून प्रळयगती ॥ सकळ समुदाय तो आणिला ॥ २ ॥ त्याही चामुंडा तीव्र थोर ॥ शस्त्रास्त्रीं करिती मार ॥ परी तो सुभट मच्छिंद्र ॥ निवारीत अस्त्रानें ॥ ३ ॥ असो वातास्त्रआकर्षणीं ॥ अष्ट भैरव गेले क्षीण होउनी ॥ प्राण विकळ देह धरणीं ॥ निचेष्टित पडियेले ॥ ४ ॥ यावरी एक क्षणीं चामुंडाभार ॥ तयांचा कैसा झाला विचार ॥ भुलीक मोहनास्त्र ॥ कामशरीं योजिलें ॥ ५ ॥ तंव तें अस्त्र प्राबल्यवंत ॥ सर्वांच्या संचरलें देहीं गुप्त ॥ तेणें क्षणैक होऊन मूर्च्छित ॥ पिशाचासमान भ्रमताती ॥ ६ ॥ कोणी वाद्यें घेऊन नाचती ॥ कोणी उगीच टाळ्या पिटिती ॥ कोणी खगीं चंद्री लाविती ॥ कोणी हंसती गदगदां ॥ ७ ॥ कोणी म्हणती विमान आलें ॥ कोणी उग्याच डोलती डोळे ॥ कोणी धांवती महीं पाउलें ॥ पळतां उलथोनि पडताती ॥ ८ ॥ कोणी उगेच स्फुंदोनि रडती ॥ कोणी गोंधळी गायन करिती ॥ कोणी रानोरान भ्रमती ॥ आईबया म्हणोनी ॥ ९ ॥ कोणी लोळती धुळींत ॥ कोणी मृत्तिका उधळीत ॥ कोणी उंदोउदो म्हणत ॥ कोणी रडतां पडताती ॥ ११० ॥ कोणी निचेष्टित पडतां धरणीं ॥ मक्षिका गोंगाट करिती वदनीं ॥ कोणी उग्याच शिव्या देउनी ॥ विवाद करिताती नेपुरें ॥ ११ ॥ कोणी भेटती दाटती प्रेमें ॥ कोणी काष्ठचि उभवून सप्रेमें ॥ नाना खेळ स्त्रिया उगमें ॥ पुरुषनावीं होताती ॥ १२ ॥ कोणी फेडून नेसतें वसन ॥ वृक्षा-नेसविती गुंडाळून ॥ कोणी कवळून करीं पाषाण ॥ स्तनपान करिती त्या ॥ १३ ॥ कोणी काढून चोळी चिंधोटी ॥ त्याची नेसती लंगोटी ॥ अंगा चर्चून भस्मचिमुटी ॥ भोपळा नरोटी कवळूनियां ॥ १४ ॥ कोणी ऊर्ध्व करोनि हस्त ॥ अलख म्हणूनि भिक्षा मागत ॥ कोणी शृंगार काढूनि निश्चित ॥ पाषाणांतें लेवविले ॥ १५ ॥ ऐसा होत चमत्कार ॥ त्यांत काय करी नाथ मच्छिंद्र ॥ विद्यागौरवीं प्रहर ॥ तयांमाजी संचरवी ॥ १६ ॥ तें अस्त्र चपळ सबळवंत ॥ वसनें आसडून त्वरित ॥ नेऊनियां गगनपंथें ॥ अंबरातें मिरविलीं ॥ १७ ॥ मग त्या सकळ नग्न होउनी ॥ नृत्य करिती सकळ अवनीं ॥ त्याही सकळ आणि मच्छिंद्रमुनी ॥ मायास्त्रातें जल्पतसे ॥ १८ ॥ तेणेंकरून अपार पुरुष ॥ सर्वभूषणीं महादक्ष ॥ निर्मूनियां नाथ प्रत्यक्ष ॥ समोर संचार करवितसे ॥ १९ ॥

१ सूर्यासारखें तीक्ष्ण. २ दासी. ३ पृथ्वीवर. ४ भूल पाडणारें. ५ देवीपुढें म्हणण्याचा विजयसूचक शब्द. ६ नेसलेलें वस्त्र. ७ आकाशांत.

ऐसी करून दृढ राहटी ॥ स्मरणास्त्र जल्पलें होठीं ॥ तेणेंकरून सर्व गोरटी ॥ देहाप्रती पातल्या ॥ १२० ॥ देहस्मरणीं होतां स्थित ॥ आपण आपणाकडे पहात ॥ तों नग्नशरीरी केश मुक्त ॥ परम लज्जित मग त्या झाल्या ॥ २१ ॥ भोंवतें पाहती दृष्टी करूनी ॥ तों अपार पुरुष देखिले नयनीं ॥ तेणें फारच लज्जित होउनी ॥ पळती सैराट नग्नचि ॥ २२ ॥ तों पळतपळत सहज नयनीं ॥ भैरव पाहिले अनवस्थान ॥ कंठीं उरलासे प्राण ॥ रुधिर अवनीं सांडतसे ॥ २३ ॥ आणिक पाहिलें नेत्रश्वेतीं ॥ मग पळून गेल्या जेथें भगवती ॥ अंबिका पाहून नग्न समस्ती ॥ आश्चर्य चित्तीं करितसे ॥ २४ ॥ म्हणे कां वो ऐसें केलें ॥ कोणी तुम्हांतें नागविलें ॥ येरी म्हणती सुकृत[1] संपलें ॥ म्हणूनि अवस्था हे झाली ॥ २५ ॥ माय वो माय जोगी आला ॥ कोणीकडोन जाणों आम्ही त्याला ॥ तेणें करून अवस्था आम्हांला ॥ प्राण घेतला भैरवांचा ॥ २६ ॥ आतां जननी काय उरलें ॥ तुम्हीं स्वस्थान सोडा वेहिलें[2] ॥ नातरी दशा पूर्ण पावाल ॥ आम्हां दिसतें जननीये ॥ २७ ॥ भैरवांसारिखे वीर धुरंधर ॥ तयांचा प्राण कंठावर ॥ उरला असे बरवा विचार ॥ आम्हांलागीं दिसेना ॥ २८ ॥ तो जोगी नव्हे मायजननी ॥ सुत प्रसवला दुसरा तरणी[3] ॥ पूर्वभयाची आतां मांडणी ॥ जगामाजी मिरवेना ॥ २९ ॥ कीं एकादश प्रळयरुद्र ॥ एकच शरीरीं मिरवले भद्र ॥ देव दानव नक्षत्र चंद्र ॥ आम्हां वाटलें ग्रासितो ॥ १३० ॥ कीं माये प्रळयविजेच्या स्थानास ॥ आजीच आली धरून यास ॥ आप[4] तेज मही वायु आकाश ॥ ग्रासील ऐसें वाटतसे ॥ ३१ ॥ तरी आतां वेगीं माये ॥ या स्थानातें आंचवावें ॥ कोणे प्रकारें वांचवावें ॥ जीवित्व आपुलें जननीये ॥ ३२ ॥ ऐसें बोलून भयभीत ॥ कंपायमान बावऱ्या होत ॥ कोणी बोलतां चांचरा[5] घेत ॥ आला आला म्हणोनी ॥ ३३ ॥ ऐसी दीक्षामाय भवानी ॥ पाहूनि आश्चर्य करी मनीं ॥ मग स्वचित्तांत पाहे शोधूनी ॥ कोण कोणाचा कोणता ॥ ३४ ॥ तंव तो महाराज कविनारायण ॥ उपरिचरवसूचा प्रियनंदन ॥ मच्छिंद्रनामें अवतार धरून ॥ जगामाजी मिरवला ॥ ३५ ॥ ऐसें आणून स्वचित्तांत ॥ मग सकळांलागीं वसनें[6] देत ॥ पुढें घालून अबला समस्त ॥ बाहेर आली जगत्रयजननी ॥ ३६ ॥ मग मच्छिंद्रापाशीं येऊनि त्वरित ॥ बहु प्रेमानें हृदयीं धरित ॥ तेणें पाहून जगन्मातेतें ॥ चरणावरी लोटला ॥ ३७ ॥ मग घेऊनि अंकीं[7] मच्छिंद्रनाथ ॥ म्हणे बा प्रताप केला बहुत ॥ तरी भैरव प्राणरहित ॥ झाले सावध करीं त्यांसी ॥ ३८ ॥ ऐसी ऐकून अंबिकावाणी ॥ प्रसन्न झाली चित्तभवानी ॥ मग अस्त्रविद्या वातआकर्षणीं ॥ काढून घेतली ते समयीं ॥ ३९ ॥ जैसें दुग्धामाजी तोय[8] ॥ काढून घेत हंस समयीं ॥ तेवीं वातआकर्षण अस्त्र सदयी ॥ काढून घेत ते क्षणीं ॥ १४० ॥ कीं पंचाक्षरी कौशलेंप्रती ॥ महीं मांदुसे काढून घेती ॥ तन्यायें विद्याशक्ती ॥ काढून घेत तो नाथ ॥ ४१ ॥ किंवा स्वबुद्धिविचक्षण ॥ कार्य असतां परस्वाधीन ॥ तें युक्तिप्रयुक्तीं



१ पुण्य. २ लवकर. ३ सूर्य. ४ उदक. ५ कानवसा. ६ वस्त्रें. ७ मांडीवर. ८ उदक.

घेती करून ॥ प्राज्ञ बळें आपुलालें ॥ ४२ ॥ असो ऐसे दृष्टांत बोलें ॥ येरीकडे भैरव सावध झाले ॥ चलन वलन सर्व संचरलें ॥ जैसें तैसें शरीर ॥ ४३ ॥ मग झाल्या विचक्षणीं ॥ दिशा पाहाती दृष्टींकरूनी ॥ तों जगन्माता अंकीं घेउनी ॥ मच्छिंद्रातें बैसली ॥ ४४ ॥ मग ते अष्ट भैरववीर ॥ येते झाले अंबिकेसमोर ॥ म्हणती अंबे प्रताप थोर ॥ मच्छिंद्रानें पैं केला ॥ ४५ ॥ आम्ही याची युद्ध-मांडणी ॥ घेऊं सकळ परीक्षाकडसणी ॥ मग नागपत्रअश्वत्थाहूनी ॥ कथा वदले अंबेतें ॥ ४६ ॥ नागअश्वत्थाहून ऐकतां गोष्टी ॥ माता म्हणे हा धन्य धूर्जटी ॥ मग मच्छिंद्रास म्हणे माझे दृष्टीं ॥ प्रताप कांहीं दावीं कां ॥ ४७ ॥ जैसें पैयामाजी तोय ॥ शोषून घेती हंस पय ॥ तेवीं आतां युद्धसंदेह ॥ काढून दावीं चक्षूतें ॥ ४८ ॥ यावरी बोले मच्छिंद्रनाथ ॥ कैसी दावूं कोणत्या अर्थ ॥ माता म्हणे हा पर्वत ॥ आकाशातें मिरवीं कीं ॥ ४९ ॥ मिरवेल परी जेथील तेथ ॥ पुन्हां ठेवीं मूर्तिमंत ॥ ऐसें ऐकतां मच्छिंद्रनाथ ॥ करीं कवळी भस्मातें ॥ १५० ॥ मग वायुअस्त्र फणिदैवत ॥ मंत्रजल्पें केलें युक्त ॥ पर्वतीं फेंकितां भस्म होत ॥ उदयवातचि जो झाला ॥ ५१ ॥ वात मौळीं कद्रुनंदन ॥ पर्वत मौळीं शीघ्र वाहून ॥ वातचक्रीं करी भ्रमण ॥ चंडरथासमान कीं ॥ ५२ ॥ त्यातें उल-थावया शक्ती ॥ अंबा पाहे आपुल्या चित्तीं ॥ परी शेषमौळींची पर्वतमाती ॥ दृढ असे ढळेना ॥ ५३ ॥ मग मनीं म्हणे हा धन्य नाथ ॥ जेणें ऐक्य केला पर्वत वात ॥ शत्रु समरीं ऐक्य चित्त ॥ मिरविलाही हें धन्य ॥ ५४ ॥ पर्वत पूर्ण वातावरी ॥ तो वात मिरवी घेऊन शिरीं ॥ जैसा मत्स्यकोदरीं ॥ येवोनियां दडाला ॥ ५५ ॥ कीं व्याघ्रअजानांदवटी[2] ॥ नांदविले एका पेटीं ॥ कीं उरग[3] उर-गारी[4] सांगती गोष्टी ॥ प्रेमभावें मिरवूनियां ॥ ५६ ॥ तन्न्याय मच्छिंद्रें केलें ॥ धन्य सद्विद्येचें धाम[5] रचलें ॥ मग कुरवाळून म्हणे वहिलें ॥ पर्वतातें उतरीं कां ॥ ५७ ॥ मग मच्छिंद्रें वात आकर्षून ॥ ठायींच्या ठायीं नग उतरून ॥ ठेवून अंबेचें समाधान ॥ सद्विद्येनें पैं केलें ॥ ५८ ॥ यावरी नाथ आणि भगवती ॥ गेले अंबिकास्थानाप्रती ॥ तेथें राहून तीन रात्री ॥ पुसूनियां चालिले ॥ ५९ ॥ मग अंबा प्रसन्न होऊन ॥ अस्त्रें दिधलीं त्यातें दोन ॥ स्पर्शास्त्र अस्त्र भिन्न ॥ प्रसादातें निवेदिलें ॥ १६० ॥ असो ऐसा प्रसाद घेऊन ॥ निघता झाला मातेस नमून ॥ बारा मल्हारांचा मार्ग धरून ॥ जाता झाला तो नाथ ॥ ६१ ॥ पुढें बारा मल्हारांचें कथन ॥ श्रोतियां सांगे धुंडिनंदन ॥ नरहरि माल्रू नामाभिधान ॥ जगामाजी मिरवे तो ॥ १६२ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागार ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ चतुर्थाध्याय गोड हा ॥ १६३ ॥ ॥

॥ अध्याय ॥ ४ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

---

१ दुधांतलें पाणी. २ शेळीची नांदणूक. ३ सर्प. ४ गरुड. ५ ठिकाण.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी यदुकुळटिळका ॥ भक्तिपंकजाच्या सदैव अर्का ॥ मुनिमानसचकोरपाळका ॥ कृपापीयूषा चंडा तूं ॥ १ ॥ भाविक प्रेमळ भक्त परी ॥ तयांचा अससी पूर्ण कैवारी ॥ बाळप्रल्हादसंकटावरी ॥ कोरडे काष्ठीं प्रगटला ॥ २ ॥ कर-विंशतिप्रताप सघन ॥ संकटीं घातले देव तेणें ॥ तदर्थ सकळ रविकुळपाळण ॥ अवतारदीक्षा मिरविसी ॥ ३ ॥ देवविप्रांचें संकट पाहून ॥ मत्स्यकुळातें करी धारण ॥ मग उदधीतें गगन दावून ॥ शंखासुर धरियेला ॥ ४ ॥ तेवींच दैत्य दुमदुमा करित ॥ अवतार कच्छ झाला मिरवित ॥ उदधी मंथूनि शंखा तोषवित ॥ महाराज कृपार्णव ॥ ५ ॥ राया बळीची उद्दाम करणी ॥ स्वरूप मिरवी खुजटपणीं ॥ संकट पडतां सुरगणीं ॥ फरशधर झालासे ॥ ६ ॥ अपार भक्तप्रेमा सघन ॥ त्यांत स्थिरावले पंडुनंदन ॥ शिशुपाळ वक्रदंतकंदन ॥ वसुदेवकुशीं मिरवला ॥ ७ ॥ असो ऐसा भक्तिप्रेमा ॥ तूतें आवडे मेघश्यामा ॥ तरी भावभक्तीच्या उगमा ॥ पुढें ग्रंथ बोलवीं ॥ ८ ॥ मागिले अध्यायीं केलें कथन ॥ हिंगळाज क्षेत्रीं मच्छिंद्रनंदन ॥ अष्टभैरव चामुंडा जिंकून ॥ दर्शन केलें अंबेचें ॥ ९ ॥ तरी श्रोते सिंहावलोकनीं ॥ कथा पहा आपुले मनीं ॥ बारामल्हारमार्गे धरूनी ॥ जाता झाला मच्छिंद्र ॥ १० ॥ तो बारामल्हारकाननांत ॥ मुक्कामा उतरला एका गांवांत ॥ देवालयीं मच्छिंद्रनाथ ॥ सुखशयनीं पहुडला ॥ ११ ॥ तों रात्र झाली दोन प्रहर ॥ जागृत आहे नाथ मच्छिंद्र ॥ तंव काननीं दिवट्या अपार ॥ मच्छिंद्रनाथें देखिल्या ॥ १२ ॥ इकडून जाती तिकडून येती ॥ ऐशा येरझारा करिती ॥ तें पाहून नाथ जती ॥ म्हणे भुतावळें उदेलें ॥ १३ ॥ तरी यातें करावें प्रसन्न ॥ समय येत हाचि दिसून ॥ कोण्या तरी कार्यालागून ॥ उपयोगीं श्रम पडतील ॥ १४ ॥ तरी त्यातें आतां शरणागत ॥ प्रसन्न करून घ्यावें भूत ॥ श्रोते म्हणती कार्य कोणतें ॥ भूतास्वाधीन असेल कीं ॥ १५ ॥ तरी ऐसें न बोलावें या वेळे ॥ भूत श्रीरामा उपयोगीं आलें ॥ राक्षसाचें प्रेत नेलें ॥ समरंगणीं सुवेळे ॥ १६ ॥ तेव्हां अमृतदृष्टीकरून ॥ उठवी श्येन कपिरत्न ॥ तेवीं तुळसीसी प्रसन्न ॥ भूत झालें कलींत ॥ १७ ॥ तरी लहानापासून थोरापर्यंत ॥ समयीं कार्य घडून येत ॥ पहा अर्णवा झुरलें निश्चित ॥ वांचविलें म्हणताती ॥ १८ ॥ तन्न्यायें कल्पून चित्तीं ॥ नाथ भूतांच्या बैसल्या अर्थीं ॥ मग अंबिकाअस्त्र स्पर्शशक्ती ॥ प्रेरिता झाला तेच क्षणीं ॥ १९ ॥ तें अस्त्र प्रेरितां भूतगणीं ॥ होतां स्पर्श कुरुमेदिनीं ॥ मग पद धरी आंवळूनी ॥ सुटका नाहीं पदातें ॥ २० ॥ जेवीं युद्ध कुरुक्षेत्रांत ॥ मँही धरीतसे कर्णरथ ॥ चक्रें गिळून करी कुंठित ॥ गमनसंधान करूं नेदी ॥ २१ ॥ तन्न्यायें स्पर्शशक्ती ॥ करी भूतपदा धरा व्यक्ती ॥ चलनवलन मग त्या क्षितीं ॥ कांहींएक चालेना ॥ २२ ॥ जैसे तरू एकाच ठायीं ॥ वसती अचळप्रवाहीं ॥ तन्न्यायें भूतें सर्वही ॥ खुंटोनियां टाकिलीं ॥ २३ ॥ तयां भूतांचे वियोगनिमित्तें ॥ कीं वेताळा भेटी जाणें

१ भक्तिरूपी कमलाच्या. २ वीस हातांचा (रावण), त्याचा पराक्रम. ३ सूर्यवंशीयांत. ४ समुद्राला. ५ वामन. ६ परशुराम. ७ पृथ्वी. ८ वृक्ष. ९ अचळरूपानें.

होतें ॥ सर्व मिळोनी येतां क्षितींत ॥ जमोनियां येताती ॥ २४ ॥ तंव ते दिवशीं झाले कुंठित ॥ वेताळभेटीच राहिली प्राप्त ॥ येरीकडे [1]वेताळक्षितींत ॥ अनंत भूतें पातलीं ॥ २५ ॥ तो दक्षभूतांचा बळी वेताळ ॥ पाहे अष्टकोटी भूतावळ ॥ तों न्यूनपणीं सर्व मंडळ ॥ दिसून आलें तयातें ॥ २६ ॥ मग अन्य भूतांतें विचारित ॥ शरभतीरींची भूतजमात ॥ आली नाहीं किमर्थ ॥ शोध त्यांचा करावा ॥ २७ ॥ अवश्य म्हणोनी पांच सात ॥ गमन करिते झाले भूत ॥ शरभतीरीं येऊनि त्वरित ॥ निजदृष्टी पहाती ॥ २८ ॥ तंव ते मंडळी महीं व्यक्त ॥ उभी असे बळरहित ॥ जैसा एका ठायींचा पर्वत ॥ दुसऱ्या ठायीं [2]आतळेना ॥ २९ ॥ मग त्या मंडळानिकट येऊन ॥ पुसते झाले वर्तमान ॥ तुम्ही व्यक्त महीलागून ॥ काय म्हणोनी तिष्ठलां ॥ ३० ॥ येरी म्हणती अनेक जे भेद ॥ महीं उचलोनी देतां पद ॥ कोण आला आहे सिद्ध ॥ तेणें कळा रचियेली ॥ ३१ ॥ मग ते पाहे कळा ऐकून ॥ पर्वता चालिले शोधालागून ॥ गुप्तरूपें वस्तींत येऊन ॥ मच्छिंद्रनाथ पाहिला ॥ ३२ ॥ बालार्ककिरणीं [3]तेजागळा ॥ शेंदूर चर्चिलासे भाळा ॥ तयामाजी विभूती सकळा ॥ मुखचंद्रें चर्चिली ॥ ३३ ॥ कर्णीं मुद्रिका रत्नपाती ॥ कीं वस्तीस पातल्या रत्नज्योती ॥ [4]हेमगुणीं गुंफोनि निगुती ॥ [5]कंबरीभारीं वेष्टिला ॥ ३४ ॥ ललाट अफाट मिशा पिंगटा ॥ वटदुग्धानें भरल्या जटा ॥ सरळ नासिका नेत्रवाटा ॥ अग्रीं समदृष्टी पहातसे ॥ ३५ ॥ अर्कनयनीं विशाळ बहुत ॥ उग्रपणीं उदय दावित ॥ पाहतां वाटे [6]कृतांत ॥ नेत्रतेजें विराजला ॥ ३६ ॥ स्थूळवट बाहुदंड सरळ ॥ आजानुबाहू तेजाळ ॥ कीं मलविमल करून स्थळ ॥ बाहुवटीं विराजले ॥ ३७ ॥ मस्तकीं शोभली दिव्य वीरगुंठी ॥ कंथा विराजे पाठपोटीं ॥ त्यावरी [7]ग्रीवेस नेसल्या दाटी ॥ ज्ञानशिंगी मिरवीतसे ॥ ३८ ॥ बाहुवटें हनुमंत ॥ वीरकंकण करीं शोभत ॥ कुबडी फावडी घेऊन हातांत ॥ बोध शैलिका विराजे ॥ ३९ ॥ जैसा तीव्र बारावा रुद्र ॥ कीं सकळ योगियांचा भद्र ॥ जैसा नक्षत्रगणीं चंद्र ॥ तेजामाजी डवरतसे ॥ ४० ॥ ऐसें पाहून एक भूतीं ॥ मनामाजी करितां ख्याती ॥ येणेंचि व्यक्त केलें क्षितीं ॥ भूतगणा वाटतसे ॥ ४१ ॥ मग ते होऊन संदेहस्थ ॥ नाथास म्हणती भूतें पतित ॥ जाऊं द्या स्वामी करा मुक्त ॥ आपुलाल्या कार्यासी ॥ ४२ ॥ नाथ म्हणे सर्व गुंतले ॥ तुम्ही मुक्त केवीं राहिले ॥ येरू म्हणे पाठविलें ॥ समाचारा वेताळें ॥ ४३ ॥ तरी महाराजा करीं मुक्त ॥ जाऊं द्या वेताळनमनार्थ ॥ यावरी त्याला म्हणे नाथ ॥ सोडणार नाहीं सहसाही ॥ ४४ ॥ तुमचा वेताळ [8]आदिराणिव ॥ जाऊन त्यातें त्वरें सांगावें ॥ येरू म्हणती मग अपूर्व ॥ भलें नोहे महाराजा ॥ ४५ ॥ वेताळ खेळता बाबरदेव ॥ हे महाबळाचे असती अष्टार्णव ॥ ब्रह्मांड जिंकून [9]कंदुकभाव ॥ महीं खेळती महाराजा ॥ ४६ ॥ नवनाग जैसे सबळी ॥ तयांमाजी फेडिती कळी ॥ तयांसवें कोणी [10]रंळी ॥ केली नाहीं आजन्म ॥ ४७ ॥ देव दानव गंधर्व असती ॥

१ वेताळाच्या राज्यांत. २ प्राप्त होईना. ३ तेजानें विशेष. ४ सुवर्णाच्या दोरीनें. ५ जटाभारानें. ६ यम. ७ मानेला. ८ मुख्य. ९ चेंडूसारखें. १० तंटा.

तेही वेताळ बलाढ्य म्हणती ॥ तस्मात् स्वामी तयांप्रती ॥ श्रुत करूं नोहे जी ॥ ४८ ॥ येरू म्हणे संपादणी ॥ येथें काय करितां दाउनी ॥ तुमचा वेताळ पाहीन नयनीं ॥ बळजेठी कैसा तो ॥ ४९ ॥ ऐसी ऐकून भूतें मात ॥ म्हणती अवश्य करूं श्रुत ॥ मग जाती जेथ तो वेताळ भूत ॥ तयापाशीं पातले ॥ ५० ॥ राया वेताळास करूनि नमन ॥ सांगते झाले वर्तमान ॥ म्हणती महाराजा भूतांस विघ्न ॥ जोगी एक आहे कीं ॥ ५१ ॥ तेणें खेळून मंत्रशक्ती ॥ महीं व्यक्त केली जेमाती ॥ शेवटीं म्हणतो हेच गती ॥ तुम्हां करीन महाराजा ॥ ५२ ॥ ऐसें ऐकून पिशाचराव ॥ परम क्षोभला विकृतिभाव ॥ म्हणे आतां अष्टका सर्व ॥ भूतावळ मेळवा ॥ ५३ ॥ मग भूतभृत्य जासूद हलकारे ॥ जाते झाले देशांतरा ॥ अर्बस्थान पंजाब गुर्जरा ॥ बंगालादि पातले ॥ ५४ ॥ माळवी मेवाड तैलंगण ॥ कर्नाटकी देश दक्षिण ॥ कुंडाळ कैकाड विलंबवचन ॥ सप्तद्वीपींचे पातले ॥ ५५ ॥ सकळां श्रुत करून गोष्टी ॥ पाठविती सकळ भूतथाटी ॥ अष्टराणीव एक एक कोटी ॥ समारंभा पातले ॥ ५६ ॥ अष्टराणीव तयांचें नांव ॥ महावीर विद्येकारणी सर्व ॥ म्हंमदा म्हैषासुरा धुळोनियां गर्वें ॥ बाबरझोटिंग पातले ॥ ५७ ॥ मुंजा नरसिंहाचा अवतार ॥ म्हणोन वीरांत त्याचा संचार ॥ तोही एक कोटी भार ॥ घेऊनियां मिळाला ॥ ५८ ॥ असो ऐसे कोटीभार ॥ उतरले जैसे गिरिवर ॥ महाभद्र तो आग्या वेताळवीर ॥ येऊनियां पोहोंचला ॥ ५९ ॥ सकळ वेताळापाशीं येऊन ॥ कथिते झाले सिद्धगमन ॥ मग सकळ सांगून वर्तमान ॥ समारंभीं चालिले ॥ ६० ॥ येऊन शरभतीराप्रती ॥ अष्टही कोटी कोल्हाळ करिती ॥ तेणें दणाणी अमरक्षिती ॥ आणि पाताळीं आदळतसे ॥ ६१ ॥ तें पाहून मच्छिंद्रनाथ ॥ करीं कवळी विभूतीपात ॥ आराधून मंत्रशक्तीतें ॥ लखलखीत पैं केलें ॥ ६२ ॥ स्परणगांठीव विभूती शर ॥ सज्ज करिती अति तत्पर ॥ परी सर्वांचा प्रताप पहावया स्थिर ॥ महीं विराजे उगलाचि ॥ ६३ ॥ परी वज्रास्त्रमंत्र जपून ॥ भोंवतें वेष्टिलें रेषारंगण ॥ आणि मस्तकीं वज्रासन ॥ वज्रशक्ती मिरवीतसे ॥ ६४ ॥ तेणेंकरून भूतांचा प्रवेश ॥ लिप्त नोहे आसपास ॥ परी भूताळ्या स्मशानास ॥ वर्षाव करित आगळा ॥ ६५ ॥ जैशा पर्जन्याच्या धारा ॥ वर्षाव करिती अपार अंबरा ॥ परी वज्रास्त्र सबळ मौळिभारा ॥ कदाकाळीं मानीना ॥ ६६ ॥ त्यांत अष्ट पिशाचनृपाळ ॥ स्वरूपेंकरून अति विशाळ ॥ तरू टाकिती उपटून बळें ॥ पर्जन्यधारांसारिखे ॥ ६७ ॥ परी तें वज्रास्त्र मौळीं ॥ तया न गणती तये काळीं ॥ तरू संचवून पर्वतमौळी ॥ पर्णकुटी ती जाहली ॥ ६८ ॥ ऐसा संचरतां तरुभार ॥ काय करिते झाले समग्र ॥ कोरडे काष्ठादि तृण अपार ॥ तयावरी सांडिती ॥ ६९ ॥ सकळ करूनी महाकहर ॥ सांडिते झाले वैश्वानर ॥ तें पाहूनी नाथ मच्छिंद्र ॥ जलदास्त्र प्रेरितसे ॥ ७० ॥ भूतें सांडिती वैश्वानर ॥ तरू कडकडिती ज्वाळपर ॥ ब्रह्मांडीं उमाळा व्यापे थोर ॥ पक्षिकुळ जीवजंतु ॥ ७१ ॥

१ मोठा बलिष्ठ. २ भूतांचा जमाव. ३ आठ. ४ स्वर्गभूमि. ५ विशेष. ६ आकाशांत. ७ मस्तकाचे ठिकाणीं. ८ कोलाहल. ९ अग्नि.

ऐसी पाहतां पावकथाटी ॥ परी जलदास्त्रें केली दाटी ॥ उदधी मिरवून आकाशापाठीं ॥ शांत केला पावक तो ॥ ७२ ॥ यापरी मच्छिंद्रनाथ ॥ पावकास्त्र प्रेरिता झाला विभूतिमंत्र ॥ तेणें अग्नि प्रदीप्त करित ॥ भूतगणीं मिरवीतसे ॥ ७३ ॥ परी ते दृश्य अदृश्य जाणोनी ॥ प्रळयाग्नी पहाती गुप्त होउनी ॥ मग पहा [2]उदधितोया सांडोनी ॥ आकाशांत मिरवूं त्या ॥ ७४ ॥ परी तो विझेना मंत्राग्न ॥ मग मच्छिंद्रें जलदास्त्र प्रेरून ॥ शांत केला [1]द्विमूर्धन ॥ अस्त्रमंत्रेंकरूनियां ॥ ७५ ॥ शांत होतांचि मंत्राग्नी ॥ मही उतरली भूतगणीं ॥ मग स्पर्शास्त्र जल्पोनी ॥ भूतांगणीं कल्पीतसे ॥ ७६ ॥ तेणेंकरून अष्टकोटी ॥ महीं व्यक्त झाली एकथाटी ॥ जैसी पूर्वीं भूतांतें राहटी ॥ तेंच झालें सर्वांस ॥ ७७ ॥ परी अष्टजन जे तयांचे नृप ॥ महाबळी प्रतापदर्प ॥ ते स्पर्शास्त्र न गणती माप ॥ स्वबळें मिरविती ॥ ७८ ॥ परी स्पर्शास्त्रें एकच केलें ॥ अदृश्य सकळ तेज खंडून धरिलें ॥ हें तों नेणोनि निकट आले ॥ मच्छिंद्रातें आकळावया ॥ ७९ ॥ परी भोंवतें आहे वज्र संपन्न ॥ लाग न चाले कांहीं तेणें ॥ परी परम बलाढ्य वेताळसंधान ॥ निकट अंगें पातले ॥ ८० ॥ परी भोंवतें आहे वज्रास्त्र ॥ तेंचि गिळून गेला मुखपात्र ॥ हें मच्छिंद्र पाहतां अति विचित्र ॥ वासवास्त्र सोडीतसे ॥ ८१ ॥ वासवास्त्र होतां प्रगट ॥ उभयतांची झाली झगट ॥ जैसे जेठीलागून येत पाठ ॥ लोंबी झोंबी खवळले ॥ ८२ ॥ एकमेकां महीं पाडिती ॥ तेणें दणाणा उठे क्षितीं ॥ अष्टसमुद्र [3]हेलावती ॥ खळबळती नक्षत्रें पैं ॥ ८३ ॥ शेषमस्तकें हेलावती ॥ कूर्म म्हणे त्या अति अद्भुती ॥ वराह सांवरून नेटे देती ॥ महीलागीं उचलीतसे ॥ ८४ ॥ येरीकडे सप्तजन ॥ [5]कवळूं पहाती मच्छिंद्राचे चरण ॥ कीं चरणीं धरून महीकारण ॥ मच्छिंद्रनाथ आकळावा ॥ ८५ ॥ परी तो नाथ अति चपळ ॥ पुनः वज्रास्त्र सिद्ध केलें सबळ ॥ दाही दिशा [4]रक्षपाळ ॥ ऐसें वज्रास्त्र मिरविलें ॥ ८६ ॥ यावरी तो दानवास्त्र जल्पून ॥ दानव केले सप्त निर्माण ॥ मधु तिल कुंभकर्ण ॥ मरु आणि मालीमल ॥ ८७ ॥ मुचकुंद त्रिपुर बळजेठी ॥ ऐसी सप्त दानवहाटी ॥ साती दैवतें बळजेठी ॥ लोंबी झोंबी पातले ॥ ८८ ॥ झोटिंगातें मधु झगटे ॥ खेळतात कुंभक नेटें ॥ बावरा तेथील कर्णलोटे ॥ झोटधरणी झगडती ॥ ८९ ॥ म्हंमदालागीं मरू भिडत ॥ मालीमल मुंज्यातें आल्हाटित ॥ म्हैसासुर अति उन्मत्त ॥ मुचकुंद त्यातें भिडतसे ॥ ९० ॥ धुळोवान वीर समर्थ ॥ त्रिपुर झगटे तया निरत ॥ ऐसे एका मंत्रीं अस्त्रदैत्य ॥ सप्तजन [6]आल्हाटिले ॥ ९१ ॥ ऐसे भिडतां अष्टजन ॥ महीं उठला अति दणाण ॥ एकमेकां महीकारण ॥ आकळावया ते [7]जल्पती ॥ ९२ ॥ एक दिन एक रात्री ॥ साती जणां न विश्रांती ॥ लाथा केवड हुमण्या देती ॥ वर्मावर्मीं जाणूनियां ॥ ९३ ॥ तेणेंकरून प्रहार भेदित ॥ भेदितां देह विकळ होत ॥ मुष्टिप्रहारें मूर्च्छित होत ॥ महीं पडती आदळोनि ॥ ९४ ॥ मग साती जणें दानवास्त्र ॥ भिडतां केलें त्यां [8]जर्जर ॥ मग सप्त दानव

१ अग्नि. २ समुद्राच्या उदकाला. ३ खवळती. ४ रक्षणार्थ. ५ केंस धरून. ६ भिडले. ७ बडबड करतात. ८ जर्जर.

अदृश्यवर ॥ होते झाले एकसरें ॥ ९५ ॥ येरीकडे वासवशक्ती ॥ भिडतां प्रेमें वेताळाप्रती ॥ तों संधान पाहून हृदयस्थिती ॥ वासवशक्ती भेदीतसे ॥ ९६ ॥ तेणें घायें अति सबळ ॥ मूर्च्छित पडला वेताळ ॥ महीं पडतां उतावेळ ॥ अदृश्य झाली शक्ती ते ॥ ९७ ॥ येरीकडे मच्छिंद्रनाथ ॥ वाताकर्षणविद्या जल्पत ॥ तों सांवरोनि वेताळ मूर्च्छित ॥ पुनरपि आला त्वरेनें ॥ ९८ ॥ येतां येतां सातीजणीं ॥ लगट करिती निकट येउनी ॥ तों सिद्धप्रयोग वाताकर्षणी ॥ मच्छिंद्राचा झालासे ॥ ९९ ॥ सिद्धप्रयोग होतां नीती ॥ संचारतो अष्टदेहांप्रती ॥ तेणेंकरून वातगती ॥ आकर्षण होतसे ॥ १०० ॥ जंव जंव आकर्षणवात होत ॥ तंव हस्तपादांचें चलन राहत ॥ परम क्लेश उचंबळत ॥ मूर्च्छाशक्ती मिरवावया ॥ १ ॥ ऐसी होतांचि अष्टमावृत्ती[1] ॥ मग एकमेकांप्रती बोलती ॥ आतां आसडून[2] अहंवृत्ती ॥ शरण वेगीं रिघावें ॥ २ ॥ नातरी जोगी आहे कठिण ॥ भूतांसह आपुला घेईल प्राण ॥ तरी यातें प्रसन्न करून ॥ जगामाजी नांदावें ॥ ३ ॥ जैसें रामप्रसादेंकरून ॥ लंकाराणीव[3] बिभीषण ॥ कीं वाळीचे कृतीनें ॥ राज्यीं मिरवला सुग्रीव ॥ ४ ॥ तन्यायें येथें करून ॥ वांचवावा आपुला प्राण ॥ उपरी जीवलिया संगोपन ॥ आश्रय होईल हा एक ॥ ५ ॥ जैसा दरिद्रियाला परिस ॥ कीं चिंतामणी चिंतित्यास ॥ कीं पीयूष[4] लाभे रोगियास ॥ तैसें होईल आपणासी ॥ ६ ॥ कीं प्रल्हादाचें नरसिंह दैवत ॥ संकटीं झालें साह्यवंत ॥ तन्यायें आजही प्रीत ॥ वाढवावी महाराजा ॥ ७ ॥ ऐसें बोलून एकमेकां ॥ निश्चय करून नेटका ॥ म्हणती महाराजा तपोनायका ॥ सीमा झाली प्रतापा ॥ ८ ॥ तन्यायें सर्वज्ञमूर्ती ॥ सोडवीं आम्हां क्लेशपद्धती ॥ क्रोधानळें प्राणआहुती ॥ योजूं नको महाराजा ॥ ९ ॥ तरी आतां अनन्य शरण ॥ आहोंत आमुचा वांचवा प्राण ॥ जैसें कचा शुक्रें दान ॥ संजीवनीचें पैं केलें ॥ ११० ॥ तूं प्रत्यक्ष अससी नारायण ॥ हें नेणोनी रंळी तुजकारण ॥ केली परी उचित धन ॥ प्राप्त झालें सध्यांचि ॥ ११ ॥ जैसा जटायु आणि संपाती ॥ प्रताप दावूं गेले गभस्ती[5] ॥ परी भोगदशाप्राप्ती ॥ सध्यांच झाली लाभावरी ॥ १२ ॥ तन्यायें येथें झालें ॥ तरी कृपेचीं बसवीं पाउलें ॥ चलनवलन अवघेंच राहिलें ॥ बोलणें उरलें सांगावया ॥ १३ ॥ आतां क्षणैक करिसी आळस ॥ आम्ही जाऊं पैंरठायास[6] ॥ तेणें लाभ तव हस्तास ॥ काय मिरवेल तुजलागीं ॥ १४ ॥ तरी आमुचा वांचवावा प्राण ॥ मग तुझें नाम मिरवूं जगाकारण ॥ सांगशील तें कार्य करून ॥ भूतांसहित येऊं कीं ॥ १५ ॥ कीं यमें पाळिले यमदूत ॥ किंवा विष्णूपुढें विष्णुगण धांवत ॥ तन्यायें आम्ही भूतांसहित ॥ तुजपुढें मिरवूं कीं ॥ १६ ॥ हें जरी म्हणसील खोटें ॥ तरी पूर्वजां बुडवूं नरककपाटें ॥ आणि पंचपातकें महानेटें ॥ निजमस्तकीं मिरवूं कीं ॥ १७ ॥ गोहत्यारी ब्रह्महत्यारी ॥ स्त्रीहत्यारी बाळहत्यारी ॥ मातृपितृगुरुहत्यारी ॥ पंचपातकें मस्तकीं मिरवूं कीं ॥ १८ ॥ ऐशीं पातकें रौरव क्षितीं[7] ॥

१ आठवी आवृत्ती. २ टाकून. ३ लंकेचें राज्य. ४ अमृत. ५ भांडण. ६ सूर्याला. ७ परलोकीं. ८ पृथ्वीवर.

भोग मिरवूं संवत्सरअयुतीं ॥ यातें साक्ष चित्रगुप्तीं ॥ लीनमुखपदा मिरवूं कां ॥ १९ ॥ ऐसे आमुचे बोल निश्चित ॥ काया वाचा धरूनि निश्चित ॥ तरी आतां होईं कृपावंत ॥ दयालहरी मिरवावी ॥ १२० ॥ यावरी बोले मच्छिंद्रनाथ ॥ साबरीविद्या मम कवित्व ॥ त्यातें साह्य भूतांसहित ॥ कार्यार्थीं तुम्हीं असावें ॥ २१ ॥ जो जो मंत्र जया प्रकरणीं ॥ तरी त्या अर्थीं तुम्हीं वर्तोनी ॥ साह्य करावें मंत्रालागुनी ॥ कोणीतरी घोकिलिया ॥ २२ ॥ मग अष्टही म्हणती अवश्य ॥ कार्य करूं निःसंशयास ॥ मग साधनप्रयोग आपुला भक्ष ॥ पृथक् पृथक् सांगीतला ॥ २३ ॥ अष्टकोटी भूतावळीसहित ॥ भक्षसाधन सांगितलें समस्त ॥ येणें पंथें कार्य जगांत ॥ निश्चयें आम्ही मिरवूं कीं ॥ २४ ॥ पूजापुरस्कर अभ्युत्थान ॥ मंत्रासहित निर्वाण ॥ मंत्र उजळला स्थापून ग्रहण ॥ पर्वणीतें नेमिलें ॥ २५ ॥ ऐसा निश्चय सांग होतां ॥ मग बळें प्रेरकास्त्र प्रेरितां ॥ समूळ नासूनि गेली वार्ता ॥ आकर्षणअस्त्राची ॥ २६ ॥ येरीकडे अष्टकोटी भूतावळ ॥ जोगिणी इत्यादि सकळ ॥ स्पर्शूं पाहती चरणकमळ ॥ मही व्यक्त होऊनियां ॥ २७ ॥ तेव्हां जल्पून विमुक्तास्त्र ॥ मुक्त केले पिशाच सर्वत्र ॥ मग मच्छिंद्रपद नमूनि पवित्र ॥ सन्मुख उभ्या राहती ॥ २८ ॥ बद्धांजुळी[1] उभय कर ॥ उभे असती ते समोर ॥ वाणी वदले जयजयकार ॥ धन्य मच्छिंद्र म्हणोनी ॥ २९ ॥ मग त्या मंडळींत मच्छिंद्र ॥ कैसा शोभला मूर्तिमंत ॥ जेवीं नक्षत्रांमाजी तेजोमंत ॥ शशिनाथ[2] मिरवला ॥ १३० ॥ कीं रश्मिपालमंडळांत[3] ॥ तेजें गर्हिवरला प्रभे आदित्य ॥ कीं सुरवरगणीं शचीनाथ[4] ॥ देवांमध्यें मिरवला ॥ ३१ ॥ कीं शिवगणसमुदायीं ॥ परम शोभत नेगजांवई[5] ॥ कीं विष्णुगणांत शेषशायी[6] ॥ प्रभुत्वपणीं मिरवला ॥ ३२ ॥ कीं दानवांमाजी[7] उशनामूर्ती[8] ॥ कीं देवांमाजी बृहस्पती ॥ कीं पृतनेमाजी[9] ऐरावती ॥ देवांगणीं मिरवतसे ॥ ३३ ॥ तेवीं पिशाचमंडळांत ॥ परम शोभला मच्छिंद्रनाथ ॥ मग सकळांच्या मस्तकीं ठेवूनि हात ॥ म्हणे क्षेमवंत असावें ॥ ३४ ॥ अष्टजण मुख्य नायक ॥ ते बोलती बोलावून सकळिक ॥ कीं मच्छिंद्र कार्यश्लोक ॥ जगउपकारा वदला असे ॥ ३५ ॥ तरी त्याचा धाक कोणीं ॥ तया साह्य पिशाच असावें येउनी ॥ सांगितलें याचें कार्य द्या करूनी ॥ मंत्रोचार होतांचि ॥ ३६ ॥ ऐसें ऐकोनियां भूतें ॥ अवश्य म्हणती जोडोनि हात ॥ यावरी बोले मच्छिंद्रनाथ ॥ आणिक वर मज द्यावा ॥ ३७ ॥ तुमचें आमुचें समरंगण ॥ झालें सबळ बळेंकरून ॥ त्या समरंगणाचें कथन ॥ लोकीं ऐसें मिरवलें ॥ ३८ ॥ तरी तें आख्यान वाचितां ॥ तया न करावी बाधा सर्वथा ॥ आणि हें आख्यान संग्रहीं पाळितां ॥ प्रिय मानावा तो पुरुष ॥ ३९ ॥ त्यास जरी संकट येतां ॥ निवारण करावें तुम्हीं सर्वथा ॥ आणि आपलेकडून सहसा व्यथा ॥ जाणून त्या पुरुषा करूं नये ॥ १४० ॥ हें आख्यान राहे जया सदनीं ॥ तेथें बसूं नये सहसा भूतांनीं ॥ जैसें भाद्रपदशुद्ध चतुर्थीदिनीं ॥ चंद्रालागीं न देखती ॥ ४१ ॥ कीं अविंधातें जेवीं

१ हात जोडून. २ चंद्र. ३ सूर्यमंडळांत. ४ इंद्र. ५ शंकर. ६ विष्णू. ७ दैत्यांच्या समूहांत. ८ शुक्र. ९ सैन्यांत.

किंवा सूकर ॥ कीं श्वान मानिती अशुद्ध विप्र ॥ तेवीं तें मानूनि सर्वत्र ॥ दूरदेशा वसावें ॥ ४२ ॥ ऐसें आणून चित्तीं ॥ तें सदन स्पर्शू नये भूतीं ॥ अस्पर्श होतां व्यथा किंचित ॥ होणार नाहीं भूतांची ॥ ४३ ॥ यावरी प्रशस्तपणें राहून ॥ जरी त्या सदना आलें विघ्न ॥ तयाचें करावें निवारण ॥ सकळ भूतें मिळोनियां ॥ ४४ ॥ आणि तया घरचें मनुष्य व्यर्थ ॥ जरी भेटलें जातां मार्गांत ॥ तरी मार्ग सोडून निश्चित ॥ दूर मार्गी बैसावें ॥ ४५ ॥ हें आख्यान जो पाळिता ॥ त्यास कदाकाळीं न करावी व्यथा ॥ हेंचि द्यावें मज सर्वथा ॥ कृपा करून सर्वांनीं ॥ ४६ ॥ ऐसी ऐकून मच्छिंद्रउक्ती ॥ अवश्य करूं सकळ म्हणती ॥ त्या सदनातें व्यथा निश्चितीं ॥ आम्ही न करूं सहसाहीं ॥ ४७ ॥ ऐसें वदून वेरदभूत ॥ नमिता झाला मच्छिंद्रनाथ ॥ सर्व नमून पुसून त्यातें ॥ स्वस्थानातें चालिले ॥ ४८ ॥ अष्टकोटी पिशाचांसहित ॥ अष्ट विराजे मुख्य दैवत ॥ तेही नमून मच्छिंद्राप्रत ॥ स्वस्थानासी पैं गेले ॥ ४९ ॥ येरीकडे मच्छिंद्रनाथ सत्वर ॥ पाहता झाला बारा मल्हार ॥ तेथींचा विधी करूनि सर्व ॥ कुमारीं दैवतीं चालिला ॥ १५० ॥ तैसीच पावे कालिका भवानी ॥ ते कथा पावेल मच्छिंद्रालागुनी ॥ ते पुढिले अध्यायीं अवधान देउनी ॥ कथा श्रोते स्वीकारा ॥ ५१ ॥ अहो ह्या कथासारग्रंथास ॥ परिकर पंचम अध्याय घोकिल्यास ॥ पिशाचबाधा तयासी खास ॥ होणार नाहीं सहसाही ॥ ५२ ॥ जरी पहिली बाधा असेल ॥ तरी ती पठण करितां जाईल ॥ प्रथम अध्याय जो घोकील ॥ त्याचा अंगरोग जाईल कीं ॥ ५३ ॥ दुसरा अध्याय घोकिल्यापासून ॥ विद्याभ्यास होईल पूर्ण ॥ तिसरा अध्याय घोकितां प्रसन्न ॥ होईल अंज-नीसुत तयांतें ॥ ५४ ॥ चवथा अध्याय घोकितां फळ ॥ कार्य निर्वंटील परम सकळ ॥ मान्यता देईल महीपाळ ॥ मौन पडेल सर्वांतें ॥ ५५ ॥ असो ऐसे पंचम प्रसंग ॥ मंत्रसंजीवनी अनुराग ॥ धुंडिसुत मालुजी सांग ॥ वदे नरहरिकृपेंकरूनियां ॥ ५६ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागार ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ पंचमाऽध्याय गोड हा ॥ १५७ ॥ ॥ अध्याय ॥ ५ ॥ छ ॥ ओंव्या ॥ १५७ ॥ छ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ छ ॥ श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥ छ ॥ शुभं भवतु ॥ छ ॥

१ कुत्रा. २ वेताळ. ३ रसाळ, गोड. ४ मारुति. ५ शेवटास नेईल. ६ राजा.

॥ नवनाथभक्तिसार पंचमाध्याय समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी क्षीराब्धिवासा ॥ शेषशायी कमळहंसा ॥ नभोद्भवशोभाकर्मळाभासा ॥ सुखविलासा रमेशा ॥ १ ॥ हे करुणानिधे दयावंता ॥ दीनबंधो दीनानाथा ॥ पुढें रसाळ कवित्वकथा ॥ बोलवीं कां रैसनेसीं ॥ २ ॥ मागील अध्यायीं रसाळ कथन ॥ कीं बारामल्हार पवित्र स्थान ॥ तेथें अष्टदैवत पिशाच मिळोन ॥ युद्ध केलें नाथासीं ॥ ३ ॥ यापरी बारामल्हार करून तीर्थ ॥ कुँमार दैवत करून कोंकणस्थानांत ॥ कुडाळ प्रांत आडूळ गांवांत ॥ येऊनियां राहिला ॥ ४ ॥ तों ग्रामाबाहेर दुर्गालयीं ॥ महाकाळिका दैवत आहे ॥ तयाचे दर्शना लवलाहें ॥ मच्छिंद्रनाथ पैं गेला ॥ ५ ॥ तें काळिका दैवत अति खँडतर ॥ मूर्तिमंत नांदे पृथ्वीवर ॥ तें शिवहस्ताचें काळिकाअस्त्र ॥ स्थापन केलें महीसी ॥ ६ ॥ त्या अस्त्रेंकरून दैत्य वधिले ॥ म्हणोनि शिवचित्त प्रसन्न झालें ॥ म्हणून काळिकादेवी वहिलें ॥ वरप्रदान घेई कां ॥ ७ ॥ वेधक कामना असेल चित्तीं ॥ तें वरप्रदान मागें भगवती ॥ येरी म्हणे अँपर्णापती ॥ मम कामना ऐकिजे ॥ ८ ॥ तव हस्तीं मी बहुत दिवस ॥ बैसलें अस्त्रसंभारास ॥ आणि जेथें धाडिलें त्या कार्यास ॥ सिद्ध करून आलें मी ॥ ९ ॥ बहुत वृक्षांतें भंगितां क्षितीं ॥ मी श्रम पावलें अंबिकाहस्तीं ॥ तरी मातें विश्रांती ॥ सुखवासा भोगूं दे ॥ १० ॥ मग अवश्य म्हणूनि उमारमण ॥ तेथें केलें तियेचें स्थापन ॥ तें उग्र दैवत अति म्हणोन ॥ अद्याप आहे कलीमाजी ॥ ११ ॥ त्या काळिकादर्शनासाठीं ॥ चित्त व्यग्र होवोनि पोटीं ॥ मार्ग लक्षून तयासाठीं ॥ संचार करिता जाहला ॥ १२ ॥ देवीप्रती करूनि नमन ॥ म्हणे माय वो आश्चर्यपण ॥ म्यां मंत्रकाव्य केलें निपुण ॥ त्याजला साह्य होईं तूं ॥ १३ ॥ तरी माझे हस्तें विराजून ॥ मम कवित्वविद्या गौरवून ॥ तया ओपून वरदान ॥ कार्या उदित होईं कां ॥ १४ ॥ ऐसें मच्छिंद्र बोलतां वाणी ॥ क्षोभ चढला अंतःकरणीं ॥ शिवहस्तें अस्त्रालागोनी ॥ पूर्णाश्रम झालासे ॥ १५ ॥ त्यांत मच्छिंद्राचें बोलणें ॥ त्या काळिकादेवीनें ऐकून ॥ तेणें क्षोभलें अंतःकरण ॥ प्रळयासमान जेवीं ॥ १६ ॥ जैसा मुचकुंद श्रमोनि निद्रिस्थ ॥ तैं काळयवन गेला तेथ ॥ निद्रा विघडतां क्रोधानळांत ॥ प्रसर झाला त्या समयीं ॥ १७ ॥ कीं प्रल्हाद पडतां परम संकटीं ॥ विष्णुहृदयीं क्रोध दाटी ॥ प्रगट झाला कोरडे काष्ठीं ॥ राक्षसालागीं निवटावया ॥ १८ ॥ तैसी काळिकाहृदयसरिता ॥ उचंबळली क्रोधभरिता ॥ मच्छिंद्रालागीं महीसिंधुअर्था ॥ मेळवूं पाहे लगबगें ॥ १९ ॥ कीं क्रोध नोहे वडवानळ ॥ मच्छिंद्र अब्धी अपारजळ ॥ प्राशूं पाहे उतावेळ ॥ अर्थसमय जाणूनियां ॥ २० ॥ म्हणे नष्टा अनिष्टा पतिता ॥ मी भँवपाणीं श्रमलें असतां ॥ त्यांतचि मातें दुःखवार्ता ॥ शिणवूं पाहसी पुढारा ॥ २१ ॥ तुवां कवित्वविद्या निर्मून ॥ मातें मागसी वरप्रदान ॥ परी वर नोहे मजला विघ्न ॥ करूं आलासी दुर्बुद्धे ॥ २२ ॥ अरे मी आपुला भोग सारून ॥ निवांत बैसलें सेवित स्थान ॥ तें तूं मातें वरा गोंवून ॥

१ आकाशांतील कमल–सूर्य–त्याप्रमाणें शोभणाऱ्या. २ वाणीनें. ३ स्वामिकार्तिक. ४ जागृत. ५ शंकरा. ६ पृथ्वीवर. ७ शंकराचे हातांत.

शिणवूं पाहसी दुरात्मया ॥ २३ ॥ तरी आतां मम लोचनीं ॥ उभा न राहें जाय फिरोनी ॥ नातरी आगळीक होतां करणी ॥ शासनकाळ लाभसील ॥ २४ ॥ मी शिवकरींचें अस्त्र ॥ तव करीं राहीन काय विचित्र ॥ कीं करीं कवळून नरोटीपात्र ॥ भिक्षा मागे श्रीमंत ॥ २५ ॥ किंवा पितळधातूची मुद्रिका रचिली ॥ ते हिराहिरकणी वेढेका घडली ॥ तेवीं तूतें कामना स्फुरली ॥ सर सर माघारा ॥ २६ ॥ कीं वायसाचे धवळारीं ॥ हंसबाळ करी चाकरी ॥ तन्न्यायें दुराचारी ॥ इच्छूं पाहे मम काष्ठा ॥ २७ ॥ राव रंकाचे पंक्तीं आला ॥ आला परी श्रेष्ठता त्याला ॥ कीं सिंधूचि कूपस्थानीं ठेला ॥ नांदत कीं आवडीनें ॥ २८ ॥ कीं दीपतेजातें पाहूनि वास ॥ दीपतेजातें करी आस ॥ तन्न्यायें शक्तिअस्त्रास ॥ तव करीं वसती प्रारब्धें ॥ २९ ॥ आला विचारिता पांडित्यपण ॥ तो अजारक्षका पुसेल कोठून ॥ तन्न्यायें मूर्खा जाण ॥ आलास येथें दुरात्मया ॥ ३० ॥ अहा प्रतापी विनतासुत ॥ क्षीण चिलीट होऊनि मस्त ॥ तयासीं समता करूं पाहत ॥ तेवीं येथें आलासी ॥ ३१ ॥ अरे मी देव रुद्रकरीं असतां ॥ तव करीं वसूं हें काय भूता ॥ तूतें कांहीं शंका बोलतां ॥ वाटली नाहीं दुरात्मया ॥ ३२ ॥ तरी असो आतां कैसें ॥ येथोनि जाईं लपवीं मुखास ॥ नातरी जीवित्वा पावसी नाश ॥ पतंग दीपासम जेवीं ॥ ३३ ॥ याउपरी मच्छिंद्र म्हणे देवी ॥ पतंग जळे दीपासवीं ॥ परी तैसें नोहे माझे ठायीं ॥ प्रताप पाहीं तरी आतां ॥ ३४ ॥ अगे मित्रबिंब तें असे लहान ॥ परी प्रतापतेजें भरे त्रिभुवन ॥ तेवीं तूतें दाखवून ॥ वश्य करीन ये समयीं ॥ ३५ ॥ अगे प्रताप जेवीं पंडुसुतांनीं ॥ वायुसुतातें श्वेतीं दावुनी ॥ अक्षयी ध्वजीं बैसवोनी ॥ कीर्ति केली महीवरी ॥ ३६ ॥ कीं अरुण मित्रापुढी जोड ॥ तेवीं तूतें दावीन चाड ॥ तरी दत्तपुत्र मी कोड ॥ जगीं मिरवीन ये वेळे ॥ ३७ ॥ देवी म्हणे भ्रष्टा परियेसीं ॥ कान फाडून तूं आलासी ॥ इतुक्यानें भयातें मज दाविसी ॥ परी मी न भीं सर्वथा ॥ ३८ ॥ हातीं घेऊनि करकंकण ॥ शेंदूर आलासी भाळीं चर्चून ॥ परी मी न भिईं इतुक्यानें ॥ सर सर परता हे भ्रष्टा ॥ ३९ ॥ अरे तुझी उत्पत्ती मज ठाउक ॥ कीं धीवर जाण तुझा जनक ॥ तरी तूं मत्स्य मीन धरून कौतुकें ॥ निर्वाह करीं बा उदराचा ॥४०॥ तरी तुज अस्त्रविद्या निपुण ॥ कासया व्हावी दरिद्याकारण ॥ कीं अंधाचें जन्मचक्षुलावण्य ॥ सर्वथा उपयोगीं दिसेना ॥ ४१ ॥ कीं बहुरूपी मिरवी शूरपण ॥ तरी तें खेळापुरतें निपुण ॥ तें द्वंद्वजाळ सांभाळ सांभाळून ॥ वेव्हार आव्हानीं आपुला ॥ ४२ ॥ अरे मातें दाविसी उग्र रूप ॥ दांभिका ठका महाप्रताप ॥ अहंकृती मनाचें पाप ॥ मनामाजी मिरवीं कां ॥ ४३ ॥ तूतें वाटेल मी महाथोर ॥ कीं वश्य केलीं भूतें समग्र ॥ तैसा नोहे हा व्यवहार ॥ शिवास्त्र मी असें ॥ ४४ ॥ उगली दृष्टी करीन वांकुडी ॥ पाडीन ब्रह्मांडांच्या उतरडी ॥ तेथें मशका तव प्रौढी ॥ किमर्थ व्यर्थ मिरवावी ॥ ४५ ॥ अगा



१ नरवंटी. २ कोंदण. ३ कावळ्याचे. ४ गृहीं, घरट्यांत. ५ धनगराला. ६ गरुड. ७ मासे.

मशक थडका हाणी बळें ॥ तरी का पडेल मंदराचळ ॥ तेवीं तूं मातें घुंगरडें केवळ ॥ निजदृष्टीं आव्हानीं ॥ ४६ ॥ मच्छिंद्र म्हणे देवी ऐक ॥ बळीनें वामन मानिला मशक ॥ परी परिणामीं पाताळलोक ॥ निजदृष्टीं दाविला ॥ ४७ ॥ ऐसें ऐकतां भद्रकाळी ॥ चित्तव्यवधान पडिलें क्रोधानळीं ॥ मग प्रतापशिखाज्वाळामाळीं ॥ कवळूं पाहे मच्छिंद्रा ॥ ४८ ॥ मग परम क्रोधें त्यासी बोलत ॥ म्हणे कवण प्रताप आहे तूतें ॥ तो मज दावीं मशका येथें ॥ वामनकृत्यें बळी जेवीं ॥ ४९ ॥ मच्छिंद्र म्हणे बहु युद्धासी ॥ मिरवलीस शिवकार्यासीं ॥ तें मज दावीं अहर्निशीं ॥ परीक्षा घेईन मी तुझी ॥ ५० ॥ अगा तरू वाढला गगनचुंबित ॥ परी वातशस्त्रें उचंबळत ॥ तेवीं तूतें तोचि पंथ ॥ आज दृष्टीं पडेल कीं ॥ ५१ ॥ अगे बहु जिंकिलें समरंगणी ॥ अभिमाननग[३] वाढविला त्वांणीं ॥ परी प्रारब्धयोगेंकरूनी ॥ छिन्नभिन्न होईल तो ॥ ५२ ॥ ऐसें ऐकतां भद्रकाळी ॥ देती झाली सिंहआरोळी ॥ प्रगट होतां अंतराळीं ॥ ब्रह्मांड तेजें उजळिलें ॥ ५३ ॥ शब्द करी अति अचाट ॥ कीं सहस्र विजूंचा कडकडाट ॥ कीं अनंत अर्क उदयांत ॥ महीलागीं मिरवला ॥ ५४ ॥ तें भद्रकाळीअस्त्र पूर्ण ॥ येरी अस्त्र नोहे तें समयप्रदान ॥ कीं देवदानवांचें मरण ॥ महीलागीं मिरवतसे ॥ ५५ ॥ तें अस्त्र नोहे बोलतां वाणी ॥ कीं मायाप्रळयींचा उदित अग्नी ॥ सकळां शांतवून शून्यवदनीं ॥ भक्षून राहे पंचभूतां ॥ ५६ ॥ ऐसी ते सकळ पूर्ण ॥ कीं वासवशक्तीची भगिनी दारुण ॥ पाहती झाली ऊर्ध्वगगन ॥ तेजःपुंज मिरवूनी ॥ ५७ ॥ जंव शब्द करितां अति अचाट ॥ खचून पडती गिरिकपाट ॥ वनचर पळतां न मिळे वाट ॥ ठायीं ठायीं दडताती ॥ ५८ ॥ अष्ट दिग्गज अष्ट दिक्पाळ ॥ परम हडबडले शब्द तुंबळ ॥ अति थडथडाट कांपे केवळ ॥ महीलागीं मिरवतसे ॥ ५९ ॥ हेलावलें समुद्रजळ ॥ हालावले सप्तपाताळ ॥ मही म्हणे मी रसातळ ॥ पाहीनसें वाटतें ॥ ६० ॥ उरगनाथ सहस्रफणी ॥ तोही उचली स्वमूर्धनी ॥ वाहूं पाहे सकळा अवनी ॥ रसातळभोगातें ॥ ६१ ॥ ऐकूनि सबळ कडकडाट ॥ वराह दंत सांवरी नेटें ॥ कूर्म पृष्ठी आपुली हाटे ॥ महीलागीं देतसे ॥ ६२ ॥ ऐसें दाही दिशा झालें ॥ मानव दानव सर्व गळाले ॥ विकारा करून प्रगट वहिले ॥ महीलागीं मिरवतसे ॥ ६३ ॥ सकळ झालिया हडबडाट ॥ देव दचकले स्वर्गपीठ ॥ सोडोनि राहोनि विमाना पेठ ॥ अंतराळीं मिरवती ॥ ६४ ॥ अंतराळीं कडकडाट ॥ करितां बोले मच्छिंद्रा नेट ॥ म्हणे घाला येतसे अचाट ॥ जीविंत रक्षीं जोगड्या ॥ ६५ ॥ तुवां व्यर्थ केली रेळी ॥ आतां महीची होईल रांगोळी ॥ तरी तूं स्वगुरू येणें काळीं ॥ स्मरणातें मिरवीं कां ॥ ६६ ॥ अगा जैसें वज्रास्त्रेंकरून ॥ बा नगाचें होतें चूर्ण ॥ तन्न्यायें तूं महीकारण ॥ क्षीण करिसी जोगड्या ॥ ६७ ॥ अरे हा सकळ महीपाट ॥ तो आज कालिका करी सपाट ॥ तरी आतां काय पहासी वाट ॥ मिरविसी कैसा जोगड्या ॥ ६८ ॥

१ मंदरनांवाचा पर्वत. २ क्रोधाग्नीमध्यें. ३ अभिमानरूपी पर्वत. ४ आकाशांत. ५ सूर्य. ६ शेष. ७ आपलें मस्तकीं. ८ स्वर्गांत. ९ तंटा.

कीं धरा सबळ ती आंदोळली ॥ यावरी तळीं भद्रकाळी ॥ तरी मच्छिंद्रधान्याची पिष्टबळी ॥ आतां मिरवीन जोगव्या ॥ ६९ ॥ मच्छिंद्र म्हणे बोलसी वाणी ॥ परी ते वृश्चिककंटकाची खाणी ॥ दंश करितां मजलागोनी ॥ त्याला मारीन निश्चयें ॥ ७० ॥ मग भस्मझोळी कक्षीपुटीं ॥ करीं कवळून भस्मचिमुटी ॥ मंत्रअस्त्रातें आणोनि पोटीं ॥ वासवशक्ती जपतसे ॥ ७१ ॥ मंत्रीं पाठ होतां भस्मचिमुटी ॥ फेंकिली तेव्हां गगनपंथीं ॥ तंव ती तत्काळ वासवशक्ती ॥ प्रगट झाली तेजस्वी ॥ ७२ ॥ जैसें सहस्र अर्क[1] तेजाळ ॥ कीं उदय पावला भडाग्निगोळ ॥ कालिकाविधान तममंडळ ॥ निरसावया जातसे ॥ ७३ ॥ कालिका कैनककश्यपू-जागीं[2] ॥ मानूनि प्ऱ्हाद मच्छिंद्र जोगी ॥ स्तंभापरी भस्मचिमुटींत वेगीं ॥ नरहरिरूपें प्रगटली ॥ ७४ ॥ कीं परम क्रोधी वडवानळ ॥ भद्रकाळी ते समुद्रजळ ॥ प्राशावया उतावेळ ॥ गगनपंथें जातसे ॥ ७५ ॥ तें वासवास्त्र अर्ककरींचें ॥ भद्रकाळी अस्त्र शिवकरींचें ॥ उभय ते सवार प्रतापनगरींचे ॥ युद्धालागीं मिरवले ॥ ७६ ॥ कीं पाहाणी पाहातां हरिहर ॥ कीं एक मित्र एक चंद्र ॥ वाचस्पतीचें माहात्म्य अपार ॥ उशना[3] कवी मिरवीतसे ॥ ७७ ॥ कीं एक मेरू एक मांदार ॥ कीं वायु आणि वायुकुमर ॥ तेवीं भद्रकाळी वासवास्त्र ॥ गगनामाजी मिरवती ॥ ७८ ॥ कीं जेठियांमाजी जरासंध ॥ तया भिडला भीम प्रसिद्ध ॥ कीं कपींमाजी सुग्रीव द्वंद्वं ॥ वाळीलागीं भिडतसे ॥ ७९ ॥ तव्द्यार्थे[4] उभय शक्ती ॥ युद्धा मिसळल्या गगनपंथीं ॥ लोंबीझोंबी प्राणरहिती ॥ करूं पाहे एकमेकां ॥ ८० ॥ मग तो एकचि दणदणाट ॥ झाला सबळ ब्रह्मांडस्फोट ॥ विमानीं पळविती देवता वाट ॥ चुकारपणीं मिरवतसे ॥ ८१ ॥ दोनीं अस्त्रें बळवंत ॥ एकमेकांतें प्रहार करित ॥ जेणें प्रहारें भयाभीत ॥ दाही दिशा तैं होती ॥ ८२ ॥ परी ती काळी अस्त्रदैवत ॥ तिणें ग्रासिलें वासवशक्तीतें ॥ मग अति क्रूर होउनी उन्मत्त ॥ मच्छिंद्रावरी चालली ॥ ८३ ॥ तें पाहून मच्छिंद्रनाथ ॥ करीं कवळीं भस्म चिमुटींत ॥ मग एकादश शस्त्रांतें ॥ रुद्रमंत्र[5] प्रयोगीं स्मरतसे ॥ ८४ ॥ जेणेंकरून एकादश रुद्र ॥ प्रगट झाले महाभद्र ॥ तेजःपुंज नक्षत्रचंद्र ॥ कालिकास्त्र मिरवलें ॥ ८५ ॥ तें महाप्रळयाकार ॥ भयंकररूपी अनिवार ॥ तें पाहतांच कालिकास्त्र ॥ सूक्तीलागीं प्रवर्तली[6] ॥ ८६ ॥ सकळां करूनी नमनानमन ॥ स्तुतीस वाडोनी खणूनी रत्न ॥ परम भक्ती सूक्तीचें कारण ॥ शृंगारिलें रुद्रातें ॥ ८७ ॥ तें नवरत्नांचा सुगम शृंगार ॥ भूषणीं मिरवितां द्वादश रुद्र ॥ शांत होउनी महाभद्र ॥ ऐलँरूपीं[7] पावले ॥ ८८ ॥ तें पाहूनी मच्छिंद्रनाथ ॥ वज्रास्त्र त्वरें प्रेरित ॥ तया साह्य धूम्रास्त्र ॥ महांत तेवीं मिरवतसे ॥ ८९ ॥ तेणेंकरून धुमधुमाकार ॥ मावळला मित्र तारा चंद्र ॥ तया संधींत वज्रास्त्र ॥ निजमस्तकीं भेदितसे ॥ ९० ॥ परी ती चपळ काळिका देवी ॥ वज्रास्त्र धरिलें तिनें पायीं ॥ आपटिती झाली शैलाद्रिमहीं[8] ॥ उत्तरदिशेकारणें ॥ ९१ ॥ तेणें घायें

१ सूर्य. २ हिरण्यकशिपुदैत्याचे ठिकाणीं. ३ शुक्राचार्य. ४ युद्धार्थ. ५ शिवमंत्र. ६ स्तुती करण्याला प्रारंभ केला. ७ पूर्वरूपाला. ८ सह्याद्रिपर्वतावर.

शैलाद्रि पर्वत ॥ निमा चूर झाला नेमस्त ॥ ती साक्ष अद्यापि हिंदुस्थानांत ॥ सह्याद्रिपर्वत नसेचि ॥ ९२ ॥ रामेश्वरापासून नेमस्त ॥ आणि गुर्जरदेशपर्यंत ॥ महाद्री आहे नांदत ॥ पैल नसे महाराजा ॥ ९३ ॥ असो ऐसें वज्रास्त्र सरलें ॥ आणि धूम्रास्त्र तें गिळिलें ॥ तें पाहून मच्छिंद्र वहिलें ॥ वाताकर्षण जपतसे ॥ ९४ ॥ तें सबळ वाताकर्षण ॥ लाभलें होतें मच्छिंद्राकारणें ॥ जें शुक्रमंत्रप्रदान ॥ संजीवनी लाधली ॥ ९५ ॥ कीं वसिष्ठा धेनू झाला लाभ ॥ कीं तें विष्णूचें सुदर्शन मिळालें स्वयंभ ॥ तेवीं देत सूक्तिकागर्भ ॥ सूक्तास्त्र मिळालें ॥ ९६ ॥ कीं यमालागीं यमन साधलें ॥ कीं दमालागीं दमन लाधलें ॥ तेवीं युक्तीं मच्छिंद्र शोभले ॥ देत सूक्तिकारत्न मिरवलें ॥ ९७ ॥ कीं वज्रास्त्रें शक्र विराजमान ॥ कीं देवतां लाधलें अमृतपान ॥ तेवीं दत्तानें सूक्तिकारत्न ॥ मच्छिंद्रातें मिरवलें ॥ ९८ ॥ रत्नांत मंत्रावळीं ॥ देत कृपेची वरदवाळी ॥ भस्मचिमुटी योजून ते काळीं ॥ प्रोक्षिता झाला मच्छिंद्र ॥ ९९ ॥ तंव तें मंत्रास्त्र गुप्त ॥ कालिका देवीवर वाहात ॥ प्रवेश होतांच वात कुंठित ॥ सकळ देहाचा पैं झाला ॥ १०० ॥ तेणें देवी विकळ झाली ॥ गगनाहून आदळली ॥ तेणें धायें अति व्यापिली ॥ केवील दिसे मूर्च्छेनें ॥ १ ॥ परी महीं पडतां ऐसें वाटलें ॥ कीं मेरुमांदार कोसळले ॥ तेणें प्रहारें पर्वत भंगले ॥ तरू झाले रांगोळी ॥ २ ॥ कित्येक सावजें झालीं चूर्ण ॥ कांहीं पळतां रानोरान ॥ दचका पावती समुच्चयें जन ॥ देव दानव विस्मित ॥ ३ ॥ असो ती आवरण अवस्था ॥ महीं निचेष्टित झाली माता ॥ श्वेत नयनीं विकळ देहस्था ॥ अवस्थेंत मिरवली ॥ ४ ॥ प्राणरहित होऊं पाहे ॥ मग वेगीं स्मरला उमाराय ॥ ते वाग्भाट[१] धांवोनी तरणोपाय ॥ जाऊनि पोंचलें कैलासा ॥ ५ ॥ जातांच श्रवणद्वारीं बोभाट[२] ॥ सावध होय कैलासनाथ ॥ कीं शिवकरींचें कालिकास्त्र अचाट ॥ संकटातें पडियेलें ॥ ६ ॥ तो हृदयीं पाहे विचारून ॥ मच्छिंद्रनाथाचें झालें आगमन ॥ मग नंदिकेश्वरीं सिद्ध होऊन ॥ तया ठायीं पातला ॥ ७ ॥ येतांच देखे मच्छिंद्रनाथ ॥ धांवून लगबगीं अति त्वरित ॥ चरणकमळीं कामनातीत[३] ॥ मूर्धकमळ[४] अर्पितसे ॥ ८ ॥ शिव उतरून नंदिकेश्वरीं ॥ भाउकें कवळिला दशमकरीं[५] ॥ भेटून हृदय प्रेमलहरीं ॥ आंवळून धरितसे ॥ ९ ॥ म्हणे तान्हुल्या अति थोर ॥ करून दाविला चमत्कार ॥ मजकरींचें कालिकास्त्र ॥ आजि जिंकिलें पराक्रमें ॥ ११० ॥ नाथ म्हणे जी आदिनाथा ॥ ही त्वत्कृपेची बोधसरिता ॥ बद्रिकाश्रमीं राहून दत्ता ॥ श्रुत केलें तुम्हीं मातें ॥ ११ ॥ षण्मास महाराजा रक्षूनि मातें ॥ प्रसन्न रवी केला तुम्हीं दत्त ॥ त्या प्रसन्न फळाचें उदित ॥ मातें ओपिलें कृपेनें ॥ १२ ॥ शिव म्हणे बा अस्तु आतां ॥ सावध करीं कालिकादेवता ॥ नाथ म्हणे वरदहस्ता ॥ मम मौळीं[६] स्पर्शावा ॥ १३ ॥ माझें मागणें आहे किंचित ॥ देऊनि स्वामींनीं करावें श्रुत ॥ जैसा संजीवनीचे अर्थ ॥ शुक्र कचा फळला असे ॥ १४ ॥ मग सिद्ध

१ सुंदरभाषणरूपी रत्न. २ धांव्याचे शब्द. ३ निष्काम. ४ मस्तक. ५ दहा हातांनीं. ६ मस्तकाचे ठिकाणीं.

सर्वेश वरदमौळी ॥ म्हणे कोण कामना उचित झाली ॥ तदनुअर्थ ये काळीं ॥ लाधसी तूं वद वत्सा ॥ १५ ॥ नाथ म्हणे पंचवक्त्रा ॥ तुवां कवित्व करविलें साबरी पवित्रा ॥ त्यातें वर देऊनि वरदपात्रा ॥ काळिकास्त्र मिरवावें ॥ १६ ॥ जैसें तव करीं बहु दिवस ॥ बसून अमित केलें कार्यास ॥ तेवीं माझे वैकास ॥ काळिकेनें बसावें ॥ १७ ॥ जें जें कार्य लागे मातें ॥ तदनुकार्य वाहावें सरतें ॥ आणि पुढेंही मंत्रकार्यातें ॥ उपयोग व्हावें जयासी ॥ १८ ॥ ऐसें ये रीतीं वरदान ॥ द्याल जरी प्रसन्न होऊन ॥ तरी कामना-समाधान ॥ निजदेहीं नांदेल ॥ १९ ॥ अवश्य म्हणून उमारमण ॥ काळिका त्वत्करीं ओपीन ॥ परी या समयीं जीवितदान ॥ काळिकेतें स्वीकारीं ॥ १२० ॥ यापरी मीही उमानाथ ॥ त्वत्कार्यास आहें उदित ॥ ऐसें म्हणोनि करतळीं त्वरित ॥ भाष घेतली मच्छिंद्रें ॥ २१ ॥ मग चरणीं माथा ठेवूनी ॥ भस्मचिमुटी घेउनी ॥ वातास्त्रमंत्रआकर्षण जपोनी ॥ बोलतसे वैखरी ॥ २२ ॥ पूर्णपाठ वैखरीसीं होतां ॥ भस्मचिमुटी फेंकी तत्त्वतां ॥ तेणें हृद्गत होऊनि सर्वथा ॥ काळिकादेवी उठली ॥ २३ ॥ उठून बैसली सावध होउनी ॥ दाही दिशा पाहे न्याहाळूनी ॥ तों अकस्मात शूळपाणी ॥ आपुले दृष्टीं देखिला ॥ २४ ॥ मग लगबगें येऊनि त्वरित ॥ शिवपदीं मौळी सज्ज करित ॥ म्हणे महाराजा आदिनाथ ॥ आजि जीवित्व त्वां दिधलें ॥ २५ ॥ जैसें होय सर्पसंत्रास ॥ तोही मिरवला आस्तीक त्यास ॥ तेवीं आज मम प्राणांस ॥ रक्षिता झालासी आदिनाथा ॥ २६ ॥ कीं भस्मासुराच्या पवनवातीं ॥ आपण पडिलां होतां व्यावृत्ती ॥ तेथें रक्षणें विष्णुमूर्ती ॥ कृपापात्रीं मिरवली ॥ २७ ॥ कीं शक्तिघातें सुमित्रासुत ॥ पुढें होतां रघुनाथ ॥ विकट होतां हनुमंत ॥ प्रसन्न त्यातें झालासे ॥ २८ ॥ कीं प्रह्लादाच्या कैवारासी ॥ नरहरी धांवला अति उद्देशीं ॥ तन्न्यायें आज तूं मजपाशीं ॥ मिरवलास कीं कृपेनें ॥ २९ ॥ ऐसें म्हणोनि काळिकादेवी ॥ वारंवार लागे पायीं ॥ याउपरी म्हणे दक्षजांवई ॥ मम मागणें आहे एक ॥ १३० ॥ देशील जरी कृपा करून ॥ तरी तुज देईन नागरत्न ॥ देवी म्हणे उमारमण ॥ अर्थ कोणता बोलवा ॥ ३१ ॥ शिव म्हणे बहु दिवस ॥ मम करीं विराजलीस ॥ आतां येऊनि मच्छिंद्रास ॥ जगउपकारीं बसावें ॥ ३२ ॥ हेंचि मागणें माझें आहे ॥ तुवां कृपा करोनि मज द्यावें ॥ हें वचन ऐकून महामाय ॥ गदगदां हांसिन्नली ॥ ३३ ॥ म्हणे महाराजा पायांपाशीं ॥ मी म्हणवितें तुमची दासी ॥ इतुकें गुह्य धरोनि मानसीं ॥ दान मागतां हें काय ॥ ३४ ॥ जिकडे धाडाल तिकडे जाईन ॥ तुमची आज्ञा मज प्रमाण ॥ इतुकें गुह्य धरोन ॥ दान म्हणणें अनुचित हें ॥ ३५ ॥ जैसा वाचस्पती ज्ञानचाड ॥ अजारक्षका पुसे कोड ॥ तन्न्याय माझिया पाड ॥ जल्पसी कीं महाराजा ॥ ३६ ॥ कीं उड्डाण करावया अर्थीं ॥ गोलांगुळा स्तवी मारुती ॥ तन्न्यायें मम प्रयुक्तीं ॥ जल्पतां कीं महाराजा ॥ ३७ ॥ कीं पीयूषा मृत्युनिवारणास ॥ स्तविता झाला बळीरस ॥ कीं

१ त्याची सिद्धि. २ शंकरा. ३ तोंडांत. ४ तयार. ५ शंकर. ६ बृहस्पति. ७ ज्ञानासाठीं. ८ मेंढरें राखणाऱ्या धनगराला. ९ वानरांला. १० अमृताला.

टक्याकरितां महापरिस ॥ विनवीतसे धनाढ्याला ॥ ३८ ॥ तद्याय अपर्णापती ॥ गौप्य धरूनी करितां विनंती ॥ परी हें श्लाघ्य सेवकाप्रती ॥ कदाकाळीं साजेना ॥ ३९ ॥ तरी आतां असो ऐसें ॥ मान्य करीन स्वामिशब्दास ॥ मग बोलावून मच्छिंद्रास ॥ जननीं हृदयीं कवळिला ॥ १४० ॥ म्हणे बारे ऐक वचन ॥ साबरीविद्या कविरत्न ॥ जेथें येईल माझें नाम ॥ तेथें साह्य मी असें ॥ ४१ ॥ कवण अर्थी असो कैसें ॥ मी प्रवर्तवून उच्चारास ॥ ऐसें करतल देऊन भाष्य ॥ समाधानीं मिरवले ॥ ४२ ॥ मच्छिंद्र आणि उमानाथ ॥ देवीनें ठेवून तीन रात्र ॥ मग स्नेहसंपन्न बोल बोलता ॥ मच्छिंद्रनाथा ओडविलें ॥ ४३ ॥ याउपरी शिवें देवीचा पाणी ॥ मच्छिंद्रनाथाच्या कृपें ओपूनी ॥ अति गौरवें शूलपाणी ॥ स्वस्थानासी जातसे ॥ ४४ ॥ मग मच्छिंद्र आणि उमानाथ ॥ देवी बोळवूनि स्वस्थाना येत ॥ शिव पावले कैलासांत ॥ मच्छिंद्रनाथा भेटुनी ॥ ४५ ॥ यापरी तेथूनि मच्छिंद्रनाथ ॥ उत्तरपंथें गमन करित ॥ तों समुद्रतीरीं हरेश्वर दैवत ॥ गदातीर्थी पातला ॥ ४६ ॥ गदातीर्थी करूनि स्नान ॥ येत हरेश्वरा दर्शनाकारणें ॥ ते कथा वर्तेल रसाळ पूर्ण ॥ पुढिले अध्यायीं वदूं आतां ॥ ४७ ॥ शिवसुत वीरभद्र ॥ महाजेठी प्रतापरुद्र ॥ तयातें भेटतां नाथ-मच्छिंद्र ॥ समरंगणीं मिरवती ॥ ४८ ॥ असो येऊनि त्या प्रसंगीं आतां ॥ भावें पूजिली काळिका देवता ॥ तरी पठणीं प्रसंग उपयोग बहुतां ॥ मुष्टिनिवारणीं पडेल ॥ ४९ ॥ पुढें मंत्रपुष्टी दृष्टी ॥ बाधा न करी तीर्थांचिया पाठीं ॥ कुडेचेडेजारणालोटीं ॥ मरणभीती बाधेना ॥ १५० ॥ हा अध्याय नित्य पठण करील ॥ तो इतुक्या भयापासून सुटेल ॥ आणि हा अध्याय गृहीं पाळील ॥ कधींही पीडा त्यास न होय ॥ ५१ ॥ आणि कोणासही जगा[2]आंतौता ॥ काळीमुष्टीची बाधा होतां ॥ त्यांतें प्रसंग श्रवणीं पडतां ॥ शम होईल ती मुष्टी ॥ ५२ ॥ ऐसें गोरक्षाचें कथन ॥ वदला आहे किमयागिरी ग्रंथाकारण ॥ तरी जन हो विश्वास धरून ॥ ग्रंथ संग्रहीं पाळावा ॥ ५३ ॥ हा ग्रंथ म्हणाल उँगलीच[3] वाणी ॥ तरी नोहे आहे अमृतसंजीवनी ॥ पहा सिद्धाची वाग्वाणी ॥ श्रीगोरक्षें कथियेली ॥ ५४ ॥ तरी विश्वास धरूनि चित्ता ॥ प्रचीत[4] घ्यावी पठन करितां ॥ नाहींतरी ग्रंथ उगाच निंदितां ॥ दोषामाजी पडाल कीं ॥ ५५ ॥ याउपर अर्थाअर्थी ॥ उगेंच निंदाल ग्रंथाप्रती ॥ तयाचा निर्वंश पावून क्षितीं ॥ यमपुरीं वसे तो ॥ ५६ ॥ तरी श्रोते भाविक जन ॥ तुम्हां सांगतों एकचि वचन ॥ भावविश्वास करा रोहण ॥ सकळ स्वार्थ पुरेल कीं ॥ ५७ ॥ जे विश्वासावर स्वार झाले ॥ ते सर्वस्वीं तरून गेले ॥ सत्यवचनीं जगीं मिरवले ॥ संतवचनीं विश्वासुक ॥ ५८ ॥ तरी जगामाजी धुंडीसुत ॥ माल्ह नरहरीच्या वंशांत ॥ विश्वासें झाला ब्रह्मीं व्यक्त ॥ संतपदीं भावार्थ ॥ ५९ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ षष्ठाध्याय गोड हा ॥ १६० ॥ ॥ शुभं भवतु ॥ ॥ ६ ॥

१ शंकर. २ जगामध्यें. ३ व्यर्थ. ४ अनुभव.

## अध्याय ७ वा






श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी पंकजाक्षा ॥ कमलापते कमलपत्राक्षा ॥ अगुणरूपा गुणसर्वेशा ॥ महादक्षा रघूत्तमा ॥ १ ॥ हे कमळमित्रकुळभूषणा ॥ रावणांतका रघुनंदना ॥ पुढें बोलवीं ग्रंथरचना ॥ जेणें श्रोतयां सुख वाटे ॥ २ ॥ मागिले अध्यायीं कथा सुरस ॥ कालिका देवी मच्छिंद्रास ॥ प्रसन्न होऊन वरदानास ॥ साबरीविद्या आतुली ॥ ३ ॥ तेथूनि आला हरेश्वरासी ॥ गदातीर्थस्नानउद्देशीं ॥ स्नान करून पर्वतासी ॥ प्रदक्षिणा आरंभिली ॥ ४ ॥ सवेंच येतां मच्छिंद्रनाथ ॥ तों वीरभद्र पातला स्नाना तेथ ॥ मानववेषी जोगी कृत्य ॥ त्रिशूळ डमरू धनुष्यादि ॥ ५ ॥ शैली शिंगी नाद अद्भुत ॥ नाद नोहे तो आगम व्यक्त ॥ साधकहिताचा स्वार्थअर्थ ॥ परिणाम सूचवी ॥ ६ ॥ अहो ती शिंगी नोहे देवता ॥ साधकजनांची कामदुहिता ॥ पूर्ण करावया परिणाम अर्था ॥ बोधरवि प्रवेशती ॥ ७ ॥ रज तम सत्व तृतीय गुण ॥ महामारक अति कठिण ॥ ते त्रिवर्ग करिती खडतरपण ॥ ऐक्य केला त्रिशूळ तो ॥ ८ ॥ यापरी आगमनिगमबीजें ॥ सारव्यक्त तेजःपुंजें ॥ तयाची पंथिका दावी करांभोजें ॥ विशाळ डमरू विराजला ॥ ९ ॥ सगुणकथा सप्तधातु ॥ गुणीं भरला गुणातीतु ॥ नवरंगरसांत झाला व्यक्तु ॥ हरिगुणींचि भक्तु होईना कां ॥१०॥ कामक्रोधषड्गुणविकार ॥ सत्वस्थाचे शत्रु अनिवार ॥ तयां जिंकितां विवेक फार ॥ शरगांडीव विराजलें ॥ ११ ॥ अहो शर नोहे ते जाण युक्ती ॥ कामक्रोधांतें देत मुक्ती ॥ गांडीव नोहे तें विषयभक्ती ॥ ज्ञानशरीं विराजलें ॥ १२ ॥ अगा शर न म्हणूं ते ज्ञानदिवटी ॥ अज्ञानतमींचें द्वंद्व निवटी ॥ अलक्षसंधानपूर्णकोटी ॥ भेदाभेद सर्वथा ॥ १३ ॥ ऐसा महाराज प्रतापरुद्र ॥ द्वंद्वलेश नसे मनीं वीरभद्र ॥ अज्ञानतमींचा महाचंद्र ॥ मच्छिंद्रातें भेटला ॥ १४ ॥ मच्छिंद्र करून येतसे स्नान ॥ वीरभद्र येतसे स्नानालागून ॥ तों मार्गीं मच्छिंद्रातें पाहून ॥ उभा केला हटकोनी ॥ १५ ॥ करून उभे नमनानमन ॥ म्हणे स्वामी तुम्ही कोण ॥ येरू म्हणे मच्छिंद्र अभिधान ॥ निजदेहा मिरवीतसे ॥ १६ ॥ येरू म्हणे कवण पंथीं ॥ अभ्यास मिरवितसां जगाप्रती ॥ मच्छिंद्र म्हणे जोगी ये नीती ॥ नाथपंथीं मिरवितों ॥ १७ ॥ येरू म्हणे कोण दर्शन ॥ मच्छिंद्र म्हणे जोगीमहिमान ॥ शैली कंथा मुद्रा भूषण ॥ निजअंगीं मिरवीतसें ॥ १८ ॥ विरभद्र म्हणे मुद्रा सान ॥ न घालितां फाडिले कान ॥ येरू म्हणे गुरुप्रसादेंकरून ॥ मंथनीं निर्मिला हा एक ॥ १९ ॥ वीरभद्र म्हणे काय पाखंड ॥ व्यर्थचि उगलें वाढवूनि बंड ॥ जगामाजी मिरवितां काळें तोंड ॥ योग्यायोग्य दिसेना ॥ २० ॥ तरी आतां योगद्रुमा ॥ मुद्रा सोड ह्या नसती उत्तमा ॥ नाहीं तरी शिक्षा पावसी नेमा ॥ ठाईं ठाईं महाराजा ॥ २१ ॥ अगा तव गुरु ऐसा कोण ॥ वेदविधीच्या प्राज्ञेंकरून ॥ पूर्ण आगळीक पंथ निर्मून ॥ जगामाजी मिरवितो ॥ २२ ॥ अगा स्वबुद्धीं तर्क करून ॥ भलतेंच मत करी स्थापन ॥

१ सूर्यकुलाला शोभविणाऱ्या. २ देती झाली. ३ इच्छित वस्तु देणारी. ४ नाशी. ५ नांव.

तो प्राज्ञीक[1] नव्हे मूर्खाहून ॥ शतमूर्ख म्हणावा ॥ २३ ॥ ऐसी ऐकतां भद्रगोष्टी[2] ॥ मच्छिंद्र संतप्त झाला पोटीं ॥ म्हणे मशका खोटी ॥ वल्गना करिसी अपार ॥ २४ ॥ अरे शतमूर्खाहून मूर्ख ॥ म्हणून बोलसी दुःखदायक ॥ परआत्मा क्षोभवून पातक ॥ भार वाहिला निजमौळीं[3] ॥ २५ ॥ अरे आत्मा क्षोभतां पराचा ॥ पापभार होत ब्रह्मांडींचा ॥ तस्मात् तव गुरु कैंचा ॥ दुजा गुरु विलोकीं ॥२६॥ अरे नष्टा दुर्जना अधमा ॥ तव दर्शनें स्नान करणें आम्हां ॥ आतां उगाचि जाय अपुल्या कामा ॥ शिक्षा पावसील मम हस्तें ॥ २७ ॥ ऐशापरी मच्छिंद्रनाथाचें भाषण ॥ ऐकतां वीरभद्राचें क्षोभलें मन ॥ म्हणे भ्रष्टा तुझा प्राण ॥ आतांच घेईन ये काळीं ॥२८॥ मग करीं कवळून सायकासन[4] ॥ सत्वर रगडून लाविला गुण[5] ॥ निर्वाण अर्धचंद्र बाण ॥ तूणीरांतून[6] काढिला ॥ २९ ॥ तें पाहून मच्छिंद्रनाथ ॥ म्हणे पतित झालासी उन्मत्त ॥ अरे उद्धटा आपुलें अहित ॥ जनांमाजी मिरविसी ॥ ३० ॥ अरे सायकासन सिद्ध करून ॥ सोंग दाविसी मजलागून ॥ परी हें बरवें नोहे मरण ॥ ये काळीं पावसी ॥ ३१ ॥ अरे ऐसें सोंग मजकारण ॥ कित्येक झाले अवलोकून ॥ बहुरूप्याचें खडतरपण ॥ शूरत्व रणीं मिरवेना ॥ ३२ ॥ कीं अजाकंठींचें लंबस्तन ॥ परी नातुडे[7] त्यांत दुग्धपान ॥ तेवीं तूं दाखविसी हावभाव करून ॥ परी क्षणैक क्षीण होसील कीं ॥ ३३ ॥ वीरभद्र म्हणे मूर्खा ऐक ॥ तूतें दावीन यमलोक ॥ तव आयुष्य सरलें सकळिक ॥ म्हणून येथें आलासी ॥ ३४ ॥ तरी मी तूतें काळयक्ष ॥ प्रगट झालों आहें प्रत्यक्ष ॥ तरी तव गुरु प्रतापदक्ष ॥ कैसा आहे पाहूं दे ॥ ३५ ॥ मच्छिंद्र म्हणे मशकासाठीं ॥ मेरू मिळवील काय नगांची कोटी ॥ कीं महाक्षीराब्धी घेऊन नरोटी ॥ भीक मागेल पोटातें ॥ ३६ ॥ मूर्खा ऐक वचनार्थ ॥ मम गुरूचा मौळीं वरद हस्त ॥ तेणें होतसे शरणागत ॥ मानव दानव देवादि ॥३७॥ तेथें अर्भका तुझा पाड ॥ किमर्थ आधीं मिरविसी कोड ॥ महासविता तप्त उजेड ॥ खद्योतातें मिरवेना ॥ ३८ ॥ वीरभद्र म्हणे तूं काय करिशी ॥ मरणकाळीं फांटा फुटला तुजसी ॥ आतां क्षणेंच भूमीपाशीं ॥ करीन नव्हतासि ऐसें ॥ ३९ ॥ अरे तव ग्रीवेतें काळपाश ॥ आधींच पावलें आयुष्य नाश ॥ म्हणून मूर्खा तूतें हौस ॥ ये वादा स्फुरलासी ॥ ४० ॥ ऐसें म्हणून वीरभद्रानें ॥ गुणीं सज्जिलें अस्त्रविंदान ॥ म्हणे भ्रष्टा सावधान ॥ राममंत्र जल्पीं कां ॥ ४१ ॥ मच्छिंद्र म्हणे राममंत्र ॥ तूतें वाटला अपवित्र ॥ परी तेणेंचि सुखी पंचवक्र ॥ दुःखलेशीं मुकलासे ॥ ४२ ॥ अरे राममंत्रें वाल्या तरला ॥ तें नाम तारील आतांच मजला ॥ परी सावध तूं होईं कां वहिला ॥ राममंत्रावेगळा ॥ ४३ ॥ ऐसें म्हणून कक्षे झोळी ॥ विलोकून भस्म करीं कवळी ॥ मग शस्त्रास्त्रीं तेणें काळीं ॥ वज्रस्थापना जल्पतसे ॥ ४४ ॥ पूर्ण प्रयोग घालून धाटीं ॥ भोंवतीं फिरवी भस्मचिमुटी ॥ तेणेंकरून वज्रदाटी ॥ दाही दिशा मिरवीतसे ॥ ४५ ॥ आणीक करीं कवळून भस्म ॥ याला विलोकी योगद्रुम ॥ तों वीरभद्रें सायकें परम ॥ निर्वाण-

१ शहाणा. २ वीरभद्राची गोष्ट. ३ आपल्या मस्तकावर. ४ धनुष्य. ५ धनुष्याची दोरी. ६ भात्यांतून. ७ आढळत नाहीं. ८ मानेला.

बाण सोडिला ॥ ४६ ॥ तो बाण येतां किंकाटत ॥ दृष्टीं पाहे मच्छिंद्रनाथ ॥ मग आपुले मानी मनांत ॥ बाण आहे तृणासम ॥ ४७ ॥ ऐसें म्हणून स्तब्धदृष्टी ॥ उभा करीं कवळून भस्मचिमुटी ॥ तंव तो बाण नभापोटीं ॥ संचरून उतरतसे ॥ ४८ ॥ मच्छिंद्रनाथातें लक्षून ॥ खालीं उतरतसे घ्यावया प्राण ॥ तों सबळ बळें वज्र येऊन ॥ प्रहार करिते पैं झाले ॥ ४९ ॥ तरी तें वज्र वरिष्ठ ॥ आदळतांच बाण झाला पिष्ट ॥ तें पाहून वीरभद्र वरिष्ठ ॥ परम चित्तीं क्षोभला ॥ ५० ॥ मग शक्तिअस्त्र दैदीप्यमान ॥ योजिता झाला रुद्रनंदन ॥ सज्ज करून सायकसंधान ॥ साधूनियां प्रेरिलें ॥ ५१ ॥ सर्वेंचि काढून दुसरा बाण ॥ नागास्त्र तयावरी स्थापून ॥ तोही चुंबीत पावला गगन ॥ पाठोपाठ शक्तीच्या ॥ ५२ ॥ परी ती शक्ती बलाढ्य बहुत ॥ स्वर्गीं मिरवे शब्द करीत ॥ ऐकतां शब्द भयभीत ॥ सकळ मही झाली असे ॥ ५३ ॥ दिग्गज पळती रानोरान ॥ शेष न ठेवी आपुली मान ॥ वराह पाहून अति निर्वाण ॥ दंतानें मही सरसावी ॥ ५४ ॥ कूर्म करीतसे सबळ पृष्ठी ॥ पाहूं पातले देव विमानदाटीं ॥ तेही पाहून कपाटपोटीं ॥ संचरून पळताती ॥ ५५ ॥ देवविमानीं हडबड ॥ पाहून उडुगण पळती पाड ॥ सोडून आपुलें कार्य उघड ॥ नभामाजी सरळले ॥ ५६ ॥ देव मानव यक्ष दैत्य ॥ म्हणती पावला प्रळयमृत्य ॥ ही शक्ति नोहे प्रळय समस्त ॥ मही बुडवील वाटतसे ॥ ५७ ॥ सबळ बळिष्ठ ती मही कांपत ॥ तेणें नगकड्यांची खांचणी होत ॥ मायलेक चुकून निश्चित ॥ रुदन करिती हंबरडें ॥ ५८ ॥ सहस्रविजूंचा कडकडाट ॥ दावून शब्द अनिवारलोट ॥ नभमंडळ पाहून नीट ॥ शक्ती भेदिली वज्रातें ॥ ५९ ॥ तेणें वज्र अति क्षीण ॥ होऊन पडलें गगनाहून ॥ पुढें मच्छिंद्राचा लक्षून प्राण ॥ हरावया येतसे ॥ ६० ॥ यावरी नागास्त्र निःशक्त ॥ तें पाहून मच्छिंद्रनाथ ॥ त्वरें कवळून भस्म चिमुटींत ॥ रुद्रास्त्र प्रेरीतसे ॥ ६१ ॥ त्यासवेंच योजून खगेंद्र अस्त्रांत ॥ पाठोपाठीं प्रेरित ॥ परी रुद्रास्त्र झालें व्यक्त ॥ रुद्र एकादश प्रतापी ॥ ६२ ॥ एकादशरुद्रचूडामणी ॥ शक्तीतें तल्लीन करी कवळूनी ॥ तेणें हस्त पाद मूर्धनी ॥ क्षीण होऊन पडियेलीं ॥ ६३ ॥ शक्ती पडतां खचून महीं ॥ रुद्र मिरवले अदृश्य देहीं ॥ येरीकडे खगेंद्र अही ॥ अस्त्राअस्त्र भक्षितसे ॥ ६४ ॥ तेणें नागास्त्र त्वरित ॥ अदृश्य झालें युद्धरहित ॥ यावरी अस्त्र विनतासुत ॥ तेंही झालें अदृश्य ॥ ६५ ॥ यावरी वीरभद्र प्रतापतरणी ॥ वातास्त्र प्रेरिता झाला गगनीं ॥ तें मच्छिंद्रनाथ विलोकुनी ॥ पर्वतास्त्र सोडीतसे ॥ ६६ ॥ तेणें कोंडिला अवघा वात ॥ मग वज्रास्त्र प्रेरी महारुद्रसुत ॥ तेणेंकरून चूर्ण पर्वत ॥ अदृश्यपणीं मिरवला ॥ ६७ ॥ यापरी प्रतापी वीरभद्र त्वरित ॥ प्रेरिता झाला अग्न्यस्त्र ॥ तें पाहून मच्छिंद्रनाथ ॥ जलदास्त्र प्रेरीतसे ॥ ६८ ॥ त्यानें सकळ अग्नी विझवून ॥ करितें झालें अदृश्य गमन ॥ यावरी वीरभद्रें कामास्त्र सोडून ॥ कामव्यथा योजीतसे ॥ ६९ ॥ त्यावरी विरक्तनाथ मच्छिंद्र ॥ प्रेरिता झाला

१ वीरभद्र. २ आणीबाणीचा प्रसंग. ३ नक्षत्रसमूह. ४ मस्तक. ५ गरुडास्त्र. ६ पर्जन्यास्त्र.

रत्यस्त्र[1] ॥ तेणेंकरून काम पळत ॥ सुख पावला रतिसंगें ॥ ७० ॥ यावरी वीरभद्र दक्ष ॥ प्रेरिता झाला महोरगास्त्र[2] ॥ तें पाहून मच्छिंद्रनाथ ॥ संजीवनी प्रेरीतसे ॥ ७१ ॥ वीरभद्र तो वैश्वानर ॥ प्रेरिता झाला दानवास्त्र ॥ मच्छिंद्रनाथ अति तत्पर ॥ देवास्त्र प्रेरीतसे ॥ ७२ ॥ मग अस्त्र तें बळवंत ॥ देव दानव प्रगटले अमित ॥ ते पाहूनियां उभयतांतें ॥ स्वग्रीवा तुकाविती[3] ॥ ७३ ॥ परस्परें धन्य धन्य ॥ वदोन हृदयीं करिती मान ॥ गद्गदोनि हास्यवचन ॥ एकमेकां बोलती ॥ ७४ ॥ वीरभद्र म्हणे सकळ महीं ॥ वीर जिंकिले भद्रयुद्धें प्रवाहीं ॥ परी मच्छिंद्रा तुजसमान ये देहीं ॥ देखिला नाहीं कोणीच ॥ ७५ ॥ मच्छिंद्र म्हणे वरदहस्त ॥ पुढें पहा भद्रजात ॥ येरी म्हणे अविनाशवंत ॥ गुरु आहे माझा कीं ॥ ७६ ॥ वीरभद्र तुकावून मान ॥ म्हणे गुरु तुझा आहे प्राज्ञ ॥ आणि तूंही त्यांत अससी धन्य ॥ प्राज्ञीकवंत सद्यशा ॥ ७७ ॥ ऐसें देवास्त्रयुक्तप्रयुक्त ॥ दानव करून सकळ शांत ॥ अदृश्यपणीं स्वस्थानांत ॥ जाऊनियां पोंचले ॥ ७८ ॥ यावरी वीरभद्र ब्रह्मास्त्र ॥ प्रेरिता झाला अति पवित्र ॥ तें पाहूनियां वरद-पात्र ॥ विध्यस्त्र प्रेरीतसे ॥ ७९ ॥ तें प्रगटतां चतुर्भुजमूर्ती ॥ विधी लागे चरणाप्रती ॥ यावरी कार्तिकास्त्र भद्रजाती ॥ सोडिता झाला तत्क्षणीं ॥ ८० ॥ तें पाहूनियां दत्तवरदपाणी ॥ स्त्रीअस्त्र सोडीत गगनीं ॥ तें बोलतां लावण्यखाणी ॥ स्वामीलागीं विहि-ताती ॥ ८१ ॥ तेणेंकरून कार्तिकास्त्र ॥ तत्क्षणीं पावलें शांत ॥ यावरी भद्र[4] तो काळास्त्र ॥ प्रेरिता झाला तत्क्षणीं ॥ ८२ ॥ तें पाहूनियां मच्छिंद्रनाथ ॥ मायाप्रळयी प्रेरिलें अस्त्र ॥ तेणें काळ भक्षून पवित्र ॥ पंचतत्त्व कवळीतसे ॥ ८३ ॥ तें पाहून सकळ देव ॥ करिते झाले मच्छिंद्रस्तव ॥ म्हणती महाराजा युगभाव ॥ सकळ नाश पावले कीं ॥ ८४ ॥ म्हणती महाराजा कलिभाग ॥ पुढें आहेत अनंतयुग ॥ तों आजि तुम्ही सकळ याग ॥ विनाशरूपी पहातां कीं ॥ ८५ ॥ तरी आतां कृपा करून ॥ मायाप्रळय घ्या आवरून ॥ मग देववाणी श्रवणीं ऐकून ॥ वासनीक अस्त्र प्रेरीतसे ॥ ८६ ॥ तेणें मायाप्रळय हरला ॥ मायाउत्पत्तिप्रयोगराहिला ॥ मग सकळ विमानें उतरून महीला ॥ देव नमिती मच्छिंद्रा ॥ ८७ ॥ ब्रह्मा विष्णु आणि रुद्र ॥ स्तवनें केला शांत मच्छिंद्र ॥ मग सन्निध बोलावूनि वीरभद्र ॥ करीं कर ओपिती ॥ ८८ ॥ म्हणती कविनारायण मच्छिंद्रनाथ ॥ तरी आपण वाढवावी सदैव प्रीत ॥ ऐसें वीरभद्रातें सांगून समस्त ॥ प्रेमें प्रीती वाढविती ॥ ८९ ॥ यावरी बोले भद्र प्रसन्न होऊन ॥ कीं मच्छिंद्राची कामना[5] कोण ॥ ती मीच पूर्ण करीन ॥ वरदचित्तेंकरूनियां ॥ ९० ॥ धन्य आहे मच्छिंद्रनाथ ॥ युद्धीं कुशल प्रतापवंत ॥ धन्य श्रीगुरु मिळाला त्यातें ॥ प्रतापवंत आगळा[6] तो ॥ ९१ ॥ मजसमान युद्धनेमीं ॥ पातलों यास युद्धभूमीं ॥ परी न देखों युद्धसंगमीं ॥ मच्छिंद्रासमान पुरुषार्थ ॥ ९२ ॥ म्यां पूर्वी रावण बळी भांडोन ॥ सुखें देववीर रणीं आणून ॥ किन्नर गंधर्व थकित जाण ॥ नाहीं

१ रतीचें अस्त्र. २ सर्पास्त्र. ३ माना डोलावूं लागले. ४ वीरभद्र. ५ इच्छा. ६ विशेष.

पुढें ठेले मम युद्धीं ॥ ९३ ॥ कल्पांतभैरव मातें नाम ॥ देते झाले सुरासुर उत्तम ॥ माझें जिंकावया युद्धकर्म ॥ मिळाला नाहीं कोणीच ॥ ९४ ॥ परी आजी खातरी कृत्याकृत्य ॥ केली असे मच्छिंद्रनाथें ॥ मग करीं कवळून हृदयातें ॥ धरिता झाला सप्रेम ॥ ९५ ॥ म्हणे महाराजा योगद्रुमा ॥ वेधक कामना असेल तुम्हां ॥ तरी ती सांगून रुद्रोत्तमा ॥ वरदसुखा पहुडवीं ॥ ९६ ॥ येरी म्हणे बा महाराजा ॥ एक अर्थ तूं करून माझा ॥ परी त्यातें फळ देऊन ओजा ॥ लोकोपकारीं मिरवावें ॥ ९७ ॥ जैसें एक वायूचे आधीन यथार्थ ॥ वर्षाकाळीं मेघ वर्षे जलातें ॥ तेणें तुष्ट होय क्षितींत ॥ चराचर अवघे ॥ ९८ ॥ तन्न्यायें कामना चित्तीं ॥ विकार सांडी वरली माती ॥ तरी कार्यगंधाच्या बैसोनि अर्थी ॥ लोकोपकारीं मिरवावें ॥ ९९ ॥ तरी तो अर्थ म्हणाल कोण ॥ महाराजा करा श्रवण ॥ म्यां कामनीं वरिला विद्याकाम ॥ साबरीविद्या महाराजा ॥ १०० ॥ तरी त्या मंत्रबोलासमान ॥ आपण वहिवाटा ये देहीं धर्म ॥ त्वरें जाऊन जगाचा काम ॥ मंत्रापाठीं पुरवावा ॥ १ ॥ एवं वर ओपून मातें ॥ लोट लोटवा कृपासरिते ॥ मग अवश्य म्हणे मच्छिंद्रातें ॥ कार्य सहसा करीन मी ॥ २ ॥ ऐसें बोलून वरदयुक्तीं ॥ करतळा देत प्रसन्नचित्तीं ॥ यापरी सकळ देव बोलती ॥ प्रसन्न होऊन तयातें ॥ ३ ॥ म्हणती वीरभद्रें दिधला वर ॥ तया साह्य असों आम्ही समग्र ॥ मंत्रपोटीं कार्य थोर ॥ आम्ही करूं सहसाही ॥ ४ ॥ ऐसें बोलून वरदयुक्ती ॥ मग मच्छिंद्र म्हणे नमस्कार सर्वांप्रती ॥ रुद्र ब्रह्मा चक्रवर्ती ॥ भावेंकरून नमियेला ॥ ५ ॥ विष्णुपदीं ओपितां मौळी ॥ तोही त्यातें कृपें न्याहाळी ॥ परम प्रेमें हृदयकमळीं ॥ धरिता झाला स्नेहाळ तो ॥ ६ ॥ म्हणे वत्सा पूर्णकोटी ॥ जेथें पडतां जीव संकटीं ॥ माझें स्मरण करितां ओंठीं ॥ दृश्य होईन त्या ठाया ॥ ७ ॥ दृश्य होतां संकटराशी ॥ निवारीन मी निश्चयेंसीं ॥ मग चक्रअस्त्र देऊन त्यासी ॥ तुष्ट मानसीं केला तो ॥ ८ ॥ यापरी नंदीश उमानाथ ॥ तोही प्रसन्न होऊन त्यातें ॥ प्रेमें कवळून हृदयातें ॥ त्रिशूळास्त्र ओपीतसे ॥ ९ ॥ यापरी नाभितनया नमितां ॥ तोही वदे प्रसन्नचित्ता ॥ शापादपि सविता ॥ संजोगिलें तयासी ॥ ११० ॥ जें वाणीनें निघे अक्षर ॥ तें होय साचोकार ॥ शुभाशुभ कर्मांवर ॥ फळें पावती गोमटीं ॥ ११ ॥ ऐसें वदून विधिराज ॥ तुष्ट केला तपोभुज ॥ यापरी शक्र नमी ओज ॥ तोही वर ओपीतसे ॥ १२ ॥ मग वज्रास्त्र कां पूर्ण ॥ त्यातें दिधलें कृपा करून ॥ मग अस्त्रमंत्र सांगून ॥ वज्रहस्त ओपिला ॥ १३ ॥ यावर नमितां देव कुबेर ॥ तोही होऊनियां उदार ॥ सिद्धि मंत्र देऊनि समग्र ॥ दासी केल्या तयाच्या ॥ १४ ॥ यावरी वरुण भावें नमितां ॥ तोही प्रसन्न होऊन चित्ता ॥ आपास्त्रमंत्रभोक्ता ॥ केला असे त्वरेनें ॥ १५ ॥ त्या मंत्राचा होतां पाठ ॥ आपोआप धरेतें नीरँ उठे ॥ सकळ सरिता लोटून लोट ॥ दिशे दिशे मिरविती ॥ १६ ॥ यापरी नमितां द्विमूर्धनी ॥ तोही आल्हादे चित्तकामनीं ॥

१ पृथ्वीमध्यें. २ मस्तक. ३ शंकर. ४ ब्रह्मदेवाला. ५ मच्छिंद्रनाथ. ६ इंद्र. ७ उदक.

वर दिधला मंत्रअग्नी ॥ स्मरण होतां प्रगटावें ॥ १७ ॥ यापरी नमितां देव अश्विनी ॥ तोही देत मंत्रमोहनी ॥ असो सर्व देवीं
वरदपाणी ॥ एकएकांनीं ओपिला ॥ १८ ॥ मग आपुलालें आसन योजून ॥ सिद्ध करिते झाले गमन ॥ यावरी मच्छिंद्र कर
जोडून ॥ विनवीतसे सकळिकां ॥ १९ ॥ म्हणे महाराजा स्वर्गवासी ॥ मातें कामना वेधली जीवासी ॥ कीं मनकर्णिकास्नान मान-
वांसी ॥ आदर चित्तीं वाटतसे ॥ १२० ॥ तरी मातें करावया स्नान ॥ न्याल जरी कृपेंकरून ॥ तरी येऊनियां कामना पूर्ण ॥ करीन
आपुली महाराजा ॥ २१ ॥ ऐसी ऐकून वचनयुक्ती ॥ सकळ प्रसन्न झाले चित्तीं ॥ मग स्वयें विमानीं वाहून श्रीपती[1] ॥ घेऊनियां
चालिला ॥ २२ ॥ विमानयानें आपुले बहुत ॥ त्वरें पातले वैकुंठनाथ ॥ मग आपुले आसनीं मच्छिंद्रनाथ ॥ नेऊनियां बैसविला
॥ २३ ॥ आसनीं शयनीं भोजनीं ॥ एकत्रपणीं वर्ते चक्रपाणी ॥ सकळ देव पातले स्वस्थानीं ॥ मच्छिंद्र वैकुंठीं राहिला ॥ २४ ॥
मग नित्य मनिकर्णिकेचें स्नान ॥ मच्छिंद्रनाथ येत करून ॥ यावरी पूर्ण समाधिकारण ॥ पाहूं ऐसें वाटतसे ॥ २५ ॥ मग विष्णूस
म्हणे मच्छिंद्रनाथ ॥ मेरुपाठार दाविजे मातें ॥ म्यां समाधि घेतली पूर्वजन्मांत ॥ तया गोचर करावें ॥ २६ ॥ अवश्य म्हणूनी
नारायण ॥ मेरुपाठारीं[2] केलें गमन ॥ मग दाही समाधी दृष्टी पाहून ॥ संतुष्ट झाला मानसीं ॥ २७ ॥ नवनारायणांच्या समाधी
नव ॥ दहावी समाधी वासुदेव ॥ ऐसा पाहून मनोभाव ॥ पुनः येत वैकुंठीं ॥ २८ ॥ असो एक संवत्सर वैकुंठनाथ ॥ ठेविता
झाला प्रीतिवंत ॥ मग पाचारून उमाकांत ॥ नेता झाला कैलासीं ॥ २९ ॥ तेथेंही एक संवत्सरपर्यंत ॥ राहता झाला मच्छिंद्रनाथ ॥
स्थितिवृत्तीं स्नेह बहुत ॥ वाढविले शिवाचे ॥ १३० ॥ यावर कोणे एके दिवशीं ॥ इंद्र येऊन कैलासासी ॥ भावें नमून महादे-
वासी ॥ मच्छिंद्रनाथा नेतसे ॥ ३१ ॥ यावर तीन मास अमरावतीं ॥ राहता झाला योगपती ॥ तेथेंही अत्यंत वाढवून प्रीती ॥
निरोपातें मागतसे ॥ ३२ ॥ तों विधीनें[3] नारद पाठवून ॥ नेलें सत्यलोकाकारण ॥ तेथेंही षण्मास राहून ॥ विधिराज तोषविला
॥ ३३ ॥ यापरी सकळ देव येऊन तेथ ॥ घेऊन जाती मच्छिंद्रनाथ ॥ एक एक दिन करून तीर्थ ॥ सकळ देवांसी तोषविलें
॥ ३४ ॥ सुरगण[4] गंधर्व किन्नर यक्ष ॥ पितृगणादि अर्यमा[5] दक्ष ॥ सकळ करून प्रीतीनें प्रत्यक्ष ॥ तोचि एक मिरवला ॥ ३५ ॥
असो सप्तवर्षेंपर्यंत ॥ स्वर्गीं राहिला मच्छिंद्रनाथ ॥ सकळांचा गौरव घेऊनि अतिथ ॥ पुसूनियां निघतसे ॥ ३६ ॥ मग सकळ
निघून स्वर्गवासी ॥ बोळविती मच्छिंद्रासी ॥ विमानीं वाहून मृत्युलोकासी ॥ आणूनियां घातलें ॥ ३७ ॥ असो देव गेले स्वस्था-
नासी ॥ येरीकडे मच्छिंद्र पृथ्वीसी ॥ पुनः चालिला तीर्थाटणासी ॥ करावया अत्यादरें ॥ ३८ ॥ भ्रमण करितां शुद्धमहीसी ॥ 
जाता झाला केकडादेशीं ॥ तें परम स्थान पश्चिमदेशीं ॥ वज्रवन पाहिलें ॥ ३९ ॥ तंव त्या ठायीं वज्रभगवती ॥ महादैवत प्रता-

१ विष्णु. २ मेरुपर्वताचे शिखरीं. ३ ब्रह्मदेवानें. ४ देवसमुदाय. ५ पितरांचा राजा.

पशक्ती ॥ भावें नमून अंबिकामूर्ती ॥ तीर्थस्नान करीतसे ॥ १४० ॥ तेथें तीनशें साठ कुंडें असती ॥ परी उष्णोदकें भरलीं असती ॥ तें पाहून परम चित्तीं ॥ आश्चर्यातें मानीतसे ॥ ४१ ॥ आश्चर्य मनांत योजून करित ॥ कीं उष्णोदकें कुंडें भरित ॥ तरी तयांची राहणी पुसून कोणास ॥ आपण कुंडें निर्मावीं ॥ ४२ ॥ निर्मूनि ये परी सर्वांहून ॥ परमागळें उष्णोदक जीवन ॥ मग सकळ तीर्थांत करून स्नान ॥ भगवतीठाया पातला ॥ ४३ ॥ पाचारुनी तीर्थाच्या पुजाऱ्यासी ॥ वृत्तांत पुसिला उष्णोदकासी ॥ विचारितां सांगे त्यासी ॥ उष्णोदककारण तें ॥ ४४ ॥ म्हणे पूर्वी वसिष्ठें यज्ञ केला ॥ तेव्हां सकळ देव पातले स्नानाला ॥ त्यांनीं निर्मून उष्णोदकाला ॥ कुंडें केलीं आपुलालीं ॥ ४५ ॥ उष्णोदकीं स्नानाकरितां तात्कालिक ॥ निर्मिते झाले सकळिक ॥ आपुलीं नामें अलोलिक ॥ कुंडांलागीं ठेविलीं ॥ ४६ ॥ द्वादश वरुषें द्वादश दिवस ॥ समस्त राहिले त्या ठायास ॥ यज्ञ पावलिया पूर्णतेस ॥ सकळ गेले स्वस्थाना ॥ ४७ ॥ तीं कुंडें अद्यापपर्यंत ॥ स्थानोस्थानीं आहेत ॥ ऐसें ऐकून मच्छिंद्रनाथ ॥ म्हणे योजिलें करावें ॥ ४८ ॥ मग सरस्वतीसरितापात्रीं[1] ॥ जी उंचवट जागा तया क्षेत्रीं ॥ पाहूनि वाटिका पवित्र नेत्रीं ॥ वरुणमंत्र जल्पतसे ॥ ४९ ॥ आपास्त्रमंत्र[2]उच्चार पूर्ण ॥ होतांच प्रविष्ट झालें जीवन[3] ॥ भोगावतीचें उदक काढून ॥ अग्निमंत्र जल्पतसे ॥ १५० ॥ अग्निमंत्रउच्चार होतां ॥ प्रवाहीं लागला हुताशन[4] तत्त्वतां ॥ तेणेंकरून हुताशनतप्तता ॥ पावते झाले ते समयीं ॥ ५१ ॥ शिववरदकरीं त्रिशूळ हातीं ॥ तो बुडाकडोन टाकिला महीमाथीं ॥ तेणेंकरून जीवन तप्त कुंडाप्रती ॥ महीलागीं विराजलें ॥ ५२ ॥ भोगावतीचें उत्तम उदक ॥ प्रगट होतां अलोलिक ॥ आपण स्नान करोनि शुचिक ॥ करी भगवती मातेतें ॥ ५३ ॥ भोगावतीचें उत्तम जीवन ॥ अंबिकेप्रती होतां स्नान ॥ मग ती मच्छिंद्रा प्रत्यक्ष होऊन ॥ बोलती झाली सम्यक ॥ ५४ ॥ म्हणे जिवलगा मच्छिंद्रनाथा ॥ धन्य तूं प्रतापवंता ॥ भोगावतीजीवनानें मातें ॥ स्नान घातलें योगींद्रा ॥ ५५ ॥ तरी येथें एक मास ॥ वस्तीस वसावें सावकाश ॥ मग बोळवीन स्वस्थचित्तास ॥ तुजलागीं पुढारां ॥ ५६ ॥ अवश्य म्हणून मच्छिंद्रनाथ ॥ राहता झाला मास तेथ ॥ मग रुचल्या अर्थी बोले देवीतें ॥ बोलून काळ क्रमीतसे ॥ ५७ ॥ यावर कोणे एके दिवशीं ॥ मच्छिंद्र म्हणे अंबिकेसी ॥ वज्राबाई नाम तुजसीं ॥ काय म्हणून सांगा हें ॥ ५८ ॥ माता म्हणे तपोधना ॥ वसिष्ठ करिता जाहला हवना ॥ तैं शक्र[5] पातला स्थाना ॥ यालागीं महाराजा ॥ ५९ ॥ तंव सभास्थानीं सकळ ऋषी ॥ बैसले होते महातापसी ॥ तों इंद्र पातला देवकटकेंसीं[6] ॥ सभास्थानीं बैसावया ॥ १६० ॥ सभेंत येतां शचीनाथ ॥ उत्थापन दिधलें नाहीं त्यातें ॥ म्हणून क्षोभें अमरनाथ ॥ वज्रालागीं प्रेरीतसे ॥ ६१ ॥ तें पाहूनियां दाशरथी राम ॥ शक्तिमंत्रें दर्भ मंत्रून ॥ सोडिता झाला वज्राकारण ॥ बहु तांतडी लगबगें ॥ ६२ ॥ मग त्या दर्भी मंत्र-

१ सरस्वतीनदीच्या पात्रामध्यें. २ जलास्त्र. ३ पाणी. ४ अग्नि. ५ इंद्र. ६ देवसैन्यासह.

प्रयुक्ती ॥ मी प्रगट झालें महाभगवती ॥ वज्र गिळून उदरआहुती ॥ करिते झाले ते समयीं ॥ ६३ ॥ यावरी शक्रें राम तो बोलून ॥ पूर्ण केला समाधान ॥ मग श्रीरामाचें स्तवन करून ॥ वज्र पुन्हां मागितलें ॥ ६४ ॥ मग तो प्रसन्न होऊन चित्तीं ॥ वज्र दिधलें मागुतीं ॥ मग सकळ ऋषि देवीं मजप्रती ॥ नांव असें स्थापिलें ॥ ६५ ॥ यज्ञ जाहला समाप्ती ॥ सकळ गेले स्थाना-प्रती ॥ परी श्रीरामें येऊन ते क्षितीं ॥ मातें स्थापिलें अद्यापि ॥ ६६ ॥ ती भोगावती येथें श्रेष्ठा ॥ माझी केली प्राणप्रतिष्ठा ॥ तें भोगावतीचें उदक श्रेष्ठा ॥ मिळालें होतें मजलागीं ॥ ६७ ॥ किंवा आतां तुझे हातीं ॥ स्नान पावली भोगावती ॥ परी रामाहून कृपामूर्ती ॥ तुवां अधिक केलें बा ॥ ६८ ॥ रामें न्हाणिलें शीतोदकें ॥ तुवां न्हाणिलें उष्णोदकें ॥ आणि अखंडित पुण्यश्लोकें ॥ भोगावती दिधली त्वां ॥ ६९ ॥ असो ऐशी संवादयुक्ती ॥ झाल्या अंतीं त्या उभयतीं ॥ उपरी मासाची झाली भरती ॥ नाथ पुसूनि निघाला ॥ १७० ॥ उत्तरदेशीं करितां गमन ॥ अयोध्ये जातां तपोधन ॥ द्वारावती तीर्थ करून ॥ अयोध्येसी पातला ॥ ७१ ॥ ती कथा बहु सुरस ॥ होईल ती स्वीकारा पुढले अध्यायास ॥ धुंडीसुत नरहरिवंश ॥ मालु सांगे गुरुकृपें ॥ ७२ ॥ इति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ सप्तमाध्याय गोड हा ॥ १७३ ॥ अध्याय ॥ ॥ ७ ॥ ॥ ओंव्या ॥ १७३ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्रीदत्तात्रेयार्पणमस्तु ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

॥ नवनाथभक्तिसार सप्तमाध्याय समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ ॐनमोजी गुरुराया ॥ भवच्छेदका पळवीं माया ॥ श्रीज्ञानेश्वरा सदयहृदया ॥ मम किंचित नाम मिरविशी ॥ १ ॥ अगा हे ज्ञानदिवटी ॥ आम्हां साधकां जे दिठी ॥ मिरवला आहेसी पूर्णकोटी ॥ हितकारक महाराजा ॥ २ ॥ तरी मागिले अध्यायीं कथन ॥ विधियुक्त वीरभद्र केला प्रसन्न ॥ आणि स्वर्गवासातें भोगून ॥ महीलागीं मच्छिंद्र उतरला ॥ ३ ॥ आणि वज्रवटिके वज्रभगवती ॥ तोषविलें स्नानाप्रती ॥ उष्णोदकीं भोगावती ॥ जगामाजी मिरविली ॥ ४ ॥ यापरी द्वारका करूनी तीर्थ ॥ गोमतीं स्नानविधी यथार्थ ॥ करूनियां द्वारकानाथ ॥ प्रसन्न चित्तीं आगळा ॥ ५ ॥ त्यावर आला अयोध्येसी ॥ तरी श्रोतिया कथा परियेसीं ॥ स्नान करून शरयूतीरासी ॥ रामदर्शना जातसे ॥ ६ ॥ तों पाशुपतराव तया ग्रामीं ॥ रामवंशांत पराक्रमी ॥ तो देवालयीं पूजेलागुनी ॥ आला होता संभारें[१] ॥ ७ ॥ अपार सैन्य जें भोंवतीं ॥ सदनीं तुरंगणें राबती ॥ छत्रचामरें कळसदीप्ती ॥ लाजविती भानूतें[२] ॥ ८ ॥ वाजी[३] गज यांचे रंग आणिक ॥ तेही चपळ अलोलिक ॥ वाताकृती लक्ष एक ॥ तयाभोंवते फिरताती ॥ ९ ॥ सकळ वाजी शृंगारयुक्त ॥ जडित पांखरा[४] हाटकवत[५] ॥ रत्नकोंदणी हार लखलखित ॥ कीं नक्षत्रमणी मिरवले ॥ १० ॥ त्यांतही झळकत झालरीयुक्त ॥ गुणीं ओविले अपार मुक्त ॥ कोणीं विराजत गंगावत ॥ शुभ्रतेजीं मिरवले ॥ ११ ॥ ग्रीवे माळा रत्नवती ॥ हाटकास जे ढाळ देती ॥ रत्न नोहे तेजगभस्ती[६] ॥ चमूलागीं[७] मिरवला ॥ १२ ॥ पदीं पैंजण रुणझुणती ॥ कीं वीरांची वीरश्री वाचे वदती ॥ कीं शत्रुगणींच्या अपार पंक्ती ॥ ब्रीद म्हणती विभांड्र ॥ १३ ॥ ऐशियापरी वाजी ते हौसें ॥ कीं चिंतिल्या ठायीं दाविती वास ॥ अतिवातचपळगतीस[८] ॥ सर सर म्हणती माघारा ॥ १४ ॥ अगा ते वाजी न म्हणूं महीचे ॥ कीं इंदुबंधुरत्न उदधीचे ॥ विशाळ शुक्तिकापात्र अब्धीचें ॥ मुक्त करून आणिले ते ॥ १५ ॥ याचकनीती विकासून अवनीं ॥ हत्ती मिरवती पृतनेलागुनी ॥ विशाळ गंडस्थळ दंतकंदनी ॥ चूडे सुवर्ण मिरवलें ॥ १६ ॥ हाटक व्यक्त त्यां भूषण ॥ हौदे अंबारिया देदीप्यमान ॥ कीं पृतना महीचे नग ते पूर्ण ॥ भावनीं ऐसें पाहें कां ॥ १७ ॥ अपार सैन्य बहु संभार ॥ पाहतां उचलिले जे गिरिवर ॥ कीं पर्वतमाथां तरुशृंगार ॥ तैशा पताका गजपृष्ठीं ॥ १८ ॥ एकाहून एक अधिक ॥ महारथी ते युद्धकामुक ॥ दहासहस्र रायासवें लोक ॥ युद्धकामुक असती ॥ १९ ॥ परी युद्धशास्त्रीं चतुर सुगम ॥ कीं परशक्तीस देती दम ॥ ऐसे प्रतापीक स्तोम ॥ इंद्रसुखा आगळे कीं ॥ २० ॥ पायींचें पायदळ अपार ॥ वस्त्राभरणीं मंडिताकार ॥ छडीदार आणि चोपदार ॥ जासूद हलकारे मिरवती ॥ २१ ॥ हेमभूषणीं मुक्तमाळा ॥ सकळ पाइकां झळकती गळां ॥ जडितरत्नीं अति तेजाळा ॥ हेमालंकार करकमळीं ॥ २२ ॥ दाही अंगुळीं मुद्रिका गहन ॥ हेममुक्तें ते मिरवती श्रवण[९] ॥ पहातेपणीं राणीवपण ॥ भार पडेल लोकांतें ॥ २३ ॥ असो

१ सैन्यासह. २ सूर्याला. ३ घोडे. ४ पोषाक. ५ सोन्यासारख्या. ६ तेजानें सूर्यप्रमाणें. ७ सैन्यांतें. ८ मोठ्या वाऱ्याच्या गतीला. ९ कान.

ऐसी अपार संपत्ती ॥ मिरवला पाशुपत अयोध्यापती ॥ ते सकळ दाटी देवळाभोंवतीं ॥ राजीराजीनें[१] मिरवली ॥ २४ ॥ त्यांत श्रीरामदर्शनाकारण ॥ जाता झाला योगद्रुम[२] ॥ परी ते द्वारपाळ परम ॥ नाथालागीं बोलत ॥ २५ ॥ परमपाप संचल्या तुंबळ ॥ तेव्हां मिरवे द्वारपाळ ॥ प्रथम धर्मालागीं काळ ॥ अधर्मपरी मिरवतसे ॥ २६ ॥ त्या धर्मद्वारींचे म्हणती श्वान ॥ ते द्वारपाळ द्वाररक्षण ॥ आपण बुडून यजमाना ॥ बुडवूं पाहती निश्चयें ॥ २७ ॥ महानष्ट जातां समोर ॥ कदा न म्हणती लहानथोर ॥ न भीड चित्तीं परम निष्ठुर ॥ वाचे कठोर बोलती ॥ २८ ॥ सप्तजन्म तस्करनीती ॥ शत ब्रह्महत्या जया घडती ॥ तेव्हां तो पावे द्वारपाळ क्षितीं[३] ॥ धर्मविनाश रायाचा ॥ २९ ॥ ऐसियेपरी द्वारपाळ ॥ राजद्वारीं असती सकळ ॥ मच्छिंद्र जातां उतावेळ ॥ हटकून डंभ केली असे ॥ ३० ॥ तीव्र वाचे बोलती वचन ॥ म्हणती कान फाडून बुद्धिहीन ॥ कोठें जासी तांतडीनें ॥ मतिमंदा हे मूर्खा ॥ ३१ ॥ हे भ्रष्टा तूतें कैसें कळेना ॥ कीं राव आला आहे दर्शना ॥ त्यांत तूं जासी बुद्धिहीना ॥ सर परता माघारा ॥ ३२ ॥ ऐसें म्हणून निष्ठुर वचन हातीं ॥ लोटिलें मच्छिंद्रनाथाप्रती ॥ येणेंकरून परम चित्तीं ॥ विक्षेपातें पावला ॥ ३३ ॥ परी तो सर्वज्ञ संतापासी ॥ विवेकअर्गळा[४] घाली त्यासी ॥ तो म्हणे सेवकांसी ॥ संवाद करणें विहित[५] नव्हे ॥ ३४ ॥ पतिस्वाधीन पतिव्रता ॥ कीं पात्रसोई वाहे सरिता[६] ॥ तेवीं बुद्धी तरूनि पाशुपता ॥ सेवक सेवा आव्हानिती ॥ ३५ ॥ कीं सुईमागें गुंतों जातां ॥ कीं मित्रामागें रश्मी[७] येतां ॥ तदनुबुद्धी पाशुपता ॥ सेवक सेवा आव्हानिती ॥ ३६ ॥ कीं रत्नामागें सकळ कळा ॥ माउलीसवें आव्हानूं बाळा ॥ तदनुबुद्धी अयोध्यानृपाळा ॥ सेवक सेवा आव्हानिती ॥ ३७ ॥ कीं माळी मळ्याचा योजून पंथ ॥ सुयुक्त सोडी उदक आंत ॥ तदनुबुद्धी पाशुपत ॥ सेवक सेवा आव्हानिती ॥ ३८ ॥ ऐसिये शब्दां सद्गुणवाणी ॥ बोधी सकळां विवेकखाणी ॥ बंधनीं निर्मून विक्षेप मनाचे चरणीं ॥ घालिता झाला महाराज ॥ ३९ ॥ परी बुद्धिप्रकरण ॥ आणीक सुचलें तयाकारण ॥ कीं सेवकांतें काय बोलून ॥ शिक्षा देऊं राजातें ॥ ४० ॥ एक राव आऱ्हाटितां ॥ संपूर्ण सेवकां दाटे व्यथा ॥ जेवीं गवसणी मित्रा घालितां ॥ रश्मी[८] आतुडती सहजचि ॥ ४१ ॥ शरीरीं कोठें घालितां घाय ॥ परी सर्वोपरी दुःख होय ॥ तदनुशिक्षा योजितां राया ॥ दुःख मिरवी पृतनेतें[९] ॥ ४२ ॥ ऐसें योजून मच्छिंद्रनाथ ॥ भस्मचिमुटी कवळी हाता ॥ स्पर्शास्त्रमंत्रप्रयुक्ता ॥ रामनामीं जल्पला ॥ ४३ ॥ येरीकडे पाशुपत ॥ देवा बद्धांजुळी होऊन प्रणत ॥ रामासन्मुख दंडवत ॥ महीं मस्तक ठेवीतसे ॥ ४४ ॥ तों स्पर्श मग येऊनि निकट ॥ करिता झाला अंगीं झगट ॥ झगट होतां महीपाठ ॥ भाळा सहज झालीसे ॥ ४५ ॥ राव उठूं पाहे क्षणीं ॥ परी सुदृढ युक्त न सोडी मेदिनी ॥ भाळपदादी उभयपणीं ॥ महीयुक्त झाली ती ॥ ४६ ॥ करितां यत्न बहुतांपरी ॥ परी विभक्त नोहे कदा

१ रांगेरांगेनें. २ मच्छिंद्रनाथ. ३ पृथ्वीवर. ४ विवेकरूपी अडसर. ५ योग्य. ६ नदी. ७ किरण. ८ सैन्याला. ९ पृथ्वी.

धरित्री ॥ बहु श्रमला नानापरी ॥ उपाय कांहीं चालेना ॥ ४७ ॥ मग बोलावून सेवकमंत्री ॥ वृत्तांत सांगे झाल्यापरी ॥ म्हणे कदा न सोडी धरित्री ॥ व्यक्त झाली सर्वस्वें ॥ ४८ ॥ परी मंत्री बुद्धिमंत ॥ एकटाच तेव्हां बाहेर येत ॥ सेवकां पुसे रेळी मात ॥ कोणी कोणातें झाली का ॥ ४९ ॥ मनांत म्हणे कोणी जैती ॥ आला असेल नगराप्रती ॥ गांजिला असेल राजदूतीं ॥ म्हणून क्षोभला असेल तो ॥ ५० ॥ मग त्यातें क्षोभ न येतां ॥ क्षोभ वरिला श्रीभगवंता ॥ तयाचे साधू जगीं छळितां ॥ क्रोध नावरे देवासी ॥ ५१ ॥ महीं श्रेष्ठ तो अत्रिनंदन ॥ परी उगेंच क्षोभवून आपुलें मन ॥ श्रीअंबऋषीचें केलें छळण ॥ तरी न साहे देवातें ॥ ५२ ॥ तेणें सुदर्शन लावून पाठीं ॥ गर्भ सोसी आपण जगजेठी ॥ तस्मात् भक्त गांजिल्यापाठीं ॥ कदा न राहवे देवातें ॥ ५३ ॥ भजनीं प्रेमा प्रल्हादबाळा ॥ परम आवडे तमाळनीळा ॥ दानवीं गांजितां उतावळा ॥ कोरडे काष्ठीं प्रगटला ॥ ५४ ॥ धर्महवनीं मंडूकबाळ ॥ तप्तोदकीं केलें शीतळ ॥ तस्मात् संकटीं भक्त प्रेमळ ॥ कदा न राहवे देवातें ॥ ५५ ॥ रणीं होतां कडकडाट बहुत ॥ पक्षिजोडा बाळें टाकूनि जात ॥ बाळकांनीं स्मरतां रमानाथ ॥ करिघंटा टाकी तयांवरी ॥ ५६ ॥ पारधी पक्षिप्राणहरणीं ॥ व्याळरूप झाले चक्रपाणी ॥ तस्मात् दासाचा छळ कोणीं ॥ कदाकाळीं करूं नये ॥ ५७ ॥ जळीं पदातें नक्रें ओढी ॥ स्मरतां धांवला अतितांतडीं ॥ सुदर्शन प्रेरून घाली उडी ॥ निजदासा रक्षावया ॥ ५८ ॥ याचि नीतीं कोणें दूतीं ॥ गांजिली असेल हरि-भक्ती ॥ म्हणून लोभें सायक हातीं ॥ हरीनें वरिला असेल कीं ॥ ५९ ॥ ऐशी भावना आणून चित्तीं ॥ शोध करीतसे पूतनेप्रती ॥ शोध शोधितां द्वारा निगुतीं ॥ वृत्तांत तो प्रविष्ट झाला ॥ ६० ॥ मंत्री वृत्तांत ऐकूनि कानीं ॥ शोधून काढी मच्छिंद्रमुनी ॥ धन्य मंत्री तो शोधप्रकरणीं ॥ अर्थपैशुन्य निवडिता ॥ ६१ ॥ अहो तो मंत्री नोहे मोहरा ॥ विषचि घेउनी सांडी रुधिरा ॥ कीं चिंता-मणिराज अधीरा ॥ राजचिंताहरणार्थ ॥ ६२ ॥ तन्यायें तो सुर्घडकरणी ॥ त्वरें लागला मच्छिंद्रचरणीं ॥ मग म्हणे महाराजा औदार्यपणीं ॥ कृपादान ओपावें ॥ ६३ ॥ तुम्ही संत ते स्नेहभरित ॥ पूर्णशांतीचे भांडारयुक्त ॥ औदार्य सांगतां नाहीं मित ॥ अपराध क्षमा करावा ॥ ६४ ॥ मेघ जरी उदार म्हणावा ॥ तोही ममता न करी संतभावा ॥ मेघ विसरे दातृत्वभावा ॥ तेवीं संत नोहे तो ॥ ६५ ॥ जरी परिसाची उपमा देऊं ॥ तो लोहातेंच देत हाटकभाऊ ॥ इतर धातूसी होत परिभऊ ॥ न चले शक्ती तयाची ॥ ६६ ॥ कल्पतरू जरी करावा समान ॥ शुभाशुभ दावी रत्न ॥ तेवीं नोहे संतजन ॥ शुभचिन्हेंच वांछिती ॥ ६७ ॥ ऐसें बोलतां मच्छिंद्रनाथ ॥ प्रसन्न झाले स्वचित्तांत ॥ क्रोध आवरून होतां शांत ॥ प्रसाद देऊं म्हणतसे ॥ ६८ ॥ मग करीं कवळून भस्मचिमुटी ॥ विभक्तअस्त्र मंत्रपोटीं ॥ कविराज जल्पतां होटीं ॥ धरा चिमुटी सोडीतसे ॥ ६९ ॥ राव उठून बैसे धरित्रीं ॥ वेगीं

१ कलह, तंटा. २ तपस्वी जोगी. ३ दुर्वासऋषि. ४ विष्णु. ५ सुसर. ६ बाण. ७ सैनिकांमध्यें. ८ धन्याचा कल्याणार्थी. ९ सोनेपणा. १० जमिनीवर.

पाचारीतसें सुहितमंत्री ॥ सर्वेच येऊनि झडकरी ॥ दूतीं राजाज्ञा निवेदिली ॥ ७० ॥ पत्रिके बोलाऊन निकट दूत ॥ विचारून घेतो राजक्षेमांत ॥ तंव ते शुभवार्ता सांगत ॥ कल्याणें राजा विराजला ॥ ७१ ॥ मग मच्छिंद्राचा धरून पाणी ॥ मंत्री नेत तयालागुनी ॥ प्रवेश होतां तये क्षणीं ॥ वृत्तांत रायातें निवेदिला ॥ ७२ ॥ रायें ऐकून सकळ वृत्तांत ॥ मच्छिंद्रचरणीं भाळ अर्पित ॥ अति गौरवें स्नेहभरित ॥ नाम पुसे तयाप्रती ॥ ७३ ॥ येरी म्हणे नरेंद्रपाळा ॥ मज मच्छिंद्र म्हणती तान्हुल्या बाळा ॥ रायें ऐकून वृत्तांत सकळा ॥ मच्छिंद्रचरणीं प्रेरितसे ॥ ७४ ॥ पूर्वीं मच्छिंद्रकृतिरत्न ॥ सांठवलें श्रवणाकारणें ॥ तेणेंकरून दर्शनभूषण ॥ स्वीकारावयास पहातसे ॥ ७५ ॥ ऐसी इच्छा अब्धीपाठीं ॥ तों मच्छिंद्रचंद्र देखिला दृष्टीं ॥ मग परम मनीं आनंददाटी ॥ चित्रपात्रीं हेलावली ॥ ७६ ॥ मग सुखासनें सिद्ध करून ॥ राजानें मच्छिंद्राचा हात धरून ॥ आपले सभास्थानीं नेऊन ॥ [३]कनकासनीं बैसविला ॥ ७७ ॥ षोडशोपचारें पूजन ॥ अर्पिता झाला तन मन धन ॥ वरी परम आदरें भक्तिरत्न ॥ मच्छिंद्रनाथ ओपितसे ॥ ७८ ॥ सदा सर्वदा आसनीं शयनीं ॥ गमनीं भोजनीं जोडून पाणी ॥ निरंतर उभा सेवेलागुनी ॥ अन्य कांहीं सुचेना ॥ ७९ ॥ ऐसिया भक्तीचा पाहतां पाठ ॥ मच्छिंद्रकृपेचा लोटला लोट ॥ म्हणे कोण नरेंद्र कामनालोट ॥ कवण चित्तीं दाटतसे ॥ ८० ॥ येरु म्हणे जी योगद्रुमा ॥ मी सूर्यवंशीं पाशुपतनामा ॥ [४]रामअवलाद कुशपत्नीधामा ॥ अवलाद देह असे हा ॥ ८१ ॥ तरी वडील माझा विजयी ध्वज ॥ श्रीराम अवतरे तेजःपुंज ॥ मातें भेटवीं महाराजा ॥ मित्रकुळाचा टिळक जो ॥ ८२ ॥ येरी म्हणे रे भाउका दिठीं ॥ आतां करितों तयाची भेटी ॥ मग सभेबाहेर तपोजेठी ॥ राया घेऊन येतसे ॥ ८३ ॥ उभा राहून राजांगणीं ॥ धूम्रास्त्र मंत्र जल्पे वाणी ॥ भस्मचिमुटी संजीवनी ॥ अर्कावरी प्रेरितसे ॥ ८४ ॥ तेणें ध्रुव खगमंडळ संपूर्ण ॥ धूम्रें भरून गेलें गगन ॥ दिशांसह अर्क संपूर्ण ॥ झांकाळून पैं गेला ॥ ८५ ॥ धूम्रास्त्रानें भरले नयन ॥ नेत्र पुसीतसे सारथी अरुण ॥ धूम्र संचारोनि मुखाकारण ॥ कासावीस होतसे ॥ ८६ ॥ तें पाहून सविताराज ॥ म्हणे अस्त्रविद्ये धूम्र विराजे ॥ क्षत्रिय कुळांतील नरेंद्र ओजें ॥ तेणें प्रेरिली ही विद्या ॥ ८७ ॥ मग तो महाराज जगलोचन ॥ कवळून सायका चढवून गुण ॥ वायुअस्त्र शर निर्मून ॥ सोडिता झाला महाराजा ॥ ८८ ॥ तंव तो शर प्रतापवंत ॥ लवकर प्रगटवी स्थावर मारुत ॥ तेणें मंदराचळ पर्वत ॥ हालूं पाहती डगडगां ॥ ८९ ॥ गगनापासून महीपर्यंत ॥ प्रगट झाला प्रळयवात ॥ तरू उचंबळून नभीं भ्रमत ॥ पक्षी जेवीं भूगोलातें ॥ ९० ॥ ऐसा वात होतां प्रगट ॥ धूम्रें फुटला दिशापाट ॥ सदनालागीं निर्मळ वाटे ॥ गमन करितां येईना ॥ ९१ ॥ तें पाहुनियां योगद्रुम ॥ जल्पता झाला अस्त्र उत्तम ॥ तें पर्वतास्त्र विशाळ प्रकाम ॥ आड झालें रथातें ॥ ९२ ॥ विशाळपणीं सांगूं कितुलें ॥ कीं मंदराचळचि

१ हात. २ मस्तक. ३ सुवर्णसिंहासनावर. ४ श्रीरामाचा कुशनांवाचा पुत्र त्याचे वंशींचा.

दुजे उगवले ॥ तेणें मार्ग कुंठित झाले ॥ वातचक्राचे महाराजा ॥ ९३ ॥ मग ते अस्त्रीं नारायण ॥ पर्वत पाहतां विशाळपणें ॥ मग वज्रास्त्रसंधान ॥ करिता झाला अर्क तो ॥ ९४ ॥ तंव वज्रास्त्र अति कठिण ॥ पर्वतमाथे गेले भेदून ॥ तेणें घायें शतचूर्ण ॥ त्वरें झाले नगराज ॥ ९५ ॥ पर्वत चूर्ण होतां निगुतीं ॥ तें पाहून मच्छिंद्र जती ॥ भ्रमी अस्त्र योजून उपरती ॥ मित्राभागीं सांडीतसे ॥ ९६ ॥ तें अस्त्र होतां स्यंदनीं प्रविष्ट ॥ वाजींसह अरुण झाला भ्रमिष्ट ॥ सांडून रहाणीची नित्य वाट ॥ स्यंदन नेती भलतीकडे ॥ ९७ ॥ तें पाहूनियां द्वादशनामी ॥ ज्ञानशराच्या न उरल्या गुणऊर्मी ॥ तेणेंकरून भ्रमे प्रकामीं ॥ नाशाप्रती पावतसे ॥ ९८ ॥ जैसा पेटला पावक ॥ त्यावरी सोंपविलें सकळ उदक ॥ मग तो उरे केवीं दाहक ॥ तेवीं अर्का झालें असे ॥ ९९ ॥ कीं अज्ञानपण साधकाचें ॥ श्रीसद्गुरु निवारीत वाचे ॥ अंगीं भूषण ज्ञानपणाचें ॥ बोधगुणीं गोवीतसे ॥ १०० ॥ कीं सदनांत दाटला अंधार अपार ॥ तो दीप उजळितां होतो दूर ॥ तन्यायें श्रीभास्कर ॥ ज्ञानेश्वरा प्रेरितसे ॥ १ ॥ तेणें उडवून भ्रमिष्टपण ॥ सुपंथ-सुपंथा करी गमन ॥ तें मच्छिंद्रनाथें दृष्टीं पाहोन ॥ वाताकर्षण जल्पत ॥२॥ वातास्त्रआकर्षण सबळ ॥ वायुचक्रीं भेदिलें तुंबळ ॥ मग वाजींचे आणि सारथ्याचे तये वेळ ॥ श्वासोच्छ्वास राहिले ॥ ३ ॥ आणि जो प्रत्यक्ष चंडकिरण ॥ तोही दाटला श्वासेंकरून ॥ वायुचक्रीं गेले आटून ॥ रथ उलथोनि पडियेला ॥ ४ ॥ वायुचक्राचा ज्यास आधार ॥ तो आधार तुटतांच सत्वर ॥ स्वर्गाहून उर्वीवर ॥ आदळला स्यंदन तो ॥५॥ महीं आदळतां दिव्य रथ॥ खालीं पडला श्रीआदित्य ॥ स्यंदनीं वाजी अति होत ॥ कासा-विस श्वासानें ॥ ६ ॥ परी महीं पडतां तेजोराशिपाळ ॥ महीं मातला अति अनळ ॥ तेणें दाहूं पाहे सकळ ॥ महीवरले उद्भिज्ज ॥ ७ ॥ तें पाहून मच्छिंद्रनाथ ॥ जलदास्त्र स्मरे त्वरित ॥ तेणेंकरून अपरिमित ॥ जलवृष्टी होतसे ॥ ८ ॥ परी आदित्य पडतां निचेष्टित ॥ परम घाबरले स्वर्गदैवत ॥ मग विमानयानी होऊन त्वरित ॥ मच्छिंद्रापाशीं पातले ॥ ९ ॥ ब्रह्मा विष्णु आणि शिव ॥ वरुण अश्विनी कुबेर देव ॥ सुरवर अनादि सकळ गंधर्व ॥ महीलागीं पातले ॥ ११० ॥ सत्यलोक तपोलोक ॥ अतळ वितळ सुतळादिक ॥ संकटीं पडला एक अर्क ॥ लागवेगीं धांविन्नले ॥ ११ ॥ जैसे सकळ तरूवरतीं ॥ चहूंकडून पक्षी येती ॥ तन्यायें महीवरती ॥ सकळ देव उतरले ॥ १२ ॥ मग महाराजा क्षीराब्धिजांवई ॥ धांवून मच्छिंद्र धरिला हृदयीं ॥ म्हणे हा आदित्य कां अन्यायी ॥ संकटीं तुवां योजिला ॥ १३ ॥ याउपरी करून नमस्कार ॥ विष्णूतें देत उत्तर ॥ म्हणे महाराजा पाशुपतवीर ॥ आदित्यकुळीं असे हा ॥ १४ ॥ ऐसें असतां यथार्थ ॥ वंशजास न पाहे हा आदित्य ॥ तस्मात् वडिलांची धर्मनीत ॥ ऐसेपरी असावी कां ॥ १५ ॥ बालकांचें संगोपन होय मातेन ॥ सदा रोषाची केली गवसण ॥ मग ती माता काय म्हणून ॥ लावेपरी मिरवावी ॥ १६ ॥ स्वामी

१ सूर्य. २ रथ. ३ अग्नि. ४ पृथ्वीवर. ५ वृक्ष, वेली वगैरे. ६ विमानांत बसून. ७ आईमुळें.

 

सेवकां अमित्र मानी ॥ मग कार्य कैंचें येत घडोनी ॥ सदा संशयाची गवसणी ॥ उभयचित्तीं मिरवतसे ॥ १७ ॥ तस्मात् राय पाशुपती ॥ नावडे या आदित्याप्रती ॥ म्हणून ऐसा वैकुंठपती ॥ चर्याभाग रचियेला ॥ १८ ॥ आणिक एक मम वाञ्छुत्तरासी॥ साबरीविद्या कवित्वराशी ॥ सूर्यनामें मंत्रउपदेशीं ॥ प्रसन्न असावें अर्कानें ॥ १९ ॥ याउपरी आणीक आहे चोज ॥ सूर्यवंशी विजयध्वज ॥ तो पाशुपतातें श्रीराम आज ॥ भेटवावा महाराजा ॥ १२० ॥ ऐसेपरी कामना मनीं ॥ वेधली आहे चक्रपाणी ॥ पाशुपतरायाचे प्रेमवदनीं ॥ गुंती पावलों भक्तीनें ॥ २१ ॥ नवराणिवासह माझा काम ॥ पूर्णते आणा मेघश्यामा ॥ ऐसें बोलतां योगद्रुम ॥ हरी उत्तरा स्वीकारी ॥ २२ ॥ म्हणे बा रे योगद्रुमा ॥ जो जो काय वेधला काम ॥ तो तूं पावशील कल्पद्रुमा ॥ परी सावध करीं अर्कातें ॥ २३ ॥ बारे सूर्यनामीं मंत्र ॥ जगीं होतील प्रविष्ट पवित्र ॥ तैं स्वकष्टानें येऊन मित्र ॥ कार्य करील लोकांचें ॥ २४ ॥ ऐसें बोलून चक्रपाणी ॥ करतळा कर देत वचनीं ॥ म्हणे बारे भास्कर मंत्रालागुनी ॥ वरदाता झालासे ॥ २५ ॥ बारे तव मंत्र लोकोपकार ॥ नामस्मरणीं होतां नर ॥ तेणेंचि पातक योग भद्र ॥ सकळ जनांचे मिटतील ॥ २६ ॥ सहज सूर्याचें वदतां नाम ॥ सकळ पातकें होतील भस्म ॥ तशांत मंत्रप्रयोग उत्तम ॥ कार्यालागीं दुणावेल ॥ २७ ॥ नाममंत्रयुक्त प्रयोग ॥ त्यावरी तव वाणी पवित्र अभंग ॥ त्याहीवरती वरद चांग ॥ प्रत्यक्ष दैवतें मिरवतील ॥ २८ ॥ तरी बा सोळा राशी पावलें ॥ सुवर्ण जडावासी गमलें ॥ तें भूषण मोला चढलें ॥ मान्य केवीं होईना ॥ २९ ॥ तरी या कामा कदा न आळस ॥ होणार नाहीं महापुरुष ॥ आम्ही सर्व देव तव वचनास ॥ उतरलों आहों महाराजा ॥ १३० ॥ वीरभद्राचे समरंगणीं ॥ आणी नागपत्रअश्वत्थस्थानीं ॥ तूतें [2]ओपून [3]वरदवाणी ॥ तुष्ट केलें आधींच ॥ ३१ ॥ तरी आतां संशय ॥ सांडूनि अर्का जीववावें ॥ याच रीतीं देव अवघे ॥ गौरविती मच्छिंद्रा ॥ ३२ ॥ जैसे एका [4]चंद्रांबुसाठीं ॥ न्याहाळिती चकोर पाठी ॥ तेवीं जगलोचना दिठी ॥ सकळ देव गौरविती ॥ ३३ ॥ मच्छिंद्र म्हणे पाशुपतराया ॥ आधीं दावीन रामकाया ॥ तेव्हांच समाधान तरी राया ॥ मम चित्तांत ओसंगी ॥ ३४ ॥ ऐसी ऐकतां मच्छिंद्रवाणी ॥ सौमित्रासह सगुणी ॥ प्रगट झाला कोदंडपाणी ॥ दशरथतनय महाराज ॥ ३५ ॥ मग राममूर्ती प्रगट होतां ॥ शिवासी आनंद वाटला चित्ता ॥ आणि राया पाशुपता ॥ आनंदसरिता उचंबळली ॥ ३६ ॥ मच्छिंद्र देखतां कोदंडपाणी ॥ भावें मस्तक ओपिलें चरणीं ॥ रामें प्रेमें धरून वक्षःस्थानीं ॥ मच्छिंद्रनाथ कवळिला ॥ ३७ ॥ पाशुपतराव भाविक पूर्ण ॥ तोही वंदी श्रीरामचरण ॥ राम त्यातें हृदयीं धरून ॥ धन्य वंश म्हणतसे ॥ ३८ ॥ यावरी मच्छिंद्र जोडोनि दोन्ही हस्त ॥ नम्रोत्तरीं स्तवून [5]रघुनाथ ॥ गौरवोनि रामा बोधत ॥ हे रघूत्तमा महाराजा ॥ ३९ ॥ तव नामें अनंत असती ॥ तेवीं त्यांत राम- 

१ इच्छा. २ कोंदणांत बसविलेलें. ३ आशीर्वाद देऊन. ४ चंद्रमंडळांतून पडणाऱ्या अमृतबिंदूसाठीं. ५ श्रीरामचंद्र.

नाम गंगा वसती ॥ सर्वांत श्रेष्ठ सीतापती ॥ ग्रंथामाजी निवेदिलें ॥ १४० ॥ त्याही ग्रंथां नाहीं मिती ॥ परी तव नामें शुभ ते असती ॥ तेवीं माझ्या कवित्वाप्रती ॥ वदनपात्रीं विराजिजे ॥ ४१ ॥ साबरीविद्येचें अपार वचन ॥ मंत्रप्रयोगीं कवित्व पूर्ण ॥ जेथें येईल तुझें नाम ॥ तेथें कार्य करावें समग्र त्वां ॥ ४२ ॥ तव नामीं होतां मंत्रोच्चार ॥ तें त्वां कार्य करावें समग्र लवकर ॥ तरी प्रांजळ चित्तीं देवीं कर ॥ मम करीं ओपावा ॥ ४३ ॥ चित्तीं असेल जरी अनमान ॥ तरी सज्ज करीं कां कोदंडबाण[1] ॥ माजवोनि आतां समरंगण ॥ नृत्य करूं रणांगणीं ॥ ४४ ॥ श्रीराम म्हणे मच्छिंद्रा ऐक ॥ तूं तिहीं देवांचा वरदायक ॥ श्रीदत्तात्रय प्रतापार्क ॥ अवतार तिघां देवांचा ॥ ४५ ॥ आणि नरसिंह अवतार पूर्णब्रह्म ॥ ते तुज वश्य आहेत योगद्रुमा ॥ तेथें मीं कां नसावें साह्यार्थकामा ॥ साह्य असों तुज आतां ॥ ४६ ॥ तुज्या मंत्रीं माझें स्मरण ॥ होतांच कार्य करीन ॥ बावनवीरांत सबळ आचरण ॥ मंत्रप्रयोगीं दावीन मी ॥ ४७ ॥ ऐसी वदून वरदवाणी ॥ भाष[2] देत मच्छिंद्रपाणी ॥ मग म्हणे हे योगधामी ॥ मज तुज ऐक्य असे कीं ॥ ४८ ॥ तूं विष्णूचा अवतार ॥ जो कविनारायण महाथोर ॥ तस्मात् तुझें शरीर ॥ ऐक्यत्व असे या लोकीं ॥ ४९ ॥ ऐसें बोलून कौसल्यासुत ॥ धन्य म्हणवून ग्रीवा तुकावित ॥ यावरी बोले सावध आदित्य ॥ वेगें करीं तपोराया ॥ १५० ॥ एक मित्रा-वांचून धरणी ॥ झाली असे दीनवाणी ॥ तरी योगींद्रा सुखधामीं ॥ मम पूर्वजां मिरवीं[3] कां ॥ ५१ ॥ महीं पडला अंधकार ॥ देव त्रास पावले समग्र ॥ सकळ जगाचा व्यवहार ॥ खोळंबला तपोराया ॥ ५२ ॥ ऐसें ग्लानीं सुढाळ वचन ॥ श्रीराममुखीं ऐकोन ॥ तें मच्छिंद्रहृदयीं अपार भूषण ॥ चित्तशक्तीतें मिरवलें ॥ ५३ ॥ तेणें परम आनंदवृत्ती ॥ प्रसन्न झाली चित्तभगवती ॥ मग वातास्त्रमंत्र देहस्थव्यक्ती ॥ प्रसादातें ओपीतसे ॥ ५४ ॥ वातयुक्त अस्त्र पूर्ण ॥ मुखीं जल्पतां मच्छिंद्रयोगिजन ॥ मग सुटी पावून वाताकर्षण ॥ सुखी केला आदित्य[4] तो ॥ ५५ ॥ मग सावध होऊन महीं बैसत ॥ दाही दिशा न्याहाळित ॥ तों अपार दृष्टी देखून दैवतें ॥ सकळांलागीं पाचारी ॥ ५६ ॥ सकळ दैवतें जाऊन तेथ ॥ नमिला महाराज प्रतापआदित्य ॥ यावरी विष्णू-लागीं पुसत ॥ क्षत्रिय कोण असा आहे ॥ ५७ ॥ कीं वासना पुन्हां परतून ॥ हरूं पाहत श्यामकर्ण ॥ धन्य प्रतापी प्रतापगहन ॥ आज दावीं कां मजकारणें ॥ ५८ ॥ तरी ऐसे प्रतिज्ञेलागून ॥ कीं युगायुगीं असें प्रसन्न ॥ तरी तयाचें मुखमंडन ॥ मज भेटीतें आणावें ॥ ५९ ॥ मग मच्छिंद्रातें देव पाचारिती ॥ कीं तुज बोलावीतसे गैभस्ती ॥ मग चंद्रास्त्र जल्पून उक्ती ॥ दर्शना जात मच्छिंद्र ॥ १६० ॥ मित्र दाहक तो अति सबळ ॥ म्हणून चंद्रास्त्र जपला मच्छिंद्रबाळ ॥ तें मागें पुढें परम शीतळ ॥ चंद्रास्त्रीं मिर-वीतसे ॥ ६१ ॥ त्यांत जलदास्त्राचा[5] वर्षाव ॥ होवोनि होत शीतळ ठाव ॥ ऐसें योजून सविताराव ॥ जाऊनियां नमियेला ॥ ६२ ॥

---

१ धनुष्यबाण. २ वचन. ३ मान. ४ सूर्य. ५ मेघास्त्राचा.

सर्वांतें देखून मच्छिंद्रनाथ ॥ धन्य धन्य ऐसें म्हणत ॥ कवण नामीं असे पुसत ॥ ग्राम धाम जन्मादि ॥ ६३ ॥ मग विष्णूनें मुळा-पासून कथा ॥ नामधामादि सांगीतली वार्ता ॥ कविनारायण महीवरता ॥ मच्छिंद्रनाथ मिरवतसे ॥ ६४ ॥ येरी म्हणे माझा अंश ॥ नवनारायण असती महीस ॥ तयांचा अवतार शुभ आम्हांस ॥ चांगुलपणीं वाटला हा ॥ ६५ ॥ तरी बा रे मच्छिंद्रनाथा ॥ कवण कामनीं वेधली व्यथा ॥ तें मज वदून वरदामृता ॥ प्राशन करीं महाराजा ॥ ६६ ॥ कृत त्रेता द्वापारयुग गेलें ॥ परी ऐसें नाहीं केलें ॥ धन्य तुझा प्रताप असे विपुल ॥ धन्य गुरु तुझा तो ॥ ६७ ॥ येरू बोले कर जोडोनी ॥ मम वेधली कामना मनीं ॥ साबरीविद्या कवित्वकरणी ॥ कृपा करूनि दाविली ॥ ६८ ॥ परी त्यातें वरद आपुला ॥ असावा असें वाटतें मनाला ॥ तरी कृपा करूनि वर त्याला ॥ दिधला पाहिजे महाराजा ॥ ६९ ॥ मंत्रप्रयोगीं तुझें स्मरण ॥ होतां व्हावें दृश्यमान ॥ जगाचें कार्य मंत्रसा-धन ॥ स्वकष्टानें मिरवावें ॥ १७० ॥ ऐसी ऐकतां मच्छिंद्रवाणी ॥ अवश्य म्हणे वासरमणी ॥ मंत्रप्रयोगीं स्वयें येउनी ॥ कार्य करीन जगाचें ॥ ७१ ॥ ऐसें वदोन जगलोचनी ॥ भाष देत करतळींवचनीं ॥ यावरी पाशुपतराया बोलावुनी ॥ चरणावरी घातला ॥ ७२ ॥ सूर्यवंशीं वीर्यप्रवाह ॥ वंशमालिका सगुण सर्व ॥ तुष्ट केला सविताराव ॥ मच्छिंद्रानें ते समयीं ॥ ७३ ॥ वंश-मालिका ऐसी ऐकून ॥ संतुष्ट झाला सवितानारायण ॥ मग आपुला सिद्ध करून स्यंदनें[2] ॥ वातचक्रा आव्हानी ॥ ७४ ॥ येरीकडे सकळ देव ॥ विमानयानीं गेले सर्व ॥ आपुलालें स्थान अपूर्व ॥ पाहते झाले ते वेळां ॥ ७५ ॥ येरीकडे मच्छिंद्रनाथ ॥ कृपें आव्हानून पाशुपत ॥ निघता झाला करून तीर्थ ॥ राममूर्ती वंदूनियां ॥ ७६ ॥ आतां पुढील अध्यायीं कथन ॥ चंद्रागिरि पाहिला ग्राम ॥ तेथें गवरांतून गोरक्ष काढून ॥ पुन्हां तीर्थें करील कीं ॥ ७७ ॥ नरहरिवंशीं धुंडीसुत ॥ मालू हरीचा शरणागत ॥ पुढिले अध्यायीं उत्तम कथेंत ॥ निवेदील श्रोतियांसी ॥ ७८ ॥ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागार ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ अष्टमाध्याय गोड हा ॥ १७९ ॥ ॥ अध्याय ॥ ८ ॥ ॥ ओंव्या ॥ १७९ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

१ सूर्य. २ रथ.

## ॥ नवनाथभक्तिसार अष्टमाध्याय समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ ॥ जयजयाजी जगदुद्धारा ॥ अवतारदीक्षाज्ञानेश्वरा ॥ अघटितमायावतारधरा ॥ भिंतीवाहना गुरुराया ॥ १ ॥ रेड्यामुखीं वेदोच्चार ॥ करूनि तोषविले सकळ विप्र ॥ फोडोनि भगवद्गीतांभांडार ॥ सकळ जनां वाढिलें ॥ २ ॥ ऐसा तूं कविमहाराज ॥ तरी मम कामनेचें धरूनि चोज ॥ ग्रंथार्थीं विपुल सुरस ॥ वैखरीतें वदवीं कां ॥ ३ ॥ मागिले अध्यायीं कथा सुरस ॥ दिली भाक मच्छिंद्रास ॥ वर देऊनि वातचक्रास ॥ गमन करिता पैं झाला ॥ ४ ॥ आणि श्रीरामाची झाली भेटी ॥ तेणेंही वर ओपुनी शेवटीं ॥ पाशुपतरायाची रामाचे पोटीं ॥ कामना संतुष्ट केली मच्छिंद्रें ॥ ५ ॥ असो आतां येथूनि मच्छिंद्रनाथ ॥ सप्त मोक्षपुऱ्या पाहूनि त्वरित ॥ अयोध्या मथुरा अवंतिका यथार्थ ॥ काशी काश्मिरी पाहिलीं ॥ ६ ॥ मिथुळा प्रयाग गया सुरस ॥ तेथें नमूनि विष्णुपदास ॥ अन्य तीर्थें करूनि बंगालदेश ॥ चंद्रागिरीस तो पातला ॥ ७ ॥ गांवांत करितां भिक्षाटन ॥ तों सर्वोपकारी दयाळु दिव्य ब्राह्मण ॥ तयाचें दृष्टी पडतां सदन ॥ झालें स्मरण भस्माचें ॥ ८ ॥ मनांत म्हणे याचे सदनीं ॥ पुत्रमंत्रसंजीवनी ॥ वरदभस्मीं सिद्ध करूनी ॥ दिधली होती निश्चयें ॥ ९ ॥ तरी ती साध्वी विप्रजाया ॥ सरस्वती नामें होती जया ॥ सर्वोपकारी दयाळ द्विजभार्या ॥ सुकृत होतें तियेचें ॥ १० ॥ तरी द्वादश वर्षें लोटल्यापाठीं ॥ पुन्हां मी येईन शेवटीं ॥ ऐसें वदोनि भस्मचिमुटी ॥ सरस्वतीतें दिधली असे ॥ ११ ॥ तरी त्या मायेचा शोध करून ॥ पाहूं तियेचा वरदनंदन ॥ ऐसें हृदयीं मच्छिंद्र आणून ॥ सदनामाजी प्रवेशला ॥ १२ ॥ उभा राहून विप्रांगणीं ॥ हे सरस्वति ऐसी पुकारी वाणी ॥ तंव ती ऐकून शुभाननी ॥ बाहेर आली अति त्वरें ॥ १३ ॥ येतां देखिला योगद्रुम ॥ मग भिक्षा घेऊनि उत्तमोत्तम ॥ म्हणे महाराजा भिक्षान्न ॥ झोळीमाजी स्वीकारीं ॥ १४ ॥ मच्छिंद्र म्हणे वो शुभाननी ॥ तव नाम काय तें ऐकूं दे कानीं ॥ येरी म्हणे सरस्वती अभिधानी ॥ लोकोपचारें मज असे ॥ १५ ॥ उपरी मच्छिंद्र बोले तीतें ॥ नाम काय तव भ्रतारातें ॥ येरी म्हणे सर्व त्यातें ॥ दयाळपती म्हणताती ॥ १६ ॥ नाथ म्हणे तुम्ही कवण जाती ॥ गौड विप्र म्हणे ती तैं सरस्वती ॥ ऐसें ऐकून खूण चित्तीं ॥ मिळाली तेव्हां नाथाच्या ॥ १७ ॥ मच्छिंद्र म्हणे मायें ऐक ॥ दावीं कोठें तव बाळक ॥ येरी म्हणे जी पुत्रमुख ॥ पाहिलें नाहीं अद्यापि ॥ १८ ॥ मच्छिंद्र म्हणे बोलसी कां खोटें ॥ म्यां वरदभस्माची दिधली चिमुट ॥ भस्म नोहे तें संजीवनीपीठ ॥ पुत्ररूपींचें दर्शवीं ॥ १९ ॥ दाखवीं परी तो पुत्र कैसा ॥ अजरामर मार्गें सोडिला कैसा ॥ तेजःपुंज अन्यून अनिळमहेशा- ॥ ऐसा पुत्र असेल कीं ॥ २० ॥ असो भस्मचिमुटी ऐकतां वाणी ॥ खूणयुक्त झाली नितंबिनी ॥ परी भस्मचिमुटीतें उकिरडाभुवनीं ॥ सांडिलें अन्याय वाढला ॥ २१ ॥ तेणेंकरूनि जाहली भयग्रस्त ॥ हृदयीं संचरला कंपवात ॥ चित्तीं म्हणे आतां हा नाथ ॥ शिक्षा करील मजलागीं ॥ २२ ॥

१ भिंत चालविणाऱ्या. २ ज्ञानेश्वरी. ३ वाणीला. ४ घर. ५ नांव. ६ कमी नाहीं असा. ७ स्त्री.

नेणों शापें करील भस्म ॥ कीं तोडील स्वशक्तीनें माझा काम ॥ कीं तरुरूप हो ऐसा शाप देऊन ॥ सांडूनि जाईल अवनीतें ॥२३॥ आधीं मी अल्पबुद्धीपासुनी ॥ घेतल्या आहेत नितंबिनीवाणी ॥ कीं कानफाट्याची विपरीत करणी ॥ अविद्यार्णवी असती ते ॥ २४ ॥ नाटक चेटक कुडें अपार कपट ॥ जाणती दुर्गुण परम पापिष्ठ ॥ जाया पाहून उत्तम बेरवट ॥ स्तुती करिती तियेची ॥ २५ ॥ दिनमानपर्यंत कुत्री ॥ उत्तम जाया करिती रात्रीं ॥ मग शयनीं घेऊन शेजपात्रीं ॥ भोग भोगिती दुरात्मे ॥ २६ ॥ ऐसें पूर्वी मज श्रुत ॥ सखियांमुखीं श्रवण केलें होतें ॥ परी तोचि बोल समस्त ॥ सत्य होऊं पहातसे ॥ २७ ॥ तरी आतां कपाळ फुटकें ॥ होणार तें होऊं शके ॥ कानफाट्या करूनि चेटकें ॥ दशा करील कीं माझी ॥ २८ ॥ तरी यातें कवण उपाय ॥ कांहीं सुचेना करूं काय ॥ हा ओळख धरूनि समय ॥ साधूनि आला परतोनी ॥ २९ ॥ ऐसे रीतीं मनीं जल्पत ॥ तरी गात्रें थरथरां कांपत ॥ अत्यंत भयाचें भरूनि भरतें ॥ शुद्धिपात्रा सोडिलें तिनें ॥ ३० ॥ यावरी नाथ म्हणे वो जननी ॥ पाहसी काय तूं पिशाच-पणीं ॥ पुत्र कोठें तो दावीं नयनीं ॥ उशीर न लावीं वो माते ॥ ३१ ॥ ऐसिया बोलाची होतां दाटी ॥ मग विचारी हृदयीं गोरटी ॥ कीं यासी वदावी खरी गोष्टी ॥ वृत्तांत जितुका झाला तो ॥ ३२ ॥ खरेपणीं आहे वर्म ॥ पृच्छावादीं होय न शर्म ॥ दैवें अन्यायसाफी होऊन ॥ मुक्त होतसे तो प्राणी ॥ ३३ ॥ तस्मात् जी खरी सत्यनीती ॥ त्यांत साहते बहु असती ॥ पांचांमुखीं वदूनि श्रीपती ॥ मुक्त करी अन्यायीं ॥ ३४ ॥ तस्मात् राहो अथवा जावो प्राण ॥ पुढें येवो कैसें घडून ॥ परी सत्य वाचे खरें भाषण ॥ वृत्तांत झाला तैसा वदूं ॥ ३५ ॥ मग चरणीं ठेवूनि भाळ ॥ उभय जोडूनि करकमळ ॥ म्लानमुख दीन विकळ ॥ वृत्तांत सकळ निरोपी ॥ ३६ ॥ म्हणे महाराजा क्षमाशीळा ॥ आपण जो कां प्रसाद दिधला ॥ परी अन्याय मजपासून झाला ॥ भस्म गोरीं सांडिलें ॥ ३७ ॥ सांडिलें म्हणाल काय म्हणून ॥ तरी विश्वासें व्यापिलें नव्हतें मन ॥ भस्मानें पुत्र होईल कोठून ॥ ऐसें म्हणूनी सांडिलें ॥ ३८ ॥ शेजारी असती बोलती जन ॥ दारा म्हणती प्रज्ञावान ॥ खरें नोहे निरूपण ॥ केलें विचित्र तुजलागीं ॥ ३९ ॥ तेणें संशय आणूनि मनीं ॥ नेणों कैसी घडेल करणी ॥ जठरीं पेटला कोपँवह्नी ॥ तरी आपणचि भोगावा ॥ ४० ॥ अपत्याकरितां परम अहित ॥ परगृहीं मिरवावें कां यथार्थ ॥ म्हणोनि गौप्य धरिलें चित्तांत ॥ सरस्वती वदलीसे ॥ ४१ ॥ जन्मांत आल्या परोपकार ॥ करावा हें शास्त्रनिर्धार ॥ न घडे तरी उपकार ॥ अनुपकार करूं नये ॥ ४२ ॥ उत्तम वृक्षाची करावी लावणी ॥ न घडे तरी न टाकावा खंडुनी ॥ धर्म करावा न घडे मेदिनीं ॥ वारूं नये कवणातें ॥ ४३ ॥ आपण स्वतां तीर्थास जावें ॥ न घडे तरी परा न वारावें ॥ विवाहकार्य कदा न मोडावें ॥ आपली बुद्धी वेंचूनियां ॥ ४४ ॥ गौतमीं करूं जातां

१ स्त्रियांचें भाषण. २ सुंदर. ३ खोट्या भाषणानें. ४ कल्याण. ५ पातकाचा नाश होऊन. ६ उकिरड्यामध्यें. ७ क्रोधाग्नि. ८ छेदून. ९ पृथ्वीवर.

चोरी ॥ तेथें वेंचूं नये वैखरी ॥ तस्करातें मारितां अधिकारी ॥ आड त्यातें होऊं नये ॥ ४५ ॥ सुतापाशीं पित्याचे अवगुण ॥ सांगून न करावें मन क्षीण ॥ सुनेपाशीं सासू हीन ॥ म्हणूं नये कदापि ॥ ४६ ॥ कूप तडाग मळे बागाईत ॥ करितां वारूं नये कवणातें ॥ कोणी कीर्तनास असतील जात ॥ आड येऊं नये त्यांसी ॥ ४७ ॥ आपली वैखरी वेंचल्यांत ॥ होऊं पाहे पराचें अनहित ॥ तरी तें विचारूनि स्वचित्तांत ॥ मौनें कांहीं न बोलावें ॥ ४८ ॥ ऐसें जाणोनि सरस्वती ॥ सत्य बोलली ती युवती ॥ कीं महाराजा विश्वास चित्तीं ॥ ठसला नव्हता त्या वेळे ॥ ४९ ॥ ऐसिया युक्तीप्रयुक्तीकरून ॥ भावाभावीं दृष्टी वेंचून ॥ जेणें जनाचें होय कल्याण ॥ तोचि अर्थ करावा ॥ ५० ॥ म्हणून भस्माचें सांडवण ॥ मज दयाळा घडलें पूर्ण ॥ काय करूं दैवहीन ॥ उपाय तो अपाय झालासे ॥ ५१ ॥ कीं वाटे चालतां चालीं ॥ धनाची ग्रंथिका पुढें आली ॥ परी दैवहीना बुद्धी संचरली ॥ अंध व्हावें ते समयीं ॥ ५२ ॥ कीं कल्पतरूच्या वृक्षाखालीं ॥ कल्पिली कल्पना फळा आली ॥ कीं पिशाचवत् बुद्धी संचरली ॥ दैवहीना शेवटीं ॥ ५३ ॥ तन्न्यायें मातें झालें ॥ आतां क्षमा करावी माउलें ॥ अज्ञानपणें उडविलें ॥ हित माझें महाराजा ॥ ५४ ॥ परी ही ऐकतां वाणी ॥ मच्छिंद्र खिन्न झाला मनीं ॥ म्हणे स्त्रिया जाती पापरूपिणी ॥ अविश्वासाचें भांडार हें ॥ ५५ ॥ हिताहित कदा न जाणती ॥ भलतेंसें पद ठेविती ॥ आपण बुडून दुसऱ्यास बुडविती ॥ बेचाळीस पूर्वजांस ॥ ५६ ॥ स्त्रियांसंगें लाभ किंचित ॥ कांहीं दिसेना सकळ अनहित ॥ उगाचि राबे भाडाइत ॥ वृषभ जेवीं वनितांचा ॥ ५७ ॥ उदयापासूनि सायंकाळ ॥ कष्ट अमित होती तुंबळ ॥ एक क्षणही चित्त शीतळ ॥ विश्रांतीतें मिळेना ॥ ५८ ॥ या विषयसुखाची परी ॥ मानावी जरी हृदयांतरीं ॥ तेथें होय स्वशक्तिबोहरी ॥ निर्बळपणीं मिरवावें ॥ ५९ ॥ ऐसी जीवासी अवस्था होय ॥ मेलिया नरकामाजी जाय ॥ केल्या कर्माचें रूप फेडाया ॥ आचरण कांहीं नसेचि ॥ ६० ॥ शिष्यपाप गुरुनाथ ॥ स्त्रीपाप भोगणें भर्ता ॥ तस्मात् जिकडे तिकडे पाहतां ॥ अनर्थाचें मूळ ती ॥ ६१ ॥ तस्मात् स्त्रियांचे बुद्धी लागे जन ॥ तो प्राणी गा प्रज्ञाहीन ॥ महामूर्ख अति मळिण ॥ दुष्कर्माचा भांडारी ॥ ६२ ॥ तन्न्यायें मी मूर्ख झालों ॥ या बाईच्या बोलीं लागलों ॥ वरदमंत्रभस्म ओपिलों ॥ सूर्यवीर्या आणोनी ॥ ६३ ॥ याउपरी आणीक वर ॥ मंत्रसंजीवनी आहे अमर ॥ सूर्यवीर्यें देह पर ॥ रचिला असेल कोठेंही ॥ ६४ ॥ तरी आतां ठाव सांडिला ॥ शोध करूनी पाहूं वहिला ॥ ऐसा मनीं विचार केला ॥ सरस्वतीतें बोलतसे ॥ ६५ ॥ म्हणे माय वो ऐक वचन ॥ घडलें घडो दैवयोगान ॥ तरी सांडिलें भस्म तें ठिकाण ॥ मम दृष्टीं दावीं कां ॥ ६६ ॥ तुजवर क्षोभ करावा कांहीं ॥ तरी पदरीं कांहीं पडत नाहीं ॥ तरी सांडिला ठाव माझे आई ॥ निजदृष्टीं दावीं कां ॥ ६७ ॥ ऐसी बोलतां नाथ वाणी ॥ भय फिटलें मुळींहूनी ॥

१ वाणी. २ सरोवरें, तलाव. ३ स्त्री. ४ होणें जाणें यावर. ५ फेंकून देणें. ६ गांठोंडें. ७ गुरुमाउलीनें. ८ स्वभावतः. ९ भाड्याचा.

प्रांजळ चित्तें शुभाननी ॥ मुखचंद्रा उचंबळी ॥ ६८ ॥ म्हणे महाराजा योगद्रुमा ॥ सांडिला ठाव दाविलें तुम्हां ॥ पुढें चालें मागें उगमा ॥ नाथ जातसे सवेंसवें ॥ ६९ ॥ तंव तो उकिरडाकेर उद्दाम ॥ गोंवर पडिला पर्वतासमान ॥ तेथें जाऊनि सुमधुम ॥ नाथाप्रती सांगतसे ॥ ७० ॥ हे महाराजा तपोजेठी ॥ येथें सांडिली भस्मचिमुटी ॥ ऐसें ऐकोनि नाथ होटीं ॥ हांक मारी बाळकातें ॥ ७१ ॥ हे हरिनारायण प्रतापवंता ॥ मित्रवर्या सूर्यसुता ॥ जरी असरसील या गोंवरांत ॥ नीघ त्वरित या समयीं ॥ ७२ ॥ या गोंवरगिरींत नरदेहजन्म ॥ मिरवला असे तूतें उत्तम ॥ तरी गोरक्ष असें तूतें नाम ॥ सुढाळपणीं मज वाटे ॥ ७३ ॥ द्वादश वर्षेंपर्यंत ॥ बैसलास गोंवररक्षणांत ॥ म्हणूनि गोरक्षक नाम तूतें ॥ पाचारितों स्वच्छंदें ॥ ७४ ॥ तरी आतां न लावीं उशीर ॥ हे गोरक्षनाथा निघें बाहेर ॥ ऐसें वदतां नाथ मच्छिंद्र ॥ बाळशब्द उदेला ॥ ७५ ॥ म्हणे महाराजा गुरुवर्या ॥ गोरक्ष असें मी या ठाया ॥ परी गोवरनगानें गुंफित काया ॥ भार मौळीं विराजला ॥ ७६ ॥ तेणेंकरून शरीरवेष्टण ॥ झालें आहे दडपण ॥ तरी गोरयातें विदारून ॥ बाहेर काढीं महाराजा ॥ ७७ ॥ ऐसें ऐकून बोले उत्तर ॥ लौकरी आणून लोहपत्र ॥ मही विदारूनी नगगौर ॥ बाळतनू काढिली ॥ ७८ ॥ काढिली परी ती तनुलता ॥ बालार्ककिरणीं दिसे समता ॥ कीं घनमांदुसी विद्युल्लता ॥ चमक दावी आगळी ॥ ७९ ॥ कीं पूर्ण चंद्र प्रकाश पौर्णिमेचा ॥ दिशा उजळे समयीं निशीचा ॥ तेवीं तनुगर्भ मदनाचा ॥ जनामाजी मिरवला ॥ ८० ॥ कीं दुसरा ईश तो चक्रधर ॥ त्यजोनि आतां मूर्तिसार ॥ वीट मानूनि क्षीरसागर ॥ म्हणूनि येथें आला असे ॥ ८१ ॥ कुंकुमाकार पदपंकज ॥ सकळ आंगोळ्या तेजःपुंज ॥ चंद्राकारसम विराजे ॥ नखें अग्र आंगोळी ॥ ८२ ॥ घोटींव सुनीळ अपूर्व देखा ॥ कीं इंद्रनीळाची झळके बिंका ॥ मनगटावरी अलोलिका ॥ सकळ पोटरी विराजे ॥ ८३ ॥ गुडघ्यावरी जानुस्थळ ॥ जैसे स्तंभ कर्दळीचे उभय सरळ ॥ त्यावरी कटितटा अति निर्मळ ॥ हरिमाजासम जाणावी ॥ ८४ ॥ कटीवरती नाभिधाम ॥ त्यावरतें हृदय अति सुगम ॥ सुगम परी विद्याधाम ॥ ऐसेपरी वाटतसे ॥ ८५ ॥ सरळ बाहु स्कंधीं शोभत ॥ परी आजानुबाहु दिसों येत ॥ तयामाजी जग समस्त ॥ उभ्या कर्दळी मिरवती ॥ ८६ ॥ त्यातेंही अंगुळ्या सरळ प्रकाम ॥ तयांअग्रीं नख उग्रतम ॥ चंद्राकृती तेज उत्तम ॥ कोर जैसी द्वितीयेची ॥ ८७ ॥ असो स्कंधामाजी ग्रीवा सरळ ॥ घोटितां बीक दावी सकळ ॥ तयावरी हनुवटी निर्मळ ॥ अधरापरी शोभतसे ॥ ८८ ॥ अधरदंत जिव्हेसहित ॥ आनन केवळ चंद्र मूर्तिमंत ॥ परी आनन नोहे धाम निश्चित ॥ वेदधनाचें विराजे ॥ ८९ ॥ सरळ नासिका शुकाग्रवत ॥ उभय चक्षु विशाळवंत ॥ चक्षु नव्हेत ते शशिआदित्य ॥ नांदावया पातले ॥ ९० ॥ भाळ विशाळ कबरीभार ॥ कुरळ वरती पिंगटाकार ॥ ऐसा महाराज सर्वेश्वर ॥ उदया आला वाटतें ॥ ९१ ॥ द्वादश

१ पुष्कळ. २ शरीर. ३ मस्तकावर. ४ विशेष प्रकारची. ५ तेज. ६ सिंहाचे कमरेसमान. ७ खांद्यावर. ८ मान. ९ चंद्रसूर्य.

वर्षें अलोलिक ॥ सर्वगुणीं पाहतां बालक ॥ सरस्वतीनें भाळीं देख ॥ तर्जनीतें लोंविलें ॥ ९२ ॥ मनांत म्हणे ती गोरटी ॥ आहा जनीं मीच करंटी ॥ ऐसा पुत्र माझिये पोटीं ॥ येतां दैवें उच्छेदिला ॥ ९३ ॥ चित्तीं उठोनि परम तळमळ ॥ नेत्रीं दाटलें अपार जळ ॥ मोहें करपे हृदयकमळ ॥ रुदनसंवादा अनुवादी ॥ ९४ ॥ तें पाहूनि मच्छिंद्रनाथ ॥ म्हणे खेद कां वो करिसी व्यर्थ ॥ तुझा नव्हता तो सुत ॥ प्राप्त कैसा होईल ॥ ९५ ॥ पहा पहा अन्नयोग ॥ श्वान पराचा भक्षितो भाग ॥ परी उलटोनि रसनामार्ग ॥ श्वान दैवें विराजे ॥ ९६ ॥ तन्न्यायें मूर्तिमंत ॥ विभाग नसे हा ऐसा सुत ॥ आतां शोक करिसी कां व्यर्थ ॥ तपशापविभाग मिरविसी ॥ ९७ ॥ तरी जा तूं येथूनी ॥ नाहक घेसील शापवाणी ॥ माझा कोप प्रत्यक्ष अग्नी ॥ ब्रह्मादिकां साहेना ॥ ९८ ॥ ऐसी बोलिला क्रूर वार्ता ॥ सरस्वती पावली भय चित्ता ॥ मागें पाऊल ठेऊनि तत्त्वतां ॥ निजसदना पातली ॥ ९९ ॥ येरीकडे गोरक्षनाथें ॥ येऊनि वंदिलें गुरुपदातें ॥ मच्छिंद्रनाथ तो प्रसन्न चित्तें ॥ अनुग्रह ओपीतसे ॥१००॥ ॐ मित्येकाक्षर अक्षर ॥ संबोधीत समग्र ॥ नारायणीं नामोच्चार ॥ मंत्रविधीनें निरोपिला ॥ १ ॥ वरदहस्त ठेवूनि मौळीं ॥ सकळ निवटिली अज्ञानकाजळी ॥ वरदविभूती चर्चून भाळीं ॥ मुख कुरवाळी प्रेमानें ॥ २ ॥ मग हस्त धरोनि तत्त्वतां ॥ म्हणे तान्हुल्या ऊठ आतां ॥ महीचे गोचर करूनि तीर्थां ॥ हरिपरायणा सकामातें ॥ ३ ॥ अवश्य म्हणूनि गोरक्षनाथ ॥ सलील चरणीं माथा ठेवीत ॥ श्रीमच्छिंद्राचा धरूनि हस्त ॥ गमन करिता पैं झाला ॥ ४ ॥ चंद्रागिरिस्थान सोडून ॥ करिती जगन्नाथीं गमन ॥ तों मार्गीं जातां एक ग्राम ॥ कनकगिरि लागला ॥ ५ ॥ मच्छिंद्र पाहतां ग्राम सुरस ॥ बोलता झाला गोरक्षास ॥ बा रे प्रारंभ क्षुधेस ॥ जठरामाजी दाटला ॥ ६ ॥ कक्षेमाजी घालून झोळी ॥ बा रे संचरोनी वस्तिमेळीं ॥ भिक्षा मागून ये वेळीं ॥ क्षुधा माझी हरीं कीं ॥ ७ ॥ अवश्य म्हणूनि गोरक्षनाथ ॥ सत्वर झोळी कक्षे घेत ॥ संचरोनि कनकग्रामांत ॥ भिक्षा मागे घरोघरीं ॥ ८ ॥ भिक्षा मागतां अति उद्देशीं ॥ तंव तो गेला एका विप्रगृहासी ॥ तेथें पाहतां ते दिवशीं ॥ पितृश्राद्ध मिरवलें ॥ ९ ॥ विप्र करूनियां भोजन ॥ उपरी मागत्यास देतसे अन्न ॥ ते संधीस गोरक्ष जाऊन ॥ 'अँलक्ष' आदेश जल्पतसे ॥ ११० ॥ तंव त्या घरची नितंबिनी ॥ महाप्राज्ञिक सुस्वरूपिणी ॥ क्षमाशांतीची लावण्यखाणी ॥ सर्वगुणीं संपन्न ॥ ११ ॥ तिनें पाहतां गोरक्षनाथ ॥ भाविती झाली चित्तांत ॥ म्हणे धन्य हें बाळ अतित ॥ चांगुलपणीं मिरवतसे ॥ १२ ॥ प्रत्यक्ष मातें भासे कैसा ॥ कीं बालार्कतनूचा ओतिला ठसा ॥ कीं हरूनि चपळेचे मांदुसा ॥ महीलागीं उतरला ॥ १३ ॥ परी हा तापसी योगी वरिष्ठ ॥ मातें भासतो योग हा श्रेष्ठ ॥ पूर्वींचा कोणी योगभ्रष्ट ॥ जगामाजी मिरवतसे ॥ १४ ॥ ऐसें जाणूनि लवडसवडी ॥ पात्रीं पदार्थ स्वकरें वाढी ॥ अन्नसामुग्री अति तांतडीं ॥ घेऊन आली

१ गोजिरवाणें. २ कपाळावर हात ठेविला. ३ रडूं लागली. ४ कुत्रा. ५ पोटांत भूक लागली. ६ बापाचें श्राद्ध. ७ 'अलख' ह्मणून. ८ स्त्री.

भिक्षेस ॥ १५ ॥ खाज्या करंज्या पदार्थ घिवर ॥ पोळी भात शिरा कचोर ॥ मालपुव्यादि सुकुमार ॥ परम मृदू भक्ष्यतो ॥१६॥ चोटी मुगदळ बुंदी विशेष ॥ पूर्ण पोळिया विस्तीर्ण पात्रास ॥ घाऱ्या पुऱ्या पंच मधुरस ॥ श्रद्धापूर्ण ठेविल्या ॥ १७ ॥ वड्या पातवड्या शाखा बहुत ॥ सोमसट्टकाचे द्रोण भरित ॥ कोशिंबिरी आंबेरायतें ॥ बहु भात चटणिया ॥ १८ ॥ कढी सांबारें वडे त्यांत ॥ सार आमटी चणचणीत ॥ नाना द्रोण भरूनि घृत ॥ मेतकुटादि वाढिलें ॥ १९ ॥ मध्यभागीं ठेवूनि भात ॥ त्यावरी वरण कनकवर्णांत ॥ तळीं वडे पोखरे दह्यांत ॥ घालोनियां वाढिलें ॥ १२० ॥ ऐसियापरी षड्रसान्न ॥ घवघवीत पात्र वाढून ॥ श्रीगोरक्षापुढें ठेवून ॥ नमस्कारी प्रीतीनें ॥ २१ ॥ गोरक्षा पाहतां पात्र सुरस ॥ मनीं वाटला परम हर्ष ॥ चित्तीं म्हणे त्या नितंबिनीस ॥ धन्य धन्य माउले ॥ २२ ॥ आहा आम्ही कोठील कोण ॥ नोहे इष्ट सोयरे जन ॥ आम्हांसाठीं सिद्ध करून ॥ पात्र वाढून आणिलें ॥ २३ ॥ पात्र पहा घवघवीत ॥ हें पात्र नोहे यथार्थ ॥ शिवलिंगी शोभला भात ॥ पात्र शाळुंका मिरवली ॥ २४ ॥ नाना पदार्थ अर्थप्रकरण ॥ तें शिवासी अपार सुगम ॥ कीं शिवलाखोली ढांसळून ॥ शाळुंका ते मिरवली ॥ २५ ॥ कीं प्रीतीं पाहतां तो भात ॥ सकळ अन्नाचा प्रभु शोभत ॥ पात्रमहीतें[1] प्रीतीनें बहुत ॥ नानापदार्थ मिरवले ॥ २६ ॥ तरी शाक नोहे पृतनामेळ[2] ॥ खाजे मंत्री दिसे सबळ ॥ मौळीं छत्र तेजाळ ॥ वैरान्न[3] हें मिरवलें ॥ २७ ॥ ऐसा भास भासून हृदयीं ॥ पात्र कक्षझोळींत ठेवी ॥ आशीर्वचनें तोषवूनि बाई ॥ जाता झाला महाराज ॥ २८ ॥ चित्तीं म्हणे उदरापुरतें ॥ प्राप्त अन्न झालें मातें ॥ आतां वेंचून स्वकष्टातें ॥ केवीं हिंडावें घरोघरीं ॥ २९ ॥ ऐसा विचार करूनि चित्तीं ॥ येऊनि वंदिलें श्रीगुरुमूर्ती ॥ भिक्षाझोळी कक्षेतुनी निगुती ॥ काढून ठेवी पुढारां ॥ १३० ॥ तंव ती प्रत्यक्ष तपोमौळी ॥ विकासून[4] पाहे झोळी ॥ तंव तें अन्न सुंदर परिमळीं ॥ निजदृष्टीं देखिलें ॥ ३१ ॥ मग तें घेऊनि आपुलेपासीं ॥ भोजन करी योगींद्र तापसी ॥ अन्न स्वादिष्ठ रसनेसी[5] ॥ लागतां भक्षी आवडीनें ॥ ३२ ॥ मुखामाजी कवळ[6] करितां ॥ रसना न लावी दंता ॥ म्हणे हे तरकी होतील आतां ॥ लवडसवडी लोटीतसे ॥ ३३ ॥ जठरभांडारीं भरून भरतें ॥ आणीक इच्छे नाहीं पुरतें ॥ परी सर्व पदार्थ कामनायुक्त ॥ वडा प्रिय मिरवला ॥ ३४ ॥ परी पदार्थ अपूर्वपणीं ॥ कामना येथें राहिली मनीं ॥ कीं वडा आणीक असता भोजनीं ॥ चांगुलपणा मिरवितो ॥ ३५ ॥ ऐसी चित्तीं कल्पना आणून ॥ पाहता झाला गोरक्षवदन ॥ तों सच्छिष्य ओळखून ॥ बोलता झाला गुरूसी ॥ ३६ ॥ म्हणे महाराजा तपोधना ॥ कवण कामना आली मना ॥ तो अर्थ उघड दाऊनि वचना ॥ आम्हां कार्या निरोपावें ॥ ३७ ॥ येरू म्हणे गोरक्षनंदना ॥ कामना वेधली माझिया मना ॥ आणीक वडा असता भोजना ॥ तृप्त चित्तीं मिरवतों ॥ ३८ ॥ ऐसें ऐकोन गुरूचें चोज ॥ म्हणे गुरुराजा महा-

१ पात्ररूपी जमिनीला. २ सैन्यसमुदाय. ३ वरण. ४ उघडी करून. ५ जिव्हेला. ६ ग्रास.

राज ॥ आतांच वडा आणून सहज ॥ तुम्हांप्रती देईन मी ॥ ३९ ॥ ऐसें म्हणून तत्कालिक ॥ उठता झाला तपोनायक ॥ विप्रगृहीं येऊन देख ॥ मारी हांक गोरक्ष तो ॥ १४० ॥ म्हणे माय वो माय आतां ॥ आणीक वडा दे तत्त्वतां ॥ मम गुरूची कामना असे चित्ता ॥ तृप्ती अस्तातें पावेना ॥ ४१ ॥ तंव ते बोले नितंबिनी ॥ आलास गुरूचें निमित्त करोनी ॥ परी सकामसविता स्वेच्छापणीं ॥ हृदयपात्रीं हेलावे ॥ ४२ ॥ मातें दावूनि गुरुभक्ती ॥ कामने करूं पाहसी तृप्ती ॥ तस्मात् सकळ अर्थ कळूं आला चित्तीं ॥ मजलागीं जाण पां ॥ ४३ ॥ येरू म्हणे जननी ऐसें ॥ कामनीं वेधलें नाहीं मानस ॥ गुरुइच्छा कामउद्देश ॥ पाहूं आलों तव ठाया ॥ ४४ ॥ तंव ती बोले विप्रनंदिनी ॥ गुरुअर्थ कामना मनीं ॥ वेधली म्हणतोस तरी प्राज्ञी ॥ वचन माझें ऐकावें ॥ ४५ ॥ अगा मम भक्तीचे प्रसंगेंकरून ॥ तूतें दिधलें पहा वाढून ॥ पुन्हां आलासी मागून ॥ तरी तें नाहीं फुकाचें ॥ ४६ ॥ येरू म्हणे तरी त्यास ॥ काय लागतें सांग आम्हांस ॥ तेंच देऊनि तूतें खास ॥ वडे जाण इच्छितों ॥ ४७ ॥ येरी म्हणे गुरुभक्ती ॥ मातें दाऊं पावलास शक्ती ॥ परी वडे अन्नावरते पाहिजेती ॥ डोळा काढून देईं कां ॥ ४८ ॥ येरू म्हणे काय कठिण ॥ चक्षुकामनीं वेधलें मन ॥ तरी चक्षु आतां देईन जाण ॥ उशीर नसे या कार्या ॥ ४९ ॥ ऐसें बोलून केलें कौतुका ॥ तत्काळ अंगुळी[१] अनामिका ॥ चक्षुद्वारीं घालोनि देखा ॥ बाहेर काढिलें बुबुळातें ॥ १५० ॥ बुबुळगोळ वामकरतटीं ॥ ठेवितां लोटला रुधिरपाटीं[२] ॥ जैसा नगीं झरा लोटीं ॥ अकस्मात उद्भवलासे ॥ ५१ ॥ कीं मांदारनदी स्वर्गीहूनी ॥ उतरे मनकर्णिकेचे जीवनीं ॥ तन्यायें चक्षुद्वाराहूनी ॥ लोट लोटला रुधिराचा ॥ ५२ ॥ म्हणावी ती रुधिर नोहे शक्ती ॥ दाखवूं पातली गुरुभक्ती ॥ विप्रकामना पात्र भरूनी ॥ जीवनभागीरथी दाविली ॥ ५३ ॥ कां ते जाया हेलनभाव ॥ ती सगराची मिरवली ठेव ॥ तदर्थ जीवनभागीरथीराव ॥ गोरक्षनगींची आणिली असे ॥ ५४ ॥ असो ऐसें तेणें रुधिरा[४] ॥ लोट लोटला महीवरा ॥ तें पाहून चिंतातुरा ॥ प्रेमें जाया मिरवली ॥ ५५ ॥ रुधिर वाहतां भडभडाट ॥ महीं लोटला रक्तपाट ॥ खंडणा नोहे परम अचाट ॥ भूषण मिरवी लोकांतें ॥ ५६ ॥ तरी तो पाहतां रुधिरपाट ॥ नोहे धरादेवीचा शुद्ध मळवट ॥ भाळीं चर्चून कुंकुमपाट ॥ भूषण मिरवी लोकांतें ॥ ५७ ॥ ऐसी ती विप्रदारा[७] पाहून ॥ लज्जित झाली अरिष्टपण ॥ परम चित्तीं खोंच मानून ॥ सदनामाजी परतली ॥ ५८ ॥ चित्तीं म्हणे हा अहाहा कैसें ॥ बोलतां झालें विपर्यासें ॥ धन्य हा एक शिष्य असे ॥ जगामाजी मिरवला ॥ ५९ ॥ अहा कैसें केलें धैर्यपण ॥ बोलतांचि काढिला जेणें नयन ॥ परी ती व्यापून भयसंपन्न ॥ म्लानवदन मिरवली ॥ १६० ॥ मग वडे घेऊनि सातपांच ॥ देऊं पातली लगबगें साच ॥ पुढें ठेवूनि वदे वाचे ॥ ऐक्यार्थें करी भावार्थ ॥ ६१ ॥ उपरी जोडून उभय पाणी ॥ विनंती करी म्लानवदनीं ॥ म्हणे महाराजा

१ इच्छेच्या ठिकाणीं. २ करांगळीजवळील बोट. ३ डोळ्यांत. ४ रक्तप्रवाह. ५ जीवंत करणारी भागीरथी नदी. ६ रक्ताला. ७ ब्राह्मणस्त्री.

सहजवाणीं ॥ शब्द माझा उदेला ॥ ६२ ॥ परी उदय होतां न लावितां वेळ ॥ तुम्ही बाहेर काढिलें बुबुळ ॥ परी मम अन्यायी शब्द केवळ ॥ क्षमापात्रीं मिरवणें ॥ ६३ ॥ तुम्ही कृपाळू संपूर्ण ॥ बसतां अंगीं क्लेश धरून ॥ परी तितुकें दुःख पराकारण ॥ देऊं ऐसें वाटेना ॥ ६४ ॥ कीं कमळ करीं अस्तसमयीं ॥ घ्यावया इच्छा द्रुम घेत हृदयीं ॥ परी तें दुःखप्रवाहीं ॥ कदाकाळीं मिरवेना ॥ ६५ ॥ शेवटीं आपण पावोन मरण ॥ परातें कळिके सुख ओपून ॥ राहे तन्न्यायेंकरून ॥ तुम्ही संत आहाती ॥ ६६ ॥ उपरी बोले गोरक्षनाथ ॥ तूं किमर्थ झालीस भयभीत ॥ वडे अन्न तत्प्राप्त्यर्थ ॥ चक्षु दिधला म्यां आपुला ॥ ६७ ॥ तरी तूं भयभीत न होईं सकळ ॥ स्वकरीं माझे विराजे बुबुळ ॥ येरी म्हणे तपस्वी स्नेहाळ ॥ कृपा करीं मजवरी ॥ ६८ ॥ इतुकें देऊन मातें दान ॥ बुबुळासहित नेइजे अन्न ॥ आपुलें कार्य संपादून ॥ क्षमा वाढवीं आम्हुतें ॥ ६९ ॥ ऐसें ऐकून गोरक्षनाथ ॥ म्हणे तूं न होईं भयभीत ॥ बुबुळासह वडे अन्नातें ॥ घेऊनियां चालिलों ॥ १७० ॥ चक्षूसी आडवोनि पदर[1] ॥ जावोनि उभा राहिला गुरूसमोर ॥ वाचे बोले नम्रोत्तर ॥ इच्छा पूर्ण करा जी ॥ ७१ ॥ परी तो कनवाळु मच्छिंद्रनाथ ॥ सच्छिष्याचें मुख पाहत ॥ तंव वसनपदर चक्षूवरतें ॥ घेऊनियां मिरवला ॥ ७२ ॥ तें पाहूनि चक्षुवसन ॥ म्हणे चक्षु झांकिला केवीं वसनें ॥ येरू[2] म्हणे उगेंच करून ॥ चक्षु वसनें धरियेला ॥ ७३ ॥ मनांत कल्पी गोरक्षनाथ ॥ जरी मी यातें करीं श्रुत ॥ तरी धिक्कारूनि वडे अन्नासहित ॥ दुःखप्रवाहीं मिरवेल ॥ ७४ ॥ जैसा श्रावणाचा[3] अंतकाळ ॥ ऐकतां न सेविती वृद्ध तेथें केवळ ॥ तन्न्यायें येथें केवळ ॥ दुःखसरिता लोटेल ॥ ७५ ॥ म्हणून पुसतां गुरूनीं वचन ॥ बोले श्रीगुरूतें गौप्य धरून ॥ सहजस्थिती चक्षुवसन[4] ॥ धरिलें असे महाराजा ॥ ७६ ॥ येरू म्हणे बा मुखकमळा ॥ प्रत्यक्ष पाहूं दे माझिया डोळां ॥ येरू म्हणे गुरुस्नेहाळा ॥ भोजन झालिया दाखवीन ॥ ७७ ॥ मी तों असतां सहजस्थिती ॥ कीं परी उगलाच नयन केउतगती ॥ ठणका उठला चक्षुप्रती ॥ आला कीं काय कळेना ॥ ७८ ॥ तरी तें दाऊनि चक्षुद्वार ॥ परम दिसेल अपवित्र ॥ किळस बाधील भोजनोत्तर ॥ चक्षु पहावा महाराजा ॥ ७९ ॥ येरू म्हणे बा न घडे ऐसें ॥ आधीं पाहून तव मुखास ॥ नंतर सारूं भोजनास ॥ दुःख तुझें हरोनियां ॥ १८० ॥ जरी तूं करिसी अनमान ॥ तरी प्रत्यक्ष गोमांससमान ॥ मानीन हें अन्न निश्चय जाण ॥ चक्षु आधीं दावीं कां ॥ ८१ ॥ ऐसें ऐकतां निर्वाणवचन[5] ॥ गोरक्ष बोले श्रीगुरुकारण ॥ कीं मागूं गेलों वडे अन्न ॥ कथा झाली ती ऐका ॥ ८२ ॥ जया घरीं वडेअन्न ॥ तेथील सद्भक्ति आहे कामिन ॥ तिनेंचि प्रथम दिधलें अन्न ॥ मागून गेलों दुसऱ्यानें ॥ ८३ ॥ तुमची इच्छा काम दाऊन ॥ म्यां मागितलें वडेअन्न ॥ तंव ती बोलली मजकारण ॥ गुरुभक्त म्हणविसी ॥ ८४ ॥ तरी तूं काढून देईं डोळा ॥ मग वडे देईन बाळा ॥ ऐसें

१ वस्त्राचा पदर. २ गोरक्ष. ३ दशरथानें अज्ञानानें वधलेला एक ऋषिपुत्र. ४ डोळ्यावरील वस्त्र. ५ अखेरचें भाषण.

बोलतां तर्जनी बुबुळा ॥ खोऊनियां काढिलें ॥ ८५ ॥ तरी हा अन्याय घालून पोटीं ॥ मातें करावी कृपादृष्टी ॥ ऐसें ऐकतां तपोजेठी ॥ परम चित्तीं तोषला ॥ ८६ ॥ मग चक्षुद्वाराहूनि वसन ॥ हस्तें काढी मच्छिंद्रनंदन ॥ तों रुधिरप्रवाह अति दारुण ॥ चक्षुद्वारा येतसे ॥ ८७ ॥ मग बोले मच्छिंद्रनंदन त्यातें ॥ बुबुळ कोठें सांग मातें ॥ येरू काढून तळहस्तें ॥ गुरुनाथा दर्शवी ॥ ८८ ॥ मग तो प्रतापी योगद्रुम ॥ मंत्रसंजीवनी आराधोनि नेम ॥ सवितातेज[1] बुबुळधामीं[2] ॥ मंत्रप्रयोगीं स्थापिलें ॥ ८९ ॥ पूर्णमंत्राचा होतां पाठ ॥ बुबुळ संचरलें[3] चक्षुकपाट ॥ मग पूर्वस्थितीहूनि अचाट[4] ॥ तेजालागीं मिरवलें ॥ १९० ॥ मग अंकीं[5] घेऊनि गोरक्षनाथ ॥ स्वकरें मुख कुरवाळीत ॥ म्हणे धन्य धन्य बा महींत ॥ तूंचि एक सच्छिष्य ॥ ९१ ॥ मग त्यासी घेऊनि अंकावरी ॥ सच्छिष्यासह भोजन करी ॥ परी धैर्यशक्तीची अपार लहरी ॥ मच्छिंद्रदेहीं मिरवतसे ॥ ९२ ॥ झालिया सांगोपांग भोजन ॥ गोरक्षकास बोले मच्छिंद्र जाण ॥ बा रे तव भक्ति पाहून ॥ परम चित्तीं संतोषलों ॥ ९३ ॥ तरी मजपासींचें विद्याधन ॥ हृदयीं सांठवीं ठेवून ॥ मग अस्त्रविद्या दत्तात्रेयदेणें ॥ सकळ तूतें निरोपीन ॥ ९४ ॥ कवित्वविद्या साबरी सबळ ॥ तीही विद्या अर्पिली सकळ ॥ एक मास करूनि वस्तीस्थळ ॥ विद्येचा अभ्यास केला पैं ॥ ९५ ॥ असो आतां निरूपण ॥ पुढिले अध्यायीं धुंडीनंदन ॥ मालू सांगेल श्रोत्यांकारण ॥ नरहरिप्रसादेंकरूनियां ॥ ९६ ॥ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ नवमोऽध्याय गोड हा ॥ १९७ ॥ ॥ अध्याय ॥ ९ ॥ ॥ ओंव्या ॥ १९७ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

१ सूर्याचें तेज. २ बुबुळाच्या ठिकाणीं. ३ जागच्याजागीं बरोबर बसलें. ४ विलक्षण. ५ मांडीवर.

## ॥ नवनाथभक्तिसार नवमाध्याय समाप्त ॥

अध्याय १० वा.












श्रीगणेशाय नमः ॥ ॥ वक्रतुंडा गणाधिपती ॥ विद्यार्णवा कळासंपत्ती ॥ भक्तवरदा हरसी आर्ती ॥ मंगळमूर्ति गजानना ॥ १ ॥ जयजयाजी आदिनाथा ॥ मायाचक्रचालका अनंता ॥ सर्वाधीशा भगवंता ॥ साक्षात् अक्षय मोक्ष तूं ॥ २ ॥ तरी मागिले अध्यायीं निरूपण ॥ श्रीगोरक्षाचा पावोनि जन्म ॥ उपरी सेवून कनकगिरी ग्राम ॥ विद्यार्णवी तो केला ॥ ३ ॥ तरी ती विद्या कोण कैसी ॥ सकळ कळा श्लोकराशी ॥ भविष्योत्तरपुराणासी ॥ निरोपितों श्रीश्रोतियां ॥ ४ ॥ श्लोक ॥ ब्रह्मज्ञान रसायन कविता ॥ वेद शास्त्र ज्योतिष तथा ॥ व्याकरण धनुर्धर जलतरंगता ॥ संगीत काव्य अकरावें ॥ ५ ॥ अश्वारोहण कोकशास्त्र ॥ निपुण नाट्य तथा चार ॥ चतुर्दश विद्यांचा सागर ॥ पूर्णपणें भरलासे ॥ ६ ॥ टीका ॥ प्रथम सांगून ब्रह्मज्ञान ॥ स्वमुखीं केल्या परायण ॥ विश्व आणि विश्वंभर दोन ॥ भावचि ऐसा नुरवी ॥ ७ ॥ कीं बहुत जे अर्थप्रकार ॥ जीवजंतु चराचर ॥ तो ऐक्यमेळीं सकळ विस्तार ॥ मीच ऐसें भाविलें ॥ ८ ॥ कर्माकर्म सत्कर्मराशी ॥ त्या नुरल्याच कोणीही बीजांकुराशीं ॥ वासना देऊन योगफांसीं ॥ कामनेतें नुरवितो ॥ ९ ॥ ऐशा एकमेळेंकरून ॥ गोरक्ष झाला सनातन ॥ एवंच सकळ ब्रह्मज्ञान ॥ उपदेशिलें गुरुनाथें ॥ १० ॥ मग पूर्णपणाचें पात्र होउनी ॥ वसुधेकल्प अव्यक्त भुवनीं ॥ सर्व आत्मरूपी मानुनी ॥ तत्स्वरूपीं प्रगटेल ॥ ११ ॥ याउपरी वातपित्तकफहारक ॥ रसायनविद्या सकळिक ॥ किमया करणें धातु अनेक ॥ हातवटी सांगितली ॥ १२ ॥ कवित्व रसाळ नवरस ॥ गणादि निरोपी दीर्घ र्‍हस्व ॥ व्यक्त अर्थलिंगप्रकरणास ॥ व्यक्ताव्यक्त सांगितलें ॥ १३ ॥ याउपरी वेदाध्ययन ॥ सूक्तऋचेंत केला प्रवीण ॥ दीर्घर्‍हस्वें छंदें निपुण ॥ स्वरित छंदीं अवघे गुण पैं केला ॥ १४ ॥ ऋक् अथर्वण यजुर्वेद ॥ सामवेदादि सांगून प्रसिद्ध ॥ उपरी विद्या ज्योतिषसिद्ध ॥ परिपूर्ण सांगितली ॥ १५ ॥ सारस्वत किरात कोश ॥ कौमुदी रघु हरिवंश ॥ पंच काव्यें मीमांसा ॥ साही शास्त्रें निवेदिलीं ॥ १६ ॥ यावरी धनुर्धरविद्यानिपुण ॥ सकळ अस्त्रीं केला प्रवीण ॥ तीं सकळ अस्त्रें कोण कोण ॥ नामें तयांचीं ऐकिजे ॥ १७ ॥ वातास्त्र आणि जलदास्त्र ॥ उर्मी उभी कामास्त्र ॥ वाताकर्षण बळ स्वतंत्र ॥ पर्वतास्त्र सांगितलें ॥ १८ ॥ वज्रास्त्र वासवशक्ती ॥ नागास्त्र खगेंद्र संजीवनी ती ॥ ब्रह्मास्त्रादि निर्वाणरणशक्ती ॥ रुद्रास्त्र सांगितलें ॥ १९ ॥ विरक्तास्त्र दानवास्त्र ॥ पवनास्त्र आणि कालास्त्र ॥ स्तवन महाकार्तिकास्त्र ॥ स्पर्शविभक्तास्त्र निवेदिलें ॥ २० ॥ यावरी साबरीविद्याकवित्व ॥ प्रत्यक्ष करून सकळ दैवत ॥ तयाचा वरदपाणी निश्चित ॥ गोरक्षमौळीं मिरवला ॥ २१ ॥ तीं दैवतें कोण कोण ॥ बावन्न वीर असती जाण ॥ नरसी कालिका म्हंमदा उत्तम ॥ महिषासुर आराधिला ॥ २२ ॥ झोटिंग वेताळ मारुती ॥ अस्त्रवीर भद्रपती ॥ मूर्तिमंत सीतापती ॥ वरदमौळीं स्पर्शीतसे ॥ २३ ॥ परम आदरीं आलिंगून ॥ श्रीराम घेत चुंबन ॥ म्हणे होईं सनातन ॥ कीर्तिध्वज मिरविजे

१ विद्यासागरा. २ पाण्यावर पोंहणें. ३ कामशास्त्र. ४ इच्छेला. ५ इंद्रशक्ति.

॥ २४ ॥ यावरी प्रत्यक्ष गजवदन ॥ तोही उतरला सहस्रकिरण ॥ गोरक्षातें अंकीं घेऊन ॥ वरदमौळी स्पर्शीतसे ॥ २५ ॥ यावरी
अष्टभैरव उग्र ॥ तेही पातले तेथें समग्र ॥ सिद्धभैरवादि काळभैरव सांग ॥ बाळभैरवादि पातले ॥ २६ ॥ वीरभैरवादि गणभैरव ॥
ईश्वरभैरव रुद्रभैरव ॥ भस्मभैरवादि महादेव ॥ अपर्णापति पातला ॥ २७ ॥ तेणें घेऊन अंकावरतें ॥ मुख कुरवाळलें वरदहस्तें ॥
खेळतां बाबर धांवोनि येती ॥ तेही देती आशीर्वचन ॥ २८ ॥ मुंडा चामुंडा शंखिनी डंखिनी ॥ कुंडा रंडा भलांडा यक्षिणी ॥
चंडा वंडिका प्रत्यक्ष येउनी ॥ वर गोरक्षा देती त्या ॥ २९ ॥ यावरी प्रगटून जलदैवत ॥ तेव्हां त्यातें वर ओपीत ॥ कुमारी
धनदा नंदा विख्यात ॥ देवता त्या गोमव्या ॥ ३० ॥ लक्ष्मी प्राज्ञा बाला बगला ॥ नववी दैवत प्रत्यक्ष विमला ॥ ऐशा जल-
देवता येऊन तत्काला ॥ वर ओपिती बाळातें ॥ ३१ ॥ यावरी प्रत्यक्ष अष्टसिद्धी ॥ होऊन वर ओपिती वरमादी ॥ अणिमा
गरिमा विशाळबुद्धी ॥ महिमा प्रकामें पातली ॥ ३२ ॥ प्रथिमा प्राची वशित्वा सातवी ॥ तेवीं ती सिद्धी महादेवी ॥ सज्ज करून
अस्त्रकर उभवी ॥ अष्टसिद्धि तत्काल त्या ॥ ३३ ॥ असो बावनवीरांसहित ॥ श्रीराम सूर्य जाहला प्राप्त ॥ सर्वत्र ओपून मौळीं हस्त ॥
विद्या करीं ओपिती ॥ ३४ ॥ असो वर देउनी सद्विद्येसी ॥ सर्वत्र वंदिती मच्छिंद्रासी ॥ म्हणती महाराजा गोरक्षासी ॥ तपालागीं बैसवीं
॥ ३५ ॥ तपीं होतां अनुष्ठान ॥ तेणें बळ चढे पूर्ण ॥ मग ही विद्या तपोधन ॥ लखलखीत मिरवेल ॥ ३६ ॥ जैसें खड्ग शिकलें
होतां ॥ मग भय काय तें शत्रु जिंकितां ॥ तेवीं तपोबळ आराधितां ॥ सामर्थ्यसत्ता वाढेल ॥ ३७ ॥ ऐसें वदोन सकळ देव ॥
पाहते जाहले आपुलाले गांव ॥ रामसूर्यादि महादेव ॥ बावन्न वीरादि पैं गेले ॥ ३८ ॥ यावरी इंद्र वरुण अश्विनी ॥ गण-
गंधर्वादि पातले भुवनीं ॥ वर देती तयालागुनी ॥ सकळ गेले स्वस्थाना ॥ ३९ ॥ याउपरी कोणे एके दिवशीं ॥ गोरक्ष घोकितां
सद्विद्येसी ॥ मंत्रसंजीवनी पाठ मुखासी ॥ करीत बैसला होता तो ॥ ४० ॥ जवळी नसतां मच्छिंद्रनाथ ॥ बैसला होता एकां-
तांत ॥ तों गांवचीं मुलें खेळत खेळत ॥ तया ठायीं पातलीं ॥ ४१ ॥ हातीं कवळून कर्दमगोळा ॥ मुलें खेळती आपुले मेळां ॥
तों गोरक्षापासीं येऊन आगळा ॥ बोल बोलती सकळिक ॥ ४२ ॥ म्हणती गोरक्षा ऐक वचन ॥ आम्हीं आणिला बहुत कर्दम ॥
तरी शकट करून दे उत्तम ॥ आम्हांलागीं खेळावया ॥ ४३ ॥ येरू म्हणे शकट मजसीं ॥ करूं येत नाहीं निश्चयेंसीं ॥ येत असेल तुम्हां
कोणासी ॥ तरी करून कां घ्याना ॥ ४४ ॥ ऐसें ऐकतां मुलांनीं वचन ॥ करीं कर्दम कवळून ॥ आपुलाले करेंकरून ॥ शकट
रचिती चिखलाचा ॥ ४५ ॥ कर्दमचक्र काष्ठ व्यक्त ॥ शकट केला यथास्थित ॥ वरी उदेलें कल्पनेंत ॥ शकटा सारथी असावा
॥ ४६ ॥ म्हणूनि कर्दम घेऊनि गोळा ॥ मुलें रचिती कर्दमपुतळा ॥ परी तो साधेना मुलां सकळां ॥ मग गोरक्षातें विनविती ॥ ४७ ॥

१ गणपति. २ शंकर. ३ ह्या नांवांच्या देवता. ४ मस्तकावर. ५ चिखलाचा गोळा. ६ गाडा. ७ चिखलाचें चाक.

म्हणती गोरक्षा आम्हांप्रती ॥ साह्य देईं शकटसारथी ॥ आम्हां साधेना कर्दमनीती ॥ तरी तूं करून देईं कां ॥ ४८ ॥ अगा तूं सकळ मुलांचे गणीं ॥ वयोवृद्ध अससी प्राज्ञी ॥ तरी आम्हांसी सारथी करूनी ॥ सत्वर देईं खेळावया ॥४९॥ ऐसें ऐकतां मुलांचें वचन ॥ म्हणे कर्दम आणून द्या देतों करून ॥ परी ही वासना भविष्यकारण ॥ गोरक्षातें उदेली ॥ ५० ॥ जैसे ज्याचे पूर्वानुक्रम ॥ तैसी बुद्धि येत घडून ॥ जेवीं बीज पेरिल्या समान ॥ तोचि तरु हेलावे ॥ ५१ ॥ पहा मातेच्या द्वेषउद्देशीं ॥ ध्रुव बैसला अढळपदासी ॥ तैसेंच वासनालेशीं ॥ क्षीरोदधि उपमन्या ॥ ५२ ॥ कीं गांधारीचा होता अंत ॥ म्हणून पार्थी सुचला अर्थ ॥ [१]अकिंचन तो वायुसुत ॥ ध्वजस्तंभीं मिरवला ॥ ५३ ॥ कीं सीतासतीच्या उद्देशीं ॥ लंकेस राहिली येऊन विवशी ॥ तिनें भक्षून दशाननासी ॥ राक्षसकुळ भक्षिलें ॥ ५४ ॥ पहा अनुसर्गकर्म कैसें ॥ त्याच राक्षसीं वंशलेशें ॥ चिरंजीव होऊन लंकाधीश ॥ भोग भोगी बिभीषण ॥ ५५ ॥ तस्मात् बोलावयाचें हेंचि कारण ॥ बुद्धि संचरे पूर्वकर्माप्रमाण ॥ पुढें उदयातें करभंजन ॥ येणार होते महाराज ॥५६॥ नवनारायण करभंजन परम ॥ उदय पावणार गहन नाम ॥ म्हणून गोरक्षा इच्छाद्रुम ॥ [३]चित्तधरेतें उदेला ॥ ५७ ॥ मग हातीं घेऊन कर्दमगोळा ॥ रचिता झाला उत्तम पुतळा ॥ परी रसने पाठ संजीवनी आगळा ॥ होतसे मंत्राचा ॥ ५८ ॥ त्यांत विष्णुवीर्य उपचार ॥ पीयूषमांडणी जल्पत स्मर ॥ एवंविधि संजीवनीमंत्र ॥ पाठ होता गोरक्षा ॥ ५९ ॥ मुखीं पाठ हस्तें पुतळा ॥ पूर्णपणीं होतां कर्दमगोळा ॥ महीभागीं भाग सकळा ॥ व्यक्त असे तत्त्वांचा ॥ ६० ॥ तेणेंकरून पंचभूत ॥ दृश्यत्व पावले संजीवनी अर्थ ॥ करभंजन ते संधींत ॥ प्रेरक झाला जीविता ॥ ६१ ॥ अस्थि मांस त्वचेसहित ॥ आकार दृश्य झाला त्यांत ॥ पुढें शब्द [५]आननांत ॥ अकस्मात उदेला ॥ ६२ ॥ उदय होतां करी रुदन ॥ तें पाहिलें सकळ बाळांनीं ॥ म्हणती भूत आणिलें गोरक्षांनीं ॥ पळा पळा येथूनियां ॥ ६३ ॥ ऐसें बोलतां एकमेकांत ॥ सकळ होऊन भयभीत ॥ सांडून खेळ सकळ अर्थ ॥ पळून गेले वातगती ॥ ६४ ॥ हृदयीं दाटून भयकांपरा ॥ मुलें कांपती थरथरां ॥ आरडत बरडत मच्छिंद्रआधारा ॥ पळोनियां पैं गेलीं ॥ ६५ ॥ ऐशापरी मुलें भयग्रस्त ॥ तें पाहून मच्छिंद्रनाथ ॥ मग पाचारून सकळ मुलांतें ॥ आश्वासून पुसतसे ॥ ६६ ॥ म्हणे बाळां होय थरथराट ॥ कां रे कांपतां सांगा वाट ॥ येरीं मुळाहून सकळ बोभाट ॥ मच्छिंद्रातें निवेदिला ॥ ६७ ॥ म्हणे कर्दमाचा शकटसारथी ॥ करवीत होतों गोरक्षाहातीं ॥ तों बालतत्त्वपणीं भूतमती ॥ कर्दम लोपून संचरली ॥ ६८ ॥ तें भूत अद्याप आहे लहान ॥ परी क्षणैक होईल स्थूलवटपण ॥ आम्हांलागीं करील भक्षण ॥ म्हणूनियां पळालों ॥ ६९ ॥ परी आम्ही आलों येथें पळून ॥ मागून गोरक्षनाथ येत होता धांवून ॥ त्यास भक्षिलें असेल भूतानें ॥ यांत संशय नसेचि ॥ ७० ॥ मच्छिंद्र

१ समुदायांत. २ दरिद्री. ३ चित्तरूपी पृथ्वीवर. ४ वाणीला. ५ तोंडांत.

ऐसी ऐकून वार्ता ॥ साशंकित झाला चित्ता ॥ चित्तीं म्हणे मुलें वार्ता ॥ सांगती काय तें नोहे ॥ ७१ ॥ अवचट भूत कैसें व्यापिलें ॥ तें पाहून बाळ भ्याले ॥ तरी आतां जाऊन वहिलें ॥ गोचर करावें निजदृष्टीं ॥ ७२ ॥ मग आश्वासून सकळ मुलां ॥ निकट बैसवून पुसे त्यांला ॥ कोणत्या ठायीं संचार झाला ॥ भूताचा तो मज सांगा ॥ ७३ ॥ येरी म्हणती बावा ऐक ॥ भूत तेव्हां होतें बाळक ॥ आतां थोर फोडोनि हांक ॥ भक्षील आम्हां वाटतसे ॥ ७४ ॥ मच्छिंद्र म्हणे मी असतां ॥ तुम्हां भय नसे सर्वथा ॥ चला जाऊं भूतास आतां ॥ शिक्षा करूं आगळी ॥ ७५ ॥ मुलें म्हणती मच्छिंद्रनाथ ॥ तुम्ही जाऊं नका तेथ ॥ बाळार्ककिरण आहे भूत ॥ तुम्हां भक्षील तेच घडी ॥ ७६ ॥ मच्छिंद्र म्हणे दुरून ॥ दाखवा भूताचा ठिकाण ॥ मग तीं बाळें अवश्य म्हणोन ॥ दुरून ठाव दाविती ॥ ७७ ॥ यापरी इकडे गोरक्षनाथ ॥ तोही पळाला होऊनि भयग्रस्त ॥ मुलांचें मंडळ सांडूनि एकांतीं ॥ लपोनियां बैसला ॥ ७८ ॥ भूत भूत ऐसें म्हणून ॥ मुलें पळालीं आरोळ्या देऊन ॥ तेव्हांच गेला होता पळून ॥ भूतभयेंकरोनियां ॥ ७९ ॥ ठाव लक्षून परम एकांत ॥ बैसला होता शुचिष्मंत ॥ परी हृदय धडधडीत अत्यंत ॥ भूत येईल म्हणोनियां ॥ ८० ॥ येरीकडे मच्छिंद्रातें ॥ ठाव दाविती मुलें समस्त ॥ परी दूरचि असती यत्किंचित ॥ सन्निध न येत भयानें ॥ ८१ ॥ जैसा राजभयाचा तरणी[3] ॥ लखलखीत मिरवीत असतां अवनीं[4] ॥ मग दुष्कृत चोर जार जारिणी ॥ दर्शनार्थ ते न येती ॥ ८२ ॥ कीं रामनामबोधोत्तर[5] ॥ असतां भूत न ये समोर ॥ कीं पीयूषीं[6] विषदृष्टिव्यवहार ॥ कदाकाळीं चालेना ॥ ८३ ॥ तन्यायें मुलें भिऊन ॥ दुरून दाविती मच्छिंद्रा ठिकाण ॥ म्हणती याच ग्रामांतून ॥ भूत प्रगट जाहलें ॥ ८४ ॥ मग त्या ग्रामांत मच्छिंद्रनाथ ॥ मुलें दावितां सँधट जात ॥ तों बाळ टाहा आरडत ॥ महीलागीं उकिरडां ॥ ८५ ॥ बाळार्ककिरणीं तेज लकाकत ॥ मुखीं टाहा टाहा वदत ॥ तें पाहून मच्छिंद्रनाथें ॥ करभंजन ओळखिला ॥ ८६ ॥ हृदयीं धरून लवडसवडी ॥ बाळ उचलोनि घेतला आवडीं ॥ मग लगबगी गांवाबाहेर अतितांतडीं ॥ बाळासह पावला ॥ ८७ ॥ तें सकळ मुलें पाहूनी ॥ पळतीं झालीं प्राण सांडुनी ॥ म्हणे नाथांनीं भूत धरोनी ॥ आणिलें आतां बरें नसे ॥ ८८ ॥ आतां त्या भूतास देईल सोडून ॥ मग तें आपल्या पाठीस लागून ॥ एकएकासी भक्षील धरून ॥ ऐसें म्हणून पळताती ॥ ८९ ॥ पळतां पडती उठून जाती ॥ भयेंकरून सांदींत दडती ॥ हृदयीं धडधडा अर्थार्थ[7] चित्तीं ॥ लपोनियां बैसला ॥ ९० ॥ येरीकडे बाळ घेऊन ॥ गोरक्ष पाहे मच्छिंद्रनंदन ॥ सदनींसदनीं हांका मारून ॥ गोरक्षातें पुकारी ॥ ९१ ॥ परी ज्या सदनीं जाय जती ॥ ते सदनींचीं मुलें आरडून उठती ॥ आई आई बया बया म्हणती ॥ आणिक पळती पुढारां ॥ ९२ ॥ परी सदनींसदनींचे जन ॥ नाथा पुसती हटकून ॥ भय काय दाविलें मुलांकारण ॥ म्हणून आर-



१ लवकर. २ मोठी. ३ सूर्य. ४ पृथ्वीवर. ५ रामनामाचा जप केल्यानंतर. ६ अमृताचे ठिकाणीं. ७ धीर धरून.

ढून पळताती ॥ ९३ ॥ कोणाचें मूल घेवोनी ॥ फिरतां तुम्ही सदनींसदनीं ॥ येरी म्हणे गोरक्ष नयनीं ॥ पाहेन तेव्हां सांगेन ॥ ९४ ॥ ऐसें बोलोनी पुढें जात ॥ तों पातला गोरक्ष होता जेथ ॥ उभा राहोनि अंगणांत ॥ गोरक्षातें पाचारी ॥ ९५ ॥ ऐकून श्रीगुरूची वाणी ॥ गोरक्ष निघाला सदनांतुनी ॥ परी येतांच बाळ पाहिला नयनीं ॥ पुन्हां आरडून पळे तो ॥ ९६ ॥ हा विपर्यास पाहूनि नयनीं ॥ मच्छिंद्र विचारी आपुले मनीं ॥ गोरक्ष व्यापला भयेंकरूनी ॥ बाळ येथें ठेवावें ॥ ९७ ॥ मग स्वशिरींचें काढून वसन ॥ त्यावरी निजविलें बाळरत्न ॥ मग त्या सदनीं संचरून ॥ गोरक्षापासीं पातला ॥ ९८ ॥ जातां कवळून धरिलें हृदयीं ॥ म्हणे वाहसी व्यर्थ भयप्रवाहीं ॥ तें भूत नाहीं मनुष्यदेहीं ॥ करभंजन उदेला ॥ ९९ ॥ परी तयाची उदयराहाटी ॥ सांग झाली निर्भय पोटीं ॥ येरी म्हणे मुलांसाठीं ॥ खेळत होतों महाराजा ॥ १०० ॥ हातीं घेऊन कर्दमगोळा ॥ पूर्णपणीं रचिला पुतळा ॥ परी नेणों कैशी झाली कळा ॥ भूत त्यांत संचरलें ॥ १ ॥ लोपून सकळ कर्दमनीती ॥ दिसूं आली मानवाकृती ॥ तेणें भय व्यापून चित्तीं ॥ पळालों मी मुलांसह ॥ २ ॥ यावरी मच्छिंद्र बोले वाणी ॥ तूतें सांगितली संजीवनी ॥ तो मंत्र घोकितां क्षणीं ॥ करीत होतास काय तूं ॥ ३ ॥ येरी म्हणे आज्ञा तुमची ॥ भंगिली नाहीं शपथ पायांची ॥ खेळतां वाणी मंत्राची ॥ सांडिली नाहीं महाराजा ॥ ४ ॥ कर्दमपुतळा करितां हातीं ॥ परी मंत्र सांडिला नाहीं उक्तीं ॥ चुकलों नाहीं शिक्षेहातीं ॥ ओपूं नका गुरुनाथा ॥ ५ ॥ ऐसी ऐकतां गोरक्षवाणी ॥ मच्छिंद्र तोषला आपुले मनीं ॥ म्हणे बा बरी केली करणी ॥ ऊठ आतां वेगेंसीं ॥ ६ ॥ मुख कवळून चुंबन घेत ॥ हास्य मानून कुरवाळित ॥ म्हणे होईं आतां स्वस्थ ॥ चाल वेगीं पाडसा ॥ ७ ॥ येरी म्हणे गुरुनाथा ॥ तुम्हीं आणिलें आहे भूता ॥ तें मज खाईल प्रांजळ आतां ॥ बाहेर नेऊं नका जी ॥ ८ ॥ मच्छिंद्र म्हणे ऐक मात ॥ हें बाळ नसे रे भूत ॥ तुवां घोकोनि संजीवनींत ॥ मनुष्यपुतळा तो झाला ॥ ९ ॥ जैसा गौरउकिरडां स्थान ॥ बाळ झालासी उत्पन्न ॥ त्याच नीतीं खेळतां कर्दम ॥ बाळ उदयातें आलें हो ॥ ११० ॥ ऐसी ऐकतां गुरुगोष्टी ॥ म्हणे भूत नोहे तपोजेठी ॥ मच्छिंद्र म्हणे भय पोटीं ॥ सांडीं मनुष्य तें असे ॥ ११ ॥ ऐसें ऐकून प्रांजळमत ॥ मग श्रीगुरूचा धरून हात ॥ बाळ होतें चीरपदरांत ॥ तयापासीं पातले ॥ १२ ॥ बाळ उचलोनि मच्छिंद्रनाथ ॥ आपुल्या शिबिरा घेऊनियां जात ॥ गोदुग्ध आणून पान त्वरित ॥ तें बाळका पैं केलें ॥ १३ ॥ यावरी वसनझोळी करून ॥ आंत घातला गहिनी नंदन ॥ यावरी तया गांवींचे जन ॥ शिबिरापासीं पातले ॥ १४ ॥ नाथचरणीं अर्पून माथा ॥ पुसती हे नाथ समर्था ॥ बाळ कोणाचें हालवितां ॥ श्रवण करूं इच्छितों ॥ १५ ॥ मग झाला वृत्तांत मच्छिंद्रनाथ ॥ तयां ग्रामस्थां निवेदीत ॥ ते ऐकून सकळ वृत्तांत ॥ आश्चर्य करिती क्षणोक्षणीं

१ वस्त्र. २ भयाच्या प्रवाहांत. ३ पूर्ण. ४ बोलण्यांत. ५ खरोखर. ६ वस्त्राच्या पदरांत.

॥ १६ ॥ म्हणे धन्य धन्य संजीवनी ॥ हा कलींत उदेला उशनामुनी ॥ परी त्याही प्रत्यक्ष सर्वगुणीं ॥ नाथ मच्छिंद्र वाटतो ॥ १७ ॥ पहा पहा गुरुदैत्य ॥ शवशरीरा सावध करीत ॥ परी त्या म्हणाया जगदेहस्थ ॥ जीवदशा व्यापीतसे ॥ १८ ॥ तरी तैसा नोहे मच्छिंद्रनाथ ॥ कर्दमपुतळा केला जीवंत ॥ तस्मात् शुक्र तो त्या तुलनेंत ॥ सहस्रभागीं दिसेना ॥ १९ ॥ तरी उशना न म्हणूं संमती ॥ द्वितीय ब्रह्मा पातला क्षितीं ॥ तीही संमत गौण चित्तीं ॥ मच्छिंद्रभाग्य दिसतसे ॥ १२० ॥ पहा पहा विधिराज ॥ उत्पन्न करी जगा सहज ॥ तरी मूळ त्यांत असे बीज ॥ बीजासमान रुंख होय ॥ २१ ॥ यावरी आणिक दुसरा अर्थ ॥ विधी स्वअंगें उत्पत्ती करीत ॥ तैसा नोहे मच्छिंद्रनाथ ॥ शिष्याहातीं करविला ॥ २२ ॥ महाबीजाविण जाण ॥ कर्दमीं केला मनुष्य उत्पन्न ॥ तस्मात् धन्य विधीहून ॥ मच्छिंद्रनाथ मिरवला ॥ २३ ॥ ऐसें परस्परें भाषण ॥ करिती गांवींचे सकळ जन ॥ यावरी बोलती नाथा-कारण ॥ नाथानिकट बैसूनियां ॥ २४ ॥ म्हणती महाराजा प्रतापतरणी ॥ बाळाचे कष्ट करूं जाणे जननी ॥ ती तों बाळका न दिसे करणी ॥ गैबीनंदन हा असे ॥ २५ ॥ पहा बाळाचे कष्ट उत्कृष्ट ॥ पुरुषा होईनात ते नाथा श्रेष्ठ ॥ तरी यास धर्मजननी वरिष्ठ ॥ करून द्यावी महाराजा ॥ २६ ॥ तीतें बाळक करीं अर्पण ॥ करील तयाचें संगोपन ॥ तुम्हांलागीं कष्ट दारुण ॥ होणार नाहींत महाराजा ॥ २७ ॥ ऐशी ऐकतां जगाची वाणी ॥ मान तुकावी मच्छिंद्रमुनी ॥ म्हणे बा ते धर्मजननी ॥ कोणती करावी महाराजा ॥ २८ ॥ ऐसें बोलतां मच्छिंद्रनाथ ॥ विचार करिताती ग्रामस्थ ॥ तों ग्रामामाजी विप्रगृहांत ॥ मधुनामा नांदतसे ॥ २९ ॥ तयाची कांता लावण्यखाणी ॥ पतिव्रता धर्मपत्नी ॥ सत्य संचित सर्वज्ञानी ॥ ज्ञानकळा पैं असे ॥ १३० ॥ नामें कौतुका असे गंगा ॥ निर्मळ-पणीं असे अभंगा ॥ पतिसेवे अंतरंगा ॥ जगामाजी मिरवली ॥ ३१ ॥ उदरीं नाहीं संतती ॥ तेणें विव्हळ प्रेम चित्तीं ॥ संतती-वीण कामगती ॥ संसार ते वेदना ॥ ३२ ॥ सदा वाटे हुरहुर ॥ लोकांचे पाहून किशोर ॥ चित्तीं पाहून चिंती गुहार ॥ साशंकित होताती ॥ ३३ ॥ नाना यत्न संततीसाठीं ॥ करून बैसले होते जेठी ॥ उपाय न चाले परम कष्टी ॥ जगामाजी मिरवला ॥ ३४ ॥ ऐसे असतां उभे जन ॥ तों दैवें उदेला मांदुसाकारण ॥ ग्रामस्थाकरीं तयाचें स्मरण ॥ अकस्मात पैं झालें ॥ ३५ ॥ जैसा द्रोणाचा विषमकाळ ॥ निवटावया उदेला उत्तम वेळ ॥ सहजखेळीं गांधारीबाळ ॥ विटी कूपांत पडियेली ॥ ३६ ॥ कीं रत्नांची होणें उत्पत्ती ॥ म्हणोनी देवदानवमती ॥ अब्धिमंथनीं उदेली चित्तीं ॥ एकभावेंकरूनियां ॥ ३७ ॥ तन्न्यायें मधुविप्राचें ॥ दैव उदेलें जगमुखें साचें ॥ म्हणून स्मरण निघालें त्याचें ॥ मान्य पडलें सर्वांसी ॥ ३८ ॥ मग मच्छिंद्रनाथा विनवणी करून ॥ म्हणती महाराजा मधुब्राह्मण ॥ तयाची कांता परम सगुण ॥ ज्ञानकळा असे कीं ॥ ३९ ॥ तो ओपून बाळ गोमट ॥ तेथेंचि होईल पूर्ण शेवट ॥ पुत्रार्थिया परम



१ शुक्राचार्य. २ पृथ्वीवर. ३ ब्रह्मदेव. ४ वृक्ष. ५ बालकें. ६ समुद्रमंथन करण्यासंबंधी.

अनिष्ट दिवस ॥ असती महाराजा ॥ १४० ॥ ऐसी ऐकून मच्छिंद्र वाणी ॥ पुत्राच्या राहे संरक्षणीं ॥ मग त्या विप्रा बोलावूनी ॥ कांतेसहित आणिलें ॥ ४१ ॥ परी ते भार्या लावण्यराशी ॥ सद्गुणवर्या जगासी ॥ नाथ पाहतांच ते चित्तासी ॥ ओळखिलें हृदयांत ॥ ४२ ॥ मनांत म्हणे मच्छिंद्रनाथ ॥ उत्तम जागीं दिसून येत ॥ सकळ जग मान देत ॥ तस्मात् श्रेष्ठ आतां हे ॥ ४३ ॥ जो जगामाजी आहे भला ॥ तो तैसाचि परलोका ठेला ॥ जो जगीं जाय मानवला ॥ परलोकीं मानवला तोचि एक ॥ ४४ ॥ आणीक भविष्य अवश्य जाण ॥ अर्थाअर्थीं करी गमन ॥ मग कौतुकानें जवळ घेऊन ॥ बाळ ओंटीं ओपीतसे ॥ ४५ ॥ म्हणे माय वो माय ऐक ॥ हा बाळ आहे वरदायक ॥ नवनारायणांतील एक ॥ करभंजन मिरवला ॥ ४६ ॥ याचें होतां संगोपन[1] ॥ फेडील दृष्टीचें पारण ॥ जगामाजी स्थूलवट[2] मान ॥ पुत्र तुझा मिरवेल हा ॥ ४७ ॥ म्हणसील हा होईल कैसा ॥ तरी कीर्तिध्वज मित्र[3] जैसा ॥ कीं देवकीचा हरि जैसा ॥ वंद्य असे जगातें ॥ ४८ ॥ माय मी काय सांगूं गहन ॥ या बाळाचें चांगुलपण ॥ मूर्तिमंत याचे सेवेकारण ॥ कैलासपती[4] उतरेल गे ॥ ४९ ॥ तयाची निवटून[5] अज्ञानराशी ॥ हा अनुग्रह होईल तयासी ॥ आणून ठेवील निवृत्तिपदासीं ॥ निवृत्तिनामें मिरवुनी ॥ १५० ॥ म्हणे हा अयोनि[6] संभवला ॥ जगामाजी सहज गे मिरवला ॥ परी अति गहनीं नाम याला ॥ गहनी ऐसें देई कां ॥ ५१ ॥ यावरी आणीक सांगतों तुजसी ॥ आम्ही जातों तीर्थस्नानासी ॥ उपरी फिरून द्वादशवर्षीं ॥ गोरक्षबाळ येईल गे ॥ ५२ ॥ तो यातें अनुग्रह देऊन ॥ माय गे करील सनातन[7] ॥ परी तूं आतां जीवित्व लावून ॥ संगोपन करीं याचें ॥ ५३ ॥ यावर बोले कौतुकें सती ॥ कीं महाराजा योगमूर्ती ॥ बाळ ओपिलें माझे हातीं ॥ परी संशय एक असे ॥ ५४ ॥ तुम्ही द्वादश वरुषां आलां परतोन ॥ बाळ न्याल कीं मजपासून ॥ मग मी कैसें जननीपण ॥ जगामाजी मिरवावें ॥ ५५ ॥ मग केल्या कष्टाचें आचरण ॥ मज मिरवेल कीं भाडायितपण[8] ॥ तरी प्रांजळपणीं आतांचि वचन ॥ मजप्रती सांगिजे ॥ ५६ ॥ पहा पहा जी आशाबद्ध ॥ सकळ जग असे प्रसिद्ध ॥ तरी इच्छा प्रांजळ शुद्धबुद्ध ॥ एकभागीं लावा जी ॥ ५७ ॥ तुम्हां आशा असेल याची ॥ तरी तैशीच गोष्टी सांगायाची ॥ मग नाथ गोष्टी ऐकून तिची ॥ प्रांजळ वचन बोलतसे ॥ ५८ ॥ माये संशय सांडूनि मनीं ॥ बाळ न्यावें आपुले सदनीं ॥ माझी आशा बाळालागुनी ॥ गुंतत नाहीं जननीये ॥ ५९ ॥ तरी तुज तुझा लाभो सुत ॥ प्रांजळपणीं मिरवो जगांत ॥ तूं माय हा सुत ॥ लोकांमाजी बोलतील ॥ १६० ॥ मी आणि माझा शिष्य ॥ गुंतणार नाहीं या आशेस ॥ हा बाळ तुमचा तुम्हांस ॥ लखलखीत बोलतों ॥ ६१ ॥ परी गोरक्ष अनुग्रह देईल यासी ॥ पुढें जाईल तीर्थस्नानासी ॥ तूं संभाळ तुजपाशीं ॥ चिरंजीव असो हा ॥ ६२ ॥ ऐसें बोलून ग्रामस्थांतें ॥ शपथपूर्वक साक्षसहित ॥ निर्मळपणीं

१ संरक्षण. २ मोठा. ३ सूर्य. ४ शंकर. ५ घालवून. ६ गर्भवासाशिवाय. ७ अक्षय. ८ भाडोत्रीपणा.

करूनि चित्त ॥ कौतुकसदनीं बोलवी ॥ ६३ ॥ मंत्रें चर्चूनी विभूती बाळा ॥ मोहनास्त्र घातलें गळां ॥ कौतुकें स्पर्शीत हृदय-कमळा ॥ पयोधरीं पय दाटतसे ॥ ६४ ॥ मग तें बाळ लावोनि स्तनीं ॥ गांवींच्या आणूनि सुवासिनी ॥ पालखांत घातलें प्रेमें-करूनी ॥ गहनी नाम स्थापिलें ॥ ६५ ॥ यावरी मच्छिंद्र कांहीं दिवस ॥ तया ग्रामीं करून वास ॥ मग सवें घेऊनी गोरक्षास ॥ तीर्थस्नाना चालिला ॥ ६६ ॥ पुसून सकळ ग्रामस्थांसी ॥ निघता झाला गौरवेंसीं ॥ मार्ग लक्षून तीर्थस्नानासी ॥ बद्रिकाश्रमीं जातसे ॥ ६७ ॥ परी मार्गीं चालतां वाटोवाट ॥ श्रीगोरक्षाची घेऊनि पाठ ॥ कार्यरूपी कार्य घेऊनि अलोट ॥ परीक्षेतें पाहतसे ॥ ६८ ॥ नंतरी ते पाहतां परी विषम अशी ॥ विषम दिसती सर्व कार्यासी ॥ मग मच्छिंद्र विचार करी मानसीं ॥ तप पूर्ण नसे या ॥ ६९ ॥ मुळींच पदरीं नसतां पैसा ॥ कीं दान मिरवी दांभिका व्यवसा ॥ तेवीं मंत्रहेतु तपोलेशा ॥ विना विषम आहे हा ॥ १७० ॥ तरी आतां बदरिकाश्रमीं ॥ बद्रिकेदार उभा स्वामी ॥ तयाहातीं गोरक्ष ओपूनी ॥ तयालागीं रुझवावा ॥ ७१ ॥ ऐसा विचार करूनि चित्तीं ॥ उभयतां हिंडले नाना तीर्थी ॥ मग लक्षून हिमाचलमार्गाप्रती ॥ बद्रिकाश्रमाप्रती पैं गेले ॥ ७२ ॥ गेले परी तेथील कथन ॥ पुढिले अध्यायीं होईल श्रवण ॥ अर्थ धरून अपूर्ण ॥ स्वीकार करावा श्रोत्यांनीं ॥ ७३ ॥ तुम्ही विचक्षण श्रोते संत ॥ सदा तुमचा धुंडिसुत ॥ सेवेलागीं अर्थी प्राणांत ॥ ग्रंथ आदरीं मिरवीतसे ॥ ७४ ॥ तुमचे कृपेचें लेवून भूषण ॥ नरहरिवंश पूर्ण ॥ कवि मालु धुंडीनंदन ॥ संतगणीं मिरवला ॥ ७५ ॥ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किम-यागार ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ दशमाध्याय गोड हा ॥ १७६ ॥ अध्याय ॥ १० ॥ ओंव्या ॥ १७६ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

॥ नवनाथभक्तिसार दशमाध्याय समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी इंदुशलाका- ॥ मुगुटमणे सकळटिळका ॥ इंदिरापते विबुधजनका ॥ भक्तिमानसा विराजित ॥ १ ॥ ऐसा धैर्यऔदार्यवंत ॥ पुढें बोलवीं भक्तिसारग्रंथ ॥ मागिले अध्यायीं गहिनीनाथ ॥ जन्मोदय पावला ॥ २ ॥ यावरी गोरक्ष मच्छिंद्रनाथ ॥ महीचीं तीर्थें करीत ॥ हिमाचल बद्रिकेदारांत ॥ भ्रमण करीत पैं गेले ॥ ३ ॥ इतुकी कथा सिंहावलोकनीं ॥ पूर्वाध्यायांत कीजे श्रवणीं ॥ असो गुरुशिष्य बद्रिकाश्रमीं ॥ शिवालया पातले ॥ ४ ॥ बद्धांजळीं जोडोनि कर ॥ करिते झाले नमस्कार ॥ नमस्कार करून जयजयकार ॥ स्तुतिसंवादें आराधिलें ॥ ५ ॥ हे त्रिपुरारी शूळपाणी ॥ अपर्णावर पंचाननी ॥ रुंडमाळा चिताभस्मी ॥ दिव्यतेजभूषित तूं ॥ ६ ॥ हे कामांतका दक्षतेजा ॥ भोळवट वरां देशी दानवां ॥ कैलासपते महादेवा ॥ सदाशिवा आदिमूर्ते ॥ ७ ॥ हे दिगंबरा जगजेठी ॥ भाळीं गंगा मौळीं जटाजूटी ॥ नरकपाळ करसंपुटीं ॥ इंदुकळेतें मिरविशी ॥ ८ ॥ उरगवेष्टन कुरंगसाली ॥ व्याघ्रांबर वसनपाली ॥ गजचर्मादि मिति झाली ॥ परिधाना महाराजा ॥ ९ ॥ हे कैलासवासा उमापती ॥ दक्षजामाता आदिमूर्ती ॥ चक्रचालका मायाभगवती ॥ आम्हां दासां अससी तूं ॥ १० ॥ हे नीलग्रीवा आदिपीठ ॥ करुणाकरा उत्तमा श्रेष्ठ ॥ स्वीकारून सर्व अरिष्ट ॥ सुख देसी देवांसी ॥ ११ ॥ हे भाळदृष्टित्रयार्थनयनी ॥ डमरू त्रिशूळ विराजे पाणीं ॥ सदा प्रिय वृषभ वाहनीं ॥ भस्मधारणी महाराजा ॥ १२ ॥ हे स्मशानवासी वैराग्यशीळा ॥ नगजामात रक्षपाळा ॥ श्वेतवर्णा तमोगुणा आगळा ॥ वाहासी गळां राममंत्र ॥ १३ ॥ हे सर्वाधीश विश्वपती ॥ भिक्षाटणीं बहुत प्रीती ॥ जटा पिंगटा त्रिपुंड्र ललाटीं ॥ शुद्ध वीरगुंठी शोभतसे ॥ १४ ॥ फरशांकुश डमरू हातीं ॥ लोप पापा पातोपातीं ॥ षडाननताता सुत गणपती ॥ विद्यालक्षणीं मिरविसी ॥ १५ ॥ ऐसी स्तुति अपार वचनीं ॥ करीत मच्छिंद्र बद्रिकाश्रमीं ॥ स्तुती ऐकून प्रेमें उगमी ॥ प्रगट झाला महाराज ॥ १६ ॥ मग मच्छिंद्राचा धरूनि हस्त ॥ सप्रेम त्यातें आलिंगित ॥ निकट बैसवून पुसे त्यातें ॥ योगक्षेम कैसा तो ॥ १७ ॥ गोरक्षातें घेऊन जवळी ॥ मुख स्वकरें कुरवाळी ॥ म्हणे बा उदय येणें काळीं ॥ हरिनारायण झालासी ॥ १८ ॥ ऐसें वदोन आणीक वदत ॥ हे महाराज मच्छिंद्रनाथ ॥ हा तव शिवयोगें सुत ॥ तारक होईल ब्रह्मांडा ॥ १९ ॥ म्यां पूर्वींच यातें पाहिलें होतें ॥ म्हणशील तरी कनकगिरीतें ॥ तुवां अभ्यासून सुतें ॥ आणिलें दैवत घरातें ॥ २० ॥ श्रीराम नरसिंह सूर्य हनुमंत ॥ भैरव काळिका वीरांसहित ॥ पाचारितां मीही तेथ ॥ आलों होतों महाराजा ॥ २१ ॥ तस्मात् पूर्वींची होय ओळखी ॥ म्हणवून गोरक्ष घेतला अंकीं ॥ परी आतां असो शेखीं ॥ एक वचन ऐकिजे ॥ २२ ॥ यातें विद्येतें अभ्यासिलें ॥ परी तपावीण विगलित ठेलें ॥ जैसे शत्रु जगत्रयीं झाले ॥ मग तें हीनत्व प्रतापा ॥ २३ ॥ कीं जीवनावीण वृक्ष जैसा ॥ काळरूप भासे तैसा ॥ कीं तरुवीण ग्राम

१ चंद्राची कोर. २ लक्ष्मीच्या पते. ३ शंकरा. ४ मस्तकीं. ५ सर्पाचें वेष्टन. ६ हातांत. ७ चरितार्थ. ८ मोठेपणा. ९ पाण्यावांचून.

जैसा ॥ बुभुक्षित लागतसे ॥ २४ ॥ कीं नाकेंवीण सुंदर नारी ॥ कीं विना तोय सरितापात्रीं ॥ कीं नक्षत्रावीण शोभा रात्रीं ॥ कदाकाळीं दिसेना ॥ २५ ॥ तरी तपावीण लखलखीत ॥ विद्याभांडार न दिसत ॥ जैसा मानव परम क्षुधित ॥ विकळ शरीरीं मिरवतसे ॥ २६ ॥ तरी आतां माझिया आश्रमीं ॥ तपा बैसवीं योगद्रुमी ॥ मग तपबळानें बलाब्धगामी ॥ विद्याअस्त्रें मिरवेल हा ॥ २७ ॥ याउपरी मच्छिंद्रनाथ बोलत ॥ वय धाकुटें बाळ अत्यंत ॥ तरी तप तीव्रक्लेशांत ॥ साहिलें जाईल कैसें जी ॥ २८ ॥ येरू म्हणे वरदपाणी ॥ तुझ्या आहे मौळिस्थानीं ॥ तरी तपक्लेशावर कडसणी ॥ दुःख देणार नाहीं बा ॥ २९ ॥ यापरी येथें नित्य-नित्य ॥ मी समाचारीन गोरक्षातें ॥ तूं निःसंशय सकलातें ॥ तपा गोरक्षा बैसवीं ॥ ३० ॥ ऐसें वदतां आदिनाथ ॥ अवश्य मच्छिंद्रनंदन म्हणत ॥ उत्तम आहे ऐसें बोलत ॥ अंगिकारिता पैं झाला ॥ ३१ ॥ तेथें आमुचें काय हरलें ॥ कीं जन्मांधा चक्षू आले ॥ कीं सदैव हरिणीतें सांभाळिलें ॥ एकटपणीं पाउसांत ॥ ३२ ॥ तेवीं तूं आणि तुझा दास ॥ येथें आश्रमीं करितां वास ॥ तेथें वाईट काय आम्हांस ॥ चिंता माझी निरसेल ॥ ३३ ॥ ऐसी शिवातें बोलून वाणी ॥ परी हर्ष न माये मच्छिंद्रमनीं ॥ जें योजिलें होतें अंतःकरणीं ॥ तेंचि घडूनि पैं आलें ॥ ३४ ॥ फारचि उत्तमोत्तम झालें ॥ गोरक्षासी शिवें अंगिकारिलें ॥ आतां जाईल संगोपिलें ॥ अर्थाअर्थीं बहुवसें ॥ ३५ ॥ मग उत्तम वेळा उत्तम दिवस ॥ ग्रहबळ जाणून नक्षत्रास ॥ उत्तम तिथि उत्तम मास ॥ पाहूनी तपा बैसविला ॥ ३६ ॥ लोहांचा[1] करूनी कंटक[2] नीट ॥ त्या अग्रीं योजून चरणांगुष्ठ ॥ वामपादा[3] देऊनि कष्ट ॥ उभा राहिला गोरक्ष तो ॥ ३७ ॥ वायुआहारीं ठेवून मन ॥ क्षणिक अन्न त्यजून ॥ उपरी फळपत्रीं आहार करून ॥ क्षुधाहरण करीतसे ॥ ३८ ॥ सूर्यमंडळीं ठेवून दृष्टी ॥ तप करीतसे तपोजेठी ॥ तें मच्छिंद्र पाहूनि निजदृष्टीं ॥ परम चित्तीं तोषला ॥ ३९ ॥ मग आदिनाथा विनवोनी ॥ मच्छिंद्र निघाला तीर्थाटनीं ॥ द्वादश वर्षांचा नेम करूनी ॥ गोरक्षातें सांगितलें ॥ ४० ॥ असो मच्छिंद्र गेला तीर्थाटनीं ॥ येरीकडे बद्रिकाश्रमीं ॥ रात्रंदिवस बद्रिकाशूळपाणी ॥ जवळी जाऊनि बैसला ॥ ४१ ॥ स्वयें आपण आदिनाथ ॥ गोरक्षाचें दास्य करीत ॥ मागें पुढें राहून अत्यंत ॥ आल्या विघ्ना निर्वटीतसे[4] ॥ ४२ ॥ असो यावरी मच्छिंद्र-नाथ ॥ गया प्रयाग करूनि त्वरित ॥ काशी अवंतिका मिथुळासहित ॥ मथुरा कास्मिरी पाहिलीं ॥ ४३ ॥ अयोध्या द्वारका महाकाळेश्वर ॥ सोमनाथ करूनि तत्पर ॥ ब्रह्मगिरी त्र्यंबकेश्वर ॥ घृष्णेश्वर पाहिला ॥ ४४ ॥ भीमाउगमीं भीमाशंकर ॥ आंवढ्या नागनाथादि पंढरपुर ॥ करून चौदा पीठें थोर ॥ भगवतीचीं पाहिलीं ॥ ४५ ॥ कार्तिक शेषादि मल्लिकार्जुन ॥ सरितासरोवरीं अपार स्नान ॥ घडलें करितां महीतें गमन ॥ लोटलीं वर्षें द्वादशादि ॥ ४६ ॥ सकळ तीर्थें महींचीं करून ॥ शेवटीं सेतुबंधीं

१ लोखंडाचा. २ कांटा. ३ डाव्या पायाला. ४ नाहींसें करी.

जाऊन ॥ रामेश्वराचे चरण वंदून ॥ स्नाना गेला अब्धीसी ॥ ४७ ॥ तों श्वेतबंधीं वायुसुत ॥ जाऊनि नमी मच्छिंद्रनाथ ॥ परी मच्छिंद्र पाहतां मकरध्वजतात ॥ आल्हादला चित्तीं बहुत तो ॥ ४८ ॥ परमप्रीतीं लवडसवडी ॥ मच्छिंद्रहस्त धरून ओढी ॥ हृदयीं आलिंगून परम आवडीं ॥ निकट बैसवी महाराजा ॥ ४९ ॥ म्हणे बा तूं योगद्रुमानें ॥ कोणीकडे केलें येणें ॥ चोवीस वर्षीं तुझें दर्शन ॥ आजि झालें महाराजा ॥ ५० ॥ कीं आळशावर गंगा वळली ॥ कीं द्वादश वर्षें पर्वणी आली ॥ तैसी मातें गोष्ट जाहली ॥ आज दर्शनें तुझ्या बा ॥ ५१ ॥ ऐसें बोलून वायुसुत ॥ परम मच्छिंद्राचें आतिथ्य करीत ॥ मग समय पाहून संतोषयुक्त ॥ मच्छिंद्रातें बोलतसे ॥ ५२ ॥ आज चोवीस संवत्सर झाले ॥ परी तुजकडे माझे चक्षु लागले ॥ कैं भेटसील म्हणोन भुकेले ॥ पारणें फिटलें आजि तें ॥ ५३ ॥ हे महाराज योगद्रुमा ॥ कामनीं काम जो वेधला आम्हां ॥ तो सरिताप्रवाहीं हस्त्वर उगमा ॥ बुडवितो मजलागीं ॥ ५४ ॥ तरी त्या कामनाजळांत ॥ तूं तारक झाला आहेस मातें ॥ झालास परी अद्यापपर्यंत ॥ बाहेर न काढिसी महाराजा ॥ ५५ ॥ पूर्वीं मजला देऊनि वचन ॥ तुवां केलें आहे गमन ॥ परी स्त्रीराज्याचें स्थान ॥ पाहिलें तुवां नाहीं कीं ॥ ५६ ॥ आतां तरी धरून चित्तीं ॥ प्रसन्न करीं कृपाभगवती ॥ मैनाकिनीची कामरती ॥ पूर्ण आहुती घेई कां ॥ ५७ ॥ आपुले वचनेंकरून त्याचें ॥ आणीक फल दे मम वचनाचें ॥ मग पावून आर्त मनींचें ॥ सुटका केव्हां होईल ॥ ५८ ॥ मी गुंतलों तिचे वचनीं ॥ कीं मच्छिंद्र पाठवीन ये भुवनीं ॥ तरी ते रतिसुखाच्या कामाश्रमीं ॥ मच्छिंद्रनाथा मिरविजे ॥ ५९ ॥ ऐसें वचन तीतें व्यक्त ॥ आहे तरी मज करीं मुक्त ॥ आणि तुवांही वचन दिधलें मातें ॥ तेंही सत्य करीं आतां ॥ ६० ॥ ऐसी ऐकून हनुमंतवाणी ॥ अवश्य म्हणे मच्छिंद्रमुनी ॥ मग त्रिरात्र तेथें वस्ती करूनी ॥ निघते झाले उभयतां ॥ ६१ ॥ मार्गीं जातां अनेक तीर्थें ॥ यथाविधि झाले सारिते ॥ मग गौडबंगाला टाकून त्वरितें ॥ स्त्रीराज्यांत संचरले ॥ ६२ ॥ तंव ती सकळ स्त्रियांची स्वामिनी ॥ विराजलीसे राज्यासनीं ॥ महापुण्यांशें तपोखाणी ॥ मैनाकिनी ज्ञानकळा ॥ ६३ ॥ शृंगारमुरड उत्तमजन ॥ तेथें भोगीतसे राज्यासन ॥ गज वाजी उदधी रत्न ॥ रथ उष्ट्रादि असती ॥ ६४ ॥ छडीदार चोपदार ॥ रत्नपारख हेमकार ॥ राउत पूर्ण भांडार ॥ पोतदार फरासी ॥ ६५ ॥ यंत्रधारी मंत्रधारी ॥ नानामंत्री असती कुसरी ॥ शास्त्रनिपुण कारभारी ॥ लेखकही सेवा विराजले ॥ ६६ ॥ जासुद हलकारे वकीलात ॥ करूं जाणती सकळ समंतात ॥ पायदळ अश्वराउत ॥ नसे गणित पृतनेतें ॥ ६७ ॥ कुत्तेवान चित्तेवान ॥ साकरखाणी पहिलदान ॥ दिवाणादि कपिलखान ॥ गजमस्तकीं रूढती ॥ ६८ ॥ खिस्मतगारी कर्णार ॥ सिकारकी बंडीदार ॥ ताशा मरफी पनवाळ थोर ॥ कुशळपणीं वाजविती ॥ ६९ ॥ गायक हेर बातमीदार ॥ खेळक

१ समुद्राला. २ मारुति. ३ इच्छा. ४ घोडे. ५ उंटें वगैरे. ६ सैन्याला.

प्राज्ञी निपुणतर ॥ वाद्यधारी शृंगारकर ॥ शिंपी कुल्लाळ विराजले ॥ ७० ॥ असो ऐसीं राजकारणें ॥ बहुत असती कामें भिन्नें ॥ परी सकळ समुदायकानें ॥ स्त्रिया अवघ्या मिरवल्या ॥ ७१ ॥ असो अवघ्या कटकांत ॥ संचरते झाले उभयतां नगरांत ॥ राजद्वारीं जाऊन त्वरित ॥ झाले दृष्टीस रायासी ॥ ७२ ॥ दृष्टीं पाहतांच अंजनीसुत ॥ स्त्रियांसी आनंद झाला बहुत ॥ बोलावून त्वरितात्वरित ॥ कनकासनीं बैसविलें ॥ ७३ ॥ एकासनीं मच्छिंद्रनाथ ॥ एकासनीं अंजनीसुत ॥ षोडशोपचारीं पुजूनि त्वरित ॥ बद्धांजली केली तैं ॥ ७४ ॥ म्हणे महाराजा दिव्यरथा ॥ वातनंदना अंजनीसुता ॥ द्वितीय कोण सांग आतां ॥ आगमन झालें महाराजा ॥ ७५ ॥ येरू म्हणे वो शुभाननी ॥ त्वां बैसुनी तपा प्राज्ञी ॥ तरी त्या तपाच्या कामना मनीं ॥ पूर्ण करीं आतां वो ॥ ७६ ॥ मम भक्तीचे वरदावळीं ॥ कीं पुरुष लाधशील मच्छिंद्र बळी ॥ तरी तोचि हा होय येणें काळीं ॥ रतिसुखा निववावें ॥ ७७ ॥ कीं सेवेलागीं उडुगणनाथ ॥ कीं अरुणसहा पूर्ण आदित्य ॥ तेवीं तूतें मच्छिंद्रनाथ ॥ काम व्यक्त पुरवावया ॥ ७८ ॥ कीं शचीलागीं सहस्रनयनी ॥ कीं शोभली जैशी शिवीं अपर्णी ॥ तेवीं तूतें मच्छिंद्रमुनी ॥ रतिसुखा हेलावे ॥ ७९ ॥ ऐसें बोलून वज्रशरीरी ॥ निवांत बैसला आसनावरी ॥ मग राहून तेथें तीन रात्री ॥ निघता झाला कपिराज ॥ ८० ॥ पुन्हां श्वेतपदा येऊन ॥ करीत बैसला श्रीरामचिंतन ॥ येरीकडे मच्छिंद्रनंदन ॥ सुखामाजी हेलावे ॥ ८१ ॥ बैसूनियां कनकासनीं ॥ राज्यविलासा भोगी मुनी ॥ मुक्तमाळा ग्रीवेलागुनी ॥ हेलावती समोर ॥ ८२ ॥ हेममुद्रिका ओपून कर्णीं ॥ हस्त विराजले कनककोंदणीं ॥ भरजरी भूषणें हेमकर्णीं ॥ ढाळ देती लखलखीत ॥ ८३ ॥ पुढें सेवे परिचारिका ॥ परी त्याही दारा लावण्यलतिका ॥ उर्वशीच्या सारून आवांका ॥ सेवेलागीं उतरल्या ॥ ८४ ॥ बडीजाई बडीदार ॥ वारंवार करिती पुकार ॥ छडीदार चोपदार ॥ दवलतजादा म्हणताती ॥ ८५ ॥ मुक्तलवंगांचे तुरे माळी ॥ कस्तूरी केशर शोभे भाळीं ॥ राज्यासनीं स्त्रियामंडळी ॥ सुशोभित भंवतालीं ॥ ८६ ॥ जैसा नभांत तारांगणीं ॥ वेष्टित शोभला उडुगणस्वामी ॥ तेवीं स्त्रियांत मच्छिंद्रमुनी ॥ निजभारीं शोभला ॥ ८७ ॥ कीं देवगणी शचीनाथ ॥ परम शोभिवंत घवघवीत ॥ तेवीं स्त्रीमंडळींत ॥ मच्छिंद्रनाथ मिरवला ॥ ८८ ॥ सदा बैसून एका आसनीं ॥ खेळ खेळती द्यूतकर्मीं ॥ नाना विनोदून विनोदवाणी ॥ हास्य करिती गदगदां ॥ ८९ ॥ राज्यवैभवादि कारभार ॥ स्वयें करिती सारासार ॥ नाना कुशलता अपार ॥ निजदृष्टीं पाहतसे ॥ ९० ॥ रसायनीं कविताकार ॥ वेदज्ञ बोलती शास्त्र अपार ॥ ज्योतिष भविष्य जाणणार ॥ व्याकरणादिक मिरवले ॥ ९१ ॥ धनुर्धर युद्धशास्त्रीं प्रबळ ॥ कीं भिन्न पाहती प्रळयकाळ ॥ जळ तें निर्मील विशाळ ॥ उभे असती सन्मुख ॥ ९२ ॥ संगीतकार गायनप्रकारी ॥ गंधर्वसरी तानमानी कळाकुसरी ॥ औषधीक वैद्य रोगापरी ॥ परीक्षिकी मीनले ते ॥ ९३ ॥ अश्वा-

१ सैन्यांत. २ मारुति. ३ सूर्य. ४ रामेश्वरीं सेतूपाशीं. ५ मोत्यांचे हार. ६ गळ्यामध्यें. ७ शोभा. ८ स्त्रिया. ९ चंद्र. १० इंद्र.

रोहण उत्तमयुक्तीं ॥ अश्व फिरवणें वाताकृती ॥ कोकशास्त्र भाष्याकृती ॥ स्वर्गाचाराचे सकळिक ॥ ९४ ॥ नाटककळा सकळी शृंगारीत ॥ आणून टेंकती राजसंमत ॥ प्रसंगानुसार वाचे वदत ॥ बोलूं जाणती चातुरी ॥ ९५ ॥ ऐसिया गुणांचे उत्तम भरत ॥ हेलावती राजसभेंत ॥ तेणें चित्तसरितेंत ॥ आनंदतोय हेलावे ॥ ९६ ॥ तेणेंकरून मच्छिंद्रनाथ ॥ सुखाब्धीचा मीन तळपत ॥ ऐसे लोटले दिवस बहुत ॥ रतिसुखामाझारीं ॥ ९७ ॥ तों समयें चित्तसुखमेळीं ॥ ऋतु पावली राजबाळी ॥ ते कामरतीचे सुखवेळीं ॥ गरोदर झाली ते दारा[२] ॥९८॥ तो गणामाजी भद्रजाती ॥ सर्वगुणीं मुनी भद्रमूर्ती ॥ अंशरूपें प्रगटून रती ॥ देह धरिता पैं झाला ॥ ९९ ॥ रेतरक्त जेणें काळीं ॥ लोटत मासां[३] नवांचे मेळीं ॥ तदनंतर प्रसूत झालिया बाळी ॥ बाळ बाळार्क देखिला ॥ १०० ॥ त्यातें भरतां द्वादश दिवस ॥ उत्तमापरी केलें बारसें ॥ नाम ठेविलें त्या देहास ॥ मीननाथ म्हणवूनी ॥ १ ॥ याउपरी याचकां देऊनि दान ॥ उचितार्थें सकळ तोषविले जन ॥ नानारत्नीं देऊनि भूषण ॥ गौरवातें मिरविलें ॥२॥ असो ऐसे संगोपनीं ॥ तीन संवत्सर तया स्थानीं ॥ लोटून गेलीं सुखासनीं ॥ मच्छिंद्रातें भोगितां ॥ ३ ॥ यावरी आतां दुसरें कथन ॥ हस्तनापुरीं कुरुनंदन ॥ जन्मेजयाच्या वंशाकारण ॥ बृहद्रवा जन्मला ॥४॥ तो जन्मेजयापासून पुढती ॥ सातवा पुरुष वंशाप्रती ॥ दोन सहस्र सातशतीं ॥ कली गेलासे लोटून ॥ ५ ॥ तो बृहद्रवा राजा थोर ॥ राज्यपदीं हस्तनापुर ॥ मेळवून महीचे अपार विप्र[४] ॥सोमयाग मांडिला ॥ ६ ॥ एक वरुषें त्या क्षितीं[५] ॥ अग्निकुंडीं पूर्णाहुती ॥ पुष्ट होउनी दाहकमूर्ती ॥ तुष्ट शरीरीं मिरवला ॥ ७ ॥ परी शिवनेत्रींचा प्रळयाग्नी ॥ तेणें दाहिले होते पंचबाणी ॥ परी तो गेला होता भक्षुनी ॥ द्विमूर्धनी[६] महाराज ॥ ८ ॥ तो शिवशरीरीं चेतला मदन ॥ जठरीं वाहत होता द्विमूर्धन[६] ॥ तयामाजी जीवित्वप्राण ॥ अंतरिक्ष संचरला ॥ ९ ॥ तो अंतरिक्ष महाराज ॥ अग्निजठरामाजी विराजे ॥ तो गर्भ अति तेजःपुंज ॥ यज्ञकुंडीं सांडिला ॥ ११० ॥ पूर्ण होतांच यज्ञआहुती ॥ शेष प्रसाद मिरवून निगुती ॥ मग यज्ञकुंडीं विप्राहुती ॥ रक्षा काढी बृहद्रवा ॥ ११ ॥ विप्राहातें सलील बाळतेजातें ॥ रक्षा स्पर्शतां लागे हातें ॥ दृष्टीं पाहतां बाळातें ॥ मंजुळवत् रुदन करी ॥ १२ ॥ तंव तो पुरोहित ज्ञानी द्विज ॥ रायास म्हणे महाराज ॥ यज्ञकुंडीं तेजःपुंज ॥ बाळ प्रसाद मिरवलें ॥ १३ ॥ प्रत्योदक उचलोनि हातीं ॥ बाळ दावी रायाप्रती ॥ राव पाहोनि तेजस्थिती ॥ परम चित्तीं तोषला ॥ १४ ॥ जैसा जलार्णव मंथन करितां ॥ त्यांत चतुर्दशरत्नें निघतां ॥ मग आनंद न माये सुरवरचित्ता ॥ तैसें झालें बृहद्रव्या ॥ १५ ॥ कीं संजीवनीचा धरूनि अर्थ ॥ कच गेला शुक्रगृहातें ॥ साधुनी येतां संजीवनीतें ॥ शचीनाथ[८] आनंदला ॥ १६ ॥ कीं राम उपजतां कौसल्येकुशीं ॥ आनंद झाला दशरथासी ॥ तेवीं पाहतां बाळमुखासी ॥ बृहद्रवा आनंदला ॥ १७ ॥ मग पुरोहित विप्रापासून ॥ निज-

१ मासा. २ स्त्री. ३ नऊ महिने भरतांच. ४ ब्राह्मण. ५ पृथ्वीवर. ६ अग्नि. ७ हेतु. ८ इंद्र.

करीं कवळी अग्निनंदन ॥ परम स्नेहें हृदयीं धरून ॥ घेत चुंबन बाळाचें ॥ १८ ॥ परम उदेला आनंद पोटीं ॥ कीं चंद्रोदयींची
ऐक्यभेटी ॥ मग समुद्रपात्रा तोयदाटी ॥ प्रेमलहरी उचंबळे ॥ १९ ॥ वारंवार घेत चुंबन ॥ कीं त्यातें भासे प्रत्यक्ष मदन ॥ परी
तो मदनचि व्यक्त पूर्ण ॥ शिवकायेचा प्रगटला ॥ १२० ॥ कीं सत्वगुणी विद्युलता ॥ पाळा मांडिला शरीरावरुता ॥ कीं पुनर्विंदु
प्रसन्न होतां ॥ तेज आपुलें अर्पिलें ॥ २१ ॥ कीं संघात अपार किरणीं ॥ महीं मिरवला हा उत्तम तरणी[1] ॥ असो ऐसा अपार चिन्हीं ॥
वर्णितां ग्रंथ वाढेल ॥ २२ ॥ असो बृहद्रवा लवडसवडीं ॥ अंतःपुरांत जात तांतडी ॥ धर्मपत्नी संसारसांगडी ॥ निजदृष्टीं विलोकी
॥ २३ ॥ नाम तिचें सुलोचना ॥ परी ती प्रत्यक्ष सुलोचना ॥ शुभानना ती देवांगना ॥ महीलागीं उतरली ॥ २४ ॥ कीं प्रत्यक्ष
रमा सरस्वती ॥ कीं दिव्य अपर्णेची[2] मूर्ती ॥ उदया आली मायभगवती ॥ कुरुकुळातें तारावया ॥ २५ ॥ जिचे पाहतां चरण ॥
गंगोदक दिसे मळिण ॥ शंतनूसारखें टाकूनि रत्न ॥ शिवमौळीं विराजली ॥ २६ ॥ तस्मात् गंगासमान हातीं ॥ देतां अपूर्व लागे
गोष्टी ॥ असो तिनें बाळक देखतां दृष्टी ॥ पुसे रायातें आवडीनें ॥ २७ ॥ म्हणे महाराजा विजयध्वजा ॥ करीं कवळिलें कवण
आत्मजा[3] ॥ मातें भासे मित्रवोजा ॥ दुसरा तरणी आहे हा ॥ २८ ॥ येरू म्हणे वो शुभाननी ॥ यज्ञकुंडीं द्विमूर्धनी ॥ प्रसादरूपें
दिधलें तेणें ॥ राजस्तंभीं मिरवावया ॥ २९ ॥ तव उदरीं जो मीनकेत ॥ मनानें वरीं आपुला सुत ॥ तयावरील सकळ हेत ॥ या
बाळातें मिरवावा ॥ १३० ॥ तरी वंशासी मीनकेत ॥ दिव्यस्वरूपा आहे सुत ॥ तयाचा पाठिराखा निश्चित ॥ ईश्वरें हा प्रेरिला
॥ ३१ ॥ अगे हा अयोनिसंभव जाण ॥ अवतारदक्ष चिद्रत्न ॥ [4]ज्वाळामाळी होऊन प्रसन्न ॥ प्रसाद दिधला आपणांसी ॥ ३२ ॥ ऐसें
वदतां राजभूप ॥ सुलोचना कवळी बाळकंदर्प ॥ तयाचें पाहूनि दिव्यरूप ॥ मोहदीप उजळला ॥ ३३ ॥ बाळहृदयीं कवळून धरितां ॥
पयोधरीं[5] लोटली पयसरिता ॥ बाळमुखीं स्तन घालितां ॥ पयःपान स्वीकारी ॥ ३४ ॥ मग उत्तम करी बाळरीती ॥ स्नानमार्जनादि
सारिती ॥ यापरी द्वादश दिनांप्रती ॥ परम सोहळा मांडियेला ॥ ३५ ॥ मेळवुनी सुवासिनी ॥ पाळणां घातला योगप्राज्ञी ॥ जालिं-
दर हें नाम जनीं ॥ सकळां आवडीं ठेविलें ॥ ३६ ॥ यज्ञकुंडींचा ज्वाळामाळी ॥ प्रसन्न झाला तेणें काळीं ॥ ज्वाळांत उदेला म्हणूनि
सकळीं ॥ नाम जालिंदर स्थापिलें ॥ ३७ ॥ ऐशा करूनियां गजरा ॥ ग्रामांत वांटिली गोड शर्करा ॥ अपार धन याचक नरां ॥ लौकि-
कार्थ वांटिलें ॥ ३८ ॥ ऐशिया गजरें पूर्ण राहटी ॥ झाली बहुत दिवसां लोटी ॥ मास संवत्सर पंचवटी ॥ षट् सप्तम लोटले ॥ ३९ ॥
यापरी तो बृहद्रवा राणा ॥ अपार पाळिल्या ललना[6] ॥ पुढें योजून मौंजीबंधना ॥ यज्ञोपवीत आराधी ॥ १४० ॥ याउपरी कोणे एके ॥३॥
दिवसीं ॥ राव विचार करी मानसीं ॥ गृहस्थाश्रमी जालिंदरासी ॥ लग्नविधी उरकाया ॥ ४१ ॥ म्हणवूनि आपुला पुरोहित ॥

१ सूर्य. २ पार्वतीची. ३ पुत्राला. ४ अग्नि. ५ स्तनांचे ठिकाणीं. ६ स्त्रिया.

मंत्री सर्वे देऊनि त्यातें ॥ उत्तम कुमारीशोधार्थ ॥ महीवरी प्रेरिला ॥ ४२ ॥ गुणवंत रूपवंत ॥ सुलक्षणी कुमारी पाहत ॥ मंत्री आणि पुरोहित ॥ देशावरी हिंडती ते ॥ ४३ ॥ येरीकडे जालिंदर ॥ राजांगना परम सुंदर ॥ घेऊनियां अंकावर ॥ चुंबन घेत लालसें ॥ ४४ ॥ परम स्नेहानें ऊर्ध्वदृष्टी ॥ पाहूनि बोले योगजेठी ॥ धूर्मिण मंत्री मम दृष्टीं ॥ दिसत नाहीं कां मातें ॥ ४५ ॥ येरी म्हणे पाडसा ऐकें ॥ तुज स्त्री करावया जनकें ॥ पुरोहित आणि मंत्री देखें ॥ पाठविले आहेत बा ॥ ४६ ॥ येरी म्हणे स्त्री काये ॥ माता म्हणे बायकोस म्हणावें ॥ म्हणे मज दावावें ॥ बायका कैशा जननीये ॥ ४७ ॥ येरी म्हणे मजसमान ॥ बायको येईल तुजकारण ॥ जैसी मी वा त्याचसमान ॥ तुज बायको येईल कीं ॥ ४८ ॥ ऐसी सुलोचना त्यातें वदतां ॥ तो शब्द रक्षुनी आपुल्या चित्ता ॥ बाळांत येउनी खेळतां खेळतां ॥ बाळांलागीं पुसतसे ॥ ४९ ॥ म्हणे गडे हो ऐका एकु ॥ मम तात माता करिती बायकु ॥ तीस कासयासाठीं अर्थकौतुकु ॥ करितां बायकु ते सांगा ॥ १५० ॥ तंव ते बोलती [१]विचक्षण ॥ बहु शठपणीं बोलती हांसून ॥ जालिंदर बुद्धिहीन ॥ बायकोही कळेना ॥ ५१ ॥ मग ते म्हणती मूर्खा ऐक ॥ बायकु म्हणतां संसार [२]निक ॥ विषयसुखाचें पूर्ण भातुक ॥ जगामाजी मिरवतसे ॥ ५२ ॥ हस्तसंकेतें दावूनि शिश्न ॥ म्हणती याचें समाधान ॥ इतुकें त्यांचें ऐकून वचन ॥ मनीं विचार करीतसे ॥ ५३ ॥ अगा जग हें परम अधम ॥ आचरण आचरती परम दुर्गम ॥ जें कां जगाचें उत्पत्तिस्थान ॥ तेच रमणी रमतात ॥ ५४ ॥ तरी आपण करूं नये ऐसें ॥ याचा मनाला सबळ त्रास ॥ ऐसें रचूनि विवेकास ॥ मुलांतून निघाला ॥ ५५ ॥ मनांत अति करी विचार ॥ मातेच्या शब्दासी पर ॥ तरी ते तें करूनि वेव्हार ॥ अधर्मराशी दिसतसे ॥ ५६ ॥ माता बोलली मजसमान ॥ कांता मिरवतसे चिद्रत्न ॥ तरी ती कांता मज मातेसमान ॥ वेव्हारा योग्य वाटेना ॥ ५७ ॥ तरी ही पूर्ण अधर्मराशी ॥ कदा न वर्तूं कार्यासी ॥ मग सांडून [३]ग्रामधामदारासी ॥ [४]काननांतरीं निघाला ॥ ५८ ॥ परी ग्रामद्वारीं ग्रामरक्षक ॥ त्यांनीं जातां पाहिलें बाळक ॥ परी राजनंदन म्हणूनि धाक ॥ हटकावया अंतरले ॥ ५९ ॥ परी बुद्धीचा त्यांनीं विवेक केला ॥ हेर मागें पाठविला ॥ कोणी जाऊनी त्वरें नृपाला ॥ सांगताती तांतडीनें ॥ १६० ॥ हे महाराज भुवननाथ ॥ [४]विपिनीं गेला आपुला सुत ॥ रायें ऐसा ऐकून वृत्तांत ॥ आला धांवत तांतडीनें ॥ ६१ ॥ परी तो चपळ विलक्षण ॥ म्हणे कोणी येईल धांवोन ॥ म्हणोनी मार्गाला सोडोन ॥ महाकाननीं रिघाला ॥ ६२ ॥ तंव त्या विपिनीं तरुदाटी ॥ विशाळ जाळिया तृण अफाटी ॥ त्यांत संचरतां हेर दृष्टी ॥ चुकुर झाले पाहतां ॥ ६३ ॥ परी तो योगेंद्र चपळ बहुत ॥ जातां जातां एक पर्वत ॥ त्याची दरी धरून सुत ॥ उत्तरदिशे चालिला ॥ ६४ ॥ येरीकडे नृपनाथ ॥ काननीं निघाला शोध करीत ॥ परी शोध लागला दूतस्थानापर्यंत ॥ पुढें शोध लागेना ॥ ६५ ॥ पाहतां परी बहु विपिन ॥

१ शाहाणे. २ चांगला. ३ गांव, घर, दार. ४ वनामध्यें. ५ घाईनें.

परी जालिंदराचें न पावे दर्शन ॥ जैसा अमावास्येचा दिन ॥ चंद्रमणी लोपतसे ॥ ६६ ॥ ऐसें झालें सकळांसी ॥ निराशापणें ग्रामासी ॥ येते झाले झालिया [1]निशी ॥ शोक करितां सकळांनीं ॥ ६७ ॥ रायासह अपार जन ॥ पाहती आपुलालें [2]सदन ॥ परी बृहद्रवा आणि सुलोचना ॥ परम अट्टहास्य करिताती ॥ ६८ ॥ बाळलीला खेळ अद्भुत ॥ आठवोनि गातां रुदन करीत ॥ राव म्हणे हा अनुचित ॥ प्रसाद हातींचा पैं गेला ॥ ६९ ॥ मातें अग्नि झाला प्रसन्न ॥ अहा माझें कर्म गहन ॥ हातींचें गेलें चिद्रत्न ॥ काय करूं उपाय हो ॥ १७० ॥ अहा बाळक माझें [3]अर्कासमान ॥ तेजरूप वाटे मदन ॥ माता म्हणे खेळ उत्तम ॥ काय वर्णूं तयाचा ॥ ७१ ॥ ऐसा करितां अट्टहास ॥ परी आणीक सरदार बुद्धिलेश ॥ रायास सदा बोधी नानाभाष्य ॥ युक्तिप्रयुक्ती करोनियां ॥ ७२ ॥ म्हणती राया नरोत्तम ॥ जालिंदर अयोनिसंभवन ॥ तरी हा सेवितां महाकानन ॥ त्यासी मरण नसेचि ॥ ७३ ॥ मही समुद्र-वलयांकित ॥ शोध करूं आम्ही निश्चित ॥ परी केव्हां तरी तुमचा सुत ॥ तुम्हां भेटेल महाराजा ॥ ७४ ॥ तरी निःसंशयेंकरून ॥ धैर्यअर्गळीं ठेवा मन ॥ ऐशा युक्तीकरून ॥ रायास शांत करिताती ॥ ७५ ॥ येरीकडे जालिंदर ॥ पर्वतदरीं अतिगुहार ॥ संचरला परी महीवर ॥ काळोखी रात्र दाटली ॥ ७६ ॥ तयामाजी झालें विपरीत ॥ विपिनीं वणवा लागला बहुत ॥ पुढें तें कानन अग्नि जाळीत ॥ तयापासीं पातला ॥ ७७ ॥ तंव त्या दरींत जालिंदर ॥ निद्रें व्यापिला तृण अपार ॥ तों जवळीं आला [4]वैश्वानर ॥ तृण भक्षावयाकारणें ॥ ७८ ॥ तों बाळ गोमटें देखिलें दृष्टीं ॥ विस्मयो करी आपुले पोटीं ॥ हें बाळ मम उदरजेठीं ॥ उदय पावलें होतें कीं ॥ ७९ ॥ उत्तम ठाव पाहून यातें ॥ सांडिलें होतें म्यां गर्भातें ॥ येथें यावया कारण यातें ॥ कां पडलें न कळे हो ॥ १८० ॥ मग शांत होऊनि मूर्तिमंत ॥ बाळ त्वरें केला जागृत ॥ अंकीं घेऊनि पुसे त्यातें ॥ कारण काय येथें यावया ॥ ८१ ॥ येरू पाहून तया आदरें ॥ म्हणे कोण तुम्ही सांगा सत्वर ॥ येरू म्हणे मी वैश्वानर ॥ जननीजनक तुझा मी ॥ ८२ ॥ येरू म्हणे जननीजनक ॥ कैसे होतील हरएक ॥ मग तो मुळींहून कथा पावक ॥ तयालागीं सांगतसे ॥ ८३ ॥ असो आतां वैश्वानर ॥ पुढें पुढती लिहितां पर ॥ ती कथा पुढें धुंडिकुमर ॥ मालू नरहरीचा सांगे कीं ॥ ८४ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ एकादशाध्याय गोड हा ॥ १८५ ॥ ॥ छ ॥ अध्याय ॥ ११ ॥ ॥ ओंव्या ॥ १८५ ॥ ॥ छ ॥

१ रात्र. २ घर. ३ सूर्याप्रमाणें तेजस्वी. ४ अग्नि.



॥ नवनाथभक्तिसार एकादशाध्याय समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी भगवंता ॥ पाळक नरहरीच्या सुता ॥ नरहरिरूपा [1]कंदर्पताता ॥ अवतार अनंत मिरविशी ॥ १ ॥ तरी आतां पुढें ग्रंथ ॥ बोलवीं बरवे रसभरित ॥ मागिले अध्यायीं मच्छिंद्रनाथ ॥ स्त्रीराज्यांत पैं गेला ॥ २ ॥ उपरी जालिंदराचा जन्म ॥ यज्ञकुंडीं उत्तमोत्तम ॥ उपरी पश्चात्तापेंकरून ॥ पर्वतदरींत रिघाला ॥ ३ ॥ तेथें प्रगटून [2]ज्वाळामाळी ॥ तो परम स्नेहाचे नव्हाळीं ॥ अंकीं घेउनी त्या काळीं ॥ जन्मकथा सांगीतली ॥ ४ ॥ आहे इतुकी कथा श्रोतीं ॥ पूर्वअध्यायीं संपली होती ॥ आतां पुढें अवधानाप्रती ॥ श्रवणार्थी मिरवावें ॥ ५ ॥ असो महाराज द्विमूर्धनी ॥ सकळ जन्माची कथा सांगोनी ॥ उपरी बोले कामना मनीं ॥ कोणती बाळा ती सांग ॥ ६ ॥ येरी म्हणे जी महाराज ॥ कामनाविरहित मन माझें ॥ आहे परी हितार्थ गुज ॥ सकळ जाणसी तूं ताता ॥ ७ ॥ या नरदेहाची झाली प्राप्ती ॥ तरी सार्थक ओपीं माझे हातीं ॥ नाहीं तरी आले तैसे जाती ॥ ऐसें न करीं महाराजा ॥ ८ ॥ जैसा उदककुंभ साचार येथें ॥ तो मळ उसके जेथें तेथें ॥ परी तयाचा विस्तार महीतें ॥ कांहींएक मिरवेना ॥ ९ ॥ तरी व्यर्थ जन्मूनि मरण ॥ कीं [3]लोहकाराचे भाते भरून ॥ कीं [4]भाडाईत ग्रंथिक रचून ॥ व्यर्थ शीण वृषभातें ॥ १० ॥ तरी आतां ऐक ताता ॥ मिरवेल अशा पूर्ण वार्ता ॥ तिहीं भुवनांमाजी सत्ता ॥ चिरंजीवित्व संपादीं ॥ ११ ॥ लोक म्हणती जालिंदर झाला ॥ परी मेला नाहीं ऐकिला ॥ ऐसें न करूनियां देहाला ॥ जगीं मिरवीं हे ताता ॥ १२ ॥ ऐसें ऐकूनियां [2]ज्वलन ॥ मौळी तुकावोनी डोलवी मान ॥ म्हणे बाळाचें धन्य ज्ञान ॥ वयासमान नसे कीं ॥ १३ ॥ मग त्वरें तो द्विमूर्धनी ॥ जालिंदरास स्कंधीं वाहोनी ॥ [5]अनसूयानंदनस्थानीं ॥ त्वरें जाऊन पोहोंचला ॥ १४ ॥ तंव त्या महाराज अत्रिनंदनास ॥ अग्नीस पाहोनी झाला हर्ष ॥ मग पुढें होऊन हव्यवाहनास ॥ आलिंगिलें सुप्रेमें ॥ १५ ॥ म्हणे महाराजा मम दैवता ॥ तेजःपुंज जेवीं सविता ॥ कवण कामना वेधुनी चित्ता ॥ येथें आलासी महाराजा ॥ १६ ॥ मज आळशियावरी ओघ ॥ ओघिला गंगोदकीं चांग ॥ कीं क्षुधिता धेनू लागुनी माग ॥ पयःपान करवीतसे ॥ १७ ॥ कीं तमाचें होतां वेष्टण ॥ अर्क दिवटा आला होऊन ॥ कीं मृत्युसमयीं [6]पीयूषपान ॥ पीयूषच करवी आग्रहें ॥ १८ ॥ तेवीं येथें झाली परी ॥ गंगा [7]ओघिली आळशावरी ॥ मग बैसून निकट शेजारीं ॥ वर्तमान पुसतसे ॥ १९ ॥ परी महाराजा द्विमूर्धन ॥ हा कोणाचा आहे नंदन ॥ येरी म्हणे पंचबाण ॥ शिवदेहींचा हा असे ॥ २० ॥ कीं शिवदेहींचा काम श्रेष्ठ ॥ म्यां दाहिला हें बोलती स्पष्ट ॥ परी जठरीं रक्षिला होता वरिष्ठ ॥ आजपर्यंत महाराजा ॥ २१ ॥ मग बृहद्रव्याच्या यज्ञकुंडांत ॥ प्रगट केलें या देहातें ॥ तस्मात् महाराज तुमचा सुत ॥ तूंच आतां संगोपीं ॥ २२ ॥ तरी यातें अनुग्रह देउनी ॥ जगीं मिरवीं सनाथपणीं ॥ हा चिरंजीव असो शिवकामनीं ॥ मृत्यु कदा न पावो ॥ २३ ॥ प्रमथ

१ मदनाच्या बापा. २ अग्नि. ३ लोहाराचे. ४ भाडोत्री. ५ दत्तात्रेयाचे जागीं. ६ अमृतपान. ७ धांवून आली.

देशकर रेत वहिला ॥ मम जठरीं त्यावर जन्मला ॥ तस्मात् श्रेष्ठ उभयपक्षांला ॥ चिरंजीव असो हा ॥२४॥ जैसा लाभल्या रस पीयूष ॥ उपरी संजीवनी साह्य त्यास ॥ मग तो निर्भय यमसदनास ॥ यमापाशीं मिरवेल ॥ २५ ॥ कीं घृतशर्करेची पडतां मिठी ॥ नको कोण म्हणेल या कडवटीं ॥ कां चंद्रअर्कांची झाली भेटी ॥ उजेड कांहीं दिसेना ॥ २६ ॥ तेवीं शिवकाम माझें जठर ॥ ऐक्य झालिया श्रेष्ठाकार ॥ त्यांत नारायण नव साचार ॥ अंतरिक्ष संचरला ॥ २७ ॥ याही उपरांतिक ऐका परी ॥ मौंजी विराजल्या स्वामी-करीं ॥ मग तें माहात्म्य कवणापरी ॥ जगामाजी काय वर्णावें ॥२८॥ आधीं सुवर्ण सोवळा दामी ॥ त्यावरी सुगलें हेमकर्णी ॥ जडित नवरत्न सुढाळ कोंदणीं ॥ तें कोण लेऊं म्हणेना ॥ २९ ॥ कीं आधींच सुगंध मलयागर ॥ मृगमद झाला असे त्यावर ॥ त्यावरी श्रृंगारुनी सुंदर ॥ कोणी उटी घेईना ॥ ३० ॥ तस्मात् ऐशा झाल्या गोष्टी ॥ वरदकरीं तव गा तपोजेठी ॥ मग जालिंदर महीपाठीं ॥ कीर्तिसूर्यें मिरवेल ॥ ३१ ॥ परी ते पावकी रसाळ वचन ॥ वर्षते झाले अमृतघन ॥ तेणें दत्तचातकमन ॥ तुष्ट झालें शरीरीं ॥ ३२ ॥ मग म्हणे जी महाराजा ॥ पुरवीन आतांचि काम तुझा ॥ परी द्वादश वर्षे विजयध्वजा ॥ मजपाशीं ठेवीं हा ॥ ३३ ॥ अवश्य म्हणूनि ज्वाळमौळी ॥ म्हणे रक्षणें आपणाजवळी ॥ परी मजदेखतां हस्त मौळीं ॥ वरदकरणी मिरवावा ॥ ३४ ॥ मग तो सुपात्र अत्रिनंदन ॥ अंकीं घेत जालिंदररत्न ॥ सकळ कळांतें सांगून ॥ विकल्पातें नुरवीतसे ॥ ३५ ॥ पहा हो कृपेची सदट नँव्हाळी ॥ वरदहस्त स्पर्शितां मौळीं ॥ कर्णीं ओपितां मंत्रावळी ॥ अज्ञानकाजळी फिटलीसे ॥ ३६ ॥ परी मंत्राक्षर अंबुदाकार ॥ पूर्ण संचरतां कर्णपात्र ॥ मग ती मही पिके विचित्र ॥ ब्रह्मपणें मिरवली ॥ ३७ ॥ मग तातचि तात अनुपम ॥ चराचरादि स्थावरजंगम ॥ एके रूपीं सनातन ॥ ब्रह्मप्राप्ती मिरवली ॥ ३८ ॥ ऐसा झालिया स्वतंत्र विचार ॥ मग करूनी दत्तासी नमस्कार ॥ महाराज तो वैश्वानर ॥ अदृश्यपणें मिरवला ॥ ३९ ॥ मग दत्तात्रेय आणि जालिंदर ॥ विराजले पर्वतगिरिदर ॥ मग प्रेमें अभ्यासीं चमत्कार ॥ दृश्यादृश्य कळतील ॥ ४० ॥ मग सवें घेऊन जालिंदरासी ॥ नित्य गमन करी महीसी ॥ स्नान करूनी भागीर-थीसी ॥ विश्वेश्वरासी नमिताती ॥ ४१ ॥ तेथून भोजन पांचाळेश्वरीं ॥ भिक्षा मागावी कोल्हापुरीं ॥ निद्रा जयाची मातापुरीं ॥ माहूरगड म्हणविताती ॥ ४२ ॥ असो ऐसे द्वादश वरुषांत ॥ नाना अस्त्रांसही घेत ॥ प्रवीण करी बाळा समर्थ ॥ विद्याभांडार भरूनियां ॥ ४३ ॥ जालिंदराचें दास्य पाहून ॥ घडिघडी आल्हाद पावे मन ॥ सकळ विद्येचें रत्न ॥ तयालागीं भूषणातें ॥ ४४ ॥ वातास्त्रादि जलदास्त्र ॥ अग्न्यस्त्र धूम्रास्त्र ॥ वाताकर्षण कामास्त्र ॥ पर्वतास्त्र निवेदिलें ॥ ४५ ॥ वज्रास्त्र आणि वासव-शक्ती ॥ नागास्त्र प्राणाहुती ॥ खगेंद्रास्त्र प्रतापशक्ती ॥ मोहनास्त्र सांगीतलें ॥ ४६ ॥ निर्वाणास्त्रादि संजीवनी ॥ रुद्रास्त्र आणि

१ शिववीर्य. २ अमृत. ३ उंची. ४ चांगल्या सोनारानें. ५ कस्तूरी. ६ अग्नि. ७ अपूर्वता. ८ पर्जन्याप्रमाणें.

प्रळयाग्नी ॥ विरक्तास्त्र कामासनीं ॥ मोहनास्त्र सांगीतलें ॥ ४७ ॥ दानवास्त्र देवास्त्र पूर्णतम ॥ काळास्त्र मिरविती यमादि दम ॥ स्तवनास्त्रगती उत्तम ॥ जिंकूं शके ब्रह्मांड ॥ ४८ ॥ कार्तिकास्त्र ब्रह्मास्त्र ॥ विभक्तास्त्र जारणास्त्र ॥ शापास्त्र आणि मरणास्त्र ॥ शरास्त्रही शिकविलें पैं ॥ ४९ ॥ ऐसा द्वादश वर्षांत ॥ सकळास्त्रीं प्रवीण केला नाथ ॥ आयुष्य भविष्य गमनार्थ ॥ सकळ विद्या निरूपिल्या ॥ ५० ॥ रसायनादि किमयागर ॥ वेदव्याकरणादि निपुण शास्त्र ॥ नाटकें संगीतसार जें पर ॥ गंधर्वांतें लाजवी ॥ ५१ ॥ ज्योतिष सायक शरसंधान ॥ कोकशास्त्रीं झाला प्रवीण ॥ कार्मुक दंडगुण ओढण ॥ शास्त्राधार पैं केला ॥ ५२ ॥ जलतरणादि चातुर्यकविता ॥ वैदिकी रत्नलक्षणसहिता ॥ ब्रह्मज्ञानादि निपुण अर्था ॥ बोले तैसा चालतसे ॥ ५३ ॥ ऐसी सकळ कळाकुसरी ॥ सद्विद्येचा पूर्ण भांडारी ॥ करूनी [1]निका परीक्षेपरी ॥ जगामाजी मिरवला ॥ ५४ ॥ यापरी झालिया पूर्णपण ॥ पुढें दैवतें आराधून ॥ वर ओपावयाकारणें ॥ जलिंदरा उतरलीं ॥ ५५ ॥ मग तो स्तवून [2]वैश्वानर ॥ पुढें केला तयाचा कुमर ॥ प्रत्यक्ष होतां जालिंदर ॥ सद्विद्येसी दाविलें ॥ ५६ ॥ पाहूनि विद्या अपाररत्न ॥ मान तुकावी द्विमूर्धन ॥ धन्य धन्य हा अत्रिनंदन ॥ वारंवार म्हणतसे ॥ ५७ ॥ यापरता अत्रिसुत ॥ म्हणे महाराजा ऐक मात ॥ पूर्णपणीं जालिंदर नाथ ॥ [3]सद्विद्येश पैं झाला ॥ ५८ ॥ झाला परी ऐक वचन ॥ एक उरलें आराधन ॥ दैवत करूनी द्यावें प्रसन्न ॥ वरालागीं महाराजा ॥ ५९ ॥ तरी सकळ दैवतांसी ॥ नेऊन भेटवीं जालिंदरासी ॥ बोल स्वीकारून पूर्ण तयासी ॥ बैसवावें महाराजा ॥ ६० ॥ मग अवश्य म्हणून वैश्वानर ॥ स्कंधीं वाहिला जालिंदर ॥ भुवनत्रयीं समग्र ॥ फिरोनि ओळखी दैवतें ॥ ६१ ॥ असो तीं स्थानें दैवतें नामें ॥ सांगतां [4]वैखरी सुमध्यमे ॥ तरी दुबार कथा ग्रंथमाहात्में ॥ पडत आहे महाराजा ॥ ६२ ॥ पूर्वीं मच्छिंद्राचे कारणीं ॥ निरोपिलीं स्थानें दैवतें नामीं ॥ नागपत्रें अश्वत्थधामीं ॥ सूर्यकुंड उपदेशिलें ॥ ६३ ॥ जें जें मच्छिंद्रें केलें संधान ॥ सकळ दैवतें प्रसन्न ॥ तें तें दाविलें द्विमूर्धनें ॥ वरालागीं ओपिलें ॥ ६४ ॥ बावनवीरादि जळदेवता ॥ पाताळभुवन स्वर्गनाथा ॥ तितुक्यांस करूनी प्रणिपाता ॥ वरालागीं ओपिलेंसे ॥ ६५ ॥ परी दैवतें वर देऊन त्यासी ॥ सांगतीं झालीं पूर्ण तपासी ॥ तेणें पावेल सकळ सिद्धींसी ॥ ऐसें सकळ वदलेती ॥ ६६ ॥ तें ऐकुनी [4]द्विमूर्धन ॥ पाहता झाला बद्रिकावन ॥ तेथें द्वादश वर्षें नेम करून ॥ तपालागीं बैसला ॥ ६७ ॥ लोहकंटकीं चरणांगुष्ठ ॥ वातग्रहणीं आहार पुष्ट ॥ मुखीं रामनामपाठ ॥ ब्रह्मीं दृष्टी निर्मिलीसे ॥ ६८ ॥ तंव तें [5]अचाट तप पाहून ॥ दैवतें तुकावितीं झालीं मान ॥ आपुलाले वाहनीं आरोहण ॥ करूनी आलीं तया ठाया ॥ ६९ ॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर ॥ आणिक दैवतें आलीं अपार ॥ तपशांती करून साचार ॥ स्थानीं गेलीं आपुलाल्या ॥ ७० ॥ बद्रिकाश्रमीं बद्रिनाथ ॥ तेणें उभयतां सुतां ॥

१ पूर्णपणें. २ अग्नि. ३ सर्व विद्यांमध्यें प्रवीण. ४ वाणीनें. ५ विलक्षण.

आपुल्याज़वळी त्रिरात्र ॥ ठेवूनियां घेतलेंसे ॥ ७१ ॥ ठेविलें परी भविष्य कथून ॥ सांगता झाला पंचानन ॥ सत्यलोकातें ब्रह्मभुवन ॥ तेथें वर्तलें विपरीत ॥ ७२ ॥ म्हणाल तें कोणत्या रीतीं ॥ ब्रह्मतनया सरस्वती ॥ द्वादशवर्षें दिव्यमूर्ती ॥ रेखिलीसे शृंगारीं ॥ ७३ ॥ जिचें मुख पाहतां भद्र[1] ॥ रेखला वाटे पूर्णचंद्र ॥ केश कुरळ आकाश मंद्र ॥ वेष्टित वाटे पाहतां कीं ॥ ७४ ॥ यापरी पूर्ण आणिक युक्तीं ॥ शृंगार रेखिला हेमयुक्ती ॥ तें मुक्त न वाटे नक्षत्रपातीं ॥ शृंगारातें मिरविलें ॥ ७५ ॥ अपार रतीं आगळा ॥ स्कंध वेष्टित बहू रसाळा ॥ तिहीं भुवनीं रत्नकीळा[2] ॥ नक्षत्रांसम मिरवली ॥ ७६ ॥ कंचुकी[3]वेष्टन दाट करूनी ॥ त्यांत कंदुकसमान[4] इंदुतरणी[5] ॥ कुच विराजती हृदयस्थानीं ॥ चीर[6] पदरातें मिरवे पैं ॥ ७७ ॥ हरिकटीतें कटाकृती ॥ जानु कर्दळीस्तंभनीती ॥ सरळ पोटऱ्या चरणस्थिती ॥ गजगामिनी मिरवते ॥ ७८ ॥ ऐसी तनया पाहतां दृष्टीं ॥ तों काम उदेला सहज पोटीं ॥ मग विधी नोहे तो अविधी परमेष्ठी ॥ कुबुद्धीतें संचरला ॥ ७९ ॥ तों कामबळें उन्मत्त ॥ कुमारीमागें लागत ॥ धांवतां धांवतां वीर्यपात ॥ झाला विधीचा तेधवां ॥ ८० ॥ वातचक्र सबळ नेट ॥ बुंद पावला महीपाट ॥ परी हिमाद्रीचे वनीं अचाट ॥ दिग्गज एक निजलासे ॥ ८१ ॥ निजला परी कर्णरंध्रांत ॥ येऊन पडलें बिंदुरेत ॥ त्या रेतातें जीव व्यक्त ॥ प्रबुद्ध नारायण संचरला ॥ ८२ ॥ परी त्यातें लोटले बहुत दिन ॥ झालें चतुरावृत्ती युगप्रमाण ॥ द्विजांलागीं नाहीं मरण ॥ चिरंजीव असती ते ॥ ८३ ॥ अष्टदिशीं अष्ट दिग्गज ॥ महादीप्त ते महाराज ॥ त्यांतील एक हो तेजःपुंज ॥ निजला आहे महाराजा ॥ ८४ ॥ प्रबुद्ध नारायण विख्यात ॥ अवतारदीक्षा देहस्थित ॥ त्या दिग्गजाच्या कर्णविवरांत ॥ सुशोभित आहे कीं ॥ ८५ ॥ बालतनु बालार्ककिरणीं ॥ तरी ते पहावे निजनयनीं ॥ तो जालिंदरें शिष्य करोनी ॥ महीलागीं मिरवला ॥ ८६ ॥ कर्णोदय त्याचा झाला ॥ म्हणोनि कानिफा नाम त्याला ॥ ऐसें ऐकुनी शिववचनाला ॥ वैश्वानर[7] बोलतसे ॥ ८७ ॥ म्हणे महाराजा फार बरवें ॥ आपण वदलां तितुकें अपूर्व ॥ परी गज केवीं विदारावा ॥ आम्हांलागीं दाखवा ॥ ८८ ॥ जैसी उदया आणिली गोष्टी ॥ तैसी दाखवा प्रत्यक्ष दृष्टी ॥ सूर्यजयद्रथ पाठपोटीं ॥ मिरवावा महाराजा ॥ ८९ ॥ फार बरवें उत्तम झालें ॥ एकटें महीं मम तान्हुलें ॥ त्यातें पृष्ठीं रक्षक भलें ॥ निर्माण केलें महाराजा ॥ ९० ॥ तरी आतां कृपा करून ॥ दाखवावें गजस्थान ॥ अवश्य म्हणूनि उमारमण[8] ॥ त्रिवर्गादि चालिले ॥ ९१ ॥ त्रिवर्गांचें तेज अद्भुत ॥ दिशा व्यापोनि शिरलें गगनांत ॥ जेवीं चंद्रसूर्यांचे तेजांत ॥ अग्नि संचरे तिसरा ॥ ९२ ॥ कीं एक रुद्र एक विष्णु ॥ तिजा उदेला कमळतनु[9] ॥ कीं चंद्राचळ द्रोणाचळ धनु ॥ मंदराचळ तिसरा पैं ॥ ९३ ॥ कीं एक शुक्र बृहस्पती ॥ त्यांत कचेश्वरमूर्ती ॥ कीं अमृतसंजीवनी युक्ती ॥ तिसरा अमर मिरवला ॥ ९४ ॥ कीं

१ चांगलें. २ रत्नशोभा. ३ चोळी. ४ चेंडूप्रमाणें. ५ चंद्र व सूर्य. ६ वस्त्र. ७ अग्नि. ८ शंकर. ९ ब्रह्मदेव.

एक परिस एक चिंतामणी ॥ तिसरा निघतो प्रतापखाणी ॥ ऐसे त्रिवर्ग हिमाद्रिस्थानीं ॥ प्रवेश करिते पैं झाले ॥ ९५ ॥ तों पैल हिमाद्रिपर्वतीं ॥ दिसे शेवटीं दिग्गजमूर्ती ॥ पहा विक्राळ स्थूळवटशक्ती ॥ पर्वतासम देखिला ॥ ९६ ॥ देखतांचि उमावर ॥ म्हणे हा गज प्रतापी तीव्र ॥ कदा नोहे महीं स्थिर ॥ माजवील समर आपणांसीं ॥ ९७ ॥ तरी तयासीं कैसी युक्ती ॥ करावी न राहे स्थिरत्वगती ॥ मग जालिंदर तीव्रयुक्ती ॥ बोलता झाला शिवातें ॥ ९८ ॥ हे महाराज उमावर ॥ माझिया मस्तकीं वरदकर ॥ अत्रिसुतें ठेविला थोर ॥ त्याचा चमत्कार पहा आतां ॥ ९९ ॥ ब्रह्मांड मिरवल्या तीव्रपणीं ॥ तेंही हिसावेल शूलपाणी ॥ मग या गजाची अपार करणी ॥ कोठवर उरे महाराजा ॥ १०० ॥ प्रळयकाळ कृतांत शमे ॥ तोही शांतवेल उत्तमोत्तमें ॥ ते दिग्गजा तीव्रता प्रकामे ॥ कोठें असेल महाराजा ॥ १ ॥ वातगती चक्राहटी[१] ॥ तेही कुंठित होईल जेठी ॥ मग मित्रस्यंदन[२] भवकोटी ॥ स्थिर कैसा होईना ॥ २ ॥ तन्न्यायें ब्रह्मांड जिंकितां ॥ पावे हा गज कां न स्थिरता ॥ तरी महाराजा चमत्कार आतां ॥ निजदृष्टीं विलोकीं ॥ ३ ॥ मग कक्षेमाजी भस्मझोळी ॥ करतर्जनीं चिमुटी[३] ओळी ॥ मोहनास्त्र तदनुकाळीं ॥ जपता झाला महाराजा ॥ ४ ॥ मोहनास्त्रामागें पवित्र ॥ प्रेरिता झाला स्पर्शास्त्र ॥ जपूनियां शुद्ध मंत्र ॥ भस्मचिमुटी सोडीतसे ॥ ५ ॥ तंव तें अस्त्र होतां व्यक्त ॥ तीव्रपणीं गज झाला शांत ॥ यापरी महीं चरण चतुर्थ ॥ सुदृढ व्यक्त झाला तो ॥ ६ ॥ मग म्हणे शिवास तातासहित ॥ येथेंचि असावें स्वस्थचित्त ॥ मी करीपाशीं जाऊनि त्वरित ॥ कानिफातें आणितों ॥ ७ ॥ ऐसें ऐकतां वागुत्तर ॥ अवश्य म्हणे श्रीशंकर ॥ मग तो तेथूनि जालिंदर ॥ गजापाशीं पातला ॥ ८ ॥ परी मोहनास्त्र प्रतापवंत ॥ सर्व अंगें गज झाला शांत ॥ निकट जाऊनि तयाचे त्वरित ॥ आदरोक्ती[४] बोलतसे ॥ ९ ॥ म्हणे बा रे धीरपण ॥ कोणी नसे तुजसमान ॥ तुझे कर्णी दिव्यरत्न ॥ महासिद्धीनें निर्मिलें ॥ ११० ॥ हाक मारूनी बोले त्यातें ॥ म्हणे प्रबुद्धनारायण समर्थ ॥ गजकर्णीं होऊन व्यक्त ॥ अवतारदीक्षा मिरविसी ॥ ११ ॥ तरी आतां झडकरी ॥ कर्ण सोडून ये बाहेरी ॥ तूतें नाम या देहापरी ॥ कर्णकानिफा साजतसे ॥ १२ ॥ ब्रह्मवीर्य कर्णउत्पत्ती ॥ म्हणूनि नाम तुजप्रती ॥ तूं तंव कानिफा सर्वज्ञमूर्ती ॥ दृश्यमान होईं कां ॥ १३ ॥ ऐकूनि जालिंदराचें वचन ॥ बोलता झाला विधिनंदन[५] ॥ हे महाराजा गुणनिधान ॥ स्थिर असा महीतें ॥ १४ ॥ मग त्वरें येऊनि कर्णद्वारीं ॥ दृष्टीं पाहे ब्रह्मचारी ॥ सहज करूनि उभयकरीं ॥ नमस्कारी प्रेमानें ॥ १५ ॥ षोडशवर्षी वयमान ॥ बाळतनू देदीप्यमान ॥ तयाचे तेजें सकळ कानन ॥ तेजामाजीं डवरलें ॥ १६ ॥ मग जालिंदरें देऊनी हस्त ॥ खालीं उतरिला कर्णसुत ॥ स्कंधीं वाहुनी प्रेमें स्नेहभरित ॥ शिवापाशीं पातला ॥ १७ ॥ स्कंधींचा उतरुनी ठेवी महीशीं ॥ म्हणे कानिफा सर्वज्ञराशी ॥ नमस्कारीं उमावरासी[६] ॥ वीर्यवंता महाराजा ॥ १८ ॥ त्यातें नमून

---

१ युद्ध. २ सूर्यरथ. ३ आंगठा व आंगठ्याजवळील बोट यांची चिमटी. ४ आदरपूर्वक भाषणानें. ५ ब्रह्मदेवपुत्र (कानिफा). ६ शंकराला.

जनकासमेत ॥ द्विमूर्धनी आजी तात ॥ त्यातें नमस्कारुनी त्वरित ॥ श्रेयवंत होईं कां ॥ १९ ॥ मग शिवासी करूनि नमस्कार ॥ उपरी नमिला वैश्वानर ॥ त्याहुनी प्रीतीं अति थोर ॥ जालिंदर नमिलासे ॥ १२० ॥ उपरी अत्यंत स्नेहभरितीं ॥ शिवें कवळुनी सप्रेम हस्तीं ॥ आपुले अंकीं बाळमूर्ती ॥ कर्णकानिफा बैसविला ॥ २१ ॥ परम प्रिय अति लालन ॥ घेतलें बाळाचें चुंबन ॥ मग जालिंदरा बोले वचन ॥ बाळा देईं अनुग्रह ॥ २२ ॥ तव अनुग्रह झाल्यापाठीं ॥ मोडेल अज्ञानदशाराहाटी ॥ सकळार्थ विजय पोटीं ॥ कर्णकानिफा मिरवेल ॥ २३ ॥ जैसा होतां अर्कोदय[1] ॥ अंधकार पावे विलय[2] ॥ तैं सकळ जनांचे हे व्यवसाय ॥ तद्न्यायें बाळा करावें ॥ २४ ॥ कीं द्रव्य असतां गृहीं भरती ॥ मग सकळ व्यवसाय तया सुचती ॥ तन्न्यायें कृपामूर्ती ॥ बाळालागीं करावें ॥ २५ ॥ ऐसें ऐकुनी आदिनाथवचन ॥ जालिंदर तो तुकावी मान ॥ मग तेचि घडी क्रियामंडन ॥ संकल्पांत आव्हानी ॥ २६ ॥ तन मन धन काया वाचा ॥ त्याग केला दुर्गुणांचा ॥ तो संकल्प निःसंकल्प साचा ॥ गुरुराज वंदिला ॥ २७ ॥ मग वरदहस्त स्पर्शोनि चंद्रमौळी ॥ कर्णीं ओपिली मंत्रावळी ॥ तेणें सकळ अज्ञानकाजळी ॥ फिटोनि गेली तत्काळ ॥ २८ ॥ जैसा सदनीं लावितां दीप ॥ तीव्र तमाचा होय लोप ॥ तेवीं मंत्रबीजमाप ॥ अज्ञानकर्दमपण निवटी कां ॥ २९ ॥ व्यक्ताव्यक्त सकळ भास ॥ पूर्ण झाला विजयपणास ॥ मग चराचरीं माझाचि वास ॥ एके रूपें वर्ततसे ॥ १३० ॥ ब्रह्मदृष्टी संकलित खुण ॥ दृश्य गुरुमुखेंकरून ॥ तें हरि रुद्र ब्रह्मरूप चैतन्य ॥ ऐक्यरूपें मीनलें ॥ ३१ ॥ असो ऐशी होतां राहाटी ॥ मग उठते झाले चतुर्थ जेठी ॥ पदीं चालतां महीपाठीं ॥ बद्रिकाश्रमीं पातले ॥ ३२ ॥ मग सुवचनीं द्विमूर्धन[3] ॥ युक्ति सांगेल जालिंदराकारण ॥ बा रे जें कां दत्तवचन ॥ कानिफातें समर्पीं ॥ ३३ ॥ ऐसें सांगूनि स्वयें युक्ती ॥ अदृश्य जाहला दाहकमूर्ती ॥ वरी सादृश्यपणें उमापती ॥ षण्मासें त्यातें मिरवला ॥ ३४ ॥ परी षण्मासदिनांमाझारी ॥ दत्तकृपेची विद्यालहरी ॥ सांठवुनी कानिफाअंतरीं ॥ केला भांडारी[4] विद्येचा ॥ ३५ ॥ सकळ अस्त्रीं केला प्रवीण ॥ परी संजीवनी अस्त्र देदीप्यमान ॥ आणि दुसरें वाताकर्षण ॥ जालिंदरें रक्षिलें असे ॥ ३६ ॥ म्हणाल करून रक्षण ॥ सांगितलें सकळ विद्येचें कारण ॥ तरी इतुकेंच रक्षावयास संशय कोण ॥ जालिंदरा उदेला हो ॥ ३७ ॥ तरी संशयाचें कारण ॥ गजकर्णीं झाला जन्म ॥ तया स्थानींचा उत्तम गुण ॥ उभयतांचा मिरवेल ॥ ३८ ॥ दांभिक बुद्धिसंस्कार ॥ पाहूनियां जालिंदर ॥ वाताकर्षण संजीवनीमंत्र ॥ अस्त्र भिन्न रक्षिलें ॥ ३९ ॥ परी सकळ अस्त्रीं झाला निपुण ॥ मग बोलता झाला उमारमण[5] ॥ अस्त्रदेवता करूनि प्रसन्न ॥ कानिफातें देईं कां ॥ १४० ॥ मग स्तवनास्त्र जपोनि त्वरित ॥ बोलाविले सकळ दैवत ॥ इंद्र वरुण अश्विनीसहित ॥ महीलागीं उतरलें ॥ ४१ ॥ दानव मानव प्रतापवंत ॥ अतळवितळ पाताळीं जे विख्यात ॥ नवनागकुळें वशवंत ॥ तेही

१ सूर्याचा उदय. २ नाश करी. ३ अग्नि. ४ अधिकारी. ५ शंकर.

पातले ते ठाया ॥ ४२ ॥ चंद्रसूर्य गणगंधर्व ॥ यक्ष किन्नर आले सर्व ॥ विष्णुसहित कामोद्भव ॥ महीलागीं उतरले ॥ ४३ ॥ खगेंद्रासहित[1] प्लवंगम ॥ येता झाला दाशरथी राम ॥ अवतारदक्ष विष्णु दशम ॥ दशअवतारीं मिरवला ॥ ४४ ॥ बावन वीर जळदेवता ॥ शंखिनी डंखिनी कालिकेसहिता ॥ अष्टभैरव गण पाताळनाथ ॥ गजानन मिरवला ॥ ४५ ॥ ऐशा देवता वर्णूं किती ॥ मृत्युलोकीं पूर्ण विख्याती ॥ तेहतीस कोटी संख्या बोलती ॥ दृश्य झाले तितुकेही ॥ ४६ ॥ असो ऐशा समुच्चयाकारणें ॥ त्यासी जालिंदर करी नमन ॥ बद्धांजळी सर्वां जोडून ॥ बोलता झाला तत्क्षणीं ॥ ४७ ॥ म्हणे महाराजा कृपामूर्ती ॥ कानिफा मिरवला सद्विद्येप्रती ॥ तें योग देउनी निगुतीं ॥ कार्यालागीं वर्तावें ॥ ४८ ॥ ऐसें ऐकून तयाचें वचन ॥ दैवतें बोलती सकळ जाण ॥ तुज आम्हीं वरप्रदान ॥ सद्विद्येसीं दिधलेसें ॥ ४९ ॥ दिधलें परी कवणार्थी ॥ श्रीपावकाच्या[2] मोहाप्रती ॥ आणि अत्रिसुत[3] तुम्हांप्रती ॥ विद्यानाथ झालासे ॥ १५० ॥ ऐसें उभयांच्या भिडेकरून ॥ तुम्हांस दिलें वरप्रदान ॥ परी पुढें आणिकाकारण ॥ वर मिरवत नाहीं जी ॥ ५१ ॥ तेथून तुम्ही पुढतपुढतीं ॥ शिष्य सकळ अगणित मिती ॥ तितुक्यांसी सद्विद्येप्रती ॥ वर किती ओपावा हो ॥ ५२ ॥ बरें म्हणाल तरी वाईट ॥ परी वर न ओपूं आम्ही स्पष्ट ॥ मानाल तैसें महाश्रेष्ठ ॥ दुःख देहीं आपुल्या ॥ ५३ ॥ ऐसें म्हणून विमानीं ॥ बैसते झाले तत्क्षणीं ॥ तें जालिंदर दृष्टीं पाहोनी ॥ परम चित्तीं क्षोभला ॥ ५४ ॥ म्हणे माझा अनादर ॥ करूनि जातां स्थानावर ॥ परी माझा चमत्कार ॥ निजदृष्टीं पहावा ॥ ५५ ॥ मग करीं कवळुनि भस्मचिमुटी ॥ वातास्त्र प्रेरिता झाला जेठी ॥ तेणेंकरूनि नभापोटीं ॥ प्रेरक झालें वातास्त्र ॥ ५६ ॥ तें वातास्त्र अति तीव्र ॥ प्रगट होतां वातचक्र ॥ तैं सकळ विमानें नभावर ॥ भ्रमण करिती वातानें ॥ ५७ ॥ तें पाहूनियां गंधर्वनाथ ॥ गुणीं[4] गांडीव[5] चढवितां सिद्ध[6] ॥ आदिदेव सुरवरादि समस्त ॥ सज्ज केले सायकें ॥ ५८ ॥ मग नानास्त्रें जपून युक्ती ॥ शर सोडिती नाथावरती ॥ तें पाहुनि जालिंदर जती ॥ निवारण करी सर्वांचें ॥ ५९ ॥ पर्वतास्त्र गंधर्व प्रेरिती ॥ वज्रास्त्र प्रेरी अमरपती ॥ यक्ष अग्निअस्त्रें सोडिती ॥ जळदास्त्र वरुण तो ॥ १६० ॥ धूम्रास्त्र अश्विनीदेव ॥ नागास्त्र प्रेरिती सकळ दानव ॥ ऐशीं अस्त्रें बहुत गौरव ॥ बहुतांनीं तीं निर्मिलीं ॥ ६१ ॥ परी हरी आणि हर[7] ॥ दृष्टीं पाहाती चमत्कार ॥ म्हणती पुढें कैसा विचार ॥ निजदृष्टी पाहूं कीं ॥ ६२ ॥ ऐशीं अस्त्रें प्रेरिती बहुत ॥ तें पाहूनी जालिंदरनाथ ॥ मग सकळ अस्त्रांवरी मोहनास्त्र ॥ योजिता झाला महाराजा ॥ ६३ ॥ तें मोहन अस्त्रांतरीं ॥ प्रवेशून करी प्रताप बाहेरी ॥ जालिंदरातें अवलोकन करी ॥ नमून जात असे अस्त्र ॥ ६४ ॥ ऐसें अस्त्र सकळ आलें ॥ परी जालिंदरा नमून गेलें ॥ परी पर्वतास्त्रें युक्त केलें ॥ निवटिलें वातास्त्र तें ॥ ६५ ॥ मग विमानें होउनी स्वर्गीं स्थिर ॥ समूळ आटलें वातचक्र ॥ मग एकाएका बोलती

१ गरुडासह. २ अग्नीच्या. ३ दत्तमहाराज. ४ दोरीवर. ५ या नांवाचें धनुष्य. ६ घट्ट. ७ शंकर.

उत्तर ॥ कैसा विचार करावा ॥ ६६ ॥ जीं जीं अस्त्रें प्रेरितों आपण ॥ तीं तेथें जाती नमून ॥ तरी आतां शस्त्रें घेऊन ॥ महीलागीं उतरावें ॥ ६७ ॥ तीव्र शस्त्रघातेंकरून ॥ द्वंद्वमुखांतें करावें हरण ॥ मग तयाचा घेऊनि प्राण ॥ स्वर्गवासी करावा तो ॥ ६८ ॥ ऐसें मानलें सर्वां चित्तीं ॥ विमानें उतरलीं महीवरती ॥ मग मुद्गल फरश अंकुश शक्ती ॥ घेवोनियां धांवले ॥ ६९ ॥ त्रिशूळ खड्ग भाले तोमर ॥ फरश मुरस पाड्ड कव्यार ॥ गदा चक्र बरची यंत्र ॥ दारुकादि उभवले ॥ १७० ॥ गुप्ती भाले असिलता ॥ ऐशीं शस्त्रें किती वर्णितां ॥ असंख्यरूपी प्राणहर्ती ॥ घेवोनियां धांवले ॥ ७१ ॥ तें पाहूनी जालिंदर ॥ सोडिता झाला कामिनीअस्त्र ॥ कामिनी अस्त्रावरी पवित्र ॥ कामास्त्र प्रेरिलें ॥ ७२ ॥ कामिनी अस्त्र प्रगट होतां ॥ अगणित स्त्रिया तेजभरिता ॥ उदया पावून कामवार्ता ॥ दर्शविती रायासी ॥ ७३ ॥ परी त्या स्त्रिया कैशा ॥ रंभेहूनी शतगुण ऐशा ॥ भृकुटीसायक नेत्रकटाक्षां ॥ शर सोडिती कामाचे ॥ ७४ ॥ तयामागें कामास्त्र ॥ सर्वां हृदयीं निघोन पवित्र ॥ तेणें लंपट होऊनि सर्वत्र ॥ युद्धालागीं उसळले ॥ ७५ ॥ मग एकएकींच्या ध्यानीं ॥ लागुनी करिती नम्र विनवणी ॥ तंव त्या पळती रानोरानीं ॥ हेही धांवती त्यामागें ॥ ७६ ॥ परी बद्रिकाश्रमीं बद्रितरु ॥ त्यांतें वर्णितां नसे पारू ॥ कीं वाट दावी कंटकापारू ॥ तयामाजी रिघाल्या ॥ ७७ ॥ तंव त्या कामिनी कंटकवनीं ॥ बद्रितरूतें जाती वेंघुनी ॥ देवही तैसे तरू कवळुनी ॥ वृक्षावरी वेंघती ॥ ७८ ॥ एक वृक्षावरी एक एकावरी ॥ तैसे एकएक वेंघले तयांवरी ॥ निकट जाउनी विनंती करी ॥ वश्य होय म्हणउनी ॥ ७९ ॥ सकळ वृक्षा गेले वेंघून ॥ तें पाहून जालिंदर नंदन ॥ मग स्पर्शास्त्र मंत्र जपून ॥ भस्मचिमुटी सोडीतसे ॥ १८० ॥ स्पर्शास्त्र प्रगट होतां ॥ सकळ कामिनींसी झाली प्रेरकता ॥ तें पाहुनी कामिनी तत्त्वतां ॥ उड्या सोडिती महीतें ॥ ८१ ॥ तयांच्या मागें देव भले ॥ उड्या सोडिती अतिं वेहिलें[३] ॥ परी स्पर्शास्त्रें पदातें धरिलें ॥ तरुशाखेतें कवळुनी ॥ ८२ ॥ मग खालीं मौळी वरतें पद ॥ मध्येंच लोंबती देववृंद ॥ मुकुट महीतें पडोनि बद्ध ॥ कबरी मोकळी हेलावे ॥ ८३ ॥ जैसें सुग्रीव पक्ष्यांचें घर ॥ तरूस लोंबती दिसती अपार ॥ कीं दिनउदयीं शाखेवर ॥ वडकाळिका झोंबती ॥ ८४ ॥ तन्यायें तरूवरती ॥ देव उफराटे झोळकंबे घेती ॥ तें पाहूनी उमापती रमापती ॥ हास्य करिती गदगदां ॥ ८५ ॥ म्हणती बरवी झाली मौज ॥ ऐसा मिळाला नाहीं भोज ॥ न मारितां सकळ ज्ञानकाज ॥ बरें जाणोनियां घेतलें ॥ ८६ ॥ मग स्त्रिया तळवटीं ॥ काम करित्या झाल्या शेवटीं ॥ सकळांचे चीर फेडूनी करपुटीं ॥ नग्नशरीरी मिरवले ॥ ८७ ॥ सकळ वस्त्रें जालिंदरापासीं ॥ स्त्रिया आणूनि करिती राशी ॥ मग जालिंदर कानिफापाशीं ॥ हळूच खुणें सांगतसे ॥ ८८ ॥ देव सकळ झाले नग्न ॥ त्यांतें नेसवुनी येई वसन ॥ मग तो कानिफा घेउनी वसन ॥ ज्याचें त्यास नेसवीतसे ॥ ८९ ॥ नेसवितां देव बोलत ॥ अहो गुरूची करणी विपरीत ॥



१ चढतात. २ स्त्रियांना. ३ सत्वर. ४ वस्त्र.

विध्वंसिलें असे सामर्थ्य ॥ योग्यायोग्य दिसेना ॥ १९० ॥ ज्यांची ब्रह्मांडभरी कीर्ती ॥ ते तरूलागीं कैसे लोंबती ॥ ऐसें म्हणून तयापरती ॥ वसनालागीं पैरिधानी ॥ ९१ ॥ म्हणे महाराजा गुरूसी चोरून ॥ तुम्हां पैरिधानितों गुप्त वैसन ॥ तरी हें ऐसें वर्तमान ॥ बोलूं नका गुरूतें ॥ ९२ ॥ वसन नेसविल्याउपरी ॥ पाय वंदी उभय करीं ॥ भाळ ठेउनी पदावरी ॥ आणिक जात पुढारां ॥ ९३ ॥ मग कानिफाची नेत्रभक्ती ॥ पाहून तुष्टले देव चित्तीं ॥ मग प्रसन्न होऊनि वरदहस्तीं ॥ वरा ओपिती कृपेनें ॥ ९४ ॥ मनीं करूनि दृढ विचार ॥ विना दिधल्यावांचूनि वर ॥ सोडणार नाहीं जालिंदर ॥ कृतनिश्चय हा असे ॥ ९५ ॥ ऐसा निश्चय करूनि चित्तीं ॥ प्रसन्न चित्तें वर ओपिती ॥ जें जें अस्त्र तयाचे शक्ती ॥ आम्ही मिरवूं निश्चयें ॥ ९६ ॥ मग सकळीं देऊनि वरप्रदान ॥ कानिफा केला वरदवान ॥ तें ऐकूनि पैावकनंदन ॥ विभक्तास्त्र सोडीतसे ॥ ९७ ॥ विभक्तास्त्र होतां प्राप्त ॥ सकळ देव झाले मुक्त ॥ सांवरूनि वस्त्रभूषणांतें ॥ नाथापाशीं पातले ॥ ९८ ॥ मग सर्वत्रीं करूनि नमस्कार ॥ म्हणती तव सुता दिधला वर ॥ सकळ अस्त्रीं साक्षात्कार ॥ निजांगें आम्ही मिरवूं ॥ ९९ ॥ उपरी बोले जालिंदरनाथ ॥ पुढें करीन साबरी कवित्व ॥ त्यातें साह्य तुम्हीं समस्त ॥ कृपा करूनि असावें ॥ २०० ॥ मग अवश्य म्हणोनि वचन देती ॥ साह्य असों तव कवितीं ॥ ऐसें बोलोनि स्वस्थाना जाती ॥ विमानारूढ होऊनियां ॥ १ ॥ यावरी रमावर आणि उमावर ॥ कानिफा आणि जालिंदर ॥ बद्रिकाश्रमीं होऊनि स्थिर ॥ तीन रात्र राहिले तेथें ॥ २ ॥ तेथील स्वाद धुंडीसुत ॥ पुढें सांगेल यथास्थित ॥ नरहरवंशीं नाम ज्यातें ॥ मालु ऐसें वदताती ॥ ३ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ द्वादशाध्याय गोड हा ॥ २०४ ॥

१ नेसवी. २ नेसवितों. ३ वस्त्र. ४ अग्निपुत्र जालंदर.

॥ नवनाथभक्तिसार द्वादशाध्याय समाप्त ॥

१५

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ जयजयाजी त्रिभुवनेशा ॥ मच्छकच्छवराहनरसिंहवामनवेषा ॥ भार्गव राघव द्वारकाधीशा ॥ पूर्णब्रह्मा सर्वज्ञा ॥ १ ॥ हे गुणातीता सकलगुणज्ञा ॥ अव्यक्तव्यक्ता सर्वज्ञा ॥ पूर्णब्रह्म अचल सर्वज्ञा ॥ बौद्ध कलंकी आदिमूर्ते ॥ २ ॥ मागिले अध्यायीं केलें कथन ॥ श्रीजालिंदरा होऊनि जन्म ॥ तप आचरोनि अत्रि-नंदन[1] ॥ संपादिला गुरुत्वीं ॥ ३ ॥ तो समर्थ अत्रिसुत ॥ प्रसन्न झाला सद्विद्येंत ॥ तयावरुतें सकल दैवत ॥ गौरविलें पावकें[2] ॥ ४ ॥ स्कंधीं वाहूनि द्विमूर्धनी[3] ॥ पृथक् दैवतें स्थानीं स्थानीं ॥ सत्यलोकादि अमरां पाहूनी ॥ वैकुंठादि पाहिलें ॥ ५ ॥ पाहिलें इंद्र चंद्रस्थान ॥ मित्र वरुण गंधर्वा भेटून ॥ सुवर्लोक भुवर्लोक तपोलोकादि पाहून ॥ वरालागीं आणिलें ॥ ६ ॥ यक्ष राक्षस किन्नरांसहित ॥ गणगंधर्वादि गौरवूनि समस्त ॥ वश केला जालिंदरनाथ ॥ अस्त्रविद्येकारणें ॥ ७ ॥ याउपरी कानिफा कर्णो-दय ॥ होऊनि झाला विद्यामय ॥ तयाच्या वराकरितां सर्व देव ॥ सकळ दैवतें विटंबिलीं ॥ ८ ॥ विटंबोनी आपुली शक्ती ॥ प्रसन्न केलें वराप्रती ॥ उपरी गेले स्वस्थाना निगुती ॥ आश्रम बद्रिका सांडुनी ॥ ९ ॥ परी उमावर आणि रमावर ॥ कानिफा आणि जालिंदर ॥ बद्रिकाश्रमीं राहुनी स्थिर ॥ करिती विचार तो कैसा ॥ १० ॥ एकमेकां बोलती हांसून ॥ आठवूनि दैवतांचें विमुंडमुंडन ॥ प्रसन्न झाले विटंबून ॥ बुद्धिहीन हे कैसे ॥ ११ ॥ परी धन्य जालिंदर मिळाला यांसी ॥ अवस्था दारुण महीसी ॥ पूर्वी भिडले[6] अपार राक्षसांसीं ॥ परी ऐसा मिळाला नाहीं त्यां ॥ १२ ॥ उफराटे नभदेही ॥ अधो पाहत होते मही ॥ ऐसे उचित कदा देही ॥ मिळाले नाहीं तयासी ॥ १३ ॥ ऐसें बोलोनि उत्तरोत्तर ॥ हास्य करिती वारंवार ॥ मेळवुनी करास कर ॥ टाळी पिटिती विनोदें ॥ १४ ॥ असो ऐसी विनोदशक्ती ॥ यावरी बोले उमापती ॥ हे महाराजा जालिंदरा जती ॥ चित्त दे या वचनातें ॥ १५ ॥ नागपत्रअश्वत्थस्थानीं ॥ पूर्ण यज्ञआहुती करोनी ॥ प्रथम कवित्वा रचोनी ॥ वरालागीं साधावें ॥ १६ ॥ वेदविद्या मंत्र बहुत ॥ अस्त्रविद्या प्रतापवंत ॥ परी ते महीवरी पुढें कलींत ॥ चालणार नाहीं महाराजा ॥ १७ ॥ मग मंत्रशक्ती उपायतरणी[7] ॥ कांहींच न मिळे लोकांलागुनी ॥ मग ते दुःखप्रवाहशमनीं ॥ सकळ लोक पडतील ॥ १८ ॥ तरी सिद्ध करूनी आतां कविता ॥ आवंतिजे[8] नागाश्वत्था ॥ सकल विद्या करूनी हाता ॥ कानिफातें ओपिजे ॥ १९ ॥ या कानिफाची उदार शक्तिस्थिती ॥ मिरवत आहे दांभिक-वृत्ती ॥ तरी बरवी आहे कार्याप्रती ॥ पुढें पडेल महाराजा ॥ २० ॥ हा अपार शिष्य करील पुढती ॥ विद्या वरितील याच्या हातीं ॥ मग ती प्रतिष्ठा लोकांपरती ॥ सर्व जगीं मिरवेल ॥ २१ ॥ पूर्वी सांबरी ऋषीनें मार्ग ॥ काढिला आहे शुभयोग ॥ परी थोडकी विद्या चांग ॥ महीलागीं पुरेना ॥ २२ ॥ तरी शतकोटी सांबरीगणा ॥ महीतें मिरवावें शुभवचना ॥ सकलास्त्रांची आणुनी

[1] दत्तात्रेय. [2] अग्नीनें. [3] सूर्य. [4] शंकर. [5] विष्णु. [6] समोर लढले. [7] उपायरूपी सूर्य. [8] बोलवावें.

भावना ॥ महीलागीं मिरवावी ॥ २३ ॥ तरी या कवितेची वांटणी ॥ मिरवावी नवनाथांलागुनी ॥ कोणती कैसी गतीलागुनी ॥ सांगतों मात ते ऐका ॥ २४ ॥ पूर्वीं मच्छिंद्रानें धरूनि लक्ष ॥ काव्य केलें आहे प्रत्यक्ष ॥ तेहतीस कोटी पंचाणव लक्ष ॥ मंत्रविद्युलता मिरविल्या ॥ २५ ॥ यापरी गोरक्षगोष्टी होटीं ॥ मिरवेल नव लक्ष बारा कोटी ॥ पंच कोटी एक लक्ष शेवटीं ॥ मीननाथ मिरवेल ॥ २६ ॥ नव कोटी सात लक्ष ॥ चर्पटनाथ करील कीं प्रत्यक्ष ॥ सात कोटी चार लक्ष ॥ भरतरीनाथ करील कीं ॥ २७ ॥ तीन लक्ष दोन कोटी ॥ रेवणनाथ करील शेवटीं ॥ एक लक्ष एक कोटी ॥ वटसिद्धनाथ करील कीं ॥ २८ ॥ चौतीस कोटी बारा लक्ष ॥ श्रीजालिंदरानें करावें प्रत्यक्ष ॥ सहा कोटी आठ लक्ष ॥ कानिफानें मिरवावें ॥ २९ ॥ अशुभप्रयोग गोरक्षरहाटी ॥ स्थापून योजावे शतकोटी ॥ पुढें लोकां साधनजेठी ॥ होणार नाहीं महाराजा ॥ ३० ॥ म्हणून ऐसें योजून साधन ॥ मंत्रप्रयोगीं करावें प्रवीण ॥ तें न करितां सकळ जन ॥ सुख होईल [१]रोगांतें ॥ ३१ ॥ तरी हे जनउपकारासाठीं ॥ जीवा करावी आटाआटी ॥ तुम्हांतें सांगावी ऐसी गोष्टी ॥ नोहे सर्वज्ञ आम्हांत ॥ ३२ ॥ ही कलीची विद्या कलिसंधान ॥ मिरवत आहे पूर्वींपासून ॥ तुम्ही नवनाथ अवतार घेऊन ॥ विद्या [२]वर्तवीत असतां कीं ॥ ३३ ॥ तुम्ही जाणणार भविष्योत्तर ॥ तरी या कलींत करावा प्रसार ॥ आम्हीं सांगावें ऐसें थोर ॥ तुम्हां योग्य साजेना ॥ ३४ ॥ भविष्योत्तर जाणोनि नाथा ॥ तूं देवांसीं केली वार्ता ॥ कानिफातें वर देतां ॥ बोललास हिता महाराजा ॥ ३५ ॥ तरी आतां आळस सांडून ॥ जीवीं मिरवावें कवित्वरत्न ॥ जारण मारण उच्चाटण ॥ कवित्व-रचनीं मिरवावें ॥ ३६ ॥ ऐसें सांगून [३]उमानाथ ॥ कानिफाविषयीं आणीक सांगत ॥ यास बसवून पूर्ण तपास ॥ समर्थपणें मिरवीं कां ॥ ३७ ॥ ऐसें सांगतां उमावर ॥ अवश्य म्हणे जालिंदर ॥ मग वर देऊनि [४]रमावर ॥ जाता झाला वैकुंठीं ॥ ३८ ॥ मग जालिंदर आणि कानिफनाथ ॥ द्वादश वर्षें राहून तेथ ॥ चाळीस कोटी वीस लक्षांत ॥ उभें चरित्र रचियेलें ॥ ३९ ॥ तें [५]आदिनाथें कवित्व पाहोन ॥ पूर्ण झालें समाधान ॥ मग म्हणे नागाश्वत्थीं जाऊन ॥ सिद्धिमार्गीं पावावें ॥ ४० ॥ मग जालिंदर आणि कानिफनाथ ॥ जाऊनि पाहिला नागाश्वत्थ ॥ पूर्ण आहुती हवन तेथ ॥ करूनि तोषवी वीरातें ॥ ४१ ॥ सूर्यकुंडाचें आणून [५]जीवन ॥ बावन-वीरां करी सिंचन ॥ प्रसन्न करूनि त्यांचें मन ॥ वरालागीं घेतलें ॥ ४२ ॥ यापरी पुनः परतून ॥ पाहते झाले बद्रिकाश्रम ॥ मग कानिफातें तपा बैसवून ॥ [६]लोहकंटकीं मिरविला ॥ ४३ ॥ श्रीआदिनाथाच्या साक्षीसी ॥ कानिफा बैसवून पूर्ण तपासी ॥ श्रीजालिंदर तीर्थस्नानासी ॥ जाता झाला पुसून ॥ ४४ ॥ त्याच ठायीं बद्रिकाश्रमांत ॥ कानिफा आणि श्रीकृष्णनाथ ॥ तप करिती भागीरथीतीरांत ॥ तीव्र [७]काननीं बैसूनियां ॥ ४५ ॥ उभय [८]ठाव असे विभक्त ॥ एकमेकां नसे माहीत ॥ असो येरीकडे

१ रोगराई बळावतील. २ प्रसार करित आहांत. ३ शंकरानें. ४ विष्णु. ५ उदक. ६ लोखंडी कांट्यावर. ७ अरण्यांत. ८ स्थानें.

जालिंदरनाथ ॥ नानाक्षेत्रीं हिंडतसे ॥ ४६ ॥ परी क्षेत्रीं जातांच आधीं काननीं ॥ भारा बांधिला तृण कापुनी ॥ निजमौळीं त्वरें वाहुनी ॥ क्षेत्रामाजी संचरे ॥ ४७ ॥ परी तो मौळीं भारा घेतां ॥ सुख न वाटे [1]अनिळचित्ता ॥ मग संचरोनि भयहर्ता ॥ वरच्यावरी धरीतसे ॥ ४८ ॥ म्हणाल [2]पवनास काय कारण ॥ वरचेवर धरावया तृण ॥ तरी जालिंदर अग्निनंदन ॥ अग्निपिता तो असे ॥ ४९ ॥ परी [3]पौत्राची करूनी ममता ॥ म्हणून भारा धरी वरुता ॥ असो जालिंदर क्षेत्रीं येतां ॥ तृण गोधना सोडीतसे ॥ ५० ॥ ऐसें भ्रमण करितां महीं ॥ नानातीर्थक्षेत्रयात्राप्रवाहीं ॥ तो गौडबंगाल देशाठायीं ॥ हेलापट्टणीं पैं आला ॥ ५१ ॥ तृणभार मिरवोनि माथीं ॥ परी तो मिरवे सर्वांहातीं ॥ अधर चाले मस्तकावरती ॥ लोक पाहती निजदृष्टी ॥ ५२ ॥ हेलापट्टण अति विस्तीर्ण ॥ बुद्धिप्रयुक्त तेथील जन ॥ जालिंदराचें चिन्ह पाहून ॥ आश्चर्य करिती मानसीं ॥ ५३ ॥ म्हणती अधर भारा कैसा ॥ चालतो हा न कळे तमाशा ॥ तरी हा सिद्ध अवतारलेशा ॥ महीलागीं मिरवीतसे ॥ ५४ ॥ मग ते चव्हाट्याचे जन ॥ करूं धांवती तैं दर्शन ॥ परी तें नाथा समाधान ॥ चित्तीं प्रशस्त लागेना ॥ ५५ ॥ जे पूर्णपणें झाले निवाले ॥ ते प्रतिष्ठेपासून दुरावले ॥ कदा न जातां जगीं मानवले ॥ चित्तीं निस्पृहता धरूनियां ॥ ५६ ॥ बृहस्पतीचे पडिपाडीं ॥ तया होतसे सर्वार्थजोडी ॥ परी तो वेडियांत मारी दडी ॥ लोकमहिमाभयास्तव ॥ ५७ ॥ जैसें कृपण आपुलें धन ॥ रक्षी महीचे पाठीलागून ॥ तन्न्याय झालिया मन ॥ कदाकाळीं आवरेना ॥ ५८ ॥ असो मग जालिंदरनाथ ॥ अति तोषें तृणभार जमवून आणित ॥ पाहूनि गोधनाची जमात ॥ तृण सोडी तयांसी ॥ ५९ ॥ मग गल्लीकुची गंधमोरी ॥ तेथें जाऊनि वस्ती करी ॥ भिक्षा मागुनी क्षेत्राभीतरी ॥ उदरनिर्वाह करीतसे ॥ ६० ॥ यापरी वर्ततां त्या गांवींचा नृप ॥ त्रिलोचनसुत जैसा कंदर्प ॥ तयाचें वर्णितां स्वरूप ॥ सरस्वतीसी न सुचे हो ॥ ६१ ॥ नाम जयाचें गोपीचंद ॥ परी मिरवला सर्व [4]संपत्तिवृंद ॥ दिव्य [5]अमूप अमरभद्र ॥ पाहूनि लाजे कुबेर तो ॥ ६२ ॥ द्वादशलक्ष अपूर्वशक्ती ॥ अश्व मिरवले वाताकृती ॥ तेजःपुंज पाहुनी लाजती ॥ चपळपणीं चपळा त्या ॥ ६३ ॥ चीरतगटीं रत्नकोंदणीं ॥ पाखरा शोभल्या बालार्ककिरणीं ॥ झगमगती झालरी किरणीं ॥ हेमगुणीं मिरवल्या ॥ ६४ ॥ रश्मी अति शोभायमान ॥ झालरी अग्निहेमगुण ॥ [6]मुक्त गुंफिले समत्वीं समान ॥ नक्षत्रमालिका जेवीं त्या ॥ ६५ ॥ हेमतगटीं रत्नकोंदणीं ॥ [7]ग्रीवे मिरवल्या माळा भूषणीं ॥ संगीत पेव्या नवरंगरत्नी ॥ दीप जैसे लाविले ॥ ६६ ॥ मुख शोभलें त्याचपरी ॥ दिव्य मिरवल्या सरोवरीं ॥ चातकपिच्छ कर्णद्वयाभीतरीं ॥ तुरे खोविले मौळीतें ॥ ६७ ॥ आणि पुच्छपृष्ठीं रत्नजडित ॥ गेंदा जोडिया तेजभरित ॥ चार जामे लखलखित ॥ [8]चपळेहून अधिक ते ॥ ६८ ॥ द्वादश लक्ष ऐसियेपरी ॥ [9]वाजी मिरवती चमूभीतरी ॥

१ वायूचे अंतःकरणाला. २ वायूला. ३ नातवाची. ४ सर्वसंपत्ति. ५ पुष्कळ. ६ मोत्यें. ७ मानेंत. ८ विजेपेक्षां. ९ घोडे.

प्रत्येक पाहतां संमतसरी ॥ उदधिसुत मिरवले ॥ ६९ ॥ कीं अर्कहृदयीं स्पृहा होती ॥ मातें लाभली श्यामकर्ण मूर्ती ॥ त्या
स्पृहेची करावया शांती ॥ द्वादश लक्ष प्रगटले ॥ ७० ॥ त्याचपरी गजसमूह मत ॥ पाहून लाजे ऐरावत ॥ चित्तीं म्हणे क्षोभून
सर्वत्र ॥ रत्नें उपजलीं महीवरी ॥ ७१ ॥ विशाळ शुंडा हिरेजाती ॥ अधरें द्वैतदंत शोभती ॥ तयां वेष्टुनी चुडे पाहती ॥ रत्न-
कोंदणीं मिरवले ॥ ७२ ॥ ग्रीवे घंटिका हेमगुणीं ॥ तयांमाजी रत्नपणीं ॥ हिरे माणिक पाचतरणी ॥ नवरंगी शोभले ॥ ७३ ॥ यापरी
पृष्ठीं झुली व्यक्त ॥ तयांवरी झालरी लखलखित ॥ हेमगुणीं गोवुनी मुक्त ॥ ढाळ देती सुरवाड ॥ ७४ ॥ यापरी हौदे मेघडंबरी ॥
सुवर्ण अंबाऱ्या शोभल्या वरी ॥ त्यांहीं कोंदणीं नक्षत्रपरी ॥ रत्न मिरवूं लाहिले ॥ ७५ ॥ कोणी रिक्त कोणी ऐसे ॥ परी ते
भासती पर्वत जैसे ॥ पृष्ठीं पताका पहा भासे ॥ पर्वतमौळीं तरू जेवीं ॥ ७६ ॥ जैसे गजपृथूतें मिश्र ॥ विराजलेती दशसहस्र ॥
पाईक स्वारदासचक्र ॥ रायापुढें धांवती ॥ ७७ ॥ छडीदार चोपदार ॥ पूर्ण बोथाटे पुकारदार ॥ यंत्रधारी अश्वस्वार ॥ रायासमोर
धांवती ॥ ७८ ॥ अति उग्र खडतरपती ॥ मिरवल्या जैशा कृतांतमूर्ती ॥ कीं युद्धकुंडींचे पावक होती ॥ घेती आरती परचक्र ॥ ७९ ॥
यापरी राव तो कृपाळ ॥ शोभे जैसा तमालनीळ ॥ बरवेपणीं अतिझळाळ ॥ कंदर्पपंथीं मिरवीतसे ॥ ८० ॥ स्वरूपलक्षणीं गोपीचंद ॥
समता न पावे आणीक गौडवृंद ॥ चंद्रचूडमण्यालागीं अबाध ॥ कलंक देहीं म्हणोनी ॥ ८१ ॥ अर्क दृष्टांता संमत देखा ॥ तरी तोही
तीव्र दाहकपंथा ॥ चंपला तेजापरी भ्याडा चित्ता ॥ मेघामाजी दडताती ॥ ८२ ॥ तैसा नव्हे हा नृपनाथ ॥ दिव्यरूपी सद्गुण-
भरित ॥ धर्म औदार्य सभाग्यवंत ॥ विजयलक्ष्मी मिरवीतसे ॥ ८३ ॥ म्हणाल प्रताप नसेल व्यक्त ॥ तरी कृतांताचें आसन पाळीत ॥
धाकें परचक्र आणून देत ॥ करभारातें न मागतां ॥ ८४ ॥ यापरी वर्णितां शरीरपुष्टी ॥ तरी म्हणवीतसे महीतें जेठी ॥ शतजेठी महीपुटी ॥
लावूनियां रगडीतसे ॥ ८५ ॥ यापरी आणीक कल्पाल चित्तीं ॥ कीं इतुकी स्थावर झाली शक्ती ॥ तरी भोगीत नसेल कामरती ॥ विषयीं
आसक्त नसेल तो ॥ ८६ ॥ तरी धर्मपत्नी शुभाननी ॥ असती नक्षत्रतेजप्रकरणीं ॥ खंजरीटमृगपंकजनयनी ॥ चंद्राकृती मिरवल्या
॥ ८७ ॥ चित्तज्ञ परम चातुर्यखाणी ॥ यापरी षोडशशत शुभाननी ॥ भोगांगना जयालागुनी ॥ राजांकीं मिरवल्या ॥ ८८ ॥
परी ते पाहतां स्वरूपखाणी ॥ कीं कामचि सांडावा ओंवाळुनी ॥ कीं उर्वशीच्या पंक्ती आणुनी ॥ दासी मिरवती तिला त्या
॥ ८९ ॥ गजगामिनी चपला अबळा ॥ तेजें लाजविती पाहून चंपळा ॥ शृंगारभरित असती सकळा ॥ चंद्र रात्रीं नक्षत्रीं ॥ ९० ॥
असो ऐसा नृपनाथ ॥ हेलापट्टणीं विराजित ॥ जयाची माता सद्गुणभरित ॥ मैनावती विराजली ॥ ९१ ॥ तंव ती सती मैना-
वती ॥ कोणे एके दिवशीं उपरीवरती ॥ दिशा न्याहाळी सहजस्थिती ॥ जालिंदरातें देखिलें ॥ ९२ ॥ तृणभार अधर मौळी ॥ मुक्तं

१ चंद्राप्रमाणें. २ शोभा. ३ पायदळ. ४ विजा. ५ यमाचें. ६ विषयसुख. ७ विजेला. ८ गोपीचंदाची आई. ९ माडीवर. १० मोकळा.

विराजला हस्तकमळीं ॥ पथिकासमान ग्राममेळीं ॥ मार्गीं येतसे पुढारां ॥ ९३ ॥ परी तेजःपुंज जैसा तरणी ॥ मदनाकृती स्वरूप-खाणी ॥ निःस्पृह निवृत्त योगींद्र मुनी ॥ देखियेला तियेनें ॥ ९४ ॥ मग म्हणे मैनावती ॥ अधर भारा मौळीवरती ॥ कैसा चाले धैर्यशक्ती ॥ काय असे तयातें ॥ ९५ ॥ नोहे आधार करबंधन ॥ तेही मिरवती मुक्तमन ॥ तरी हा कोणी प्रतापवान ॥ महीलागीं उतरला ॥ ९६ ॥ गेण किंवा गंधर्व सुरवर ॥ [३]विरिंची किंवा गंधर्व हरिहर ॥ कीं वाचस्पति [४]उशना थोर ॥ प्रतापवान हा असे ॥ ९७ ॥ परी सदृढ आराधोनि भक्तीं ॥ मिरवूं नरदेहसार्थकगती ॥ प्रसन्न करून चित्तभगवती ॥ अचळपद वरावें ॥ ९८ ॥ ऐसा विचार करूनि मनीं ॥ [५]परिचारिके पाचारुनी ॥ तेही सद्विवेकी सज्ञान प्राज्ञी ॥ जगामाजी मिरवीतसे ॥ ९९ ॥ सन्मुख उभी कर-संपुटीं ॥ जोडून बोले वागवटी ॥ कवण अर्थ उदेला पोटीं ॥ निवेदावा महाराज्ञी ॥ १०० ॥ येरी म्हणे वो गजगामिनी ॥ अर्थ उदेला माझे मनीं ॥ परी प्राणजीवित्व रक्षूनी ॥ कार्य आपुलें साधावें ॥ १ ॥ प्रगट होतां ती वार्ता ॥ परम पडेल क्षोभ चित्ता ॥ मग त्या उदकप्रवाहीं वाहतां ॥ परम संकट मिरवेल ॥ २ ॥ म्हणोनि गौप्य धरोनि वचन ॥ कार्यमांदुसा सोडिजे संधान ॥ मग तें वर्णितां सभाग्यपण ॥ अंबर ठेंगणें वाटतसे ॥ ३ ॥ म्हणोनि तिनें उभवूनि तर्जनी ॥ खुणें दाविलें तिजलागुनी ॥ कोण येत प्रविष्टतरणी ॥ मौळीं तृण वाहोनियां ॥ ४ ॥ तंव ती खूण परिचारिका ॥ पाहती झाली जालंदर विवेका ॥ तों मौळीं भारा अधर देखा ॥ सवें सवें चालतसे ॥ ५ ॥ तें पाहूनियां निजदृष्टीं ॥ विस्मय करी आपुले पोटीं ॥ म्हणे माय वो परम [६]धूर्जटी ॥ योगसिद्ध असे हा ॥ ६ ॥ कनकवर्ण बालार्ककिरणीं ॥ महीं मिरवतसे योगप्राज्ञी ॥ तरी हा [७]स्वर्भुवर्लोकप्राणी ॥ सहसा येत असे जननीये ॥ ७ ॥ सत्यलोक भूलोक तपोलोक ॥ तयाचे गमनें शोभती देख ॥ स्मरारि कीं स्मरजनक ॥ महीलागीं उतरला ॥ ८ ॥ तरी माय वो ऐक वचन ॥ सलीलभक्तीं आराधून ॥ तैं चित्तभगवती प्रसन्न करून ॥ कल्याणदरीं रिघावें ॥ ९ ॥ जैसें ध्रुवानें अढळपद ॥ जिंकूनि हरिला सकळ भेद ॥ जन्ममृत्यूंचे दृढ बंध ॥ मुक्त केले जननीये ॥ ११० ॥ तन्न्याय दास दासी ॥ ओपून अंशा शत पुरुषांसी ॥ चिरंजीव प्रसाद ओपून देहासी ॥ अचळ महीतें वर्तावें ॥ ११ ॥ ऐसी परिचारिकेची युक्ती ॥ ऐकून बोले मैनावती ॥ म्हणे माय वो तरुनी आर्ती ॥ चित्तस्वरूप करावें ॥ १२ ॥ तरी येवढा प्राज्ञीक ज्ञानी ॥ वस्तीस राहतो कोणे स्थानीं ॥ तितुकें गुज गोचर करूनी ॥ लगबगें येईं कां ॥ १३ ॥ अवश्य म्हणोनि परिचारिका ॥ जाती झाली सदैविका ॥ तंव तो संचारून ग्राम-लोका ॥ गोधनांतें पाहतसे ॥ १४ ॥ तंव तीं गोधनें ग्रामवाटीं ॥ अपार जात असती चव्हाटीं ॥ तृण सोडून ते थाटी ॥ सुपंथीं तेथ गमतसे ॥ १५ ॥ तंव ती दासी मागें मागें ॥ जात असे लगबगें ॥ मग गंधगल्लीं कुश्चळयोगें ॥ जाऊनियां बैसला ॥ १६ ॥

१ वाटसरू पांथाप्रमाणें. २ देवांचे भेद, जुटीनें असणारे. ३ ब्रह्मदेव. ४ शुक्राचार्य. ५ दासीला. ६ शंकर. ७ स्वर्गींचा.

तेथें क्षण एक उभी राहून ॥ पहात त्याचें अचळपण ॥ सूर्य पावे तों अस्तमान ॥ अचळस्थान रक्षिलें ॥ १७ ॥ मग ती येऊन वाताकृती ॥ पूर्ण सतीस झाली सांगती ॥ अमुक स्थानीं चित्तभगवती ॥ प्रसन्नचित्तीं स्थिरावे ॥ १८ ॥ कुश्चित जागा सुगंधव्यक्त ॥ माये वो असे सर्व एकांत ॥ तया स्थानीं पिशाचवत ॥ वस्तीलागीं ठिकाण ॥ १९ ॥ जेथें न राहे श्वानसूकर ॥ कर्दम कुवेग गंध अपार ॥ वस्ती विराजून पिशाचसर ॥ वल्गना ते वदतसे ॥ १२० ॥ ऐसी ऐकूनि तियेची वाणी ॥ म्हणे स्थिर वो शुभाननी ॥ रहित होतां जनसंबाधयामिनी ॥ मग जाऊं दर्शना ॥ २१ ॥ अवश्य म्हणोनि परिचारिका ॥ मग मध्ययामिनीं सद्विवेका ॥ उत्तम फळ ठेऊनि तबकां ॥ षड्रसानें मिरविलें ॥ २२ ॥ काळी कांबळी गुंतून बुंथी ॥ परिचारिका मैनावती ॥ येत्या जाहल्या स्थान एकांतीं ॥ लक्षोनियां महाराजा ॥ २३ ॥ तंव तो सिद्धरायमुनी ॥ परमहंसाच्या आव्हानून वहनीं ॥ मोक्षमुक्ताच्या ग्रहणार्थ ध्यानीं ॥ बैसलासे महाराजा ॥ २४ ॥ मग त्या उभय सहित युवती ॥ जाऊन लोटल्या पदावरती ॥ मूर्ध्निकमळ प्रेमभरतीं ॥ पदकमळीं ओपिती ॥ २५ ॥ सन्मुख जोडून उभय कर ॥ सप्रेम भक्ती वाग्उच्चार ॥ चातुर्यगंध म्लान अपार ॥ समर्पिली लाखोली ॥ २६ ॥ म्हणसी महाराजा सर्वज्ञराशी ॥ त्रिविधताप उभय उद्देशीं ॥ ते तूं दाहिले जीविलासीं ॥ मोक्षमांदुसा जाणूनियां ॥ २७ ॥ तरी ऐशिया तपोदरीं ॥ समयजलदा लक्षुनी अंतरीं ॥ कल्पनासदनाचा पेटला भारी ॥ विझवावया पातलों ॥ २८ ॥ तरी औदार्याचें पाहूनि मुख ॥ त्रिविधतापांचा सबळ पावक ॥ विझवुनी चित्तमहीतें पिक ॥ ब्रह्मकर्णीं पिकावें ॥ २९ ॥ ऐसें तयांचें वाग्उत्तर ॥ प्रविष्ट होतां निशिकर ॥ तेणेंकरूनि चित्तसागर ॥ आनंदलहरीं दाटला ॥ १३० ॥ दाटला परी संकोचित ॥ चंद्र आकाशीं उदधिमहींत ॥ तरी भक्तिपंथिका चक्रवात ॥ अस्ताचळीं योजावा ॥ ३१ ॥ ऐसें चित्त योजून नाथा ॥ दाविता झाला तीव्रवार्ता ॥ मैनावतीचे सफळ चित्ता ॥ किंवा कसोटी पाहतसे ॥ ३२ ॥ पिशाचचेष्टा उद्दामनीती ॥ आव्हानून सद्दढयुक्तीं ॥ महीचे पाषाण हातीं ॥ कवळोनियां झुगारी ॥ ३३ ॥ अशुभवाणीं करूनि वल्गना ॥ भंगूं पाहे चित्तप्रेमा ॥ मेघऔदार्याच्या दुर्गुणा ॥ पाषाणकरका ओसांडी ॥ ३४ ॥ परी ते जाया धैर्यवंत ॥ निश्चयअर्गळीं योजून चित्त ॥ म्हणे याचे हस्तें मृत्य ॥ आल्या मोक्ष वरीन मी ॥ ३५ ॥ ऐसें योजून सद्दढ मांडी ॥ बैसली ठाव कदा न सांडी ॥ जैसा पर्वत अचळ विभांडी ॥ मेघधारा न गणोनी ॥ ३६ ॥ परी तो नाथ जालिंदर ॥ ओसंडितां पाषाणपूर ॥ परी ती रामा वज्राकार ॥ अचळ पाहुनी तोषला ॥ ३७ ॥ मग हस्तें झाडून पाषाणधाडी ॥ म्हणे कोण तूं सांग गोरटी ॥ किमर्थ आज माझिये पृष्ठीं ॥ लागपाळती केली त्वां ॥ ३८ ॥ दुर्गंधी गल्ली ओंगळींत ॥ आहें उगलाचि मी पिशाच येथ ॥ तरी तुज पेटला किमर्थ अर्थ ॥ कामानळें दाटला ॥ ३९ ॥ कवण कोणाची नितंबिनी ॥ 

१ कुत्रा किंवा डुकर. २ चिखल. ३ स्त्रिया. ४ शिरकमळ. ५ अग्नि. ६ चंद्र. ७ निश्चयरूप अडसराचे ठिकाणीं. ८ बळकट. ९ पुष्कळ खडे मारलेतरी. १० स्त्री.

वेगीं वद वो शुभाननी ॥ आम्ही तपी अलक्ष ध्यानीं ॥ लक्ष भंगाया कां आलीस ॥ १४० ॥ यावरी म्हणे ती महाराजा ॥ त्रिलोचनराज विजयध्वजा ॥ तयाची कांता सर्वज्ञभोजा ॥ धर्मपत्नी मी असें ॥ ४१ ॥ असें परी जी योगेंद्रुमा ॥ काळें भक्षून पतिउत्तमा ॥ मातें केलें प्लवंगमा ॥ जगामाजी मिरवावया ॥ ४२ ॥ ऐसेपरी योगजेठी ॥ काळचक्र पाहनी राहटी ॥ मग भयार्क-उदक पाहुनी पोटीं ॥ पश्चात्तापीं मिरविलें ॥ ४३ ॥ काळें पतीची केली गती ॥ तैसीच करील मम आहुती ॥ तरी मानवसन्निपातीं ॥ आस्तीक मातें होईं कां ॥ ४४ ॥ येरी म्हणे त्वद्धर्ता ॥ पावोनि लया त्वरिता ॥ कवणआश्रमीं काळचरिता ॥ लोटसी तूं जननीये ॥ ४५ ॥ येरी म्हणे वो सदैवभरिता ॥ सुत एक आहे प्रपंचा ॥ येरू म्हणे कवण अर्था ॥ प्रपंचराहटी चालवी ॥ ४६ ॥ तंव ती म्हणे गौडबंगाल ॥ राज्यसदनीं देश विपुल ॥ तयाचा नृप गोपीचंद मूल ॥ दास तुमचा विराजे ॥ ४७ ॥ परी असो कर्मराहटी ॥ कृतांतउद्देशाचे पाठीं ॥ मम मौळींचा भार निवटीं ॥ कृपा ज्ञणीं करूनियां ॥ ४८ ॥ ऐसें ऐकूनि तियेचें वचन ॥ म्हणे कृतांतपाश दृढबंधन ॥ कैसें तुटे गे मम पिशाचान ॥ तुवां काय जाणितलें ॥ ४९ ॥ तरी आतां क्षण उभी न राहीं ॥ वेगीं आपुल्या सदना जाईं ॥ तव सुता कळतां अनर्थप्रवाहीं ॥ मति त्याची मिरवेल ॥ १५० ॥ ऐसें बोलतां सांगोपांग ॥ तों मित्र-उदयाचा पाहिला मार्ग ॥ मग नमस्कारुनी स्वामि सवेग ॥ सदनाप्रती पातली ॥ ५१ ॥ पातली परी अर्थवियोग ॥ चित्तसरितीं दाटला भाग ॥ अति तळमळे प्रसादमार्ग ॥ कृपार्णवीं भेटावया ॥ ५२ ॥ ऐसी तळमळे दुःखव्यथा ॥ तों दिनकर लोटला अस्ता ॥ होतां चंद्रविकास ती वनिता ॥ विकासली आनंदें ॥ ५३ ॥ पुन्हां घेऊन परिचारिका ॥ तेथें आली सदयविवेका ॥ दृष्टीं पाहून योगि-मृगांका ॥ चरणीं माथा ठेवीतसे ॥ ५४ ॥ मग सलगभक्तीची करून दाटी ॥ सदृढ चरणीं घातली मिठी ॥ पद कवळोनि हस्त-पुटीं ॥ पद चुरीत प्रेमानें ॥ ५५ ॥ ऐशी सेवा दोन प्रहर ॥ करितां अगम्यलीला प्रभाकर ॥ तें पाहूनि नमस्कार ॥ स्वामीस करूनि उठतसे ॥ ५६ ॥ पुन्हां येऊनियां सदनीं ॥ आचरे आपुली प्रपंचराहणी ॥ अस्त होतांच वासरमणी ॥ स्वामीसी जाऊनि लक्षीतसे ॥ ५७ ॥ सद्भावउदय दाऊनि प्रेमा ॥ सेवा करीतसे मनोधर्मा ॥ परी सेवा करितां षण्मासउगमा ॥ दिन लोटून गेले पैं ॥ ५८ ॥ यापरी कोणे एके दिवशीं ॥ काळुखी दाटली अपार महीसी ॥ परी सेवा करावयासी ॥ पातली नित्यनेमानें ॥ ५९ ॥ तंव तो मूर्धीखालीं अंक ॥ ठेऊनियां देतसे टेंक ॥ त्या संधींत योगिनायक ॥ काय करिता झाला पैं ॥ ६० ॥ माईक सबळ करूनि भ्रमर ॥ रुंजी घाली तयावर ॥ न कळतां येऊन महीवर ॥ अंकाखालीं रिघाला ॥ ६१ ॥ ऐसें करूनि अवस्थेंत ॥ आपण गाढ झाले निद्रिस्थ ॥ चलनवलन सांडूनि स्थित ॥ कंठीं घोर वाजवी ॥ ६२ ॥ तंव तो षट्पद जानूपरी ॥ फोडूनि निघाला नेटें उपरी ॥

१ ध्यानयोगामध्यें गढलेले. २ ज्याचें योगसामर्थ्य वृक्षाप्रमाणें पसरलें आहे. ३ मरणधर्मी मनुष्यांकडे लक्ष देऊन. ४ मस्तकावरील. ५ सूर्य. ६ भ्रमर.

ग्रीवे डसून जालिंदरा परी ॥ सुचविलें अर्थातें ॥ ६३ ॥ तंव तो लगबगें अति त्वरित ॥ उठोनि हस्तें पाहे ग्रीवेंत ॥ ग्रीवा पाहोनि सैतीअंकांत ॥ दृष्टी करी महाराजा ॥ ६४ ॥ अंका फोडोनि पडे छिद्र ॥ रुधिर दाटलें महीं अपार ॥ तें पाहूनियां जालिंदर ॥ धैर्यबळ ओळखिलें ॥ ६५ ॥ मग सहज कृपेची करोनि दृष्टी ॥ मौळीं कुरवाळी कृपाजेठी ॥ मग तारकमंत्र कर्णपुटीं ॥ उपदेशिला तत्काळ ॥ ६६ ॥ मंत्रउपदेश ओपितां कानीं ॥ खूण व्यक्त दाविली संजीवनी ॥ तेणें खुणें पारायणी ॥ ब्रह्मव्यक्त झालीसे ॥ ६७ ॥ किंबहुना चराचरीं ॥ जीव तितुका जंगमस्थावरीं ॥ अहंब्रह्म भुवनापासुनी आकारीं ॥ ब्रह्मदृष्टि हेलावे ॥ ६८ ॥ ऐसा होतां चमत्कार ॥ मग मौळी ठेवी चरणावर ॥ म्हणे महाराजा सकळ व्यापार ॥ आजि मिरवला सुगमत्वें ॥ ६९ ॥ यापरी तो कृपाळु मोक्षदानी ॥ आणिक करिता झाला करणी ॥ मंत्रप्रयोगें संजीवनी ॥ ते देहीं प्रेरीतसे ॥ १७० ॥ जी निर्जीविला उठवील ॥ ती जीविला काय न करील ॥ असो मैनावतीसी अमरवेल ॥ देहीं होऊन ठेविलीसे ॥ ७१ ॥ जैसें रामें दानवकुशीं ॥ चिरंजीव केलें बिभीषणासी ॥ तन्न्यायें मैनावतीसी ॥ श्रीजालिंदरें केलें पैं ॥ ७२ ॥ मग नित्यनित्य प्रेमभक्ती ॥ विशाल मिरवे भावस्थिती ॥ परी आणीक काम उदेला चित्तीं ॥ पुत्रमोहें करोनियां ॥ ७३ ॥ मनांत म्हणे चमत्कार ॥ जानू भेदिली स्थिर भ्रमरें ॥ त्या दुःखाचा घाय अनिवार ॥ जानूवरी मिरवला ॥ ७४ ॥ घाय पडतां अनिवार ॥ अशुद्धाचा लोटला पूर ॥ तयेवर स्पर्शतां कर ॥ जैसी तैसी मिरविली ॥ ७५ ॥ तरी सध्यां चमत्कार ॥ झाला मम दृष्टीं गोचर ॥ आणीक केलें सनातनसार ॥ ब्रह्मव्यक्तिपरायण ॥ ७६ ॥ तरी चिरंजीवपद देऊन मातें ॥ अचल केलें त्रैलोक्यातें ॥ याच रीतीं माझ्या सुतातें ॥ होतें तरी फार बरवें ॥ ७७ ॥ ऐसें योजून दृढमानसीं ॥ वियोगव्यथा वरिली देहासी ॥ ती व्यथा नरहरिवंशीं ॥ धुंडीसुत मालू सांगे ॥ ७८ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागार ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ त्रयोदशाध्याय गोड हा ॥ १७९ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

१ मानेला. २ त्या पतिव्रतेच्या मांडीवर. ३ रक्त. ४ मस्तक.

॥ नवनाथभक्तिसार त्रयोदशाध्याय समाप्त ॥

## अध्याय १४वा.






श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी पंढरीनाथा ॥ समचरणीं भक्ततापशमिता ॥ कटीं कर नासाग्रीं दृष्टी ठेविता ॥ होसी रंजिता मुनिमानसा ॥ १ ॥ ऐसा स्वामी तूं करुणाकर ॥ तरी तूं बोलवीं भक्तिसार ॥ मागिले अध्यायीं कथानुसार ॥ परम कृपें वदविला ॥ २ ॥ त्या कृपेचा बोध सबळ ॥ ब्रह्मउदधि पावला मेळ ॥ पात्रा मैनावती सबळ ॥ सरिताओघीं दाटली ॥ ३ ॥ ॐ नमो ब्रह्मार्णवीं दाटली परी ॥ ऐक्यरूप झाली सारी ॥ मोहें पुत्राचे परिवारीं ॥ गुंतलीसे जननी ते ॥ ४ ॥ मनास म्हणे अहा कैसें ॥ त्रिलोचनरायाचें जाहलें जैसें ॥ त्याच नीतीं होईल तैसें ॥ मम सुताचें काय करूं ॥ ५ ॥ जंव जंव पाहे त्यातें दृष्टीं ॥ तंव तंव वियोग वाटे पोटीं ॥ हृदयीं कवळून जठरवेष्टी ॥ होत असे मोहानें ॥ ६ ॥ अहा पुत्राचें चांगुलपण ॥ दिसे जैसा प्रत्यक्ष मदन ॥ परी काय करावें चांगुलपण ॥ भस्म होईल स्मशानीं ॥ ७ ॥ उत्कृष्टपणें करोनि कष्ट ॥ धाम उभविलें अति श्रेष्ठ ॥ परी वैन्हिबळें लागल्या काष्ठ ॥ तेवीं असे काळाग्नी ॥ ८ ॥ पहा पल्लवपत्रझाड ॥ अति विशाळ लवला पाड ॥ परी गाभारीं वेष्टितां भिरूड ॥ उशाशीं काळ बैसला ॥ ९ ॥ तन्यायें दिसून येत ॥ वायां जाईल ऐसा सुत ॥ कीं कैंद्रूलागीं चोखट अमृत ॥ फिकरपणें मिरवलें ॥ १० ॥ कीं यत्नेंकरूनी कचें दुर्घट ॥ संजीवनीचा केला पाठ ॥ परी देवयानीचा शाप उँल्हाट ॥ यत्न व्यर्थ तो झाला ॥ ११ ॥ कीं सुंदर जाया कर्मे जारिणी ॥ परी पतिभयाचा धाक मनीं ॥ तेवीं तो उशाशीं काळ बैसोनी ॥ सकळ जनां मिरवला ॥ १२ ॥ कीं कुसुमसेज मृदुलाकार ॥ परी उसां घालून निजे विखार ॥ ते सुखनिद्रेचा व्यापार ॥ सुखा लाहे केउता ॥ १३ ॥ तन्यायें झालें येथ ॥ राजवैभव अपरिमित ॥ परी काळचक्राची सबळ वात ॥ भ्रमण करीत असे पैं ॥ १४ ॥ ऐसी सदासर्वकाळ ॥ चित्तीं वाहे माय तळमळ ॥ परी सुतास बोध कराया बळ ॥ अर्थ कांहीं चालेना ॥ १५ ॥ तंव कोणे एके दिवशीं ॥ शीतकाळ माघमासीं ॥ उपरी सहपरिचारिकेंसीं ॥ उष्ण घेत बैसलीसे ॥ १६ ॥ ते संधींत गोपीचंद ॥ चौकीविभागीं सकळ स्त्रीवृंद ॥ वेष्टून स्नान कराया सिद्ध ॥ चंदनचौकीं बैसला ॥ १७ ॥ चंदनचौकी परी ते कैशी ॥ हेमतगटीं रत्न जैशी ॥ जडावकोंदणीं नक्षत्रांसीं ॥ राजवृंदीं चमकतसे ॥ १८ ॥ सकळ काढून अंगींचें भूषण ॥ वरी विराजे राजनंदन ॥ उष्ण उदकीं करीत दंतधावन ॥ चौकीवरी बैसला ॥ १९ ॥ तों ऊर्ध्व उपरी मैनावती ॥ झाली स्वसुतातें पाहती ॥ परी देखिला जैसा पूर्ण गभस्ती ॥ तेजामाजी डवरला ॥ २० ॥ राजसेवकांचें भोंवतें वेष्टन ॥ परिचारिका वाहती जीवन ॥ परी त्या मंडळांत नृपनंदन ॥ चांगुलपणीं मिरवतसे ॥ २१ ॥ जैशा अपार नक्षत्रपंक्ती ॥ आव्हानी उँडुगणपती ॥ कीं हेमचौकीं कोंदणस्थिती ॥ रत्नतेजीं मिरवत ॥ २२ ॥ ऐसा पाहतां स्वनंदन ॥ मोहें आलें उदरवेष्टन ॥ तेणें लोटलें अपार जीवन ॥ चैक्षूंतून झराटलें ॥ २३ ॥ परी ते बुंद अकस्मात ॥ मोहें प्राणाचे उद्भवव्यक्त ॥ गोपीचंद-

१ भक्तांचीं दुःखें नाहींशीं करणाऱ्या. २ गोपीचंदाच्या बापाचें. ३ घर. ४ अग्नीच्या योगानें. ५ भेंड. ६ नागांच्या मातेला. ७ मोठा. ८ चंद्र. ९ डोळ्यांतून अश्रू.

चातकातें ॥ स्पर्शावया धांवले हो ॥ २४ ॥ म्हणाल बुंद चक्षूदकीं ॥ नोहे उरते सत्कर्मवाकीं ॥ उत्तम फळातें लक्षून [1]सेकीं ॥ व्यक्त जलें ते अंगासी ॥ २५ ॥ बुंद नव्हती ते चिंतामणी ॥ हरुष केला भवकाचणीं ॥ कीं कृतांतभयातें संजीवनी ॥ भूपशरीरा आदळले ॥ २६ ॥ कीं अर्कें पीडित भारी ॥ नृपजन वेष्टला नगरीं ॥ तैं ते उतरले घन मनहरी ॥ बुंदवेष धरूनियां ॥ २७ ॥ कीं काळक्षुधेचा पेटला अनळ ॥ तेणें शरीर झालें विकळ ॥ ते संधींत होऊन कृपाळ ॥ कामधेनु उतरली ॥ २८ ॥ कीं दरिद्राचें अतिवेष्टन ॥ तैसा येथें मिरवला कुबेर येऊन ॥ तन्न्याय सुबुंद घन ॥ रावहृदयीं आदळले ॥ २९ ॥ शरीरीं होतां बुंद लिप्त ॥ परी उद्भवस्थिती लागली त्यांत ॥ म्हणून ऊर्ध्व करून मूर्धातें ॥ नभालागीं विलोकी ॥ ३० ॥ हृदयीं होऊन राव शंकित ॥ म्हणे बुंद कैंचा उद्भवला येथ ॥ तरी अंबर झालें असेल व्यक्त ॥ घनमंडळ आगळें ॥ ३१ ॥ म्हणूनि ऊर्ध्व करूनि दृष्टी ॥ पाहता झाला नभापोटीं ॥ परी ते निर्मळपणें वृष्टी ॥ झाली कोठून म्हणतसे ॥ ३२ ॥ ऐसा विचार करितां चित्तीं ॥ दृष्टिगोचरी संभविती ॥ तों रुदन करितां मैनावती ॥ निजदृष्टीं देखिली ॥ ३३ ॥ करीत होता दंतधावन ॥ तैसाच उठला नृपनंदन ॥ उपरी त्वरा वेगीं चढून ॥ मातेपाशीं पातला ॥ ३४ ॥ जातांच पदीं ठेवून माथा ॥ उभा जोडुनी दोन्ही हस्तां ॥ म्हणे सांग जी कवणे अर्था ॥ उचंबळलीस जननीये ॥ ३५ ॥ मजसारखा तूतें सुत ॥ राज्याधीश महीं व्यक्त ॥ ऐसा असून दुःखपर्वत ॥ कोठून उदेला तव चित्तीं ॥ ३६ ॥ पाहें पाहें प्रताप आगळा ॥ न वर्णवे बळ बळियांकित महीपाळा ॥ मिरवती दर्पकंदर्प केवळा ॥ करभारातें योजिती ॥ ३७ ॥ ऐसी असतां बळसंपत्ती ॥ बोललें कोणीं दुःखसरितीं ॥ तरी मम कोपाचा दाहक [2]गभस्ती ॥ सांवरेल कोणातें ॥ ३८ ॥ जेणें पाहिलें असेल नयनीं ॥ उगीच तीव्र दृष्टी करोनी ॥ तरी तयाचें क्षणें चक्षु काढोनी ॥ तव करीं माये ओपीन गे ॥ ३९ ॥ किंवा दाविलें असे बोटीं ॥ तरी तींच बोटें काढीन शेवटीं ॥ तरी कवण अर्थ उदेला पोटीं ॥ रुदन कराया जननीये ॥ ४० ॥ अष्टविंशति स्त्रीमंडळ ॥ कीं त्यांनीं ओपिलें कडुवट फळ ॥ तरी शिक्षा करूनी तया सबळ ॥ मोक्षपंथा मिरवीन ॥ ४१ ॥ किंवा माझिये दृष्टी सेवेशीं ॥ उदया पावला अंतरशेषीं ॥ म्हणून उदय शोकनिशीं ॥ दर्शविली त्वां माते ॥ ४२ ॥ तरी कोणता कवण अर्थ ॥ माते वदें प्रांजळवत ॥ कामनीं वेधक असेल चित्त ॥ तोचि वेध निवटीन मी ॥ ४३ ॥ म्हणसील कार्य आहे थोर ॥ करूं न शके सुत पामर ॥ तरी हा देह वेंचून समग्र ॥ अर्थ तुझा पुरवीन मी ॥ ४४ ॥ जरी ऐशिया दृष्टीं ॥ अंतर पडेल काय पोटीं ॥ तरी धिक्कार असो मज शेवटीं ॥ पुत्रधर्म मिरवावया ॥ ४५ ॥ मग श्वान सूकर काय थोडीं ॥ अवतार मिरविती द्वारीं पवाडी ॥ याच नीतीं तया प्रौढीं ॥ निर्माण झालों मी एक ॥ ४६ ॥ अहा पुत्रधर्म मग कैसा ॥ माता पिता दुःखलेशा ॥ पाहून चित्तीं परी

[1] शिंपून. [2] अग्नि. ३ मस्तकाला. ४ आकाश. ५ मोठा. ६ सूर्य.

हरुषा ॥ भूभार तो नर एक ॥ ४७ ॥ आपण मिरवे राणिवाप्रकरणीं ॥ मातापिता दैन्यवाणीं ॥ तयाचे भारें सकळ मेदिनी ॥ विव्हळ दुःखें होतसे ॥ ४८ ॥ कांतेलागीं शृंगार व्यक्त ॥ मातेस वैसन नेसावया भ्रांत ॥ तयाचे भारीं धरा समस्त ॥ विव्हळ दुःखी होतसे ॥ ४९ ॥ कांतेस नेसावया वस्त्र भरजरी ॥ माता ग्रंथीं चीर सांवरी ॥ तयाचे भारें सकळ धरित्री ॥ विव्हळ दुःखें होतसे ॥ ५० ॥ कांतेस इच्छासमान देणें ॥ मातेस खावया न मिळे अन्न ॥ तयाचे भारें पृथ्वी सघन ॥ विव्हळ दुःखें होतसे ॥ ५१ ॥ कांतेस बसावया उंच आसन ॥ मातेस कष्टवी दासीसमान ॥ तयाचे भारें धरारत्न ॥ विव्हळ दुःखी होतसे ॥ ५२ ॥ रंभेसमान कांता ठेवी ॥ भूतासमान माता मिरवी ॥ तयाचे भारें धरादेवी ॥ विव्हळ दुःखी होतसे ॥ ५३ ॥ जन्म घेतला जियेचे पोटीं ॥ तीतें म्हणे परम करंटी ॥ तयाचे भारें धरा हिंपुटी ॥ विव्हळ दुःखी होतसे ॥ ५४ ॥ कांता सर्व सुखाचे मेळीं ॥ माता दुःखें अश्रु ढाळी ॥ तयाचे भारें धरा विव्हळी ॥ अति दुःखी होतसे ॥ ५५ ॥ कांतेलागीं मृदु भाषण ॥ मातेस हृदयीं खोंची बाण ॥ तयाचे भारें धरारत्न ॥ विव्हळ दुःखी होतसे ॥ ५६ ॥ आपण मिरवे राणिवासरसा ॥ पितया काळा मातंग जैसा ॥ तयाचे भारें धरा क्लेशा ॥ विव्हळ दुःखी होतसे ॥ ५७ ॥ आपण कंठी कुब्या पहुडी ॥ पित्याशिरीं बत्त्या जोडी ॥ तयाचे भारें धरा मुख मुरडी ॥ विव्हळ दुःखी होतसे ॥ ५८ ॥ आपण भक्षी सदा सुरस अन्न ॥ पितर मागती भिक्षा कदन्न ॥ तयाचे भारें धरारत्न ॥ विव्हळ दुःखी होतसे ॥ ५९ ॥ तरी ऐसिये पुत्र सृष्टीं ॥ गळावेत गर्भींहुनी शेवटीं ॥ तन्न्याय अर्थ पोटीं ॥ माझा न धरीं जननीये ॥ ६० ॥ जे तुज वेधक मनकामना ॥ तयासाठीं वेंचीन प्राणा ॥ परी माये वो तव वासना ॥ पूर्ण करीन निश्चयेंसीं ॥ ६१ ॥ ऐसी बोलतां स्वसुत वार्ता ॥ प्रेमाब्धि उचंबळला चित्ता ॥ मग हितार्थरत्न द्यावया हाता ॥ वाग्लहरी उचंबळे ॥ ६२ ॥ म्हणे बा रे ऐक वचन ॥ प्रेमउदयाचळीं तूं दिव्यरत्न ॥ उदय पातलासी चंडकिरण ॥ शत्रुतम निवटावया ॥ ६३ ॥ तया ठायीं अंधकार ॥ मज पीडा बा काय करणार ॥ परिस लाधल्या वस्तीस दरिद्र ॥ स्वप्नामाजी नांदेना हो ॥ ६४ ॥ बा रे तव प्रतापदर्प ॥ पादरज झाले भूप ॥ ऐसें असतां कोपकंदर्प ॥ मातें कोण विवरील ॥ ६५ ॥ बा रे तीव्र प्रतापी स्थावर केसरी ॥ तयाचे लेंकुरा वारण मारी ॥ हा विपर्यास कवणेपरी ॥ मिरवूं लाहे जगातें ॥ ६६ ॥ राया नरेंद्रा तुझी मी माता ॥ मातें कोण होय गांजिता ॥ परी चिंता उदरीं मोहव्यथा ॥ शोकतरू उद्भवला ॥ ६७ ॥ बा रे तव स्वरूप पूर्ण अर्क ॥ पाहतां मातें उदेला शोक ॥ म्हणसील जरी अर्थदायक ॥ कवणापरी उदेला तो ॥ ६८ ॥ बा रे तव पिता तव समान ॥ स्वरूप उदेलें अर्कप्रमाण ॥ परी काळअस्ताचळीं जाऊन ॥ गुप्त झाला पुरुष तो ॥ ६९ ॥ अहा अपार तो स्वरूपाब्धी ॥ अंतीं वेष्टी वडवानळसंधी ॥ पडतां बा रे विशाल बुद्धी ॥ भस्म झाला क्षणांतरीं ॥ ७० ॥

१ राजासमान. २ पृथ्वी. ३ वस्त्र. ४ फाटलेलीं वस्त्रें गांठी मारून नेसते. ५ कष्टी. ६ हत्ती. ७ सूर्य.

अस्थी जळाल्या काष्ठासमान ॥ लोम दाहिलें जेउतें तृण ॥ मांसस्नेहाचें होऊनि शोषण ॥ स्वरूपातें लोपला तो ॥ ७१ ॥ तंव त्या भयाची हुडहुडी मोठी ॥ बा रे मज उदेली पोटीं ॥ तुझें स्वरूप पाहतां दृष्टीं ॥ भयातें उठी उठावे ॥ ७२ ॥ बा रे कृतांत महा-विखार ॥ धुसधुसित वारंवार ॥ टपून बैसला जैसा मांजर ॥ मूषकातें उचलावया ॥ ७३ ॥ जैसा व्याघ्र जपे गाई ॥ कीं मीन वेंची बगळा प्रवाहीं ॥ तैसें जगातें तन्यायीं ॥ कृतांत आहारीं नटलासे ॥ ७४ ॥ तरी तो व्याघ्र ऐसा सबळ ॥ जिंकून योजावा पिंजरीं मेळ ॥ बा रे तैं भयाचा वडवानळ ॥ मग स्पर्शणार नाहीं देहातें ॥ ७५ ॥ बा रे विखार डंखी दुःख ॥ तेंचि वेंचिल्या सकळ सुख ॥ कंटकीं धरल्यास सकळ वृश्चिक ॥ वेदनेतें मिरवेना ॥ ७६ ॥ ऐसेपरी रचून युक्ती ॥ सकळ हरावी कृतांतगती ॥ व्यर्थ शरीराची माती ॥ करूं नये जन्मल्यानें ॥ ७७ ॥ आपण आपलें पहावें हित ॥ सारासार नरदेहांत ॥ पाहें वश्य करूनि रघुनाथ ॥ चिरंजीव झाला बिभीषण ॥ ७८ ॥ पाहें नारद वैष्णव कैसा ॥ विष्णु आराधी नरवेषा ॥ तो श्रीगुरु वरून वरदेशा ॥ अमरपणीं मिरवला ॥ ७९ ॥ त्याच नारदासी कृपाघन ॥ बोलला श्रीव्यास महीकारण ॥ तेणें पिकलें ब्रह्मपण ॥ शुकमहाराज तिसरा ॥ ८० ॥ त्याचा कौशिक अनुगृहीत ॥ तेणें करोनी शरणागत ॥ कृष्णयाज्ञवल्की तारून निश्चित ॥ तेणें तारिला रामानुज ॥ ८१ ॥ ऐसा प्रकाश सांप्रदाय मिरवून ॥ ते पुरुष झाले ब्रह्मसनातन ॥ तेवीं तूं बाळा माझा नंदन ॥ जगामाजी मिरवीं कां ॥ ८२ ॥ ऐसें बोधितां मैनावती ॥ संपली येथून तिची उक्ती ॥ परी श्रोते कवी ते संप्रदाय पुसती ॥ सांगा म्हणती चातुर्य ॥ ८३ ॥ ऐसा प्रश्न कवी पाहून ॥ सांगे संप्रदाय पूर्ण ॥ रामानुजापासून ॥ योगिया संत पैं झाला ॥ ८४ ॥ तयापासून मुकुंदराज ॥ मुकुंदराजाचा जैतपाल भोज ॥ जैतपालाचा धर्मानुज ॥ बोधल्यादिक पैं त्याचे ॥ ८५ ॥ यापरी द्वितीय संप्रदायी ॥ माता सुतातें लोटी बोधप्रवाहीं ॥ उमेनें[३] आराधोनि शिवगोसावी ॥ चैतन्यसंप्रदायीं मिरवला ॥ ८६ ॥ त्यानें बोधिला कपिलनामी ॥ आणि दुसरा राघवचैतन्य-स्वामी ॥ राघवाचा ब्रह्मचैतन्य नेमी ॥ तयाचा केशवचैतन्य ॥ ८७ ॥ केशवाचा बावाचैतन्य ॥ श्रीतुकाराम त्याचा धन्यधन्य ॥ हा चैतन्यसंप्रदाय उत्तम मान्य ॥ संतगणीं मिरवतो ॥ ८८ ॥ यापरी तिसरा संप्रदाय ॥ महाश्रेष्ठ म्हणती स्वरूपमय ॥ तरी प्रथम बोधिला कमलोद्भव[४] ॥ हंसरूपें[५] श्रीविष्णूनें ॥ ८९ ॥ ते विधीचे सकळ हित ॥ अत्रीनें घेतले सकळ पंथ ॥ अत्रीपासुनी झाले दत्त ॥ तयापासुनी नाथ सकल ॥ ९० ॥ यापरी सांप्रदाय पाहें ॥ चवथा नंद महीतें आहे ॥ सूर्यापासुनी याज्ञवल्की पाहें ॥ ब्रह्मवेत्ता मिरवला ॥ ९१ ॥ तयापासून सहजानंद ॥ सहजानंदाचा कूर्मअवतार प्रसिद्ध ॥ कूर्मानें उपदेशिला ब्रह्मानंद ॥ ब्रह्मानंदाचा योगा-नंद कीं ॥ ९२ ॥ योगानंदाचा चिदानंद ॥ जगीं मिरवत आहे प्रसिद्ध ॥ तरी तुवां गोपीचंद ॥ हित करून घेईं कां ॥ ९३ ॥

१ काळ. २ सर्प. ३ पार्वतीनें. ४ कमलापासून ज्याची उत्पत्ति असा ब्रह्मदेव. ५ हा इतिहास श्रीभागवताच्या एकादशस्कंधांत आहे.

तेणेंकरून अमरपणीं ॥ जगीं मिरवसी महाप्राज्ञी ॥ यास्तव बा रे माझे नयनीं ॥ अश्रू लोटले तुजलागीं ॥ ९४ ॥ याउपरी बोले नृपनाथ ॥ बोलसी माते सत्यार्थ ॥ परी प्रस्तुतकाळीं ऐसा नाथ ॥ कोण मिळेल आम्हांतें ॥ ९५ ॥ मुळींच असेल अमरपणीं ॥ जो ओपील[1] अपरवाणी ॥ ऐसा गोचर आम्हांलागुनी ॥ कोठून होईल जननीये ॥ ९६ ॥ ऐसी ऐकून तयाची मात ॥ माता बोलती झाली त्यातें ॥ बा रे तैसाचि आपुले गांवांत ॥ जालिंदरनाथ मिरवला ॥ ९७ ॥ स्वरूप सांप्रदाय परिपूर्ण ॥ तूतें करील ब्रह्मसनातन ॥ तरी तूं कायावाचामनेंकरून ॥ शरण जाईं तयासी ॥ ९८ ॥ बा रे तुझें वैभव थोर ॥ राजकारणी कारभार ॥ परी माइक सकळ विस्तार ॥ लया जाईल बाळका ॥ ९९ ॥ तरी तनमनधनप्राण ॥ शरण रिघावें तयाकारण ॥ आपुलें हित अमरपण ॥ जगामाजी मिरवीं कां ॥ १०० ॥ ऐसें ऐकोनि मातेचें वचन ॥ बोलता झाला त्रिलोचननंदन[2] ॥ म्हणे माते तयासी शरण ॥ जालिया योग्यता फिरावें ॥ १ ॥ सकळ टाकूनि सुखसंपत्ती ॥ राजवैभव दारासुती[3] ॥ आप्तवर्गादि सोयरेजाती ॥ टाकूनि योग कैसा करावा कीं ॥ २ ॥ तरी द्वादशवरुषें मातें ॥ भोगूं दे सकळ वैभवातें ॥ मग शरण रिघून त्यातें ॥ योगालागीं कशीन कीं ॥ ३ ॥ कशीन तरी परी कैसा ॥ मिरवीन ब्रह्मांडांत ठसा ॥ कीं उत्तानपादराजसुता-[4] ॥ परी शिक्का जगामाजी मिरवीन ॥ ४ ॥ माता म्हणे बाळा परियेसीं ॥ पळ घडी भरंवसा नाहीं देहासी ॥ तेथें संवत्सर म्हणतां द्वादशी ॥ देखिले कोणी बाळका ॥ ५ ॥ चित्त वित्त आणि जीवित्व आपुलें ॥ अचळ नोहे अशाश्वत ठेलें ॥ क्षणैक काय होईल न कळे ॥ क्षणभंगुर वर्ततसे ॥ ६ ॥ बा रे उदकावरील बुडबुडा ॥ कोण पाहील अशाश्वत चाडा ॥ वंध्यापुत्रें घेतला वाडा ॥ मृगजळा केवीं तृषार्त ॥ ७ ॥ तेवीं बा रे सहजस्थितीं ॥ बोलतां न ये अशाश्वती ॥ स्वप्नप्रवाहीं इंद्रपदासी ॥ भोगितां खरें न मानावें ॥ ८ ॥ तन्याय आभासपर ॥ सकळ मिरवतसे चराचर ॥ त्यांतून कोणीएक रणशूर ॥ शाश्वतपदा मिरवतसे ॥ ९ ॥ शुक दत्तात्रेय कपिलमुनी ॥ व्यास वसिष्ठाची मांडणी ॥ प्रल्हादादिक भागवतधर्मी ॥ ऐसे कोणीं निवडले ॥ ११० ॥ नाहींतरी होताती थोडीं ॥ सकळ बांधिलीं प्रपंचबेडीं ॥ परी यमरायाच्या रक्षकवाडीं ॥ एकसरां कोंडिलीं ॥ ११ ॥ म्हणून बा रे सांगतें तुज ॥ शाश्वत नोहे काळ समस्त ॥ कोणे घडी घडेल केउत ॥ अकलकळा कळेना ॥ १२ ॥ ऐसा बोध माता करितां ॥ लुमावंती तयाची कांता ॥ गुप्तवेषें श्रवण करितां ॥ हाय हाय म्हणतसे ॥ १३ ॥ म्हणे माता नोहे पापिणी ॥ पुत्रास योजिती पुत्रकाचणी ॥ ऐसी राज्यविभवमांडणी ॥ जोग देऊं म्हणतसे ॥ १४ ॥ तरी राज्यास आली विवशी[5] ॥ उपाय काय करावा यासी ॥ रामासारिखा पुत्र वनवासीं ॥ कैकेयीनें धाडिला ॥ १५ ॥ स्वप्नताराचा घेतला प्राण ॥ चतुर्थपुत्रा लाविलें रानोरान ॥ तन्याय आम्हांकारणें ॥ देव क्षोभला वाटतसे ॥ १६ ॥ दुष्ट स्वप्न दृष्टीं येतां ॥ तर्कीं

---

१ मोठा आशीर्वाद. २ गोपीचंद राजा. ३ स्त्री आणि पुत्र. ४ उत्तानपाद राजाचा पुत्र ध्रुव त्याप्रमाणें. ५ अवदशा.

मानिती विनाश चित्ता ॥ म्हणतां प्रवेशली दुःखव्यथा ॥ तरी देव क्षोभतात ॥ १७ ॥ दासदासी आपुले हातीं ॥ आज्ञेमाजी सकळ वर्तती ॥ ते अवज्ञा करोनि उत्तर देती ॥ तरी देव क्षोभला जाणावें ॥ १८ ॥ सहज ठेविलें धनमांदूस [1] ॥ पुढें काढूं जातां कार्यास ॥ तें न सांपडे ठेवित्यास ॥ तरी देवक्षोभ जाणिजे ॥ १९ ॥ सभेस्थानीं सत्यार्थगोष्टी ॥ करितां अनृत वाटे चावटी ॥ लोक बैसती चेष्टेपाठीं ॥ तरी देवक्षोभ जाणिजे ॥ १२० ॥ आपुलें धन लोकांवरी सांचे ॥ तें मागूं जातां स्वयें वाचे ॥ ते म्हणती काय घेतलें तुझ्या बापाचें ॥ तरी देवक्षोभ जाणिजे ॥ २१ ॥ आपुली विद्या तीव्रशस्त्र ॥ शत्रुकाननीं विनाशपात्र ॥ ती कार्यार्थ न मिरवे स्वतंत्र ॥ तरी देवक्षोभ जाणावा ॥ २२ ॥ नसतां वांकुडें पाऊल कांहीं ॥ नागविला जाय राजप्रवाहीं ॥ नसत्या कळी बैसल्या ठायीं ॥ तरी देवक्षोभ जाणिजे ॥ २३ ॥ आपुला शत्रु प्रतापापुढें ॥ मिरवी जैसा अति बापुडें ॥ त्या शरण रिघतां आपुल्या चाडें ॥ तरी देवक्षोभ जाणिजे ॥ २४ ॥ लोकां उपकार केला विशेष ॥ तेच लोक मानिती आपुला त्रास ॥ पाहूं नका म्हणती मुखास ॥ तरी देवक्षोभ जाणिजे ॥ २५ ॥ नसतां अधिमधीं उतरा [3] ॥ नसतींच विघ्नें येती घरा ॥ तेंच करणें परिहारा ॥ तरी देवक्षोभ जाणिजे ॥ २६ ॥ गृहींचें मनुष्य मुष्टींत [2] सकळ ॥ असून वाढे गृहांत कैळ ॥ आपुलें न चाले कांहींच बळ ॥ तरी देवक्षोभ जाणिजे ॥ २७ ॥ तरी हेचि नीति उपदेश ॥ माता करीत आहे पुत्रास ॥ परी बरवें नोहे हा विनाश ॥ जगामाजी मिरवेल ॥ २८ ॥ तरी ह्या द्वंद्वसुखाची कहाणी ॥ पेटेल महावडवानळ वन्हीं [4] ॥ राजवैभव हें अब्धिपाणी ॥ भस्म करील निश्चयें ॥ २९ ॥ ऐसा विचार करूनि मानसीं ॥ लुमावंती प्रवेशे स्वसदनासी ॥ येरीकडे मैनावतीसी ॥ उत्तर देत नरेंद्र ॥ १३० ॥ म्हणे माय वो तव कामनीं ॥ ऐसेंच आहे वेधक मनीं ॥ तंव त्या स्वामीची करणी ॥ निजदृष्टीं पाहीन वो ॥ ३१ ॥ माझें मजलागीं हित ॥ तें द्यावया असेल सामर्थ्य ॥ शोध शोधितां भक्तिपंथ ॥ सहज दृष्टीं पडेल वो ॥ ३२ ॥ मग मी सोडून सकळांस ॥ तनधनकाय ओपीन त्यास ॥ तूं येथून वाईट चित्तास ॥ सहसा न मानीं जननीये ॥ ३३ ॥ ऐसें वदोनि समाधानीं ॥ नृप गेला स्नानालागोनी ॥ येरीकडे अंतःपुरसदनीं ॥ काय करी लुमावंती ॥ ३४ ॥ परम आवडत्या स्त्रिया पांचसात ॥ तयांच्या आज्ञेंत [2] नृपनाथ ॥ पट्टराणिया प्रीतिवंत ॥ सदा सर्वदा वर्तती ॥ ३५ ॥ तयांसी पाठवूनि परिचारिका [5] ॥ बोलविल्या सद्विवेका ॥ त्यांत लुमावंती मुख्य नायिका ॥ पट्टराणी रायाची ॥ ३६ ॥ वेगें मांडून कनकासन ॥ बैसविल्या प्रीतींकरून ॥ तांबूलादि पुढें ठेवून ॥ वृत्तांत सांगे रायाचा ॥ ३७ ॥ बाई वो बाई विपरीत करणी ॥ मैनावती राजजननी ॥ विक्षेप पेटला तियेचे मनीं ॥ काय सांगूं तुम्हांतें ॥ ३८ ॥ कोण गांवांत आला हेला ॥ जालिंदर ऐसें म्हणती त्याला ॥ त्याचा अनुग्रह देऊनियां रायाला ॥ जोग देऊं म्हणतसे ॥ ३९ ॥ तैसें वैर भोगवी



१ धनाची पेटी. २ मुठींत, आज्ञेंत. ३ तंटा. ४ अग्नि. ५ दासी.

माता सुत ॥ निश्चय करूनि केला घटपटीत ॥ रायास बोधितां श्रवणीं मात ॥ सकळ झाला वो बाई ॥ १४० ॥ मग राजवैभव सकळ नासलें ॥ स्तंभ भंगल्या सदन पडलें ॥ मुळींच अर्कालागीं गिळिलें ॥ मग अंधकार सर्वस्वीं ॥ ४१ ॥ मग आपण अष्टविंशती सती ॥ असून काय करावी माती ॥ परचक्र येऊनि सकळ संपत्ती ॥ विनाशातें पावे हो ॥ ४२ ॥ परी येउते अर्थाअर्थीं ॥ कैसी करावी ती युक्ती ॥ सांगावी आधीं योजून सबळ मती ॥ केलिया कारण मोडावें ॥ ४३ ॥ अगे वन्ही म्हणूं नये लहान ॥ तो क्षणें जाळील सकळ सदन ॥ तरी त्यातें करूनि सिंचन ॥ विझवूनियां टाकावा ॥ ४४ ॥ उशा घातला विखार ॥ मग सुखनिद्रा केवीं येणार ॥ विष भेदून गेल्या जठर ॥ जीवित्व काय वांचेल ॥ ४५ ॥ तरी प्रथमचि सारासार ॥ करून मोडावा सकळ प्रकार ॥ ऐसी बुद्धि रचून सार ॥ सुखसंपत्ती भोगा कीं ॥ ४६ ॥ ऐसी ऐकून तियेची उक्ती ॥ मग तर्कवितर्क करिती त्या युवती ॥ नानाबुद्धि विलाप दाविती ॥ परी निश्चय न घडे कोणाचा ॥ ४७ ॥ यापरी विशाळबुद्धी युवती ॥ विचार काढी लुमावंती ॥ कीं ये अर्थीं दिसे एक मजप्रती ॥ सुढाळपणीं नेटका ॥ ४८ ॥ आपुल्या गांवांत जालिंदर ॥ जोगी आहे वैराग्यपर ॥ तरी तयाचा अपाय करून थोर ॥ निर्दाळावा सर्वस्वीं ॥ ४९ ॥ निर्दाळावा तरी कैसे रीतीं ॥ तयाच्या भक्तीस मैनावती ॥ आहे तरी राजयाप्रती ॥ निवेदावें कुडेभावें ॥ १५० ॥ तरी तो तुमचा वैसवसा ॥ ग्रीवे मिरवीतसे भयार्थ फांसा ॥ म्हणून युक्ती रचिली मानसा ॥ गाढपणीं ऐकावी कीं ॥ ५१ ॥ निवेदावें तरी कैसें ॥ काम न आवरे मैनावतीस ॥ म्हणूनि चित्तीं उदास ॥ जालिंदर भोगीतसे ॥ ५२ ॥ जालिंदराचा अनुग्रह देऊन ॥ जोगी करावा राजियाकारण ॥ मग करूनि पाठवावा तीर्थाटण ॥ अथवा तपाचे कारणीं ॥ ५३ ॥ मग तो गेलिया दूरदेशीं ॥ गृहीं आणून जालिंदरासी ॥ बैसवोनि राज्यासनासी ॥ सकळ सुखा भोगावें ॥ ५४ ॥ ऐसें सांगून सकळ रायातें ॥ उदय करावा कोपानळातें ॥ मग सहजविधि जालिंदरनाथ ॥ भस्म होईल त्यामाजी ॥ ५५ ॥ जैसे विषय अति गोड ॥ गोडचि म्हणून करावा पुड ॥ मग तें मिरवे शत्रुचाड ॥ द्वंद्वसुख वाटावया ॥ ५६ ॥ ऐसा विचार करूनि गोमटा ॥ जात्या झाल्या त्या बरवंटा ॥ येरी सांगे राजपटा ॥ गोपीचंद मिरवला ॥ ५७ ॥ राजकारणीं अपार वार्ता ॥ रागरंग कुशळता ॥ मानरंजनीं नृपनाथा ॥ दिवस लोटून पैं गेला ॥ ५८ ॥ मग निशाउदय तममांडणी ॥ तेही प्रहर गेली यामिनी ॥ मग पाकशाळेंत भोजन करूनी ॥ अंतःपुरीं संचरला ॥ ५९ ॥ संचरला परी लुमावंती ॥ तिच्याच गेला सदनाप्रती ॥ तिनें पाहून राज्याधिपती ॥ कनकासनीं बैसविला ॥ १६० ॥ उचलोन परमभक्तीं मांदार ॥ बैसला आहे मंचकावर ॥ गौरवूनि षोडशोपचार ॥ प्रेमडोहीं बुडविला ॥ ६१ ॥ मग तो राव होऊनि निर्भर ॥ रतिसुखाचा करूनि आदर ॥ यावरी गजगामिनी जोडूनि कर ॥ बोलती झाली रायातें

१ घर. २ सूर्याला. ३ स्त्रिया. ४ दुष्टपणानें. ५ भय. ६ क्रोधाग्नीला. ७ रात्र.

॥ ६२ ॥ हे महाराज प्रतापतरणी ॥ एक वार्ता ऐकिली कानीं ॥ परी वदतां भय कीं मनीं ॥ संचरत आहे महाराजा ॥६३॥ जरी न बोलावें ठेवूनि गुप्त ॥ तरी महाअनर्थाचा पर्वत दिसत ॥ वदूं तंव तरी भयांत ॥ चित्त गुंडाळा घेतसे ॥ ६४ ॥ ऐसा उभय पाहतां अर्थ ॥ भ्रांतीमाजीं पडलें चित्त ॥ तरी सुखशब्दाचा सरूनि वात ॥ वार्ता अवघड महाराजा ॥ ६५ ॥ ऐसें ऐकूनि राव बोलत ॥ म्हणे सकळ सोडूनि भयातें ॥ निर्विकार कवण अर्थ ॥ असेल तैसें कळविंजे ॥ ६६ ॥ येरी म्हणे द्याल भाष्य ॥ तरी चित्त सोडील भयदरीस ॥ मग खरें खोटें बरें रत्नास ॥ तुम्हांलागीं अर्पीन तें ॥ ६७ ॥ ऐसें वचन नृप ऐकतां ॥ मग करतळभाष्य झाला देता ॥ म्हणे मम दर्पभयाची व्यथा ॥ सोडून वार्ता बोल कीं ॥ ६८ ॥ येरी म्हणे जी एक कुंडें ॥ मातेनें रचिलें तुम्हांपुढें ॥ जालिंदर जोगी विषयपाडें ॥ वश्य केला आहे कीं ॥ ६९ ॥ परी तुमचा भयाचा संदर्प ॥ अंगीं वरिला विषयकंदर्प ॥ तेणेंकरूनि बुद्धि कुरूप ॥ तिनें वरिली आहे जी ॥ १७० ॥ तुम्हांस अनुग्रह देऊन त्याचा ॥ वेष द्यावा योगियाचा ॥ मग तीर्थाटणीं योग तुमचा ॥ बोळवावें तुम्हांतें ॥ ७१ ॥ तुम्ही गेलिया तपाकारण ॥ दूरदेशीं विदेशाकारण ॥ मग जालिंदराप्रती आणून ॥ राज्यासनीं ओपावा ॥ ७२ ॥ ऐसे प्रकरणीं सहजस्थिती ॥ श्रुत मात झाली आम्हांप्रती ॥ परी आमुचे सौभाग्यनीतीं ॥ भाग्यार्क दिव्य झाले ॥ ७३ ॥ आमुचें कुंकुम होतें अचळ ॥ म्हणोनि दृष्टीं आलें ऐसें फळ ॥ यापरी तुम्ही नृपाळ ॥ वाईट बरें विलोका ॥ ७४ ॥ ऐसी ऐकून तियेची वार्ता ॥ उचंबळला क्रोधानळाच्या माथां ॥ मग अनर्थानळाच्या शाखा दावितां ॥ भयंकररूपी जाहलासे ॥ ७५ ॥ मग तो क्रोध न वदवे वाणी ॥ प्रत्यक्ष आला वडवानळ अग्नि ॥ नाथ जालिंदर समुद्रपाणी ॥ प्राशावया क्षोभला ॥ ७६ ॥ मग तो उठोन तैसेच गतीं ॥ बाहेर जाय तो नृपती ॥ मंत्री बोलावुनी सेवकांहातीं ॥ जालिंदरा पाहों चला ॥ ७७ ॥ शीघ्र आणोनि कामाठ्यांसी ॥ गर्तीं योजिली कूपासरसी ॥ नाथ जालिंदर ते उद्देशीं ॥ तयामाजी लोटिला ॥ ७८ ॥ अश्वलीद न गणती ॥ तेथें सर्वत्र पडली होती ॥ ती लोटून गर्तेवरती ॥ नाथजती बुजविला ॥ ७९ ॥ ऐसें गुप्त करोनि प्रकरण ॥ राव सेवी आपुलें स्थान ॥ परी सेवका ठेविलें सांगोन ॥ मात बोलूं नका ही ॥ १८० ॥ जरी होतां मुखलंपट ॥ मम श्रोत्रीं आलिया नीट ॥ त्यांचें करीन सपाट ॥ यमलोकीं मिरवीन कीं ॥ ८१ ॥ ऐसी ऐकून भयंकर वार्ता ॥ दर्पसिंह तो योजून माथां ॥ रागेला परी सेवकचित्ता ॥ धुसधुसी मिरवतसे ॥ ८२ ॥ इतुके प्रकरणीं मध्ययामिनी ॥ झाली म्हणून नेणती जनीं ॥ अर्कोदयीं पाहिला स्वामी ॥ म्हणती उठोनी गेला असे ॥ ८३ ॥ एक म्हणती त्याचें येथें काय ॥ स्वइच्छे वसावें वाटेल तेथ ॥ हा ग्राम नव्हे आणीक राय ॥ ग्रामवस्तीं विराजला ॥ ८४ ॥ ऐशी बहुतांची बहुत वाणी ॥ प्रविष्ट झाली जगालागोनी ॥ कीं जालिंदर गेला येथुनी ॥ महीं भ्रमण करा-

१ वचन. २ भयरूपी गुहेला. ३ खोटें. ४ खड्डा, खांच. ५ मध्यरात्र.

वया ॥ ८५ ॥ ऐसी वार्ता नगरलोकीं ॥ उठली ऐकून परिचारिकी[1] ॥ त्या जाऊनि सद्विवेकी ॥ मैनावतीसी सांगती ॥ ८६ ॥ कीं महाराज आपला गुरु ॥ वस्तुफळाचा कल्पतरू ॥ उठोनि गेला कोठें दुरू ॥ महीं भ्रमण करावया ॥ ८७ ॥ ऐसें ऐकोनि मैनावती ॥ असंतोषली परम चित्तीं ॥ म्हणे मम सुताचे दैवाप्रती ॥ लाभ नाहीं आतुडला[2] ॥ ८८ ॥ ऐसें म्हणोनि संकोचित ॥ नेत्रीं प्रेमाश्रु ढाळीत ॥ येरीकडे जालिंदरनाथ ॥ कैसे स्थितीं राहिला ॥ ८९ ॥ तरी अवश्य भविष्य जाणणार ॥ आणि मैनावतीचा लोभ अपार ॥ आणि शत्रुमित्र पाहणार ॥ एकरूपीं समत्वें ॥ १९० ॥ नातरी परम प्रतापी वासरमणी[3] ॥ क्षणें टाकील ब्रह्मांड जाळोनी ॥ तो भद्र ज्याची विपर्यासकरणी ॥ तुष्ट कैसा राहिला ॥ ९१ ॥ जो द्वंद्वातीत मूर्तिमंत ॥ दंभरहित स्वरूपीं मिरवत ॥ ममता निःसंग विरहित ॥ कार्याकार्य जाणोनी ॥ ९२ ॥ असो गर्तेमाजी यतिनाथ ॥ वज्रासनातें घालोनि खालतें ॥ आकाशास्त्र प्रेरून भोंवतें ॥ स्वस्थचित्तीं बैसला ॥ ९३ ॥ आकाशास्त्र असतां भोंवतें ॥ लीद मिरवे सभोंवतें ॥ यापरी आकाशास्त्र माथां ॥ वज्रास्त्र स्थापिलें ॥ ९४ ॥ तेणेंकरोनि अधरस्थळीं ॥ लीद मिरविली आहे शिरीं ॥ येरीकडे अंतःपुरीं[4] ॥ जनवार्ता समजली ॥ ९५ ॥ नाथ जालिंदर गेला निघोन ॥ मग सकळ स्त्रियांचें झालें समाधान ॥ बरें झालें म्हणती निधान ॥ येऊनि पहुडल्या सेजेसी ॥ ९६ ॥ यापरी पुढें सुरस ॥ धुंडीसुत सांगेल श्रोतियांस ॥ तरी सर्व श्रोतीं टाकून आळस ॥ अवधान द्यावें पुढारां ॥ ९७ ॥ मालू धुंडी नरहरि-वंशीं ॥ कथा वदेल नवरसी ॥ परी वारंवार श्रोत्यांसीं ॥ कृपाअवधान मागतसे ॥ ९८ ॥ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ चतुर्दशाध्याय गोड हा ॥ १९९ ॥ अध्याय ॥ १४ ॥ ओंव्या ॥ १९९ ॥

१ दासी. २ सांपडला. ३ सूर्य. ४ जनानखान्यांत.

॥ नवनाथभक्तिसार चतुर्दशाध्याय समाप्त ॥

## अध्याय १५ वा.









श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी जगत्पालका ॥ मुनिमानसचकोरमृगांका[1] ॥ कृपांबुदातया पूर्णशशांका ॥ ग्रंथादरीं येईं कां ॥ १ ॥ मागील अध्यायीं कथन ॥ तुवां वदविलें कृपा करून ॥ गर्तकूपीं अग्निनंदन[2] ॥ गोपीचंदें घातला ॥ २ ॥ घातला परी कैसा लाग ॥ कीं कोठें नाहीं मूसमाग ॥ जैसा शंकर गेल्यामाग ॥ फसवूनि त्यासी वरियेलें ॥ ३ ॥ असो पुढें आतां श्रोतीं ॥ श्रवण करावी रसाळ उक्ती ॥ सिंहावलोकनीं घेऊन गती ॥ मागील कथा विलोका ॥ ४ ॥ बद्रिकाश्रमीं पूर्ण तपासी ॥ गोरक्ष कानिफा जान्हवीतीरासी ॥ तप आचरितां द्वादशवर्षीं ॥ उद्यापन उरकिलें ॥ ५ ॥ परी याचें त्यास नाहीं ठाऊक ॥ कायाभुवनीं उभय अर्क ॥ संगोपीत कामांतक ॥ परी माहीत नाहीं अन्योन्यां ॥ ६ ॥ पुढील भविष्योत्तर जाणून ॥ गुप्त ठेविलें ओळखून ॥ यापरी तप झालिया पूर्ण ॥ उभयतांही बोळविलें ॥ ७ ॥ कानिफा निघाला उत्तरदेशीं ॥ महातपी तो गोरक्षशेखी ॥ उत्तरपूर्णमध्यकोणासी ॥ संचार करीत चालिला ॥ ८ ॥ प्रयाग गया काशी करून ॥ श्रीगुरूतें शोधी गजकर्णनंदन[3] ॥ यापरी पूर्ण दक्षिण कोण ॥ गोरक्ष शोधी मच्छिंद्रा ॥ ९ ॥ शोधीत परी तो कैसा ॥ कीं जलावीण विभक्त मासा ॥ कीं बाळ मातेचे वसवसा ॥ सदोदित हृदयांत ॥ १० ॥ नावडे त्यातें अन्नपाणी ॥ नावडे निद्रा सुखासनीं ॥ सदा भंवते भाविक मनीं ॥ उद्वेगचक्रीं पडियेला ॥ ११ ॥ श्रीगुरु आठवूनि चित्तांत ॥ भ्रमण करीतसे पिशाचवत ॥ सांडी श्वास आणून हेत ॥ नाथ हे नाथ म्हणोनी ॥ १२ ॥ वारंवार हंबरडे फोडीत ॥ म्हणे कधीं भेटती गुरुनाथ ॥ प्राण डोळां उरला किंचित ॥ पाय आतां दाखवीं ॥ १३ ॥ ऐसी प्रेमें होतसे वृष्टी ॥ आपुल्या पुसे वागवटी ॥ म्हणे पाहिला असेल मच्छिंद्र जेठी ॥ कोणी तरी सांगा हो ॥ १४ ॥ ऐसें बहुधा बहुतां पुसून ॥ नानाक्षेत्रीं करी गमन ॥ तो भ्रमत गौडदेशाकारण ॥ हेळापट्टणीं पातला ॥ १५ ॥ तपें मांस भक्षिलें समग्र ॥ अति सूक्ष्म जर्जर शरीर ॥ त्यावरी श्रीगुरुवियोगचिंताशर ॥ हाडीं टोले मारीतसे ॥ १६ ॥ जेथें बैसे तेथें वसे ॥ नीरबिंदु वाहती नेत्रास ॥ कार्याकारण कोण्या क्षेत्रास ॥ भिक्षा मागूं जातसे ॥ १७ ॥ तों हेळापट्टण नगरामाझारी ॥ येऊन बैसला क्षणभरी ॥ तों द्वारपाळ ग्रामद्वारीं ॥ बैसले होते कांहींसे ॥ १८ ॥ त्यांनीं पाहून गोरक्षनाथ ॥ आदेश म्हणूनी त्यातें नमीत ॥ परी गोरक्ष तयां द्वारपाळां पुसत ॥ मच्छिंद्रनाथ आहे कीं ॥ १९ ॥ तंव ते म्हणती आमुचे गांवीं ॥ मच्छिंद्र नामें कोणी गोसावी ॥ महाराजा आलाच नाहीं ॥ काय सांगावी सुखव्यक्ती ॥ २० ॥ परी नाथा एक तापसी ॥ आला होता या गांवासी ॥ नाम जालिंदर या जगासी ॥ मिरवत होता महाराजा ॥ २१ ॥ काय सांगावी तयाची नीती ॥ लोकांस वाटे जैसा गभस्ती[4] ॥ तो तृणभारा वाहतां माथीं ॥ अधर[5] आम्हीं पाहातसों ॥ २२ ॥ गोरक्ष म्हणे काय कारण ॥ मस्तकीं वाहतसे तृण ॥ येरी म्हणे तो काननांतून ॥ गोधनाकरितां

१ ऋषिजनांच्या मनोरूपी चकोराला चंद्रासारख्या. २ जालंदर. ३ कानिफा. ४ सूर्य. ५ पृथ्वी न स्पर्शतां, अंतराळांत.

आणीतसे ॥ २३ ॥ गोरक्ष म्हणे गोधन कोणाचें ॥ येरी म्हणती ते गांवींचें ॥ परी निस्पृहवृत्ति गोधनाचें ॥ पालन करी महाराजा ॥ २४ ॥ गोरक्ष म्हणे किती दिवस ॥ राहिला होता या वस्तीस ॥ राहून लोप कवण ठायास ॥ झाला पुढें तो सांगा ॥ २५ ॥ येरी म्हणती योगद्रुमा ॥ एक संवत्सर राहिला या ग्रामा ॥ पुढें गेला कोठें तें आम्हां ॥ माहीत नाहीं महाराजा ॥ २६ ॥ याउपरी गोरक्षनाथ ॥ दिवस किती लोटले तें पाहात ॥ येरी म्हणे दश आजपर्यंत ॥ लोटले संवत्सर महाराजा ॥ २७ ॥ ऐसी ऐकून तयांची वाणी ॥ गोरक्ष विचारी आपुले मनीं ॥ तरी कां माझा स्वामी नाम पालटूनी ॥ जगामाजी विचरला ॥ २८ ॥ मी सांडून पूर्ण तपास ॥ लागावया करीत येईन धांवत ॥ म्हणून पालटलें स्वनामास ॥ गांवामाजी मिरवला ॥ २९ ॥ ऐसी कल्पना आणून मनीं ॥ अश्रुधारा वाहती नयनीं ॥ म्हणे महाराजा गेलास सोडूनी ॥ मज पाडसा कैसा रे ॥ ३० ॥ टाकून निर्वाणकाननांत ॥ कोठें गेला माझा नाथ ॥ मी अर्भक अज्ञान बाळक बहुत ॥ मोकलिलें मज कैसें ॥ ३१ ॥ हे नाथ तूं सकळमय ॥ सर्वस्वी बापमाय ॥ तुजवीण मातें कोण आश्रय ॥ तीन्ही लोकीं दिसेना ॥ ३२ ॥ अहा मज पाडसाची [1]येरणी ॥ चरूं गेली कोणे रानीं ॥ माझें स्मरण सकळ सांडूनी ॥ कैसी गुंतली तिकडेच ॥ ३३ ॥ अहा मम वत्साची प्रेममाउली ॥ कोणे रानीं चरूं गेली ॥ परी माझें स्मरण विसरली ॥ कैसी गुंतली तिकडेच ॥ ३४ ॥ अहा माझी मोहाची माय ॥ करूं गेली [2]अंतराय ॥ मज ते विसरून सदयहृदय ॥ कैसी गुंतली तिकडेचि ॥ ३५ ॥ ऐसें बोलून विलाप करीत ॥ ऊर्ध्व हंबरडा मारूनि धांवत ॥ पोट कवळून श्वास सोडीत ॥ अहा नाथ म्हणूनी ॥ ३६ ॥ मग ते कनवाळू द्वारपाळ ॥ म्हणती नाथा न करीं तळमळ ॥ तुम्हां मायलेंकरांचा मेळ ॥ ईश्वर करील पुढारां ॥ ३७ ॥ ऐसी वदती ते वाणी ॥ गांवांत धाडिला भिक्षेलागूनी ॥ मग तो गोरक्ष सदनोसदनीं ॥ अलक्ष गाजवीत जातसे ॥ ३८ ॥ परी जालिंदर होता ज्या ठायीं ॥ तेथें सहज आला भिक्षेस पाहीं ॥ तैं एकटएक सदन सांई ॥ पाहून अलख म्हणतसे ॥ ३९ ॥ तो सवाल ऐकून जालिंदरनाथ ॥ आदेश म्हणत [3]महीआंत ॥ ते आदेश गोरक्षाप्रत ॥ श्रवण झाले तांतडी ॥ ४० ॥ मग ते आदेश वंदून पुढती ॥ म्हणे कोठें आहांत महाराज जती ॥ येरी म्हणे महीगर्तीं ॥ विराजलेंसें महाराजा ॥ ४१ ॥ गोरक्ष म्हणे कवण नामीं ॥ मिरवत आहांत नाथा स्वामी ॥ येरी म्हणे मनोधर्मीं ॥ नाथ जालिंदर म्हणतात ॥ ४२ ॥ परी महाराजा योगद्रुमा ॥ कवण नाम मिरवतसे तुम्हां ॥ आणि वरदहस्तप्रसादउगमा ॥ गुरु कोण तुमचा हो ॥ ४३ ॥ गोरक्ष म्हणे मच्छिंद्रजती ॥ वरदप्रसाद गुरुमूर्ती ॥ आणि गोरक्ष नाम देहाप्रती ॥ जगामाजी मिरवलें ॥ ४४ ॥ परी महाराजा एक युक्ती ॥ तुम्हीं सेविली महीगर्तीं ॥ जगीं प्रवेष्टुनी पाप मती ॥ भंगित झाली लोकांची ॥ ४५ ॥ ऐसी ऐकून तयाची वार्ता ॥

१ हरिणी. २ विघ्न. ३ जमिनींतून.

जालिंदर सांगे झाली कथा ॥ ती ऐकतांचि गोरक्षनाथा ॥ कोपानळ पेटला ॥ ४६ ॥ म्हणे महाराजा आज्ञा करावी ॥ क्षणेंच घालीन पालथी मही ॥ तंव या नृपाची प्रौढी कांहीं ॥ भस्म करीन क्षणांत ॥ ४७ ॥ जैसा अग्नि पेटला सदनांत ॥ तेणें तृणतंतूचें कोण गणित ॥ तन्यायें येथील नृपनाथ ॥ भस्म करीन महाराजा ॥ ४८ ॥ अहा ऐसी गुरुमूर्ती ॥ देवांदानवां वरद अती ॥ ऐशा स्वामीस घालून गर्ती ॥ राज्य कैसा करितो जी ॥ ४९ ॥ तरी आतांचि आज्ञा प्रमाण ॥ लागूं नेदीं एक क्षण ॥ मग जालिंदर बोले वचन ॥ ऐसें नोहे महाराजा ॥ ५० ॥ या कार्याचें पुढें कार्य ॥ नातरी हृदयीं विचारूनि पाहें ॥ नाथपंथ येणें दुणावे ॥ हेंच भविष्य असे पहा ॥ ५१ ॥ तरी आतां क्षमा करून ॥ पुढें महाराजा करीं गमन ॥ परी हें ऐसें वर्तमान ॥ बोलूं नको जगासी ॥ ५२ ॥ तुम्ही हिंडतां सहज महीसी ॥ मम सुत कानिफा भेटतां तुम्हांसी ॥ श्रुत करावें कृत्य त्यासी ॥ वृत्तांत येथींचा सकळिक ॥ ५३ ॥ मग तो युक्तिप्रयुक्ती करून ॥ संपादून रायास कल्याण ॥ मातें काढील गर्तेतून ॥ वाढवील तो नाथपंथ ॥ ५४ ॥ ऐसें सांगून गोरक्षनाथ ॥ आदेश म्हणून बोळवीत ॥ आणी गोरक्ष ऐकूनि शांत ॥ होऊनि आदेश म्हणतसे ॥ ५५ ॥ मग आदेशशब्देंचि नमन ॥ करूनि निघाला गोरक्षनंदन ॥ आहारापुरतें मेळवून अन्न ॥ उपहारा संपादी ॥ ५६ ॥ मग शिंगी शैली करून ग्रहण ॥ करिता झाला मार्गीं गमन ॥ तों जगन्नाथ प्राचीनस्थान ॥ तेथें जाऊन पोहोंचला ॥ ५७ ॥ येरीकडे कानिफानाथ ॥ गांवोगांवीं भ्रमण करीत ॥ परी ज्या गांवीं जाय तेथें ॥ जगालागीं बोधीतसे ॥ ५८ ॥ कानिफामुखाचिये बोधस्थिती ॥ ऐकून परम जन मानवती ॥ सलिलप्रेम दाटूनि चित्तीं ॥ अनुग्रह घेती तयाचा ॥ ५९ ॥ मग त्या गांवांत एकेक दोन ॥ सच्छिष्य निघती विरक्तिमान ॥ प्रपंचराहणीस लाथ मारून ॥ नाथासवें चालती ॥ ६० ॥ ऐसे एक दोन पांच सात ॥ दहाविसांचा मेळा जमत ॥ होतां होतां सप्तशत ॥ दाटले शिष्य समागमें ॥ ६१ ॥ पूर्वदेशीं करितां गमन ॥ तों स्त्रीराज्य दोषसघन ॥ तयाच्या सीमेपर्यंत जाऊन ॥ उलट पाहती माघारां ॥ ६२ ॥ स्त्रीराज्यांत पुरुष कोणी ॥ नाहीं हें विख्यात जनश्रुतकर्णीं ॥ म्हणोन शिष्यमंडळ दणाणोनी ॥ परतोनि पाहती माघारीं ॥ ६३ ॥ ठायीं ठायीं करिती विचार ॥ म्हणती स्त्रीराज्यदेश तीव्र ॥ तेथें प्रवेश करितां नर ॥ वांचत नाहीं सहसाही ॥ ६४ ॥ ऐसा देश कठिण असून ॥ स्वामी करिती तयांत गमन ॥ तरी अग्निकुंडीं सकळां नेऊन ॥ पूर्ण आहुती इच्छीतसे ॥ ६५ ॥ जरी सेविल्या हालाहलातें ॥ मग कोण पुरुष जगेल तेथें ॥ जेवीं तीव्र अग्नींत शिरतां तेथें ॥ आहाळेना कैसें म्हणावें ॥ ६६ ॥ सदनीं प्रेरिला वैश्वानर ॥ सदन झालें खदिरांगार ॥ तयामाजी निघतां नर ॥ वांचेल कैसा सहसा तो ॥ ६७ ॥ कीं पतंग घेती दीपाची भेटी ॥ त्याच रीतीं येथें गोष्टी ॥ दिसून येती परी शेवटीं ॥ मृत्यु आम्हां दिसतसे

१ क्रोधाग्नि. २ पृथ्वीवर. ३ डोळ्यांत आनंदाश्रू येऊन. ४ सातशें. ५ दोषांनीं परिपूर्ण. ६ शोध, तपास. ७ हालाहलनामक विषाला. ८ पोळत नाहीं.

॥ ६८ ॥ ऐसें होतां निश्चयवचन ॥ कोणी म्हणती करा पलायन ॥ जीवित्व वांचल्या साधन ॥ घडून येईल महाराजा ॥ ६९ ॥ एक म्हणती ऐसें करावें ॥ सदृढ धरावे गुरूचे पाय ॥ मग जीवित्वाचें भय काय ॥ जातसे तरी जाऊं द्या ॥ ७० ॥ काया वाचा तनुमनधन ॥ प्रथम त्यासी केलें अर्पण ॥ मग या जीवित्वाची आस्था धरून ॥ व्रतालागीं कां भंगावें ॥ ७१ ॥ एक म्हणती लागलें वेड ॥ कैंचें व्रत पडिपाड ॥ जीवित्व हरल्या व्रतकोड ॥ कोणीं दृष्टीं पाहिलें ॥ ७२ ॥ तरी हा अर्थ सांडूनि धन ॥ या स्वामीलागीं चुकवून ॥ गृहस्थांनो पलायन ॥ करून जीवित्व वांचवा ॥ ७३ ॥ या स्वामीस लागलें वेड ॥ सादर मृत्युझांपड ॥ जया ठायीं पडेल धाड ॥ चालून जातो त्या ठायीं ॥ ७४ ॥ ऐसें तुम्हांस सत्य भासेल ॥ तरी हे मानून घ्यावे बोल ॥ जीवित्वाची आस्था असेल ॥ तरी बोल फोल न मानावे ॥ ७५ ॥ ऐसें ठायीं ठायीं ताटीं ॥ बैसून करिती बोलचावटी ॥ परी हा अर्थ सकळ पोटीं ॥ कानिफातें समजला ॥ ७६ ॥ मनांत म्हणे भ्याले सकळ ॥ हीनबुद्धि अति दुर्बळ ॥ परी आपुला प्रताप सांगतां [1]तुंबळ ॥ सत्य वाटणार नाहीं यांसी ॥ ७७ ॥ मग करीं कवळून भस्मचिमुटी ॥ स्पर्शास्त्रप्रयोग पोटीं ॥ जल्पून प्रेरी महीपोटीं ॥ तीन्ही दिशा लक्षुनी ॥ ७८ ॥ पुढील मात्र मार्ग ठेवून मोकळा ॥ दिशा बंधन केल्या सकळा ॥ केल्या परी ऐशा बळा ॥ देवदानवां आतुळेना ॥ ७९ ॥ केले अर्थ द्यर्थपर ॥ शिष्य पळून नाहीं जाणार ॥ आणि मारुतीचाही भुभुःकार ॥ पोहोंचूं नये त्या ठाया ॥ ८० ॥ ऐसें स्पर्शास्त्र पृष्ठीं ॥ रचून शांत बैसला जेठी ॥ मग शिष्यां पाचारून शेवटीं ॥ पुसता झाला तयांसी ॥ ८१ ॥ लहान मोठे मेळवून ॥ समुदायासी बैसवून ॥ म्हणे आम्हांलागीं जाणें ॥ स्त्रीराज्यांत आहे कीं ॥ ८२ ॥ परी तो देश कठिण ॥ वांचत नाहीं पुरुषरत्न ॥ हनुमंतभुभुःकारेंकरून ॥ प्राणहानी होतसे ॥ ८३ ॥ पुढें देश बहुत कठिण ॥ परी आम्हांलागीं आहे जाणें ॥ तया देशींचें तीर्थ करून ॥ येऊं ऐसें वाटतसे ॥ ८४ ॥ आमुचा विश्वास गुरुपायीं ॥ जरी असेल भवप्रवाहीं ॥ तरी देशाची लंघून मही ॥ पुनः येऊं माघारे ॥ ८५ ॥ नातरी सुखें जावो प्राण ॥ परी मनाची धांव येई पूर्ण ॥ तरी तुमचा विचार कवण ॥ तो मजप्रती दर्शवावा ॥ ८६ ॥ जे निःसीम गुरूच्या असती भक्तीं ॥ तिहीं धरावी माझी संगती ॥ नातरी जीवलोभ असेल चित्तीं ॥ तिहीं जावें माघारें ॥ ८७ ॥ ऐसें सांगून बोलावीत ॥ म्हणे देखिली बुद्धि करा येथ ॥ मग निःसीम भक्तीचे किंचित ॥ तया ठायीं राहिले ॥ ८८ ॥ सातशतांत सात जण ॥ ठायीं उरले स्थान धरून ॥ वरकड कंबरबस्ती करून ॥ कल्पिल्या मार्गीं चालिले ॥ ८९ ॥ मनांत मानिती सुखवसा ॥ म्हणती तस्करबुद्धीचा ठसा ॥ पळून जातां काजळीलेशा ॥ मूर्खत्व येतें आपणांसी ॥ ९० ॥ तरी फार बरवें झालें ॥ स्वामीनें अंतर ओळखिलें ॥ उंजळणीं बोळविलें ॥ कीर्तिमाहात्म्य रक्षुनी ॥ ९१ ॥ ऐसा चित्तीं सुखवसा मानून ॥ आले पंथीं

१ मोठा. २ पृथ्वी. ३ मनांतील उद्देश. ४ उघड दर्शनें. ५ आनंद.

करिती गमन ॥ एक कोस गेले धांवून ॥ सीमेपर्यंत ग्रामाच्या ॥ ९२ ॥ परी स्पर्शास्त्र सीमा लक्षून ॥ बैसलें होतें मही वेष्टून ॥ तेणें येतांच धरिलें कवळून ॥ महीसीं दृढ केले ते ॥ ९३ ॥ पंद झाले महीं व्यक्त ॥ मागें पुढें ठेवाया नसे शक्त ॥ जैसें सावज गुंतल्या चिखलांत ॥ बळ कांहीं चालेना ॥ ९४ ॥ असो झाले महीव्यक्त ॥ म्हणून हस्तें काढूं जात ॥ तों हस्त झाले महीं लिप्त ॥ मग सकळ ओणवे झाले ॥ ९५ ॥ येरीकडे कानिफानाथ ॥ त्या सातांतें बोलावून घेत ॥ जवळ बसवून सकळ वृत्तांत ॥ निवेदिला तयांचा ॥ ९६ ॥ तुम्हीं करावें आतां ऐसें ॥ शीघ्र जाऊन त्या महीस ॥ पाषाण करीं उचलोन विशेष ॥ तयांच्या पृष्ठीं स्थापावे ॥ ९७ ॥ मग विभक्तास्त्रविभूती ॥ चर्चून तयांच्या भाळाप्रती ॥ मागून पाठविले साती ॥ समाचारा तयांच्या ॥ ९८ ॥ ते तंव श्रीगुरूचे आज्ञेकरून ॥ पहात चालिले सीमास्थान ॥ तरी ते सर्वही ओणवे होऊन ॥ ठायीं ठायीं खुंटले ॥ ९९ ॥ सातांस पाहून अवघ्या मूर्ती ॥ परम चित्तीं लज्जित होती ॥ अधोवदन करून पाहती ॥ परी न देती उत्तर ॥ १०० ॥ हे जाऊन बोलती त्यांतें ॥ कैसें सोडून गुरूतें ॥ जीवित्वलोभ धरूनियां मनातें ॥ मार्ग केला पुढारां ॥ १ ॥ परी ईश्वराची अगाध करणी ॥ सकळ पडलां महीं खिळूनी ॥ ऐसियां रीतीं कोण तरूनी ॥ गेला आहे सांगा पां ॥ २ ॥ मग हस्तें सकळ पाषाण ॥ पृष्ठीं ठेविती बळेंकरून ॥ स्पर्श होतांचि जाती चिकटून ॥ आंग हालवितां पडेना ॥ ३ ॥ मग परम आक्रंदती ॥ चुकलों चुकलों ऐसें म्हणती ॥ आतां क्षमा करून चित्तीं ॥ सोडवावें आम्हांतें ॥ ४ ॥ येरू म्हणती खुशाल असा ॥ जीवित्वाचा धरून भरंवसा ॥ स्वामी पाहून आलिया देशा ॥ सोडवून नेऊं तुम्हांसी ॥ ५ ॥ गुरु करितां हा कशाला ॥ संकट पडतां काढितां पळा ॥ परी ज्याची क्रिया त्याची त्याला ॥ फलद्रूप होतसे ॥ ६ ॥ आतां स्वस्थ असा चित्तीं ॥ आम्ही जातों स्त्रीदेशाप्रती ॥ दैवें वांचून आलिया अंतीं ॥ सोडवून नेऊं तुम्हांतें ॥ ७ ॥ ऐसें सकळां करून भाषण ॥ सकळां पृष्ठीं देऊनि पाषाण ॥ परतते झाले गुरुआज्ञेकरून ॥ परी ते पाहून आरंबळती ॥ ८ ॥ म्हणती गुरुमायेहून माय ॥ होऊनियां सदयहृदय ॥ आम्हांसही सवें न्यावें ॥ स्त्रीराज्यामाझारी ॥ ९ ॥ आमुची सकळ गेली भ्रांती ॥ आणि गुरूची समजली प्रतापशक्ती ॥ आतां सकळ नासून दुर्मती ॥ विश्वासातें टेंकलों ॥ ११० ॥ ऐसी करितां विनवणी ॥ ती ऐकिली सातजणीं ॥ मग म्हणती श्रीगुरूतें सांगुनी ॥ सुटका करूं तुमची ॥ ११ ॥ ऐसें बोलून सकळां-कारण ॥ पुनः आले परतून ॥ म्हणती महाराजा दैन्यवाण ॥ शिष्यकटक मिरवलें ॥ १२ ॥ त्यांची नासली सकळ भ्रांती ॥ पृष्ठीं पाषाण घेऊन आरंबळती ॥ तरी आतां कृपा ओसंडोनि चित्तीं ॥ मुक्त करा सर्वांतें ॥ १३ ॥ आतां येथून गेलिया प्राण ॥ सोडणार नाहींत आपुले चरण ॥ सर्वही स्थिर मती धरून ॥ चरणावरी लोटतील ॥ १४ ॥ नाना युक्तींकरून ॥ करितील श्रीगुरूचें

१ पाय जमिनीला चिकटले. २ जनावर. ३ गुरूला सोडून वागल्यानें. ४ पाठीवर. ५ शिष्यसमूह. ६ धरून.

समाधान ॥ हें सच्छिष्यांचें ऐकून वचन ॥ नाथ चित्तीं तोषला ॥ १५ ॥ मग विभक्तास्त्रमंत्र होटीं ॥ जल्पून योजिली भस्मचिमुटी ॥ ओपून शिष्या करसंपुटीं ॥ म्हणे चर्चून यावें तयांतें ॥ १६ ॥ मग एक शिष्य जाऊन तेथें ॥ भाळीं[1] चर्चूनि भस्मचिमुटीतें ॥ चर्चितां झाले सकळ मुक्त ॥ सातां उणें सातशें ॥ १७॥ ऐसे मुक्त झाले सकळ जनीं ॥ येऊन लागले गुरूचे चरणीं ॥ नाथ तयांलागीं पाहुनी ॥ अहा अहा म्हणतसे ॥ १८ ॥ असो ऐसें बोलून वचन ॥ तेथून टाळितां मग मुक्काम ॥ स्त्रीदेशाचे सीमेवरी जाऊन ॥ वस्तीलागीं[2] विराजती ॥ १९ ॥ तेथें दिन लोटल्या झाली रात्री ॥ तों चमत्कार वर्तला ते क्षितीं ॥ भुभुःकार द्यावया मारुती ॥ सेतुहूनि चालिला ॥ १२० ॥ तों मार्गीं येतां अस्त्र सबळ ॥ वेष्टित झालें पदकमळ ॥ परी तो वज्रशरीरी तुंबळ ॥ अस्त्रालागीं मानीना ॥ २१ ॥ येरू चित्तामाजी विचार करीत ॥ हें स्पर्शास्त्र आहे निश्चित ॥ तरी येथें कोणी प्रतापवंत ॥ आला आहे निश्चयें ॥ २२ ॥ ऐसा विचार करून चित्तीं ॥ येता झाला सीमेप्रती ॥ तों कटक[3] पाहून नाथपंथी ॥ मनांत विचार करीतसे ॥ २३ ॥ कीं म्यां यत्न करूनी बहुत ॥ तेथें पाठविला मच्छिंद्रनाथ ॥ परी कटक गेलिया तेथ ॥ बोधितील तयासी ॥ २४ ॥ मग बोधें होऊनियां स्वार ॥ स्वदेशीं येईल मच्छिंद्र ॥ मग मैनाकिनीमुखचंद्र ॥ दुःखसागरीं उतरेल ॥ २५ ॥ तरी येथेंच यांतें निर्बळ करून ॥ मागें लावावें परतून ॥ मग अति भीमरूप धरून ॥ भुभुःकार करीतसे ॥ २६ ॥ गाजवी पुच्छाचा फडत्कार ॥ भयंकररूपी अति तीव्र ॥ तें पाहूनियां कटकभार समग्र ॥ स्वामीआड दडताती ॥ २७ ॥ म्हणती महाराजा प्रळयकाळ ॥ प्रथम उदेला महाबळ ॥ आतां भक्षील कटक सकळ ॥ उपाय कांहीं योजावा ॥ २८ ॥ येरू म्हणे नाहीं भय ॥ उगेचि पहा धरून धैर्य ॥ यानें तुमचें करावें काय ॥ अचळपणीं असा रे ॥ २९ ॥ मग करीं घेऊन भस्मचिमुटी ॥ वज्रास्त्र परम बोले होटीं ॥ तो प्रयोग सिद्ध होतां दाटीं ॥ भस्मचिमुटी फेंकिली ॥ १३० ॥ मग तें वज्रास्त्र परम कठिण ॥ माथां मिरवलें भूषणगगन ॥ येरीकडे वायुनंदन ॥ निजदृष्टीं पहातसे ॥ ३१ ॥ मग मोठेमोठे उचलून पर्वत ॥ फेंकिता झाला गगनपंथ ॥ ते गिरी आदळतां वज्रास्त्र ॥ चूर्ण होती क्षणार्धें ॥ ३२ ॥ तें पाहूनि अंजनीसुत ॥ प्रेरिता झाला मुष्टिघात ॥ तेणें वज्र झालें भंगित ॥ निचेष्टित महीं पडलें ॥ ३३ ॥ ऐसें होतां प्रकरण ॥ दृष्टीं पाहे कर्णनंदन[4] ॥ मग काळिकास्त्र जल्पून ॥ भस्मचिमुटी सोडीतसे ॥ ३४ ॥ यावरी सर्वेचि अग्न्यस्त्र ॥ सोडिता झाला प्रयोगमंत्र ॥ त्यावरी सर्वेचि वासवास्त्र[5] ॥ वरी वाय्वस्त्र प्रेरिलें ॥ ३५ ॥ मग तो वाय्वस्त्रप्रयोग होतां ॥ द्विर्मूर्धनी[6] दाटला सविता ॥ मग महापर्वत असती स्थूलता ॥ भस्म होती तयानें ॥ ३६ ॥ तों अंजनीसुतासकट ॥ तो अति तीव्र करीत नेट ॥ याउपरी काय उद्भट[7] ॥ विक्राळरूपी प्रगटला ॥ ३७ ॥ कीं कृतांत जैसा मुख पसरून ॥ ग्रासूं पाहे सकळ जन ॥ त्यातें साह्य परिपूर्ण ॥ वासवशक्ती[8]

१ मस्तकावर. २ त्या ठिकाणीं. ३ सैन्य. ४ कानिफानाथ. ५ इंद्राचें अस्त्र. ६ अग्नि. ७ मोठा. ८ इंद्रशक्ती.

मिरवली ॥ ३८ ॥ जैसा यमामागें दम ॥ प्रगट होय हरूं प्राण ॥ ऐसें उभयास्त्र तरुण ॥ कडकडां करीतसे ॥ ३९ ॥ जैसे खग मेघडंबरीं ॥ चमका मारिती चपेळेपरी ॥ उदेली भक्ती तदनुपरी ॥ प्रळयतरणी मिरवल्या ॥ १४० ॥ त्यांत अम्यस्त्राचा ताप थोर ॥ त्यावरी साह्यातें वातास्त्र ॥ मग मारुतिदेह होऊनि जर्जर ॥ रक्षणार्थ कांहीं दिसेना ॥ ४१ ॥ वासव आणि कालिकास्त्र ॥ मागें पुढें होऊनि पवित्र ॥ प्रहर भेदाया पाहती स्वतंत्र ॥ परी वायुपुत्र चपळ तो ॥ ४२ ॥ देई अस्त्रातें दोन हात ॥ ओढिता झाला चपळवंत ॥ तरी तेंही अस्त्र चपळ बहुत ॥ हस्तयुक्त होऊं न देत ॥ ४३ ॥ यावरी अम्यस्त्राकारण ॥ पुच्छीं योजी वायुनंदन ॥ यापरी वातास्त्राकारण ॥ स्तुति विनवोनि आराधिलें ॥ ४४ ॥ म्हणे महाराजा प्रळयवंत ॥ प्रविष्ट करा अम्यस्त्रांत ॥ तरी तुझा आहें सुत ॥ लोकांमाजी मिरवतसें ॥ ४५ ॥ परी गृहींचा पाहून अनर्थ ॥ कोणता पाहून तुष्टला तात ॥ ऐसे या प्रकरणीं हृदयांत ॥ निवारिजे महाराजा ॥ ४६ ॥ ऐसें उत्तर ऐकोनि सावधान ॥ मग बोलवी वायुनंदन ॥ तें वातास्त्र झालें क्षीण ॥ महाप्रतापें आच्छादी ॥ ४७ ॥ तें पाहून कानिफानाथ ॥ मोहनास्त्र प्रेरूनियां त्वरित ॥ तें गुप्तास्त्र हृदयांत ॥ जाऊनि आंत संचरलें ॥ ४८ ॥ संचरलें तरी वज्रशरीर ॥ लाग न धरी मोहनास्त्र ॥ परी कांहींसा भ्रांत वायुकुमर ॥ निजदेहीं दाटला ॥ ४९ ॥ तरी तैसाच भ्रांतीमाझारी ॥ अम्यस्त्र पुच्छें धरी ॥ महाबळें समुद्रतीरीं ॥ भिरकाउनी दिधलें ॥ १५० ॥ परी अम्यस्त्रें महासबळ ॥ कढूं लागलें समुद्रजळ ॥ जळचरां ओढवला प्रळयकाळ ॥ तेणें समुद्र गजबजिला ॥ ५१ ॥ मग तो येवोनि मूर्तिमंत ॥ निजदृष्टीनें जंव पाहात ॥ तों कानिफा आणि वायुसुत ॥ युद्धालागीं मिरवले ॥ ५२ ॥ परी तयासी ओढवला प्रळयकाळ ॥ अम्यस्त्रातें करी शीतळ ॥ मग जेलद आणोनि सकळ ॥ अम्यस्त्रीं स्थापिले ॥ ५३ ॥ तेणें अम्यस्त्र झालें शांत ॥ येरीकडे वायुसुत ॥ मोहनप्रकरणीं प्रविष्ट-चित्त ॥ परी पुच्छीं पर्वत उचलिला ॥ ५४ ॥ पर्वत उचलावयाचे संधीं ॥ फांकली होती तिकडे बुद्धी ॥ आणि स्थावरमोह अस्त्रें शुद्धी ॥ भ्रम पडला होताचि ॥ ५५ ॥ त्या संधींत दोहींकडून ॥ पाठींपोटीं अस्त्रें दोन ॥ एकदांच भेदिलीं प्रहार करून ॥ सबळ-बळेंकरूनियां ॥ ५६ ॥ जैसी मेषाची मूर्धनी ॥ झुंजतां एक होय मेळणीं ॥ तैसीं पृष्ठी हृदय लक्षुनी ॥ भेदितीं झालीं तीं अस्त्रें ॥ ५७ ॥ कालिका आणि वासवशक्ती ॥ भेदितांचि मूर्च्छित झाली व्यक्ती ॥ तेणें उलंडून महीवरती ॥ वातसुत पडियेला ॥ ५८ ॥ तें पाहून अनिळराज ॥ हृदयीं उजळलें मोहबीज ॥ मग प्रत्यक्ष होवोनि तेजःपुंज ॥ तयापासीं पातला ॥ ५९ ॥ परी तो अंजनीचा बाळ ॥ वज्रशरीरी ब्रह्मांडबळ ॥ पुच्छ सांवरोनि उतावेळ ॥ युद्धा मिसळूं पहातसे ॥ १६० ॥ मग श्रीवातें धरूनि हात ॥ म्हणे ऐक मद्वचन सत्य ॥ हे सबळपाणी आहेत नाथ ॥ रळी यांतें करूं नको ॥ ६१ ॥ पूर्वीं पाहें मच्छिंद्रनाथ ॥ तव

१ आकाशांत. २ विजेप्रमाणें. ३ मेघ. ४ मारुति. ५ वायु. ६ तंटा.

शिरीं दिधला होता पर्वत ॥ वातआकर्षणविद्या बहुत ॥ जाज्वल्यें मिरवे यासी ॥ ६२ ॥ तरी आतां सख्य करून ॥ कार्य काय तें घे साधून ॥ गूळ दिल्या पावे मरण ॥ विष त्यातें नकोचि ॥ ६३ ॥ यापरी बोले अपांपती ॥ म्हणे हेंचि मानवतें माझे चित्तीं ॥ सख्यासारखी दुसरी युक्ती ॥ योग्यायोग्य दिसेना ॥ ६४ ॥ मग उदधी आणि द्वितीय वातें ॥ सवें घेऊनि मारुतीतें ॥ कानिफातें येऊनि त्वरितें ॥ परम प्रीतीनें भेटले ॥ ६५ ॥ कानिफा तीन्ही देवांसी ॥ नमन करीतसे अतिप्रीतीसी ॥ नमून पुढें वायुसुतासी ॥ युद्ध कां सोडिलें म्हणतसे ॥ ६६ ॥ हें ऐकून बोले अनिळ ॥ कीं युद्ध कासया करितां तुंबळ ॥ कवण अर्थीं तयाचें फळ ॥ आम्हांलागीं दाखवा ॥ ६७ ॥ नाथ म्हणे तया मारुतीसी ॥ युद्ध करीत होतों कासयासी ॥ मारुति म्हणे कामनेसी ॥ तरी ऐका माझिया ॥ ६८ ॥ म्यां बहुत यत्नेंकरून ॥ गौरवोनि मच्छिंद्रनंदन ॥ परम आदरें स्त्रीराज्याकारण ॥ पाठविला आहे कीं ॥ ६९ ॥ तरी हे तयाचे असती जाती ॥ तेथें गेलिया तयाप्रती ॥ भेटल्या तयाची समूळ वृत्ती ॥ बोधस्थिती आणितील ॥ १७० ॥ मग तो सांडून तेथींचें स्थान ॥ स्वदेशांत करील गमन ॥ ऐसी चित्तीं कल्पना आणून ॥ युद्धालागीं मिसळलों ॥ ७१ ॥ तरी आतां असो कैसें ॥ हा गेलिया स्त्रीराज्यास ॥ कांहीं योग मच्छिंद्रास ॥ बोलूं नये दुरुक्ती ॥ ७२ ॥ ऐसे प्रकरणीं भाष्य देऊन ॥ अवश्य करावें यांनीं गमन ॥ मग माझें कांहीं एक छलन ॥ होणार नाहीं नाथासी ॥ ७३ ॥ ऐसें बोलतां वायुसुत ॥ अपांपति म्हणे बरवें यांत ॥ अहा म्हणूनि वदे मरुतसुत ॥ यांत काय वेंचतसे ॥ ७४ ॥ मग हांसोनि बोलिलें कानिफानाथें ॥ अहा शंका आलिया तुम्हांतें ॥ तरी प्रयोजन काय आमुतें ॥ मच्छिंद्रातें बोलाया ॥ ७५ ॥ तरी सहसा आम्ही मच्छिंद्रासी ॥ बोलणार नाहीं दुर्बलेंसी ॥ आणि संबोधून त्यासी ॥ तेथील तेथें स्थापूं कीं ॥ ७६ ॥ ऐसें वदून करतळभाष ॥ देऊन तुष्ट केलें त्यास ॥ मग आपण आपल्या स्वस्थानास ॥ त्रिवर्गही चालिले ॥ ७७ ॥ सकळ गेले स्वस्थानासी ॥ तों उदय झाल्या लोटली निशी ॥ मग नाथ शिष्यकटकेंसीं ॥ तेथूनियां निघाले ॥ ७८ ॥ स्त्रीराज्यांत प्रवेशून ॥ नाना तीर्थ क्षेत्रस्थान ॥ पहात पहात गजनंदन ॥ शृंगमुरुडीं पातला ॥ ७९ ॥ तों ते गांवींचें नृपासनीं ॥ तिलोत्तमा मैनाकिनी ॥ मच्छिंद्रासह बैसोनि सभास्थानीं ॥ सेवेलागीं विनटली ॥ १८० ॥ तों कानिफानाथ फेरी ॥ आला करीत राजद्वारीं ॥ सवें शिष्यकटक भारी ॥ तों द्वाररक्षक शोधालागीं धांवले ॥ ८१ ॥ शोधितां शिष्य नयनीं ॥ तो कानिफा कळला कानीं ॥ मग जाऊनियां राजांगणीं ॥ वृत्तांत सुचविला ॥ ८२ ॥ म्हणती महाराजा ग्रामद्वारीं ॥ कानिफा सहनाथपरिवारीं ॥ सातशें शिष्य समुद्रलहरी ॥ तव भेटी आलासे ॥ ८३ ॥ हें ऐकून मच्छिंद्रनाथ ॥ म्हणे पाहिला तया कोण पंथ ॥ येरी म्हणती म्हणवती नाथ ॥ कानफाटी कर्णीं ॥ ८४ ॥ ऐसें ऐकून मच्छिंद्रनाथ ॥ परम दचकलें तयाचें चित्त ॥

१ समुद्र. २ वायु. ३ वचन. ४ रात्र. ५ शिष्यवर्गासह. ६ या नांवाच्या गांवांत.

म्हणे आला कीं गोरक्षनाथ ॥ पालटोनि नामातें ॥ ८५ ॥ तरी आतां कैंचें येथें ॥ राहूं देईना या सुखातें ॥ अहा तिलोत्तमा सौंदर्यें मातें ॥ लाधली होती प्रीतीनें ॥ ८६ ॥ परी तयामाजी विक्षेप झाला ॥ कीं सैंधवें दुग्धघट नासला ॥ तन्न्यायें न्याय झाला ॥ प्रारब्धवशें आमुचा ॥ ८७ ॥ आतां असो कैसें तरी ॥ यास न्यावें ग्रामाभीतरीं ॥ म्हणोनि सिद्ध करोनि स्वारी ॥ अश्वशिबिकेसह निघाला ॥ ८८ ॥ त्वरें येऊन ग्रामद्वारीं ॥ परस्पर भेटी झाल्यावरी ॥ कानिफा पाहोनि हृदयाभीतरीं ॥ समाधान मिरवलें ॥ ८९ ॥ मग आदेशाआदेश होऊनि नमन ॥ रुजामे भरजरी कनकवर्ण ॥ महीं पसरून योगद्रुम ॥ तयावरी बैसविला ॥ १९० ॥ मग कोण कोणाची समूळ कथा ॥ तदनु[1] पुसतां गुरूचे पंथा ॥ त्यांनींही सांगितली समूळ वार्ता ॥ जालिंदरजन्मापासूनी ॥ ९१ ॥ मग मच्छिंद्र म्हणे जालिंदरनाथ ॥ देता अनुग्रह उत्तम यांत ॥ तरी तूं कानिफा नाम सुत ॥ गुरुबंधू तो माझा ॥ ९२ ॥ मग शब्दोशब्दीं अधिकोत्तर ॥ वाढत चालली प्रेमलहर ॥ मग वाहुनी गजस्कंधावर ॥ ग्रामामाजी आणिलें ॥ ९३ ॥ मग नानायुक्ती रचोनि चित्तीं ॥ स्वयें करी मच्छिंद्रजती ॥ एक मास अति प्रीतीं ॥ कानिफा राहविला त्या स्थानीं ॥ ९४ ॥ राहिला परी तो नाथ कैसा ॥ तरी समूळ कथासुधारसा[2] ॥ पुढिले अध्यायीं श्रवणीं वसा ॥ श्रवण होईल सकळिकां ॥ ९५ ॥ तरी हा भक्तिकथासार ॥ तुम्हां वैष्णवांचें निजमाहेर ॥ प्रपंच सांडून रहावें स्थिर ॥ या धवलागिरीं येऊनी ॥ ९६ ॥ धुंडीसुत नरहरिवंशीं ॥ कवि मालु नाम जयासी ॥ तो बैसला ग्रंथमाहेरासी ॥ सुखसंपन्न भोगावया ॥ ९७ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ पंचादशाध्याय गोड हा ॥ १९८ ॥ ॥ अध्याय ॥ १५ ॥ ॥ ओंव्या ॥ १९८ ॥

---

१ त्यानंतर. २ कथारूपी अमृताला.

॥ नवनाथभक्तिसार पंचदशाध्याय समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ ॥ जयजयाजी दिगंबरा ॥ आद्यनामें विश्वंभरा ॥ वर्णितां तुझिया गुणसंभारा ॥ मति अपूर्व होतसे ॥ १ ॥ वर्णितां तुझिया गुणसंपत्ती ॥ वेदभांडारें अपूर्व होती ॥ सहस्रफणी वाहतां माथीं ॥ शीण वाचे दावीतसे ॥ २ ॥ पंचाननाऐसे धेंडे ॥ परी दो अक्षरीं झाले धडे ॥ सरस्वतीचें शिणोनि तोंड ॥ करी सांड विलापाची ॥ ३ ॥ आठभार उद्भिज्ज देही ॥ कमळपात्रांत पुरे मही ॥ सप्ताब्धींची अपूर्व शायी ॥ तव गुणसाररसज्ञ ॥ ४ ॥ ऐसा सर्वगुणज्ञ पुरुष ॥ येवोनि बैसला अबद्धमतीस ॥ भक्तिसार ग्रंथ सुधारस ॥ स्वयें निर्मिला आपणचि ॥ ५ ॥ तरी मागिले अध्यायीं सकळ कथन ॥ कानिफा आणि वायुनंदन ॥ युद्धसमयीं ऐक्य होऊन ॥ सुखसागरा मिळाले ॥ ६ ॥ यावरी कानिफा स्त्रीदेशांत ॥ गेले श्रीगडमुंडगांवांत ॥ तेथें भेटोनि मच्छिंद्रातें ॥ आतिथ्यातें भोगिलें ॥ ७ ॥ भोगिलें परी कैसे रीतीं ॥ तेंचि ऐका येथून श्रोतीं ॥ मच्छिंद्राचे काम चित्तीं ॥ एक अर्थी उदेला ॥ ८ ॥ कीं कानिफा जाईल स्वदेशांत ॥ श्रीगोरक्षका करील श्रुत ॥ मग तो धांवोनि येईल येथ ॥ नेईल मातें येथुनी ॥ ९ ॥ तरी गोरक्ष मम शिष्य आहे ॥ ऐसें यास श्रुत करूं नये ॥ अनेक योजून उपाय ॥ येथें राहता करावा ॥ १० ॥ ऐसी युक्ती रचूनि चित्तीं ॥ करावें म्हणे आतिथ्य बहु रीतीं ॥ म्हणोनी बोलावूनि बहुत युक्तीं ॥ सकळां मच्छिंद्र सांगतसे ॥ ११ ॥ याउपर आणीक योजना करीत ॥ कीं विषयीं गोंवावा कानिफानाथ ॥ मग हा कदा देशांत ॥ जाणार नाहीं सर्वस्वें ॥ १२ ॥ चंद्राननी मृगांकवदनी ॥ पाठवीतसे शिबिरालागुनी ॥ परी तो नातळे कामवासनीं ॥ इंद्रियदमनी महाराजा ॥ १३ ॥ म्हणाल तरी त्या कैशा युवती ॥ प्रत्यक्ष कामाच्या मूर्ती ॥ जयांचे नेत्रकटाक्षें होती ॥ वेडेपिसे देवादि ॥ १४ ॥ जयेचें पाहतां मुखमंडण ॥ तपी सांडिती तपाकारणें ॥ येवोनी मुंगी लुंगी होवोन ॥ मागें भ्रमती जपी तपी ॥ १५ ॥ जयेचे अधर पोंवळ्यांपरी दिसती ॥ दशन दाळिंबबीज गोमटी ॥ गौरवर्ण पिकाघाटी ॥ ग्रीवा दर्शवी बाहेर ॥ १६ ॥ कीं अनंत चंद्रांचा प्रकाश जैसा ॥ कीं उडुगणपतीचा द्वितीय ठसा ॥ जयांच्या नखाकृतीलेखा ॥ चंद्रकोरी मिरवल्या ॥ १७ ॥ असो ऐसे स्त्रियांचे वर्ण ॥ कीं भानूच पावला उदयमान ॥ ऐसिया स्त्रिया पाठवोनि स्थान ॥ चेतविती कामास ॥ १८ ॥ परी तो नातळे महाराज ॥ हा वृत्तांत मच्छिंद्रा कळला सहज ॥ मग म्हणे शिष्यकटकाचा समाज ॥ कामासनीं गोंवावा ॥ १९ ॥ ऐसाही यत्न करून पाहतां ॥ कामिनींचा श्रम झाला वृथा ॥ शिष्यकटकही येईना हाता ॥ उपाय कांहीं चालेना ॥ २० ॥ असो ऐसे छळणांत ॥ एक मास राहिले तेथ ॥ परी कोपें देव होतां उदित ॥ सहजस्थितीं लोटले ॥ २१ ॥ असो लोटल्या एक मास ॥ मग पाचारून मच्छिंद्रास ॥ म्हणती आज्ञा द्यावी आम्हांस ॥ स्वदेशासी जावया ॥ २२ ॥ मग अवश्य म्हणोन मच्छिंद्रनाथ ॥ नानासंपत्ती द्रव्य ओपीत ॥ गज वाँजी उंष्ट्र

१ दिशा हींच वस्त्रें परिधान करणाऱ्या शंकरा. २ एकंदर गुणांना ३ दांत. ४ मान. ५ चंद्राचा. ६ सूर्य. ७ घोडे. ८ उंटें.

अमित ॥ द्रव्य बहुत दिधलें ॥ २३ ॥ शिबिरें कनाथा पडप थोर ॥ तंबु राहुट्या पृथगाकार ॥ [1]शिबिका मुक्तझालरा छत्र ॥ वस्त्राभरणीं भरियेले ॥ २४ ॥ ऐसी ओपूनि अपार संपत्ती ॥ बोळवीतसे मच्छिंद्रजती ॥ एक कोस बोळवोनि नमिती ॥ परस्परांसी आदरें ॥ २५ ॥ ऐसे बोळवोनि कटकभार ॥ स्वस्थाना आला नाथ मच्छिंद्र ॥ येरीकडे तीर्थवर ॥ करीत आला स्वदेशा ॥ २६ ॥ सहज आले मुक्कामेंमुक्काम ॥ लंघूनि स्त्रीदेश सुगम ॥ पुढें गौडबंगाल स्थान उत्तम ॥ नानाक्षेत्रें हिंडती ॥ २७ ॥ परी जया गांवीं जाय नाथ ॥ त्या गांवीं लोक करिती आतिथ्य ॥ सर्व पाहून भक्तिवंत ॥ उपचारें मिरवती ॥ २८ ॥ इच्छेसम सकळ अर्थ ॥ पूर्ण होऊनि शिष्यसांप्रदायी होत ॥ म्हणोनि वर्णिती कीर्त ॥ मुखोमुखीं उल्हासें ॥ २९ ॥ मग या गांवींचे त्या गांवीं लोक ॥ येऊनि नेती सकळ कटक ॥ दावूनि भक्तिभाव अलोलिक ॥ बोळविती पुढारां ॥ ३० ॥ ऐसें श्रवण करीत करीत ॥ कीर्तीमागें कीर्ति होत ॥ ती सत्कीर्ति हेळापट्टणांत ॥ प्रविष्ट झाली जगमुखें ॥ ३१ ॥ बहुत जनांचे वाचे स्तुती ॥ अहाहा स्वामी ऐसें म्हणती ॥ मग राजांगणीं ही कीर्ती ॥ [2]हेलावली सेवकमुखें ॥ ३२ ॥ कीर्ति ऐकून नृपनाथ ॥ पुढें प्रेरिता झाला दूत ॥ त्याकरवीं उत्तम वृत्तांत ॥ मुनिकटकाचा आणविला ॥ ३३ ॥ ते सांगती मुनीचा राजयोग ॥ गांवोगांवींहूनि शिबिरें सुरंग चांग ॥ धांवताती घेऊनि मागोमाग ॥ स्वामीलागीं राहावया ॥ ३४ ॥ पुढें नाथध्वज येऊन ॥ शिबिरें चालती त्यामागून ॥ शिष्यकटकास मागून गमन ॥ कानिफाचे होतसे ॥ ३५ ॥ ऐसें मार्गीं करितां गमन ॥ तों येरीकडे जगन्नाथाहून ॥ गोरक्ष बंगालदेशांत येऊन ॥ गांवोगांव भ्रमतसे ॥ ३६ ॥ तो सहजमार्गीं करितां गमन ॥ महीप्रवाहीं तरुव्यक्त [3]विपिन ॥ तया विपिनीं [4]गजकर्णनंदन ॥ सहजस्थितीं भेटला ॥ ३७ ॥ तेणें पाहिलें गोरक्षकासी ॥ गोरक्षें पाहिलें कानिफासी ॥ दृष्टादृष्टी होतां आदेशीं ॥ एकमेकां बोलिले ॥ ३८ ॥ करूनि स्थिर शिबिकासन ॥ खालीं उतरला कर्णनंदन ॥ मग भरजरी गालिचा महीं पसरून ॥ गोरक्षासी बैसविलें ॥ ३९ ॥ आपण बैसे [5]उपसवें नेटीं ॥ बोले कानिफा [6]वाग्वटी ॥ नाथपंथ हा वरदपुटी ॥ कोण गुरु लाहिला ॥ ४० ॥ हें ऐकून गोरक्षनाथ ॥ मच्छिंद्रजन्मापासून कथा सांगत ॥ वरदपाणी उदयमित्र ॥ प्रसन्न झाला तयासी ॥ ४१ ॥ तरी त्याचा दासानुदास ॥ मी म्हणवितों महापुरुष ॥ परी श्रीगुरु कानिफादेहास ॥ गुरु कोण मिरवला तें सांगा ॥ ४२ ॥ ऐसे गोरक्षबोल ऐकून ॥ कानिफा सांगे जालिंदरकथन ॥ जन्मापासून वर्तमान ॥ दत्तकृपा आगळी ॥ ४३ ॥ ऐसें उभयतांचें भाषण ॥ झालिया मिरवलें समाधान ॥ म्हणती योग्य आलें घडून ॥ तुम्ही आम्हां भेटलां ॥ ४४ ॥ याउपरी कानिफाचित्तीं ॥ कामना उदेली एका अर्थीं ॥ कीं मच्छिंद्र गुरु गोरक्षाप्रती ॥ दत्तवरदें मिरवला ॥ ४५ ॥ तरी दत्तकृपेचें अनुसंधान ॥ कैसें लाधलें विद्यारत्न ॥ कीं कवणरूपीं सहजदर्शन ॥ ॥१॥

१ पालख्या. २ पसरली. ३ अरण्य. ४ कानिफा. ५ जवळ. ६ वाणीच्या कौशल्यानें.

जगामाजी मिरवती ॥ ४६ ॥ तरी याचा शोध करावा ॥ दावूनि आपुल्या गौरवा ॥ ऐसें योजून सहजभावा ॥ दृष्टी करी भोंवतालीं ॥ ४७ ॥ तों दृष्टीसमोर आम्रवन ॥ पक्व फळीं देखिलें सघन ॥ तेंही पाडाचें पक्वपण ॥ शाखा वृक्षीं विराजल्या ॥ ४८ ॥ तें पाहतां कानिफानाथ ॥ म्हणे हें आम्रवन काय शोभत ॥ फळेंही मधुर शाखा व्यक्त ॥ झोंबल्या आहेत ह्या वृक्षीं ॥ ४९ ॥ परी ऐसीं फळें सुगम दिसती ॥ तरी भक्षण करावें वाटे चित्तीं ॥ यावरी गोरक्ष बोले युक्ती ॥ नको नको म्हणतसे ॥ ५० ॥ याउपरी बोले कानिफा वचन ॥ तोडून आणावें तों शिष्य धाडून ॥ गोरक्ष म्हणे इतुका यत्न ॥ कासयासी करावा ॥ ५१ ॥ आतां शिष्य आहेत जवळी ॥ तोडूनि आणावें त्या करकमळीं ॥ शिष्य नसतां कोणे काळीं ॥ मग आपण काय करावें ॥ ५२ ॥ तरी आतां स्वतः ऐसें करावें ॥ गुरुप्रसादें प्रताप मिरवावे ॥ फळें तोडून विद्येसी गौरवावें ॥ तुष्ट आत्मा करावा ॥ ५३ ॥ ऐसें कानिफा ऐकून वचन ॥ जरी तुमचें इच्छितें ऐसें मन ॥ तरी आतांचि आणितों तोडून ॥ पक्वपणीं गुरुकृपें ॥ ५४ ॥ मग कवळून भस्मचिमुटी ॥ विभक्तास्त्र जपे होटीं ॥ त्यावरी आकर्षण मंत्रपोटीं ॥ प्रेरिता झाला युक्तीनें ॥ ५५ ॥ विभक्तास्त्र आकर्षणीं ॥ प्रेरितां फेंकी भस्म काननीं ॥ तंव तीं पक्वफळें वृक्षावरूनी ॥ पुढें आलीं सर्वत्र ॥ ५६ ॥ मग ते शिष्यकटकासहित ॥ फळें भक्षिती मधुर व्यक्त ॥ भक्षिल्या पूर्ण तृप्त ॥ क्षाळिले[1] हात जीवनानें ॥ ५७ ॥ ऐसें झालिया पूर्णप्रकरणीं ॥ गोरक्ष विचारी ऐसें मनीं ॥ म्हणे प्रताप दाविला मजलागुनी ॥ कानिफानें आपुला ॥ ५८ ॥ तरी आपण आतां यासी ॥ दावूं विद्या चमत्कारासी ॥ ऐसा विचार करूनि मानसीं ॥ कानिफातें बोलतसे ॥ ५९ ॥ म्हणे तुम्हीं केला पाहुणचार ॥ तरी उत्तरालागीं उत्तर ॥ आणिक फळें भक्षूनि साचार ॥ चवी रसनें मिरवावी ॥ ६० ॥ ऐसें ऐकून तयाचें वचन ॥ म्हणे बोललां तें फार उत्तम ॥ तुमच्या शब्दास करूनि मान ॥ स्वीकारावें तैसेंचि ॥ ६१ ॥ मग आकर्षणशक्तीं विभक्तास्त्र ॥ जल्पोनि नाथ गोरक्ष पवित्र ॥ तों लवंगवनींचीं फळें विचित्र ॥ येऊन पडलीं पुढारां ॥ ६२ ॥ मग तीं फळें खात जेठी ॥ रसनेसी पडों पाहे मिठी ॥ अहा अहा म्हणे शेवटीं ॥ अमृतसरीं दाटले ॥ ६३ ॥ मग तीं फळें केलिया भक्षण ॥ शुद्धजीवनें हस्त प्रक्षाळून ॥ बैसले आसनीं सुखें येऊन ॥ त्यावरी बोले गोरक्ष तो ॥ ६४ ॥ म्हणे खालीं फळें उत्तम राहिलीं ॥ परी जैशीं तैशीं करावीं वहिलीं ॥ पुन्हां योजून वृक्षडाहळीं ॥ पुढें मार्गा गमावें ॥ ६५ ॥ याउपरी कानिफानाथ ॥ ऐसा कोण ब्रह्मयाचा सुत ॥ पुन्हां निर्मोनि मूर्तिमंत ॥ जैसें तैसें करील ॥ ६६ ॥ गोरक्ष म्हणे गुरुपुत्र ॥ जो निस्सीमपणीं आहे पवित्र ॥ त्यास हें करणें अघटित विचित्र ॥ कदाकाळीं नसेचि ॥ ६७ ॥ तो दुसरा ब्रह्मा करील उत्पन्न ॥ मग ऐसियाची कथा कोण ॥ जो महीच मस्तकीं करिता धारण ॥ तो पर्वताचे ओझें शिणे कीं ॥ ६८ ॥ जो अर्कतेजा निववणार ॥ तो पावकठिणगीनें

१ दाट. २ पाठवितांना. ३ धुतले. ४ पाण्यानें. ५ जिव्हेच्या ठिकाणीं. ६ लवकर. ७ सूर्यतेजाला. ८ अग्नीच्या कणानें.

पळे सत्वर ॥ हृदयीं सांठवितो सप्तसागर ॥ तो थिल्लरोदकें अटकेना ॥ ६९ ॥ जो बोलकाजाचे गंभीर चातुरीं ॥ बृहस्पतीतें मागें सारी ॥ तो अजारक्षकातें भिवोनि अंतरीं ॥ मौन्य वरील कां वाचे ॥ ७० ॥ जो आपुले प्रतापेंकरूनी ॥ क्षीराब्धी करील गृहवासनी ॥ तो तक्राकरितां सदैव सदनीं ॥ भीक मागेल केउंता ॥ ७१ ॥ कीं चक्षूचे कृपाकटाक्षें ॥ पाषाण करी परीस जैसे ॥ तो हेमाकरितां काय प्रत्यक्ष ॥ आराधील धनाढ्या ॥ ७२ ॥ जयाचे वचनवाग्वटी ॥ मिरविती सकळ देवांच्या थाटी ॥ तो आपुल्या मोक्षासाठीं ॥ आराधीना भूतास ॥ ७३ ॥ तस्मात् ब्रह्मयाची काय कथा ॥ जो अनंतब्रह्मांडें होय निर्मिता ॥ सर्व कर्तव्याचा कर्ता ॥ गुरुकृपेसीं मिरवतसे ॥ ७४ ॥ नातरी मुळींच प्रौढीं ॥ गुरु मिरवला ज्याच्या कवाडीं ॥ तयाची दैना कोण फेडी ॥ काबाड ओझें वाहे तो ॥ ७५ ॥ ऐसें ऐकतां कानिफानाथ ॥ परम क्षोभला खचितार्थ ॥ जैसा पावक आज्यसिंचितार्थ ॥ कवळूं पाहे ब्रह्मांडा ॥ ७६ ॥ म्हणे हो हो जाणतों तूतें ॥ आणि तुझिया गुरूसहित ॥ बहुसाधनीं प्रतापवंत ॥ नरकामाजी पचतसे ॥ ७७ ॥ वाचे म्हणविती योगीजन ॥ कर्म आचरती नरकपतन ॥ सकळ स्त्रीराष्ट्र वेष्टून ॥ भोग भोगी पापाचा ॥ ७८ ॥ जितेंद्रियत्व दावावें जनीं ॥ असोनी भोग चिंती मनीं ॥ तया भोगवश करोनी ॥ मेनिकानाथ होवोनि ठेला ॥ ७९ ॥ तरी ठाऊक गुरु तुझा ॥ किती बोलसी प्राज्ञी ओजा ॥ ब्रह्मयातें करूनि हीनतेजा ॥ ढिसाळ गोष्टी करितोसी ॥ ८० ॥ प्रथम गुरु तुझा काबाडी ॥ तुझी दैना कोण फेडी ॥ आतां सोडोनि सकळ प्रौढी ॥ मार्गालागीं क्रमीं कां ॥ ८१ ॥ ऐसें वचन खडतर बोलणें ॥ गोरक्षकातें होतां श्रवण ॥ मग म्हणे बोलसी आपण ॥ चावटीपणीं हे भ्रष्टा ॥ ८२ ॥ तुझा गुरु जालिंदरनाथ ॥ प्रतापहीन दीन बहुत ॥ दशवर्षें आजपर्यंत ॥ नरकीं नित्य पचतसे ॥ ८३ ॥ परी त्या सामर्थ्य नाहीं झालें ॥ कीं आपण येथून जावें वहिलें ॥ नृपसर्पदर्पें वेष्टिलें ॥ शक्तिहीन झालासे ॥ ८४ ॥ हेळापट्टणीं गौडबंगाल देशीं ॥ वस्ताद मिळाला आहे त्यासी ॥ धन्य गोपीचंद प्रतापराशी ॥ लीदगर्तीत पचवीतसे ॥ ८५ ॥ तैसा नोहे गुरु माझा ॥ हालवील सकळ ब्रह्मांड चोजा ॥ शंकरावें अस्त्र ओजा ॥ करकमळीं मिरवतसे ॥ ८६ ॥ अष्टभैरव महादारुण ॥ अजिंक्य देवांदानवांकारण ॥ त्यांसी बळें करूनी कंदन ॥ शरणागत आणिलें ॥ ८७ ॥ पाहें केवढा मारुतसुत ॥ जेणें विजयी केला रघुनाथ ॥ तया मस्तकीं देऊनि पर्वत ॥ उभा केला स्तंभापरी ॥ ८८ ॥ वीरभद्र प्रतापतरणी ॥ देवदानवां अजिंक्य करणी ॥ तयाचा प्राण कंठीं आणुनी ॥ शरणागत तो केला ॥ ८९ ॥ द्वादशकळीं तीव्र आदित्य ॥ तयाचा उलथोनि पाडिला रथ ॥ सकळ देव शरणागत ॥ होऊनि लोटले पायांसी ॥ ९० ॥ तरी प्रतापी गुरु ऐसा ॥ भक्त सोडवीत नरकक्लेशा ॥ तयाच्या वरदकृपें ऐसा ॥ आतांच पाहें हे भ्रष्टा ॥ ९१ ॥ मग घेऊनि भस्मचिमुटी ॥ मंत्रप्रयोग बोले होटीं ॥ संजीवनी ते



१ डबक्यांतील पाण्यानें. २ धनगराला. ३ घरांत मावेसा. ४ काय म्हणून. ५ सोन्यासाठीं. ६ हारी. ७ मारुति. ८ सूर्य.

पीयूषथाटी ॥ सकळ फळांतें मिरवली ॥ ९२ ॥ ऐसी सकळ प्रयोगीं फळें संपूर्ण ॥ जैसीं तैसीं ठेलीं होऊन ॥ तें कानिफानाथ पाहून ॥ मनीं शंकित पैं झाला ॥ ९३ ॥ योजूनि सवें मुख वोठीं ॥ विस्मय करीत आपुले पोटीं ॥ म्हणे धन्य हा प्रतापजेठी ॥ जगामाजी मिरवला ॥ ९४ ॥ सकळ टाकून विरुद्ध भाषण ॥ धांवोनि दिधलें आलिंगन ॥ म्हणे धन्य तूं एक निपुण ॥ गुरुपुत्रता मिरविशी ॥ ९५ ॥ परी ऐशा बोलतां विरुद्ध बोला ॥ मातें सर्वज्ञ लाभ झाला ॥ शोधीत फिरलों जालिंदराला ॥ ठाव लाधला तुजपासीं ॥ ९६ ॥ यापरी गोरक्ष बोले वचन ॥ हें बोललासी अति अप्रमाण ॥ माझा लाभ तुजकारण ॥ तुझा लाभ मज झाला ॥ ९७ ॥ ते बोल नव्हे कदा वाईट ॥ दाविते झाले मार्ग चोखट ॥ गुप्तगुरूचें उघडूनि कपाट ॥ मार्गदिवटा पैं केला ॥ ९८ ॥ तरी आतां उत्तम झालें ॥ दृष्टीं पाहूं गुरुपाउलें ॥ ऐसें वदूनि प्रीतीं नमिलें ॥ एकमेकां ते वेळां ॥ ९९ ॥ याउपरी गौरनंदन ॥ स्पर्शास्त्र मुखीं जल्पून ॥ वृक्षांदेठीं फळें नेऊन ॥ जेथील तेथें जडियेलीं ॥ १०० ॥ मग पुनः करोनि नमनानमन ॥ प्रांजळ वर्णीत वर्तमान ॥ एकमेकांतें विचारून ॥ आदेश म्हणवून जाताती ॥ १ ॥ गोरक्ष चालिला स्त्रीदेशांत ॥ कानिफा गौडबंगालीं जात ॥ हेळापट्टण लक्षूनियां पंथ ॥ कूच मुक्काम साधीतसे ॥ २ ॥ परी तीव्र होऊनि अति चित्तीं ॥ म्हणे जातांच भस्म करीन नृपती ॥ अहा जालिंदरगुरुमूर्ती ॥ दुखविली नष्टानें ॥ ३ ॥ ऐसें म्हणोनि वारंवार ॥ परम क्रोधाचा वैश्वानर ॥ शिखा डुलवी स्वअंगावर ॥ अहाळूनी पाडावया ॥ ४ ॥ तन्न्यायें तीव्रमती ॥ चित्तकुंडीं पावकस्थिती ॥ प्रदीप्त करोनि नृपआहुती ॥ इच्छूनियां जातसे ॥ ५ ॥ तच्छिष्यकटकथाटी ॥ गमन करितां वाटोवाटीं ॥ तंव हेळापट्टणकाननपुटीं ॥ जाऊनियां पोहोंचला ॥ ६ ॥ तो वृत्तांत रायासी कळला ॥ कानिफा आले गांवाला ॥ मग परिवारासहित गोपीचंद वहिला ॥ सवें सामोरा जातसे ॥ ७ ॥ चित्तीं म्हणे मम वैभवा ॥ योग्य दिसे महानुभावा ॥ तरी गुरु हाचि करावा ॥ कायावाचाभावानें ॥ ८ ॥ सातशें शिष्यकटक भारी ॥ पूर्णयोगी ब्रह्मचारी ॥ गज वाजी स्यंदनीं स्वारी ॥ जगामाजी मिरवतसे ॥ ९ ॥ सिद्ध करूनि चमूभार ॥ शिबिकासनें तुरंग अपार ॥ अन्य मंडळी वीर झुंजार ॥ रायासवें मिरवले ॥ ११० ॥ रायमस्तकीं एकशत ॥ चंद्राकृती दैदीप्यवंत ॥ ऐसीं छत्रें वर्णितां बहुत ॥ वाढेल ग्रंथ आँगळा ॥ ११ ॥ एक सहस्र सातशें मिती ॥ बरोबरीचे सरदार असती ॥ तयांचीं छत्रें पंच असती ॥ चंद्रार्कीं मिरवत ॥ १२ ॥ हेमतगटी झालरा शिल्पयुक्ती ॥ छत्रकळसाची अपार दीप्ती ॥ रत्नखचित अर्का म्हणती ॥ तेज सांडीं तूं आपुलें ॥ १३ ॥ ऐशा संपत्तिसंभारेंसीं ॥ ठेंगणें भाविती अमरपदासी ॥ मार्गीं चालतां मांत्रिकासी ॥ पाचारी तो नृपनाथ ॥ १४ ॥ म्हणती प्रारब्धयोगेंकरून ॥ येथें पातलें सिद्धरत्न ॥ तरी याचा अनुग्रह घेऊन ॥ ईश्वरभक्ती परिधानूं ॥ १५ ॥ हा श्रीगुरु आहे योग्य मातें ॥ माझी संपत्ती भूषणभरतें ॥

१ मार्ग. २ अग्नि. ३ सत्वर. ४ महापराक्रमी. ५ सर्व सैन्य. ६ घोडे. ७ विशेष. ८ शोभा. ९ सूर्याला.

जगामाजी दिसे सरितें ॥ योग्यायोग्य उभयतीं ॥ १६ ॥ नातरी गुरु मम मातेनें ॥ योजिला होता कंगाल हीन ॥ रत्नपति काच आणून ॥ भूषणातें मिरवीतसे ॥ १७ ॥ कीं कल्पतरूच्या बागाइतीं ॥ कंटकतरू बाभूळवस्ती ॥ कीं अर्कचंद्रांचे मध्यपंक्तीं ॥ काजव्यानें मिरवावें ॥ १८ ॥ मी भूप माझे पंक्ती ॥ भूपती असावा सर्वज्ञमूर्ती ॥ घृतशर्करा दुग्धसरितीं ॥ लवण कैसें वाढावें ॥ १९ ॥ अमंगळ गल्ली कुश्चल स्थान ॥ बहुत ज्ञानी पिशाचसमान ॥ तो गुरु मातें मम मातेनें ॥ जार्लिंदर योजिला ॥ १२० ॥ अहो ही योग्य असे संगत ॥ काय केलें स्त्रीजातींत ॥ परी आतां उदेलें उचिताउचित ॥ गुरू कानिफा आम्हांसी ॥ २१ ॥ ऐसें वदूनि मंत्रिकासी ॥ राव जातसे कटकप्रदेशीं ॥ घेऊनि सर्वे संभारासी ॥ षोडशोपचार आदरें ॥ २२ ॥ ऐसेपरी कटकथाटीं ॥ राव जाय सुगम वाटीं ॥ त्या मार्गीं योगींद्र जेठी ॥ जाऊनियां मिळाला ॥ २३ ॥ परी येतां देखतांचि गोपीचंद ॥ हृदयीं धडाडला अपार क्रोध ॥ परी विवेक[1]अर्गळा अपार तेणें अक्रोध ॥ मनामाजी संचरला ॥२४॥ आतांचि शापून करीन भस्म ॥ परी कार्य तैसेंच राहील सुगम ॥ कोठें श्रीगुरु योगद्रुम ॥ मिरवला तो कळेना ॥ २५ ॥ परी याचे हातीं कार्य सुगम ॥ उरकोनी घ्यावा मनोधर्म ॥ आधीं पाहूनि गुरुचरणपद्म ॥ [2]शासनातें मग [3]ओपूं ॥ २६ ॥ ऐसा विचार करूनि चित्तीं ॥ स्तब्ध राहिला योगींद्र जती ॥ क्रोधानळा समूळ शांती ॥ बोधलक्ष्मी स्थापीतसे ॥ २७ ॥ जैसे शस्त्रास्त्रीं निपुण ॥ जेवीं रक्षिती प्रतापवान ॥ परी कार्यसंबंधीं देदीप्यमान ॥ दर्शविती लोकांतें ॥ २८ ॥ तरी प्रथम श्रीगुरुमूर्ती ॥ प्रत्यक्ष करावी याचे हातीं ॥ मग क्रोधानळासी दुस्तर आहुती ॥ गोपीचंद योजावा ॥ २९ ॥ ऐसिये विचारीं शब्दबोधें ॥ कानिफा राहिला स्तब्ध ॥ येरीकडे गोपीचंद ॥ चरणांवरी लोटला ॥ १३० ॥ उभा राहिला समोर दृष्टीं ॥ नम्रोत्तर बोले होटीं ॥ जोडोनियां करसंपुटीं ॥ विनवणी विनवीतसे ॥ ३१ ॥ हे महाराजा दैवयोगा ॥ मज आळशावरी गंगा ॥ वोळलासी कृपाओघा ॥ अनाथा सनाथ करावया ॥ ३२ ॥ तुम्ही कृपाळु संतसज्जन ॥ दयाभांडार शांतिरत्न ॥ ज्ञानविज्ञान [3]आस्तीककर्म ॥ गृहस्थांसी कल्पावें ॥ ३३ ॥ ब्रह्मीं पावलां तत्त्वतां ॥ षड्गुणांसीं विषयां दमितां ॥ सकळ भोगूनि अकर्ता ॥ मिरवतसां जगामाजी ॥ ३४ ॥ आणि जगाच्या वि[4]षयतिमिरीं ॥ ज्ञानदिवटी ते[5]जारी ॥ मिरवून सुख सनाथपरी ॥ दाविते झालां महाराजा ॥ ३५ ॥ ऐसे साधक याचकमणी ॥ तुम्ही कल्पतरू कल्पनापूर्णी ॥ ऐसिये स्थिती जान्हवी जीवनी ॥ वोळविलीत मजवरुती ॥ ३६ ॥ परी श्रीरायाचें वाग्उत्तर ॥ ऐकूनि कानिफा मनोहर ॥ तेणें चित्तशक्तितरुवर ॥ आनंदशांती मिरवली ॥ ३७ ॥ देहीं क्रोधाचा वै[6]श्वानर ॥ पेटवा घेत होता अपार ॥ तरी रावउत्तराचें सिं[7]चननीर ॥ होतांच शांती वरियेली ॥ ३८ ॥ मग रायासी धरूनि करीं ॥ बैसविला स्वशेजारीं ॥ मग बोलत वाग्उत्तरीं ॥ कुशळ असां कीं महाराजा ॥३९॥ ॥३॥

१ विवेकरूपी अडसर. २ शिक्षा देऊं. ३ कर्माचे ठिकाणीं विश्वासू असें. ४ विषयरूप काळोखांत. ५ तेजस्वी. ६ अग्नि. ७ पाणी शिंपडतांच.

म्हणे राया अनुचित केलें ॥ परी तव भाग्य सबळ पाहिलें ॥ तेणेंकरूनि शांतीतें वरिलें ॥ मम मानसें महाराजा ॥ १४० ॥ नातरी अनर्थासी गांठी ॥ पडत होती प्राणास मिठी ॥ परी तव भाग्यउत्तराचे देठीं ॥ शांतिफळें मिरवलीं ॥ ४१ ॥ तरी आतां असो कैसें ॥ वेगीं चाल पट्टणास ॥ तेथें सकळ इतिहास ॥ निवेदीन तुज राया ॥ ४२ ॥ मग बैसूनि शिबिकासनीं ॥ कटकासह ग्रामास येवोनी ॥ रायें राजसदना आणोनी ॥ कनकासनीं वाहिला ॥ ४३ ॥ वाहिला तरी प्रीतीकरूनी ॥ षोडशोपचारें पूजिला मुनी ॥ हेमरत्नीं आणि वस्त्रभूषणीं ॥ नम्रवाणी बोलतसे ॥ ४४ ॥ हे महाराजा योगसंपत्ती ॥ कामना वेधली माझे चित्तीं ॥ अनुग्रहीं चोज घेऊनि निगुतीं ॥ सनाथपणीं मिरवावें ॥ ४५ ॥ ऐसी वेधककामना चित्तीं ॥ प्रथम भागीं मिरवत होती ॥ त्यांत उदेली कोप-युक्ती ॥ वैश्वानरशिखा ते ॥ ४६ ॥ तेणें आनंदोनि उदयाचा तरू ॥ वोळलासे योगधीरू ॥ मग पुढें वासनाफळकारू ॥ प्रेरावयातें पावला ॥ ४७ ॥ नृप म्हणे अर्थ उघडून ॥ चित्तीं मिरवा समाधान ॥ नातरी भययुक्त भिरड पूर्ण ॥ चित्ततरूतें स्पर्शी-तसे ॥ ४८ ॥ तरी प्रांजळ करूनि मातें ॥ कृपें ओपूनि अनुग्रहातें ॥ आपुला साह्य म्हणोनि सरतें ॥ तिहीं लोकीं मिरवावें ॥ ४९ ॥ कानिफा म्हणे नृपा ऐक ॥ मम अनुग्रहाचें उत्तम दोंदिक ॥ घेऊं पाहसी भावपूर्वक ॥ परी तुवां भाव नासिला ॥ १५० ॥ जैसें दुग्ध पवित्र गोड ॥ परी लवण स्पर्शितां परम द्वाड ॥ तेवीं तूतें घडून विघड ॥ आलें आहे महाराजा ॥ ५१ ॥ अरे माझा अनुग्रह घ्यावया पाहसी ॥ परी ज्याचा अनुग्रह मजसीं ॥ तो तूं स्वामी महागर्तेसी ॥ अश्वविष्ठेंत स्थापिला ॥ ५२ ॥ परी तुझें आयुष्य लाग ॥ पूर्वपुण्याचा होता योग ॥ म्हणोनि क्रोधानळ मग ॥ शांतिदरीं दडाला हो ॥ ५३ ॥ नातरी महाराज जालिंदर ॥ प्रळयकाळींचा वैश्वानर ॥ तुझे वैभवाचें अपार नीरें[३] ॥ भस्म करिता क्षणार्धें ॥ ५४ ॥ जयाच्या प्रतापाची सैरी ॥ कोण करी बोल वायुत्तरीं ॥ जेणें स्वर्गदेवतांची थोरी ॥ झाडोझाडीं लाविली ॥ ५५ ॥ मग साद्यंत वराची कथा ॥ तया नृपातें सांगतां ॥ तेणेंही सकळ ऐकूनि वार्ता ॥ भय उदेलें चित्तांत ॥ ५६ ॥ अंगीं रोमांच आले दाटून ॥ शरीरीं कांपरें दाटलें पूर्ण ॥ मग धरोनि त्याचे चरण ॥ नम्रपणें विनवीतसे ॥ ५७ ॥ म्हणे महाराजा योगवित्त ॥ घडूनि आलें तें अनुचित ॥ तरी आतां क्षमा उचित ॥ प्रसाद करा दासावरी ॥ ५८ ॥ या ब्रह्मांडमंडपांत ॥ मजएवढा कोणी नाहीं पैतित ॥ अहा ही करणी अघटित ॥ घडून आली मजलागीं ॥ ५९ ॥ परी सदैव मायेपरी ॥ शांती वरावी हृदयांतरीं ॥ बहु अन्याय होतां किशोरीं ॥ अहितातें टेकेना ॥ १६० ॥ तुम्ही संत दयावंत ॥ घेतां जगाचे बहु आघात ॥ अमृतोपम मानूनि चित्त ॥ कृपा उचित दर्शवितां ॥ ६१ ॥ जैसा झाडा घातला घाव ॥ एकीं लावणी केली अपूर्व ॥ परी उभयतां एकचि छाँव ॥ मिरवूं शके जैशी कां ॥ ६२ ॥ कीं सरितापात्रीं नीरओघीं ॥ धुती पूजिती मळसंगीं ॥ परी

१ फळ. २ उदक. ३ बरोबरी. ४ पापी. ५ मुलाकडून. ६ अकल्याणाकडे वळत नाहीं. ७ छाया.

एकचि तों उभयप्रसंगीं ॥ मिरवली कीं सरिता ते ॥ ६३ ॥ कीं तस्करा होतां घरांत रिघावा ॥ त्यासही प्रकाश देई जैसा दिवा ॥ तन्न्याय संतभावा ॥ मिरवूं जात महाराजा ॥ ६४ ॥ तरी आतां असो कैसें ॥ क्षमावोढण करीं आम्हांस ॥ दुष्कृतसरिताप्रवाहीं विशेष ॥ ओढून काढीं महाराजा ॥ ६५ ॥ ऐसें ऐकूनि तयाचें वचन ॥ नाभीं म्हणे गजकर्णनंदन ॥ मग रायालागीं सवें घेऊन ॥ स्वशिबिरातें पातला ॥ ६६ ॥ परी हा वृत्तांत ऐकूनी ॥ परिचारिका धांवल्या तेथूनी ॥ त्यांनीं जाऊनि सकळ युवतींलागोनी ॥ मैनावतीतें सांगितलें ॥ ६७ ॥ हे माय वो भक्तिसंपादनीं ॥ जालिंदरगुरू तुम्हांलागुनी ॥ परी तयाची रायें विपत्ती करूनी ॥ महीगर्तीत मिरविला ॥ ६८ ॥ तेंही अश्वविष्ठेंत ॥ टाकिला आहे दशवरुषांत ॥ ही राजदरबारा ऐकूनि मात ॥ तुम्हां आम्हीं निवेदिलें ॥ ६९ ॥ म्हणाल कैसी कळली मात ॥ तरी जालिंदराचा आला सुत ॥ अपार वैभव कानिफानाथ ॥ विद्यार्णव दूसरा ॥ १७० ॥ तरी तयाचें वैभव पाहून ॥ शेवटीं नटला आपुला नंदन ॥ परी जालिंदराचें वर्तमान ॥ श्रुत केलें तेणेंचि ॥ ७१ ॥ आतां राव तयाचे शिबिरीं ॥ गेला आहे सहपरिवारीं ॥ तेथें घडेल जैसेपरी ॥ तैसें वृत्त सांगूं पुढें ॥ ७२ ॥ ऐसें सांगतां युवती ॥ हृदयीं क्षोभली मैनावती ॥ परी पुत्रमोहाची संपत्ती ॥ चित्तझुलारी हेलावे ॥ ७३ ॥ येरीकडे नृपनाथ ॥ मुनिशिबिरा जाऊनि त्वरित ॥ उत्तम अगारीं अनन्य पदार्थ ॥ इच्छेसमान भरियेले ॥ ७४ ॥ सदा सन्मुख कर जोडून ॥ अंगें धांवे कार्यासमान ॥ जेथील तेथें अर्थ पुरवून ॥ संगोपन करीतसे ॥ ७५ ॥ जैसे दुर्वासा अतिथी सकळ ॥ सेवे आराधी कौरवपाळ ॥ तन्न्याय हा भूपाळ ॥ नाथालागीं संबोखी ॥ ७६ ॥ असो ऐसे सेवेप्रकरणीं ॥ अस्तास गेला वांसरमणी ॥ मग रायातें आज्ञा देऊनी ॥ बोळविला सदनातें ॥ ७७ ॥ राव पातला सदनाप्रती ॥ परी येतांचि वंदिली मैनावती ॥ मग झाला वृत्तांत तियेप्रती ॥ निवेदिला रायानें ॥ ७८ ॥ वृत्तांत निवेदूनि तिजसी ॥ तुवां जाऊनि शिबिरासी ॥ युक्तिप्रयुक्तीं बोधूनि त्यासी ॥ महाविघ्न निवटावें ॥ ७९ ॥ मग अवश्य बोलून मैनावती ॥ शिबिरा आसनीं जाऊं पाहती ॥ शीघ्र येऊनि शिबिराप्रती ॥ कानिफानाथ मिरवला ॥ १८० ॥ वंदूनि निकट बैसली तेथ ॥ म्हणे महाराजा गुरुनाथ ॥ कोण तुम्हीं वरिला अर्थ ॥ नाथपंथीं मिरवावया ॥ ८१ ॥ तरी या नाथपंथिका ॥ मीही मिरवतें महीलोका ॥ तरी मम मौळीं वरदपादुका ॥ श्रीजालिंदरासी मिरवितें ॥ ८२ ॥ ऐसी ऐकोनि तियेची वाणी ॥ बोलता झाला कानिफा मुनी ॥ ऐसी असूनि बरवी करणी ॥ जालिंदरातें मिरविली ॥ ८३ ॥ तूं अनुग्रही असतां निश्चित ॥ गुरू ठेवावा अश्वविष्ठेंत ॥ मैनावती म्हणे श्रुत ॥ आज झालें महाराजा ॥ ८४ ॥ मग आपुली कथा मुळापासुनी ॥ तया नाथासी निवेदूनी ॥ हे स्वसुताहातीं झाली करणी ॥ मज न कळतां महाराजा ॥ ८५ ॥ तरी आतां झालें कर्म ॥ सज्ञाना सांवरीं दुर्गम ॥ परी



१ नदी. २ क्षमेचा बुरखा. ३ भिऊं नको. ४ कानिफा. ५ घोड्यांच्या लिदींत. ६ शरण गेला. ७ सूर्य. ८ अनुग्रह घेणारी.

रायाचें दुष्टकर्म ॥ टाळूनि सुपंथ मिरवीं कां ॥ ८६ ॥ ऐसें सांगून तयाप्रती ॥ मोहो उपजला अति चित्तीं ॥ मग म्हणे श्रीगुरुमूर्ती ॥ दृश्य करा लोकांत ॥ ८७ ॥ म्हणशील सुताचे हातेंकरून ॥ कां न करिसी दृश्यमान ॥ परी नेणों जालिंदराचा कोपाग्न ॥ धांव घेईल पुढारां ॥ ८८ ॥ तरी बोधावा युक्तिप्रयुक्तीं ॥ रक्षूनियां आपल्या भाच्याप्रती ॥ दृश्य करूनि गुरुमूर्ती ॥ सत्कीर्ति भाच्या वरीं कां ॥ ८९ ॥ मग या ब्रह्मांडमंडपांत ॥ कीर्तिध्वज अति लखलखीत ॥ हेळाऊन परम लोकांत ॥ कीर्तिध्वज फडकेल ॥ १९० ॥ ऐसें बोलूनियां तयाप्रती ॥ मग उठती झाली मैनावती ॥ त्यानेंही नमूनि परमप्रीतीं ॥ बोळविलें भगिनीतें ॥ ९१ ॥ पूर्ण आश्वासन देऊन ॥ म्हणे रायाचें कल्याण इच्छीं पूर्ण ॥ श्रीगुरुचरण पाहून जाण ॥ सकळ संशय सोडीं कां ॥ ९२ ॥ ऐशी आश्वासूनि माता ॥ श्रीनाथ झाला बोळविता ॥ असो मैनावती तत्त्वतां ॥ नमूनि आली सदनासी ॥ ९३ ॥ स्वसुतातें पाचारून ॥ सकळ सांगितलें वर्तमान ॥ मग सकळ भयाचें दृढासन ॥ भंगित झालें तत्क्षणीं ॥ ९४ ॥ जालिंदराचे अनुग्रहासहित ॥ आश्वासीत कानिफानाथ ॥ ऐसा सकळ सांगूनि वृत्तांत ॥ भयमुक्त तो केला ॥ ९५ ॥ असो आतां येथून ॥ पुढिले अध्यायीं धुंडीनंदन ॥ नरहरिवरदें श्रोत्यांकारण ॥ माळू निवेदील गुरुकृपें ॥ ९६ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ षोडशाध्याय गोड हा ॥ १९७ ॥ अध्याय ॥ १६ ॥ ओंव्या ॥ १९७ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

॥ नवनाथभक्तिसार षोडशाध्याय समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी वैकुंठाधीशा ॥ अलक्ष अगोचरा आदिपुरुषा ॥ पूर्णब्रह्म निष्कल निर्दोषा ॥ सनातना आदि-
मूर्ते ॥ १ ॥ ऐसा स्वामी [1]पंढरीअधीश ॥ बैसून मालूचे कवित्वपृष्ठीस ॥ भक्तिसारसुधारस ॥ निर्माण केला [2]ग्रंथासी ॥ २ ॥ तरी
मागिले अध्यायीं कथन ॥ कानिफा पातला हेळापट्टण ॥ गोपीचंदाची भेटी घेऊन ॥ मैनावतीसी भेटला ॥ ३ ॥ तरी [3]सिंहावलो-
कनीं तत्त्वतां ॥ मैनावती भेटून नाथा ॥ सकळ वृत्तांत सांगूनि सुता ॥ समाधानीं मिरवलें ॥ ४ ॥ असो गोपीचंद दुसरे दिनीं ॥
नाथाग्रहें शिबिरीं जाउनी ॥ मौळी ठेवून नाथाचे चरणीं ॥ उभा राहिला सन्मुख ॥ ५ ॥ कानिफा पाहूनि राव दृष्टीं ॥ बोलता
झाला स्ववाग्वटी ॥ श्रीजालिंदर महीपोटीं ॥ कोठें घातला तो सांग पां ॥ ६ ॥ येरू म्हणे महाराजा ॥ ठाव दावितों चला ओजा ॥
तेव्हां म्हणे शिष्य माझा ॥ घेऊन जावें सांगातीं ॥ ७ ॥ ऐसी कानिफा बोलतां मात ॥ अवश्य म्हणे नृपनाथ ॥ मग सच्छिष्य
घेऊन सांगात ॥ तया ठायीं पातला ॥ ८ ॥ ठाव दाखवून सच्छिष्यासी ॥ पुन्हां आले शिबिरासी ॥ शिष्य म्हणती त्या ठायासी ॥
पाहून आलों महाराजा ॥ ९ ॥ मग रायास म्हणे कानिफानाथ ॥ जालिंदर काढाया कोणती रीत ॥ येरू म्हणे तुम्ही समर्थ ॥
सकळ जाणते सर्वस्वीं ॥ १० ॥ बाळें आग्रहें करूं जाती ॥ परी तयांचा निर्णय कैशा रीतीं ॥ करावा हें तों नेणती निश्चितीं ॥ सर्व
संगोपी माता ती ॥ ११ ॥ तेवीं माता पिता गुरू ॥ [4]त्राता मारिता [5]सर्वपारू ॥ तरी कैसे रीती हा विचारू ॥ आव्हानिजे महा-
राजा ॥ १२ ॥ ऐसें बोलतां नृपनाथ ॥ मग बोलता झाला गजकर्णसुत ॥ तुझें रक्षावया जीवित ॥ विचार माझा ऐकिंजे ॥ १३ ॥
कनक रौप्य ताम्रवर्ण ॥ पितळ लोहधातु पूर्ण ॥ पांच पुतळे करून आण ॥ तुजसमान हे राया ॥ १४ ॥ ऐसी आज्ञा करितांच नाथ ॥
प्रेरिले रायें ग्रामांत दूत ॥ [6]हेमकार लोह[7]कारासहित ॥ ताम्रकारका आणिलें ॥ १५ ॥ जे परम कुशल अति निगुती ॥ लक्षून सोडिलें
हेरांप्रती ॥ धातु ओपून तयांचे हातीं ॥ पुतळ्यांतें योजिलें ॥ १६ ॥ मग ते आपुले [8]धीकोटी ॥ पुतळे रचिती मेणावरती ॥ नाथा-
लागीं दाऊन दृष्टीं ॥ रसयंत्रीं ओतिले ॥ १७ ॥ पाहोनि दिन अति सुदिन ॥ मग नृपासह पुतळे घेवोन ॥ पाहता झाला गुरु-
स्थान ॥ विशाळबुद्धी कानिफा ॥ १८ ॥ गरतीकांठीं आपण बैसोन ॥ पुतळा ठेवोन हेमवर्ण ॥ राजाहातीं कुदळ देवोन ॥ घाव
घालीं म्हणतसे ॥ १९ ॥ घाव घालितां परी लगबगां ॥ पुसतां स्वामी नांव सांगा ॥ सांगीतल्यावरी अति वेगा ॥ गरतीबाहेर
निघे कीं ॥ २० ॥ ऐसें सांगोनि प्रथम रायातें ॥ मग कुदळी दिधली हातातें ॥ उपरी चिरंजीवप्रयोगातें ॥ भाळीं चर्चिली विभूती
॥ २१ ॥ पुतळा ठेवोनि मध्यगरती ॥ मागें उभा राहिला नृपती ॥ लवकर घाव घाली [9]क्षितीं ॥ आंतून पुसे महाराज ॥ २२ ॥
कोणी येवोनि घालिती घाव ॥ वेगीं वदें कां तयाचें नांव ॥ नृप म्हणे मी [10]राणीव ॥ गोपीचंद असें कीं ॥ २३ ॥ रायें सांगतांचि

१ श्रीपांडुरंग. २ ग्रंथामध्यें. ३ मागील कथेच्या संदर्भाकडे पाहिलें असतां. ४ रक्षक. ५ सर्वपणें. ६ सोनार. ७ लोहार. ८ बुद्धीनें. ९ जमिनीवर. १० राजा.

नाम ॥ निघाला होता गरतींतून ॥ श्रीजालिंदराचें शापवचन ॥ कनकप्रतिमे झगटलें ॥ २४ ॥ तीव्रशाप वैश्वानर[1] ॥ व्यापिलें कनकपुतळ्याचें शरीर ॥ क्षण न लागतां महीवर ॥ भस्म होवोन पडियेलें ॥ २५ ॥ भस्म होतां कनकप्रतिमा ॥ दुसरा ठेविला उगमा ॥ तयाही मागें नरेंद्रोत्तमा ॥ पुन्हां गरतीं स्थापिलें ॥ २६ ॥ रौप्यवर्णी पुतळ्यामागें ॥ राव उभा केला वेगें ॥ पुन्हां विचारिलें सिद्धियोगें ॥ कोण आहेस म्हणवोनी ॥ २७ ॥ पुन्हां सांगे नृप नांव ॥ गरतीबाहेर वेगीं धांव ॥ जालिंदरशापगौरव ॥ जळ जळ खाक होवो कीं ॥ २८ ॥ ऐसें वदतां शापोत्तर ॥ पुतळा पेटला वैश्वानरें ॥ तोही होवोनि भस्मपर ॥ महीलागीं मिरवला ॥ २९ ॥ मग तिसरा लोहपुतळा पूर्ण ॥ तोही झाला शापें भस्म ॥ चवथा पांचवा गति दुर्गम ॥ त्याचपरी पावला ॥ ३० ॥ यावरी त्या नृपनाथा ॥ श्रीकानिफा झाला सांगता ॥ मातें वदोनि नाम सर्वथा ॥ नाथाप्रती सांगावें ॥ ३१ ॥ अवश्य म्हणोनि गौडपाळ ॥ लवकरी भेदी अति सबळ ॥ तो नाद ऐकून तपी केवळ ॥ विचार करीत मानसीं ॥ ३२ ॥ माझा क्रोध वडवानळ ॥ जाळूनि टाकील ब्रह्मांड समग्र ॥ तेथें वांचला त्रिलोचनकुमर[2] ॥ हें आश्चर्य वाटतें ॥ ३३ ॥ कृतांताचे दाढेआंत ॥ सांपडलिया सुटोनि जात ॥ शिववैश्वानरें मृत्य ॥ हें आश्चर्य वाटतसे ॥ ३४ ॥ महातक्षकातें दंश करून ॥ वांचवूं न शके कोणी प्राण ॥ केवीं वांचला नृपनंदन ॥ हें आश्चर्य वाटतें ॥ ३५ ॥ परम संकट पाहोनी ॥ प्राण उदित घेत हिरकणी ॥ तो वांचूनी मिरवे जनीं ॥ हें आश्चर्य वाटतसे ॥ ३६ ॥ उरग[3] खगेंद्रा[4] हातीं लागतां ॥ परी तो न मरे भक्षण करितां ॥ तेवीं झालें नृपनाथा ॥ हेंचि आश्चर्य वाटतें ॥ ३७ ॥ कीं मूषक सांपडल्या मुखांत ॥ त्यातें कदा न ये मृत्य ॥ तेवीं वांचला हा नृपनाथ ॥ हेंचि आश्चर्य वाटतें ॥ ३८ ॥ सहज उभा पर्वतानिकटीं ॥ कडा तुटोन पडला माथीं ॥ त्यांत वांचला ऐसें म्हणती ॥ हेंचि आश्चर्य वाटतसे ॥ ३९ ॥ ऐसा विचार मनांत ॥ करिता झाला जालिंदरनाथ ॥ चित्तीं म्हणे त्या भगवंत ॥ साह्य झाला रक्षणीं ॥ ४० ॥ तरी आतां असो ऐसें ॥ वांचल्या अमर करूं त्यास ॥ ऐसें विचारूनि चित्तास ॥ मनीं गांठी दृढ धरिली ॥ ४१ ॥ येरीकडे कानिफानाथ ॥ हुंकार नृपासी देत ॥ तंव उभा स्वकरीं व्यक्त ॥ लवकरी मही भेदीतसे ॥ ४२ ॥ लवकरी घाव कानीं उठतां ॥ श्रीजालिंदर होय पुसता ॥ कोण आहेस अद्यापपर्यंत ॥ घाव घालिसी महीतें ॥ ४३ ॥ ऐकतां श्रीगुरुवचन ॥ रायाआधीं गजकर्णनंदन ॥ सांगून आपलें नामाभिधान ॥ गोपीचंदाचें सांगतसे ॥ ४४ ॥ म्हणे महाराजा तपोजेठी ॥ मी बाळक कानिफा महीपाठीं ॥ पहावया चरण दृष्टीं ॥ बहुत भुकेले चक्षू ते ॥ ४५ ॥ म्हणवोनि गोपीचंद नृपनाथ ॥ तुम्हां काढावया उदित[5] ॥ ऐसी ऐकोनि सच्छिष्यमात ॥ म्हणे अद्याप नृप वांचला ॥ ४६ ॥ तरी आतां चिरंजीव ॥ असो अर्कअवधी[6] ठेव ॥ अमरकांती सदैव भाव ॥ जगामाजी मिरवो कां ॥ ४७ ॥ ऐसें वदोनि जालिंदर-

१ अग्नि. २ त्रिलोचनराजाचा मुलगा ( गोपीचंद ). ३ सर्प. ४ गरुडाच्या. ५ उद्युक्त. ६ सूर्य असेपर्यंत.

नाथ ॥ निजचक्षूनें पहावया सुत ॥ बोलता झाला अति तळमळत ॥ म्हणे महीतें [1]विदारीं ॥ ४८ ॥ ऐसी आज्ञा होतांच तेथें ॥ मग काढिते झाले वरील लिदीतें ॥ तंव ते मृत्तिका दशवर्षांत ॥ महीव्यक्त झालीसे ॥ ४९ ॥ मग कामाठी लावून नृपती ॥ उकरिता झाला मही ती ॥ वरील प्रहार वज्राप्रती ॥ जावोनियां भेदलासे ॥ ५० ॥ मग तो नाद ऐकोनि नाथ ॥ म्हणे आतां बसा स्वस्थ ॥ मग जल्पोनि शक्रास्त्र ॥ वज्रास्त्रातें काढिलें ॥ ५१ ॥ मग नाथ आणि [2]गजकर्णनंदन ॥ पहाते झाले उभयवदन ॥ मग चित्तीं मोहाचें अपार [3]जीवन ॥ चक्षुद्वारें लोटलें ॥ ५२ ॥ मग गरतीबाहेर येवोनि नाथ ॥ प्रेमें आलिंगिला सुत ॥ म्हणे बा प्रसंगें होतास येथ ॥ म्हणवोनि नृपनाथ वांचला ॥ ५३ ॥ परी गरतीबाहेर येतांचि नाथ ॥ चरणीं लोटला नृपनाथ ॥ मग त्यातें कवळोनि धरीत ॥ मौळीं हात ठेवीतसे ॥ ५४ ॥ म्हणे बाळा प्रळयाग्नी ॥ त्यांत निघालासी वांचुनी ॥ आतां जोंवरी [4]शशितरणी ॥ तोंवरी मिरवें महीतें ॥ ५५ ॥ यावरी त्रिलोचनकामिनी ॥ मैनावती लोटली चरणीं ॥ नेत्रीं अश्रुपात आणोनी ॥ स्वामीलागीं बोलतसे ॥ ५६ ॥ म्हणे महाराजा एकादश वर्षांत ॥ मातें लोटली महातमरात ॥ माझा [5]अर्क गुरुनाथ ॥ अस्ताचळीं पातलासे ॥ ५७ ॥ मित्रकुमुदिनी दीनवाणी ॥ हुरहुर पाहे जैसी तरणी ॥ कीं मम बाळकाची जननी ॥ गेली कोठें कळेना ॥ ५८ ॥ कीं मम वत्साची [6]गाउली ॥ कोणे रानीं दूर गेली ॥ समूळ वत्साची आशा सांडिली ॥ तिकडेच गुंतली कैसेनि ॥ ५९ ॥ कां मम चकोराचा [7]उडुगणपती ॥ कैसा पावला अस्तगती ॥ कीं मज चातकाचे अर्थी ॥ ओस घन पडियेला ॥ ६० ॥ सदा वाटे हुरहुर जीवा ॥ कीं लोभ्याचा चुकला द्रव्यठेवा ॥ कीं अंधाची शक्ति काठी टेंकावा ॥ कोणें हरोनि नेलीसे ॥ ६१ ॥ ऐसे एकादश संवत्सर ॥ मास गेले महाविकार ॥ ऐसें बोलोनि नेत्रीं पूर ॥ अश्रुघन वर्षतसे ॥ ६२ ॥ मग तियेसी हृदयीं धरोनि नाथ ॥ स्वकरें नेत्राश्रु पुसत ॥ तीन्ही बाळकें धरोनि यथार्थ ॥ माय हेलवे त्यामाजी ॥ ६३ ॥ गोपीचंदाचें मुख कुरवाळून ॥ बोलता झाला अग्निनंदन ॥ बा रे तुझें काय मन ॥ इच्छीतसे मज सांग ॥ ६४ ॥ राजवैभवातें भोगावें ॥ कीं आह्मीं समययोग्यते मिरवावें ॥ कोणतें तुझे मनीं भावे ॥ तैसा योग घडेल बा ॥ ६५ ॥ अशाश्वत शाश्वत दोन पद ॥ राज्य वैराग्य मार्गभेद ॥ तरी तुज आवडे तोचि वृंद ॥ स्वीकारीं कां बाळका ॥ ६६ ॥ म्यां तूतें केलें अमरपणीं ॥ परी तैसें नाहीं राजमांडणीं ॥ अनेक आलें अभ्र दाटोनी ॥ मृगजळासमान तें ॥ ६७ ॥ बा रे संपत्ती अमरां कैसी ॥ तेही आटेल काळवेळेसीं ॥ दिसतें तितकें वैभवासी ॥ नाशिवंत आहे बा रे ॥ ६८ ॥ बा रे पूर्वी राज्य सांडून ॥ कित्येक बैसले योग्यांत येवोन ॥ परी तो योग सोडून ॥ राज्यवैभवा नातळला ॥ ६९ ॥ पाहें [8]गाधिसुताचें वैभव ॥ महीलागीं केवढें नांव ॥ परी तो सोडून सकळ वैभव ॥ योगक्रिया आचरला ॥ ७० ॥ उत्तानपाद महीवरती ॥ काय न्यून असे संपत्ती ॥

१ उकर. २ कानिफा. ३ अश्रु. ४ चंद्रसूर्य. ५ सूर्य. ६ गाय. ७ चंद्र. ८ विश्वामित्राचें.

परी सुताची कामशक्ती ॥ वेगें जनीं दाटलीसे ॥ ७१ ॥ तस्मात् अशाश्वत ओळखून ॥ बा ते झाले सनातन ॥ तरी आतां केउतें मन ॥ इच्छितें तें मज सांगें ॥ ७२ ॥ गोपीचंद विचार करी मनांत ॥ राज्यवैभवीं सामर्थ्य गळित ॥ अहा योगी जालिंदरनाथ ॥ चिरंजीव मिरवतसे ॥ ७३ ॥ आज एकादश वर्षेंपर्यंत ॥ गेरतगलित पचला योगिनाथ ॥ जेणें यम शरणागत ॥ पायातळीं लोळतसे ॥ ७४ ॥ जेणें कृतांत निर्बळ केला ॥ तो राज्य मेळवूनि खळ ठेला ॥ हेमकर्णें अशक्त झाला ॥ परीस लोहाकारणें ॥ ७५ ॥ सुरभी त्रैलोक्यकामना ॥ पूर्ण करील क्षुधार्तवचना ॥ ती स्वपोटा रानोराना ॥ शोधील काय तृणातें ॥ ७६ ॥ ब्रह्मांडावरी जयाची सत्ता ॥ तो कोणे अर्थीं दरिद्रता ॥ भोगील काय ऐसी वार्ता ॥ श्लाघ्य दिसेना बोलाया ॥ ७७ ॥ तरी तें वैराग्य भाग्यसदन ॥ साध्य करावें कायें मनें ॥ ऐसा पश्चात्ताप दारुण ॥ चित्तामाजी डवरला ॥ ७८ ॥ मग म्हणे गुरुमहाराज ॥ इंधनीं अग्नि होतां सज्ज ॥ तेवीं विधानचि तैसें विराजे ॥ पावका स्पर्श झालिया ॥ ७९ ॥ तरी आतां सरतें पुरतें ॥ आपुल्यासमान करा मातें ॥ आळीभृंगन्यायमतें ॥ करूनि मिरवें महीसीं ॥ ८० ॥ ऐकोनि दृढोत्तर वचन ॥ श्रीगुरु स्वकरातें उचलोन ॥ पृष्ठी थापटी वाचे वचन ॥ गाजी गाजी म्हणतसे ॥ ८१ ॥ मग वरदहस्त स्पर्शोनि मौळीं ॥ सकळ देहातें कृपें न्याहाळी ॥ कर्णीं ओपून मंत्रावळी ॥ स्वनाथमार्गीं मिरविला ॥ ८२ ॥ ऐसें होतां अंग लिप्त ॥ मग दिसून आलें अशाश्वत ॥ काया माया दृश्य पदार्थ ॥ विनय चित्तीं मिरवले ॥ ८३ ॥ मग वटतरूचें दुग्ध काढून ॥ जटा वळी राजनंदन ॥ त्रिसट कौपीन परिधानून ॥ कर्णीं मुद्रा परिधानी ॥ ८४ ॥ शैली कंथा परिधानूनी ॥ शिंगीनाद गाजवी भुवनीं ॥ कुबडी फावडी कवळून पाणी ॥ नाथपणीं मिरवला ॥ ८५ ॥ भस्मझोळी कवळून कक्षेंत ॥ आणि द्वितीय झोळी भिक्षार्थ ॥ हातीं कवळून नाथनाथ ॥ जगामाजी मिरवला ॥ ८६ ॥ परी हा वृत्तांत सकळ गांवांत ॥ अंतःपुरादिकीं झाला श्रुत ॥ श्रुत होतांचि अपरिमित ॥ शोकसिंधू उचंबळला ॥ ८७ ॥ एकचि झाला हाहाकार ॥ रुदन करितां लोटला पूर ॥ स्त्रिया धरणीस टाकिती शरीर ॥ मुखीं मृत्तिका घालिती ॥ ८८ ॥ मैनावतीसी शिव्या देत ॥ म्हणती हिनेंचि केला सर्वस्वीं घात ॥ अहा अहा नृपनाथ ॥ महीं कोठें पहावा ॥ ८९ ॥ आठवून रायाचे विशाळ गुण ॥ भूमीवरी लोळती रुदन करून ॥ मूर्च्छागत होऊन प्राण ॥ सोडूं पाहती रुदनांत ॥ ९० ॥ अहा हें राज्यवैभव ॥ कैसी आली विवशी माव ॥ अहा सुखाचा सकळ अर्णव ॥ वडवानळें प्राशिला ॥ ९१ ॥ अहा रायाचें बोलणें कैसें ॥ कधीं दुखविलें नाहीं मानस ॥ आमुचे वाटेल जें इच्छेस ॥ राव पुरवी आवडीनें ॥ ९२ ॥ एक म्हणे सांगूं काय ॥ रायें वेष्टिलें चित्त मोहें ॥ म्लानवदन पाहोनि राय ॥ हृदयीं कवळी मोहातें ॥ ९३ ॥ म्हणे बाई मुखातें कुरवाळून ॥ परम प्रीतीनें घेत चुंबन ॥ अति स्नेहानें अर्थ पुरवून ॥ मनोरथ पुरवी माझे गे ॥ ९४ ॥

१ खांचेंत पडलेला. २ यम. ३ कामधेनू. ४ स्तुत्य. ५ पाही. ६ वडाचा चीक. ७ पृथ्वीवर.

ऐसें म्हणून आरंबळत ॥ एकसरां शब्द करीत ॥ एक म्हणे वो बाई मात ॥ काय परी सांगूं रायाची ॥ ९५ ॥ अगे वत्सालागीं जैशी गाय ॥ क्षणिक विसंबूं कदा न पावे ॥ तेवीं क्षणक्षणां येऊन राय ॥ वदन पाहे माझें गे ॥ ९६ ॥ एक म्हणे अर्थ पोटीं ॥ किती सांगूं राजदृष्टी ॥ वांकुडा केश कॅबरीथाटी ॥ पडतां सांवरी हस्तानें ॥ ९७ ॥ अगे कुंकुमरेषा वांकडी होत ॥ ती सांवरी नृपनाथ ॥ मायेहून अधिक आतिथ्य ॥ माझें करीत होता गे ॥ ९८ ॥ ऐसें म्हणून धरणीं अंग ॥ धडाडून टाकिती सुभाग्य ॥ म्हणती विधात्या बरवा भांग ॥ निजभाळीं रेखिला कीं ॥ ९९ ॥ मस्तक धरणीवरी आपटिती ॥ धडधडां हस्तें हृदय पिटिती ॥ महीं गडबडून पुन्हां उठती ॥ पुन्हां सांडिती शरीरातें ॥ १०० ॥ म्हणती राया तुजवीण ॥ आतां कोण करील संगोपन ॥ आतां आमुचे सकळ प्राण ॥ परत्र देशांत जातील हो ॥ १ ॥ ऐसें म्हणून आरंबळती ॥ अट्टाहासें हृदय पिटिती ॥ मृत्तिका घेऊनि मुखीं घालिती ॥ केश तोडिती तटतटां ॥ २ ॥ म्हणती अहा राया तीन वेळ ॥ शय्येहूनि उठूनि पाजिसी जळ ॥ ऐसा कनवाळू असूनि निर्मळ ॥ सोडून कैसा जासी रे ॥ ३ ॥ अहा राया शयनीं निजतां ॥ उदर चापसी आपुल्या हाता ॥ रिक्त लागतां ऊठोनि तत्त्वतां ॥ भोजन घालीत होतासी ॥ ४ ॥ ऐसा कनवाळू तूं मनीं ॥ आतां कैसा जासी सोडुनी ॥ ऐसें म्हणोन शरीर धरणीं ॥ धडाडून टाकिलें ॥ ५ ॥ म्हणे रायाचें स्वरूप ॥ पहातांच पुरतसे कंदर्प ॥ तरी त्या स्वरूपाचा झाला लोप ॥ कोठें पाहूं महाराजा ॥ ६ ॥ एक म्हणे नोहे भर्ता ॥ प्रत्यक्ष होती आमुची माता ॥ कैसी सांडून जात आतां ॥ निढळवाणी पाडसा ॥ ७ ॥ एक म्हणे माझी हरिणी ॥ कैसी पाडसा जात सोडूनी ॥ एक म्हणे माझी कूर्मिणी ॥ कृपादृष्टी आवगतली ॥ ८ ॥ एक म्हणे मज मीनाचें जळ ॥ कैसें आटलें अब्धीचें जळ ॥ दुःखार्कांची झळाळ ॥ साहवेना वो माये ॥ ९ ॥ एक म्हणे माउली माझी ॥ स्नेहाचा पान्हा पाजी ॥ वियोगकाननीं चुकर आजी ॥ कैसी झाली दैवानें ॥ ११० ॥ एक म्हणे आमुची पक्षिणी ॥ अंडजांसमान पाळिलें धरणी ॥ आतां चंचुस्नेहेंकरोनी ॥ कोण ओपील ग्रासातें ॥ ११ ॥ एक म्हणे मज चातकाकारण ॥ भरतां नोहे गे अंबुदस्थान ॥ परम स्नेहाचें पाजितां जीवन ॥ आजि ओस कैसा झाला गे ॥ १२ ॥ ऐसें म्हणोनी आरंबळती ॥ एकमेकींचे गळां पडती ॥ रडती पडती पुन्हां उठती ॥ आरंबळती आक्रोशें ॥ १३ ॥ ऐसा आकांत अंतःपुरांत ॥ येरीकडे जालिंदरनाथ ॥ राया गोपीचंदा सांगत ॥ तपालागीं जाईं कां ॥ १४ ॥ परी राया ऐक मात ॥ सुरत्नपणाचा पाहों हेत ॥ तुझ्या स्त्रिया अठरा शत ॥ भिक्षा मागें तयांपासीं ॥ १५ ॥ अलक्ष आदेश निरंजन ॥ ऐसा सवाल मुखें वदोन ॥ अंतःपुरांत संचार करोन ॥ भिक्षा मागें बाळका तूं ॥ १६ ॥ शिंगीनाद वाजवूनि हातीं ॥ भिक्षा दे माई वदोनि उक्ती ॥ ऐशापरी भेटोनि युवती ॥ तपालागीं जाईं कां ॥ १७ ॥ मग अवश्य म्हणोनि नृप-

१ वेणी. २ ब्रह्मदेवा. ३ रिकामें. ४ मदन. ५ कांसवीण. ६ टाकून दिली. ७ लहान पिलांप्रमाणें. ८ मेघाचें ठिकाण. ९ पाणी. १० स्त्रियांना.

नाथ ॥ संचार करी अंतःपुरांत ॥ अलक्ष निरंजन मुखें वदत ॥ माई भिक्षा दे म्हणतसे ॥ १८ ॥ तें पाहूनि त्या युवती ॥ महाशोकाब्धींत उडी घालिती ॥ एकचि कोल्हाळ झाला क्षितीं ॥ नाद ब्रह्मांडीं आदळतसे ॥ १९ ॥ एक हातें तोडिती केशांतें ॥ एक मृत्तिका घालिती मुखांत ॥ एक म्हणे दाही दिशा ओस दिसत ॥ दाही विभाग झाल्यानें ॥ १२० ॥ एक धुळींत लोळती ॥ एक उठून पुन्हां पडती ॥ एक हृदय पिटोनि हस्तीं ॥ आदळिती मस्तकें ॥ २१ ॥ एक पाहोनि रायाचें स्वरूप ॥ म्हणती अहाहा कैसा भूप ॥ सवितारूपी झाला दीप ॥ खद्योतपणीं दिसतसे ॥ २२ ॥ अहाहा राव वैभवार्णव[1] ॥ कैसा दिसतो दीनभाव ॥ कीं मेरुमांदार सोडूनि सर्व ॥ मशक दृष्टीं ठसावला ॥ २३ ॥ अहा राय हस्तेंकरून ॥ अपार याचकां वांटी धन ॥ आतां कक्षेंत झोळी घालून ॥ मागे कण घरोघरीं ॥ २४ ॥ ऐसें म्हणोनि आरंबळती ॥ धरणीवरी अंग टाकिती ॥ पुन्हां उठोनि अवलोकिती ॥ म्हणती अहा काय झालें ॥ २५ ॥ असो नृप तो अंतःपुरांगणीं ॥ आदेश निरंजन वदे वाणी ॥ मुख्य नायिका लोमावती राणी ॥ रायापासीं पातली ॥ २६ ॥ मुखचंद्र गळे बोलूनी ॥ नयनीं अश्रु अपार जीवनीं ॥ रायालागीं पोळा[2] घालूनी ॥ वेष्टूनियां बोलती त्या ॥२७॥ तिचे मागें चंपिका कारंती ॥ उठोनि येतात मागें समस्ती ॥ राजस्त्रिया अट्टहास करिती ॥ धांव घेती मागें लगबगां ॥ २८ ॥ म्हणती राया असो कैसें ॥ घडून आलें ईश्वरसत्तेसें ॥ परी येथेंच राहून पूर्ण योगास ॥ संपादिंजे महाराजा ॥ २९ ॥ आम्हां दरिद्रियांचें स्वरूपमांदूस ॥ लोपवूं नका सहसा महीस ॥ आम्हीं तुम्हांवीण दिसतों ओस ॥ प्राणावीण शरीर जैसें ॥ १३० ॥ हे राया आम्ही स्त्रिया कोटी ॥ परम अंध महीपाठीं ॥ तरी आमुची सबळ काठी ॥ टेंका हरूं नका जी ॥ ३१ ॥ तरी येथेंचि योग आचरावा ॥ आम्हीं न छळूं विषयभावा[3] ॥ परी तव स्वरूपाचाचि ठेवा ॥ पाहून तो शांत करूं कीं ॥ ३२ ॥ जैसें जीर्ण कडतर ॥ परी म्हणाया वैभवी थोर छत्र ॥ तेवीं तव आश्रयीं सर्व पवित्र ॥ वैभवमंडण आम्हांसी ॥ ३३ ॥ तरी मानेल तेथें पर्णकुटिका ॥ बांधून देऊं जडितहाटका[4] ॥ आम्ही बारा सोळा शत बायका ॥ सेवा करूं आदरानें ॥ ३४ ॥ सुवर्णें शिंगी देऊं मढवून ॥ आणि रत्नविकी शैल्या परिधानून ॥ कनकचिरी कंथा घालून ॥ सुखसंपन्न भोगावें ॥ ३५ ॥ मुक्तारत्नें हिरे माणिक ॥ संगीत करून हाटकीं देख ॥ त्यातें भूषणमुद्रा अलोलिक ॥ सुखसंपन्न भोगावें ॥ ३६ ॥ कनक चीर[5] तेज विपुल ॥ शेले शाली शाला दुशाल ॥ स्वीकारा सांडून मृगछाल[6] ॥ हें सुखसंपन्न भोगावें ॥ ३७ ॥ लोड तिवासे मंचक सुगम ॥ गादी तोषक अति गुल्म ॥ तरी भस्म सन्निधीकरून ॥ सुखसंपन्न भोगावें ॥ ३८ ॥ भिक्षातुकडे सूक्ष्म कठिण ॥ त्यजून सेवीं षड्रसान्न ॥ घृत दुग्ध दधि सेवीं पक्वान्न ॥ हें सुखसंपन्न भोगावें ॥ ३९ ॥ एकट[7] सेवीं त्यजीं कानन ॥ दासदासी सेवकजन ॥ सेवा करितां षोडशोपचारान ॥ हें सुखसंपन्न

१ वैभवसमुद्र. २ घेरा. ३ विषयाकरितां. ४ सोनें जडवून. ५ वस्त्र. ६ हरिणचर्म. ७ एकांत.

भोगावें ॥ १४० ॥ चुवा चंदन अर्गजासुवास ॥ मार्जन करूं तव देहास ॥ तरी धिक्कारून तृणासनास ॥ सुखसंपन्न भोगावें ॥ ४१ ॥ हत्ती घोडे शिबिका सदन ॥ टाकून कराल तीर्थाटण ॥ परी चालाल तें दुःख त्यजून ॥ सुखसंपन्न भोगावें ॥ ४२ ॥ महाल चोकट संगीत रंगीत ॥ ते सांडूनि विपिनीं पडाल दुःखित ॥ तरी तें त्यजूनि रहा येथ ॥ हें सुखसंपन्न भोगावें ॥ ४३ ॥ छत्र चामरें प्रजा अंकित ॥ त्यजूनि फिराल अरण्यांत ॥ एकटपणीं त्यजूनि रहा येथ ॥ हें सुखसंपन्न भोगावें ॥ ४४ ॥ मृगाक्षा[१] खंजीर पद्मनयनीं ॥ पद चुरती कोमलपाणीं[२] ॥ तरी तृणांकुरशयन त्यजुनी ॥ हें सुखसंपन्न भोगावें ॥ ४५ ॥ चंद्रानना गजगामिनी ॥ बोलती संवाद रसाळ वाणी ॥ तरी यांचा त्याग करोनी ॥ हें सुखसंपन्न भोगावें ॥ ४६ ॥ ऐशा स्त्रिया संवादती ॥ परी कोप चढला तयाच्या चित्तीं ॥ दूर हो लंडी म्हणोनि उक्ती ॥ धिक्कारीत तयांतें ॥ ४७ ॥ परी त्या मोहें वेष्टून बोलत ॥ राया एकटें पडावें अरण्यांत ॥ तुम्हांसवें बातचीत ॥ कोण करील महाराजा ॥ ४८ ॥ येरी म्हणे अरण्यपोटीं ॥ सिंगी सारंगी करील गोष्टी ॥ स्त्रिया म्हणती आसन-दृष्टी ॥ वैसन कैंचें हो तेथें ॥ ४९ ॥ राव म्हणे मही आसन ॥ अंबरासारखें असे ओढवण[३] ॥ स्त्रिया म्हणती शयनीं कोण ॥ निजेल तुमच्या सांगतीं ॥ १५० ॥ येरी म्हणे कुबडी फावडी ॥ शयन करितील दोन्ही थडी ॥ स्त्रिया म्हणती शैत्य हुडहुडी ॥ कोण निवारी सांगावें ॥ ५१ ॥ येरी म्हणे अचळ धुनी ॥ पेटवा घेईल पंचाग्नी ॥ ते सबळ शीतनिवारणीं ॥ होतील योग साधावया ॥ ५२ ॥ स्त्रिया म्हणती अलौकिक ॥ तेथें कोठें परिचारक[४] लोक ॥ राज्यासनीं पदार्थ कवतुक ॥ देत होते आणूनियां ॥ ५३ ॥ येरी म्हणे व्याघ्रांबर ॥ आसन विराजूं वज्रापर ॥ मग धांव घेती नारीनर ॥ कौतुकपदार्थ मिरवावया ॥ ५४ ॥ स्त्रिया म्हणती मोह-व्यक्त ॥ कोणतीं असती मायावंत ॥ मायबाप भगिनीसुत ॥ अरण्यांत कैंचीं हीं ॥ ५५ ॥ येरी म्हणे विश्वरूप ॥ घरघर आई घरघर बाप ॥ इष्टमित्र भगिनी गोतरूप ॥ शिष्य साधक मिरवती ॥ ५६ ॥ स्त्रिया म्हणती षड्रसादि अन्न ॥ विपिनीं[६] मिळतील कोठून ॥ येरी म्हणे जीं फळें सुगम ॥ षड्रसादि असती तीं ॥ ५७ ॥ स्त्रिया म्हणती वेंचाया साधन ॥ विपिनीं मिळेल जी कोठून ॥ येरी म्हणे ब्रह्मरूपानें ॥ घेऊं देऊं वेव्हारासी ॥ ५८ ॥ स्त्रिया म्हणती फाटल्या कौपीन ॥ पुनः मिळेल ती कोठून ॥ येरी म्हणे इंद्रियदमन ॥ विषयीं कासोटी घालूं कीं ॥ ५९ ॥ स्त्रिया म्हणती फाटल्या कंथा[७] ॥ ते कोठून मिळेल जी समर्था ॥ येरी म्हणे योग आचरतां ॥ दिव्य कंथा होईल ॥ १६० ॥ स्त्रिया म्हणती सिंगी सारंगी ॥ फुटून गेलिया प्रसंगीं ॥ मग गोष्टी करावयाची तरंगी ॥ कोण आहे तुम्हांपाशीं ॥ ६१ ॥ येरी म्हणे सगुण निर्गुण ॥ शिंगी सारंगी असती दोन ॥ आगमनिगमाचे तंतू ओंवून ॥ सुखसंवाद करीन मी ॥ ६२ ॥ स्त्रिया म्हणतीं कुबडी फावडी ॥ जीर्ण झालिया लागती देशोधडी ॥ मग सुखशयनीं निद्रापहुडी ॥ कोण संगीन करील

१ हरिणासारख्या डोळ्यांच्या स्त्रिया. २ मृदुहातांनीं. ३ वस्त्र. ४ पांघरूण. ५ चाकर. ६ अरण्यांत. ७ गोदडी.

जी ॥ ६३ ॥ येरी म्हणे [1]खेचरी भूचरी उभय ॥ आदेय विदेह प्रकाश स्वरूपमय ॥ वाम दक्षिण घेऊनि तन्मय ॥ डोळां लावीन निर-
जनीं ॥ ६४ ॥ स्त्रिया म्हणती शैल्य तुटून ॥ गेल्या पुन्हां आणाल कोठून ॥ येरी म्हणे मोक्षयुक्तिसमान ॥ शैल्यभूषण मिरवीन गे
॥ ६५ ॥ स्त्रिया म्हणती कर्णमुद्रिका ॥ हरपोन गेल्या नरपाळका ॥ मग काय करशील वनीं देखा ॥ नाथपंथीं मिरवावया ॥ ६६ ॥
येरी म्हणे वो खेचरी भूचरी ॥ लुप्तमुद्रा कर्णद्वारीं ॥ अलक्ष चाचरी अगोचरी ॥ लेवविल्या गुरुनाथें ॥ ६७ ॥ ऐसें बोलतां उत्तरोत्तर ॥
म्हणे माई भिक्षा देईं सत्वर ॥ तंव त्या धांवती धरावया कर ॥ कंठीं मिठी घालावया ॥ ६८ ॥ ऐसें चांचल्यगुणयुक्त ॥ दृष्टीं पाहू-
नियां नृपनाथ ॥ कुबडी फावडी उगारीत ॥ दूर होईं लंडी म्हणतसे ॥ ६९ ॥ तें गुप्त पाहोनि मैनावती ॥ [2]सिद्धार्थ अन्न घेऊनि
हातीं ॥ शीघ्र येऊन पुत्राप्रती ॥ म्हणे भिक्षा घे नाथा ॥ १७० ॥ मग भिक्षा घेऊनि झोळीं ॥ मातेपदीं अर्पी [3]मौळी ॥ मग तेथून
निघून तये वेळीं ॥ नाथापाशीं पातला ॥ ७१ ॥ मग जो झाला स्त्रियांत [4]वेव्हार ॥ तो सकळ सांगितला वाग्युत्तर ॥ मैनावती
येऊन तत्पर ॥ तीही वदे वृत्तांतासी ॥ ७२ ॥ असो उभयतांचा वृत्तांत ऐकून ॥ मान तुकावी [5]अग्निनंदन ॥ मग तीन रात्री रायासी
ठेवून ॥ बहुतां अर्थीं उपदेशिला ॥ ७३ ॥ मग लोमावतीचा [6]उदरव्यक्त ॥ गोपीचंदाचा होता [7]सुत ॥ मुक्तचंद नाम त्याचें ॥ राज्या-
सनीं वाहिला ॥ ७४ ॥ स्वयें जालिंदरें कौतुक ॥ राज्यपटीं केला अभिषेक ॥ मंत्री प्रजा सेवक लोक ॥ तयाहातीं ओपिले ॥ ७५ ॥
राया गोपीचंदा सांगे वचन ॥ बा रे पाहें बद्रिकाश्रम ॥ बद्रिकेदारालागीं नमून ॥ तपालागीं तूं बैसें कां ॥ ७६ ॥ लोहकंटकीं चर-
णांगुष्ठ ॥ देऊन तपाचे दावीं कष्ट ॥ द्वादश वरुषें नेम स्पष्ट ॥ एकाग्रीं रक्षावा ॥ ७७ ॥ ऐसें सांगून तयातें ॥ मग प्रजा लोकादि
समस्तें ॥ निघाले रायास बोळवायातें ॥ कानिफासुद्धां जालिंदर ॥ ७८ ॥ परी प्रजेचे लोक शोक करिती ॥ राया गोपीचंदाचे गुण आठ-
विती ॥ नेत्रीं ढाळून अश्रुपातीं ॥ रुदन करिती अट्टाहास्यें ॥ ७९ ॥ म्हणती अहा सांगों कायी ॥ नृप नव्हे होती आमुची आई ॥
पक्षाखालीं सकळ मही ॥ संबोधीतसे महाराजा ॥ १८० ॥ ऐसे वर्णून तयाचे गुण ॥ आक्रंदती प्रजाजन ॥ परी आतां पुरे करा
विघ्न ॥ शोकमांदार खोंचला ॥ ८१ ॥ तृणपाषाणादि तरू ॥ पक्षी पशु जाती अपारू ॥ राया नृपाकरितां समग्र ॥ शोकाकुलित
मिरवले ॥ ८२ ॥ मग एक कोस बोळवून ॥ समस्त आणिले अग्निनंदनें ॥ जेथील तेथें संबोखून ॥ आश्वासीत सकळांसी ॥ ८३ ॥
परी राया जातां ठायीं ठायीं ॥ धांवून पाहतां उंच मही ॥ म्हणती सोडून गेलीस आई ॥ कधीं भेटसी माघारां ॥ ८४ ॥ घडी
घडी दृष्टी [8]ऊर्ध्व करून ॥ पाहती रायाचें वदन ॥ कोणी मागें जाती धांवून ॥ वदन पाहून येताती ॥ ८५ ॥ ऐसा राजा जातां
दोन कोश ॥ मग सकळ मिरवले एक निराश ॥ मग मागें उलटून [9]संभारास ॥ ग्रामामाजी संचरले ॥ ८६ ॥ राजसदनीं येऊन

१ हीं योगमुद्रांचीं नांवें आहेत. २ शिजलेलें. ३ मस्तक. ४ व्यवहार. ५ जालिंदर. ६ उदरीं झालेला. ७ मुलगा. ८ उंच लावून. ९ सर्व मंडळीला.

समस्त ॥ सकळ बैसले दीनवंत ॥ जैसें शरीर प्राणरहित ॥ एकसरां मिरवलें ॥ ८७ ॥ मग श्रीजालिंदर राजसदनीं ॥ मुक्तचंदा विराजून राज्यासनीं ॥ मंत्रियातें पाचारुनी ॥ वस्त्रेंभूषणें आणविलीं ॥ ८८ ॥ मग जैसें जयाचें महत्व पाहून ॥ तयालागीं भूषणें देऊन ॥ प्रेमें गौरवून प्रजाजन ॥ बोळविले स्वस्थाना ॥ ८९ ॥ याउपरी अंतःपुरीं जाऊन ॥ सर्व स्त्रियांचें केलें समाधान ॥ मैनावतीचे करीं ओपून ॥ समाधानीं मिरविलें ॥ १९० ॥ मुक्तचंद ओपून तियेचे करीं ॥ म्हणे हा गोपीचंदचि मानीं ॥ हा [1]शिलार्थ तयाचे परी ॥ मनोरथ पुरवील तुमचे ॥ ९१ ॥ ऐसें करोनि समाधान ॥ राज्यासनीं पुन्हां येऊन ॥ मुक्तचंदाचे हस्तेंकरून ॥ याचकां धन वांटिलें ॥ ९२ ॥ जालिंदर कानिफा [2]कटकासहित ॥ षण्मास राहिले पट्टणांत ॥ अर्थाअर्थीं सकळ अर्थ ॥ निजदृष्टीं पाहती ॥ ९३ ॥ श्रीजालिंदराचा प्रताप सघन ॥ कोण करूं पाहती विघ्न ॥ येरीकडे गोपीचंदरत्न ॥ भगिनीग्रामा चालिला ॥ ९४ ॥ तेथें कथा होईल अपूर्व ॥ ते पुढिले अध्यायीं ऐका सर्व ॥ अवधानपात्रीं घन भाव ॥ कथा स्वीकारा श्रोते हो ॥ ९५ ॥ नरहरिवंशीं धुंडीसुत ॥ माल्ल संतांचा शरणागत ॥ तयाचे [3]रसनेस धरून हेत ॥ अवधानपात्रीं मिरवावें ॥ ९६ ॥ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागार ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ सप्तदशाध्याय गोड हा ॥ १९७ ॥ अध्याय ॥ १७ ॥
॥ ओंव्या ॥ १९७ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ शुभं भवतु ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

१ शिलालेख. २ सैन्यासह, शिष्यांसह. ३ जिव्हेस.

## ॥ नवनाथभक्तिसार सप्तदशाध्याय समाप्त ॥

अध्याय १८ वा












श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी करुणाकरा ॥ पंढरीअधीशा रुक्मिणीवरा ॥ भक्तपालका चकोरचंद्रा ॥ प्रेमपीयूषधारका[1] ॥ १ ॥ हे दीनबंधो दीननाथा ॥ पुढें चालवीं भक्तिसारकथा ॥ मागील अध्यायीं वैराग्यता ॥ गोपीचंदा लाधली ॥ २ ॥ असो पुढें आतां श्रोतीं ॥ अवधान द्यावें ग्रंथार्थीं ॥ गोपीचंद सोडून ग्रामाप्रती ॥ वैराग्य आचरू चालिला ॥ ३ ॥ मार्गीं ग्रामोग्रामीं जात ॥ आहारापुरती भिक्षा मागत ॥ पुढें मार्गीं गमन करीत ॥ वाचे जप करीतसे ॥ ४ ॥ परी गौडबंगाल देश उत्तम ॥ समाचार कळला ग्रामोग्राम ॥ कीं गोपीचंद राजा नरोत्तम ॥ योगींद्रनीति आचरला ॥ ५ ॥ गांवोगांवींचे सकळ जनीं ॥ ऐकतां विव्हळ होती मनीं ॥ नेत्रीं अश्रुपात गाळूनी ॥ अहा अहा म्हणताती[2] ॥ ६ ॥ एकएकांसी बोलती वचन ॥ राव नव्हे होती माय पूर्ण ॥ कन्येसमान केलें पालन ॥ सकळ प्रजेचें रायानें ॥ ७ ॥ आतां ऐसा राजा मागुती ॥ होणार नाहीं पुढतपुढती ॥ ऐसें म्हणोन आरंबळती ॥ लोक गांवींचे सकळिक ॥ ८ ॥ असो तो ज्या गांवीं जात ॥ त्या गांवींचे लोक पुढें येत ॥ म्हणती महाराजांनीं रहावें येथ ॥ योग पूर्ण आचरावा ॥ ९ ॥ नाना पदार्थ पुढें आणिती ॥ परी तो न घे कदा नृपती ॥ भिक्षा मागून आहारापुरती ॥ पुढें मार्गीं जातसे ॥ १० ॥ शेटसावकार मोठेमोठे ॥ बोळवीत येती तया वाटे ॥ पुनः परता वेगवटें[3] ॥ बोलताती रायासी ॥ ११ ॥ हे महाराजा तुम्हांवीण ॥ प्रजा दिसत आहे दीन ॥ जैसें शरीर प्राणावीण ॥ निचेष्टित पडतसे ॥ १२ ॥ तैसी गति प्रजेस झाली ॥ जरी तुम्ही जातां आमुची माउली ॥ तरी योग साधून पुनः पाउलीं ॥ दर्शन द्यावें आम्हांतें ॥ १३ ॥ अवश्य म्हणून नृपनाथ ॥ बोळवीतसे समस्त ॥ ऐसें रायास गांवोगांवीं होत ॥ अति गुंती चालावया ॥ १४ ॥ असो ऐसे बहुत दिनीं ॥ स्वराज्याची सीमा उलंघूनी ॥ गौडबंगाल देश टाकूनी ॥ कौलबंगालीं संचरला ॥ १५ ॥ त्याही कौलबंगालांत ॥ गांवोगांवीं हा वृत्तांत ॥ प्रविष्ट झाला लोकां समस्त ॥ चकचकिताती अंतरीं ॥ १६ ॥ म्हणती गोपीचंद रायासमान ॥ होणार नाहीं राजनंदन ॥ अहा गोपीचंद प्रज्ञावान ॥ धर्मदाता सर्वदा ॥ १७ ॥ असो कौलबंगालींचा नृपती ॥ पौलपट्टण ग्रामीं वस्ती ॥ तेथें भगिनी चंपावती ॥ गोपीचंदाची नांदतसे ॥ १८ ॥ तिलकचंद श्वशुर नामीं ॥ महाप्रतापी युद्धधर्मीं ॥ जैसा गोपीचंद संपत्तीं उत्तमीं ॥ तैशाच नीतीं तो असे ॥ १९ ॥ गज वाजी[4] अपरिमित ॥ शिबिका नाना दिव्य रथ ॥ धनभांडारें अपरिमित ॥ राजसदनें भरलीं तीं ॥ २० ॥ किल्ले कोट दुर्ग विशाळ ॥ कौलबंगाल देश सबळ ॥ तया देशींचा तो नृपाळ ॥ तिलकचंद मिरवला ॥ २१ ॥ एक लक्ष सहस्रशत लक्ष ॥ सबळ पृतनेचा[5] असे दक्ष ॥ परी ती पृतना नव्हे प्रत्यक्ष ॥ काळ शत्रूचा मिरवतसे ॥ २२ ॥ तया गृहीं ती चंपावती ॥ सासुरवासिनी परम युवती ॥ नणंदा जावा भावांप्रती ॥ देवांपरी मानीतसे ॥ २३ ॥ परमप्रतापी गर्जत काळ ॥ सासुसासरे असती सबळ ॥ तेथेंही वृत्तांत समस्तां सकळ ॥ गोपीचंदाचा

१ प्रेमामृत धारण करणाऱ्या. २ शोक करितात. ३ वाणीनें. ४ घोडे. ५ सैन्याचा.

समजला ॥ २४ ॥ समजला परी करिती टीका ॥ म्हणती अहा रे नपुंसका ॥ ऐसें राज्य सोडूनि लेंका ॥ भीक मागणें वरियेलें ॥ २५ ॥ अहा मृत्यू आला जरी ॥ तरी भिक्षाझोळी न [1]वंचावी करीं ॥ क्षत्रियधर्मदाय शरीरीं ॥ भीक मागणें नसेचि ॥ २६ ॥ अहा जन्मांत येऊन काय केलें ॥ क्षात्रकुळा दूषण लाविलें ॥ आमुचे मुखास काळें लाविलें ॥ पिशुन केलें जन्मांत ॥ २७ ॥ म्हणतील सोयरा तुमचा कैसा ॥ नपुंसक झाला वेडापिसा ॥ वैभव टाकून देशोदेशा ॥ भीक मागे घरोघरीं ॥ २८ ॥ तो जन्मतांच कां नाहीं मेला ॥ क्षत्रियकुळातें डाग लाविला ॥ आतां स्वमुखा दावणें कशाला ॥ [2]श्लाघ्य दिसेना आमुतें ॥ २९ ॥ ऐसें आतां बहुतां रीतीं ॥ लोक निंदितील आम्हांप्रती ॥ अहा कैसी ती मैनावती ॥ सुत दवडिला तिनें हा ॥ ३० ॥ अहा पुत्रा देऊन देशवटा ॥ आपण बैसली राजपटा ॥ जालिंदर हातीं धरूनि गोमटा ॥ भ्रष्ट केलें राज्यासी ॥ ३१ ॥ अहा सांडून रत्नवाटी ॥ हातीं घेतली कैसी नरोटी ॥ कनक टाकून चिंधुटी ॥ भाळीं बांधी प्रीतीनें ॥ ३२ ॥ अहा जालिंदर कोणता [3]निका ॥ भिकार वाईट मिरवे लोकां ॥ हातीं धरिला समूळ रोडका ॥ डोईबोडका शिखानष्ट ॥ ३३ ॥ ऐसियाच्या लागून ध्यानीं ॥ घरास लाविला आपुल्या अग्नी ॥ आतां काळें तोंड करूनी ॥ जगामाजी मिरवतसे ॥ ३४ ॥ अहा माय नव्हे ती लांव म्हणावी ॥ स्वसुत जिनें केला गोसावी ॥ लट्ठाश्रमाच्या लागून पायीं ॥ विघ्न आणिलें राज्यांत ॥ ३५ ॥ आतां कोण तिचा बाप ॥ उभा राहिला बलाढ्य भूप ॥ राज्य हरून खटाटोप ॥ देशोधडी लावील कीं ॥ ३६ ॥ ऐसी वल्गना बहुत रीतीं ॥ एकमेक स्वमुखें करिती ॥ तें ऐकून चंपावती ॥ क्षीण चित्तीं होतसे ॥ ३७ ॥ मनच्या मनीं आठवून गुण ॥ बंधूसाठीं करी रुदन ॥ नणंदा जावा विशाळ बाण ॥ हृदयालागीं खोंचिती ॥ ३८ ॥ म्हणती भावानें उजेड केला ॥ कीर्तिध्वज उभारिला ॥ राज्य सांडून हात भिकेला ॥ ओढवितो लोकांसीं ॥ ३९ ॥ मायबंधूंनीं दिवटा लाविला ॥ तिहीं लोकीं उजेड केला ॥ आतां उजेड इचा उरला ॥ हेही करील तैसेंचि ॥ ४० ॥ अहा माय ती हो रांड ॥ जगीं ओढविलें भांड ॥ आतां जगीं काळें तोंड ॥ करूनियां मिरवते ॥ ४१ ॥ ऐसे दुःखाचे देती घाव ॥ हृदयीं खोंचून करिती ठाव ॥ बोलणें होतसे शास्त्रगौरव ॥ दुःख विषमारापरी ॥ ४२ ॥ येरीकडे गोपीचंद ॥ पाहतां पाहतां [4]ग्रामवृंद ॥ पौलपट्टणीं येऊनि शुद्ध ॥ [5]पाणवथीं बैसला ॥ ४३ ॥ हस्तें काढूनि शिंगीनाद ॥ वाचे सांगत हरिगोविंद ॥ परी स्वरूपामाजी प्रतापवृंद ॥ झांकला तो जाईना ॥ ४४ ॥ कीं अर्कावरी अभ्र आलें ॥ परी तेज तयाचें नाहीं बुडालें ॥ कीं [6]मृगमदातें गुंडाळिलें ॥ सुवास वेष्टिल्या राहीना ॥ ४५ ॥ तेवीं तो नृपनाथ ॥ पाणवथ्यातें विराजत ॥ तों परिचारिका अकस्मात ॥ चंपावतीच्या पातल्या ॥ ४६ ॥ त्यांनीं येतांच देखिला नयनीं ॥ देखतांच राव ओळखिला चिन्हीं ॥ मग त्या तैशाच परतोनी ॥ राजसदना पैं गेल्या ॥ ४७ ॥

१ घ्यावी. २ स्तुत्य. ३ चांगला. ४ अनेक गांव. ५ तळ्याजवळ. ६ कस्तूरीला.

सहराया सकळांसी ॥ वृत्तांत सांगती त्या युवतींसी ॥ कीं गोपीचंद पाणवथ्यासी ॥ येवोनियां बैसला ॥ ४८ ॥ ऐसा वृत्तांत रायें ऐकून ॥ मग चित्तीं झाला क्षीण ॥ म्हणे मुखास काळें लावून ॥ आमुचे गांवीं कां आला ॥ ४९ ॥ आला परी लोकांत ॥ करील आमुची अपकीर्त ॥ संचरोनि पट्टणांत ॥ भीक मागेल गृहोगृहीं ॥ ५० ॥ लोक म्हणतील अमक्याचा अमुक ॥ घरोघरीं मागतो भीक ॥ काळें करून आमुचें मुख ॥ जाईल मग पुढारां ॥ ५१ ॥ अहा राया ऐसें करणें होतें ॥ तरी कासया आलास येथें ॥ स्वदेशीं चोरोनियां गुप्त ॥ भीक मागावी सुखानें ॥ ५२ ॥ सकळ राजसदनींचीं माणसें ॥ वेडाळपणीं बोलती त्यास ॥ तिलकचंद येऊनि त्या समयास ॥ गृहमनुष्यां सांगतसे ॥ ५३ ॥ म्हणे आतां गोपीचंद ॥ भीक मागेल गांवांत प्रसिद्ध ॥ परी जगांत आपुलें नांव शुद्ध ॥ अपकीर्ति मिरवेल ॥ ५४ ॥ तरी आतां पाचारून ॥ अश्वशाळेंत ठेवा आणून ॥ तेथें तयातें घालूनि भोजन ॥ बोळवावें येथून ॥ ५५ ॥ ऐसें सांगून नृपें सर्वांला ॥ राव सभास्थानीं गेला ॥ येरीकडे परिचारिकांला ॥ पाठविलें बोलावूं ॥ ५६ ॥ परिचारिका जाऊन तेथें ॥ म्हणती महाराजा नृपनाथें ॥ बोलाविलें आहे तुम्हांतें ॥ चंपावतीचे भेटीसी ॥ ५७ ॥ राव म्हणे आम्ही गोसावी ॥ आम्हां कैंची भगिनी ताई माई ॥ घरघर बाप घरघर आई ॥ भरली असे विश्वातें[1] ॥ ५८ ॥ परी आतां असो चंपावती ॥ बोलावीतसे आम्हांप्रती ॥ तरी भेटोनि तिये युवती ॥ पुढें मार्ग क्रमावा ॥ ५९ ॥ ऐसें म्हणोनि परिचारिकांसहित[2] ॥ चालता झाला नृपनाथ ॥ परिचारिका पश्चिम[3] द्वारांत ॥ त्यासी घेवोनि जाताती ॥ ६० ॥ अश्वशाळेमाजी नेवोन ॥ बैसविला राजनंदन ॥ परिचारिका म्हणती येथें धाडून ॥ देऊं चंपावतीतें ॥ ६१ ॥ तुम्ही बैसलां तैसेंच बैसावें ॥ भेटीस येतील येथें सर्व ॥ ऐसा परिचारिका दावून भाव ॥ सदनामाजी संचरल्या ॥ ६२ ॥ सकळांसी सांगितला वृत्तांत ॥ कीं राव बैसविला अश्वशाळेंत ॥ मग राजकांतेनें[4] त्वरित ॥ अन्नपात्र भरियेलें ॥ ६३ ॥ तरुणपणाजोगें पात्र भरोन ॥ परिचारिकेकरीं शीघ्र ओपून ॥ धाडिती झाली निर्तंबिन ॥ अश्वशाळेंत तत्त्वतां ॥ ६४ ॥ तंव ती परिचारिका घेवोन अन्न ॥ अश्वशाळे आली लगबग करोन ॥ म्हणे महाराजा भोजना अन्न ॥ पाठविलें तुम्हांसी ॥ ६५ ॥ तें पात्र पुढें ठेवोन ॥ मग परिचारिका म्हणे करा भोजन ॥ भोजन झालिया भेटीकारण ॥ चंपावती येईल कीं ॥ ६६ ॥ राव विचार करी मानसीं ॥ अहा[5] आदर आहे संपत्तीसी ॥ व्याही विहिणी खायासी ॥ संपत्तीसी मिळताती ॥ ६७ ॥ तरी आतां असो कैसें ॥ आपण घेतला आहे संन्यास ॥ शत्रुमित्र सुखदुःखास ॥ समानापरी लेखावे ॥ ६८ ॥ तरी मानापमान उभें राहटीं[6] ॥ हे प्रपंचाची मिरवे कोटी ॥ तरी ऐसियासी आधीं कष्टी ॥ आपण कशास व्हावें हो ॥ ६९ ॥ मान अपमान दोन्ही समान ॥ पाळिताती योगीजन ॥ ऐसेपरी लक्षून मन ॥ भोजनातें बैसला ॥ ७० ॥ मनांत म्हणे चैतन्यब्रह्म ॥ तयाचें

१ सर्व विश्वामध्यें. २ दासींसह. ३ मागील दारानें. ४ राजपत्नी. ५ हाय हाय. ६ व्यवहारचालींत.

जीवन हें अन्नब्रह्म ॥ स्वरूपब्रह्मींचें जीवनब्रह्म ॥ नामब्रह्म मिरवीतसे ॥ ७१ ॥ तरी अन्नब्रह्म धिक्कारून ॥ मग कैंचें पाहावें सुखसंपन्न ॥ ऐसा विचार करून ॥ भोजनातें बैसला ॥ ७२ ॥ येरीकडे अंतःपुरांत ॥ स्त्रिया निघोनि गवाक्षद्वारांत ॥ निजदृष्टीनें पाहती नृपनाथ ॥ नेत्रीं दीक्षा पाहती ॥ ७३ ॥ मग एकेकी बोलती वचन ॥ अहा हें काय निर्लज्जपण ॥ सोयरियाघरीं अश्वशाळेंत बैसोन ॥ भोजन करितो करंटा ॥ ७४ ॥ एक म्हणती चंपावतीसी ॥ वेगें आणावी या ठायासी ॥ ऐकोनि नणंदेनें त्वरेसीं ॥ धांव घेतली तिजपासीं ॥ ७५ ॥ हस्तीं धरूनि चंपावतीसी ॥ वेगें मेळीं आणिलें निगुतीसी ॥ मग हस्त उचलोनि तियेसी ॥ रायातें दाविता जाहल्या ॥ ७६ ॥ तीस घेवोनि शेजारासी ॥ पाहती गवाक्षद्वारासी ॥ परी बोल बोलती कुँअक्षरासी ॥ कुश्चळवाणी करोनियां ॥ ७७ ॥ म्हणती सर्वस्वीं भ्रष्ट झाला ॥ मान अपमान कैंचा त्याला ॥ तस्करासम येवोनि बैसला ॥ अश्वशाळेमाझारी ॥ ७८ ॥ अहा जळो जळो याचें जिणें ॥ केवढें वैभव सोडून ॥ आतां हिंडतो दैन्यवाणा ॥ श्वानासमान घरोघरीं ॥ ७९ ॥ म्हणवीत होता मैंजानाथ ॥ काय मिळालें अधिक यांत ॥ भणंगासमान दिसे आम्हांत ॥ जैसा तस्कर धरियेला ॥ ८० ॥ परी जैसें तैसें असो कैसें ॥ कासया आला सोयरेगृहास ॥ येवोन बैसला अश्वशाळेंत ॥ भोजन करितो निर्लज्ज ॥ ८१ ॥ ऐसें नानापरी युवती ॥ कीटकशब्दें वाखाणिती ॥ तें ऐकोनि चंपावती ॥ परम दुःखी झालीसे ॥ ८२ ॥ प्रथमचि चंपावती गोरटी ॥ बंधूतें पाहतां निजदृष्टीं ॥ परम झाली होती कष्टी ॥ दुःख तयाचें पाहोनी ॥ ८३ ॥ त्यावरी नणंदा जावा पिशुन ॥ दुःखलेशीं बोलती वचन ॥ परी शब्द नसती ते बाण ॥ हृदयामाजी खडतरती ॥ ८४ ॥ तेणेंकरून विव्हळ झाली ॥ पश्चात्तापें परम तापली ॥ मग स्त्रीमंडळ सोडून वहिली ॥ सदना आली आपुल्या ॥ ८५ ॥ येतां झाली जीविता उदार ॥ वेगें शस्त्र घेतलें खंजीर ॥ करीं कवळुनी क्षणें उदर ॥ फोडिती झाली बळानें ॥ ८६ ॥ खंजीर होतां उदरव्यक्त ॥ जठर फोडोनि बाहेर येत ॥ क्षणेंचि झाली प्राणरहित ॥ सदनीं रक्त मिरवलें ॥ ८७ ॥ येरीकडे अश्वशाळेंत ॥ परिचारिकेस म्हणे नृपनाथ ॥ भेटवीं मातें चंपावतीस ॥ चल जाऊं दे आम्हांसी ॥ ८८ ॥ येरी म्हणती त्या शुभाननी ॥ चंपावती सासुरवासिनी ॥ त्यावरी अश्वशाळेलागुनी ॥ कैसी येथें येईल ॥ ८९ ॥ परी आतां असो कैसें ॥ तुम्ही वस्तीस असा या रात्रीस ॥ आम्ही सांगूनि चंपावतीस ॥ गुप्तवेषें आणूं कीं ॥ ९० ॥ ऐसें ऐकोन रायें वचन ॥ म्हणे राहीन आजिचा दिन ॥ तरी आतांच जाऊन ॥ श्रुत करावें तियेसी ॥ ९१ ॥ अवश्य म्हणूनि शुभाननी ॥ आतांच सांगूं तियेलागुनी ॥ रात्रीमाजी येवूं घेवोनी ॥ भेटीलागीं महाराजा ॥ ९२ ॥ ऐसें बोलोनि त्या युवती ॥ पाहत्या झाल्या चंपावती ॥ तंव खंजीर खोवोनि पोटीं ॥ महीवरी पडलीसे ॥ ९३ ॥ तें पाहोनि शब्दकोल्हाळीं ॥ धांवती झाली स्त्रीमंडळी ॥ प्राणगत पाहतां बाळी ॥ एकचि कोल्हाळ माजविला ॥ ९४ ॥ रुधिराचें तळें सांचलें ॥ जठर अवघें बाहेर



१ आधार. २ खिडकींत. ३ वाईट शब्दांनीं. ४ राजा. ५ क्षुद्र मनाच्या. ६ तत्काळ. ७ आक्रोश करून. ८ रक्ताचें.

पडलें ॥ तें पाहोनि युवती वहिलें ॥ शंखध्वनि करिताती ॥ ९५ ॥ सासु सासरे भावे दीर ॥ पति नणंदा दाटल्या जावा चाकर ॥ म्हणती बंधूकरितां साचार ॥ उदार झाली चंपावती ॥ ९६ ॥ मग बोलूं नये तेंच बोलती ॥ म्हणती अधम मंदमती ॥ कोणीकडून या क्षितीं ॥ दुष्ट नष्ट भ्रष्ट आला ॥ ९७ ॥ आपुल्या सदनीं अग्नि लाविला ॥ शेवटीं लावावया येथें आला ॥ तरी त्यातें बाहेर घाला ॥ मुख पाहों नका हो ॥ ९८ ॥ एक म्हणती तयाकरितां ॥ चंपावतीनें केली कर्तव्यता ॥ तरी तिच्यासमान त्याची अवस्था ॥ करोनि बोळवा तिजसंगें ॥ ९९ ॥ ऐसे नाना तर्ककुतर्क ॥ करोनि मारिती हंबरडा हांक ॥ एकचि कोल्हाळ करिती सकळिक ॥ अहा अहा म्हणोनी ॥ १०० ॥ कोणी हंबरडा हाणिती बळें ॥ कोणी पिटिती वक्षःस्थळें ॥ कोणी महीं आपटिती भाळें[२] ॥ मूर्च्छागत पडताती ॥ १ ॥ कोणी आठवूनि रडती गुण ॥ कोणी रडताती चांगुलपण ॥ कोणी म्हणती दैवहीन ॥ भ्रतार असे इयेचा ॥ २ ॥ कोणी म्हणती अन्नूवान ॥ चंपावती होती उत्तम ॥ निजबंधूचे क्लेश पाहोन ॥ दिधला प्राण लज्जेनें ॥ ३ ॥ एक म्हणे चंपावती ॥ किती वर्णावी गुणसंपत्ती ॥ मृगनयनी जैसा हस्ती ॥ स्त्रियांमाजी मिरवतसे ॥ ४ ॥ एक म्हणती सदा आनंदी असून ॥ पहात होतों हास्यवदन ॥ सदा हर्षित असे गमन ॥ हस्ती जेवीं पृतनेचा[३] ॥ ५ ॥ एक म्हणे चांगुलपणीं ॥ घरांत मिरवे जेवीं तरणी[४] ॥ एक म्हणे वो शुभाननी ॥ किती मृदु कोकिळा ॥ ६ ॥ एक म्हणती सासुरवास ॥ असतां नाहीं झाली उदास ॥ ईश्वरतुल्य मानूनि पुरुषास ॥ शुश्रूषा करी वडिलांची ॥ ७ ॥ ऐसें म्हणोनि आक्रंदती ॥ अवघे एकचि कोल्हाळ करिती ॥ तो नाद अश्वशाळेप्रती ॥ अकस्मात आदळला ॥ ८ ॥ अश्वशाळे गौडनाथ[५] ॥ अश्वरक्षकालागीं पुसत ॥ एवढा कोल्हाळ कां सदनांत ॥ झाला आहे कळेना ॥ ९ ॥ परी तो सर्वां ठायीं बोभाट ॥ झाला आहे गांवांत प्रविष्ट ॥ कीं भावाकरितां अति कष्ट ॥ जीवित्वातें दवडिलें ॥ ११० ॥ तें अश्वरक्षकांसी होतां श्रवण ॥ पुसतां सांगती वर्तमान ॥ म्हणती नाथा जीव राणीनें ॥ बंधूकारणें दीधला ॥ ११ ॥ नृप म्हणे रे कवण राणी ॥ कोण बंधु कवणस्थानीं ॥ येरू म्हणती ऐकिलें कानीं ॥ चंपावती राणी ती ॥ १२ ॥ तियेचा बंधू झाला पिसा ॥ सोडून गेला राज्यमांदुसा ॥ म्हणोनि वरोनि दुःखलेशा ॥ जीवित्व त्यागिलें रांडकीनें ॥ १३ ॥ येरी म्हणे बंधु कोण ॥ ते म्हणती त्रिलोकचंदनंदन ॥ गोपीचंद ऐसें नाम ॥ जगामाजी मिरवतसे ॥ १४ ॥ ऐसें ऐकोन नृपनाथ ॥ नयनीं लोटले अश्रुपात ॥ चित्तीं म्हणे वो बाई घात ॥ मजसाठीं कां केला ॥ १५ ॥ मग चंपावतीचे आठवून गुण ॥ गोपीचंद मोहें करी रुदन ॥ अहा मजसाठीं दिधला प्राण ॥ हें अनुचित झालें हो ॥ १६ ॥ तरी आतां महीवरती ॥ माझी झाली अपकीर्ती ॥ आणीक सोयरे दुःख चित्तीं ॥ मानतील बहुवस ॥ १७ ॥ मी येथें आलों म्हणोन ॥ चंपावतीनें दिधला प्राण ॥ हें दुःखा

---

१ पृथ्वीवर. २ मस्तकें. ३ सैन्यापुढें जाणारा. ४ सूर्याप्रमाणें प्रकाशमय. ५ गोपीचंद.

होईल कारण ॥ विसर पडणार नाहीं कीं ॥ १८ ॥ ऐसा विचार करी चित्तांत ॥ परी नयनीं लोटले अश्रुपात ॥ येरीकडे संस्का-
रासी प्रेत ॥ [1]चितामहीं चालिलें ॥ १९ ॥ गोपीचंदही प्रेत पाहून ॥ करीत चालिला सर्वे रुदन ॥ परी चित्त वेधलें कल्पनेकरून ॥
अपकीर्ति अवघी जाहली ॥ १२० ॥ तरी आतां असो कैसें ॥ उठवावें स्वभगिनीसी ॥ आणि चमत्कार सोयऱ्यांसी ॥ दाखवावा प्रतापें
॥ २१ ॥ आम्हीं जोग घेतला म्हणूनी ॥ तृणासमान मानिलें यांनीं ॥ तरी नाथपंथाची प्रतापकरणी ॥ निजदृष्टीं दावावी ॥ २२ ॥
जैसा पार्वतीचा [2]गोसावी ॥ परी दक्षें हेळितां तो जांवई ॥ जीवित्व हरून प्रताप महीं ॥ गाजविला तयानें ॥ २३ ॥ कीं
अष्टावक्र अष्टबाळ ब्राह्मण ॥ कुरूप म्हणून केलें हेळण ॥ परी त्यानें प्रताप दाखवून ॥ विप्र मुक्त केले पैं ॥ २४ ॥ कीं वामन-
रूप असतां [3]सान ॥ बळीनें मानिलें तृणासमान ॥ परी आपुला प्रताप दाखवून ॥ पातालभुवनीं मिरविला ॥ २५ ॥ कीं
अगस्तीचा देह लहान ॥ अर्णवें मानिला तृण ॥ परी केशव म्हणतां नारायण ॥ आचमनातें उरला नसे ॥ २६ ॥ कीं
उदयतरुपोटीं ॥ लहान एकादशी गोरटी ॥ परी [4]मृदुमान्या न सान दृष्टी ॥ पाहतां मृत्य वरियेला ॥ २७ ॥ तो दशग्रीव राक्षस-
पाळ ॥ तृणतुल्य मानिला [5]अनिळबाळ ॥ परी सकळ लंकेचा झाला काळ ॥ एकदांच जाळिली ॥ २८ ॥ तन्न्यायें आम्हां येथ ॥
झालें मानसन्मानरहित ॥ तरी आतां यांतें नाथपंथ ॥ निजदृष्टीं दाखवावा ॥ २९ ॥ मग सहजस्थितीसवें ॥ स्मशानवटीं
गेला राय ॥ प्रेतानिकट उभा राहे ॥ उभा राहून बोलतसे ॥ १३० ॥ म्हणे ऐका माझें वचन ॥ प्रेत करूं नका भस्म ॥ श्रीगुरु
जालिंदर येथें आणून ॥ चंपावती उठवीन कीं ॥ ३१ ॥ अहा मी येथें समयीं असतां ॥ वायां जातसे भगिनी आतां ॥
मग व्यर्थ आचरूनि नाथपंथा ॥ सार्थक नाहीं मिरवलें ॥ ३२ ॥ कीं पाहा मातुळकुळ ॥ आस्तिकें रक्षिलें तपोबळें ॥ तेवीं
येथें युवती निर्मळ ॥ चंपावती उठवीन मी ॥ ३३ ॥ कीं अहिरणीं गुंततां हिरा ॥ हिरकणी काढी तया सत्वरा ॥ तेवीं येथें
भगिनी सुंदरा ॥ चंपावती उठवीन मी ॥ ३४ ॥ कीं मोहरासवें सुत सगुण ॥ कदापि नव्हे भस्म ॥ तेवीं येथें सुमधुम ॥
चंपावती उठवीन मी ॥ ३५ ॥ ऐसें बोले सकळांकारणें ॥ परी अविश्वासी सकळ जन ॥ म्हणती मेलिया जीवित्व पूर्ण ॥
कदाकाळीं येईना ॥ ३६ ॥ कीं वाळल्या [6]रुखालागीं पाला ॥ आला ऐसा नाहीं ऐकिला ॥ हें तों न घडे कदा बोला ॥ धर्मनिष्ठ हा
बोलतसे ॥ ३७ ॥ गोपीचंद म्हणे बोलतां सत्य ॥ परी मम गुरूचें प्रतापकृत्य ॥ वर्णन करितां सरस्वतीतें ॥ वाचा अपूर्ण
मिरवतसे ॥ ३८ ॥ जेणें कानिफाचे अर्थालागुनी ॥ सकळ देव आणिले अवनीं ॥ आणिले परी पूर्णपणीं ॥ वृक्षालागीं गोंविले
॥ ३९ ॥ सध्यां पहा रे मम प्रतापकरणी ॥ एकादश वर्षें गर्तीं अवनीं ॥ अश्वविष्ठेंत राहिला मुनी ॥ प्रताप वर्णूं केउता ॥ १४० ॥



१ स्मशानांत. २ शंकर. ३ लहान. ४ एकादशी ही वृक्षापासून उद्भवली व तिनें मृदुमान्य नांवाचा दैत्य मारला अशी कथा आहे. ५ मारुति. ६ वृक्षाला.

तरी धैर्य धरून चार दिन ॥ करा प्रेताचें संगोपन ॥ श्रीजालिंदर येथें आणून ॥ उठवीन भगिनीसी ॥ ४१ ॥ परी न ऐकती अविश्वासी ॥ शुभा[1] रचिल्या स्मशानमहीसी ॥ प्रेत ठेवून ते चितेसीं ॥ अग्नि लाऊं म्हणताती ॥ ४२ ॥ तें पाहून गोपीचंद ॥ मग आपण चितेंत बैसून शुद्ध ॥ म्हणे अग्नि लावा प्रसिद्ध ॥ भस्म करा मजलागीं ॥ ४३ ॥ मी भस्म झालिया पोटीं ॥ मग क्रोध न आवरे जालिंदरजेठी ॥ नगर पालथें घालून शेवटीं ॥ तुम्हां भस्म करील कीं ॥ ४४ ॥ ऐसें बोलतां गोपीचंद वचन ॥ क्रोधें दाटला तिलकचंद पूर्ण ॥ म्हणे गुरूचा प्रताप वर्णून ॥ फुगीरपण मिरवतसे ॥ ४५ ॥ तरी आम्हां सांगतोस ऐसें ॥ करून दावीं चमत्कारास ॥ येरी म्हणे उत्तरासरसें ॥ बोलेन तैसें घडेल ॥ ४६ ॥ येरी म्हणे वाम[2] कर ॥ काढून देतों जाईं सत्वर ॥ पाहूं दे गुरूचा चमत्कार ॥ प्रेत रक्षूं आम्ही हें ॥ ४७ ॥ येरी म्हणे फार बरवें ॥ चंपावतीचें प्रेत रक्षावें ॥ मी हस्त दाऊन गुरूतें भाव ॥ उपजवीन प्रेमाचा ॥ ४८ ॥ तिलकचंद पुत्रा सांगोनी ॥ वाम कर तियेचा दे काढूनी ॥ गोपीचंद चितासनींहूनी ॥ उठवूनियां बोळविला ॥ ४९ ॥ नाथ गोपीचंद घेऊनि कर ॥ पुढें चालिला मार्गावर ॥ एक कोस येतां नृपवर ॥ काय केलें इकडे ॥ १५० ॥ चितेमाजी घालून प्रेत ॥ डावलून गेले सकळ आप्त ॥ येरीकडे नृपनाथ ॥ हेळापट्टणीं चालिला ॥ ५१ ॥ मार्गीं येतां पांच कोस ॥ परी हें कळलें जालिंदरास ॥ मनांत म्हणे नव्हे सुरस ॥ गोपीचंद आल्यानें ॥ ५२ ॥ पिशुन[3] करितील विचक्षणा ॥ नानापरींची होईल वल्गना ॥ आणि बाळ पावेल शोकस्थाना ॥ आप्तजनांपुढती ॥ ५३ ॥ ऐसा विचार करून चित्तीं ॥ आपण चालिला कृपामूर्ती ॥ प्रयाणअस्त्र मंत्रविभूती ॥ चर्चूनियां निजभाळीं ॥ ५४ ॥ तरी ते प्रयाणअस्त्रमंत्र ॥ एकचि नैषधराजपुत्र ॥ जाणत होता अस्त्र पवित्र ॥ येरां माहीत नव्हतेंचि ॥ ५५ ॥ तें अस्त्र जालिंदरापासीं ॥ होतें अति उजळपणासीं ॥ प्रयाणभस्म लावितां भाळासी ॥ वातगती चालिला ॥ ५६ ॥ मग लोटतां एक निमिष ॥ धांवोनि आला शतकोश ॥ अकस्मात् गोपीचंदास ॥ निजदृष्टीनें देखिलें ॥ ५७ ॥ म्हणे वत्सा पुन्हां परतोन ॥ किमर्थ केलें आगमन ॥ चरणावरी भाळ ठेवोन ॥ वृत्तांत सर्व निवेदिला ॥ ५८ ॥ मग तो ऐकोनि वृत्तांत ॥ म्हणे तुझा मनोरथ सिद्ध करीन नृपनाथ ॥ नको करूं कांहीं चिंता ॥ पुनः फीर माग़ुता ॥ ५९ ॥ अवश्य म्हणोन दोघे जण ॥ मार्गें करिते झाले गमन ॥ पौलपट्टणामाजी येवोन ॥ राजांगणीं संचरले ॥ १६० ॥ तंव ते आप्तांसहित मेळा ॥ घालून बैसले होते पौळा[4] ॥ विव्हळ चित्तीं नाना बरळा ॥ रुदनशब्दें बोलती ॥ ६१ ॥ तों अकस्मात देखिले द्वयनाथ ॥ महातपी दर्शनयुक्त ॥ देखतांचि तिलकचंद यथार्थ ॥ धांव पुढें घेतसे ॥ ६२ ॥ परमभक्ती करोनियां नमन ॥ त्वरें आणूनि कनकासन[5] ॥ त्यावरी बैसवोन अग्निनंदन[6] ॥ पुढें उभा राहिला ॥ ६३ ॥ परी तो नमनादि आदर ॥ जैसा शठाचा शृंगार ॥ कीं ढिसाळपणीं ओस नगर ॥ तेवीं विनयभाव तो ॥ ६४ ॥ कीं अजाकंठींचे लंबस्तन ॥ कीं गारोडियाचें शूरत्व पूर्ण ॥ कीं वेश्येचें मुखमंडन ॥

१ गोंवऱ्या. २ डावा हात. ३ दुष्ट लोक. ४ जमाव. ५ सुवर्णासन. ६ जालिंदर.

तेवीं आदर नृपाचा ॥ ६५ ॥ कीं घटामाजी जैसा अर्क¹ ॥ कीं हिंवराची सावली शीतळ देख ॥ कीं पिशाचबोलणें न सत्यवाक ॥ तेवीं दावी विनयभावातें ॥ ६६ ॥ कीं वृंदावनाचें गोमटें फळ ॥ कीं अर्कवृक्षीं लोंबलें केळ ॥ कीं मैंदाचे गळां माळ ॥ तेवीं विनयभावातें ॥ ६७ ॥ कीं बकाचें दिसे शुद्ध ध्यान ॥ परी अंतरीं घोकीत वेंचीन मीन² ॥ कीं तस्कराचें मौनसाधन ॥ तेवीं विनयभावातें ॥ ६८ ॥ कीं अर्थसाधक श्रोता पूर्ण ॥ परी घातें वेगें घेणार प्राण ॥ तयाचें रसाळ भाषण ॥ दावी विनयभावातें ॥६९॥ कीं गोरक्षकाचें ऊर्ध्वगायन ॥ तेथें कैंचें पहावें तानमान ॥ तेवीं त्या राजाचा सन्मान ॥ दावी विनयभावातें ॥१७०॥ कीं उदधीचें द्रोणांत जळ ॥ कीं कनकतुल्य पिवळा पितळ ॥ कीं विनयाची गोडी बहुरसाळ ॥ तेवीं विनयभावातें ॥ ७१ ॥ कीं घरनिघेचें सवाष्णपण ॥ कीं भोंद्याचें देवतार्चन ॥ कीं म्हशाचें गण्या नाम ॥ तेवीं विनयभावातें ॥७२॥ तन्न्यायें तो नृपती ॥ तिलकचंद उभा भक्तीं ॥ परी भावना सकळ नाथाप्रती ॥ कळून आली तयाची ॥७३॥ म्हणे राया चंपावती ॥ ज्ञानकळा सगुण युवती ॥ ऐसी जाया³ गृहाप्रती ॥ साजेल मातें दिसेना ॥ ७४ ॥ जैसी शिवसाळुंका सुरगणीं ॥ परी ती स्थापावी खडकीं नेऊनी ॥ तेवीं सत्य या सदनीं ॥ चंपावती साजेना ॥ ७५ ॥ गर्दभा काय चंदनलेप ॥ मर्कटा व्यर्थ गीर्वाण भाष उँमोप⁴ ॥ वायसा जाण कनकपिंजररूप ॥ कदाकाळीं घडेना ॥ ७६ ॥ तन्न्यायें चंपावती ॥ तुझे गृहीं असे युवती ॥ जैसी मैंदगृहा⁶ वसती ॥ मानहीन मिरवतसे ॥ ७७ ॥ परी आतां असो कैसें ॥ काय करावें ब्रह्मतंत्रास ॥ मग पाहून गोपीचंदवक्रास ॥ हस्त देईं म्हणतसे ॥ ७८ ॥ मग हस्त काढून दृष्टी ॥ देता झाला करसंपुटीं ॥ शव जाणून पोटीं ॥ उच्चार न करी रायातें ॥ ७९ ॥ मग कवळून भस्मचिमुटी ॥ मंत्रप्रयोग बोले होटीं ॥ सकळ संजीवनीची राहटी ॥ प्रोक्षीतसे भुजातें ॥ १८० ॥ भस्म भुजेसि होतां सिंचन ॥ हांक मारीत तयेकारण ॥ हाकेसरशी त्वरें उठोन ॥ चरणीं माथा ठेवीतसे ॥ ८१ ॥ अहा जाज्वल्य संजीवनी ॥ क्षणांत उठली राजपत्नी ॥ जैसा शुक्रें कच मुखांतूनी ॥ दोन वेळां उठविला ॥ ८२ ॥ तोच न्याय येथें झाला ॥ सकळांलागीं भाव ठसला ॥ अहा जालिंदरनाथ भला ॥ पूर्ण ब्रह्म म्हणउनी ॥ ८३ ॥ मग लागवेगें सकळ उठूनी ॥ श्रीनाथाच्या लोटले चरणीं ॥ म्हणती अपार केली करणी ॥ शुक्र प्रत्यक्ष कलींचा हा ॥ ८४ ॥ मग समस्त म्हणती फार अपूर्व ॥ कौतुक दावी गोपीचंदराव ॥ धनसंपत्तीतें काय करावें ॥ टाकून जावें सर्वस्वीं ॥ ८५ ॥ मग सर्व जग बोले राया भलें ॥ पश्चात्तापें पूर्ण तापलें ॥ परी तें स्मशानवैराग्य ठेलें ॥ पुन्हां जैसें तैसेंचि ॥ ८६ ॥ कीं कँरी⁷ आव्हानिला अति निर्मळ ॥ परी सर्वेचि गंधमोरीं लोळे ॥ उकिरड्यांत⁸ उतावेळ ॥ विष्ठाभक्षण आवडतसे ॥ ८७ ॥ तन्न्यायें सर्व लोक ॥ बोलती पश्चात्तापें दोंदिक ॥ परी त्यांचा सुटे न भोगितां नरक ॥ प्रारब्धयोग तयांचा ॥ ८८ ॥ असो ऐसी प्रारब्धकरणी ॥ श्रीजालिंदर जाय उठवूनी ॥ मग उठता झाला कनकासनीं ॥ हेळापट्टणीं जावया ॥ ८९ ॥

१ सूर्य. २ मासा. ३ स्त्री. ४ फार. ५ कावळ्याला. ६ दुष्ट मारेकरी. ७ हत्ती. ८ चिखलांत.

मग तो तिलकचंद नृपती ॥ अभिमान दवडून झाला गलती ॥ सलीलपणीं पदावरती ॥ मस्तक ठेवी सप्रेम ॥ १९० ॥ म्हणे महाराजा मी पतित[1] ॥ राजवैभवें झालों उन्मत्त ॥ लघु मानिला गोपीचंदनाथ ॥ तरी क्षमेतें वरीं आतां ॥ ९१ ॥ तुम्ही दयाळू कनवाळू संत ॥ मायेहून[2] मायावंत ॥ तरी बाळाचे अन्याय यथार्थ ॥ उदरामाजी सांठवा ॥ ९२ ॥ ऐसें बोलून नम्रोत्तर ॥ चरणीं मौळी[3] वारंवार ॥ ठेऊनि म्हणे आजची रात्र ॥ वस्ती करा या ठायीं ॥ ९३ ॥ ऐसें ऐकून तयाचें वचन ॥ बोलता झाला अभिनंदन[4] ॥ चंपावतीचे हस्तेंकरून ॥ पाकनिष्पत्ती करीं कां ॥ ९४ ॥ अवश्य म्हणून तिलकचंद ॥ चंपावतीस सांगे सद्गद ॥ तीतें सांगून पाक प्रसिद्ध ॥ करविला नेटका ॥ ९५ ॥ मग चंपावती भ्रतारासहित ॥ बैसविली स्वपंक्तींत ॥ आपुला अनुग्रह देऊनि तीतें ॥ नाथपंथीं मिरविली ॥ ९६ ॥ आपुले मुखींचा उच्छिष्ट ग्रास ॥ संजीवनीप्रयोगप्रसादास ॥ देऊनि केलें अमरपणास ॥ मैनावतीपरी सिंचिली ॥ ९७ ॥ ऐसे रीतीं सारूनि भोजन ॥ विडे घेतले त्रयोदशगुणें ॥ राया तिलकचंदा भाषण ॥ करिता झाला मुनिराजा ॥ ९८ ॥ म्हणे ऐक बा सर्वज्ञराशी ॥ गोपीचंद जातो पूर्ण तपासी ॥ तरी सांभाळीं याचे राज्यपदासी ॥ बाळ अज्ञान असे याचें ॥ ९९ ॥ तुझा प्रताप महीतें संपूर्ण ॥ शत्रु न येती तेणेंकरून ॥ मीही येथें षण्मास राहून ॥ सर्व अर्थ पुरवीन कीं ॥ २०० ॥ परी राया षण्मासांपाठीं ॥ मीही जाईन तीर्थलोटीं ॥ परी मुक्तचंद पडतां संकटीं ॥ धांव घालीं तूं येथें ॥ १ ॥ ऐसें बोलतां अग्निसुत[4] ॥ अवश्य बोले तो नृपनाथ ॥ यावरी राहून एक रात्र ॥ निघते झाले उभयतां ॥ २ ॥ करोनि जालिंदरा नमन ॥ गोपीचंद करिता झाला गमन ॥ जालिंदरही मार्ग धरोन ॥ हेळापट्टणीं चालिला ॥ ३ ॥ तिलकचंद नृपनाथ ॥ बोळवोन आला स्वगृहांत ॥ येरीकडे मैनावतीसुत ॥ मुकाममुक्काम साधीतसे ॥ ४ ॥ ऐसिया रहणीं[5] मार्ग क्रमोनी ॥ राव गेला बद्रिकाश्रमीं ॥ बद्रिकेदार भावें नमोनी ॥ तपालागीं बैसला ॥ ५ ॥ लोहकंटकीं[6] पादांगुष्ठ ॥ ठेवोनि तप करी वरिष्ठ ॥ येरीकडे जालिंदर वाटे ॥ येवोनियां पोहोंचला ॥ ६ ॥ तेथें राहून षण्मास प्रीतीं ॥ मुक्तचंद उपदेशोनि अर्थाअर्थीं ॥ कानिफासह शिष्यकटकाप्रती ॥ घेवोनियां चालिला ॥ ७ ॥ नाना तीर्थें करी भ्रमण ॥ द्वादश वर्षें गेलीं लोटोन ॥ शेवटीं बद्रिकाश्रम पाहोन ॥ गोपीचंद भेटला ॥ ८ ॥ मग तैं तपाचा उचित अर्थ ॥ उद्यापना देव समस्त ॥ पाचारोनि स्वर्गस्थ ॥ गौरविले आदरानें ॥ ९ ॥ महाविष्णु महेश सविता[7] ॥ अश्विनी वरुण अमरनाथा ॥ भेटवोनि समस्त दैवतां ॥ सनाथपणीं मिरवला ॥ २१० ॥ सकळ विद्येचा समारंभभार ॥ अभ्यासविला तो नृपवर ॥ पुन्हां दैवतां आणोनि सत्वर ॥ वरालागीं ओपिलें ॥ ११ ॥ असो येथोन गोपीचंदाख्यान ॥ संपलें पुढें करा श्रवण ॥ श्रीगोरक्ष स्त्रीराज्याकारणें ॥ जाईल गुरू आणावया ॥ १२ ॥ तरी आतां अत्यद्भुत ॥ श्रोत्यां सांगेल धुंडीसुत ॥ मालु ऐसें नाम ज्यातें ॥ नरहरिवंशीं मिरवलें ॥ १३ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ अष्टादशाध्याय गोड हा ॥ २१४ ॥

१ पापी. २ आईहून. ३ मस्तक. ४ जालिंदर. ५ रीतीनें. ६ लोखंडी कांट्यावर. ७ सूर्य.

## अध्याय १९ वा






श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी जगद्गुरुराजा ॥ सर्वज्ञ विजयभोजा ॥ भवाब्धी भवसरिते काजा ॥ साधक नौका असती तूं ॥ १ ॥ हे पूर्णब्रह्मानंदकंदा ॥ पुढें बोलवीं भक्ती अतिमोदा ॥ तुझी लीला अगाधा ॥ भक्तिसारग्रंथातें ॥ २ ॥ मागिले अध्यायीं वदविलें गहन ॥ श्रीगोपीचंदाचें उदार कथन ॥ बद्रिकाश्रमीं तप करून ॥ तीर्थाटणीं निघाला ॥ ३ ॥ याउपरी ऐकिजे श्रोतीं ॥ सिंहावलोकनीं विश्रांती ॥ गोरक्ष कानिफाची युक्ती ॥ स्त्रीराज्यांत जातसे ॥ ४ ॥ मार्गीं चालतां मुक्कामोमुक्काम ॥ सदा श्रीगुरूचें आठवी नाम ॥ ग्रामांत करूनि भिक्षाटण ॥ पुढें मार्ग क्रमीतसे ॥ ५ ॥ ऐसिया स्थितीं गौडबंगाल ॥ सांडून सांडिला बंगालकौल ॥ पुढें जात स्त्रीराज्यांत वहिला ॥ सीमेपर्यंत पातला ॥ ६ ॥ परी विचारी स्वमनांत ॥ श्रीगुरुराज आहेत तेथ ॥ राज्यवैभव बहु सामर्थ्य ॥ संपत्तीचें मिरवतसे ॥ ७ ॥ ऐसे वैभवमानी सुखप्रकरणीं ॥ मातें ओळखील कैसा कोणी ॥ श्रीमंतापुढें हीनदीन ॥ मान्यत्वातें मिरवेना ॥ ८ ॥ जेवीं अर्कापुढें खद्योत ॥ हीन दीन अति दिसत ॥ तेवीं मज कंगालवंतातें ॥ कोण तेथें ओळखील ॥ ९ ॥ मेरूपुढें मशकस्थिती ॥ कोणें वर्णावी कवणअर्थीं ॥ कीं पुढें बैसल्या वाचस्पती ॥ मैंद वल्गना मिरवीना ॥ १० ॥ कीं हिरातेजपडिपाडा ॥ गार ठेऊनि पुढां ॥ परीसपालटा देतां दगडा ॥ योग्यायोग्य साजेना ॥ ११ ॥ सुवर्ण मिरवे राशी सोळा ॥ तेथें दगडाचा पाड केतुला ॥ तेवीं मातें संपत्ती मिरवला ॥ ओळखील कैसा तो ॥ १२ ॥ असो याउपरी दुसरे अर्थीं ॥ मम नाम कळतां मच्छिंद्राप्रती ॥ परम द्वाड लागेल चित्तीं ॥ सुखसंपत्ती भोगितां ॥ १३ ॥ जैसें जेवितां षड्रस अन्न ॥ तें कडुवट सेवी कोण ॥ तेवीं मच्छिंद्र संपत्तीतें टाकून ॥ जाईल कैसा वैरागी ॥ १४ ॥ यापरी आणि तिसरे अर्था ॥ मम नाम श्रीगुरुलागीं कळतां ॥ नेणों कल्पना वरून चित्ता ॥ वर्तेल घाता माझिया ॥ १५ ॥ मग तयाच्या सवें विद्यारळी ॥ करावी आपण बांधून कळी ॥ हें तों गोड येणें काळीं ॥ मजप्रती भासेना ॥ १६ ॥ ज्या स्वामीचे वंदितों चरण ॥ तयासीं विद्येची रळी खेळेन ॥ हें योग्य मातें नव्हे जाण ॥ अपकीर्ति ब्रह्मांडभरी ॥ १७ ॥ ऐसे तर्कवितर्क करितां ॥ श्रीगोरक्ष मार्गीं रमतां ॥ तों वेश्याकटक देखिलें तत्त्वतां ॥ स्त्रीराज्यांत जाती त्या ॥ १८ ॥ तों सकळ वेश्यांची मुख्य कामिनी ॥ गुणभरिता कलिंगानाम्नी ॥ तिचें स्वरूप वर्णितां वाणी ॥ रतिपति आतळेना ॥ १९ ॥ जिचें पाहतां मुखकमळ ॥ शशितेजाहून अति निर्मळ ॥ परम लज्जित चपळा केवळ ॥ होऊन ढगीं रिघताती ॥ २० ॥ जिचा नेत्रकटाक्षबाण ॥ तपस्व्यांचें वेधीत मन ॥ मग विषयें लंपट अपार जाण ॥ कवण अर्थीं वर्णावे ॥ २१ ॥ ऐसियेपरी सुलक्षण दारा ॥ चातुर्यकलिका गुणगंभीरा ॥ जिचें नाम साजोतरा ॥ कीं हिरागारा मिरवती ॥ २२ ॥ जिचें सुस्वर विपुल गायन ॥ ऐकतां खालती गंधर्व करिती मान ॥ अप्सरा परम लज्जित होऊन ॥ सेवा इच्छिती जियेची ॥ २३ ॥ ऐशापरी ती कलिंगदारा ॥ जात स्त्रीदेशांत अवसरा ॥ तें अवचित तीतें गोरक्ष उदारा ॥ देखता झाला निजदृष्टीं ॥ २४ ॥ मग

१ भवसमुद्राला. २ सूर्यापुढें. ३ काजवा. ४ बृहस्पति. ५ बरोबरीनें. ६ नायिका. ७ मदन.

तो जवळी योगद्रुम ॥ जाऊन पुसे तियेचें नाम ॥ येरी म्हणे कलिंगा उत्तम ॥ नाम असे या देहा ॥ २५ ॥ येरू म्हणे कवणार्थीं ॥ जातां कोणत्या ग्रामाप्रती ॥ कलिंगा म्हणे स्त्रीदेशाप्रती ॥ जाणें आहे आमुतें ॥ २६ ॥ राव मैनाकिनी पद्मिणी ॥ सकळ स्त्रियां देशस्वामिनी ॥ तियेतें नृत्यकळा दावूनी ॥ वश्य करणें आहे जी ॥ २७ ॥ ती राजपद्मिणी वश्य होतां ॥ अपार देईल आमुतें [1]वित्ता ॥ यापरी कामना योजून चित्ता ॥ गमन करितों आम्ही कीं ॥ २८ ॥ ऐसा वृत्तांत ऐकून युक्तीं ॥ हृदयीं विचारी योगपती ॥ कीं इचीच शुद्ध धरून संगती ॥ प्रविष्ट व्हावें त्या स्थानीं ॥ २९ ॥ मग सहजस्थितीनें गमना ॥ आव्हानुनी दृष्टीं [2]राजसदना ॥ गुप्तवेषें श्रीगुरुकामना ॥ [3]अवगमून घ्यावी तों ॥ ३० ॥ ऐसा विचार करूनि चित्तीं ॥ बोलता झाला तिये युवती ॥ म्हणे मी येतों तुमच्या संगतीं ॥ न्याल तरी कीं कृपेनें ॥ ३१ ॥ येरी म्हणे नरेंद्रोत्तमा ॥ येऊं पाहसी संगतीं आम्हां ॥ तरी कुशळपणीं काय तुम्हां ॥ भोंवरिली विद्या जे ॥ ३२ ॥ येरू म्हणे करून गायन ॥ तुम्हांसवें चातुर्य मानून ॥ आणि मृदंगवाद्य वाजवीन ॥ कुशळपणें नेटका ॥ ३३ ॥ येरी म्हणे गाणें वाजविणें ॥ येतसे चातुर्यवाणें ॥ तरी प्रथमारंभीं आम्हां दावणें ॥ कैसे रीतीं कुशळत्व ॥ ३४ ॥ येरी म्हणे जी काय उशीर ॥ आतांचि पहावा चमत्कार ॥ हातकंकणा [4]आदर्शव्यवहार ॥ कासया पाहिजे दृष्टीतें ॥ ३५ ॥ कीं स्पर्शतां शुद्ध अमरपण ॥ होय न होय केलिया पान ॥ कीं स्पर्शिल्या परिसोन ॥ न होय भ्रांती मिरवेल काय ॥ ३६ ॥ तरी आतां या ठायीं ॥ मम विद्येची परीक्षा घ्यावी ॥ ऐसें ऐकतांच कलिंगा महीं ॥ सदनाहून उतरली ॥ ३७ ॥ [5]महीतळीं घालून आसन ॥ सारंगी देत आणून ॥ म्हणे नवरसें कुशळत्वपण ॥ कळा दावीं कोणती ॥ ३८ ॥ ऐसी ऐकून तियेची गोष्टी ॥ करीं कवळून भस्मचिमुटी ॥ गंधर्वप्रयोग होटीं ॥ जल्पून भाळीं चर्चीतसे ॥ ३९ ॥ चर्चून दाही दिशा प्रेरीतसे ॥ आणि चतुर्थवाद्यातें स्पर्शीतसे ॥ ऐसें झालिया हुंकार देतसे ॥ गावें वाजवावें म्हणूनियां ॥ ४० ॥ तरी काननीं तरु पाषाण ॥ जल्पती गंधर्वासारखें गायन ॥ तंतवितंत सुस्वरी वादन ॥ वाजवी वाद्य चतुर्थ हो ॥ ४१ ॥ आपुलें आपण वाद्य वाजविती ॥ पाषाण तरु गायन करिती ॥ हें पाहून कलिंगा युवती ॥ आश्चर्य करी मानसीं ॥ ४२ ॥ स्वमुखीं ओपून मध्यमांगुळी ती ॥ विस्मय करी आपुल्या पोटीं ॥ चित्तीं म्हणे हा [6]नरधूर्जटी ॥ ईश्वरतुल्य भासतसे ॥ ४३ ॥ जो पाषाणतरूहातीं गायन ॥ करवीत गंधर्वांसरी आपण ॥ तयालागीं स्वतां गायन ॥ अशक्य काय करावया ॥ ४४ ॥ जो पाषाणीं पिंवळेपण ॥ करूं जाणे [7]लोहाचें सुवर्ण ॥ तयालागीं परिसमणी ॥ करावया अशक्य म्हणावें कीं ॥ ४५ ॥ जेणें [8]बुरटगौतमीकासेखालीं ॥ सर्व पदार्थीं मही उद्धरली ॥ त्यातें कामधेनु निर्माया भली ॥ परम अशक्यता न बोलावी ॥ ४६ ॥ कीं कोणत्याही वृक्षाखालीं ॥ कामना पुरवी सकळी ॥ ते कल्पतरुमेळीं ॥ अनायासें शोभतसे ॥ ४७ ॥ तन्यायें वृक्षपाषाणीं ॥ आणिली ज्यानें गंधर्वमांडणी ॥ तो स्वतःसिद्ध कुशलपणीं ॥ गाणार

१ संपत्ति. २ राजवाडा. ३ समजून. ४ आरसा पाहणें. ५ जमिनीवर. ६ नरश्रेष्ठ. ७ लोखंडाचें. ८ कोल्हीच्या ओंटीमधून.

नाहीं कां बोलावें ॥ ४८ ॥ तरी आतां असो कैसें ॥ आपणचि रहावें याचे संगतीस ॥ ऐसा विचार करून स्वचित्तास ॥ बोलती झाली विऱ्हळा ॥ ४९ ॥ म्हणे महाराजा सद्गुणसरिता ॥ मी दीन किंकर अनाथा ॥ ऐसा काम उदेला चित्ता ॥ तरी सिद्धार्थ आव्हानीं ॥ ५० ॥ अगाध वर्णनाची सविताराशी ॥ दैवें उदेली मम तमगुणासीं ॥ तरी संज्ञा जे बोललासी ॥ तेंच सिद्ध आव्हानीं ॥ ५१ ॥ तरी महाराजा [1]विद्यार्णवा ॥ जगीं मिरविसी कोणत्या भावा ॥ ऐसें पुसतां गोरक्ष जीवा ॥ परम कल्पना योजीतसे ॥ ५२ ॥ चित्तीं म्हणे नामाभिधान ॥ प्रविष्ट न करावें इजकारण ॥ गुप्त ठेविल्यास कार्य साधन ॥ घडून येईल पुढारां ॥ ५३ ॥ ऐसा विचार करूनी ॥ म्हणे ऐकें शुभानननी ॥ [2]पूर्वंडा मम देहालागुनी ॥ जगामाजी मिरवतसे ॥ ५४ ॥ येरी म्हणे पूर्वंडराया ॥ अर्थकामना कोण हृदया ॥ असेल तैसी वदूनियां ॥ सुखालागीं हेलावें ॥ ५५ ॥ येरू म्हणे वो शुभानननी ॥ विषयधनाची बोलसी कडसणी ॥ परी कांहीं कामना नसे मनीं ॥ अज्ञान असे या अर्थीं ॥ ५६ ॥ एकवेळ उदरापुरती ॥ समया देईं कां आहुती ॥ याविरहित अर्थ चित्तीं ॥ इच्छा नसे कांहींच ॥ ५७ ॥ येरू ऐकोन ऐसें वचन ॥ अवश्य करी प्रेमें भाषण ॥ म्हणे महाराजा नरेंद्रा पूर्ण ॥ अर्थ पुरेल हा तुमचा ॥ ५८ ॥ परी एक आहे मम बोलणें ॥ स्त्रीराज्यांत आपण जाणें ॥ तेथें पुरुषाचें आगमन ॥ नाहीं त्या देशांत ॥ ५९ ॥ येरू म्हणे कवण अर्थीं ॥ आगमन नसे तया देशाप्रती ॥ येरी म्हणे [3]मारुतसुती- ॥ भुभुःकारें स्त्रिया होती ॥ ६० ॥ ऊर्ध्वरेता वायुनंदन ॥ रेत पडे भुभुःकारवचनें ॥ गरोदर होती तेणेंकरून ॥ सकळ स्त्रिया त्या देशीं ॥ ६१ ॥ त्याच भुभुःकारेंकरून ॥ पुरुषगर्भांत होय पतन ॥ तेणेंकरून तयांस मरण ॥ होतसे जाण महाराजा ॥ ६२ ॥ तरी तुझें जाणें उदेलें चित्तीं ॥ परी तूतें होईल कैसी गती ॥ या संशयाची भ्रांती ॥ मनीं घोंटाळे माझिया ॥ ६३ ॥ येरू म्हणे ऐक युवती ॥ काय करील आम्हां मारुती ॥ प्रळयकाळींची मूर्च्छा हरती ॥ लोळवीन महीतें ॥ ६४ ॥ अगे [4]तीव्रतपाचा [5]तपोजेठी ॥ जेणें सविता गिळोन ठेविला पोटीं ॥ तेथें दीपाची हळहळ मोठी ॥ मानील काय तो पुरुष ॥ ६५ ॥ सकळ मही जो माथां वाहे ॥ त्यातें पर्वताचें भय काय ॥ [5]अब्धी गिळितां शरण रिघावें ॥ काय वेगें थिल्लरा ॥ ६६ ॥ तरी आतां शुभानननी ॥ हा संशय तूं न आणीं मनीं ॥ ऐसें गोरक्ष तीतें बोलोनी ॥ ते स्थानाहोनि उठला ॥ ६७ ॥ मग ती कलिंगा बैसवून रथीं ॥ आपण झाले पुढें सारथी ॥ दोन्ही वाग्दोरे धरून हातीं ॥ [6]धुरा वेष्टूनियां बैसलासे ॥ ६८ ॥ परी प्रथमारंभीं तो धूर्जटी ॥ करीं कवळूनि भस्मचिमुटी ॥ वज्रास्त्र मंत्रहोटीं ॥ अपारशक्ती जल्पला ॥ ६९ ॥ तया मागें स्पर्शमंत्रा ॥ जल्पोनियां [7]निजवक्त्रा ॥ तेही मिरवे सबळ अस्त्रा ॥ महीलागीं महाराजा ॥ ७० ॥ यावरी तिसरें मोहनास्त्र ॥ विराजलें अति पवित्र ॥ उपरी चवथें नागास्त्र ॥ सीमेवरी तें प्रेरिलें ॥ ७१ ॥ ऐसें चतुर्थास्त्र प्रेरून ॥ चालता झाला गोरक्ष त्वरेनें ॥ सीमा उल्लंघून एक [8]योजन ॥ स्त्रीदेशांत मिसळला ॥ ७२ ॥ चिनापट्टण उत्तम ग्राम ॥

१ विद्यासमुद्रा. २ हें नांव. ३ मारुतीच्या. ४ कडक तपस्वी. ५ समुद्र. ६ गाडी हांकणारा बसण्याची जागा. ७ आपल्या तोंडानें. ८ आठ मैल.

तेथें झालासे मुक्काम ॥ तंव लोटून गेला अवघा दिन ॥ महीं निशा दाटली ॥ ७३ ॥ परी दिनासमान रात्री ॥ चंद्रतेजें मिरवली होती ॥ सकळीं भोजनें सारूनि निगुतीं ॥ पहुडलीं शयनीं आपुलाल्या ॥ ७४ ॥ निशा लोटली एक प्रहर ॥ तों रात्री निवळली महीवर ॥ सकळ लोपून अंधकार ॥ दिशा उजेडें उजळली ॥ ७५ ॥ ते दिनींची म्हणूं नये रात्री ॥ कीं उदया आली माया भगवती ॥ चंद्रपोत घेऊनि हातीं ॥ सहजमतीं क्रीडतसे ॥ ७६ ॥ कीं ते रात्र नव्हे जडितपदक ॥ हेमतगटी अवनी देख ॥ त्यावरी नक्षत्रें अन्य माणिक ॥ मध्यें हिराबिंदु शोभे जैसा ॥ ७७ ॥ कीं ते रात्र नव्हे भद्रकाळी ॥ शृंगारनक्षत्रें मुक्तमाळी ॥ चंद्रबिजवरा लेऊनि भाळीं ॥ महीलागीं क्रीडतसे ॥ ७८ ॥ ऐसियेपरी सुलक्षण राती ॥ उजेड दावी महीवरतीं ॥ तों येरीकडे गमन मारुती ॥ सेतूहूनि करीतसे ॥ ७९ ॥ मार्गीं जातां सहजस्थितीं ॥ येवोनि पोंचला सीमेवरती ॥ तों वज्रास्त्र हृदयाप्रती ॥ येवोनियां आदळलें ॥ ८० ॥ परी वज्रशरीरी मारुती ॥ वज्रप्रहारें पडला क्षितीं ॥ मूर्च्छा दाटोनि हृदयाप्रती ॥ विगतगति पडलासे ॥ ८१ ॥ यावरी स्पर्श करी झगटीं ॥ लिप्त केला महीपाठीं ॥ त्यावरी मोहनास्त्र हृदयपुटीं ॥ जाऊ-नियां संचरलें ॥ ८२ ॥ त्यावरी नागास्त्रनागपती ॥ सहस्रफणी प्रत्यक्षमूर्ती ॥ उदय पावतां पदहस्ती ॥ गुंडाळूनियां बैसला ॥ ८३ ॥ चतुर्था-स्त्राचें पडतां वेष्टन ॥ मग कासावीस होतसे वायुनंदन ॥ अति तळमळे उडायाकारण ॥ परी तेजास्त्र उठों नेदी ॥ ८४ ॥ घडोघडी मूर्च्छा येतां ॥ नेत्र भोवंडी वांती देतां ॥ त्यावर विखार वेष्टितां ॥ तेणें होत कासाविसी ॥ ८५ ॥ मोहनास्त्राचा अति प्रसर ॥ मोहून घेतलें सकळ शरीर ॥ मी कोण कोणत्या कार्यावर ॥ आलों हेंही कळेना ॥ ८६ ॥ ऐसा निचेष्टित महीवरती ॥ पडला असे मारुती ॥ एक प्रहर लोटल्या-वरती ॥ प्राण निघूं पाहतसे ॥ ८७ ॥ नेत्र झाले श्वेतवर्णी ॥ मुखीं लोटलें आरक्त पाणी ॥ तें लोटलें सकळ अवनीं ॥ भिजून लोट लोटतसे ॥ ८८ ॥ ऐसा समय तया होतां ॥ मग विचार करी आपुल्या चित्ता ॥ ऐसिया संकटीं प्राण आतां ॥ वांचत नाहीं सहसाही ॥ ८९ ॥ तरी माझा काळ आला ॥ आतां स्मरावें श्रीरामाला ॥ ऐसा विचार करून स्वचित्ताला ॥ आठविलें श्रीरामातें ॥ ९० ॥ हे दयार्णवा[3] कुळ-भूषणा ॥ सीतापते रघुनंदना ॥ दशग्रीवांतका[4] भक्तदुःखमोचना ॥ धांव पाव वेगेंसीं ॥ ९१ ॥ हे करुणानिधे ताटिकांतका ॥ मुनिमनोरंजना रघुकुळटिळका ॥ अयोध्याधीशा प्रतापार्का ॥ धांव पाव वेगेंसीं ॥ ९२ ॥ हे शिवमानसरंजना ॥ चापधारका तापहरणा ॥ शरयूतीर-विहारा आनंदसदना ॥ धांव पाव वेगेंसीं ॥ ९३ ॥ हे श्रीराम श्यामतनुधारका ॥ एकवचनी व्रतदायका ॥ एकपत्नीबाणनायका ॥ धांव पाव वेगेंसीं ॥ ९४ ॥ हे पंकजनेत्रा कोमलगात्रा ॥ बिभीषणप्रिया कोमलपात्रा ॥ परमप्रिय कपिकुळगोत्रा ॥ धांव पाव वेगेंसीं ॥ ९५ ॥ हे किष्किंधाधिपवालिनिर्दलना ॥ भक्तप्रियकरा भयमोचना ॥ विदेहजामाता जगपाळणा ॥ धांव पाव वेगेंसीं ॥ ९६ ॥ हे विश्वामित्रमख-सिद्धिकारका ॥ खरदूषणादिदैत्यांतका ॥ जलधिजलपाषाणतारका ॥ धांव पाव वेगेंसीं ॥ ९७ ॥ हे अहिमहिदानवहारिता ॥ शतमुख-

१ पृथ्वीवर. २ पांढरे. ३ दयासागरा. ४ रावणाचा नाश करणाऱ्या.

खंडी वैदेहीरता ॥ मंगळधारणा कुशळवंता ॥ धांव पाव वेगेंसीं ॥ ९८ ॥ हे अर्णवविहारा[1] मारीचदमना ॥ जटायुप्रिया मोक्षगहना ॥ शिवचापभंगा मंगळधामा ॥ धांव पाव वेगेंसीं ॥ ९९ ॥ हे दयार्णव राम करुणाकरू ॥ मित्रकुळध्वज कीर्तिधारू ॥ ऐसें असून संकटपारू ॥ सुखशयनीं निजला अससी ॥ १०० ॥ तरी आतां धांव वेगीं ॥ तव दूत या संकटप्रसंगीं ॥ मुक्त होऊं दे महीलागीं ॥ शरणागत तूं म्हणवितोस ॥ १ ॥ ऐसी स्तुति वायुत्तर ॥ करीत अति वायुकुमर ॥ ते वाग्बाण श्रवणद्वार ॥ पाहते झाले रामाचें ॥ २ ॥ जाणून परम संकटमात ॥ धांवोन आला श्रीरघुनाथ ॥ मारुतीचें संकट पाहूनि अत्यंत ॥ परम चित्तीं कळवळला ॥ ३ ॥ कीं एकांत पाडसावांचून हरिणी ॥ हिंडे सैरावैरा रानीं ॥ तन्न्यायें मोक्षदानी ॥ हृदयामाजी कळवळला ॥ ४ ॥ जैसी वत्सालागीं गाय ॥ काननीं हंबरडा फोडी मोहें ॥ त्याप्रमाणें रघुराय ॥ हृदयामाजी कळवळला ॥ ५ ॥ जळावेगळा पडतां मीनें[2] ॥ अति तळमळोनि सोडी प्राण ॥ तन्न्यायें रघुनंदन ॥ हृदयामाजी कळवळला ॥ ६ ॥ किंवा बाळ मातेचें चुकार होतां ॥ आरंबळती तीं उभयतां ॥ तन्न्यायें भक्त निःशक्त होतां ॥ हृदयामाजी कळवळला ॥ ७ ॥ मग मनोवेगातें मागें सारून ॥ प्रत्यक्ष आला लगबगें धांवून ॥ तों विकळ होऊन भक्तजन ॥ अहा अहा म्हणतसे ॥ ८ ॥ मग तापनिवारण चाप करीं ॥ शर संजून बाप कैवारी ॥ पाकशासनास्त्र[3] अवधारीं ॥ वज्रास्त्र निवटावया ॥ ९ ॥ प्रेरितांच वातास्त्र ॥ प्रगट झाला सहस्रनेत्र ॥ वज्रास्त्र कवळून पवित्र ॥ जाता झाला अमरपुरीं ॥ ११० ॥ यावर विभक्तास्त्र जल्पून ॥ स्पर्शास्त्र केलें निवारण ॥ यावर फणी सहस्रनयन[4] ॥ हस्तपदीं गुंडाळला ॥ ११ ॥ तयासाठीं क्षीराब्धिवासी ॥ लक्ष्मीनारायण वेगेंसीं ॥ तैं प्रत्यक्षस्वरूपें उरगेंसीं ॥ पाहता वैनतेय झालासे ॥ १२ ॥ नमून म्हणे अहा अनंता ॥ तूं प्रिय अससी माझे चित्ता ॥ याच नीतीं वायुसुता ॥ संबोखीत आहेसी ॥ १३ ॥ तरी आतां मम सखया ॥ मुक्त करीं अंजनीहृदया ॥ ऐसें ऐकून आराधिया[5] ॥ मोहाब्धि उचंबळला ॥ १४ ॥ मग स्वदेहपुच्छ काढून ॥ मुक्त केले हस्तचरण ॥ काढून घेतलें अस्त्रमोहन ॥ प्रत्यक्ष विष्णू होऊनियां ॥ १५ ॥ असो नागास्त्री उरगपती ॥ प्रेमें नमून अब्धिजापती ॥ जाता झाला स्वस्थानाप्रती ॥ मही धारण करावया ॥ १६ ॥ येरीकडे अंजनीनंदन ॥ सावध होऊनि बैसला जाण ॥ हृदयीं आठवूनि रामगुण ॥ स्वस्थ झाला तेधवां ॥ १७ ॥ दृष्टी करितां चहूंकडे ॥ तों रामस्वामी देखिला पुढें ॥ आनंदोनि मग प्रेमें उडे ॥ चरणकमळ नमावया ॥ १८ ॥ वंदून श्रीरामाचे चरण ॥ म्हणे महाराजा वांचविला प्राण ॥ वेधलें अस्त्र अति दुर्गम ॥ देखिलें नाहीं कधीं हो ॥ १९ ॥ अस्त्र नव्हे हें परम काळ ॥ महाप्रळयींचें उतरलें सबळ ॥ आज माझा अंतकाळ ॥ ओढवला होता महाराजा ॥ १२० ॥ परी तूं माझी माय सघन[6] ॥ लगबगीनें आलीस धांवून ॥ म्हणून वांचला माझा प्राण ॥ प्रळयास्त्रामाझारीं

---

१ क्षीरसमुद्रांत विहार करणाऱ्या. २ मासा. ३ इंद्राचें वज्र. ४ शेष. ५ आराधित अशा श्रीरामाला. ६ मोठी.

॥ २१ ॥ तरी तुझिया उपकारा ॥ उत्तीर्णता न होय मज पामरा ॥ ऐसें वदोन वायुत्तरा ॥ चरणांवरी लोळतसे ॥ २२ ॥ अति कनवाळू सीतापती ॥ सप्रेम हृदयीं धरिला मारुती ॥ म्हणे तुजसाठीं बा या क्षितीं ॥ तीन वेळां आलों मी ॥ २३ ॥ तेव्हां चतुर्थ अस्त्रबंधन ॥ मुक्त झालें तुजकारण ॥ परी असो तव शत्रु कोण ॥ वेगें वद मम वत्सा ॥ २४ ॥ येरू म्हणे महाराजा ॥ अकल्पित लाभ संकट-चोजा ॥ शत्रु येथें कवण माझा ॥ प्राप्त झाला असे कीं ॥ २५ ॥ तरी आतां प्रस्तुतकाळीं ॥ क्षत्रिय नसे कोणी बळी ॥ परी नाथ-पंथी अस्त्रफळी ॥ मिरवीतसे महाराजा ॥ २६ ॥ तरी महाराजा नवांतील[1] एक ॥ आला असेल प्रतापदायक ॥ तयाचा प्रताप जो अर्क[2] ॥ असे अजिंक्य सर्वांसी ॥ २७ ॥ ऐसें ऐकूनि मारुतिवचन ॥ म्हणे राम नाथपंथी भक्त जाण ॥ तयांसी रळी[3] हे वायुनंदन ॥ करूं नये सहसाही ॥ २८ ॥ ते भक्त माझे आवडीचे असती ॥ तयांसी रळी न करीं मारुती ॥ आपण आपुल्या विक्षेपवृत्ती ॥ वाढवूं नये सर्वज्ञा ॥ २९ ॥ ऐसी नीति रघुवीर ॥ अंजनीसुता बोलोनि उत्तर ॥ हृदयांत पाहे जनकजावर ॥ नाथ कोणता नवांतुनी ॥१३०॥ तों सहज दृष्टी अंतरीं करितां ॥ चित्त गुंतलें गोरखसुता ॥ मग मारुतीस म्हणे वो प्रतापवंता ॥ गोरक्षनाथ असे हा ॥३१॥ असो जो हरिनारायण ॥ तयाचा अवतार गोरक्ष जाण ॥ याउपरी बोले मारुति वचन ॥ चला जाऊं दर्शना तयाच्या ॥ ३२ ॥ या सीमेपासून एक योजन ॥ तेणें रचून हें संधान ॥ प्रतापी आहे गौरनंदन ॥ स्त्रीराज्यांत जाते झाले ॥३३॥ तया नाथाची घेतां भेटी ॥ एक अर्थ आहे आमुचे पोटीं ॥ तो साधून घेईन त्यांत शेवटीं ॥ तरी कृपाजेठी चलावें ॥ ३४ ॥ राम म्हणे वो अर्थ कोण ॥ तो मातें करीं निवेदन ॥ मग सकळ कथा अंजनीनंदन[4] ॥ मच्छिंद्राची वदलासे ॥ ३५ ॥ मैनाकिनीचें तपोवचन ॥ मच्छिंद्र पाठविला म्हणून ॥ तरी गोरक्ष आतां जाऊन ॥ येईल घेऊन मच्छिंद्रा ॥३६॥ तरी त्यासी अमृतवाणी[5] ॥ बोलून गोंवावा दृढचरणीं ॥ मग तो गोरक्ष मच्छिंद्रा-लागुनी ॥ नेणार नाहीं कदाही ॥३७॥ ऐसा विचार सुचवी रामातें ॥ मग बोलता झाला सीतानाथ ॥ म्हणे बा तुझा पुरवावया अर्थ ॥ चल गोरक्षा भेटावया ॥३८॥ युक्तीप्रयुक्ती बोलून वचन ॥ परमादरें तोषवून ॥ इतका अर्थ घेऊं मागून ॥ तुजसाठीं कपींद्रा ॥ ३९ ॥ ऐसें वदून रघुनाथ ॥ मग चालते झाले उभयतां ॥ मध्यरात्रीचा समय होतां ॥ चिनापट्टण ग्रामा पोंचले ॥१४०॥ तंव त्या ग्रामीं सुख-शयनीं ॥ पहुडले होते सुखपणीं ॥ स्वस्वरूपीं अंतःकरणीं ॥ हेलावतसे ब्रह्मांड ॥ ४१ ॥ येरीकडे रघुनाथ ॥ आणीक द्वितीय अंजनी-सुत ॥ ग्रामानिकट येतां त्वरित ॥ स्वरूपातें पालटिती ॥ ४२ ॥ शुद्ध करून याचकपण ॥ भावें आले उत्तम ब्राह्मण ॥ नमन करितां गौरनंदन ॥ तया ठायीं पातले ॥४३॥ तंव तो साधक गोरक्षनाथ ॥ बैसला होता निवांत ॥ वाचे अंशघन सद्गुरुनाथ ॥ प्रेमछंदें डुल-तसे ॥४४॥ जैसा जळामाजी मीन ॥ तळपत आहे स्वच्छंदेंकरून ॥ तन्न्यायें गोरक्षनंदन ॥ श्रीगुरुभजनीं डोलतसे ॥४५॥ तों येरीकडे

१ नवनाथांतील. २ सूर्य. ३ तंटा. ४ मारुति. ५ गोड बोलून.

उभयतां ॥ प्रत्यक्ष जाऊन तेथ ॥ आदेश म्हणून वंदिला नाथ ॥ निकट जाऊन बैसले ॥ ४६ ॥ बोलती बैसतांचि वचन ॥ आम्हीं षड्शास्त्री ब्राह्मण ॥ तुम्ही नाथ परिपूर्ण ॥ महीवरी असतां ॥ ४७ ॥ योगियांमाजी [1]शिरोमणी ॥ जितेंद्रिय सदा दमनी ॥ विरक्तांत पूर्णपणीं ॥ मिरविसी महाराजा ॥ ४८ ॥ धैर्यो[2]ब्धीचें बुद्धिजळ ॥ मिरविसी विवेकपात्रीं सबळ ॥ परघात तो वडवानळ ॥ शांतोदरीं सांठविसी ॥४९॥ मित्रशत्रुद्वितीयतटीं ॥ सदैव [3]कृपासरितेचा पूर लोटी ॥ क्षेमालिंगनअर्थी भेटी ॥ वर्तविसी महाराजा ॥ १५० ॥ तरी सच्चिदानंद तेजाकारू ॥ कीं वहनादि चराचरू ॥ एक पाहणें जंगमादरू ॥ दटाविसी महाराजा ॥ ५१ ॥ तूं ऐसा औदार्यदाता ॥ अपूर्व मिरविसी धनवंता ॥ तरी महाराजा आमुच्या अर्था ॥ साधिला तो पुरवीं कां ॥ ५२ ॥ गोरक्ष म्हणे विप्रोत्तमा ॥ कोण कामना वेधली तुम्हां ॥ तरी सरिता-कार्यउगमा ॥ प्रसिद्धपणीं मिरवावें ॥५३॥ येरू म्हणती जी योगशीला ॥ वरदपात्रीं ओपूं बोला ॥ मग आमची सरिता विपुला ॥ आनंद-जळीं दाटेल ॥ ५४ ॥ तरी भाष देऊन आतां ॥ तोषवीं कां आमुचे चित्ता ॥ भाष दिधल्यावरी अर्था ॥ दर्शवूं तूतें महाराजा ॥ ५५ ॥ ऐसी ऐकोन तयांची वाणी ॥ तों गोरक्ष विचार करी मनीं ॥ कीं इतुका गौप्य मेदि[4]नीं ॥ कोण आहे मजपाशीं ॥५६॥ शिंगी सारंगी कुबडी फावडी ॥ मुद्रा शैली कंथा घोंगडी ॥ पात्र भोपळा संपदा एवढी ॥ आम्हांपाशीं विराजे ॥ ५७॥ याविरहित आणीक दुसरा ॥ अर्थ न राहिला आमुच्या आश्रा ॥ परी यानें कल्पिलें काय अंतरा ॥ हें तों कांहीं कळेना ॥ ५८ ॥ यापरी आणीक विचार चित्तीं ॥ कीं अव-सर लोटला मध्यरात्रीं ॥ त्यांतही स्त्रीदेशाप्रती ॥ पुरुष आला हें कैसें ॥ ५९ ॥ तरी हे मानव सहसा नसती ॥ स्वर्गसुखाचे पात्र असती ॥ शुक्र कीं वरुण गभस्ती ॥ [5]वांचस्पति पातला ॥ १६० ॥ कीं मंगळ किंवा [6]विरिंचि सुंदर ॥ कीं गण किंवा गंधर्व साचार ॥ कीं यक्ष रक्ष अश्विनीकुमर ॥ कीं तपोलोकादि पातले ॥ ६१ ॥ नातरी व्हावया आगमन ॥ मानवा नसेही साधन ॥ तरी हे देवचि निश्चयवचन ॥ मानवी कृत्य नसेचि ॥ ६२ ॥ ऐसें भासून दृढ चित्तांत ॥ आणि विचारी हृदयांत ॥ कवण कामना आहे यांतें ॥ शोध करूं याचा ॥६३॥ म्हणून अंतरदृष्टी अंतःकरणीं ॥ करून विचार शोधी मुनी ॥ परी कांहींएक अर्थ तों तरणी ॥ आश्रयातें लागेना ॥ ६४ ॥ मग म्हणे असो कैसें ॥ आपण चालिलों ज्या कार्यास ॥ तितकें भिन्न [7]करून यास ॥ मागेल तेंचि आदरूं ॥ ६५ ॥ ऐसा विचार करूनि मनीं ॥ बोलता झाला प्रसिद्धपणीं ॥ म्हणे महाराजा भूदेवतरणी ॥ तुम्ही सहसा नोहेती ॥ ६६ ॥ काय प्राप्ती द्विजवरा ॥ चालून येईल येथ-वरा ॥ काळकृतांत सीमेवरा ॥ चतुर्थअस्त्र विराजती ॥ ६७ ॥ प्रतापार्क वायुकुमर ॥ ते रश्मीतसे भुभुःकार ॥ यावर प्रेरिला वैश्वानर ॥ चतुर्थास्त्र प्रतापी ॥ ६८ ॥ ऐशिया संकटीं भूदेवराया ॥ कोण रेवाण येईल उपाया ॥ शिव हलातें प्राशिलिया ॥ वांचेल ऐसें वाटेना ॥ ६९ ॥ कीं [8]दहन आकाशीं कवळितां ॥ तेथें पतंग मिरवी आपुली वीर्यता ॥ कीं मशक मेरूतें वाहून तोली वरता ॥ जात थिल्लरीं

१ श्रेष्ठ. २ धैर्यसागराचें. ३ करुणारूप नदीचा. ४ पृथ्वीवर. ५ बृहस्पति. ६ ब्रह्मदेव. ७ उघड सांगून. ८ अग्नि.

बुडवावा ॥ १७० ॥ तेवीं येथें यावया कारण ॥ कदा न पावे मनुष्या गमन ॥ तरी महाराजा प्रज्ञावान ॥ कोण तुम्ही तें सांगा ॥ ७१ ॥
ऐसें बोलून माथा चरणीं ॥ ठेविता झाला सलीलपणीं ॥ मग एकमेकांतें विलोकुनी ॥ हास्यवदन करिताती ॥ ७२ ॥ याउपरी बोले
रघुनंदन ॥ आतां यातें ठेवणें भिन्न ॥ हें योग्य मातें न ये दिसून ॥ स्वपंकजा दावावया ॥ ७३ ॥ ऐसें वदतां रघुपती ॥ मान तुकावी
प्राज्ञमूर्ती ॥ मग प्रगट करून स्वरूपप्राप्ती ॥ नाथ हृदयीं कवळिला ॥ ७४ ॥ म्हणे वत्सा ऐक वचन ॥ कामें वेधला वायुनंदन ॥ कीं
मच्छिंद्रयतीलागून ॥ नेऊं नये स्वदेशीं ॥ ७५ ॥ मैनाकिनी नृपदारा ॥ परम आचरली तपाचारा ॥ वचनीं गोंवून वायुकुमारा ॥ नाथ
मच्छिंद्रातें मागीतलें ॥ ७६ ॥ तरी यशाची उभवूनि कोटी ॥ प्रेरिला आहे मच्छिंद्रजेठी ॥ तरी हा अर्थ मारुतीचे पोटीं ॥ पूर्णपणीं
मिरवला ॥ ७७ ॥ याविरहित मागणें तुजसी ॥ कांहीं नाहीं तपोराशी ॥ तरी तूं जाऊन तया भेटीसी ॥ श्रीनाथासी नेऊं नको ॥ ७८ ॥
ऐसें ऐकून लाघवी वचन ॥ बोलता झाला गौरनंदन ॥ हे महाराजा प्रज्ञावान ॥ सत्य वचन बोलतसां ॥ ७९ ॥ परी पाहा जी प्रज्ञा-
वानराशी ॥ आम्ही म्हणवितों योगाभ्यासी ॥ तरी हें अनुचित कर्म आम्हांसी ॥ प्रपंच विसरूं साजिरा ॥ १८० ॥ तरी इतुकें काम
करूनि भिन्न ॥ मागाल तरी देईन प्राण ॥ परी या देशीं मच्छिंद्र जाण ॥ ठेवणार नाहीं सहसाही ॥ ८१ ॥ भूवरी आकाश अवघें
पडो ॥ मेरुमांदार उलथोनि पडो ॥ कीं अवघी मही रसातळीं बुडो ॥ परी मी न ठेवीं गुरुवर्या ॥ ८२ ॥ यावरी बोले रघुनंदन ॥
इतुकें आमुचें करीं मान्य ॥ गोरक्ष म्हणे पितरांकारण ॥ घडून आल्या घडेना ॥ ८३ ॥ तरी शांतिमांदार रघुनंदन ॥ हस्तकीं धरिला
वायुनंदन ॥ म्हणे बा सकळ प्रताप गुणसंपन्न ॥ करशील [1]कंदन निश्चयें ॥ ८४ ॥ ऐसें बोलतां गौरनंदन ॥ मारुतीस क्रोध आला
दारुण ॥ रामास म्हणे करीन कंदन ॥ शब्दभ्रष्ट आतांचि ॥ ८५ ॥ परी इतुका अनर्थ कासयासाठीं ॥ लघुकार्यातें आटाआटी ॥ तुज
या वचनाची वागवटी ॥ फिटून गेली महाराजा ॥ ८६ ॥ आतां प्रारब्धयोग कैसा ॥ घडून येई तयाच्या लेशा ॥ परी त्या आपुल्या
भाषा ॥ सत्य करून शेवटविलें ॥ ८७ ॥ ऐशा युक्तीप्रयुक्तीकरून ॥ शांत केला [2]वायुनंदन ॥ मग गोरक्षा हृदयीं धरून ॥ रघुनंदन
चालिला ॥ ८८ ॥ गोरक्षें चरणीं घालून मिठी ॥ म्हणे महाराजा अस्त्रें चावटी ॥ तूतें केली असे पोटीं ॥ क्षेमाब्धींत सांठविला ॥ ८९ ॥
ऐसें विनवून वाणी रसाळ ॥ बोळविला प्रतापशीळ ॥ असो दशरथबाळ ॥ स्वस्थानासी पातला ॥ १९० ॥ याउपरी पुढिले अध्यायीं
कथन ॥ शृंगमुगुट पाहील वायुनंदन ॥ मैनाकिनी राज्यभाषण ॥ गुप्तसूचना करील तो ॥ ९१ ॥ ती कथा परम सुधारस सुंदर ॥
श्रोत्यांस सांगेल धुंडीकुमर ॥ नरहरिवंशीं संतकिंकर ॥ मालूवरी विराजला ॥ ९२ ॥ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्ष-
काव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ एकोनविंशाध्याय गोड हा ॥ १९३ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

१ नाश. २ मारुति.

## अध्याय २० वा












श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी पंढरीराया ॥ भोक्तया षड्गुणऐश्वर्या ॥ ऐसी सोसून अपार माया ॥ सकळ कळा तुझेनि ॥ १ ॥ घटपटतंतु आकाशन्याय ॥ सर्व तंवच ब्रह्म होय ॥ ऐसें असूनि निराळा राहे ॥ अव्यक्त व्यक्ती पावुनी ॥ २ ॥ कीं अपार घटीं अपार तरणी ॥ व्यापून ऐक्य दिसे गगनीं ॥ त्याचि न्यायें मोक्षदानी ॥ व्याप्त असे सर्वांतें ॥ ३ ॥ तरी पूर्णब्रह्म नाथवेष ॥ करुणानिधि पंढरीचा अधीश ॥ माय कनवाळु जगन्निवास ॥ भक्तवत्सल नटलासे ॥ ४ ॥ तरी हे दीनबंधो भक्तव्यापका ॥ पुंडलीकवरदायका ॥ आतां पुढें रसना दोंदिका ॥ भक्तिसार वदवीं कां ॥ ५ ॥ मागिले अध्यायीं रामदर्शन ॥ आणि द्वितीयीं अंजनीनंदन ॥ गोरक्षालागीं भेटून ॥ अदृश्यपणीं मिरवले ॥ ६ ॥ असो स्वस्थाना गेला अयोध्यानाथ ॥ येरीकडे अंजनीसुत ॥ शृंगमुरुडा जाऊनि त्वरित ॥ सानवेषें नटलासे ॥ ७ ॥ गुप्तवेषें राजसदन ॥ पाहता झाला अंजनीनंदन ॥ एकांतसदनीं मैनाकिण पद्मिण ॥ मंचकावरी पहुडली ॥ ८ ॥ सुखनिद्रा शयनीं असून ॥ परिचारिका गेल्या उठोन ॥ ऐसी एकांतसंधी पाहून ॥ धवळारीं तैं संचरला ॥ ९ ॥ चपळपणीं तो मंचकाजवळी ॥ जाऊन बैसला प्रतापबळी ॥ कीलोतळा पद्मिणी कमळी ॥ करपात्रीं धरियेली ॥ १० ॥ व्यक्त होतां करकमळ ॥ सावध झाली कीलोतळा वेल्हाळ ॥ तों दृष्टीं देखिला अंजनीबाळ ॥ चरणावरी लोटली ॥ ११ ॥ कीलोतळा आणि मैनाकिनी ॥ तृतीय नाम जिये पद्मिणी ॥ यापरी श्रोते बोलती कल्पनीं ॥ कवणे अर्थी हीं नामें ॥ १२ ॥ तृतीय अभिधाना ती दुहिता ॥ झाली असे कवणा अर्था ॥ मग त्या कल्पनीं वाक्सरिता ॥ व्यक्ती घेणें मिरवली ॥ १३ ॥ ऐसा पाहून श्रोतिया आदर ॥ बोलता झाला कवि सादर ॥ तृतीय भिन्न भिन्न प्रकार ॥ कैशा रीतीं ऐका त्या ॥ १४ ॥ तरी पर्वतांमाजी मंदरगिरी ॥ जंबुद्वीप त्याची प्रथम पायरी ॥ यापरी सिंहलद्वीपाची दुसरी ॥ मेरुमंदार आहे कीं ॥ १५ ॥ यापरी सिंहलद्वीपभुवनीं ॥ स्त्रिया जितुक्या असती पद्मिणी ॥ त्यांतही मुख्य मैनाकिनी ॥ स्वरूपवंती मिरवतसे ॥ १६ ॥ तों एके दिवशीं अभ्यंग करूनी ॥ उभी राहिली धवळारीं जाउनी ॥ ते सहज दृष्टीं दिशागमनीं ॥ आकाशातें पाहातसे ॥ १७ ॥ हस्तीं झगटती कबरीभार ॥ तों वर दृष्टीं जाऊन गोचर ॥ उपरिचरवसु विमानावर ॥ आरूढ होऊन जातसे ॥ १८ ॥ विमानारूढ झाला होता ॥ तों वसन एकांगें झालें तत्त्वतां ॥ आवेशें बाहेर लिंग दर्शतां ॥ असावध बैसलासे ॥ १९ ॥ विमानावर गवाक्षद्वार ॥ त्यांतून दिसे अवयव समग्र ॥ तों मैनाकिनी पाहून नेत्रें ॥ हांसे खदखदां ते काळीं ॥ २० ॥ तें ऐकून वसुनाथ ॥ विक्षेपोनि बोलता झाला तीतें ॥ म्हणे पापिणी परपुरुषांतें ॥ पाहूनियां हांसलीस ॥ २१ ॥ तरी ऐसी जारिणी वरती ॥ धरूनि राहसी स्वगृहाप्रती ॥ माझे विषयीं कामशक्ती ॥ उद्भवली म्हणून हांसलीस ॥ २२ ॥ तरी मी नोहें तैसा भ्रष्ट ॥ सकळ वसूंमाजी श्रेष्ठ ॥ इंद्रियदमनीं एकनिष्ठ ॥ पूर्णतपा साधीतसें ॥ २३ ॥ तरी मम

१ सूर्य. २ घरांत. ३ मारुति. ४ राजवाड्याच्या माडीवर. ५ वस्त्र.

अभिलाष धरूनी ॥ गदगदां हांससी पापिणी ॥ तरी पुरुषविनोदें स्वस्थानीं ॥ जाऊनियां पडशील ॥ २४ ॥ स्त्रीदेशांत स्त्रीकटकीं ॥ वस्ती होईल तुझी शेखीं ॥ मग कैंचा पुरुष ते लोकीं ॥ दृष्टिगोचर होईल ॥ २५ ॥ ऐसें बोलतां वसु अंतरिक्ष[2] ॥ परम लाजली पद्मिणी सुलक्ष ॥ परी पदच्युत शब्द ऐकतां प्रत्यक्ष ॥ स्तुतिसंवादा व्यापिली ॥ २६ ॥ म्हणे महाराजा वसुनाथा ॥ अपराध झाला विषम आतां ॥ अपराधाचें विवरण करितां ॥ बोलतां न ये आम्हांसी ॥ २७ ॥ परी हा असो प्रारब्धयोग ॥ कदा न सुटे आचरला भोग ॥ तरी उश्शाप देऊन आतां चांग ॥ स्वपदातें स्थापावें ॥ २८ ॥ तुम्ही वसु सर्वप्रकारें ॥ भरलां आहां शांतिभांडारें ॥ परम कनवाळू इंद्रियें साचारें ॥ योगदमनीं मिरवलां ॥ २९ ॥ तरी उश्शाप देऊन मातें ॥ करीं महाराजा पदाश्रित ॥ मग अंतरिक्ष[2] पाहून ढळाळित ॥ उश्शापातें वदलासे ॥ ३० ॥ म्हणे पद्मिणी ऐक वचन ॥ स्त्रीराज्यांत कीलोतळा स्वामीण ॥ तेथें आयुष्य सरल्या पूर्ण ॥ तैं पदीं वससील तूं माये ॥ ३१ ॥ परी मज भावें निवेदिलें चित्त ॥ तरी महीं मिरवेल माझा सुत ॥ तो तुज स्वीकारून होईल रत ॥ मच्छिंद्रनाथ म्हणोनियां ॥ ३२ ॥ तो रत झालिया अंगसंगीं ॥ पुत्र लाभसील रेतप्रसंगीं ॥ मीननाथ हें नाम जगीं ॥ प्रसिद्ध मिरवेल महीतें ॥ ३३ ॥ तो पुत्र झालिया तूतें शेवटीं ॥ विभक्त होईल मच्छिंद्रजेठी ॥ मग तूं स्वपदा येऊन गोरटी ॥ भोग भोगीं स्वर्गींचा ॥ ३४ ॥ याउपरी बोलली मैनाकिनी ॥ पुरुष नाहीं कां तया भुवनीं[3] ॥ सकळ स्त्रिया दिसती अवनीं ॥ काय म्हणोनी महाराजा ॥ ३५ ॥ तरी पुरुषावांचून संतती ॥ कोठून होतसे नसून पती ॥ [2]येरू म्हणे येऊन मारुती ॥ भुभुःकार देतसे ॥ ३६ ॥ ऊर्ध्वरेता वायुनंदन ॥ वीर्य व्यापीतसे भुभुःकारेंकरून ॥ मग उत्पत्ति उदयजन्म ॥ तेथें होतसे शुभानने ॥ ३७ ॥ बाळतनु जो पुरुषधारी ॥ मृत्यु पावे तो भुभुःकारीं ॥ तितुक्यांवीण अचळ नारी ॥ महीवरी विराजती ॥ ३८ ॥ ऐसें वदतां अंतरिक्ष[2] मात ॥ मग बोले पद्मिणी जाऊनि त्वरित ॥ हे महाराजा मच्छिंद्रनाथ ॥ येईल कैसा त्या ठाया ॥ ३९ ॥ प्रत्यक्ष पुरुष पावती मरण ॥ ऐसी चर्चा तेथें असून ॥ कैसा येईल तव नंदन[4] ॥ मम भोगार्थ महाराजा ॥ ४० ॥ अंतरिक्ष म्हणे वो शुभानने ॥ तूं कीलोतळेचे उपरी जाउनी ॥ बैसोनि उपरी तपमांडणीं ॥ आराधावा मारुती ॥ ४१ ॥ प्रसन्न झालिया वायुनंदन[5] ॥ मग मुक्त करील त्या भयापासून ॥ परी तुज सांगतों ती खूण ॥ चित्तामाजी रक्षावी ॥ ४२ ॥ प्रसन्न होईल जेव्हां मारुती ॥ मागणें करिजे अंगसंगती ॥ मग तो संकटीं पडून क्षितीं[6] ॥ मच्छिंद्रातें आणील ॥ ४३ ॥ तरी हा रचून दृढतर उपाय ॥ मिरवत आहे मारुती भय ॥ तरी तयाचे हस्तें साधावें कार्य ॥ मच्छिंद्रातें आणोनी ॥ ४४ ॥ याउपरी बोले पद्मिणी युवती[7] ॥ रामचरणीं श्रीमारुती ॥ कैसें सांग मातें द्यावी रती[8] ॥ ऐसें म्हणेल महाराजा ॥ ४५ ॥ परी ऐसिये बोलप्रकरणीं ॥ मारुतीच मिरवला विषयध्वनी ॥ मग तव सुत मच्छिंद्र कोठूनी ॥ येथें येईल

१ निश्चयानें. २ अंतरिक्ष नांवाचा वसु. ३ प्रदेशामध्यें. ४ पुत्र. ५ मारुति. ६ पृथ्वीवर. ७ स्त्री. ८ विषयसुख.

महाराजा ॥ ४६ ॥ ऐसें अंतरिक्ष ऐकतां वचन ॥ म्हणे विषयोपद्रवरहित वायुनंदन ॥ ब्रह्मचर्यव्रतातें लोटून ॥ रतिसुखातें मिरवेल ॥ ४७ ॥ तरी हा संशय सोडून गोरटी ॥ अर्थ धरिजे इतुका पोटीं ॥ मच्छिंद्रा लाहसील येणें कोटीं ॥ हनुमंतेंकरूनियां ॥ ४८ ॥ ऐसें सांगूनियां अंतरिक्ष ॥ स्वस्थाना गेला वसु दक्ष ॥ येरीकडे मैनाकिनी प्रत्यक्ष ॥ स्त्रीराज्यांत प्रवर्तली ॥ ४९ ॥ शृंगारमुरडा राजपट्टणीं ॥ भ्रमण करितां ती पद्मिणी ॥ तों ते [1]चर्मिकेचे सदनीं ॥ सहजस्थितीं पातली ॥ ५० ॥ सहजस्थितीं जाऊनि ओसरीं ॥ बसती झाली शुभगात्री ॥ तों ती चर्मिका पाहून नेत्रीं ॥ बोलती झाली तियेतें ॥ ५१ ॥ म्हणे माय वो शुभाननी ॥ कोठें अससी लावण्यखाणी ॥ येरी म्हणे वो मायबहिणी ॥ सिंहलद्वीपीं मी असतें ॥ ५२ ॥ परी अंतरिक्षवसूचे शापेंकरून ॥ पाहतें झालें माय हें भुवन ॥ आतां माझें संगोपन ॥ कोण करील कळेना ॥ ५३ ॥ ऐसी ऐकून पद्मिणीवाणी ॥ बोलती झाली तों चर्मिणी ॥ म्हणे माय वो माझे स्थानीं ॥ राहून सुख भोगीं कां ॥ ५४ ॥ स्वहस्तें करून पाक ॥ हरीत जा माये तृषाभूक ॥ मी आपुल्या गृहींची एक ॥ तारंबळ होतसे ॥ ५५ ॥ तरी माय वो उपेक्षा सोडून ॥ सेवीं माय वो माझें सदन ॥ कन्येसमान तुज पाळीन ॥ सर्व सुख देऊनियां ॥ ५६ ॥ ऐसी ऐकून तियेची वार्ता ॥ परम तोषली हृदयीं दुहिता ॥ मग तेथेंचि राहून [2]बैल्लवी हस्ता ॥ क्रियेलागीं आराधी ॥ ५७ ॥ हस्तें करून पाकनिष्पत्ती ॥ हरीत चर्मिकेचे क्षुधेप्रती ॥ शेवटीं भोजनक्रियेसंगतीं ॥ आपण सेवी नित्यशा ॥ ५८ ॥ यासही लोटतां बहुदिन ॥ कीलोतळा राज्यस्वामीण ॥ आयुष्य सरलें जरा व्यापून ॥ मग मंत्र्यालागीं बोलतसे ॥ ५९ ॥ म्हणे आयुष्य सरलें निकट ॥ तरी कोणास हो द्यावा राज्यपट ॥ मंत्री म्हणे माळिका चोखट ॥ गजशुंडीं विराजवावी ॥ ६० ॥ सकळ स्त्रिया पाचारून ॥ गज प्रेरावा माळ देऊन ॥ त्याला भेटेल दैववान ॥ माळग्रहणीं [3]ग्रीवेंत ॥ ६१ ॥ ऐसें बोलतां मंत्री तये वेळां ॥ परम तोषली कीलोतळा ॥ मग सुदिन पाहून कार्यमंगळा ॥ अर्पिली माळा गजशुंडीं ॥ ६२ ॥ समग्र स्त्रियांची सभा करून ॥ मग तो प्रेरिला माळ देऊन ॥ ते प्रांतीं मैनाकिनी पाहून ॥ माळ ग्रीवेंत ओपिली ॥ ६३ ॥ याउपरांतिक भोगितां [4]राणीव ॥ आचरली पूर्वोक्त तपपर्व ॥ वश केला मनोभावें ॥ [5]रामदूत तियेनें ॥ ६४ ॥ वश झाला अंजनीनंदन ॥ हें पूर्वींच लिहिलें कथन ॥ वायुसुतें मच्छिंद्राकारण ॥ निवेदिलें प्रकरण पूर्वीं ॥ ६५ ॥ तरी असो ऐसें कथन ॥ सिंहलद्वीपीं मैनाकिनी नाम ॥ मातापितरांच्या आवडींकरून ॥ नाम ऐसें विराजलें ॥ ६६ ॥ यापरी सिंहलद्वीपींची [6]दारा ॥ म्हणोनि सर्वांच्या वागुत्तरा ॥ पद्मिणी नाम सर्वोपचारा ॥ बोभावती कटकांत ॥ ६७ ॥ कीलोतळेचें पावली आसन ॥ म्हणोनी कीलोतळा ऐसें नाम ॥ असो गुप्तरूपें वायुनंदनें ॥ सावध केली कीलोतळा ॥ ६८ ॥ सावध करोनि तीतें ॥ म्हणे कीलोतळे ऐकें मात ॥ तुवां मज ठेऊनि वचनांत ॥

१ चांभारस्त्रीचे. २ स्वयंपाक करणारी. ३ गळ्यांत. ४ राणीपणा. ५ मारुति. ६ स्त्री.

मच्छिंद्रनाथ आणविला ॥ ६९ ॥ तरी तव वचनापासून ॥ सुटलों आहें अर्थ करून ॥ परी तव सुखास पातलें विघ्न ॥ मच्छिंद्र-शिष्य येतो कीं ॥ ७० ॥ तो मच्छिंद्राहून प्रतापवंत ॥ नामीं मिरवला गोरक्षनाथ ॥ तो अजिंक्य असे तयाचें सामर्थ्य ॥ वर्णवेना वाचेसीं ॥ ७१ ॥ म्यां तुझ्यासाठीं यत्न केला ॥ श्रीराम मध्यस्थ घातला ॥ परी अवमानून उभयतांला ॥ मच्छिंद्रा नेऊं म्हणतसे ॥ ७२ ॥ तरी तो आतां येईल येथें ॥ त्यासी सज्ज करून प्रीतीतें ॥ गोंवून घ्यावा कोणे हितार्थें ॥ सुखसंपत्ती दावूनियां ॥ ७३ ॥ परी तो नोहे मच्छिंद्रासमान ॥ विषयीं विरक्त तपोधन ॥ कैसा राहील नवलविधान ॥ सर्वोपरी विरक्त तो ॥ ७४ ॥ परी वाचा-गौरव द्रव्यगौरव ॥ आसनगौरव वसनगौरव ॥ भोजनादि नानावैभवें ॥ गौरवोनि गोंवावा ॥ ७५ ॥ जैसा जतन करी पावक[1] ॥ संग्रहीं जे गौरवी राख ॥ कीं चिंधीवेष्टणें रक्षणें माणिक ॥ होत आहे शुभाननी ॥ ७६ ॥ तैसा बहुविध गौरव करून ॥ तुष्ट करावें तयाचें मन ॥ ऐसें सांगून वायुनंदन ॥ गमन करिता पैं झाला ॥ ७७ ॥ परी ती चपळ मैनाकिनी ॥ मारुति बैसविला कनकासनीं ॥ षोडशोपचारें पूजा करोनी ॥ बोळविला महाराजा ॥ ७८ ॥ स्वस्थाना गेला वायुसुत ॥ येरीकडे गोरक्षनाथ ॥ वेश्याकटकीं मार्गीं येत ॥ मुक्काम मुक्कामास साधूनियां ॥ ७९ ॥ जैसे पक्षी करिती गमन ॥ या तरूहून त्या तरूवरी जाऊन ॥ तेवीं गोरक्ष मुक्काम करून ॥ शृंगसुरडीं पातला ॥ ८० ॥ गांवानिकट पेठेंत ॥ धर्मशाळा होती त्यांत ॥ वेश्याकटकीं राहून तेथ ॥ शिबिरापरी योजिलें ॥ ८१ ॥ मग ती वेश्या मुख्य नायिका ॥ कलिंगा नामें मुख्य दोंदिका ॥ साजसरंजाम घेऊन [2]निका ॥ राजसदनीं चालिली ॥ ८२ ॥ सर्वे वेश्या सात पांच ॥ घेऊन रूपवंत गुणवंत साच ॥ ऐसे कटकीं करोनि संच ॥ राजांगणीं मिरवली ॥ ८३ ॥ राजद्वारीं उभी राहून ॥ पाठविलें वर्तमान ॥ द्वाररक्षकें आंत जाऊन ॥ वेश्याकटकीं सांगितलें ॥ ८४ ॥ हे महाराजा राजद्वारीं ॥ कलावती कला-कुसरी ॥ रूपवती गुणगंभीरी ॥ भेटीलागीं पातली ॥ ८५ ॥ तरी आज्ञेप्रमाणें वदूं तीतें ॥ ऐसी ऐकतां कीलोतळा मात ॥ म्हणे घेऊन या सभास्थानांत ॥ समारंभेंसीं अवघे ॥ ८६ ॥ ऐसें ऐकतां द्वारीं दूतीं[3] ॥ सर्वेचि पातली द्वारावती ॥ घेऊनि कलिंगा कला-वती ॥ सभास्थानीं पातली ॥ ८७ ॥ तों कनकतगटीं रत्नकोंदणीं ॥ मच्छिंद्र मिरवला कैनकासनीं[4] ॥ निकट बैसली मैनाकिनी ॥ निजभारें शोभली ॥ ८८ ॥ जैसी नभीं उडुगणज्योती ॥ मध्यें मिरवला रोहिणीपती[5] ॥ त्याचि न्यायें मच्छिंद्राभोंवतीं ॥ सकळ स्त्रिया विराजल्या ॥ ८९ ॥ कीं तेजःपुंज हाटकासनीं ॥ हिरा मिरवला शुद्ध कोंदणीं ॥ नवरत्न हिरे वेष्टित हिरकणी ॥ तैसा शोभला मच्छिंद्र ॥ ९० ॥ कीं शैल्या नव्हेत त्या रश्मिज्वाला ॥ मध्यें मच्छिंद्र अर्कगोळा ॥ कनकासनीं ते सदनीं सकळा ॥ राज-सभेंत मिरवत ॥ ९१ ॥ असो ऐसी सभा सघन ॥ कलिंगा दृष्टीनें पाहोन ॥ मग बोलती झाली सभे वचन ॥ मैनाकिनी रायातें

१ अग्नि. २ चांगला. ३ दासी. ४ सुवर्णसिंहासनावर. ५ चंद्र.

॥ ९२ ॥ हे महाराजा शैल्यापती ॥ ऐकून नामाभिधानकीर्ती ॥ सोडून आपुल्या देशाप्रती ॥ येथें आलें महाराजा ॥ ९३ ॥ तरी कीर्तिध्वज फडकत अवनीं ॥ तैसी अवलोकनीं आली करणी ॥ मही कलावंत राजभुवनीं ॥ विराजतसे महाराजा ॥ ९४ ॥ बृहद्रथ राजा हस्तिनापुरीं ॥ कीर्तिध्वज धर्माचारी ॥ याच नीतीं बंगालधरित्रीं[1] ॥ गोपीचंद विराजला ॥ ९५ ॥ याच नीतीं कीर्तिध्वज ॥ शैल्यादेशीं कीलोतळा नामराज ॥ ऐसी वरूनि सत्कीर्तिभाज ॥ येथें आलें महाराजा ॥ ९६ ॥ ऐसी बोलतां कलिंगा युवती[2] ॥ परम तोषला कीलोतळाभूपती ॥ मग समुचयें विचार करोनि अन्नभुक्ती ॥ देऊनि बोले कीलोतळा ॥ ९७ ॥ तंव ती कलिंगा येऊनि शिबिरीं ॥ मध्यान्हसमया सारोनि उपरी ॥ साजसरंजाम सजूनि परी ॥ सावध रात्रीं बैसली ॥ ९८ ॥ तों येरीकडे मैनाकिनी ॥ येऊनि बैसली सभास्थानीं ॥ सभामंडप शृंगारोनी ॥ दीपमाळा रचियेल्या ॥ ९९ ॥ लावूनि स्फटिकांची कुपिका ॥ मेणबत्ती लावोनि दीपका ॥ अगरबत्तीगंध लोकां ॥ घ्राणोघ्राणीं मिरवतसे ॥ १०० ॥ तबकीं भरोन गंगेरी पानें ॥ विडे रचिले त्रयोदशगुणी ॥ त्यांत फुलें अत्तरदाणी ॥ लोकांमाजी मिरवतसे ॥ १ ॥ ऐसिये सभे कटकासन ॥ मूळ पाठविलें कलिंगेलागून ॥ तंव ती आपुला सरंजाम घेऊन ॥ दिव्यतेजें मिरवली ॥ २ ॥ येरी कलिंगा राजसदना जात ॥ सवें चालिला गोरक्षनाथ ॥ परी कलिंगा पाचारोनि एकांत ॥ गुज सांगे तियेसी ॥ ३ ॥ म्हणे वो ऐक गुणगंभीरी ॥ तूं नाट्या करिसील सभेभीतरी ॥ तरी मृदंगवाद्य माझे करीं ॥ सभास्थानीं ओपीं कां ॥ ४ ॥ शैल्यासभे कटकस्थानीं ॥ रिझवितां माझे वाजवणी ॥ मग द्रव्यलाभ घे ओढोनी ॥ मानेल तैसें माग तेथें ॥ ५ ॥ ऐसें ऐकतां कलिंगा वदत ॥ हे वरिष्ठ महाराजा गुणसमर्थ ॥ सभेस्थानीं स्त्रिया समस्त ॥ पुरुष नसे त्या ठायीं ॥ ६ ॥ तरी तुम्हांलागीं तेथें नेतां ॥ वितर्क वाढेल संशय चित्ता ॥ स्त्रीदेशांत पुरुष व्यक्त ॥ कोठेंच नाहीं म्हणोनी ॥ ७ ॥ ऐसें ऐकून तपोद्रुम ॥ म्हणे ऐकें वो सुमध्यमे ॥ अंगनावेषें येतों नटून ॥ रंग तुझा लुटावया ॥ ८ ॥ माझी इच्छा होईल पूर्ण ॥ तूंतेंही मिळेल अपार धन ॥ मग ती कलिंगा आवडीन ॥ अवश्य नाथा म्हणतसे ॥ ९ ॥ मग लेवून कंचुकीसार ॥ परिधानिलें उत्तम चीर[3] ॥ जटावियुक्त करोनि भार ॥ भांग मुक्तांनीं भरियेला ॥ ११० ॥ भाळीं चर्चून कुंकुमकोर ॥ सोगया अंजनीं मिरवलें नेत्र ॥ कँबरीवरून[4] चीरपदर ॥ नाभिस्थानीं खोंविला ॥ ११ ॥ काढोनि कर्णमुद्रिकाभूषण ॥ ताटंकें केलीं परिधान ॥ तेंही कोंदणीं जडावरत्नें ॥ नक्षत्रांस झळकती ॥ १२ ॥ कीं एकाग्र करून रोहिणीपती[5] ॥ करूं पातले श्रवणीं वस्ती ॥ मुक्तघोष नासिकाप्रती ॥ सरजी नथ शोभतसे ॥ १३ ॥ पाचकंकणजडितभूषण ॥ ग्रीवेमाजी अपार हेम[6] ॥ नानानगी हाटकगुण ॥ मुक्तलडा शोभल्या ॥ १४ ॥ असो आतां किती वर्णन ॥ अंगनावेषें गोरक्षनंदन ॥ परम शोभला चँपळेपण[7] ॥ वेश्यांगणीं तळपतसे ॥ १५ ॥ आधींच पूर्ण हेमकांती अवतारी ॥

१ बंगालदेशांत. २ स्त्री. ३ वस्त्र. ४ केंसांवरून. ५ चंद्र. ६ गळ्यांत सोन्याचे कित्येक दागिने घातले. ७ विजेसारखा.

 

त्यावरी नटला हेमशृंगारी ॥ मग वर्णदशास्वरूपापरी ॥ रंभा दासी शोभली ॥ १६ ॥ ऐसिया आव्हानून पैंजणीं ती ॥ मृदंग कवळून प्रतिहातीं ॥ नटनृत्यस्वरूपीं राजपंक्ती ॥ जाणूनियां मिरवली ॥ १७ ॥ परी त्या शैल्या शुभाननी ॥ पाहती पुरवंडा सुलोचनी ॥ एकमेकां बोलती वाणी ॥ मदनबाळी हेही असे ॥ १८ ॥ सकळ नाट्यकलावती ॥ विकळस्वरूप नीच दिसती ॥ म्हणती धन्य [२]विधात्याप्रती ॥ रचिली मूर्ति अनुपम्य ॥ १९ ॥ समस्त वदूं जरी उर्वशी ॥ तरी हिच्यापुढें वाटती दासी ॥ चपळातेजें सहजेसीं ॥ तळपत आहे बाळी हे ॥ १२० ॥ साज सोडोनि [३]प्रत्योदक ॥ नाद दर्शवी अलौकिक ॥ पाहतेपणीं पडून ठक ॥ विसयातें पडती त्या ॥ २१ ॥ वाद्यनादानें व्यक्तींत ॥ मेळवी ताल अति अद्भुत ॥ परी सकळ शैल्यांचे चक्षु तेथ ॥ एका ठायीं मीनले ॥ २२ ॥ कलिंगा मुख्य नायकिणी ॥ परी पुरवंडा दैन्यवाणी ॥ जैसें उदया येतां तरणी ॥ सकळ [४]तेजा लोपती ॥ २३ ॥ असो नाट्यदारा कलिंगेसहित ॥ उभ्या राहिल्या करूं नृत्य ॥ तैं कटीं कवळून मृदंगातें ॥ कुशळ वाजवी पुरवंडा ॥ २४ ॥ संगीत स्वरित गायन ॥ शैल्या सकळ तुकाविती मान ॥ अहा अहा बोलून वचन ॥ धन्य म्हणती कलिंगा ॥ २५ ॥ सकळ शैल्या सभांगणीं ॥ त्यांत मच्छिंद्रनाथ कनकासनीं ॥ कीं पदमाळिके चिंतामणी ॥ हिरा चमक दावीतसे ॥ २६ ॥ पुढारां पाहूनि गुरुनाथ ॥ मनच्या मनीं नमन करीत ॥ परम हेलावे आनंदें चित्त ॥ म्हणे कृतार्थ झालों मी ॥ २७ ॥ आतां श्रीगुरूचे पाहिले चरण ॥ सकळ झालों तापहीन ॥ मग स्फुरण ये कुशळपणीं ॥ वाद्यकळा मिरवीतसे ॥ २८ ॥ तैं नृत्यगीत संगीत होतां ॥ पाहून लाजे [५]विधिदुहिता ॥ लाजत अप्सरा गंधर्व माथा ॥ ठेऊन पाहती चरणांतें ॥ २९ ॥ तानमान रंगप्रकार ॥ तल्लीन झाले सकळ भार ॥ मान तुकावून नाथ मच्छिंद्र ॥ अहा अहा म्हणतसे ॥ १३० ॥ मग परिधानावया उंच वस्त्र ॥ काढून हस्तें देत मच्छिंद्रनाथ ॥ तों पुढारां पाहून हर्ष बळवंत ॥ लाघवकळे वर्तवी ॥ ३१ ॥ मृदंगवाद्य वाजवितां ॥ अद्भुतपण कुशळता ॥ तया नादातें अक्षरव्यक्ता ॥ [६]भांतीभांती काढीतसे ॥ ३२ ॥ त्या अक्षरामाजी अक्षर ॥ मच्छिंद्रनामें चमत्कार ॥ दावूनि पुढें तोच व्यवहार ॥ रंगासमान नाचवी ॥ ३३ ॥ मृदंगअक्षरीं तैसी चर्या ॥ दावीतसे गुरुवर्या ॥ "चलो मच्छिंदर गोरख आया" ॥ पुन्हां अक्षरें आच्छादी ॥ ३४ ॥ परी अक्षरें मच्छिंद्रातें ॥ श्रवण होतां पाहे भंवतें ॥ चित्तीं चाकाटून म्हणे येथें ॥ कोठून आला गोरक्ष ॥ ३५ ॥ येरीकडे सहज चालीं ॥ गोरक्ष वाजवी गायनपाउलीं ॥ रंजीत देखतां गुरुमाउली ॥ तींचि अक्षरें आणीतसे ॥ ३६ ॥ आणितां अक्षरें पूर्वव्यक्त ॥ होतांच मच्छिंद्र दचकत ॥ भंवतें पाहून गोरक्षनाथ ॥ कोठें आहे म्हणतसे ॥ ३७ ॥ शैल्या आणि कलावासिनी ॥ तयास [७]व्यक्त न पाहतां नयनीं ॥ कोठून पडतसे अक्षरध्वनी ॥ श्रवणीं आमचे साजणी ॥ ३८ ॥ पिशाचावाणी भंवतीं पाहतसे ॥ घडीघडी चित्त दचकतसे ॥ थड-

१ मृदंग वाजविणारी स्त्री. २ ब्रह्मदेवाला. ३ प्रत्यक्ष. ४ तेजस्वी चांदण्या. ५ सरस्वती. ६ निरनिराळा. ७ प्रत्यक्ष.

थडोनी हृदय उडतसे ॥ आला गोरक्ष म्हणोनी ॥ ३९ ॥ मग न आवडे सभा कनकासन ॥ मुख वाळलें झालें म्लान ॥ मग कोणी ऐकेना गायन ॥ चित्तीं फार व्यापिले ॥ १४० ॥ "चलो मच्छिंदर गोरख आया" ॥ जंव जंव अक्षरें हीं ऐकूनियां ॥ तंव तंव दचकून गेली काया ॥ कालिमा तेव्हां येतसे ॥ ४१ ॥ तंव पाहून कीलोतळा ॥ हृदयीं पेटून चिंतानळा ॥ काळिंबी काया म्हणून सकळां ॥ रोमांच उठती शरीरीं ॥ ४२ ॥ तंव पाहूनि कीलोतळा ॥ म्हणे महाराजा तपपाळा ॥ सुरसरंगीं मुखकमळा ॥ काळिंबी कां वरियेली ॥ ४३ ॥ येरी म्हणे वो मैनाकिनी ॥ मातें दिसते विपरीत करणी ॥ मच्छिंद्रशिष्य गोरक्ष अवनीं ॥ भय आहे तयाचें ॥ ४४ ॥ तो परम पवित्र भक्तचूडामणी ॥ विषया नातळे इंद्रियदमनीं ॥ महाप्रतापें तपोखाणी ॥ बैरागी तो असे हो ॥ ४५ ॥ अगे तो येतां तव पट्टणीं ॥ नेईल मातें स्वदेशअवनीं ॥ मग तव रतीची सुखयामिनी[3] ॥ गोरक्षअंकीं नासेल ॥ ४६ ॥ ऐसें ऐकतां कीलोतळा ॥ मारुतिसूचनेचा खूणगरळा ॥ हृदयीं व्यापून जाळूं लागला ॥ मुख कोमाविती पैं झाली ॥ ४७ ॥ मग तो रंग नाट्यकृती ॥ विरस होऊन नावडे चित्तीं ॥ हृदयालयीं ते चिंताभगवती ॥ नांदती झाली प्रत्यक्ष ॥ ४८ ॥ नाट्यरंगाचा आनंदवेष ॥ बळी आव्हानिला एकाचि भाष ॥ मग रंगदेवता पडून ओस ॥ उठवी आपुल्या ठाण्यातें ॥ ४९ ॥ जैसी पैंयसैंधवा[4] पडे गांठी ॥ मग विरस होऊन नासल्या गोष्टी ॥ मिरवला हा तन्याय पोटीं ॥ भय उभयतां आतळे ॥ १५० ॥ परी ती चतुर मैनाकिनी ॥ गायनस्वर आव्हान कानीं ॥ तों मृदंगवाद्यीं उठोनि ध्वनी ॥ चलो गुप्त गोरख आया ॥ ५१ ॥ ऐसा नाद अक्षरस्थित ॥ कीलोतळा श्रवण करीत ॥ मग बोलावून कलावंत ॥ उत्तरातें आराधी ॥ ५२ ॥ म्हणे तव सारंगी संगीती ॥ वाजत आहे उत्तमा गतीं ॥ परी आमुच्या साजसंग्रहाप्रती ॥ आजी पाहूं वाजवोनी ॥ ५३ ॥ ऐसें ऐकतां कलिंगा पद्मिनी ॥ म्हणे आणा पाहूं वाजवोनी ॥ मग ती कीलोतळा आज्ञापोनी ॥ साज आणून ठेवीतसे ॥ ५४ ॥ तोही साज पुढें घेऊनी ॥ वाजविती कुशळपणीं ॥ परी सुस्वर गाण्यांत अक्षर पूर्ण ॥ तेंचि काढी पुन्हां पुन्हां ॥ ५५ ॥ तेंही ऐकून मैनाकिनी ॥ मग सेविका आपुली कलावंतिनी ॥ कलिंगाचा साज देउनी ॥ उभी केली पाठीमागें ॥ ५६ ॥ तीतें सांगे रहस्ययुक्ती ॥ पुढारां वाद्यें अक्षरें काढिती ॥ त्याच नीतीं अक्षरस्थिती ॥ तूंही बोलवीं मृदंगा ॥ ५७ ॥ परी ती वाजवितां कलावंतिणी ॥ तैसीं अक्षरें न येती कानीं ॥ मग पुढें तिचा हात धरोनी ॥ एकांतासी पैं गेली ॥ ५८ ॥ सलीलपणीं चरणीं माथा ॥ ठेवून पुसे तीस वार्ता ॥ माये तूं कोण सांग आतां ॥ सकळ संशय सोडोनी ॥ ५९ ॥ जरी ही गोष्ट ठेविसी चोरून ॥ तरी तुज तुझ्या गुरूची आण ॥ मातें वदें कीं प्रांजळपण ॥ कोण कोणाची तूं असती ॥ १६० ॥ ऐसी भूपिणी[5] बोलतां वचन ॥ मनांत विचारी गोरक्षनंदन ॥ प्रगट होण्याचा समय पूर्ण ॥ हाचि सुलक्षण दिसतसे ॥ ६१ ॥ मग बोलता झाला प्रांजळ वचन ॥

१ सिंहासन. २ शरीर. ३ सुखकारक रात्र. ४ दुधाला व मिठाला. ५ राणी.

माये मी नसें सर्वथा कामिण ॥ श्रीमच्छिंद्राचा प्रियनंदन ॥ गोरक्षनामें मिरवतसें ॥ ६२ ॥ तरी स्त्रीवेषनटी नारी ॥ नटोनि निघों तव राजद्वारीं ॥ ऐसें ऐकतां ती सुंदरी ॥ पुन्हां चरणीं लोटली ॥ ६३ ॥ मग पुरुषपरिधान आणोनि त्वरित ॥ श्रीगोरक्षनाथा नेसवीत ॥ म्हणे तूं माझा सुत ॥ भेटलास दैवानें ॥ ६४ ॥ पूर्वी नाथानें नामाभिधान ॥ तव रूपीं केलें निवेदन ॥ निवेदन होतांच तनमनप्राण ॥ तव भेटी उदेले ॥ ६५ ॥ उदेले परी सांगूं काय ॥ जैसें सेवितां कां जगन्याय ॥ कीं गृहीं वत्स काननीं गाय ॥ परी प्राण वत्सा ठेवीतसे ॥ ६६ ॥ कीं जळावेगळी मासोळी ॥ होतां रिघूं पाहे पुन्हां जळीं ॥ तन्न्यायें मोहकाजळी लागली ॥ तुजसाठीं मज बा रे ॥ ६७ ॥ मग हाटकशृंगार करून व्यक्त ॥ जडितकोंदणीं लेववीत ॥ रत्नमुद्रिका रणबिंदीसहित ॥ मुक्ततुरा लाविला ॥ ६८ ॥ भरजरीचे कनकवर्णी ॥ परिधानिला चीरभूषणीं ॥ मस्तकीं मंदिल नवरत्नी ॥ शिरपेंच वरी जडियेला ॥ ६९ ॥ हस्ताग्रीं बाहुवट ॥ हेमकोंदणीं लखलखाट ॥ सर्व भूषणीं तेजवट ॥ शृंगारिला नाथ तो ॥ १७० ॥ मग हस्त धरून कीलोतळा ॥ येती झाली सभामंडळा ॥ येतांच मच्छिंद्रें देखिली डोळां ॥ पुरुषव्यक्त कामिनी ॥ ७१ ॥ मनांत म्हणे मच्छिंद्रनाथ ॥ पुरुष कैंचा आला येथ ॥ निकट येतां कीळोतळेतें ॥ हस्तें खुणावी कोण तो ॥ ७२ ॥ येरीकडे हस्तखुणे संकेतीं ॥ पाहून म्हणे गोरक्षजती ॥ तुमचा उद्देश धरून चित्तीं ॥ भेटीलागीं पातला ॥ ७३ ॥ परी आज उदेला दैवआदित्य ॥ भेटला माझा प्राणसुत ॥ सकळ राज्याचा धैर्यवंत ॥ बाळ गोरक्ष माझा हा ॥ ७४ ॥ आतां सकळ कांचणी ॥ फिटून गेली अंतःकरणीं ॥ सकळ वैभव राजमांडणी ॥ संगोपील बाळ हा ॥ ७५ ॥ आणि पाठिंबा बळिवंत ॥ सहोदर वडील गोरक्षनाथ ॥ धाकुटा मीन तुमचा सुत ॥ संगोपील तयासी ॥ ७६ ॥ म्हणून समूळ माझी कांचणी ॥ फिटून गेली दूर अवनीं ॥ वृद्धापकाळीं चक्रपाणी ॥ कृपें वेष्टिला आपणासी ॥ ७७ ॥ ऐसें बोलतां मैनाकिनी ॥ गोरक्ष हास्य करी मनीं ॥ चित्तीं म्हणे बळेंच तरणी ॥ अंधारचीरीं भूषितसे ॥ ७८ ॥ आम्ही विरक्त शुद्ध वैष्णव ॥ आम्हां कासयास वैभव ॥ विधवेलागीं कुंकुमटेव ॥ खटाटोप कासया ॥ ७९ ॥ कीं परिसालागीं कनकशृंगार ॥ कीं तक्रीं तुष्टती देव अमर ॥ तैसे आम्ही विरक्त थोर ॥ राजवैभव कासया ॥ १८० ॥ कीं ग्रामगौतमीची कास ॥ दुग्ध काढून अंजुळीस ॥ तें पयोब्धीस पाजून सुरस ॥ तुष्ट चित्तीं मिरवला ॥ ८१ ॥ कीं सकळ महीचा नृपनाथ ॥ अंजुळी धान्याचा गरजवंत ॥ कीं मित्र तेजांची भिक्षा मागत ॥ काजव्यातें जाउनी ॥ ८२ ॥ तयाचि न्यायें आम्हांस वैभव ॥ कायसें पद थोर राणीव ॥ येरी जल्पतसे आपुला भाव ॥ निःसंगा संग जाउनी ॥ ८३ ॥ परी असो कार्यापुरती ॥ ऐकून घ्यावी येउती मात ॥ श्रीगुरुमर्जी आली करतलांत ॥ मारूं लाथ वैभवासी ॥ ८४ ॥ ऐसें गोरक्ष कल्पून मनीं ॥ येरीकडे मच्छिंद्रमुनी ॥ कीळोतळेचे शब्द ऐकुनी ॥ आसनाहूनि उठिला ॥ ८५ ॥

१ स्त्री. २ स्त्रीवेष धारण करणारी. ३ पुरुषवस्त्रें. ४ सुवर्णालंकार. ५ सूर्य. ६ प्रकाशाची.

अतिप्रेमा दाटून पोटीं ॥ गोरक्षगळां घातली मिठी ॥ करीं कवळून हृदयपोटीं ॥ प्रेमें सद्गद आलिंगिला ॥ ८६ ॥ मग कलिंगेतें पाचारून ॥ अमूप द्रव्य दिधलें वसन ॥ गौरवून तियेचें मन ॥ स्वस्थानातें बोळविलें ॥ ८७ ॥ येरीकडे मंडपांत ॥ शैल्यासहित मच्छिंद्रनाथ ॥ निकट बैसवूनि गोरक्षातें ॥ योगक्षेम पुसतसे ॥ ८८ ॥ बद्रिकाश्रमीं तपोराहाटी ॥ तितुकें सांगे गोरक्षजेठी ॥ कंटकाग्रीं पादांगुष्ठीं ॥ द्वादश वर्षे संपादिलीं ॥ ८९ ॥ उपरी तप झालिया पूर्ण ॥ माव करी उमारमण ॥ सकळ देवां बोलावून ॥ आतिथ्यही मिरवलें ॥ १९० ॥ ऐशी झालिया तपराहाटी ॥ परी तव वियोग साहीना पोटीं ॥ क्षणक्षणां होऊनि कष्टी ॥ शोक करूं रिघतसें ॥ ९१ ॥ जया पदाचें होतां स्मरण ॥ अंतीं जठर जाय वेष्टून ॥ म्लानवदनीं ओस कानन ॥ दाही दिशां दिसतसे ॥ ९२ ॥ मग उदकापासून जैसा मीन ॥ तरफडून देऊं पाहत प्राण ॥ तेवीं माझें अंतःकरण ॥ दुःखडोहीं हेलावे ॥ ९३ ॥ परी प्रारब्धयोग दारुण ॥ येथें भेटले तुमचे चरण ॥ आतां गेलिया प्राण ॥ एकाकी कदा न वसें मी ॥ ९४ ॥ ऐसें ऐकतां वचनयुक्तीं ॥ पुन्हां धरीतसे हृदयाप्रती ॥ म्हणे वत्सा तुज मागुती ॥ एकांगें कदा न करीं मी ॥ ९५ ॥ मुळींहून बाळपण ॥ तुवां न जाणिलें मजवीण ॥ सकळ करूनि लालन ॥ स्थावरपणीं मिरवलें ॥ ९६ ॥ जळावेगळी जळमासोळी ॥ विभक्त न होय कवणे काळीं ॥ तेवीं मम चित्तदरींत तपोमौळी ॥ विभक्त झाला नाहींस ॥ ९७ ॥ परी न व्हावें तें घडून आलें ॥ श्रीमारुतीनें मज गोंविलें ॥ गौरविलें परी सदा फोलें ॥ वैभव वाटे तुजवीण बा ॥ ९८ ॥ बा भोजन करितां षड्रसान्नीं ॥ तुझें स्मरण होतसे मनीं ॥ बा तो ग्रास ठेवितां आननीं ॥ विषासमान वाटतसे ॥ ९९ ॥ मग अश्रूनें पूर्ण भरती नयन ॥ तुजजवळी लागे माझा प्राण ॥ मग मूर्तिमंत तूं जठरीं येऊन ॥ उभा राहसी माझिया ॥ २०० ॥ मग ताप उपजे मनांत ॥ अहा बाळकास टाकोनि वनांत ॥ आलों मी फिरत फिरत ॥ हेंच चिंतन निशिदिनीं ॥ १ ॥ बा तुजविण करितां तीर्थभ्रमण ॥ परी ओस दिशा बोभावे मन ॥ मनांत जल्पें वत्स टाकून ॥ कैसा आलों मी पापी ॥ २ ॥ ऐसें बोलतां मात ॥ मग बोलता झाला गोरक्षनाथ ॥ हे महाराजा माझी ऐकें मात ॥ तूतें सुत बहु असती ॥ ३ ॥ जया देशीं कराल गमन ॥ तेथेंचि सुत कराल निर्माण ॥ मग तुमच्या मोहाचें आवरण ॥ वांटलें जाय महाराजा ॥ ४ ॥ परी एकचि तूं माझी आई ॥ मन माझें एकेचि ठायीं ॥ मग जैसी पहा गती पाहीं ॥ जळावीण मीनातें ॥ ५ ॥ कीं अर्का कुमुदिनी असती अपार ॥ तो मोह करील कोणावर ॥ परी कुमुदा तो एकचि मित्र ॥ सुखापरी आणाया ॥ ६ ॥ कीं चंद्रा चकोर असती बहुत ॥ परी चकोरा एकचि रोहिणीनाथ ॥ त्याचि न्यायें जननी मातें ॥ असशी एकचि माते तूं ॥ ७ ॥ जळांत असती बहुत जळचर ॥ परी जळचरा असतें एकचि नीर ॥ तन्न्यायें मज माहेर ॥ एकचि मच्छिंद्र आराधिला ॥ ८ ॥ श्लाघ्य पुरुषा अन्य युवती ॥ परी युवतीस

१ पुष्कळ. २ वस्त्रें. ३ शंकर. ४ मासा. ५ तोंडांत. ६ माशाला. ७ सूर्याला. ८ चंद्र.

एकचि पती ॥ तन्यायें कृपामूर्ती ॥ माझें जीवन तूं अससी ॥ ९ ॥ घनास अपार असती चातक ॥ परी चातकास घन तो एक ॥ तेवीं तूं मातें जननीजनक ॥ एकचि अससी महाराजा ॥ २१० ॥ ऐसें म्हणून गोरक्षनाथ ॥ नेत्रीं आणी अश्रुपात ॥ तें पाहुनी अंतरिक्षसुत ॥ प्रेमें हृदयीं कळवळला ॥ ११ ॥ म्हणे तान्हुल्या सत्य वचन ॥ तुज कोणी नसे मजवीण ॥ ऐसें म्हणून मुखचुंबन ॥ कुरवाळून धरीतसे ॥ १२ ॥ मग सभास्थान विसर्जून ॥ पाकशाळेंत उभयतां जाऊन ॥ श्रीगोरक्षा ताटीं घेऊन ॥ भोजनातें सारिलें ॥ १३ ॥ भोजन झालिया एकासनीं ॥ निद्रा करिती उभय जणीं ॥ दिनोदयीं स्नानें करोनी ॥ एकासनीं बैसती ॥ १४ ॥ एका अंकीं मीननाथ ॥ एका अंकीं गोरक्षसुत ॥ कनकासनीं राजसभेंत ॥ घेऊन नाथ बैसती ॥ १५ ॥ जैसा वक्रतुंड[2] षडानन ॥ घेऊन बैसे उमारमण[3] ॥ कीं माय यशोदेजवळी रामकृष्ण ॥ उभय अंकीं मिरवती ॥ १६ ॥ असो आतां हें कथन ॥ पुढें सुखें झाले संपन्न ॥ तें पुढिले अध्यायीं निरूपण ॥ होईल श्रोतीं श्रवण कीजे ॥ १७ ॥ ते मच्छिंद्र उभय अंकीं ॥ घेऊन सुतसुताची फेडील बाकी ॥ शेल्यानें वेष्टून सुखासनीं हाटकीं ॥ नित्य मिरवे मच्छिंद्र तो ॥ १८ ॥ नरहरिवंशीं धुंडीसुत ॥ नरहरि मालू नाम ज्यातें ॥ तो श्रीगुरुकृपें रसाळ कथेतें ॥ निवेदील श्रोतियां ॥ १९ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ विंशतितमाध्याय गोड हा ॥ २२० ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अध्याय ॥ २० ॥ ओव्या ॥ २२० ॥

१ आधार. २ गणपति. ३ शंकर.

॥ नवनाथभक्तिसार विंशतितमाध्याय समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी जगन्नायका ॥ जगज्जनका जगत्पाळका ॥ विश्व व्यापूनि अवशेषका[1] ॥ विश्वंभर म्हणविसी ॥ १ ॥ जरी सकळ विद्यांचें भरणें ॥ करिसी कायावाचामनें ॥ तरी मीच काय विश्वार्तीनें ॥ उरलों असें महाराजा ॥ २ ॥ जरी मी असें विश्वांत[2] ॥ तरी पाळण होईल सहजस्थितींत ॥ ऐसें असोनि संकट तुम्हांतें ॥ कवण्या अर्थीं घालावें ॥ ३ ॥ परी मम वासनेची मळी ॥ रसनांतरीं[3] हेलावली ॥ तयाचीं सुकृतफळें जीं आलीं ॥ तीं तुज पक्क ओपीत महाराजा ॥ ४ ॥ तरी तेंही तुज योग्य भूषणस्थित ॥ मज न वाटे पंढरीनाथ ॥ परी सूक्ष्म शिकवीत भक्तां मात ॥ मोक्षगांवांत प्रेणविसी[4] ॥ ५ ॥ तरी आतां असो कैसें ॥ स्वीकारिलें बोबड्या बोलास ॥ मागिले अध्यायीं सुधारस ॥ गोरक्षमच्छिंद्र भेटले ॥ ६ ॥ भेटले परी एकविचारीं ॥ गुरुशिष्य असती त्या धवळारीं[5] ॥ नानाविलासभोगउपचारीं ॥ भोगिताती सुखसोइळे ॥ ७ ॥ शैल्यराजनितंबिनी ॥ मुख्य नायिका किलोतळा स्वामिनी ॥ मोह दर्शवी गोरक्षालागुनी ॥ स्वसुताहूनि आगळा ॥ ८ ॥ आसन वसन भूषणांसहित ॥ स्वइच्छें तया उपचारीत ॥ पैल करूनि मीननाथ ॥ संगोपीत गोरक्षबाळा ॥ ९ ॥ जैसा चातकालागीं घन ॥ स्वलीलें करी उदकपान ॥ कीं तान्हयाला कांसे लावून ॥ पय पाजिती गौतमी ॥ १० ॥ पाजी परी कैशा स्थितीं ॥ उभवोनी महामोहपर्वतीं ॥ वत्सास लावोनि कांससंपत्ती ॥ शरीर चाटी तयाचें ॥ ११ ॥ त्याचि नीतीं किलोतळा ॥ संगोपीत गोरक्षबाळा ॥ भोजन घालीत अपार ळळा ॥ तान्हयातें पाजीतसे ॥ १२ ॥ भलतैसें ललितपणें ॥ श्रीगोरक्षा घाली भोजन ॥ निकट मक्षिका उडवोन ॥ निजकरें जेववीतसे ॥ १३ ॥ नाना दावोनि चवणे[6] ॥ अधिकाधिक करवी भोजन ॥ ऐसिये परी माउलपण ॥ नित्यनित्य वाढवी ॥ १४ ॥ ऐसा असोनि उपचार ॥ बरें न मानी गोरक्ष अंतरें ॥ चित्तीं म्हणे पडतो विसर ॥ योगधर्मविचाराचा ॥ १५ ॥ ऐसें चिंतीत मनें ॥ मग भोगतो रोगचि जाणे ॥ जेवीं षड्रस रोगियाकारणें ॥ विषापरी वाटती ॥ १६ ॥ मग नित्य बैठकीं बैसून ॥ एकांतस्थितीं समाधान ॥ धृति वृत्ति ऐसी वाहून ॥ करी भाषण मच्छिंद्रा ॥ १७ ॥ हे महाराजा योगपती ॥ आपण वसतां या देशाप्रती ॥ परी हें अश्लाघ्य नाथपंथीं ॥ मातें योग्य दिसेना ॥ १८ ॥ कीं पितळधातूचे तगटीं हिरा ॥ कदा शोभेना वैरागरा ॥ कीं राव घेऊन नरोटीपात्रा ॥ भोजन करी श्लाघ्यत्वें ॥ १९ ॥ श्रीमूर्ति चांगुलपणें ॥ महास्मशानीं करी स्थापन ॥ तैसा येथें तुमचा वास जाण ॥ दिसत आहे महाराजा ॥ २० ॥ पहा जी योगधर्मी ॥ तुम्ही बैसलां निःस्पृह होवोनी ॥ तेणेंकरून ब्रह्मांडधामीं ॥ कीर्तिध्वज उभारिला ॥ २१ ॥ मृत्यु पाताळ एकवीस स्वर्ग ॥ व्यापिलें आहे जितुकें जग ॥ तितुके वांच्छिती आपुला योग ॥ चरणरज सेवावया ॥ २२ ॥ ऐसी प्रज्ञा प्रौढपणीं ॥ असोनि पडावें गर्ते अवनीं ॥ चिंताहारक चिंतामणी ॥ अजाग्रीवीं[7] शोभेना ॥ २३ ॥ तरी पाहें कृपाळु महाराज ॥

१ शिल्लक राहिलेल्या. २ जगतांत. ३ जिव्हेमध्यें. ४ पोंचवितोस. ५ महालामध्यें. ६ रुची. ७ शेळीच्या मानेंत.

उभारिला जो कीर्तिध्वज ॥ तो ध्रुव मिरवेल तेजःपुंज ॥ ऐसें करीं महाराजा ॥ २४ ॥ ऐसें झालिया आणिक कारण ॥ तुम्ही पूर्वींचे आहां कोण ॥ आलां कवण कार्याकारण ॥ कार्याकार्य विचारा ॥ २५ ॥ कीं पूर्वीं पहा ब्रह्मस्थिती ॥ श्रीकविनारायणाची होती ॥ लोकोपकारा अवतार क्षितीं ॥ जगामाजी मिरवला ॥ २६ ॥ आपण आचरलां तपाचरण ॥ शुभमार्गा लावावें जन ॥ धर्मपंथिका प्रज्ञावान ॥ जगामाजी मिरवाव्या ॥ २७ ॥ ऐसें असतां प्रौढपण ॥ ते न आचरावे धर्म ॥ मग जगास बोल काय म्हणवोन ॥ अर्थाअर्थीं ठेवावे ॥ २८ ॥ जात्या वरमाय आळशीण ॥ मग काय पहावी वऱ्हाडीण ॥ राव तस्कर[१] मग प्रजाजनें ॥ कोणे घरीं रिघावें ॥ २९ ॥ कीं अर्कचि[२] ग्रासिला महातिमिरीं ॥ मग रश्मी[३] वांचती कोणेपरी ॥ उडुगणपति[४] तेजविकारी ॥ जात्या होती तेवीं तारागणें ॥ ३० ॥ तेवीं तुम्ही दुष्कृत आचरतां ॥ लोकही आचरती तुम्हांदेखतां ॥ अवतारदीक्षेलागीं माथां ॥ दोष होईल जाणिजे ॥ ३१ ॥ तरी आधींच असावें सावधान ॥ अर्थाअर्थीं संग वर्जून ॥ अंग लिप्त मलाकारणें ॥ तिळतुल्यही नसावें ॥ ३२ ॥ नसतां ओशाळ कोणापाठीं ॥ कळिकाळातें मारूं काठी ॥ निर्भयपणें महीपाठीं ॥ सर्वां वंद्य होऊं कीं ॥ ३३ ॥ तरी महाराजा ऐकें वचन ॥ सकळ वैभव त्यजून ॥ निःसंग व्हावें संगेंकरून ॥ दुःखसरिता[५] तरावी ॥ ३४ ॥ प्रथमचि दुःखकारण ॥ विषयहस्तें बीज रजोगुण ॥ रजा अंकुर येत तरतरोन ॥ क्रोधपात्रीं हेलावे ॥ ३५ ॥ मग क्रोधयंत्रीं तृतीयसंधी ॥ मदकुसुमें क्रियानिधी ॥ मदकुसुमांचे संधी ॥ मत्सरगंध हेलावे ॥ ३६ ॥ गंधकुसुमें ऐक्यता ॥ होतांच दैवें विषयफळता ॥ मग विषयफळीं अपार महिमता ॥ मोहर शोभे वेष्टीतसे ॥ ३७ ॥ मग वेष्टिलिया मोहर अंतीं ॥ दैवें फळें पक्वपणा येती ॥ मग तीं भक्षितां दुःखव्यावृत्तीं ॥ यमपुरी भोगावी ॥३८॥ मग तें शिवहळाहळाहूनि अधिक ॥ कीं महा उरगमुखींचें[६] विख ॥ मग प्राणहारक नव्हे सुख ॥ दुःखाचे परी सोशीतसे ॥ ३९ ॥ मग दुःखाचिये उपाधी ॥ शोधीत फिराव्या ज्ञानऔषधी ॥ तरी प्रथम पाऊल कृपानिधी ॥ भिवोनियां ठेवावें ॥ ४० ॥ तरी आतां योगद्रुमा ॥ चित्तीं निवटोनि विषयश्रमा ॥ सावधपणें योगक्षेमा ॥ चिंता मनीं विसरावी ॥ ४१ ॥ ऐसी विज्ञापना युक्तिप्रयुक्तीं ॥ करूनि तोषविला मच्छिंद्रयती ॥ तंव निवटूनि विषयभ्रांती ॥ विरक्तता उदेली ॥ ४२ ॥ मग म्हणे वो गोरक्षनाथा ॥ तूं जें बोललास तें यथार्था ॥ निकें न पहाती अशा वृत्ता ॥ भ्रष्टदैवा दिसेना ॥ ४३ ॥ तरी आतां असो कैसें ॥ जाऊं पाहूं आपुला देश ॥ ऐसें म्हणोनि करतळभाष[७] ॥ गोरक्षकातें दिधली ॥ ४४ ॥ कीं गंगाजळनिर्मळपण ॥ परी महीचे व्यक्तकरोन ॥ गढूळपणें पात्र भरून ॥ समुद्रातें हेलावे ॥ ४५ ॥ भाक देऊनि समाधान ॥ चित्तीं मिरवी गोरक्षनंदन ॥ मग गुरुशिष्य तेथून उठोन ॥ पाकशाळे पातले ॥ ४६ ॥ पाकशाळे करून भोजन ॥ करिते झाले उभयतां शयन ॥ किलोतळामेळें[८] मच्छिंद्रनंदन ॥ शयनीं सुगम पैं झाले ॥ ४७ ॥ झाले

१ चोर. २ सूर्य. ३ किरण. ४ चंद्र. ५ दुःखरूप नदी. ६ सर्पाच्या तोंडांतील. ७ वचन. ८ संगतीनें.

परी मच्छिंद्रनाथ ॥ किलोतळेतें सांगे वृत्तांत ॥ म्हणे मातें गोरक्षनाथ ॥ घेऊन जातो शुभानने ॥ ४८ ॥ जातो परी तव मोहिनी ॥ घोटाळीत माझे प्राणांलागुनी ॥ त्यातें उपाय न दिसे कामिनी ॥ काय आतां करावें ॥ ४९ ॥ येरी म्हणे तुम्ही न जातां ॥ कैसा नेईल कवणे अर्था ॥ मच्छिंद्र म्हणे मज सर्वथा ॥ वचनामाजी गोंविलें ॥ ५० ॥ विरक्तपणाच्या सांगोनि गोष्टी ॥ वैराग्य उपजविलें माझे पोटीं ॥ तया भाषे संतुष्टदृष्टी ॥ वचनामाजी गुंतलों ॥ ५१ ॥ तरी आतां काय उपाय ॥ सरला सर्वस्वीं करूं काय ॥ तुझा देखोनि विनय ॥ जीव होय कासाविस ॥ ५२ ॥ तरी आतां ऐक वचनीं ॥ उपाय आहे [१]नितंबिनी ॥ तुवांचि त्यातें ध्यावें मोहोनी ॥ बहुधा अर्थीकरोनियां ॥ ५३ ॥ येरी म्हणे जी प्राणनाथ ॥ म्यां उभविला उपायपर्वत ॥ परी तो न रोधी वज्रवंत ॥ विरक्तीतें मिरवी तो ॥ ५४ ॥ ऐसें असतां त्या प्रवाहीं ॥ उपाय मोहाचा चालत नाहीं ॥ मच्छिंद्र म्हणे करून पाहीं ॥ यत्न आणिक पुढारां ॥ ५५ ॥ ऐसें भाषण करितां उभयतां ॥ [३]निशा लोटली सर्वेही असतां ॥ उपाय मोहाचा चिंतन करितां ॥ गोरक्ष येऊन बोलतसे ॥ ५६ ॥ म्हणे माय वो ऐक वचन ॥ मज करूं वाटतें तीर्थाटन ॥ तरी मच्छिंद्रनाथा सवें घेऊन ॥ तीर्था आम्ही जातसों ॥ ५७ ॥ येरी म्हणे वत्सा ऐक ॥ तूं ज्येष्ठसुत माझा एक ॥ तूं वरिष्ठ अलोलिक ॥ मम मनीं ठसलासी ॥ ५८ ॥ कीं स्त्रिया राज्यसंपत्ती ॥ त्यांत तूं शोभसी नृपती ॥ आणि धाकटा बंधू धरून हातीं ॥ शत्रु जिंकशील वाटतसे ॥ ५९ ॥ तरी तूं सकळ राज्याचा धीर ॥ आम्ही उगलेंच सुख घेणार ॥ अन्नवस्त्राचा अंगीकार ॥ करूनी असों तव सदनीं ॥ ६० ॥ बा रे नाथाचा वृद्धापकाळ ॥ दिवसेंदिवस वाढतसे सबळ ॥ तैसें माझें शरीर विकळ ॥ दिवसेंदिवस होईल कीं ॥ ६१ ॥ मग आम्हां वृद्धांचें दीनपण ॥ हरील बा कोण तुझ्यावीण ॥ आणि धाकट्या बंधूचें संगोपन ॥ कोण करील तुजवांचुनी ॥ ६२ ॥ बाळा तुजवांचून मनाचें कोड ॥ कोण पुरवील तूं गेल्यापुढें ॥ मायेवांचून न ये रडें ॥ संगोपिता तूं अससी ॥ ६३ ॥ बा देवा रे आमुचा सकळ तिलक ॥ तूं अससी राजनायक ॥ तूं गेलिया आम्हीं भीक ॥ घरोघरीं मागावी ॥ ६४ ॥ तरी ऐसें विपत्तिकोडें ॥ मज न दाखवीं दृष्टीपुढें ॥ तरी मज योजून विहीरआडें ॥ लोटून मग जाईं पां ॥ ६५ ॥ ऐशा बोलतां रसाळ युक्ती ॥ परी न मोहे गोरक्ष चित्तीं ॥ जैसें मेघसिंचन झालिया [४]पर्वतीं ॥ अचळ भंगावीण तो ॥ ६६ ॥ ऐसें किलोतळेचें ऐकून वचन ॥ म्हणे माय तूं करिसी सत्य भाषण ॥ परी काय गे तूतें बोलून ॥ वैभव माझें दाखवावें ॥ ६७ ॥ तिहीं लोकीं गे चार खुंट ॥ आमुचें असे गे राज्यपट ॥ तूतें बोलाया अधिक वरिष्ठ ॥ काय स्त्रियांचें राज्य हें ॥ ६८ ॥ तरी माय वो आतां कैसें ॥ आम्ही जातों तीर्थावळीस ॥ तुम्ही स्वस्थ असून ग्रामास ॥ संपत्ती भोगा आपुली ॥ ६९ ॥ आम्हांसी काय संपत्ति कारण ॥ आमुची संपत्ति योगधारण ॥ [५]सुकृतक्रियाआचरण ॥ सुखसंपन्न

१ मोह. २ हे स्त्रिये. ३ रात्र. ४ निश्चळ पर्वत. ५ पुण्य कर्मे.

भोगावें ॥ ७० ॥ ऐसें निकट बोलून तीतें ॥ म्हणे आज्ञा द्यावी जी आम्हुतें ॥ येरी म्हणे जी एक मातें ॥ मम हेतू जाऊं नये ॥ ७१ ॥ चित्तीं विचारी किलोतळा ॥ परम दक्षतेनें या बाळा ॥ उपरी दाराविषय घालोनि गळां ॥ यत्नेंकरून अडकावूं ॥ ७२ ॥ हें योजून म्हणे जाणें तीर्थासी ॥ तरी एक बा अटक घालूं तुजसी ॥ इतुका संवत्सर मजपासीं ॥ वस्ती करून असावें ॥ ७३ ॥ येरी म्हणे ऐक माते ॥ षण्मास लोटले मज येथें ॥ आतां न राहें माते कल्पांतें ॥ तीर्थावळी जाणें कीं ॥ ७४ ॥ याउपरी बोले किलोतळा ॥ षण्मास तरी संगती द्यावी मला ॥ थोडकियासाठीं उतावेळा ॥ होऊं नको मम वत्सा ॥ ७५ ॥ मग मी समाधानेंकरून ॥ श्रीनाथ तुजसवें देऊन ॥ तीर्थावळीतें बोळवीन ॥ समारंभें पाडसा ॥ ७६ ॥ ऐसे बोलतां बोल रसाळ ॥ विवेकी ज्ञानतपोबाळ ॥ चित्तीं म्हणे षण्मास काळ ॥ आतां जाईल निघूनी ॥ ७७ ॥ मग अवश्य म्हणे तपोकीर्णी¹ ॥ षण्मास वस्ती करूं सदनीं ॥ परी अमुक दिन निश्चय करोनी ॥ ठेवीं आम्हां जावया ॥ ७८ ॥ तो दिवस आलियापाठीं ॥ आम्ही न वसूं महीतळवटीं ॥ मग यत्न केलिया तुम्हीं कोटी ॥ फोल माते होतील ॥ ७९ ॥ तरी आतां कोणता दिन ॥ दावीं माते निश्चयेंकरून ॥ येरी म्हणे ²प्रतिपदेकारण ॥ बोळवीन तुम्हांसी ॥ ८० ॥ मुहूर्त संवत्सरप्रतिपदेस ॥ मग न पुसतां कोणास ॥ तया दिनीं गमन तुम्हांस ॥ भोजन झालिया करवीन ॥ ८१ ॥ ऐसा निश्चय मैनाकिनी ॥ बोलून स्थिर केला भुवनीं ॥ पुढें कांहींएक दिवसांलागुनी ॥ गोरक्षातें पाचारी ॥ ८२ ॥ निकट बैसवून आपुलेजवळी ॥ अति स्नेहानें मुख कवळी ॥ म्हणे बा रे कामना मम हृदयकमळीं ॥ वेधली असे एक ॥ ८३ ॥ कामना म्हणशील तरी कोण ॥ ³स्नुषा असावी मजकारण ॥ तरी उत्तम ⁴दारा तुज निपुण ॥ करूं ऐसें वाटतें ॥ ८४ ॥ मग मी बाळा स्नुषेसहित ॥ काळ क्रमीत बैसेन येथ ॥ तों तुम्हीं करून यावें तीर्थ ॥ आपुलें राज्य सेवाया ॥ ८५ ॥ षण्मास बाळा येथें अससी ॥ अंगीकारीं मुख्य संबंधासी ॥ अंगीकारिलिया तव मानसीं ॥ मोह माझा उपजेल ॥ ८६ ॥ म्हणशील तरी विधिपूर्वक ॥ लग्न तुझें करीन ⁵निक ॥ परी मम चित्ताचें काम ⁶दोंदिक ॥ फेडशी इतुकें पाडसा ॥ ८७ ॥ गोरक्ष ऐसे बोल ऐकुनी ॥ म्हणतसे ऐका मम जननी ॥ म्यां कांता दोन गुरुकृपेनी ॥ वरिल्या आहेत जननीये ॥ ८८ ॥ वरिल्या आहेत तरी चांग ॥ नित्य भोगितों करून योग ॥ म्हणशील कवण नामीं सांग ॥ तरी कर्णमुद्रिका म्हणती त्यां ॥ ८९ ॥ तयां कांतांलागीं सोडून ॥ अन्य कांता न वरीं व्यभिचारीण ॥ हें योग्य नव्हे मजकारण ॥ गुरुभक्ती जननीये ॥ ९० ॥ ऐसें बोलतां गोरक्षनाथ ॥ किलोतळा बैसली स्वस्थचित्त ॥ म्हणे नाथ हा विरक्त ॥ कदा नातळे विषयातें ॥ ९१ ॥ यापरी लोटलिया त्या दिवशीं ॥ आणिका एके दिनीं परदेशीं ॥ एक ⁷शैली ⁸उत्तमराशी ॥ सेवेलागीं पाठविली ॥ ९२ ॥ भोजन झालिया रात्रीं निर्भर ॥ शैली संचरली तें मंदिर ॥

१ तपस्वी. २ चैत्र शुद्ध प्रतिपदेच्या दिवशीं, पाडव्याला. ३ सून. ४ स्त्री. ५ खरोखर. ६ मोठें. ७ दासी. ८ सुंदर.

अत्युत्तम सारीपाट करें ॥ कवळोनियां पातली ॥ ९३ ॥ सदनीं संचरतां बोलें वचन ॥ म्हणे हे गोरक्षनंदन ॥ मी सारीपाट करीं कवळून ॥ खेळावया आणिला कीं ॥ ९४ ॥ तरी खेळ खेळूं एकटभावें ॥ ऐसें उदेलें माझिया जीवें ॥ येरी म्हणे अवश्य यावें ॥ पूर्ण कामना करावया ॥ ९५ ॥ ऐसें म्हणतां नितंबिनी ॥ सारीपाट पसरून निकट येउनी ॥ परी द्यूत खेळतां शुभाननी ॥ नेत्रबाण खोंचीतसे ॥ ९६ ॥ खोंचीत परी विषयपर ॥ बोल बोलत अनिवार ॥ बोल नव्हे तें महावज्र ॥ तपपर्वत भंगीतसे ॥ ९७ ॥ ऐसे बोलत आणिक कर्णीं ॥ दाखवीतसे नितंबिनी ॥ मौळीचा चीरपदर काढुनी ॥ भूमीवरी सोडीतसे ॥ ९८ ॥ शृंगारव्यक्त नेत्रकटाक्ष ॥ तुकवोनि खेळ खेळे गोरक्ष ॥ खेळ खेळतां मग प्रत्यक्ष ॥ जाणूनि चीर सरसावी ॥ ९९ ॥ उघडी एकचि जानू करून ॥ दावी आपुलें नग्नपण ॥ परी तो विरक्त गौरनंदन ॥ विषयातें आतळेना ॥ १०० ॥ मग नाना संवाद नानास्तुती ॥ दावितां ती श्रमली युवती ॥ परी हा विरक्त कोणें अर्थीं ॥ आतळेना तियेतें ॥ १ ॥ मग ती आपुले चित्तीं श्रमोन ॥ राहती झाली दीनवदन ॥ किलोतळेतें वर्तमान ॥ सर्व सांगून गेलीसे ॥ २ ॥ यावरी किलोतळा संपत्तीसीं ॥ गोरक्षा दावी भलते मिसीं ॥ रत्नमुक्तमाणिकराशी ॥ शृंगारादि अचाट ॥ ३ ॥ परी दावून सहजस्थित ॥ म्हणे वत्सा हें तुझेंच वित्त ॥ चंद्रसूर्यअवधीपर्यंत ॥ भोगिसील पाडसा ॥ ४ ॥ ऐसें बोले किलोतळा ॥ परी हा न मळे आशामळा ॥ जेवीं मुक्ता लिंपिलिया काजळा ॥ श्वेतवर्ण सांडीना ॥ ५ ॥ ऐशा युक्तिप्रयुक्ती करितां ॥ निकट वृत्ति आली तत्त्वतां ॥ मग किलोतळेच्या मोहें चित्ता ॥ नित्य हुंबाडा येतसे ॥ ६ ॥ मीननाथ जवळ घेऊन ॥ नेत्रीं लोटलें अपार जीवन ॥ ती आणि शैल्यासेवकी पाहून ॥ दुःखी होती तैशाचि ॥ ७ ॥ मग त्या म्हणती वो माय स्वामिनी ॥ आम्ही मोहूं गोरक्षालागुनी ॥ तुम्ही चिंता कदापि मनीं ॥ आणूं नका महाराजा ॥ ८ ॥ ऐसें बोलून शैल्या युवती ॥ किलोतळेस समजाविती ॥ ऐसें बोलतां दिनव्यावृत्ती ॥ प्रतिपदा आली असे ॥ ९ ॥ मग त्या दिवशीं आनंदमहिमा ॥ गुढ्या उभारिल्या ग्रामोग्रामा ॥ परी शृंगाररूप प्रवाहोत्तमा ॥ मच्छिंद्रयोगी बुडाले ॥ ११० ॥ कैंचा आनंद कैंची पाकनिष्पत्ती ॥ कैंची गुढी शोकव्यावृत्ती ॥ सकळ ग्रामीं शैल्या युवती ॥ मच्छिंद्रयोगें हळहळल्या ॥ ११ ॥ एक म्हणती हा नाथ ॥ राज्यप्रकरणीं प्रतावंत ॥ उदार धैर्यपर्वत ॥ दयाळ आगळा मायेहुनी ॥ १२ ॥ एक म्हणती चांगुलपणा ॥ यापुढें उणीव वाटे मदना ॥ कनकासनीं सभास्थान ॥ अर्कासमान वाटतसे ॥ १३ ॥ एक म्हणती ऐसा पुरुष ॥ दैवें लाधला होता आम्हांस ॥ गोरक्ष विवसी आली त्यास ॥ घेऊन मेला जातसे ॥ १४ ॥ ऐशापरी बहुधा युक्तीं ॥ गोरक्षातें शिव्या देती ॥ अहो मच्छिंद्रअर्काप्रती ॥ राहुग्रह हा भेटला ॥ १५ ॥ एक म्हणती नोहे गोरक्षक ॥ आम्हां भेटला यम देख ॥ मोहपाश घालून प्रत्यक्ष ॥ मच्छिंद्र प्राण नेतसे ॥ १६ ॥ हा

१ हातांत घेऊन. २ वस्त्राचा पदर. ३ तरुणी. ४ उदक. ५ विशेष. ६ सूर्यासारखा.

कोणीकडोनि आला मेला ॥ कां आमुच्या देशासी आला ॥ मच्छिंद्र मांदुस घेऊनि चालला ॥ बलात्कारें तस्कर हा ॥ १७ ॥ एक म्हणती अदैव पूर्ण ॥ ऐसें लाधलें होतें स्थान ॥ त्या सुखास लाथ मारून ॥ जात आहे करंटा ॥ १८ ॥ काय करील अभाग्यपण ॥ घरोघरीं भीक मागून ॥ त्या तुकड्यांचें झालें स्मरण ॥ षड्रसान्न आवडेना ॥ १९ ॥ उत्तम चीर अन्न भूषण ॥ सांडून करील चिंध्या लेपन ॥ महाल माड्या नावडे सदन ॥ सेवील कानन अदैवी ॥ १२० ॥ ऐसें बहुधा बहुयुक्तीं ॥ बोलताती त्या युवती ॥ बोलून वियोगें आरंबळती ॥ मच्छिंद्र मच्छिंद्र म्हणोनी ॥ २१ ॥ ऐसेपरी सकळ ग्रामांत ॥ संचरलीसे विकळ मात ॥ येरीकडे गोरक्षनाथ ॥ कुबडी फावडी संयोगी ॥ २२ ॥ अंगीं लेवून कंथाभूषण ॥ माळा गळां दाट घालून ॥ सिंगी सारंगी करीं कवळून ॥ नाथापाशीं पातला ॥ २३ ॥ चरणीं अर्पूनियां भाळ ॥ म्हणे स्वामी आली वेळ ॥ उठा वेगीं उतावेळ ॥ गमन करावया मार्गांत ॥ २४ ॥ तें पाहून किलोतळा ॥ सबळ उदक आणीत डोळां ॥ म्हणे स्थिर होईं कां बाळा ॥ भोजन सारिल्या जाइंजे ॥ २५ ॥ मग पाक करूनि अति निगुतीं ॥ गुरुशिष्य बैसवून एक पंक्तीं ॥ वाढितां बोलती झाली युवती ॥ विचक्षण किलोतळा ॥ २६ ॥ म्हणे महाराज मच्छिंद्रनाथ ॥ तुम्ही जातां स्वदेशांत ॥ परी मीननाथ तुमचा सुत ॥ ठेवितां कीं संगें नेतां ॥ २७ ॥ नाथ म्हणे वो शुभाननी ॥ जैसें भावेल तुझिये मनीं ॥ तैसीच नीति आचरूनी ॥ मीननाथ रक्षूं गे ॥ २८ ॥ मग बोलती झाली किलोतळा ॥ तुम्हीं संगें न्यावें बाळा ॥ येथें रक्षण केउतें बाळा ॥ भुभुःकारीं होईल कीं ॥ २९ ॥ तुम्ही होतां निकट येथें ॥ म्हणऊनि भुभुःकार न बाधी त्यातें ॥ तुम्ही गेलिया कोण येथें ॥ रक्षण करील बाळाचें ॥ १३० ॥ आणिक एक घेत लक्ष ॥ मातें शापिलें वसु उपरिईशें ॥ तुमचा पिता जो प्रत्यक्ष ॥ वीर्यसंघ आराधिला ॥ ३१ ॥ तयाचा विचक्षण सबळ शाप ॥ मीं सोडिलें सिंहलद्वीप ॥ त्या शापाचें पूर्ण माप ॥ भरून आलें महाराजा ॥ ३२ ॥ तरी उःशापाचा समय आला आतां ॥ फळास येईल तुम्ही जातां ॥ उपरिचर वसू तुमचा पिता ॥ येऊन नेईल मजलागीं ॥ ३३ ॥ मग बाळाचें संगोपन ॥ कोण करील मायेवीण ॥ यातें जरी न्यावें स्वर्गाकारण ॥ मनुष्यदेह न येचि ॥ ३४ ॥ तरी सांगाया हेंचि कारण ॥ मीननाथ सवें नेणें ॥ मग अवश्य म्हणे मच्छिंद्रनंदन ॥ भोजन करून उठले ॥ ३५ ॥ किलोतळाही भोजन करूनी ॥ मीननाथाकडे पाहुनी ॥ बोल न निघे तिचे वदनीं ॥ परी हृदयीं डोंब पाजळला ॥ ३६ ॥ मच्छिंद्रमोहाच्या स्नेहेंकरून अपार ॥ अनिवार मोहाचे वैश्वानर ॥ पेट घेतां शिखेपर ॥ दुःख आकाशीं प्रगटलें ॥ ३७ ॥ मोह उचंबळोनि अत्यंत चिंता ॥ नेत्रीं लोटली अश्रुसरिता ॥ तें पाहूनियां शैल्या समस्ता ॥ गोरक्षातें वेष्टिती ॥ ३८ ॥ म्हणती गोरक्षा ऐक वचन ॥ करूं नको रे कठिण मन ॥ मच्छिंद्र आमुचा घेऊनि प्राण ॥ जाऊं नको महाराजा ॥ ३९ ॥ पहा पहा सुख-

१ द्रव्याची ठेव. २ वस्त्र. ३ पुष्कळ. ४ जवळ. ५ संरक्षण. ६ दुःखज्वाला. ७ अग्नि.

संपत्ती ॥ राज्यवैभव केवीं गती ॥ ऐशा टाकून स्वसुखाप्रती ॥ कानन सेवूं नको रे ॥ १४० ॥ महाल मुलुख तुज हस्ती ॥ अश्व फिरणें चातकगती ॥ हें सुख टाकून राज्यसंपत्ती ॥ कानन सेवूं नको रे ॥ ४१ ॥ महाल मुलुख तुज स्वाधीन ॥ प्रजालोकादि करिताती नमन ॥ ऐसा टाकून बळमान ॥ कानन सेवूं नको रे ॥ ४२ ॥ हिरे रत्नें माणिक मोतीं ॥ परम तेजस्वी नक्षत्रज्योती ॥ स्वीकारूनि भूषणाप्रती ॥ सुखसंपत्ती भोगावी ॥ ४३ ॥ आम्ही झालों तुमच्या दासी ॥ नित्य आचरूं सेवेसी ॥ रतिसुखासी नटूं तैसें ॥ हें सुखसंपन्न भोगीं कां ॥ ४४ ॥ कला कुशला विद्या सांग ॥ सभेस्थानीं रागरंग ॥ ऐसे टाकून प्रेमभोग ॥ कानन सेवूं नको रे ॥ ४५ ॥ जरी जरतारी दीपती चीर ॥ परिधानीं कीं इच्छापर ॥ ऐशिया सुखा करीं निर्धार ॥ कानन सेवूं नको रे ॥ ४६ ॥ जडितरत्न हेमशृंगार ॥ भूषणीक मनोहर ॥ ऐसें टाकून सुख मनोहर ॥ कानना जाऊं नको रे ॥ ४७ ॥ चुवा चंदन अर्गजा गंध ॥ अंगीं चर्चूं आम्ही प्रसिद्ध ॥ ऐसें टाकून सुखवृंद ॥ कानना जाऊं नको रे ॥ ४८ ॥ कनकासनीं विराजमान ॥ दिससी जैसा सहस्रनयन ॥ ऐशा सुखाचा त्याग करून ॥ कानना जाऊं नको रे ॥ ४९ ॥ द्रव्यराशी अमूप[३] भांडार ॥ भरले असती अपरंपार ॥ किल्ले कोट टाकून सुंदर ॥ कानन सेवूं नको रे ॥ १५० ॥ ऐशा सुखाची उत्तम जाती ॥ टाकून जासी दुःखव्यावृत्ती ॥ महीं भ्रमण [४]काननक्षितीं ॥ दुःख अपार आहे रे ॥ ५१ ॥ शालदुशाल भूषणमाळा ॥ टाकून घेसी दुःख कशाला ॥ सांडून षड्रस अन्ना विपुला ॥ कंदमूल खाशील ॥ ५२ ॥ उंच आसन मृदु कैसें ॥ मंचकीं शय्या कुसुमकेश ॥ तें टाकून महीस ॥ लोळसील काननीं ॥ ५३ ॥ तरी गोरक्षा मनुष्यदेहीं ॥ वृत्ती आणीं विवेकप्रवाहीं ॥ राज्यासनाचें सुख घेईं ॥ सकळ मही भोगीं कां ॥ ५४ ॥ अरे या देशीं शत्रुभय ॥ अन्य राजाचें नाहीं भय ॥ ऐसें स्थान आनंदमय ॥ तरी सकळ मही भोगीं ॥ ५५ ॥ ऐसें बहुतांपरी उपदेशीं ॥ दाविती तया सुखासी ॥ परी विरक्त स्वचित्तेंसीं ॥ आशेलागीं आतळेना ॥ ५६ ॥ मग धिक्कारूनि सकळ युवती ॥ म्हणे आम्हां कासया व्हावी संपत्ती ॥ प्राण टाकोनि शवाहातीं ॥ तुम्हीच मिरवा जगीं हो ॥ ५७ ॥ अगे आम्हांस वोढण शयनवसनीं ॥ वरतें आकाश खालीं मेदिनी ॥ शयन करितों योगधारणीं ॥ [७]अलक्षीं लक्ष लावूनियां ॥ ५८ ॥ ऐसी बहुतां नीतीं तयेसी वाणी ॥ म्हणे दूर लंडी गौडबंगालिणी ॥ ऐसें म्हणोनि तये अवनीं ॥ पाऊल ठेविता पैं झाला ॥ ५९ ॥ मग किलोतळेतें करून नमन ॥ स्कंधीं वाहिला मच्छिंद्रनंदन ॥ श्रीमच्छिंद्र सवें घेऊन ॥ ग्रामाबाहेर पैं आला ॥ १६० ॥ परी किलोतळेनें गोरक्षकासी चोरून ॥ कनकवीट आणिली भांडारांतून ॥ मच्छिंद्रनाथाकरीं अर्पोन ॥ भस्मझोळींत टाकिली ॥ ६१ ॥ परी मच्छिंद्राच्या मोहेंकरून ॥ घोंटाळित पंचप्राण ॥ नेत्रीं अपार अश्रुजीवन ॥ मोहें नयन वर्षत ॥ ६२ ॥ मग गांवाबाहेर मैनाकिनी ॥ माथा ठेवी नाथाचे

१ पूर्ण. २ अनेक सुखें. ३ पुष्कळ. ४ अरण्यांत. ५ पलंगावर. ६ पृथ्वी. ७ आत्मस्वरूपीं.

चरणीं ॥ गोरक्ष हृदयीं कवळोनी ॥ निरवीतसे तयातें ॥ ६३ ॥ म्हणे वत्सा माझे नाथा ॥ घेऊन जासील अन्य देशांत ॥ परी क्षुधा तृषा जाणोनि यातें ॥ सुख देईं पाडसा ॥ ६४ ॥ बा रे अशक्त मच्छिंद्रनाथ ॥ दिधलासे तुझिये हातांत ॥ योजन अर्धयोजन महीतें ॥ सुख देईं पाडसा ॥ ६५ ॥ बा रे मच्छिंद्र शांतीचा अचळू ॥ परी फारचि असे अति भुकाळू ॥ तरी मच्छिंद्राचा क्षुधानळू ॥ बाळा-समान जाण रे ॥ ६६ ॥ जैसें मीननाथाचें लहानपण ॥ त्याच रीतीं मच्छिंद्रातें मान ॥ हे उभयतां आहेत क्षीण ॥ तुझे ओटींत वाहिले ॥ ६७ ॥ यापरी तूतें सांगूं किती ॥ तूं जेथें अससी बा सर्वज्ञमूर्ती ॥ सच्छिष्य असें तूतें म्हणती ॥ कारण भक्ती पाहोनी ॥ ६८ ॥ ऐसें वदोनि किलोतळा ॥ मिठी घाली गोरक्षगळां ॥ म्हणे बा रे तूतें वेळोवेळां ॥ निरवितें जीवीं धरीं बा ॥ ६९ ॥ ऐसें म्हणोनि हंबरडा फोडीत ॥ परम अट्टहास्यें शब्द करीत ॥ म्हणे आतां कैसा नाथ ॥ निजडोळां देखेन मी ॥ १७० ॥ ऐसी मोहाची उभवी वार्ता ॥ तें गोरक्षक पाहोन म्हणे चित्ता ॥ वेगें निघावें नातरी ममता ॥ मच्छिंद्रातें दाटेल ॥ ७१ ॥ मग श्रीगुरूचा धरोनि हात ॥ लगबगें चालिला गोरक्षनाथ ॥ पाउलापाउलीं दुरावत ॥ तों तों आरंबळे किलोतळा ॥ ७२ ॥ पालथा[१] घालोनि पर्वत ॥ अदृश्य झाले तिन्ही नाथ ॥ मग किलोतळा मस्तक महीप्रत[३] ॥ आपटीतसे तेधवां ॥ ७३ ॥ गायीसमान हंबरडा[२] मारीत ॥ हस्तें वक्षःस्थळ पिटीत ॥ म्हणे आतां मच्छिंद्रनाथ ॥ दृष्टीं कैसा पडेल ॥ ७४ ॥ ऐसा मच्छिंद्र गुणी ॥ सदा शांत म्हातारपणीं ॥ दयाब्धि कृपानिधि पूर्ण ॥ कोठें पाहूं मच्छिंद्रा ॥ ७५ ॥ म्हणे बाई गे शैचीनाथ[४] ॥ तैसा आपणांमाजी मिरवत ॥ ऐसा स्वामी दयावंत ॥ कोठें पाहूं निजदृष्टीं ॥ ७६ ॥ अहा मज कृपणाचें धन ॥ गोरक्षतस्करें नेलें चोरून ॥ आतां नाथें कठीण मन ॥ कैसें केलें मजविषयीं ॥ ७७ ॥ अहा मज वत्साचें अब्धिजीवन ॥ गोरक्षघन गेला गिळोन ॥ कीं मज अंधाची काठी हिरोन ॥ गोरक्षक निर्दयें नेली गे ॥ ७८ ॥ आतां जावोनि मंदिरांत ॥ काय कोठें पाहों नाथ ॥ दाही दिशा ओस मातें ॥ वाटताती साजणी ॥ ७९ ॥ सभेस्थानीं कनकासनीं ॥ जेवीं बैसला दिसे तरणी[५] ॥ आतां तें आसन वसन पाहोनी ॥ पाठी लागेल गे माये ॥ १८० ॥ अगे राजवैभव सकळ भार ॥ मातें वाटतें ओस नगर ॥ आतां माझा नाथ मच्छिंद्र ॥ कैं[६] पाहीन निजदृष्टीं ॥ ८१ ॥ ऐसा हा मच्छिंद्रपुरुष ॥ कोठें हिंडतां न देखों देश ॥ अति स्नेहाळू माया विशेष ॥ मायेहूनि पाळीतसे ॥ ८२ ॥ बाई गे बाई निजतां शयनीं ॥ काय सांगूं तयाची करणी ॥ तीन वेळां मज उठवोनी ॥ तान्हेलीस म्हणतसे ॥ ८३ ॥ मग आपुले करीं उदकझारी ॥ लावी माझिये मुखपात्रीं ॥ उदक पाजोनि कृपागात्रीं ॥ जठर माझें चापीतसे ॥ ८४ ॥ रिक्तँ[७] जठर लागतां त्यातें ॥ म्हणे अससी क्षुधाक्रांत ॥ मग पाचारोनि परिचारिकेतें[८] ॥ बळेंच भोजन घालीतसे ॥ ८५ ॥ ऐशिया मोहाची दयाकोटी ॥ वागवीत होता आपुले पोटीं ॥ अति निर्दय होवोनि शेवटीं ॥

१ पर्वत. २ मोठ्यानें हांका मारी. ३ जमिनीवर. ४ इंद्र. ५ सूर्य. ६ केव्हां. ७ रिकामें. ८ दासीला.

कैसा सोडून पैं गेला ॥ ८६ ॥ ऐसें बोलोनि वागुत्तर ॥ मस्तक आपटिलें महीवर ॥ मुखीं मृत्तिका वारंवार ॥ घालोनि हंबरडा फोडीतसे ॥ ८७ ॥ ऐशिया दुःखाची सबळ कहाणी ॥ उपरिचरवसूच्या पडली कानीं ॥ मग तो विमानीं बैसोनी ॥ तियेपाशीं पातला ॥ ८८ ॥ विमान ठेवोन तये अवनीं ॥ निकट पातला कृपेंकरूनी ॥ निकट येतां धरिला पाणी ॥ म्हणे पापिणी हें काय ॥ ८९ ॥ तूं स्वर्गवासिनी शुभाननी ॥ येथें आलीस शापेंकरोनी ॥ तें शापमोचन गे येथोनी ॥ झालें आहे सुख मानीं कां ॥ १९० ॥ मग करें कुरवाळोनि किलोतळा ॥ धरिता झाला हृदयकमळा ॥ अश्रु डोळां पुसोनि ते वेळां ॥ सदनामाजी आणीतसे ॥ ९१ ॥ सदना आणून ते युवती ॥ बोधिता झाला नाना युक्तीं ॥ तो बोध असे भक्तिसारग्रंथीं ॥ पुढले अध्यायीं ऐकावा ॥ ९२ ॥ भक्तिसार उत्तम ग्रंथ ॥ ऐकतां होय पुण्यवंत ॥ तरी श्रोते देऊनि चित्त ॥ ग्रंथ आदरें ऐकावा ॥ ९३ ॥ नरहरिवंशीं धुंडीसुत ॥ अनन्य तुम्हां शरणागत ॥ मालू ऐसें नाम देहातें ॥ संतकृपेनें व्यापिलें ॥ ९४ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ग्रंथ ॥ स्वयें बोलिला पंढरीनाथ ॥ सदा संतसज्जन परीसोत ॥ ईश्वरकृपेंकरोनियां ॥ ९५ ॥ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ एकविंशतितमाध्याय गोड हा ॥ १९६ ॥ ॥ श्रीगोपालकृष्णार्पणमस्तु ॥ अध्याय ॥ २१ ॥ ओव्या ॥ १९६ ॥

१ त्या ठिकाणीं. २ शापाचा शेवट.

॥ नवनाथभक्तिसार एकविंशतितमाध्याय समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी कमळाकांता ॥ कमळनाभा कमलोद्भवपिता ॥ कमळपत्राक्षा दुःखहर्ता ॥ पुढें ग्रंथ रसाळ बोलवीं ॥ १ ॥ भक्तिसारग्रंथ हा रत्न ॥ बोलवीं श्रोत्यांकारण ॥ मागिले अध्यायीं गोरक्षनंदन ॥ मच्छिंद्र घेऊनि गेला असे ॥२॥ नेला तरी किलोतळा ॥ बुडालीसे शोकाब्धिजळा ॥ तैं उपरिचरवसू[1] तरणिआगळा ॥ काढावया पातला ॥ ३ ॥ स्थावरबोधाची बांधूनि सांगडी ॥ शोकाब्धींत घातली उडी ॥ शब्दार्थीं मारुनी बुडी ॥ धैर्यकासे धरियेलें ॥ ४ ॥ धरिल्यावरी बाहेर काढुनी ॥ म्हणे माय वो सावधानी ॥ शोक सांडीं अशाश्वत गेहनीं[2] ॥ शाश्वत नाहीं कांहींच ॥ ५ ॥ पाहतेपणीं जें जें दृश्य ॥ तें आभासपणीं पावे नाश ॥ तूं शोक करिसी शब्दप्राप्तीस ॥ श्लाघ्य तूतें लागेना ॥ ६ ॥ तूं कोठील मच्छिंद्र कोण ॥ स्वर्गभूमीचा झाला संगम ॥ योग तितुका भोगकाम ॥ सरूनि गेला जननीये ॥ ७ ॥ तूं अससी स्वर्गवासिनी ॥ मच्छिंद्र स्तविला जन्मोनी ॥ परी प्रारब्धें सहजयोगेंकरूनी ॥ गांठी पडली उभयतां ॥ ८ ॥ पडली परी मच्छिंद्रनाथ ॥ स्मरोनि गेला आपुलें हित ॥ तूं आपुलें स्वहित निश्चित ॥ सांभाळीं कीं जननीये ॥ ९ ॥ तूं झालीस पदच्युत ॥ तरी तें सांभाळीं निश्चित ॥ तरी आतां मानूनि व्यक्त ॥ होऊनि चाल जननीये ॥ १० ॥ तूं पातलिया सिंहलद्वीप ॥ मग मच्छिंद्रयोगें स्थावरकंदर्प ॥ पूर्ण होईल शुद्धसंकल्प ॥ मच्छिंद्र दृष्टी पाहूनियां ॥ ११ ॥ द्वादश वर्षें झालिया पूर्ण ॥ तूतें भेटवीन मच्छिंद्रनंदन ॥ मीननाथादि तपोधन ॥ गोरक्ष दृष्टीं पाहसील तूं ॥१२॥ म्हणशील यावया मच्छिंद्रनंदन ॥ काय पडेल त्याकारण ॥ सिंहलद्वीपीं पाकशासन[3] ॥ महामख[4] आरंभील ॥१३॥ तेव्हां विष्णु विरिंचि[5] रुद्र[6] ॥ तया स्थानीं येती भद्र ॥ सकळ देवादिक मित्र चंद्र ॥ एका ठायीं मिळतील ॥ १४ ॥ ते नवनाथादि प्रतापवंत ॥ ऐक्य करील शचीनाथ[3] ॥ गहिनी गोपीचंद भर्तरीसहित ॥ एक्या ठायीं मिळतील ॥ १५ ॥ तरी आतां शोक कां व्यर्थ ॥ सांडीं प्रांजळ करीं चित्त ॥ विमानारूढ होऊनि त्वरित ॥ सिंहलद्वीपीं चाल कीं ॥ १६ ॥ ऐसें ऐकोनि मैनाकिनी ॥ महाराजा श्वशुरप्राज्ञी ॥ द्वादशवर्षें मच्छिंद्र नयनीं ॥ दावीन ऐसें म्हणतसां ॥ १७ ॥ तरी मखमंडप पाकशासन ॥ करो अथवा न करो पूर्ण ॥ जरी मज दावाल मम नंदन ॥ तरी मज भाँष्य[7] द्यावी कीं ॥ १८ ॥ भाष्य दिधल्या अंतरपुटीं ॥ विश्वासरत्न रक्षीन पोटीं ॥ मग हे शोक दरिद्रपाठीं ॥ चित्त सांडील महाराजा ॥ १९ ॥ ऐसें बोलतां मैनाकिनी ॥ श्वशुर हास्य करी आननीं ॥ मग करतळभाष्य देउनी ॥ संतुष्ट केलें सुनेतें ॥ २० ॥ यावरी बोले किलोतळा ॥ मातें नेतां स्वर्गमंडळा ॥ परी नृपपणीं या स्थळा ॥ कोणालागीं स्थापावें ॥ २१ ॥ येरू म्हणे ऐक वचन ॥ सर्वे सेवेसी आहेत क्रियावान ॥ दैर्भामा उत्तम नामानें ॥ राज्य तीतें ओपीं कां ॥ २२ ॥ मग अवश्य म्हणे मैनाकिनी ॥ दैर्भामा राज्यासनीं ॥ बैसविली अभिषेक करूनी ॥ राज्यपदीं तेधवां ॥२३॥ राज्यीं ओपुनी दैर्भामा ॥

१ सूर्याहून विशेष. २ अरण्यांत. ३ इंद्र. ४ मोठा यज्ञ. ५ ब्रह्मदेव. ६ शंकर. ७ भाक, शपथ.

मिळती झाली विमानसंगमा ॥ परी सकळ देशींच्या शैल्या रामा ॥ शोकाकुळ झाल्या कीं ॥ २४ ॥ म्हणती माय वो शुभाननी ॥ तुम्ही जातां आम्हांस टाकुनी ॥ आम्हां पाडसांची हरिणी ॥ दयाळ माय असती तूं ॥ २५ ॥ असो ऐशा बहुधा शक्ती ॥ शैल्या शोकाकुलित होती ॥ मग तितुक्यां समजाउनी युक्तीं ॥ विमानयानीं आरूढली ॥ २६ ॥ दैर्भामेस नीतिप्रकार ॥ सांगून युक्ती समग्र ॥ यथासमान प्रजेचा भार ॥ सांभाळीं कां साजणीये ॥ २७ ॥ जेथील तेथें हित फार ॥ तैसें केलें गोचर ॥ मग विमानीं आपण सश्वशुर ॥ स्वर्गमार्गें गमताती ॥ २८ ॥ असो विमान पावे द्वीपाप्रती ॥ पदा स्थापिली ते युवती ॥ मग तो उपरिचर सहजगती ॥ आपुल्या स्थाना पैं गेला ॥ २९ ॥ जैसीं दिनखेळमेळें ॥ चरूं जाती पक्षिकुळें[1] ॥ येरी होतां सायंकाळें ॥ आपुल्या स्थाना सेविती ॥ ३० ॥ त्याच न्यायें उपरिदक्षें ॥ आणिली किलोतळा पद्मिनी प्रत्यक्ष ॥ शापमोचन सायंकाळास ॥ स्थाना पावली आपुल्या ॥ ३१ ॥ कीं अब्धीचें अपार जीवन[2] ॥ व्यापी महीतें मच्छमुखानें ॥ परी तें पुन्हां सरिताओघानें[3] ॥ ठायींचे ठायीं जातसे ॥ ३२ ॥ त्याचिया न्यायें स्नुषा श्वशुर ॥ पावते झाले स्वस्थानावर ॥ परी तैं इकडे नाथ मच्छिंद्र ॥ गौडबंगालीं पातला ॥ ३३ ॥ मीननाथ स्कंधीं वाहून ॥ मार्गावरी करिती गमन ॥ तों शैल्यदेशसीमा उल्लंघून ॥ गौडबंगालीं पातले ॥ ३४ ॥ मार्गीं लागतां ग्राम कोणी ॥ त्या ग्रामांत संचरोनी ॥ गोरक्ष भिक्षा आणी मागुनी ॥ उदरापुरती तिघांच्या ॥ ३५ ॥ ऐसेपरी निर्वापण[4] ॥ मार्गीं करिताती गमन ॥ तों कौलबंगाला सांडून ॥ गौडबंगालीं पातले ॥ ३६ ॥ मार्गीं चालतां सहजस्थितीं ॥ तों कानिफा पूर्वीं भेटला तयांप्रती ॥ तेथें पातल्या त्रिवर्गमूर्ती ॥ गमन करितां मार्गातें ॥ ३७ ॥ तेथें येतांच गोरक्ष जेठी ॥ स्मरण झालें तयाचे पोटीं ॥ कीं अच्युतवृक्षापुटीं ॥ कानिफाची भेटी झालीसे ॥ ३८ ॥ झाली परी हें उत्तम स्थान ॥ महायशस्वी पुण्यवान ॥ मातें दाविले श्रीगुरूचे चरण ॥ जैसे चुकल्या वत्सासी ॥ ३९ ॥ प्रत्यक्ष माझी मच्छिंद्रराणी ॥ गेली होती आदिपट्टराणी ॥ मी पाडस रानोरानीं ॥ निढळ्यावाणी[5] लागतसें ॥ ४० ॥ कीं मज वत्साची माउली ॥ सहज रानीं चरावया गेली ॥ शैल्या व्याघ्रें आव्हाटिली ॥ ती भेटविली रायानें ॥ ४१ ॥ मग स्कंधीं होता नाथ मीन ॥ तयालागीं महीं ठेवून ॥ दृढ पायीं केलें नमन ॥ नेत्रीं अश्रु लोटले ॥ ४२ ॥ तें पाहून मच्छिंद्रनाथ ॥ बोलता झाला गोरक्षातें ॥ म्हणे बाळा अश्रुपात ॥ निजचक्षूंसी कां आले ॥ ४३ ॥ ऐसें बोलतां मच्छिंद्रनंदन ॥ मग सकळ दुःखाचें मंडण ॥ तें गोरक्षचित्तीं प्रविष्ट होऊन ॥ नेत्रीं नीर[6] अपार लोटलें ॥ ४४ ॥ सांगूं जातां मुखानें ॥ तों कंठ आलासे भरून ॥ मग क्षण एक तया स्थानीं बैसून ॥ स्थिर चित्त पैं केलें ॥ ४५ ॥ जैसें आकाशीं अभ्र दाटतां ॥ पुन्हा निर्मळ होय तत्त्वतां ॥ तैसें दुःख मोहचिंता ॥ टाकूनि निर्मळ पैं केलें ॥ ४६ ॥ मग बदरिकाश्रमापासून कथन ॥



१ पक्ष्यांचे समूह. २ पाणी. ३ नदीच्या ओघानें. ४ निर्वाह. ५ दीन होऊन. ६ अश्रूंचें पाणी.

दुःखव्यावृत्ति अति गहन ॥ कानिफाभेटीपर्यंत वदून ॥ ठाव यशस्वी म्हणतसे ॥ ४७ ॥ याच ठायीं कानिफाभेटी ॥ झाली मातें कृपाजेठी ॥ तुमची शुद्धी तद्वाग्वटीं ॥ येथेंचि लाधली महाराजा ॥ ४८ ॥ तरी हें स्थान पुण्यवान ॥ तुमचे दाविले मज चरण ॥ तरी हें स्थान धनवंत पूर्ण ॥ चुकलें धन मज दिधलें ॥ ४९ ॥ दुःखसरिते प्रवाहें वेष्टी ॥ बुडतां वांचविलें देऊन पृष्ठी ॥ कीं दुःखव्याघ्राच्या आसडून होटीं ॥ माये भेटी केली असे ॥ ५० ॥ कीं तुमचा वियोग प्रळयानळ ॥ तयांत मी पडलों होतों बाळ ॥ परी जागा नोहे हा घन शीतळ ॥ मातें झाला महाराजा ॥ ५१ ॥ कीं तुमचा वियोगकृतांतपाश ॥ लागला होता मम कंठास ॥ परी जागा नोहे हा सुधारस ॥ मज भेटला महाराजा ॥ ५२ ॥ ऐसें म्हणोनि वारंवार ॥ नेत्रीं लोटती अश्रुपूर ॥ परम कनवाळू नाथ मच्छिंद्र ॥ हृदयीं धरी गोरक्षा ॥ ५३ ॥ मुख कुरवाळून आपुले हस्तें ॥ सच्छिष्याचे अश्रु पुसीत ॥ मनांत म्हणे हा भाग्यवंत ॥ गुरुभक्त एकचि हा ॥ ५४ ॥ मग गोरक्षाचें समाधान ॥ करूनियां मच्छिंद्रनंदन ॥ मग मीननाथा कडे घेऊन ॥ ऊठ वत्सा म्हणतसे ॥ ५५ ॥ पुढें मार्गीं करितां गमन ॥ जालिंदराचें वर्तमान ॥ सांगता झाला गोरक्षनंदन ॥ श्रीमच्छिंद्राकारणें ॥ ५६ ॥ गौडबंगाल हेळापट्टण ॥ तुमचा गुरू जालिंदर पूर्ण ॥ नाथपंथीं हा अनुग्रहकारण ॥ श्रीदत्ताचा मिरवतसे ॥ ५७ ॥ तो महाराज योगभ्रष्ट ॥ पावला आहे महाकष्ट ॥ गोपीचंदें करून अनिष्ट ॥ महीगर्तीं घातला ॥ ५८ ॥ मुळापासून सकळ कथन ॥ मच्छिंद्रा केलें निवेदन ॥ परी नाथ मच्छिंद्र तें ऐकून ॥ चित्तीं परम क्षोभला ॥ ५९ ॥ म्हणे ऐसा राजा आहे नष्ट ॥ तरी आतां करीन त्याचें तळपट ॥ नगरी पालथी घालीन सुघट ॥ महीपालथा मिरवीन तो ॥ ६० ॥ ऐसें बोलोन विक्षेप चित्तीं ॥ पुढें मार्गें परमगतीं ॥ एकदोन मुक्काम साधिती क्षितीं[३] ॥ हेळापट्टणीं पातले ॥ ६१ ॥ ग्रामानिकट ग्रामस्थ भेटती ॥ त्यांतें वृत्तांत विचारीत जाती ॥ ते म्हणती कानिफा येऊनि क्षितीं ॥ मुक्त केलें जालिंदरा ॥ ६२ ॥ राया गोपीचंदा अनुग्रह देउनी ॥ जगीं मिरवला अमरपणीं ॥ तेणें गुरुदीक्षा घेउनी ॥ तपालागीं तो गेला ॥ ६३ ॥ राया मुक्तचंदा[४] स्थापून ॥ राज्यपदीं राज्यासन ॥ देऊनियां अग्निनंदन[५] ॥ तोही गेला षण्मास ॥ ६४ ॥ सकळ कथा मुळाहूनी ॥ मच्छिंद्रास सांगितली ग्रामस्थांनीं ॥ तें मच्छिंद्राचे पडतां श्रवणीं ॥ शांतपणीं मिरवला ॥ ६५ ॥ जैसी प्रळयानळावरती ॥ घनवृष्टीची होय व्यक्ती ॥ मग सकळ उबाळा पाहून अती ॥ अदृश्य होय पावक[६] तो ॥ ६६ ॥ कीं साधक पातला असतां ॥ कीं श्रीगुरूचा संसर्ग होतां ॥ होतांचि सिद्धकाची व्यथा ॥ नासून जाय ते क्षणीं ॥ ६७ ॥ कीं तम[७] ढिसाळ दाटल्या अवनीं ॥ उदय होतांचि वासरमणी[८] ॥ मग सकळ तम नाश पावूनी ॥ दिशा मिरविती उजळल्या ॥ ६८ ॥ तन्यायें मच्छिंद्रसंताप ॥ ग्रामस्थ बोलतां झाला लोप ॥ शांती वरूनि मोहकंदर्प ॥ चित्तामाजी द्रवलासे ॥ ६९ ॥

---

१ त्याच्या तोंडून. २ सहज. ३ पृथ्वीवर. ४ गोपीचंदाचा मुलगा. ५ जालिंदर. ६ अग्नि. ७ काळोख. ८ सूर्य.

यापरी तो मच्छिंद्रनंदन ॥ ग्रामस्थां विचारी मुख्यत्वेंकरून ॥ अधिकारी राज्यनिपुण ॥ कोण आहे प्राज्ञिक तेथें ॥ ७० ॥ येरी म्हणती योगद्रुमा ॥ श्रेष्ठ करणिका राजउगमा ॥ मैनावती शुभानना ॥ प्राज्ञिकवंत मिरवतसे ॥ ७१ ॥ त्या मातेनें अर्थ धरून ॥ पुत्र मिरविला जी अमरपणें ॥ तुष्ट करोनि जालिंदरमन ॥ अमर झाली आपणही ॥ ७२ ॥ ऐसें बोलतां ग्रामस्थ युक्तीं ॥ मनांत म्हणे मच्छिंद्र यती ॥ ऐसी प्राज्ञिक आहे सती ॥ भेटी घ्यावी तियेची ॥ ७३ ॥ ऐसिये धृती चित्तीं कल्पून ॥ चालते झाले त्रिवर्गजन ॥ ग्रामद्वारा शीघ्र येऊन ॥ द्वाररक्षका सांगती ॥ ७४ ॥ म्हणती जालिंदर जो प्रज्ञावंत ॥ तयाचा सहोदर मच्छिंद्रनाथ ॥ ग्रामद्वारीं आहे तिष्ठत ॥ जाऊनि सांगा सतीसी ॥ ७५ ॥ अहो अहो द्वारपाळ ॥ सांगा चला उतावेळ ॥ मैनावती लक्षून सकळ ॥ वृत्तांत तियेतें निवेदा ॥ ७६ ॥ ऐसें द्वारपाळ ऐकून ॥ मच्छिंद्रा करिते झाले नमन ॥ म्हणती महाराजा आज्ञा प्रमाण ॥ श्रुत करूं सतीसी ॥ ७७ ॥ म्हणती महाराज मच्छिंद्रजती ॥ जालिंदरसहोदर म्हणवितो क्षितीं ॥ तो येऊन ग्रामद्वाराप्रती ॥ तिष्ठत आहे महाराजा ॥ ७८ ॥ ऐसें ऐकून मैनावती ॥ म्हणे कैसी वृत्ती कैसी स्थिती ॥ कैसी आहे भूषणव्यक्ती ॥ अभ्यासानभ्यास दीक्षेतें ॥ ७९ ॥ येरी म्हणे जी महाराजा ॥ कनककांती[2] तेजःपुंजा ॥ बालार्ककिरणीं[3] विजयध्वजा ॥ आम्हांलागीं दिसतसे ॥ ८० ॥ माय वो आम्हां दिसतो ऐसा ॥ कीं न पावला योनिसंभवसा ॥ अवतारदीक्षे स्वर्गवासा ॥ करील जनां वाटतसे ॥ ८१ ॥ शैली कंथा लेऊनि भूषण ॥ शिंगी सारंगीं समागम ॥ कुबडी फावडी करीं कवळून ॥ उभा द्वारीं असे तो ॥ ८२ ॥ आणिक एक सच्छिष्य त्यासी ॥ संग्रहीं आहे सुखसेवेसी ॥ परी तो शिष्यासमान अभ्यासी ॥ आम्हांलागीं भासतसे ॥ ८३ ॥ धृति वृत्ति दीक्षेलागून ॥ ज्ञानवैराग्यस्वरूपवान ॥ आम्हांलागीं समसमान ॥ गुरुशिष्य वाटती ॥ ८४ ॥ त्याच रीतीं स्वरूप अपार ॥ तान्हुलें एक असे किशोर ॥ परी त्रिवर्ग स्वरूपसागर ॥ नक्षत्रमणी भासती ॥ ८५ ॥ ऐसें सांगतां द्वाररक्षक ॥ मंत्री पाचारिला प्रत्योदक ॥ मग स्वयें घेऊन सुखासन कटक ॥ सामोरी जातसे युवती ते ॥ ८६ ॥ कटकासवें द्वारीं येऊन ॥ वंदिती झाली मच्छिंद्रनंदन ॥ मग त्रिवर्गातें सुखासन ॥ ओपून नेतसे मंदिरा ॥ ८७ ॥ नेतांच मंदिरा राजभुवनीं ॥ भावें बैसविला कनकासनीं ॥ षोडशोपचारें पूजूनि मुनी ॥ नम्रवाणी गौरविलें ॥ ८८ ॥ हे महाराजा तपोसविता ॥ कोणीकडून येणें झालें आतां ॥ आम्हां आळशावरी सरिता ॥ प्रेमांबु लोटतसे ॥ ८९ ॥ कीं दरिद्र्याचें द्रव्यहरण ॥ करूं मांदुस धांवली आपण ॥ कीं चित्ता बोधी अंतःकरण ॥ बुडतां धांवे चिंतामणि ॥ ९० ॥ कीं मृत्युसमयीं हस्तपादास ॥ ओढितां परम दुःखक्लेशास ॥ तें पाहूनियां अमरपीयूष ॥ धांव घेत कृपेनें ॥ ९१ ॥ कीं तृषासंकटीं प्राण ॥ तों गंगाओघ आला धांवून ॥ कीं क्षुधें पेटला जठराग्न ॥ पयोब्धि तों पातला ॥ ९२ ॥ तन्यायें अभाग्य

१ भाऊ. २ सुवर्णासमान कांतीचा. ३ सकाळच्या सूर्याप्रमाणें तेजस्वी. ४ मूल.

भागीं ॥ येथें पातलेत तुम्ही जोगी ॥ परी कोणाच्या वचनप्रसंगीं ॥ आम्हां दर्शवा महाराजा ॥ ९३ ॥ येरी म्हणे वो माते ऐक ॥ उपरिचरवसू माझा जनक ॥ मच्छदेही देहादिक ॥ आम्हालागीं मिरवतसे ॥ ९४ ॥ यापरी श्रीगुरुज्ञानदृष्टी ॥ तो अनुसूयासुत शुक्तिकेपोटीं ॥ तेणें कवळुनी मौळिमुष्टी ॥ वरदपात्रीं मिरवला ॥ ९५ ॥ मज अनुग्रह प्राप्त झाला ॥ त्यावरी श्रीजालिंदराला ॥ प्राप्त होऊन वैराग्याला ॥ भूषवीतसे जननीये ॥ ९६ ॥ धाकुटा बंधु गुरुभक्त ॥ मज विराजिला जालिंदरनाथ ॥ परी या ग्रामीं पापी अवस्थेंत ॥ पावला हें ऐकिलें ॥ ९७ ॥ म्हणून उग्रता धरून पोटीं ॥ लंघीत आलों महीपाठीं ॥ परी उत्तम संग्रह ग्रामजेठी ॥ समस्तांनीं सांगीतलें ॥ ९८ ॥ तेणेंकरूनि कोपकंदर्प ॥ झाला जननी सर्व लोप ॥ तरी तूं धन्य ज्ञानदीप ॥ महीवरी अससी वो ॥ ९९ ॥ आपुल्या हितास गृहीं आणून ॥ शेवटीं परम प्रज्ञेंकरून ॥ तुवां मिळविला स्वानंदघन ॥ धन्य धन्य असशी तूं ॥ १०० ॥ धन्य धन्य मही ऐक ॥ निवटूनि पूर्वजपातक दोंदिक ॥ सनाथपणाची घेऊनि भाक ॥ स्वर्गवासा मिरविशी ॥ १ ॥ तरी तारक लोकां बेचाळिसां ॥ कुळा झालीस भवाब्धिरसा ॥ कीं भगीरथकूप पितृउद्देशा ॥ मिरवलासे त्रिभुवनीं ॥ २ ॥ कीं विनतेचें दास्यपण ॥ गरुडें सांठविलें पीयूष[2] देऊन ॥ तेवीं तूं कुळांत सकळांकारण ॥ तारक झालीस सर्व काळीं ॥ ३ ॥ ऐसें नाथ बोलतां युक्तीं ॥ चरणीं माथा ठेवी सती ॥ म्हणे महाराजा कृपामूर्ती ॥ सदैव केलें तुम्हींच ॥ ४ ॥ तुमच्या दृष्टीचा सहज झळकू ॥ कृपापात्र वरिला मशकू ॥ मम प्रज्ञे मोहशठकू ॥ मिरवला हे महाराजा ॥ ५ ॥ अहा तुमचे पैंडिपाडें ॥ न येती कल्पतरू झाडें ॥ परी वासनेसमान कोडें ॥ बरें वाईट मिरवतसे ॥ ६ ॥ तैसी तुमची नव्हे स्थिती ॥ साधक कल्याण मिरवी मती ॥ कीं परिस देतां समानगती ॥ बरें वाईट मिरवतसे ॥ ७ ॥ परिस लोहाचें करी कनक ॥ परी स्वदीक्षेची न तुटे भीक ॥ तेवीं तुम्हीं नोहेत साधक ॥ आपुलेसमान[3] करिता कीं ॥ ८ ॥ ऐशी उद्धारपूर्ण कोटी ॥ तुम्ही मिरवितां महीपाठीं ॥ उदार तरी समता होटीं ॥ मेघ अपूर वाटतसे ॥ ९ ॥ मेघ उदार म्हणती लोक ॥ परी तो अपूर ओसरे उदक ॥ तस्मात् तुमचें औदार्य दोंदिक ॥ समतापदासी मिरवेना ॥ १० ॥ तरी तुमची वर्णितां स्तुती ॥ अपूर्ण असे माझी मती ॥ ऐसें म्हणोनि मैनावती ॥ चरणीं माथा ठेवीतसे ॥ ११ ॥ मग आसन वसन भूषणासहित ॥ अन्नपानादि अन्य पदार्थ ॥ सिद्ध करून मनोरथ ॥ तुष्ट करीत नाथासी ॥ १२ ॥ तीन रात्री वस्ती करून ॥ सर्वां आशीर्वाद देऊन ॥ मग निघता झाला मच्छिंद्रनंदन ॥ गोरक्षनाथादि करूनियां ॥ १३ ॥ सकळ कटकासहित ॥ बोळवों निघाला चंद्रमुक्त ॥ मैनावती आणि ग्रामस्थ ॥ एक कोस बोळविती ॥ १४ ॥ सकळीं चरणावरी ठेवूनि माथा ॥ परतते झाले बोळवोनि नाथा ॥ मग आपुले सदनीं येऊनि तत्त्वतां ॥ धन्य नाथ म्हणतात ॥ १५ ॥ येरीकडे मच्छिंद्रनाथ ॥ त्रिवर्गादि

१ शिंपल्यामध्यें. २ अमृत. ३ तुमच्या समान. ४ श्रेष्ठ.

गमन करीत ॥ ग्रामोग्राम मुक्काम साधीत ॥ जगन्नाथीं पातले ॥ १६ ॥ तेथें करूनि [1]उदधिस्नान ॥ जगन्नाथाचें घेऊन दर्शन ॥ तीन रात्री तेथें राहून ॥ तीर्थविधि सारिला तो ॥ १७ ॥ तेथूनि निघोनि पुनः मार्गीं ॥ गमन करीत मग योगी ॥ तों सौराष्ट्रग्राम-मुक्कामप्रसंगीं ॥ जाऊनि तेथें राहिले ॥ १८ ॥ रात्र क्रमोन जैसी तैसी ॥ दुसरे दिनीं [2]मित्रोदयासी ॥ गोरक्ष सांवरोनि भिक्षा-झोळीसी ॥ भिक्षेलागीं प्रवर्तला ॥ १९ ॥ भिक्षा मागोनि सदनोसदनीं ॥ परम श्रमोनि आला सदनीं ॥ तों येरीकडे शिबिरस्थानीं ॥ शयनीं असे मीननाथ ॥ १२० ॥ तो मच्छिंद्रनाथानें उठवोन ॥ बैसविला शौचाकारण ॥ तों ते संधींत भिक्षा मागोन ॥ गोरक्षनाथ पातला ॥ २१ ॥ ग्रामांत हिंडतां सदनोसदनीं ॥ श्रमें विटलासे मनीं ॥ तो येतांच स्थानीं श्रमोनी ॥ मच्छिंद्रनाथ बोलतसे ॥ २२ ॥ म्हणे गोरक्षा मीननाथ ॥ शौचास बैसविला आहे गल्लींत ॥ तरी तूं त्यातें प्रक्षाळूनि त्वरित ॥ घेऊन येईं पाडसा ॥ २३ ॥ ऐसें बोलतां मच्छिंद्रनाथ ॥ भिक्षाझोळी ठेवून तेथ ॥ लक्षून पातला मीननाथ ॥ गल्लीमाजी जाऊनियां ॥ २४ ॥ तो मीननाथ परम अज्ञान ॥ हस्तपाद भरले विष्ठेनें ॥ अंगव्यक्त गोरक्ष विष्ठा पाहोन ॥ परम चित्तीं विटलासे ॥ २५ ॥ मनांत म्हणे मच्छिंद्रासी ॥ कीं परम असे [3]विवसी ॥ विषयउपद्रव संन्याशासी ॥ व्यर्थ कासया पाहिजे ॥ २६ ॥ कीं [4]कैंबरीभाराविण बोडकी ॥ कुंकूंखटाटोप हुडकी ॥ तेवीं मच्छिंद्रमनीं उपद्रव शेखीं ॥ काय आज सुचला हो ॥ २७ ॥ जन्मांधास अवनीं ॥ तोच संभार रक्षी कानीं ॥ [5]निगडीमनुष्या षड्रसान्नीं ॥ खटाटोप कासया ॥ २८ ॥ कीं परम भ्याड सोडी सदन ॥ शस्त्रसंभारापरी संगोपन ॥ ज्याचें काय आसन वसन ॥ त्या वस्त्रभूषण कासया ॥ २९ ॥ कीं रानींचें रानसावज उन्मत्त ॥ द्रव्य देऊन त्या करावें शांत ॥ तेवीं निस्पृहताविषय अत्यंत ॥ गोड कांहींच वाटेना ॥ १३० ॥ ऐसें बोलून गौरनंदन ॥ मीननाथातें करीं कवळून ॥ दृष्ट करी मच्छिंद्राकारणें ॥ उचलोनियां तेधवां ॥ ३१ ॥ विष्ठेव्यक्त मीननाथ ॥ पाहोन मच्छिंद्र बोलत ॥ म्हणे गोरक्षा [6]सरितेआंत ॥ धुवोनि आणीं बाळका ॥ ३२ ॥ अवश्य म्हणोनि गोरक्षनाथ ॥ तैसाच उठोनि सरिते जात ॥ संचार करितां सरितेंत ॥ तों उत्तम खडक देखिला ॥ ३३ ॥ देखिलें परी एकांतस्थान ॥ मनांत म्हणे न्यावें धुवोन ॥ परी अंतर्बाह्य मळी निवटवून ॥ नाथालागीं दाखवूं ॥ ३४ ॥ ऐसें विचारून चित्तांत ॥ पदीं धरिला मीननाथ ॥ खडकावरी आपटोनि त्वरित ॥ गतप्राण पैं केला ॥ ३५ ॥ सरिते उदक असे अपार ॥ त्यांत प्रवेशतें झालें रुधिर ॥ तें सर्व अपार जळचर ॥ भक्ष्य म्हणोनि धांवले ॥ ३६ ॥ मच्छ मगरी [7]कैंबंधदेही ॥ मग तळपती त्या प्रवाहीं ॥ तैं अपार जळचरें पाहून डोहीं ॥ मनांत म्हणतसे गोरक्षक ॥ ३७ ॥ म्हणे जीवें गेला मीननाथ ॥ तरी याचें घालों सदावर्त ॥ एक जीवावरी तृप्त होत ॥ आहेत जीव सकळ हे ॥ ३८ ॥ ऐसा विचार करूनि मनीं ॥ त्वचा घेतली काढूनी ॥ रति रति मांस तुकडे

१ समुद्रस्नान. २ सूर्योदय होतांच. ३ पराधीनपणा. ४ वेणीशिवाय. ५ बंधन पावलेल्या. ६ नदीमध्यें. ७ मोठ्या शरीराचे.

करोनी ॥ जळचरांतें ओपीतसे ॥ ३९ ॥ उरल्या अस्थी त्या जळांत ॥ टाकून तेथून उठला नाथ ॥ परी त्या जळा नसे अंत ॥ अस्थी तळीं व्यक्त जाहल्याती ॥ १४० ॥ ऐसें करितां गौरनंदन ॥ मांस तें सकळ गेलें आटून ॥ मांस सरल्या आंतडें पूर्ण ॥ जळचरांतें भक्षविलें ॥ ४१ ॥ एक त्वचेरहित भाग ॥ कांहीं न ठेवी वरतें अव्यंग ॥ खडकीं पवित्र करूनि चांग ॥ त्वचा घेऊन चालला ॥ ४२ ॥ चालला परी तो सदनीं ॥ तों शिबिरीं नसे मच्छिंद्रमुनी ॥ शांभवीअर्थी बाजारभुवनीं ॥ संचरलासे महाराजा ॥ ४३ ॥ तो येतांच तेथें मच्छिंद्रनाथ ॥ मग तान्हा पसरी [1]प्रावर्णी त्वचेंत ॥ [2]मित्ररश्मि पाहोन वात ॥ सुकावया घातलें ॥ ४४ ॥ तों येरीकडे मच्छिंद्रनंदन ॥ शांभवी आलासे घेऊन ॥ कंदा कुत्का सिद्ध करून ॥ आसनावरी बैसला ॥ ४५ ॥ बैसला परी गोरक्षातें ॥ म्हणे बा रे कोठें मीननाथ ॥ येरी म्हणे धुवोनि त्यातें ॥ स्वच्छ आणिलें महाराजा ॥ ४६ ॥ मच्छिंद्र म्हणे आणिलें परी ॥ कोठें ठेविला न दिसे नेत्रीं ॥ येरी म्हणे तान्हा प्रावरीं ॥ सुकूं घातला महाराजा ॥ ४७ ॥ म्हणे मच्छिंद्र काय बोलसी ॥ घातला सुकूं ऐसें म्हणसी ॥ येरी म्हणे कीं असत्य तुम्हांसी ॥ भाषण माझें वाटतसे ॥ ४८ ॥ तरी बाहेर शीघ्र येवोनी ॥ स्वचक्षूनें पहावा विलोकूनी ॥ ऐसें बोलतां मच्छिंद्रनंदन ॥ तेच क्षणीं बाहेर येतसे ॥ ४९ ॥ म्हणे कोठें रे मीननाथ ॥ परी पाहतां म्हणे तान्हा प्रावर्णातें ॥ न्याहाळोन पाहतां देखे त्वचेतें ॥ मग धरणीं आंग सांडीतसे ॥ १५० ॥ म्हणे अहा रे काय केलें ॥ बाळ माझें कैसें मारविलें ॥ अंग [3]धरणीवर टाकिलें ॥ वरी लोळे गडबडां ॥ ५१ ॥ अहा अहा म्हणूनी ॥ मृत्तिका उचलोनि घाली वदनीं ॥ आणि वक्षःस्थळा पिटूनी ॥ शोक करी आक्रोशें ॥ ५२ ॥ परम मोहें आरंवळत ॥ उठउठोनि त्वचा कवळित ॥ हृदयीं लावूनि आठवीत ॥ बाळकाच्या गुणांतें ॥ ५३ ॥ अहा तुझा मी असें जनक ॥ परम शत्रु होतों एक ॥ जननीचें तोडून बाळक ॥ तुज आणिलें कैसें म्यां ॥ ५४ ॥ म्हणे अहा रे मीननाथा ॥ मज सांडूनि कैसा गेलासि आतां ॥ एकटा परदेशीं सोडूनि तत्त्वतां ॥ मार्ग मिळाला तुज केवीं ॥ ५५ ॥ आतां तूतें किलोतळा ॥ कोठून पाहील मुखकमळा ॥ अहा तुझा कापिला गळा ॥ कैसा येथें आणूनी ॥ ५६ ॥ बाळका स्त्रियांचे राज्यांत ॥ भुभुःकारें पावशील मृत्य ॥ म्हणोनि बा रे तुजसी येथें ॥ रक्षणातें आणिलें ॥ ५७ ॥ आणिलें परी तुज निश्चितीं ॥ [4]कृतांत झाला गोरक्ष जती ॥ ऐसें म्हणोनि धरणीप्रती ॥ अंग टाकी धडाडून ॥ ५८ ॥ पुनः उठे मच्छिंद्रनंदन ॥ त्वचा हृदयीं धरी कवळून ॥ म्हणे बाळा तुजसमान ॥ पुत्र कैंचा मज आतां ॥ ५९ ॥ अहा बाळाचें चांगुलपण ॥ मज भासतसे जैसा मदन ॥ अहा बाळाचे उत्तम गुण ॥ कोणा अर्थी वर्णू मी ॥ १६० ॥ बाळा लोटलीं वर्षें तीन ॥ परी काय सांगूं मंजुळ बोलणें ॥ अहा ताता ऐसें म्हणोन ॥ हांक मारीत होतासी तूं ॥ ६१ ॥ बा रे तनू असतां कोवळी ॥ परी शयनींहून

१ सुकण्याकरितां. २ सूर्याचे किरण. ३ जमिनीवर. ४ यम.

उठसी उषःकाळीं ॥ माथा ठेवून मम पदकमळी ॥ अहो तात ऐसें म्हणसी ॥ ६२ ॥ बा तूं वसत होतास मम शेजारीं ॥ मर्यादा रक्षीत होतासी अंतरीं ॥ अरे कठिण वागुत्तरीं ॥ शब्द वाहिला नाहीं म्यां ॥ ६३ ॥ बा रे भोजन करितां ताटीं ॥ चतुरपणाची परम हातवटी ॥ आपुल्या पुढें ठेवून दृष्टी ॥ ग्रास घेसी बाळका ॥ ६४ ॥ अहा रे अहा मीननाथ बाळा ॥ परमज्ञानी वाचा रसाळा ॥ लिप्त कदा नव्हेसी मळा ॥ शुद्ध मुखकमळा मिरविशी ॥ ६५ ॥ अहा बा रे चक्षुघ्राण ॥ कधीं न पाहिलें तुझें मळिण ॥ आज तुझें अंग विष्ठावेष्टन ॥ कैसें अमंगळ जावया ॥ ६६ ॥ बा रे कधीं मजवांचून ॥ न राहशी एकांतपण ॥ आजिचे दिनीं शयनीं मज सोडून ॥ कैसा परत गेलासी ॥ ६७ ॥ बा रे माय तुझी किलोतळा ॥ तिचा कधीं न पाहसी लळा ॥ आसनीं शयनीं मजपासून बाळा ॥ पैल झाला नाहींस तूं ॥ ६८ ॥ तरी ऐसें असून तुझे मनीं ॥ आजि मज गेलासि सोडूनी ॥ अहा एकदां येऊनि अवनीं ॥ मुख दावीं मज बाळा ॥ ६९ ॥ ऐसें म्हणोनि मच्छिंद्रनाथ ॥ हंबरडा गायीसमान फोडीत ॥ अहा माझा मीननाथ ॥ कोणी दाखवा म्हणतसे ॥ १७० ॥ भूमीं लोळे अश्रु नयनीं ॥ नेत्रीं ढाळितां न समाये पाणी ॥ वक्षःस्थळादि पिटूनि अवनीं ॥ दाखवा म्हणे मीननाथ ॥ ७१ ॥ ऐसें म्हणोनि आक्रंदत ॥ तें पाहूनि गोरक्षनाथ ॥ मनांत म्हणे अद्यापि भ्रांत ॥ गेली नाहीं श्रीगुरूची ॥ ७२ ॥ मग पुढें गोरक्षनाथ होऊन ॥ म्हणे महाराजा कां घेतां अज्ञानपण ॥ कोण तुम्ही कोणाचा नंदन ॥ करितां रुदन त्यासाठीं ॥ ७३ ॥ अहो पुरतें पाहतां कोण मेला ॥ अशाश्वताचा भार हरला ॥ शाश्वत अचळ आहे बोला ॥ कदाकाळीं न मरे तो ॥ ७४ ॥ अहो तुमचा मीननाथ ॥ नामधारी असे त्यांत ॥ तो कदा न मरे योजिल्या घात ॥ आहे शाश्वत महाराजा ॥ ७५ ॥ तो कदा न मरे शस्त्रघातांनीं ॥ त्यातें न जाळी कदा वन्ही[3] ॥ अनिल[4] न शोषी ना बुडवी पाणी ॥ शाश्वत चिन्हीं नांदतसे ॥ ७६ ॥ ऐसें बोलतां गोरक्षक ॥ परी कदा न सोडी शोक ॥ अहा अहा मीननाथ ॥ ऐसें म्हणोनि आक्रंदे ॥ ७७ ॥ ऐशिये आग्रहाचा अर्थ ॥ तें पाहूनियां गोरक्षनाथ ॥ मग संजीवनीमंत्राप्रत ॥ स्मरण करिता पैं झाला ॥ ७८ ॥ करीं कवळून भस्मचिमुटी ॥ संजीवनी मंत्र जपे ओठीं ॥ त्वचेप्रती सोडिता झाला मुष्टी ॥ मीननाथ ऊठला ॥ ७९ ॥ उठतांच मीननाथ ॥ मच्छिंद्राचे गळां पडत ॥ मच्छिंद्र पाहून हृदयांत ॥ परम मोहें धरीतसे ॥ १८० ॥ चुंबन घेऊनि म्हणे बाळा ॥ कोठें गेला होतासी खेळा ॥ मज टाकून विनयस्थळा ॥ गमन केलें होतें कीं ॥ ८१ ॥ ऐसें म्हणोनि जैसें तैसें ॥ तोही अस्त पावला दिवस ॥ दुसरे दिनीं मीननाथास ॥ घेऊनि ते चालिले ॥ ८२ ॥ मार्गीं चालतां त्रिवर्ग जाण ॥ गोरक्ष करिता झाला बोलणें ॥ हे महाराजा मच्छिंद्रनंदन ॥ चित्त द्यावें मम बोला ॥ ८३ ॥ तुमचा प्रताप पाहतां अवनीं ॥ निर्जीवा जीववाल[5] वाटे मनीं ॥ ऐसें असून सुतालागुनी ॥ रुदन केलें हें काय

१ डोळे व नाक. २ राहत नाहीं. ३ अग्नि. ४ वायु. ५ जीवन देणारा.

॥ ८४ ॥ तरी हें रुदन करावया कारण ॥ काय होतें बोला वचन ॥ ऐसे मीननाथ सहस्रावधीनें ॥ संजीवनीतें निर्माल ॥ ८५ ॥ तरी हें आश्चर्य वाटे मनीं ॥ स्वामी पडले शोकरुदनीं ॥ कीं चिंताहारक चिंतामणी ॥ तो चिंतेमाजी पडियेला ॥ ८६ ॥ ऐसें ऐकोन मच्छिंद्रनाथ ॥ म्हणे तुवां मारिलें किमर्थ ॥ येरी म्हणे मोहभावार्थ ॥ तो पहावया तूमचा ॥ ८७ ॥ तुम्ही वैराग्यशील म्हणवितां ॥ तरी माया लंघून व्हावें परता ॥ आशा मनशा तृष्णा ममता ॥ लिप्त नसावी शरीरातें ॥ ८८ ॥ ऐशा परीक्षाभावनेसीं ॥ म्यां मारिलें मीननाथासी ॥ परी प्राज्ञिक तुम्ही सर्वज्ञराशी ॥ रुदन कासया केलें जी ॥ ८९ ॥ येरी म्हणे वत्सा ऐक ॥ तूं शिष्य माझा अससी एक ॥ तरी म्यांही परीक्षेचें कौतुक ॥ तुझें बाळा पाहिलें असे ॥ १९० ॥ बा रे आशा तृष्णा मनशा कामना ॥ काम क्रोध मद मत्सर वासना ॥ हे मोहमांदुसी मायासदना ॥ नांदणुकी करितात ॥ ९१ ॥ तरी तुझे ठायीं मायालेश ॥ आहे कीं नाहीं महापुरुष ॥ हें पहावया रुदनास ॥ आरंभिलें म्यां पाडसा ॥ ९२ ॥ आम्ही अलक्षरूपी पाहणें ॥ आणि विज्ञानज्ञानानें विवरणें ॥ याच कौतुकें जाणपणें ॥ पाहिलें म्यां पाडसा ॥ ९३ ॥ बा रे शाश्वत अशाश्वत ॥ तुज कळलें कीं नाहीं होतों या भ्रांतींत ॥ तयाची परीक्षा रुदननिमित्त ॥ तुझी घेतली पाडसा ॥ ९४ ॥ आतां बा रे तुझें वयसपण ॥ समूळ आजि झालें हरण ॥ पयतोयाचेनी कारण ॥ हंसपुरुष मिरविशी ॥ ९५ ॥ ऐसें बोलतां गुरुनाथ ॥ गोरक्ष चरणीं माथा ठेवीत ॥ म्हणे महाराजा तुम्ही सनाथ ॥ या देहासी पैं केलें ॥ ९६ ॥ ऐसें बोलोन वागुत्तर ॥ पुन्हां गमती मार्गांपर ॥ मुक्कामभुक्कामीं ज्ञानविचार ॥ गुरुशिष्य करिताती ॥ ९७ ॥ असो यापरी करितां गमन ॥ पुढें कथा येईल वर्तून ॥ नरहरिवंशीं धुंडीनंदन ॥ श्रोतियांतें सांगेल ॥ ९८ ॥ तरी पुढिले अध्यायीं कथाराशी ॥ पुण्यपर्वणी पापनाशी ॥ श्रोते स्वीकारून मानसीं ॥ अवधानिया बैसावें ॥ ९९ ॥ तरी नरहरिवंशीं धुंडीसुत ॥ तुमचा आहे शरणागत ॥ मालू नाम ठेविलें सत्य ॥ तो कथा सांगेल तुम्हांसी ॥ २०० ॥ ॥ स्वस्तिश्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागार ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ द्वाविंशतितमाध्याय गोड हा ॥ २०१ ॥ ओंव्या ॥ २०१ ॥ ॥

॥ नवनाथभक्तिसार द्वाविंशतितमाध्याय समाप्त ॥

# अध्याय २३वा






श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी कमळानना ॥ दुष्टदानवअसुरमर्दना ॥ भक्तकामचकोरचंद्रानना ॥ यादवेंद्रा आदिपुरुषा ॥१॥ हे पयोब्धिवासा[1] यदुकुळटिळका ॥ पुढें बोलवीं कथानका ॥ जेणें श्रोतियां चित्तदोंदिका ॥ आनंदाब्धि उचंबळे ॥२॥ मागिले अध्यायीं सौराष्ट्रग्रामीं ॥ गोरक्षानें मीननाथा मारुनी ॥ पुन्हां उठविलें परीक्षा देउनी ॥ श्रीगुरूच्या भावने ॥ ३ ॥ मच्छिंद्रें धरूनि अज्ञानपण ॥ मीननाथासवें केलें रुदन ॥ परी गोरक्षाचें जाणीवपण ॥ परीक्षेतें आणिलें ॥ ४ ॥ असो यापरी तेथून निघून ॥ मार्गीं करीत चालिले गमन ॥ तों तैलंगदेशीं गोदासंगमन ॥ समुद्रतीरा पातले ॥ ५ ॥ गोदासंगमीं करून स्नान ॥ आत्मलिंग शिवातें भावें पूजून ॥ तेथून गोदेचें तट धरून ॥ पश्चिमदिशे गमताती ॥ ६ ॥ तों बारा लिंगांतील लिंग समर्थ ॥ आंवढ्या आणि परळी वैजनाथ ॥ तैं करूनियां सव्य गोदातीर्थ ॥ घेऊनियां चालिले ते ॥ ७॥ ते मार्गीं चालतां गोदा सव्य ॥ तों वाल्मिकस्थान विपिनेमय[2] ॥ गर्भगिरिपर्वतप्राय ॥ येऊनियां तेथें पोंचले ॥८॥ तें रान कर्कश अचाट ॥ गगनचुंबित तरु अफाट ॥ तयांमाजी तृण अफाट ॥ न मिळे वाट चालावया ॥९॥ व्याघ्र जंबूक शार्दूळ[3] हरी ॥ वराह रीसें[4] काननांतरीं ॥ हिंडती ते उन्मत्तापरी ॥ उग्र वेष दावूनियां ॥ १० ॥ जाळिया वेली कर्दळी सघन ॥ कीं जेथें रश्मींचें न पवे दर्शन ॥ कीं अर्कोदया लपे गगन ॥ ऐसा भास वाटतसे ॥ ११ ॥ बोरी बाभळ पळस शमी ॥ रातांजन कंदर्प अनेकनामी ॥ खैर हिंवर कंटकधामी ॥ काननांत तरु मिरवती ॥१२॥ एकतुराट्ट अर्की फुल्लाट ॥ वरकड तीक्ष्ण कंटकनट[5] ॥ तेवीं कनकखंडजाळी अचाट ॥ पर्णकुटिका जैशा कीं ॥ १३ ॥ तयांमाजी तृण उचित ॥ स्थावर तरू जाहले व्यक्त ॥ तेणें धरादेवीचें सहसा नितांत ॥ झांकिन्नलें शरीर ॥१४ ॥ अहा तें कानन सुरस ॥ वसन नेसविलें भूदेवीस ॥ हरितवर्णी कुसुमपदरास ॥ बुटलिंगी मिरवली ॥ १५ ॥ म्हणाल कासया नेसली वसन[6] ॥ तो परपुरुष दिनकर गगनीं ॥ म्हणून कुळवंत दारा लज्जेनें ॥ स्वशरीरा लपवी ती ॥ १६ ॥ म्हणून मित्रकांता जागा ॥ सांडून बैसल्या अंबुजभागा ॥ धरादेवीच्या लज्जित मार्गा ॥ लक्षूनियां रक्षिलें ॥ १७ ॥ ऐसियापरी कानन अचाट ॥ दर्शन नोहे महीपाठ ॥ तेथें पाहून मच्छिंद्र सुभट ॥ मनामाजी दचकला ॥ १८ ॥ दचकला परी कवण अर्थ ॥ कनकवीट जे होती भस्मझोळींत ॥ तस्कर कोणी हरतील तीतें ॥ म्हणूनि चित्तीं विस्मित ॥ १९ ॥ तैसा नव्हे आणिक अर्थ ॥ गोरक्षाचा लोभी स्वार्थ ॥ पहावया परीक्षेत ॥ मच्छिंद्रनाथ उदेला ॥ २० ॥ आपण घेऊनि अज्ञान ॥ पाहे गोरक्षाचें लक्षण ॥ नातरी प्रतापवान ॥ तस्करभय त्या नाहीं ॥ २१ ॥ कीं ये तमाचा प्रतापजेठी ॥ अर्का[7] संचरे भय पोटीं ॥ कीं उदधीची वळी चंचुपुटीं ॥ लागतां कोप काय थरथराटे ॥ २२ ॥ कीं मशकाचे उड्डाणें ॥ मंदराचळ व्यापेल कीं भयानें ॥ कीं सर्पकृत किंवा वृश्चिकदंशानें ॥ खगेंद्रा[8] काय भय त्याचें ॥ २३ ॥ तन्न्यायें मच्छिंद्रनाथ ॥ पाळूं न शके तस्करभयातें ॥ परी श्रीगोरक्षाचें चित्त ॥ परीक्षेसी

१ क्षीरसागरांत रहाणाऱ्या. २ अरण्यमय. ३ वाघ. ४ अस्वलें. ५ कांट्यांनीं भरलेले. ६ वस्त्र. ७ सूर्याला. ८ गरुडाला.

उदेलें ॥ २४ ॥ कल्पून चित्तीं ऐसियापरी ॥ मग गोरक्षातें जती वागुत्तरीं ॥ बोलता झाला काननांतरीं ॥ पाचारूनि निकटत्वें ॥२५॥ म्हणे वत्सा ऐक बा कैसें ॥ उद्भट दिसे विपिन कर्कश ॥ तरी कांहीं भय अरण्यास ॥ नांदतें कीं तस्करीं ॥ २६ ॥ परम पूर्ण व्यक्त तरुदाटी ॥ जेथें अर्क न पडे दृष्टीं ॥ ऐसिये काननीं कर्कश पोटीं ॥ मज भय आज संचरलें ॥ २७ ॥ तरी बाळा प्रज्ञावंता ॥ आहे कीं नाहीं भय सांग आतां ॥ तस्करभयाची समूळ वार्ता ॥ काननांत न येवो या ॥ २८ ॥ ऐसें बोलतां मच्छिंद्रनाथ ॥ गोरक्ष विचार करी मनांत ॥ म्हणे तस्करभय गुरूतें ॥ काय म्हणून उदेलें ॥२९॥ तया शब्दोदयाचा अर्थ ॥ श्रीगुरूजवळ असेल वित्त ॥ म्हणून हा शब्द उदयवंत ॥ झाला असेल निश्चयें ॥ ३० ॥ तरी तो म्हणे ताता कैसें समजावें ॥ फुलावरून [1]रुखा द्यावीं नांवें ॥ ऐसें शब्दावरून मान समजावें ॥ ओळखावें सुज्ञांनीं ॥ ३१ ॥ तस्मात् गुरूपाशीं वित्त ॥ आहे काय ऐसें विचारीत ॥ तरी या शब्दाची असे भ्रांत ॥ निरसून दूर करावी ॥ ३२ ॥ ऐसें योजून गोरक्षनाथ ॥ मौन धरोनि मार्गीं चालत ॥ परी काननीं [2]अधिकोत्तरांत ॥ भयानक दिसे पदोपदीं ॥ ३३ ॥ जंव जंव कानन भयानक दिसे ॥ तंव तंव गोरक्षा मच्छिंद्र पुसे ॥ म्हणे बा अरण्य बहु कर्कश ॥ पदोपदीं दिसतसे ॥ ३४ ॥ तरी तस्करभय येथें ॥ आहे कीं नाहीं सांग मातें ॥ परी गोरक्ष उत्तरातें ॥ कांहींच तयातें न देई ॥३५॥ जैसा विश्वामित्र समर्थ ॥ [3]मखरक्षणा त्या श्रीरामार्थ ॥ स्तवितां तेणें दशरथातें ॥ परी उत्तर न देई कांहींच ॥ ३६ ॥ त्याच न्यायें गोरक्ष मौन धरोनी ॥ गम तसेच सुपंथ अवनीं ॥ तों पुढें चालतां देखिलें पाणी ॥ संचळपणीं स्थिरावलें ॥ ३७ ॥ उदक पाहतां सचळवंत ॥ गोरक्षा वदे मच्छिंद्रनाथ ॥ म्हणे बा गोरक्षा संचरत येथें ॥ उदक आहे नेटकें ॥३८॥ तरी माझी झोळी कक्षेंत घालून ॥ पुढें कांहींसें करीं गमन ॥ तों मीही येतों लगबगेंकरून ॥ दिशा फिरून पाडसा ॥ ३९ ॥ ऐसें म्हणतां मच्छिंद्रनाथ ॥ अवश्य गोरक्ष म्हणे त्यास ॥ मग स्कंधीं वाहून मीननाथास ॥ कक्षीं झोळी घातली ॥ ४० ॥ परी घालितां कक्षे झोळी ॥ वजनवस्त लागे हस्तकमळीं ॥ मग मनांत म्हणे प्रतापबळी ॥ भय यांतचि नांदतसे ॥ ४१ ॥ ऐसें म्हणोनि स्वचित्तांत ॥ स्कंधीं वाहून मीननाथ ॥ मच्छिंद्रा सोडून थिल्लरांत ॥ पुढें जात सच्छिष्य ॥ ४२ ॥ पुढें जातां शतपावलीं ॥ कक्षेंतून भिक्षाझोळी काढिली ॥ त्यांत पाहतां देखिली ॥ वीट उत्तम [4]हाटकाची ॥ ४३ ॥ पाहतांच दृष्टीं कनकवीट ॥ म्हणे कीं फुका भ्याला मच्छिंद्रनाथ सुभट ॥ मग दाट लक्षून तृण अफाट ॥ झुगारिली वीट त्यामाजी ॥ ४४ ॥ त्या कनकविटेसमाकृती ॥ पाषाण पाहून गोरक्ष जती ॥ झोळींत घालून कक्षेप्रती ॥ पुन्हां नेसवी झोळीतें ॥ ४५ ॥ कक्षे झोळी घालून ॥ स्कंधीं पुन्हां मीननाथ घेऊन ॥ लगबगोनी मार्गगमन ॥ करीत असे नाथ तो ॥ ४६ ॥ सुपंथ लक्षितां [5]तांतडीनें ॥ एक कोस गेला त्वरेंकरून ॥ तों मच्छिंद्रनाथ दिशा फिरून ॥ जात मागुता तांतडीं ॥४७॥



१ वृक्षाला. २ अधिकाधिक. ३ यज्ञरक्षण करण्याकरितां. ४ सोन्याची. ५ अतित्वरेनें.

पुढें जातसे गोरक्षनाथ ॥ मागून मच्छिंद्र लगबगां येत ॥ परी तो नाटोपे गोरक्षनाथ ॥ मार्गे क्रमितां मच्छिंद्रा ॥ ४८ ॥ परी इतुक्या नेटें भावें ॥ मार्ग मिळतां नाटोपावें ॥ तरी लघुशंकेलागीं धांवे ॥ संगतसंगमीं मिळाल्या ॥ ४९ ॥ यापरी शौचा सर्वांशीं जावें ॥ लागत आहे सर्वानुभवें ॥ संगतसंगमीं होऊनियां ठावें ॥ विसांवयासी महाराजा ॥ ५० ॥ ऐसियापरी आहे गमन ॥ तेवीं मच्छिंद्रा आलें घडून ॥ परम तांतडीं करितां गमन ॥ परी तो न मिळे गोरक्ष ॥ ५१ ॥ ऐसेपरी गोरक्षनंदन ॥ पुढें चालतां सुपंथ-पथानें ॥ मार्ग काढिला दीड योजन ॥ जाणून खूण अंतरींची ॥ ५२ ॥ तों अवचट देखिला तरू ॥ गोरक्ष पाहे दृष्टीपरू ॥ मनांत म्हणे व्हावें स्थिरू ॥ येऊं द्यावें नाथासी ॥ ५३ ॥ ऐसें योजून स्वचित्तांत ॥ पाहता झाला उंबरतरूतें ॥ तों त्या ठायीं पोखरणी अद्भुत ॥ वामतीर्थ देखिलें ॥ ५४ ॥ मग झोळी काढिली कक्षेंतून ॥ स्कंधींचा उतरिला नाथ मीन ॥ मग [१]अंबुपात्र करीं कवळून ॥ पोखरणींत उतरला ॥ ५५ ॥ सारुनी आपुलें स्नान ॥ अंगीं भस्म केलें लेपन ॥ उपरी आपुले नेम सारून ॥ घातलें स्नान मीन-नाथा ॥ ५६ ॥ तों मार्गाहून मच्छिंद्रनाथ ॥ अति तांतडीनें आले तेथ ॥ स्नान करून यथास्थित ॥ नित्यकर्म सारिलें ॥ ५७ ॥ सकळ सारिलें नित्यनेमा ॥ बैसले मार्गीं विश्रामा ॥ बैसल्या उपशब्दउगमा ॥ पुन्हां दावी मच्छिंद्र ॥ ५८ ॥ म्हणे बा रे गोरक्षनाथा ॥ कर्कश अरण्य येथपर्यंत ॥ आपणा लागलें भयानकवत ॥ पुढेंही लागेल ऐसेंचि ॥ ५९ ॥ येरू म्हणे जी गुरुराय ॥ याहून पुढें अधिक काय ॥ मच्छिंद्र म्हणे कांहीं भय ॥ काननीं या आहे कीं ॥ ६० ॥ गोरक्ष म्हणे वागुत्तर ॥ कीं महाराजा असतां जड पर [२]डेर ॥ होता जो तो डर थोर ॥ मागेंच राहिला आहे जी ॥ ६१ ॥ आतां नाहीं डर कैंचा ॥ स्वस्थ असावें कायावाचा ॥ मागें राहिला भाव साचा ॥ जड डराचा महाराजा ॥ ६२ ॥ तरी आतां कृपादेही ॥ आपणापाशीं डर नाहीं ॥ मग भय कैंचें काननप्रवाहीं ॥ जड असल्या अचाट ॥ ६३ ॥ यावरी बोले मच्छिंद्रनाथ ॥ आपणाजवळ जड आहे बहुत ॥ हाटकवीट भस्मझोळींत ॥ स्त्रीराज्यांतून आणिली ॥ ६४ ॥ म्हणून तूतें भय स्थित ॥ विचारितों काननांत ॥ येरू म्हणे अशाश्वत ॥ जडही नसे डर गेला ॥ ६५ ॥ ऐसें म्हणतां गोरक्ष-नाथ ॥ मच्छिंद्राचे काय चित्तांत ॥ चित्तीं म्हणे हाटकविटेतें ॥ सांडिली कीं कळेना ॥ ६६ ॥ ऐसें जाणूनि स्वचित्तांत ॥ मच्छिंद्र तळमळी पहावयातें ॥ परी गोरक्ष मच्छिंद्राचा धरूनि हात ॥ पर्वतावरी नेतसे ॥ ६७ ॥ तो महापर्वत गर्भगिरी ॥ उभे चढतांच लघुशंका करी ॥ पर्वतमाथां गोरक्ष मौन वरी ॥ मज समजेल म्हणूनी ॥ ६८ ॥ मग दोन घटिका स्वस्तिक्षेम ॥ सेविती ते विश्राम ॥ उपरी अवयव परिधानून ॥ मार्ग क्रमूं म्हणताती ॥ ६९ ॥ ज्याचें त्यानें वस्त्रभूषण ॥ अंगीं केलें परिधान ॥ आपुलाल्या झोळ्या घेवोन ॥ कक्षे अडकवून बांधिती ॥ ७० ॥ तों मच्छिंद्र आपुली घेऊन झोळी ॥ [३]विकासून पाहे नेत्रकमळीं ॥ तों कनक नसे [४]पाषाणवळी ॥ झोळीमाजी नांदतसे ॥ ७१ ॥ तें पाहून

१ उदकपात्र, कमंडलु. २ भय. ३ उघडून. ४ दगडाची वीट.

मच्छिंद्रनाथ ॥ धरणीवरी अंग टाकीत ॥ अहा अहा म्हणूनि आरंबळत ॥ कनकवीट गेली म्हणोनी ॥ ७२ ॥ मच्छिंद्र बोले क्रोधें-करोन ॥ तुवां टाकिलें रे माझें धन ॥ तूतें ओझें काय दारुण ॥ झालें होतें तयाचें ॥ ७३ ॥ अहा आतां काय करूं ॥ कोठें पाहूं हा भांगारू ॥ परम यत्नें वेंचून शरीरू ॥ हाटक आणिलें होतें म्यां ॥ ७४ ॥ तरी हा थोर मध्यें अनर्थ ॥ कैसा योजिला श्रीभगवंतें ॥ हातींचें सांडून गेलें वित्त ॥ तरी देवक्षोभ जाणावा ॥ ७५ ॥ ऐसें म्हणोनि दडदडां धांवत ॥ पुन्हां परतोनि मागें पहात ॥ ठाईं ठाईं चांचपीत ॥ उकरीत महीसी ॥ ७६ ॥ ऐसी करोनी अपार चेष्टा ॥ अंग टाकी महीं प्रतिष्ठा ॥ गडबडां लोळोनि स्फुंदे स्पष्टा ॥ करकमळें पिटीतसे ॥ ७७ ॥ पुनःपुनः मही उकरीत ॥ इकडे तिकडे पाषाण करीत ॥ भाळावरती ठेऊन हस्त ॥ कर्म बुडालें म्हणतसे ॥ ७८ ॥ ऐसें म्हणोनि आक्रोश करीत ॥ दीर्घस्वरें हंबरडा फोडीत ॥ जीवास सोडूं म्हणत ॥ कैसें केलें देवानें ॥ ७९ ॥ पिशाचासम भ्रमण करीत ॥ म्हणे माझें येथें आहे वित्त ॥ धांवोनि उकरा महीतें ॥ कोणीतरी येऊनियां ॥ ८० ॥ गोरक्षापाशीं शीघ्र येऊन ॥ म्हणे तूं माझें न देशी धन ॥ तूं कोण कोणाचा येऊन ॥ पाळतीनें मिरविसी ॥ ८१ ॥ ऐसें अनओळखीनें बोलत ॥ तेणें हृदयीं दचकला गोरक्षनाथ ॥ मग मच्छिंद्राचा धरोनि हात ॥ पर्वतावरी नेतसे ॥ ८२ ॥ तो [३]महानग पर्वत गर्भगिरी ॥ उभे चढले तयावरी ॥ चढतां लघुशंका करी ॥ पर्वतमाथां गोरक्ष ॥ ८३ ॥ सिद्धियोग मंत्र जपूनी ॥ मंत्रधार कनकवर्णी ॥ सकळ पर्वत दैदीप्यमानी ॥ शुद्ध हाटकीं मिरवला ॥ ८४ ॥ मग श्रीगुरूसी नमन करून ॥ म्हणे लागेल तितुकें घेइजे सोनें ॥ तें मच्छिंद्र पाहूनियां जाण ॥ म्हणे धन्य धन्य गोरक्षा ॥ ८५ ॥ गोरक्ष म्हणे गुरुनाथा ॥ लागेल तितुकें घ्यावें कनका ॥ येरू म्हणे तूं परीस [४]निका ॥ लाभलासी पाडसा ॥ ८६ ॥ मग हृदयीं धरून गोरक्षनाथ ॥ म्हणे बा धन्य आहेस सुत ॥ सकळ सिद्धींचें माहेर युक्त ॥ होऊन जगीं मिरविसी ॥ ८७ ॥ मग मी ऐसा परीस टाकोन ॥ काय करूं फार सुवर्ण ॥ उत्तम निधानालागीं सांडून ॥ वल्लीरसा कां पहावें ॥ ८८ ॥ हातींचा टाकून राजहंस ॥ व्यर्थ कवळूं फोल वायस ॥ कीं कामधेनू असतां गृहास ॥ तक्र मागे घरोघरीं ॥ ८९ ॥ दैवें निधी लाभल्या हातीं ॥ किमर्थ शोधाव्या किमयायुक्ती ॥ चिंतामणीची असतां वस्ती ॥ चिंता करावी कासयातें ॥ ९० ॥ तें बाळका कैसें कळे पूर्ण ॥ अर्थ लाधला तुजयोगानें ॥ आतां कासया व्हावें सुवर्ण ॥ सकळ निधी अससी तूं ॥ ९१ ॥ ऐसें बोलतां मच्छिंद्रनाथ ॥ उपरी गोरक्ष विचार करीत ॥ म्हणे महाराजा आजपर्यंत ॥ कनक झोळीं वागविलें ॥ ९२ ॥ तरी तें वागवावया कारण ॥ कोणता होता मनीं काम ॥ तीच कामना दृश्यमान ॥ मातें दावीं महाराजा ॥ ९३ ॥ येरू म्हणे वत्सा ऐक ॥ मम हृदयींची होती भूक ॥ कीं आपुले देशीं मोडूनि हाटक ॥ बहू साधूंतें पुजावें ॥ ९४ ॥ तया हाटकाचें करूनि अन्न ॥ मेळवावे अपार संतजन ॥ भंडारा करावा ऐसें मन ॥ मनकामनेतें वेधलें ॥ ९५ ॥ इतकाच अर्थ होता चित्तीं ॥ म्हणोनि वागविलें हाटका-

१ जमिनीवर. २ सोनें. ३ मोठा पर्वत. ४ खरोखर. ५ कावळा.

प्रती ॥ यावर बोले गोरक्ष जती ॥ तरी ही कामना फेडीन मी ॥ ९६ ॥ मग पर्वतीं बैसवोनि मच्छिंद्रनाथ ॥ आपण पुन्हां उतरला खालता ॥ उचलोनि नेलें माथां ॥ पर्वतमाथीं गोरक्षकें ॥ ९७ ॥ मग गंधर्वास्त्र जपोनि होटीं ॥ स्वर्गी प्रेरिली भस्मचिमुटी ॥ तेणेंकरूनि महीतळवटीं[1] ॥ चित्रसेन[2] उतरला ॥९८॥ श्रीनाथास करून नमन ॥ उभा राहिला कर जोडून ॥ म्हणे महाराजा आज्ञा कोण ॥ काय कार्य करावें मीं ॥ ९९ ॥ येरू म्हणे गंधर्वनाथा ॥ आणीक पाचारीं गंधर्व येथें ॥ त्यांस पाठवून महीवरतें ॥ मेळा करा सर्वांहीं ॥ १०० ॥ नाना बैरागी संन्यासी ॥ जपी तपी संतयोगियांसी ॥ येथें आणोनि समाजेंसीं ॥ अन्नदानें उत्साह करावा ॥ १ ॥ सुरवरगंधर्वगणसहित ॥ देवदानवकिन्नरांसहित ॥ मेळवोनि अपरिमित ॥ आनंदउत्साह करावा ॥ २ ॥ ऐसें सांगतांचि चित्रसेनातें ॥ मग चित्रसेन पाचारी गंधर्वांतें ॥ एकशत गंधर्व महीवरते ॥ प्रगट झाले येवोनी ॥ ३ ॥ मग त्या गंधर्वांसी चित्रसेनें ॥ सांगूनि सर्व वर्तमान ॥ दाही दिशा प्रेरणा करून ॥ प्रज्ञावंत[3] आणिले कीं ॥ ४ ॥ जपी तपी योगशीळ ॥ गुप्त प्रगट आणिले सकळ ॥ नवनाथादि ऋषिमंडळ ॥ येऊनियां पोंचले ॥ ५ ॥ शुक दत्तात्रेय याज्ञवल्की ॥ वसिष्ठ वामदेव कपिल शेखी ॥ व्यास पाराशर नारद ऋषी ॥ वाल्मीक पाचारिले गंधर्वी ॥६॥ अठ्यायशीं सहस्र ऋषिभार[4] ॥ स्वर्गीहून उतरले देवकिन्नर ॥ गणगंधर्वादि वसुलोक अपार ॥ तपोलोक पातले ॥७॥ त्यांतचि अष्टवसूंसहित ॥ उपरिचर आला विमानव्यक्त ॥ तेणें येतांच मच्छिंद्रास वृत्तांत ॥ किलोतळेचा सांगीतला ॥ ८ ॥ कीं सोडून स्त्रीदेश अवनी ॥ सिंहलद्वीपा गेली मैनाकिनी ॥ परी तुमच्या वियोगेंकरूनी ॥ क्षीणशरीर झालीसे ॥ ९ ॥ तरी असो कैसें तें ॥ भेटेल तुम्हां ईश्वरसत्ते ॥ परी योगक्षेम स्वशरीरातें ॥ आहांत कीं त्रिवर्ग ॥ ११० ॥ मच्छिंद्र म्हणे अहो जी ताता ॥ तव कृपेची दृष्टी असतां ॥ सदा मिरवूं सर्व क्षेमंता[5] ॥ पदोपदीं अर्थातें ॥११॥ ऐसें वदतां उभय जाण ॥ तों देवांसह उतरला पाकशासन[6] ॥ ब्रह्मा विष्णू रुद्रादि पूर्ण ॥ महीलागीं उतरले ॥१२॥ श्रीनाथास भेटोनि सकळ ॥ मग ठाईं ठाईं सर्व मंडळ ॥ विराजूनि वार्ता सकळ ॥ ठाईं ठाईं करिताती ॥१३॥ येरीकडे गोरक्षनाथें ॥ पाचारूनि मच्छिंद्रातें ॥ म्हणे समुदाय अपरिमित ॥ मिळाला कीं महाराजा ॥ १४ ॥ तरी तुमची कनकवीट ॥ आणोनि देतों सुभट ॥ तितुक्यांत अर्थ सारोनि सुभट ॥ बोळवावें समस्तांतें ॥ १५ ॥ यावरी बोले मच्छिंद्रनाथ ॥ काय करूं ही कनकवीट ॥ तुजएवढा शिष्यवर्गांत ॥ असतां चिंता नसे मज ॥ १६ ॥ ऐसें बोलतां मच्छिंद्रनाथ ॥ गदगदां हांसे गोरक्षसुत ॥ म्हणे महाराजा प्रतापवंत ॥ सकळ तुम्ही प्रगटलां ॥ १७ ॥ ऐसें बोलोनि वागुत्तरीं ॥ माथा ठेवी चरणांवरी ॥ म्हणे महाराजा स्वशरीरीं ॥ स्वस्थ आपण असावें ॥ १८ ॥ अष्टसिद्धी अणिमा गरिमा ॥ प्राप्ती प्राकाम्य आणि महिमा ॥ वशित्व ईशित्व आठवी प्रतिमा ॥ सिद्धींलागीं पाचारा ॥ १९ ॥ पाचारिल्या अष्ट जणी ॥ येवोनि लागल्या गोरक्षचरणीं ॥ म्हणती आज्ञा करा स्वामी ॥ कामनेसह

१ पृथ्वीवर. २ गंधर्वांचा राजा. ३ श्रेष्ठ. ४ ऋषींचे समूह. ५ कल्याण. ६ इंद्र.

अर्थातें ॥१२०॥ येरू म्हणे वो प्रियभामिनी ॥ तृप्त करावें मंडळीलागुनी ॥ षड्रसान्नरुचीकरोनी ॥ संतुष्ट सर्व करावे ॥ २१ ॥ मग तेथ अवश्य म्हणोनि सिद्धी ॥ वेंचिल्या झाल्या आपुल्या बुद्धी ॥ अन्न निर्मिलें पर्वतमांदी ॥ षड्रसादि पक्वान्नें ॥ २२ ॥ ऐशा सिद्धी योजिल्या कामा ॥ याचपरी सडासंमार्जन आरामा ॥ सप्तही संख्या नेमून उत्तमा ॥ मही पवित्र करीतसे ॥२३॥ तरी त्या सप्तही सटव्या कोण ॥ ऐका तयांचीं नामाभिधानें ॥ आणि तयांतें काय कामानें ॥ निरोपिलें विधीनें ॥२४॥ तरी त्या उत्पत्तिस्थानीं जन्मकाळा ॥ जावोनि लक्षावें यांनीं बाळा ॥ विधिअक्षरें लिहिलीं भाळा ॥ वाचूनि पाहती सटव्या ॥ २५ ॥ जरी सप्त सटव्या मानवासी ॥ शोभा न मिरवे असुरप्रदेशीं ॥ रानसटवी वनचरासी ॥ विलोकूनी जातसे ॥ २६ ॥ वृषभ अश्व गांवाचे पशू ॥ घोडसटवी आहे त्यांस ॥ वासतसटवी खेचरांस ॥ पक्षिकुळा मिरवतसे ॥२७॥ अंबुधासटवी जळचरांत ॥ सबुधासटवी उदधी जात ॥ ऐसिया कामीं सटव्या सात ॥ कमलोद्भवें लाविल्या ॥२८॥ त्या सातही परिचारिका ॥ सडासंमार्जन करिती निका ॥ यापरी वाढणें आनंदोदिका ॥ जळदेवता आराधिल्या ॥ २९ ॥ कुमारी धनदा नंदा विमळा ॥ लक्ष्मी विख्याता प्रबळा ज्ञानमंगळा ॥ नववी समर्थ देवता बाळा ॥ ह्या नवही वाढिती सकळांतें ॥१३०॥ गंधर्वें करावें पाचारणें ॥ समाचार घ्यावा अष्टवसूनें ॥ चौकी द्यावी भैरवानें ॥ अष्टदिशा अष्टांनीं ॥३१॥ उपरिचरवसूनें करपल्लवीं ॥ सकळांसी दक्षिणा द्यावी ॥ मच्छिंद्र करीत आघवी ॥ प्रदक्षिणा भावार्थें ॥ ३२ ॥ चित्रसेन गंधर्वपती ॥ तांबूल देतसे सर्वांप्रती ॥ आणि तीर्थ जे गंगाभागीरथी ॥ तोय वाढी सर्वांतें ॥ ३३ ॥ यापरी अष्टोत्तरशत तीर्थें ॥ पाणी वाहती समर्थें ॥ आणि उचलणें उच्छिष्टपात्रांतें ॥ ऐशीं कामें करिताती ॥ ३४ ॥ महानुभाव जो उमापती ॥ अति आदरें स्वपंक्ती ॥ अप्सरा किन्नर गायन करिती ॥ नारदादि येवोनियां ॥ ३५ ॥ ऐसे नेम नेमूनि कामा ॥ दिधलें ऐसें कार्यउगमा ॥ आनंदोत्साह होतां सुकर्मा ॥ सर्वानंद हेलावे ॥ ३६ ॥ ऐसी होतां आनंदस्थिती ॥ परी गहिनी आठवला गोरक्षचित्तीं ॥ मग येवोनियां मच्छिंद्राप्रती ॥ बोलता झाला प्राज्ञिक ॥ ३७ ॥ हे महाराजा गुरुनाथा ॥ प्राणिमात्र आले समर्था ॥ परी कर्दमपुतळा गहिनीनाथ ॥ येथें आणावा वाटतें ॥ ३८ ॥ ऐसें मोहक ऐकोन वचन ॥ म्हणे गंधर्वा पाठवोन ॥ कोंतिगेसहित मधुब्राह्मण ॥ बाळासह आणावा ॥ ३९ ॥ मग चित्रसेना सांगोनि वृत्तांत ॥ पत्र लिहिलें मधुविप्रातें ॥ सुलोचन गंधर्वाचे ओपून हस्तें ॥ कनकगिरीशीं पाठविला ॥ १४० ॥ गंधर्व जावोनि कनकगिरीसी ॥ भेटोनि कोंतिगे मधुविप्रांसी ॥ मग आनंदोत्सव वृत्तांतासी ॥ निवेदिलें सकळ तेथ ॥ ४१ ॥ मग पत्र देवोनि त्याहातीं ॥ वाचून पाहे विप्रमूर्ती ॥ पाचारण ही मजकुरशक्ती ॥ ध्यानालागीं संचरली ॥ ४२ ॥ मग बाळासह सपरिवार ॥ येता झाला मधुविप्र ॥ मुक्कामोमुक्काम महीवर ॥ साधूनियां पोंचला ॥ ४३ ॥ सप्तवर्षी गहिनीनाथा ॥ आणूनि लोटिला पदावरुता ॥ मच्छिंद्र अंकीं घेवोनि

१ पर्वतप्राय. २ ब्रह्मदेवानें. ३ दासी. ४ आमंत्रण. ५ शंकर. ६ गहिनीनाथाचें रक्षण करणारा ब्राह्मण.

त्यातें ॥ प्रेमें चुंबन घेतसे ॥ ४४ ॥ अति स्नेहानें करोनि लालन ॥ म्हणे अवतारी करभंजन ॥ गैबी जन्मला गहिनीनाम ॥ सकळांलागीं दिठावी ॥ ४५ ॥ ऐसिये स्नेहाचा परम अवसर ॥ पाहोनि बोलता झाला शंकर ॥ कीं आम्हांलागीं पुढें अवतार ॥ घेणें आहे मच्छिंद्रा ॥ ४६ ॥ तरी त्या अवतरणीं नेमस्ती ॥ मही मिरवे नामांप्रती ॥ तरी त्या अनुग्रहाचे स्थितीं ॥ गहिनीनाथ वदविला ॥ ४७ ॥ तरी यातें विद्या अभ्यासून ॥ सकळ अधिकारी करावा पूर्ण ॥ मी अनुग्रह याचा घेईन ॥ पुढले ते अवतारीं ॥४८॥ ऐसें सांगतां शिव त्यास ॥ मग बोलावूनि गोरक्षास ॥ प्रत्यक्ष अनुग्रह गहिनीनाथास ॥ गोरक्षानें देवविला ॥ ४९ ॥ सर्व देवांचे साक्षीसहित ॥ मौळीं ठेविला वरदहस्त ॥ ब्रह्मपरायण गहिनीनाथ ॥ जाहला सत्य परियेसा ॥ १५० ॥ अनुग्रहउत्साह मंडळीसंगम ॥ एक मास उभवला आनंदद्रुम ॥ मग कुबेरा पाचारूनि नेम ॥ सांगता झाला गोरक्ष ॥ ५१ ॥ म्हणे हा कनकगिरी जा घेवोन ॥ आम्हां देईं अपार भूषण ॥ सकळ मंडळी गौरवोन ॥ पाठवणें स्वस्थाना ॥ ५२ ॥ मग तो कुबेर बोले वचन ॥ येथेंच असों द्यावें धन ॥ मी लागेल तैसें इच्छेसमान ॥ भूषणातें आणितों ॥ ५३ ॥ मग अपार दिंडें वस्त्रें आणोन ॥ महत्वासारखें दिधलें वांटोन ॥ द्रव्यादि देवोन याचकजन ॥ तोषविले सकळ ॥ ५४ ॥ सकळ तोषले पावोनि मान ॥ पावती आपुलें स्वस्थान ॥ परी मच्छिंद्र तेथें राहोन ॥ अभ्यासिती गहिनीतें ॥ ५५ ॥ उपरी गंधर्व मच्छिंद्रपिता ॥ तो आपुले स्वस्थाना जातां ॥ त्यासवें देऊनि मीननाथा ॥ सिंहलद्वीपीं पाठविला ॥ ५६ ॥ उपरिचर वसूनें मीननाथ ॥ केला किलोतळेच्या हस्तगत ॥ मच्छिंद्राचा सकळ वृत्तांत ॥ निवेदिला तियेसी ॥ ५७ ॥ किलोतळेनें ऐकोनि वृत्तांत ॥ नेत्रीं आणिले अश्रुपात ॥ म्हणे आतां मातें मच्छिंद्रनाथ ॥ कैसा भेटेल कळेना ॥ ५८ ॥ उपरिचर बोले वो शुभाननी ॥ चिंता न करीं कांहीं मनीं ॥ एक वेळां मच्छिंद्रमुनी ॥ निजदृष्टीं पाहसील ॥ ५९ ॥ ऐसें म्हणोन उपरिचर गेला ॥ येरीकडे किलोतळा ॥ हृदयीं कवळोन मीननाथबाळा ॥ प्रेमें चुंबन घेतसे ॥ १६० ॥ म्हणे बाळा माझिये खंती ॥ होतसे कीं तुजप्रती ॥ सोडून आलासी नाथ निगुतीं ॥ श्रीमच्छिंद्र पितयातें ॥ ६१ ॥ ऐसें बोलून मीननाथातें ॥ वारंवार चुंबन घेत ॥ येरीकडे गर्भाद्रीतें ॥ गहिनी विद्या अभ्यासी ॥ ६२ ॥ तये वेळेस कोण कोण तेथें ॥ राहिले होते ऐका नाथ ॥ विचार करोनि उमाकांत ॥ गर्भाद्रीतें राहिले ॥ ६३ ॥ अदृश्य अस्त्र नगीं प्रेरून ॥ स्वस्थाना गेला कुबेर निघोन ॥ तेणें नग तो कनकवर्ण ॥ झांकोळून पैं गेला ॥ ६४ ॥ परी गर्भाद्रिपर्वतांत ॥ वस्तीस राहिला उमाकांत ॥ तो अद्यापि आहे स्वस्थानांत ॥ म्हातारदेव म्हणती त्या ॥ ६५ ॥ तयाचिया पश्चिम दिशेसी ॥ कानिफा राहिला शिष्यकटकेंसीं ॥ वस्ती करोनी नाम या ग्रामासी ॥ मढी ऐसें ठेविलें ॥ ६६ ॥ तयाचे दक्षिण पर्वतीं ॥ राहता झाला मच्छिंद्र जती ॥ त्याहून पूर्वेस महीपर्वतीं ॥ जालिं-

१ दीक्षा. २ मस्तकीं. ३ शिकवीत होते. ४ लोपून. ५ शिष्यमंडळीसह.

दर राहिला ॥ ६७ ॥ आणि त्या पर्वतापैलदेशीं ॥ नागनाथ राहिला वडवानळेंशीं ॥ आणि रेवणसिद्ध जया महीशीं ॥ विटे-
ग्रामीं राहिला ॥ ६८ ॥ वामतीर्थे गर्भाद्रिपर्वतीं ॥ राहता झाला गोरक्ष जती ॥ सेवेसी शिष्य ठेवोनि सत्ती ॥ विद्या सांगे गहि-
नीतें ॥ ६९ ॥ एक वर्षपर्यंत ॥ अभ्यासिला गहिनीनाथ ॥ सकळ विद्येचें स्वसामर्थ्य ॥ तया देहीं सांठविलें ॥ १७० ॥ परी
कोंतीगांवीं मधुब्राह्मण ॥ गेले होते गहिनीस ठेवोन ॥ ते जालंदरासमीप दिशेकारण ॥ वस्तीलागीं विराजले ॥ ७१ ॥ विरा-
जले परी गहिनीनाथ ॥ अभ्यासिते झाले पात्रभरित ॥ मग गोरक्ष बोळवोनि त्यातें ॥ विप्रापाशीं पाठविला ॥ ७२ ॥ यावरी
त्या वस्तीस ॥ वसते झाले बहुत दिवस ॥ शके दहाशें वर्षास ॥ समाधी त्यांनीं घेतल्या ॥ ७३ ॥ घेतल्या परी यवनधर्म ॥
कबरव्यक्त झाले आश्रम ॥ पुढें औरंगजेब तें पाहून ॥ पुसता झाला लोकांसी ॥ ७४ ॥ ह्या कोणाच्या असती कबरी ॥ ते
म्हणती तव पूर्वजांच्या साचारीं ॥ मठींत कान्होबापर्वतीं मच्छेंद्र ॥ आवडतें स्थान याचें तें ॥ ७५ ॥ त्याहून पूर्वेस जालिंदर ॥
विराजली त्याची कबर ॥ त्याहून खालता बळी थोर ॥ गहिनीनाथ नांदतसे ॥ ७६ ॥ मग तेणें ऐकोनि ऐसी मात ॥ पालटिलें
त्या नांवातें ॥ जानपीर जालिंदरातें ॥ ठेविलें असे राजानें ॥ ७७ ॥ गहिनीनाथास गैबी पीर ॥ नाम ठेविलें तेवीं साचार ॥
महजदी बांधोन पुजारे ॥ ठाईं ठाईं स्थापिले ॥ ७८ ॥ मच्छिंद्र आणि कानिफाचें ॥ नामाभिधान बदलून साचें ॥ कान्होबा
मायाबा बोलोन साचें ॥ यवन पुजारी स्थापिले ॥ ७९ ॥ कल्याण कलबुर्गी बाबाचैतन्य ॥ राजबागशर नाम ठेविलें त्यानें ॥
म्हणाल केलें यवनकारण ॥ ऐसें विपरीत त्या रायें ॥ १८० ॥ परी समाधी पाहिल्या कबरीऐशा ॥ म्हणोनि त्यातें पडला भौंस ॥
कीं हे पीर असतील यवनकुळींचे ॥ म्हणोन प्रविष्ट करावें ॥ ८१ ॥ म्हणोन ऐसें कृत्य घडलें ॥ यापरी ऐकोन श्रोता बोले ॥ कीं
कबरयुक्त नाथ केले भले ॥ काय म्हणोनि झालेती ॥ ८२ ॥ तरी ते अंतरसाक्ष नाथ ॥ यवन राजे होतील महीतें ॥ ते छळतील
हिंदुदेवांतें ॥ म्हणोन कबरी बांधिल्या ॥ ८३ ॥ परी हें असो आतां कथन ॥ मध्यें कथा असती दैदीप्यमान ॥ नाथांनीं योजून
आपुलालें स्थान ॥ ठाईं ठाईं राहिले ॥ ८४ ॥ गोरक्ष सटव्या ठेवोन रक्षण ॥ निघता झाला तीर्थाकारण ॥ त्या सटव्या तेथें
अद्याप राहून ॥ रक्षिताती स्थानासी ॥ ८५ ॥ यापरी पुढें गोरक्षनाथ ॥ भेटेल जाऊन भर्तरीस ॥ ती कथा पुढें रसाळभरित ॥
श्रोतिये श्रवणीं स्वीकारा ॥ ८६ ॥ नरहरिवंशीं धुंडीकुमर ॥ कवि माळू असे संतकिंकर ॥ कथा सांगेल भक्तिसार ॥ भर्तरीचें
आख्यान ॥ ८७ ॥ स्वस्ति श्रीभक्तिसार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ त्रयोविंशा-
ध्याय गोड हा ॥ २३ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

१ सात. २ खरोखर. ३ कल्पना. ४ साधुजनांचा सेवक.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी निरंजना ॥ अलक्ष गोचरव्यक्त निर्गुणा ॥ पूर्णब्रह्मा मायाहरणा ॥ चक्रचाळका आदि-पुरुषा ॥ १ ॥ हे गुणातीता सर्वत्रभरिता ॥ सगुणरूपा लक्ष्मीकांता ॥ मागिले अध्यायीं रसाळ कथा ॥ मच्छिंद्रोत्सव दाविला ॥ २ ॥ एका सुवर्णविटेसाठीं ॥ कनकगिरि करी गोरक्षजेठी ॥ आतां मम वाग्वटीं ॥ भर्तरीआख्यान वदवीं कां ॥ ३ ॥ तरी श्रोते ऐका कथन ॥ पूर्वी [१]मित्ररश्मी करितां गमन ॥ वातचक्रीं प्रेरून स्यंदन ॥ अस्ताचळा जातसे ॥ ४ ॥ तों उर्वशी विमानासनीं ॥ येत होती [३]भूलोकअवनीं ॥ तंव ती दारा मुख्यमंडनीं ॥ मदनबाळी देखिली ॥ ५ ॥ देखतांच [४]पंचबाणीं ॥ शरीर वेधलें मित्रावरुणी ॥ वेधतांचि इंद्रियस्थानीं ॥ येऊनि रेत झगटलें ॥ ६ ॥ झगटतांचि इंद्रिय रेत ॥ स्थान सोडून झालें विभक्त ॥ विभक्त होतां पतन त्वरित ॥ आकाशाहून पैं झालें ॥ ७ ॥ परी आकाशाहून होतांच पतन ॥ वातानें तें विभक्तपण ॥ द्विभाग झालें महीकारण ॥ येऊनियां आदळलें ॥ ८ ॥ एक भाग लोमशआश्रमा ॥ येऊन पावला थेट उत्तमा ॥ घटीं पडतांचि तनू उत्तमा ॥ अगस्तीची ओतली ॥ ९ ॥ यापरी दुसरा भाग ॥ तो कौलिक ऋषीच्या आश्रमा चांग ॥ येतांच कैसा झाला वेग ॥ तोचि श्रवण करा आतां ॥ १० ॥ कौलिक घेऊन [५]पात्रभर्तरी ॥ भिक्षोद्देश धरून अंतरीं ॥ निघता झाला सदनाबाहेरी ॥ वस्तीपर्यटण करावया ॥ ११ ॥ परी कौलिक येतांच बाहेर ॥ भर्तरी ठेवून महीवर ॥ बंद करीतसे सदनद्वार ॥ कडीटाळें देऊनियां ॥ १२ ॥ परी भर्तरी ठेविली अंगणांत ॥ तों आकाशांतून रेत त्यांत ॥ येऊनियां अकस्मात ॥ भाग एक आदळला ॥ १३ ॥ तों इकडे कौलिक ऋषी ॥ टाळें देऊन गृहद्वारासी ॥ येऊन पाहे भर्तरीसी ॥ तों रेत व्यक्त देखिलें ॥ १४ ॥ रेतव्यक्त देखतांच पात्र ॥ अंतःकरणीं विचारी तो पवित्र ॥ चित्तीं म्हणे वरुणीमित्र ॥ रेत सांडिलें भर्तरीं ॥ १५ ॥ तरी यांत धृमीनारायण ॥ अवतार घेईल कलींत पूर्ण ॥ तीन शत एक सहस्र दिन ॥ वर्षे लोटलीं कलीचीं ॥ १६ ॥ इतुकीं वर्षे कलीचीं गेलिया ॥ धृमीनारायण अवतरेल भर्तरीं या ॥ तरी आतां भर्तरी रक्षूनियां ॥ ठेवूं आश्रमीं तैसीच ॥ १७ ॥ मग ती भर्तरी रेतव्यक्ती ॥ रक्षिता झाला आश्रमाप्रती ॥ त्यास दिवस लोटतां बहुतीं ॥ पुढें कलि लागला ॥ १८ ॥ मग तो कौलिक ऋषी ॥ गुप्त विचारितां प्रगट देशीं ॥ भर्तरी नेऊन मंदराचळासीं ॥ गुहाद्वारीं ठेविली ॥ १९ ॥ गुहाद्वारीं ठेवून पात्र ॥ अदृश्य विचरे तो पवित्र ॥ तों कलि लोटतां वर्षे तीन सहस्र ॥ एकशतें तीन वर्षे ॥ २० ॥ तों द्वारकाधीशअंशेंकरून ॥ भर्तरींत संचरला धृमीनारायण ॥ जीवित्व व्यक्त रेताकारण ॥ होतांच वाढी लागला ॥ २१ ॥ वाढी लागतां दिवसेंदिवस ॥ पुतळा रेखित चालिला विशेष ॥ पूर्ण भरतां नवमास ॥ सिद्ध झाला तो पुतळा ॥ २२ ॥ परी मधुमक्षिकेनें पात्रांत ॥ मधूचें जाळें केलें होतें ॥ तयाचे संग्रहें व्यक्त ॥ बाळ वाढी

१ वाणीनें. २ सूर्यकिरण. ३ पृथ्वीवर. ४ मदनाच्या बाणांनीं. ५ वाटी.

लागला ॥ २३ ॥ वाढी लागतां मधुबाळ ॥ नवमास लोटतां गेला काळ ॥ परी तो देहें होतां स्थूळ ॥ भर्तरी पात्र भंगलें ॥ २४ ॥ बहुत दिवसांचें पात्रसाधन ॥ झालें होतें कुंइजटपण ॥ त्यांत पर्जन्यकाळीं कड्यावरून ॥ पर्वत कोसळतां लोटले ॥ २५ ॥ कोसळतां परी एक पाषाण ॥ गडबडींत पातला तें स्थान ॥ परी पावतांच पात्रास झगडोन ॥ भर्तरी भंग पावली ॥ २६ ॥ भर्तरी भंगतांच बाळ त्यांत ॥ तेजस्वी मिरवलें शकलांत ॥ मैक्षिकेचें मोहळ व्यक्त ॥ तेंही एकांग जाहलें ॥ २७ ॥ मग निर्मळपणीं बाळ विरक्त ॥ मिरवों लागलें स्वतेजांत ॥ जैसें अभ्र वेगळें होतां दीप्त ॥ निर्मळपणीं मिरवतसे ॥ २८ ॥ कीं स्थिरावल्या जैसें जीवन ॥ तळा बैसलें गढूळपण ॥ तें बाळ भर्तरी शुक्तिकारत्न ॥ विमुक्त झालें वेष्टणा ॥ २९ ॥ परी कडा कोसळला कडकडीत ॥ शब्द जाहले अति नेट ॥ तेणेंकरून मक्षिका अचाट ॥ भय पावोन पळाल्या ॥ ३० ॥ येरीकडे एकटें बाळ ॥ शब्दरुदनीं करी कोल्हाळ ॥ तेथें चरे कुरंगमेळ ॥ तया ठायीं पातला ॥ ३१ ॥ तयांत गरोदर कुरंगिणी ॥ चरत आली तये स्थानीं ॥ तों बाळ रुदन करितां नयनीं ॥ निवांत तृणीं पडलीसे ॥ ३२ ॥ तरी अफाट तृण दिसे महीं ॥ त्यांतही बाळ सबळ प्रवाहीं ॥ चरत येतां हरिणी तया ठायीं ॥ प्रसूत झाली बाळ पैं ॥ ३३ ॥ प्रसूत होतां बाळें दोनीं ॥ झालीं असतां कुरंगिणी ॥ पुनः मागें पाहे परतोनी ॥ तों तीन बाळें देखिलीं ॥ ३४ ॥ माझींच बाळें त्रिवर्ग असती ॥ ऐसा भास ओढवला चित्तीं ॥ मग जिव्हा लावून तयांप्रती ॥ चाटून घेतलें असे ॥ ३५ ॥ परी तीं खडतरपणीं दोन्हीं पाडसें तीतें ॥ संध्याअवसरीं झगटलीं स्तनातें ॥ परी हें बाळ नेणे पानातें ॥ स्तन कवळावें कैसें तें ॥ ३६ ॥ मग ते कुरंगिणी लोटून पाडस ॥ चहूंकडे ठेवून चौंपदांस ॥ मग वत्सलोन लावी कासेस ॥ मुख त्याचें थानासी ॥ ३७ ॥ ऐसे लोटतां कांहींएक दिवस ॥ तों रांगूं तें लागलें महीस ॥ मग ते मृगी लावून थानास ॥ संगोपन करीतसे ॥ ३८ ॥ ऐसें करवोनि स्तनपान ॥ नित्य पाजी कुरंगिणी ॥ आपुले मुखींची जिव्हा लावूनी ॥ करी क्षाळण शरीरासी ॥ ३९ ॥ पाडसें ठेवून तया स्थानीं ॥ चरूं जातसे विपिना हरिणी ॥ घडोघडीं येतसे परतोनी ॥ जाई पाजून बाळातें ॥ ४० ॥ ऐसें करितां संगोपन ॥ वर्षें लोटलीं तयातें दोन ॥ मग हरिणांमध्येंचि जाऊन ॥ पत्रें भक्षी वृक्षांचीं ॥ ४१ ॥ परी त्या वनचरांचे मेळीं ॥ विचरतां सावजभाषा सकळी ॥ स्पष्ट होऊनि त्या मंडळीं ॥ त्यांसमान बोलतसे ॥ ४२ ॥ हस्तिवर्ग गायी म्हैशी व्याघ्र ॥ जंबुक लांडगे हरिण भयंकर ॥ शार्दूळ रोही गेंडा सांबर ॥ भाषा समजे सकळांची ॥ ४३ ॥ सर्प किडे मुंगी पाळी ॥ पक्षी यांची बोली सकळी ॥ तैसेंच कोकून उत्तर पावलीं ॥ देत असे सकळांसी ॥ ४४ ॥ ऐसियापरी वनचररंगणीं ॥ प्रत्यक्ष अवतार विचरे काननीं ॥ जिकडे जिकडे जाय हरिणी ॥ तिकडे तिकडे



१ कुजलेलें. २ एका भागांत. ३ मधमाशांचें पोळें असलेलें. ४ हरिणसमुदाय. ५ कोल्हे. ६ एक प्रकारचा मृग. ७ त्याप्रमाणेंच स्वर काढून.

जातसे ॥ ४५ ॥ ऐसें पांच वर्षेपर्यंत ॥ हरिणीमागें तो हिंडत ॥ तों एके दिवशीं चरत चरत ॥ हरिणी आली त्या मार्गें ॥ ४६ ॥ काननीं चरतां मार्गें नेटें ॥ तो बाळही आला ते वाटे ॥ तों मार्गीं सहस्र पुरुष भाट ॥ मग त्या वाटे तीं येती ॥ ४७ ॥ त्या भाटा जयसिंग नाम ॥ कांता रेणुका सुमध्यम ॥ परी उभयतांचा एक नेम ॥ एकचित्तीं वर्तती ॥४८॥ वर्तती परी कैसे अलोटीं ॥ शत्रुमित्र ऐक्यदृष्टीं ॥ कीं धनदघातका मोह पोटीं ॥ समानचि वर्ततसे ॥ ४९ ॥ तन्न्यायें पुरुषकांता ॥ प्रपंचराहाटीं वर्तत असतां ॥ तों सहज त्या मार्गें येतां ॥ तया ठायीं पातले ॥ ५० ॥ पातले परी मार्गावरती ॥ बाळ देखिलें दिव्यशक्ती ॥ बालार्क[१]-किरणी तेजाकृती ॥ लखलखित देखिलें ॥ ५१ ॥ कीं सहजासहज करावया गमन ॥ महीं उतरला रोहिणीरमण[२] ॥ कीं पावक-तेजकांती वसन[३] ॥ गुंडाळलें वाटतसे ॥ ५२ ॥ ऐशापरी तेजःपुंज ॥ जयसिंग भाट देखतां सहज ॥ मनांत म्हणे अर्कतेज ॥ बाळ असे कोणाचें ॥ ५३ ॥ ऐसें स्त्रियेस म्हणतसे ॥ ऐसिया अरण्यांत असे ॥ बाळ सांडून गेलीं सुरस ॥ मातापिता कैसीं तीं ॥ ५४ ॥ कीं सहजचालीं चालतां ॥ यांत चुकली याची माता ॥ ऐसे अपार संशय घेतां ॥ तयापाशीं पातले ॥ ५५ ॥ पातले परी बाळ पाहोन ॥ भयें व्याप्त झालें मन ॥ मग मृग बोलिले आरंबळोन ॥ पळूं लागले मार्गातें ॥ ५६ ॥ तें पाहून जयसिंग भाटें ॥ धांवोनि धरिली बाळकाची पाठ ॥ पाठीं लागून धरून मनगट ॥ उभा केला बाळ तो ॥ ५७ ॥ उभा करून त्यातें बोलत ॥ म्हणे बाळा सांडीं भयातें ॥ तूतें भेटवीन तव मातेतें ॥ माता कोण ती सांग ॥ ५८ ॥ परी तें कुरंगभाषेंकरून ॥ आरंबळतसे छंदेंकरून ॥ नेत्रा लोटलें अपार जीवन[४] ॥ हांक मारी हरिणीतें ॥ ५९ ॥ परी ते हरिणी बाळ पाहून ॥ कासावीस झाले परम प्राण ॥ परी मनुष्य-भयेंकरून ॥ निकट येऊं शकेना ॥ ६० ॥ हरिणी आपुले ठायींच्या ठायीं ॥ परम आरंबळे[५] महीतें देहीं ॥ येरीकडे मार्ग-प्रवाहीं ॥ भाट बोले बाळातें ॥ ६१ ॥ म्हणे वत्सा व्यर्थ कां रडसी ॥ कोण मातापिता आहे तुजसी ॥ सोडून गेलीं अरण्यासी ॥ तरी भेटवूं तुज आतां ॥ ६२ ॥ परी कुरंगभाषेकरून ॥ ब्यां ब्यां करून करी रुदन ॥ मग भाट म्हणे हें वाचाहीन ॥ मुखस्तंभ[६] वाटतसे ॥ ६३ ॥ मग हस्तखुणेनें पुसे त्यातें ॥ परी खूणही तें नेणे परतें ॥ मग जयसिंग म्हणे आपुले मनातें ॥ परम अज्ञानी बाळक हें ॥ ६४ ॥ तरी आतां असो कैसें ॥ यातें आपुल्या न्यावें वस्तीस ॥ याची जननी भेटल्यास ॥ हस्तगत यातें करूं ॥६५॥ ऐसा विचार करून मानसीं ॥ उचलून घेतला स्वस्कंधासीं[७] ॥ परी तें आरंबळोन हरिणीसी ॥ पाचारीत अट्टहास्यें ॥ ६६ ॥ परी ती कुरंगभाषा कांहीं ॥ जयसिंगातें माहीत नाहीं ॥ तैसें वाहून मार्गप्रवाहीं ॥ घेऊन जात बाळका ॥ ६७ ॥ परी त्या बाळकासी घेऊन जातां ॥ अति आरंबळे हरिणी चित्ता ॥ सव्यअपसव्य वेढा भंवता ॥ घेऊन हंबरडा मारीतसे ॥ ६८ ॥

१ सकाळच्या कोमल सूर्यासारखा तेजस्वी. २ चंद्र. ३ वस्त्र. ४ अश्रू. ५ ओरडूं लागली. ६ मुकें. ७ आपल्या खांद्यावर.

बाळावरी ठेवून दृष्टी ॥ धांव घेतसे पाठोपाठीं ॥ ठायीं ठायीं महीतटीं ॥ उभी राहून आरंबळे ॥ ६९ ॥ ऐसी हरिणी आरं-बळत ॥ दुरोन त्यासी मार्गें गमत ॥ परी तो जयसिंग पाहून मनांत ॥ विचार करी आपुल्या ॥ ७० ॥ म्हणे ही हरिणी कवणे अर्थीं ॥ हिंडत आहे काननाप्रती ॥ पाडस चुंकार झालें निगुंतीं ॥ म्हणोनि हिंडे विपिनीं ही ॥ ७१ ॥ ऐसियेपरी चित्तीं भास ॥ भासून गमन करीतसे मार्गास ॥ गमन करितां स्वगृहास ॥ वस्तीस जाऊनि पोहोंचला ॥ ७२ ॥ मग ती वस्ती पाहोनि हरिणी ॥ विपिना गेली निराशपणीं ॥ परी ठायीं ठायीं उभी राहूनी ॥ हंबरडा मारी आक्रोशें ॥ ७३ ॥ येरीकडे जयसिंग भाट ॥ येतां ग्रामा झाला प्रविष्ट ॥ बाळ ओपून कांते सुभट ॥ वस्ती फिरूं पातला ॥ ७४ ॥ सकळ वस्तीची फेरी फिरून ॥ पुन्हां शिबिरा येत परतोन ॥ ऐसें करितां मास तीन ॥ लोटून गेले वस्तीसी ॥ ७५ ॥ परी तें बाळ आरंबळतां ॥ भयानें राहिली सकळ व्यथा ॥ मग थोडी थोडी संवय लागतां ॥ हरिणीस विसर पडला ॥ ७६ ॥ तेचि नीतीं बाळ विसर ॥ शनैकें पडला कुरंगापर ॥ मग भोजनपानादिक सारासार ॥ कळों सविस्तर लागलें ॥ ७७ ॥ बोली चाली शनैःशनैक ॥ प्रविष्ट जाहलें तें बाळक ॥ मग हांका मारी जननी जनक ॥ भक्षावया मागतसे ॥ ७८ ॥ असो ऐसियापरी अलोट ॥ ग्रामो-ग्रामीं हिंडे भाट ॥ हिंडतां हिंडतां भागीरथीतट ॥ काशीक्षेत्रीं पातला ॥ ७९ ॥ पातला परी विश्वेश्वरीं ॥ दर्शना जात देवालयांतरीं ॥ स्नान करूनी भागीरथीतीरीं ॥ बाळ घेऊन गेला असे ॥ ८० ॥ विश्वेश्वराचें दर्शन करीत ॥ तों लिंगांतून बोलिला उंमाकांत ॥ यावें भर्तरीअवतारांत ॥ दृश्य झालां तुम्हीं कीं ॥ ८१ ॥ ऐसें ऐकून नमस्कारितां ॥ शब्दोदयीं झाला बोलता ॥ त्याचे ते शब्द सहजता ॥ जयसिंगें ऐकिले ॥ ८२ ॥ मग तो मनांत करी विचार ॥ बाळ हें करितां नमस्कार ॥ शिव-लिंग बोले अति मधुर ॥ भर्तरी ऐसें म्हणोनी ॥ ८३ ॥ तरी हा आहे कोण अवतारदक्ष ॥ स्वर्गवासी आहे प्रत्यक्ष ॥ परी प्रारब्धयोगें आम्हां सुलक्ष ॥ प्राप्त झाला वाटतसे ॥ ८४ ॥ जैसा दरिद्रिया मांदुसघट ॥ सहज चालतां आदळे वाट ॥ तेवीं आम्हां बाळ चोखट ॥ प्राप्त झालें दैवयोगें ॥ ८५ ॥ कीं चिंतातुरासी चिंतामणी ॥ अवचट लाधला मार्गेंकरूनी ॥ तेवीं मातें अवतारतरणी ॥ प्राप्त झाला दैवानें ॥ ८६ ॥ कीं दुष्ट काळाची थोर रहाटी ॥ प्राण अन्नावीण होतां कष्टी ॥ तैं सुरभि येऊन कृपा-होटीं ॥ थान आपुलें ओपीतसे ॥ ८७ ॥ तन्न्याय मातें झालें ॥ निर्दैवा दैवें बाळ लाधलें ॥ लाधलें परी पुण्य पावलें ॥ अवतारी दिसतो हा ॥ ८८ ॥ हें पुण्य तरी वर्णूं केवढें ॥ जयासाठीं हा स्थूळवट दगड ॥ हर्षें पावून संस्कारपाड ॥ यावें भर्तरी म्हणतसे ॥ ८९ ॥ तरी आतां भर्तरी नाम ॥ थोर पाचारूं वाचेकारण ॥ ऐसी चित्तीं कल्पना योजून ॥ पुन्हां शिबिरा पातले ॥ ९० ॥

१ चुकलेलें. २ खरोखर. ३ अरण्यांत. ४ हळूहळू. ५ शंकर. ६ द्रव्याची घागर. ७ एकाएकीं. ८ कामधेनू. ९ राहाण्याच्या घरीं.

पातले परी कांतेलागून ॥ सर्व निवेदिलें वर्तमान ॥ म्हणे हा पुत्र तुजकारण ॥ अवतारदक्ष[1] सांपडला ॥ ९१ ॥ तरी हा अवतार-दक्ष कैसा ॥ म्हणशील तरी वो वाग्रसा[2] ॥ तरी शिव प्रत्यक्ष बोलिला ऐसा ॥ यावें भर्तरी म्हणोनी ॥ ९२ ॥ अगे हा बाळ करितां नमन ॥ ध्वनि हे निघाली लिंगांतून ॥ ती म्यां ऐकिली आपुल्या कानें ॥ म्हणोनि म्हणतों अवतार हा ॥ ९३ ॥ तरी आतां येथून यातें ॥ भर्तरी ऐसें नाम निश्चित ॥ पाचारून अंतर्भूत ॥ पालन करीं बाळाचें ॥ ९४ ॥ ऐसें सांगून तो युवती ॥ टाकून गेला फेरीप्रती ॥ परी श्रोते चित्तीं कल्पना घेती ॥ शिव कां बोलिला भर्तरी ॥ ९५ ॥ यावें भर्तरी ऐसें वचन ॥ किमर्थ वदला उमारमण[3] ॥ तरी तो भर्तरींत पावला जन्म ॥ म्हणोनि शिव बोलिला असे ॥ ९६ ॥ भर्तरीअवतार सघन ॥ यावें भर्तरी ऐसें म्हणोन ॥ तरी आतां ऐसें ऐका वचन ॥ कथा पुढें परिसावी ॥ ९७ ॥ ऐसें जयसिंग रेणुकेसी ॥ सांगून वर्तमान तियेसी ॥ भर्तरी नाम आनंदेंसीं ॥ पाचारीत उभयतां ॥ ९८ ॥ त्या उभयतांचे जठरांतरीं ॥ संतति नसे संसारविहारीं ॥ म्हणोनि स्नेहाची मोहित लहरी ॥ बोलली असे तयातें ॥ ९९ ॥ रेणुका नित्य बैसवोन अंकीं ॥ चुंबन घेतसे लालनअंकीं ॥ नाना पदार्थ मागितल्या कीं ॥ आणून देती उभयतां ॥ १०० ॥ आसन वसन भोजन पान ॥ देती करिती बहु लालन ॥ बाळ खेळतांना पाहून ॥ हर्षयुक्त होती ते ॥ १ ॥ बाळ भर्तरी पंचवर्षी ॥ बोबडें बोले नाचे महीसीं ॥ नाच नाचोनि धांवोनि कंठासीं ॥ मिठी घाली मातेच्या ॥ २ ॥ मिठी घालितां रेणुका सती ॥ उचलून घेत अंगावरती ॥ चुंबन घेतां उभयतीं ॥ हास्यवदन करिताती ॥ ३ ॥ हांसून एक-मेकां म्हणती ॥ ईश्वर पावला आपणाप्रती ॥ उदरीं नसतां स्वसंतती ॥ ईश्वरें दिधला कृपेनें ॥ ४ ॥ दिधला परी आक्षेप[4] चित्तासी ॥ घेऊन म्हणती या बाळासी ॥ मातापिता चुकल्यासी ॥ शोधीत असती महीतें ॥ ५ ॥ परी ते शोधितां कोठें ॥ अवचित[5] जरी पडली गांठ ॥ मग ते आपणापासून नेटें ॥ घेऊन जातील बाळातें ॥ ६ ॥ ऐसी चिंता उभयतीं ॥ नित्य नित्य हृदयीं वाहती ॥ अहा हें बाळ अलोलिक स्थिती ॥ स्वरूपा मिती[6] नसे याच्या ॥ ७ ॥ ऐसें बाळ हें परम सगुण ॥ हें तों नेतील आम्हांपासून ॥ ऐसें चिंतिती परी मन ॥ घोंटाळत उभयतांचें ॥ ८ ॥ मग ते उभयतां विचार करिती ॥ कीं यास सोडून क्षेत्राप्रती ॥ मही हिंडतां कोणे क्षितीं[7] ॥ गांठी पडेल तयांची ॥ ९ ॥ मग त्या क्षेत्रीं स्थळ पाहून ॥ राहते झाले भिक्षुकपणें ॥ भिक्षा मागून क्षेत्राकारण ॥ निर्वाहातें चालविती ॥ ११० ॥ यापरी तें भर्तरी बाळ ॥ मेळ मुलांचे स्थावरमंडळ ॥ तयांमाजी खेळे खेळ ॥ राजचिन्हें सर्वस्वीं ॥ ११ ॥ आपण सर्वांचा होऊन राव ॥ मुलांचींच मुलें सर्व ॥ काठीचे करून अश्व ॥ शाळा लाविल्या तयानें ॥ १२ ॥ मंत्री परिचारक[8] पायदळ जन ॥ स्वार झुंझार[9] कारकून ॥ नाना वेष मुलांस दाखवून ॥ राजचिन्हें करीतसे ॥ १३ ॥ तरी खेळ नव्हे भविष्य

१ अवतारी. २ वाणीनें. ३ शंकर. ४ संशय, शंका. ५ अकस्मात. ६ मर्यादा. ७ पृथ्वीवर. ८ चाकर. ९ योद्धे.

होणार ॥ होय भाग्याचा संस्कार ॥ जैसें ज्याचें भाग्य पर ॥ चिन्हें उदय पावलीं ॥ १४ ॥ तरी असो राजचिन्हीं ॥ खेळ खेळतां बाळपणीं ॥ तों एके दिवशीं आरोहणोनी ॥ काष्ठशालिके पळताती ॥ १५ ॥ पळती ते वाताकृती ॥ मुखें हो हो करून म्हणती ॥ हो हो म्हणून थापटिती ॥ काष्ठशालिके अश्वातें ॥ १६ ॥ ऐसें खेळतां सोडून क्षेत्र ॥ धांवती भरले काननीं सर्वत्र ॥ एकांत विपिनीं खेळ खेळत ॥ सन्निध कोणी नसेचि ॥ १७ ॥ परी ते कानन चव्हाट्यांत ॥ भर्तरी धांवतां शालिका अश्वातें ॥ तों पायास ठेंच लागून महीतें ॥ उलथोनियां पडियेला ॥ १८ ॥ पडिला महीं कासावीस ॥ होऊन सांडिलें शुद्धबुद्धीस ॥ नेत्रें विकासून महीतें ॥ दाविता झाला तत्क्षणीं ॥ १९ ॥ ते श्वेतवर्ण पाहून नयन ॥ अर्भकें पळालीं भयेंकरून ॥ म्हणती भर्तरी पावला मरण ॥ भूत होईल आतां हा ॥ १२० ॥ मग हा आपुल्या लागोन पाठीं ॥ भक्षील सकळ मग शेवटीं ॥ ऐसें भय मानून पोटीं ॥ पळून गेलीं अर्भकें ॥ २१ ॥ जाऊन भागीरथीघांटावर ॥ करीत बैसलीं आहेत विचार ॥ म्हणती भर्तरिया भूत थोर ॥ होऊनि हिंडे ग्रामांत ॥ २२ ॥ मग गडे हो आपण गल्लीसीं ॥ कैसें खेळावें भक्षील आपणासी ॥ तरी आतां आपुले ग्रामासीं ॥ खेळ खेळूं सदनांत ॥ २३ ॥ यापरी दुसरा अर्भक बोलत ॥ कीं बरवें सांडिलें काननातें ॥ मनुष्य कोणी नव्हतें तेथें ॥ भक्षिलें असतें आपणांसी ॥ २४ ॥ ऐसे अर्भक घांटावर ॥ करीत बैसले आहेत विचार ॥ तों येरीकडे मूर्च्छा अपार ॥ भर्तरीतें वेधली ॥ २५ ॥ महीं पडलासे उलथोन ॥ शरीर सुकलें तेणेंकरून ॥ ठायीं ठायीं भेदले पाषाण ॥ रुधिर तेणें वाहातसे ॥ २६ ॥ ऐसे होतां अवस्थेसी ॥ मैत्रावरुणें पाहिलें त्यासी ॥ मग पुत्रमोह हृदयासी ॥ परम कळवळा दाटला ॥ २७ ॥ मग महीस मित्रावरुणी ॥ येता झाला स्नेहेंकरूनी ॥ अति लगबगें बाळ उचलोनी ॥ हृदयालागीं कवळिलें ॥ २८ ॥ त्वरें आणून भागीरथीजीवन ॥ तयास करविलें तोयपान ॥ हृदयालागीं आलिंगून ॥ सावध केलें बाळासी ॥ २९ ॥ आणि पाहून स्वयें कृपादृष्टीं ॥ मग दुःखलेशाची झाली फिटी ॥ पाषाणघाव घसवटीं ॥ अदृश्यपणें मिरवले ॥ १३० ॥ मग तो बाळ सावधपणीं ॥ अंकीं घेऊन मिरवोनी ॥ परम स्नेहें मुखावरोनी ॥ वरदहस्तें कुरवाळी ॥ ३१ ॥ यापरी विप्राचा वेष धरोनी ॥ तेथोनि चालिला मित्रावरुणी ॥ भर्तरीचा धरोनि पाणी ॥ सदनालागीं आणीतसे ॥ ३२ ॥ तों मार्गी येतां घाबरे ॥ पाहते झाले सर्व किशोर ॥ पाहतांच म्हणती भर्तरी थोर ॥ भूत होऊनि आला रे ॥ ३३ ॥ ऐसें म्हणून आरडोनी ॥ पळताती अति भयेंकरूनी ॥ आपुलाले सदना जाऊनी ॥ भयें दडती संधींत ॥ ३४ ॥ येरीकडे मित्रावरुणी ॥ सदनीं आला त्यास घेऊनी ॥ माता रेणुकेस पाचारोनी ॥ म्हणे सांभाळीं बाळातें ॥ ३५ ॥ मग ते चरणीं ठेऊन माथा ॥ म्हणे महाराजा हे ताता ॥ आपण



१ वर चढून. २ लांकडी बाहुल्या करून. ३ मुलें. ४ अरण्य. ५ रक्त. ६ गंगेचें पाणी. ७ हात.

कोण्या ग्रामीं असतां ॥ परम स्नेहाळू आहां कीं ॥ ३६ ॥ ते रेणुका प्रेमळ सती ॥ पाहतां विप्र दिव्यमूर्तीं ॥ वस्त्रासन[1] टाकून
निगुतीं ॥ बैसविलें त्यावरी ॥ ३७ ॥ मग म्हणे बाळका करीं कवळून ॥ आणिलें तुम्हीं मोहेंकरून ॥ तरी सकळ संशय सोडून ॥
नामाभिधान मज सांगा ॥ ३८ ॥ येरी म्हणे वो सती ऐक ॥ या बाळाचा मी असें जनक ॥ म्हणोन स्नेहाचें दोंदिक ॥ तरी
तुजपाशीं मी आलों ॥ ३९ ॥ तरी बाळ तुजकारणें ॥ कायावाचा केलें अर्पण ॥ परी तूंही आतां संशय टाकून ॥ संगोपन करीं
याचें ॥ १४० ॥ तें ऐकून बोले ऐसें ॥ तुम्ही बाळकाचे जनक कैसे ॥ येरी म्हणे वो अनायासें ॥ कथा ऐक बाळाची
॥ ४१ ॥ अगे मी विप्रवेषें तूतें ॥ दिसत आहें परी मी दैवत ॥ मित्रावरुणी नाम मातें ॥ महीलोंगीं[2] वदतात ॥ ४२ ॥ मग
मूळापासून तीतें कथन ॥ भर्तरीपात्रव्यक्त जनन ॥ हरिणीस्तनींचें संगोपन ॥ सकळ निर्णय वदलासे ॥ ४३ ॥ तरी या
बाळाचें संभवन ॥ अपूर्व आहे महीकारण ॥ परी असो पूर्ण दैवानें ॥ लाभ झाला तुज याचा ॥ ४४ ॥ झाला परी आर्तभूत ॥
जगीं म्हणवीं कां आपुला सुत ॥ काया वाचा बुद्धि सुत ॥ रक्षण करीं उचित हें ॥ ४५ ॥ ऐसें सांगून मित्रावरुणी ॥ जाता
झाला आपुले स्थानीं ॥ येरीकडे नितंबिनी[3] ॥ परम चित्तीं तोषली ॥ ४६ ॥ मग भ्रतारासी सांगून वर्तमान ॥ तोही हर्षे ऐकून ॥
मग जननीजनकांचें भय पूर्ण ॥ बाळप्रकरणीं फिटलें ॥ ४७ ॥ जैसें वस्त्र स्पर्शिल्या सावणीं ॥ सकळ मळाची होय हानी ॥
तेवीं मित्रावरुणवाचेकरूनी ॥ सकळ संशय फिटला ॥ ४८ ॥ किंवा गढूळ झालें असतां उदक ॥ स्थिरावल्या दावी पवित्र
मुख ॥ तेवीं त्याचा समूळ धाक ॥ फिटून गेला तत्काळ ॥ ४९ ॥ कीं दारा सगुणपर ॥ गृहीं असतां गरोदर ॥ परी प्रसूतीचें
भय थोर ॥ प्रसूत झालिया फिटतसे ॥ १५० ॥ कीं अनभ्यस्त कासे लागतां ॥ परम भय मानी पार होतां ॥ परी पार झालिया
सकळ चिंता ॥ फिटोनि जाय सैंरितेची ॥ ५१ ॥ कीं अचाट काननीं तस्करभयातें ॥ मार्ग मिळाला भयव्यक्त ॥ परी वस्ती
पावल्या स्वस्थचित्त ॥ भयापासून होतसे ॥ ५२ ॥ तन्न्यायें मित्रावरुणी ॥ वार्ता ऐकतां उभय कर्णीं ॥ भयमुक्त होती आनंदोनी ॥
हेलावे चित्त पूर्णत्वें ॥ ५३ ॥ जैसें दुःख जाऊन होतां सुख ॥ पोसे शरीर दोंदिक ॥ तेवीं त्यांचे चित्तीं बलाहक[5] ॥ आनंदाचा
उदेला ॥ ५४ ॥ मग ते अतिप्रेमेंकरून ॥ आशापाशाचें गुंतलें बंधन ॥ मग परम स्नेहाचा खुंट उभवोन ॥ गरके घालिती त्यासवें
॥ ५५ ॥ ऐसियापरी दिवसेंदिवस ॥ परम उदेले लालनपालनास ॥ तंव काशीक्षेत्रीं पुण्यवस्तीस ॥ पंच वरुषें लोटलीं
॥ ५६ ॥ तो षड्दशवर्षी[6] भर्तरीनाथ ॥ पूर्ण झाला वयें व्यक्त ॥ जयसिंग आणि रेणुकेप्रती ॥ लग्नविचार सूचला ॥ ५७ ॥ मग
उभयतां बैसूनि एकांतीं ॥ म्हणती चला जाऊं स्वदेशाप्रती ॥ लक्षून संबंधा जाती ॥ लग्न करूं बाळाचें ॥ ५८ ॥

१ सतरंजी. २ पृथ्वीवर. ३ स्त्री. ४ नदीची. ५ मेघ. ६ सोळा वर्षांचा.

ऐसा विचार उभयतां करोनी ॥ सोडिते झाले क्षेत्रांलागोनी ॥ माळवादेशीं त्यांचा ग्राम उद्देशोनी ॥ मार्ग धरिती तयाचा ॥ ५९ ॥ मार्गीं चालतां ग्रामोग्रामीं ॥ भिक्षा करिती भिक्षुकधर्मीं ॥ मार्गीं चालतां भविष्य वर्मीं ॥ विकट झगटलें येऊनी ॥१६०॥ मार्गीं चालतां काननांत ॥ तस्कर येऊन अकस्मात ॥ जयसिंग शस्त्रघातें ॥ मुक्त केला प्राणातें ॥ ६१ ॥ जवळी होतें वित्त कांहीं ॥ तें हिरोन नेलें तस्करीं उपायीं ॥ जयसिंगाचें प्रेत महीं ॥ निचेष्टित पडियेलें ॥ ६२ ॥ मग तें पाहून रेणुका सती ॥ प्रेत कवळून देहानिगुतीं ॥ परम शोकें देहाप्रती ॥ सांडिती झाली तेधवां ॥ ६३ ॥ मग तीं उभयतां स्त्रीपुरुष ॥ भर्तरीनें काष्ठें मेळवून विशेष ॥ अग्नि लावून उभयतांस ॥ शोकडोहीं बुडाला ॥ ६४ ॥ उभयतांचें करितां दहन ॥ परी शोकविशोकें पोळे प्राण ॥ म्हणे अहा तात मातेन ॥ कैसें सोडिलें काननीं या ॥ ६५ ॥ अहा तुम्ही जननी जनक ॥ पहाते झालां परत्रलोक ॥ यापरी महीतें मायिक ॥ कोणी नसे मजलागीं ॥ ६६ ॥ अहा जननी रेणुकानाम्नी ॥ कैसी गेली मज सोडोनी ॥ आतां आई आई म्हणोनि वाणी ॥ बोलावूं मी कोणातें ॥ ६७ ॥ अहा जननी तूं परम मायिक ॥ जाणत होतीस तृषाभूक ॥ आतां निकटपणीं लोक ॥ परम कैसे पाहतील ॥ ६८ ॥ अहा जननी रात्रींतून ॥ तीन वेळां उठोन ॥ करवीत होतीस तोयपान ॥ तरी मन निष्ठुर कां केलें ॥ ६९ ॥ अहा हृदयीं धरून करिसी चुंबन ॥ वाचे म्हणसी बाळ हें तान्हें ॥ ऐसें म्हणोनि उदकपान ॥ करवीत अससी नित्यशा ॥ १७० ॥ ऐसी माय तूं सघन ॥ असोन केलें निष्ठुरपण ॥ मज ऐशा वनीं सोडून ॥ गेलीस कैसी जननीये ॥ ७१ ॥ अहा ताता जयसिंगनामी ॥ कैसा गेलास मज टाकुनी ॥ आतां पृथ्वीवर दैन्यवाणी ॥ कोठें राहूं निराश्रित ॥ ७२ ॥ अहा ताता बाहेर जातां ॥ खाऊ मजला आणीत होतां ॥ तो मुगुटीं खोवून सदनीं येतां ॥ पाचारून मज देशी ॥ ७३ ॥ ऐसा मोह असतां पोटीं ॥ सांडून गेलास विपिनीं देठीं ॥ ऐसें म्हणून करसंपुटीं ॥ वक्षःस्थळ पिटीतसे ॥ ७४ ॥ ऐसें रुदन करीत करीत ॥ पेटवून झाला शांतचित्त ॥ परी तो तेथून न उठे त्वरित ॥ प्राण सोडूं पाहातसे ॥ ७५ ॥ तों मार्गेंकरून व्यवसाइक ॥ त्या वंजारें वृषभकटक ॥ त्यांनीं पाहून त्याचा शोक ॥ परम चित्तीं कळवळले ॥ ७६ ॥ मग तयापाशीं येऊन ॥ पुसोन घेतलें वर्तमान ॥ वर्तमान कळल्या बोलती वचन ॥ बोधनीतीं तयातें ॥ ७७ ॥ म्हणती अगा भाटसुता ॥ शोक करिसी अति वृथा ॥ होणार झालें विषयमाथां ॥ विधिअक्षरें नेमीत ॥ ७८ ॥ जरी तूं आतां करिसी शोक ॥ तरी काय मिळतील जननी जनक ॥ ईश्वरकरणी प्रारब्ध फुटकें ॥ आपुलेंचि म्हणावें ॥ ७९ ॥ तरी आतां धैर्य करून ॥ हित पाहावें आपुलें आपण ॥ संसार करून आपुले मतीन ॥ तिन्ही लोकीं मिरवावें ॥ १८० ॥ ऐसें म्हणून बोध अपार ॥ उठविला त्याचा धरून कर ॥ मग संगें घेऊन मुक्कामा-

१ काशीक्षेत्र. २ चोर. ३ ठार मारला. ४ अरण्यांत. ५ परलोक. ६ घरीं. ७ व्यापारी. ८ दैवयोग. ९ हात.

वर ॥ आणिलासे भर्तरी ॥ ८१ ॥ मुक्कामीं राहून सकळ जन ॥ रात्रीं देऊन अन्नपान ॥ दुसरे दिवशीं सर्वे घेऊन ॥ पुन्हां जात व्यवसाई ॥ ८२ ॥ ऐसे परी सात पांच दिन ॥ शोक करितां गेले लोटून ॥ मग दिवसेंदिवस होऊन विस्मरण ॥ सहजस्थितीं वर्ततसे ॥ ८३ ॥ मग त्या व्यवसाइकां सहज ॥ करूं लागला तयांचें काज ॥ काज होतां तेजःपुंज ॥ सकळ चाहती आदरानें ॥ ८४ ॥ मग आसन वसन[1] भूषणांसहित ॥ व्यवसाइक सकळ संपादीत ॥ ऐसेपरी कांहीं दिवस त्या स्थितींत ॥ लोटून गेले तयाचे ॥ ८५ ॥ यापरी व्यवसाइक ॥ धान्य भरून अति अमूप[2] ॥ उज्जनी शहर अवंतिक ॥ मार्ग धरिला तयाचा ॥ ८६ ॥ मार्ग सरतां वृषभकटका ॥ येऊन पोहोंचला अवंतिका ॥ तेथें कथेचा रस निका ॥ होईल तो स्वीकारा पुढें ॥ ८७ ॥ म्हणाल पुढिले अध्यायीं रस ॥ उगाच मानाल स्वचित्तास ॥ ऐसें तरी न म्हणावें पीयूष[3] ॥ चवी घेतां कळों येईल ॥ ८८ ॥ तरी ती कथा सुधारस थोर ॥ वाढी श्रोत्यां धुंडीकुमर ॥ मालु ऐसा नामोच्चार ॥ नरहरिकृपें मिरवतसे ॥ ८९ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागार ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ चतुर्विंशति अध्याय गोड हा ॥ १९० ॥ ॥ श्रीगोपालकृष्णार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

१ वस्त्र. २ पुष्कळ. ३ अमृत.

॥ नवनाथभक्तिसार चतुर्विंशतिअध्याय समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी वासुदेवा ॥ वासनाद्वासुदेवा[1] मायाअवयवा ॥ म्हणोनि तूतें माधवा ॥ सगुणस्थिति विराजे ॥ १ ॥ हे चक्रचाळका यदुपती ॥ वदवीं आतां रसाळ युक्ती ॥ जेणें श्रोते आनंद पावती ॥ नवरसांतें वेधूनियां ॥ २ ॥ मागिले अध्यायीं भर्तरीनाथ ॥ अवंतिके आला व्यवसायातें ॥ तें जननादि पाळण यथाश्रुत ॥ वदविलें महाराजा ॥ ३ ॥ यापरी पुढें कथा गहन ॥ वदवीं नवरसां सुढाळपण ॥ ऐसें वदतां रुक्मिणीरमण ॥ संतोष चित्तीं जाहला ॥ ४ ॥ जाहला तरी आतां श्रोतीं ॥ कथा स्वीकारा श्रवणार्थीं ॥ व्यवसायिक घेऊनि भर्तरीप्रती ॥ अवंतिकेसी पातले ॥ ५ ॥ पातले परी ग्रामाजवळी ॥ करिते झाले [2]शिबिरस्थळी ॥ रचोनि गोण्या कनकपट सकळी ॥ शिबिरावरी विराजले ॥ ६ ॥ ऐसियेपरी व्यवसायिक ॥ उतरते झाले स्थानस्थायिक ॥ तों अस्ताचळा गेला अर्क ॥ व्यवसायिक मिळाले ॥ ७ ॥ अग्नि पेटवूनि एक्या ठायीं ॥ शेक घेती व्यवसायी ॥ तों निकट येऊनि जंबुक महीं ॥ कोल्हाळ केला एकचि ॥ ८ ॥ कोल्हाळ केला परी स्वभाषेंत ॥ बोलते झाले जंबुक समस्त ॥ व्यवसायिक हो या स्थितीं ॥ बैसूं नका सावध व्हा ॥ ९ ॥ तुम्हांवरी आहे धाडी ॥ महातस्कर बळी प्रौढी ॥ द्रव्य हरून नेतील तांतडी ॥ सावध होऊन बैसा रे ॥ १० ॥ ऐसें जंबुक बोलतां वाणीं ॥ भर्तरी ऐकता झाला कानीं ॥ ऐकतांच विचार अंतःकरणीं ॥ करिता झाला महाराजा ॥ ११ ॥ मनांत म्हणे व्यवसायिकअन्न ॥ आपण करीत आहों भक्षण ॥ तरी यांतें श्रुत करून ॥ उपकारातें सारावें ॥ १२ ॥ कीं मातेचा उपकार ॥ जेवीं फेडीतसे खगेंद्र ॥ तेवीं व्यवसायिकांचा उपकार ॥ जंबुकांचें भाष्य तेचि रीतीं सांगावें ॥ १३ ॥ मग म्हणे सकळ व्यवसायिकां ॥ तुम्ही असावध राहूं नका ॥ तस्कर धाड घालूं आले ऐका ॥ येत आहेती तुम्हांवरते ॥ १४ ॥ म्हणती कळलें कशावरून ॥ तरी जंबुक बोले स्वभाषेंकरून ॥ भुंकत तरी भाषा मज कळून ॥ येत आहे महाराजा ॥ १५ ॥ तरी मीं तुमचें भक्षिलें अन्न ॥ म्हणून वदलों गुप्त न ठेवून ॥ ऐसें बोले भर्तरी वचन ॥ विश्वासातें दाटले ॥ १६ ॥ मग ते व्यवसायिक जन ॥ नानाशस्त्रें करूनि धारण ॥ बैसते झाले सावधपणें ॥ काष्ठवणी योजूनियां ॥ १७ ॥ पोटीं घालून मालभरती ॥ सावध पहारे देती भंवतीं ॥ तों तस्कर धाडी शतानुशतीं ॥ येऊनियां पोंचले ॥ १८ ॥ पोंचले परी व्यवसायिक ॥ परम झुंजार [3]ब्रीददायिक ॥ यंत्रघायें तस्कर सकळिक ॥ जर्जर केले सर्वस्वीं ॥ १९ ॥ परम जर्जर तस्कर होतां ॥ मग वित्ताची सोडून वार्ता ॥ पळते झाले शस्त्रघाता ॥ साहवेना शस्त्रघात ॥ २० ॥ असो तस्कर शतानुशतें ॥ पळून गेले शस्त्रघातें ॥ मग निवारण होऊनि हडबडत ॥ बैसले शांत व्यवसायिक ॥ २१ ॥ शांत होऊनि भर्तरियासी ॥ घेऊन बैसले मंडपासीं ॥ परी सावधपणीं लोटलिया [4]निशी ॥ दीड प्रहर राहिली ॥ २२ ॥ राहिली दीड प्रहर रात्र ॥ पुन्हां जंबुक येऊनि तेथ ॥ भुंकती सर्व मंडळासहित ॥ व्यवसायिक ऐकती ॥ २३ ॥

१ सर्व प्राण्यांना चालवितोस ह्मणून वासुदेव अशा. २ व्यापाऱ्यांचा तळ. ३ योद्धे. ४ रात्र.

ऐकती परी भर्तरीतें ॥ पुन्हां पुसती प्रश्न उक्तें ॥ कीं पुन्हां जंबुक येऊनि येथें ॥ काय बोलले तें सांग ॥ २४ ॥ ऐसें बोलतां व्यवसायिक ॥ सांगता झाला वरदायक ॥ म्हणे आतां कोल्हे भुंकें ॥ वदले आहेत तें ऐका ॥ २५ ॥ तरी उत्तरदिशेहून आतां पांथिक ॥ येत आहे दक्षिणे जात ॥ शिववरदी महासमर्थ ॥ राक्षस जाण असे तो ॥ २६ ॥ तयापाशीं चार रत्नें ॥ असती तेजस्वी दैदीप्यमान ॥ तरी त्यातें येईल जो मारून ॥ पूर्णलाभ तो लाभेल ॥ २७ ॥ परी तो लाभ म्हणाल केउता ॥ तरी तयाचा रुधिरटिळा[१] रेखितां ॥ पावेल लाभ सार्वभौमता[२] ॥ अवंतिकेमाजी[३] दक्ष तो ॥ २८ ॥ तरी त्यातें योजून मरण ॥ रुधिरें वस्त्र आणावें भरून ॥ ग्रामद्वारीं टिळा रेखून ॥ विजय भाळीं रेखावा ॥ २९ ॥ ऐसें भर्तरी बोलतां त्यातें ॥ तों विक्रम नृप होता तेथें ॥ ऐकतांच शस्त्र हातातें ॥ कवळूनियां चालिला ॥ ३० ॥ यावरी श्रोते कल्पना घेती ॥ शिववरदें त्या दानवाप्रती ॥ काय धन लाभलें क्षितीं[४] ॥ तेंचि कथानक सांगावें ॥ ३१ ॥ मग कवि म्हणे तो दानव ॥ पूर्वीं स्वर्गींचा होय गंधर्व ॥ चित्रमा गंधर्व तयाचें नांव ॥ महाप्रतापी आगळा ॥ ३२ ॥ तो सहजस्थितीं कैलासासी ॥ जाता झाला भावें मानसीं ॥ तों उमेसह द्यूतकर्मासीं ॥ शिव बैसले खेळत ॥ ३३ ॥ तों चित्रमा गंधर्वनाथ ॥ येऊन पोंचला अकस्मात ॥ तो उमेसहित उमाकांत ॥ भावेंकरूनि नमियेला ॥ ३४ ॥ नमितां देखिलें नीलकंठें ॥ मग आश्वासन देऊन सन्निध नीट ॥ विराजवून गंधर्वभट ॥ तुष्ट केला मानसीं ॥ ३५ ॥ निकट गंधर्वा बैसवून ॥ खेळ खेळती दोघे जण ॥ तों अंबेनें खेळीं डाव जिंकोन ॥ शिवावरी आणियेला ॥ ३६ ॥ आणिला परी अक्षभास ॥ द्विविध भासला उभयतांस ॥ तेणेंकरूनि प्रतिवादास ॥ प्रवर्तलीं उभयतां ॥ ३७ ॥ शिव म्हणे पडले अठरा ॥ अंबा म्हणे पडले बारा ॥ ऐसा बोलण्यांत फेरा ॥ उभयतांसी पडियेला ॥ ३८ ॥ मग ते उभय वदती ॥ विवादितां गंधर्वा पुसती ॥ तेणें शिवपक्ष धरूनि चित्तीं ॥ अष्टादश पडले म्हणतसे ॥ ३९ ॥ परी ते पोबारा खरेपणीं ॥ असतां क्षोभली मृडानी[५] ॥ म्हणे गंधर्वा शिवपक्ष धरोनी ॥ बोलतोस ऐसें तूं ॥ ४० ॥ परी तव देहीं असत्यवस्ती ॥ आहे सदृढ पापमती ॥ तरी तूं जाऊनि मृत्युक्षिती ॥ राक्षसरूपें वर्तसील ॥ ४१ ॥ ऐसें बोलतां दक्षनंदिनी ॥ गंधर्व व्यापला कंपेंकरोनी ॥ अंगीं रोमांच उठवूनी ॥ शिवचरणीं लागला ॥ ४२ ॥ म्हणे महाराजा चंद्रमौळी[६] ॥ तव पक्ष धरितां येणें काळीं ॥ मुखा लागली शापकाजळी ॥ तरी आतां काय करूं ॥ ४३ ॥ ऐसें म्हणोनि अश्रु भरून ॥ आले उभय लोचन ॥ तेणेंकरूनि चित्तीं प्रसन्न ॥ पशुपति[६] दाटला ॥ ४४ ॥ म्हणे चित्रमा गंधर्वनाथा ॥ न करीं शापाची सहसा चिंता ॥ पुढें सुरोचन गंधर्व महीपर्वता ॥ शक्रशापें वर्तला कीं ॥ ४५ ॥ वर्तला परी तैंया[७] क्षितीं ॥ पुत्र होईल तयाप्रती ॥ तया पुत्राचेनि हातीं ॥ मुक्त होशील सुजाणा ॥ ४६ ॥ तो शस्त्रघातें राक्षसतनूतें ॥ तव प्राणातें करील विभक्त ॥ येरी म्हणे लाभ

१ रक्ताचा टिळा. २ सार्वभौम होऊन. ३ उज्जयिनीमध्यें. ४ पृथ्वीमध्यें. ५ पार्वती. ६ शंकरा. ७ त्या ठिकाणीं.

त्यांत ॥ मज माराया कायसा ॥ ४७ ॥ शिव म्हणे तूतें मुक्त करितां ॥ रुधिरटिळक रेखितां माथां ॥ तेणें टिळकें सर्व शोभता ॥ मही भोगील भोगातें ॥ ४८ ॥ तों चित्रमा गंधर्व बोलत ॥ त्या पुत्रास काय हें माहीत ॥ तरी तो येऊनि मम वधातें ॥ प्रवर्तेल महाराजा ॥ ४९ ॥ ऐसें ऐकून उमाकांत[1] ॥ म्हणे धूमिनअवतार भर्तरीनाथ ॥ त्याचे मुखें होईल श्रुत ॥ सुरोचन पुत्रासी ॥ ५० ॥ ऐसें बोलतां पंचानन ॥ मग स्वस्थ झालें तयाचें मन ॥ मग दिव्यदेहा आश्रमीं ठेवून ॥ दानवदेहीं अवतरला ॥ ५१ ॥ अवतरला परी बळहीन ॥ येत होता मार्गेंकरून ॥ तों शस्त्र घेऊनि विक्रम ॥ काननाप्रती प्रवर्तला ॥ ५२ ॥ यापरी आणीक श्रोते बोलती ॥ सुरोचन गंधर्व महीवरतीं ॥ शक्रशापें पातला निगुतीं ॥ कैशा अर्थीं तें वदावें ॥ ५३ ॥ कवि म्हणे वो ऐका वचन ॥ अमरपुरीं पाकशासन ॥ सभेस्थानीं सभा करून ॥ गंधर्वादिक बैसले ॥ ५४ ॥ पुढें अप्सरा नृत्य करिती ॥ नेटके हावभाव दाविती ॥ तिलोत्तमा आणि मेनका युवती ॥ अर्कज्योति[2] लावण्य ॥ ५५ ॥ कैसें त्यांचें चांगुलपण ॥ ग्रंथीं किती करूं वर्णन ॥ तरी तयांचें स्वरूप पाहतां मदन ॥ मूर्च्छागत होतसे ॥ ५६ ॥ ज्या सभास्थानीं नाट्य करितां ॥ दाविती चमचमका समता ॥ जयांचे नेत्रकटाक्ष पाहतां ॥ जपी तपी नाडती ॥ ५७ ॥ मग मुनी येऊनि लुंगी कांसोटी ॥ सोडून धांवती तयांचे पाठीं ॥ मग कैंचें आचरण योगराहाटी ॥ होती कष्टी कंदर्पें ॥ ५८ ॥ ऐसी गुणज्ञानस्वरूपस्थिती ॥ लावण्यलतिका चंद्रज्योती ॥ नाट्य करिती ते सभेप्रती ॥ वेधे चित्तीं कंदर्प[3] ॥ ५९ ॥ ते नाट्य करितां सुरपर्णीं ॥ सुरोचन गंधर्व पंचबाणीं ॥ अति वेधला निशिदिनीं ॥ लाज सोडोनि तिजकारणें ॥ ६० ॥ परम वेधतां पंचबाणीं ॥ देवसभेतें मदें न गणूनी ॥ एकाएकीं सभेंत उठोनी ॥ मेनकेतें स्पर्शीतसे ॥ ६१ ॥ धरूनि मेनकेचा हस्त ॥ कुच हस्तानें करी व्यक्त ॥ तें पाहूनि शचीनाथ[4] ॥ परम चित्तीं क्षोभला ॥ ६२ ॥ म्हणे सभास्थानीं सोडूनि लाज ॥ कवळीत रंभेतें कामिककाजें ॥ तरी हा ऐसा अधमध्वज[5] ॥ पदच्युत होवो कां ॥ ६३ ॥ जयातें न कळे रागरंग ॥ हीनबुद्धि कामिकयोग ॥ तरी हा पतन पावो स्वर्ग ॥ महागर्दभ होवो कां ॥ ६४ ॥ ऐसें बोलतां पाकशासन ॥ तत्काळ झाला तेथून पतन ॥ पतन होतां सहस्रनयन ॥ तुष्ट केला स्तुतीनें ॥ ६५ ॥ म्हणे महाराजा अमरनाथा ॥ उःशाप द्यावा मातें आतां ॥ हें कर्म घडलें असतां ॥ परी क्षमा करावी जी ॥ ६६ ॥ तूं दयावंत प्रज्ञाराशी ॥ सदा कळवळा हृदयीं पाळिशी ॥ तरी पोटीं घालून अपराधासीं ॥ क्षमादान ओपावें ॥ ६७ ॥ तूं माय मी लेंकरूं सहसा ॥ न गणीं माझे अपराधलेशा ॥ तरी तूं दृष्टि समपीयूषा[6] ॥ मिरवीं कां मजवरी ॥ ६८ ॥ ऐसें स्तुतीचें वदतां वचन ॥ संतुष्ट झाला पाकशासन ॥ म्हणे द्वादशवर्षीं पुन्हां परतोन ॥ स्वस्थानातें येशील कीं ॥ ६९ ॥ येशील परी कैसें कर्म ॥ मथुराधीश जो नरेंद्रोत्तम ॥ ज्यातें सत्यवर्मा नाम ॥ महीलागीं मिरवतसे

१ शंकर. २ सूर्यासमान. ३ कामविकार. ४ इंद्र. ५ अत्यंत नीच. ६ अमृतासमान.

॥ ७० ॥ तयाची कन्या लावण्यराशी ॥ सद्विवेकी पुण्यराशी ॥ तीतें वरोनि कृत्रिमासीं ॥ विक्रमातें तोषवावें ॥ ७१ ॥ ती विष्णु-
विक्रममूर्ती ऐसी ॥ स्वशक मिरवेल महीशीं ॥ तो येतां तव उदरासी ॥ मुक्त होशील महाराजा ॥ ७२ ॥ पाहतां विक्रमसुताचें
मुख ॥ हरेल सर्व शापदुःख ॥ मग भूलोकातें होवोनि विन्मुख ॥ स्वर्गलोकवासी होसी तूं ॥ ७३ ॥ ऐसें बोलतां सहस्रनयन ॥ गंधर्व
पावला तुष्टभान ॥ जैसें मृत्युवेळीं पीयूषपान ॥ लाभलेंसे दैवानें ॥ ७४ ॥ कीं अत्यंत दारिद्र्य झाल्यास प्राप्त ॥ दैवें मांदुसलाभ
होत ॥ कीं सरिताओघीं जात वाहत ॥ सांगडी हाता लागली ॥ ७५ ॥ कीं परम दुष्काळीं न मिळे अन्न ॥ भणंगरूप दावी
दुरून ॥ तें आपंगिलें सुरभीनें ॥ तैसें झालें गंधर्वी ॥ ७६ ॥ असो मग तो सुरोचन ॥ तया झालें स्वर्गपतन ॥ वायुचक्रीं
मिथुळाकानन ॥ सेविता झाला येऊनी ॥ ७७ ॥ परी तो येतांच स्पर्शितां मही ॥ होऊनि गेला गर्दभदेही ॥ मग रांसभपंक्ती
काननप्रवाहीं ॥ चरूं लागे नित्यशा ॥ ७८ ॥ तंव त्या गांवीं कुंल्लाळ कमठ ॥ उत्तम नामें असे सुभट ॥ तो संचरोन काननावाटे ॥
गर्दभातें शोधीतसे ॥ ७९ ॥ शोध शोधितां कमठ कुल्लाळ ॥ देखिलें गर्दभमंडळ ॥ त्या गर्दभांत हा शापबळ ॥ गर्दभरूपी मिरव-
तसे ॥ ८० ॥ मग तेणें हांकोनि गर्दभ समस्त ॥ नेता झाला स्वसदनांत ॥ त्यांजसवें गर्दभ त्यांत ॥ कुल्लाळशाळे गेला असे
॥ ८१ ॥ गेला परी बहु दिवस ॥ तया कुल्लाळगृहीं असे ॥ यावरी कमठ तो स्वसदनास ॥ दरिद्रांत पावला ॥ ८२ ॥ तेणेंकरूनि
गर्दभ समस्त ॥ ओपिले परा घेऊनि वित्त ॥ परी तो गर्दभ स्वसदनांत ॥ रक्षोनियां ठेविला ॥ ८३ ॥ रक्षिला परी एकटा द्वारीं ॥
गर्दभ मनीं विचार करी ॥ एकांतीं एकव्यापरी ॥ कमठकुल्लाळें ठेविला ॥ ८४ ॥ मग रात्र पाहोनि दोन प्रहर ॥ कुल्लाळातें बोले
उत्तर ॥ कीं सत्यवर्म्याची कन्या सुंदर ॥ करून द्यावी मज कांता ॥ ८५ ॥ ऐसें दिनोदिन पुकारितां ॥ कमठ कानीं होय ऐकता ॥
मग सदनाबाहेर येवोनि तत्त्वतां ॥ निजदृष्टीनें विलोकी ॥ ८६ ॥ विलोकी परी कोठें कांहीं ॥ पाहत्याप्रती वसत नाहीं ॥ कोण
बोलतो बोल प्रवाहीं ॥ तोही कोण कळेना ॥ ८७ ॥ ऐसा होऊनि साशंकित ॥ पुन्हां सदनामाजी जात ॥ तों गर्दभ पुन्हां
पाचारूनि त्यातें ॥ दारा द्यावी म्हणतसे ॥ ८८ ॥ पुन्हां कमठ येत परतोन ॥ पाहतां बोले याचें वदन ॥ परी गर्दभ बोलतो असें
वचन ॥ हें तों कोणा कळेना ॥ ८९ ॥ मग साशंकित होय चित्तीं ॥ कोण बोले तो गृहाप्रती ॥ संशय येत तया चित्तीं ॥ उभा
राहे कमठ तो ॥ ९० ॥ कमठ सन्मुख उभा असतां ॥ गर्दभ विचार करी चित्ता ॥ म्हणे भ्रांति फेडावी आतां ॥ आपुलिया
शब्दाची ॥ ९१ ॥ मग कमठा जवळी पाचारून ॥ बोलता झाला गर्दभ वचन ॥ म्हणे महाराजा संशयें दारुण ॥ पहात अससी
किमर्थ तूं ॥ ९२ ॥ परी मी नित्य बोलतों वाणी ॥ तूं ऐकतोसी कानीं ॥ तरी सत्यवर्म्याची मज नंदिनी ॥ करून देईं ते भाजा

१ पृथ्वीवर. २ इंद्र. ३ पैशांची पेटी सांपडणें. ४ कामधेनूनें. ५ गर्दभ झालेला. ६ कमठ नांवाचा कुंभार. ७ कन्या.

॥ ९३ ॥ ऐसें गर्दभ बोलतां वचन ॥ कमठ खोंचे भयेंकरून ॥ जरी हें ऐकिलें परानें ॥ तरी शिक्षा होईल आमुतें ॥ ९४ ॥ अहा अहा रे प्रत्यक्ष गर्दभ तंव ॥ मिसळून पाहाशी सोयराणीव ॥ मेरू मशक तेवीं मानव- ॥ सम रंगण मिरविशी ॥ ९५ ॥ कोठें राजा कोठें रजक ॥ कोठें तूं रे मागणार भीक ॥ कोठें मेरू कोठें मशक ॥ अर्की खद्योत मिरवला ॥ ९६ ॥ ऐसा विचार कमठ करीत ॥ म्हणे बरवें नव्हे यांत ॥ तरी आतां त्यजूनि ग्रामातें ॥ परदेशाप्रती वसावें ॥ ९७ ॥ तरी आतां विपर्यास ॥ कळतां सत्यवर्मरायास ॥ तो शिर छेदूनि कसायास ॥ अर्पील जाण निर्धारें ॥ ९८ ॥ ऐसा विचार करितां चित्तीं ॥ तों उदयास पावला गैभस्ती ॥ मग कांतेस सांगून गैर्दभनीती ॥ पलायनास निश्चय केला पैं ॥ ९९ ॥ परी ते मूढ दोघे जण ॥ जयांलागीं नसे ज्ञान ॥ कीं प्रत्यक्ष पशूनें बोलावें वचन ॥ हें आश्चर्य वाटेना ॥ १०० ॥ पशू असती वाचारहित ॥ हा गर्दभ बोलतो मात ॥ तरी हा पशू नव्हे निश्चित ॥ प्रज्ञावंत समजेना ॥ १ ॥ म्हणोनि असती मूढपणें ॥ योजिलें त्यांनीं पलायन ॥ मग त्याच गर्दभीं ग्रंथिका वाहोन ॥ संसारग्रंथिका भरियेली ॥ २ ॥ संसार वाहोनि गर्दभावरता ॥ त्यासवें चालती उभयतां ॥ सहजस्थितीं चाल चालतां ॥ ग्रामद्वारीं ते आले ॥ ३ ॥ परी द्वाररक्षक तेथें असती ॥ तिहीं पाहतां तयांची स्थिती ॥ समजोन त्यांची पलायनरीती ॥ तार्किकज्ञानेंकरूनियां ॥ ४ ॥ मग ते हटकिती कमठाकारणें ॥ म्हणती संसार गर्दभीं वाहोन ॥ किमर्थ तूं पलायन ॥ करिशी सांग कमठा रे ॥ ५ ॥ ऐसें पुसतां द्वाररक्षक ॥ तेव्हां तो झाला भयें व्यापक ॥ न बोले वचन कांहींएक ॥ मुखस्तंभ बावरियेला ॥ ६ ॥ तरी ते नाना युक्तिप्रयुक्तीं ॥ पलायना अर्थ पुसती ॥ परी तो न वदे दुःखाप्रती ॥ संशयांत मिरवतसे ॥ ७ ॥ मनांत म्हणे कमठ कुल्लाळ ॥ जरी हा अर्थ वदूं केवळ ॥ तरी सध्यां हा वेंडवानळ ॥ अंग स्पर्शील आमुचें ॥ ८ ॥ म्हणूनि त्यातें न बोलेच कांहीं ॥ मुखस्तंभ विचरे वाचाप्रवाहीं ॥ मग ते द्वारपाळ प्रज्ञादेही ॥ अटक करिती कमठातें ॥ ९ ॥ म्हणती ऐसी वस्ती टाकून ॥ कमठा तूं करिशी पलायन ॥ तरी तें रायातें श्रुत करून ॥ मग बोळवूं तुज कमठा ॥ ११० ॥ ऐसें वदूनि द्वारपाळ ॥ राजांगणीं जाऊनि चपळ ॥ म्हणती महाराजा कमठ कुंल्लाळ ॥ ग्रामांतून जातसे ॥ ११ ॥ मग त्वरें पाठवूनि आपुले दूत ॥ कमठ आणिला राजसभेंत ॥ सभेस्थानीं जातांच त्यातें ॥ राव स्वमुखें पुसतसे ॥ १२ ॥ म्हणे काय झाली दुःखमात ॥ कोणतें दुःख तुज वसत ॥ झालें म्हणोनि ग्रामातें ॥ सांडूनियां जासी तूं ॥ १३ ॥ ऐसी असतां महाराहाटी ॥ तूं कोणे अर्थें झालासी कष्टी ॥ तरी तो अर्थ वदोनि होटीं ॥ श्रुत करीं आमुतें ॥ १४ ॥ म्हणे कमठा सत्यवर्मा ॥ नांव मिरवत महीं आम्हां ॥ तरी सत्य चालवीन नेमा ॥ नामासमान वर्ततसें ॥ १५ ॥ ऐसें बोलतां राव वचन ॥ कमठ बोले रायाकारणें ॥ हे महाराजा प्रजापालन करणें ॥ दक्ष तुम्हीच अहां कीं ॥ १६ ॥

१ सोयरीक. २ काजवा. ३ सूर्य. ४ गाढवाचें बोलणें. ५ अग्नि. ६ कुंभार.

परी मातें दुःख जें आहे ॥ तें वाचेनें बोलतां न ये ॥ बोलों जातां प्राण जाये ॥ देहमुक्त होईन ॥ १७ ॥ राव म्हणे मजकडून ॥
जात असेल तुझा प्राण ॥ तरी अन्याय माफ करीन ॥ रक्षीन प्राण तुझा कीं ॥ १८ ॥ तरी या बोलाकारणें ॥ संशय मिरवीत
असेल मनें ॥ तरी माझें सदैव वचन ॥ घेईं घेईं कमठा तूं ॥ १९ ॥ ऐसी बोलतां राजेंद्र वाणी ॥ कमठ तुकावी श्रीवेलागुनी ॥
म्हणे महाराजा ऐसी वाणी ॥ भाष द्यावी मज आतां ॥ १२० ॥ अवश्य म्हणोनि सत्यवर्मा ॥ करतळभाष देत उत्तमा ॥ मग म्हणे
कमठा क्लेशवर्मा ॥ वदोनि दावीं मज आतां ॥ २१ ॥ येरू म्हणे नरेशा ॥ एकांतीं दावीन शब्दलेशा ॥ ऐसें बोलतां कमठ सहसा ॥
एकांतातें चालिले ॥ २२ ॥ कमठ आणि नरेंद्रोत्तम ॥ एकांतीं बैसले शुद्ध आश्रमा ॥ मग कमठ म्हणे राया कामा ॥ मम क्लेशाचे
अवधारीं ॥ २३ ॥ हे राया तूं सर्वज्ञमूर्ती ॥ तव उदरींची कन्या युवती ॥ नाम जियेचें सत्यवती ॥ महीवरती मिरवतसे ॥ २४ ॥
तरी काय सांगूं विपर्यास ॥ एक गर्दभ मम सदनास ॥ तो रात्रीं पाचारूनि आम्हांस ॥ विपरीत वाणी बोलतसे ॥ २५ ॥ बोलतसे
कैसे रीतीं ॥ कीं मज दारा करून दे सत्यवती ॥ ऐसें बोलतां चैक्रवर्ती ॥ भयें व्याप्त मन माझें ॥ २६ ॥ अहो हें पशु काय
बोलत ॥ जरी रायातें होत श्रुत ॥ मग तो मातें सदनासहित ॥ कोपानळीं जाळील ॥ २७ ॥ ऐशा भयाची उमजोनि वार्ता ॥
त्रास योजिला आपुले चित्ता ॥ म्हणोनि राया सोडोनि स्वार्था ॥ ग्रामाबाहेर जातसें ॥ २८ ॥ ऐसें बोलतां कमठ कुल्लाळ ॥ मग
विचार करीतसे नृपाळ ॥ चित्तीं म्हणे पशू केवळ ॥ वाचारहित असती कीं ॥ २९ ॥ तरी तो पशु न म्हणावा सर्वथा ॥ कोणीतरी
असेल देवता ॥ परीक्षेविण माझिये चित्ता ॥ पशुवेषें नटला असे ॥ १३० ॥ ऐसा विचार करूनि चित्तीं ॥ बोलता झाला कमठा-
प्रती ॥ म्हणे कमठा भय चित्तीं ॥ धरूं नको या हेतू ॥ ३१ ॥ तरी आतां कुशळपणें ॥ दावूं आपलें भावलक्षण ॥ आणि तयाची
परीक्षा करून ॥ सत्यवती ओपावी ॥ ३२ ॥ तरी तूं आतां सेवोनि सदन ॥ स्वस्थ करीं आपुलें मन ॥ गर्दभ करितां तूतें भाषण ॥
उत्तरयुक्ती तूं ऐक ॥ ३३ ॥ तूतें बोलतां गर्दभ मात ॥ तरी त्यातें उत्तर द्यावें त्वरित ॥ कीं हा प्रकार रायातें श्रुत ॥ केला असे
महाराजा ॥ ३४ ॥ केलें परी राजउत्तर ॥ आलें आहे तव बोलावर ॥ तरी धातुताम्राचें मिथुळानगर ॥ करून द्यावें सर्वस्वें ॥ ३५ ॥
पूर्ण झालिया ताम्रवती ॥ मग आपुल्यातें देईल सत्यवती ॥ असें सांगून तयाप्रती ॥ तुष्ट करीं चित्तातें ॥ ३६ ॥ ऐसें कमठा
नरेंद्रोत्तमें ॥ सांगोन दिला उत्तरनेम ॥ तुष्ट करोनि मनोधर्म ॥ बोळविला कमठ तो ॥ ३७ ॥ मग तुष्ट होवोनि कमठ चित्तीं ॥ जाता
झाला सदनाप्रती ॥ तों अस्ताचळा पावोनि गैभस्ती ॥ मैहीं रात्र संचरली ॥ ३८ ॥ रात्र झाली दोन प्रहर ॥ तंव गर्दभ बोले
उत्तर ॥ हे कमठा तूं नरेश्वर ॥ सत्यवती दे मातें ॥ ३९ ॥ ऐसें बोलतां पशु युक्तीं ॥ कमठ उत्तर दे तयाप्रती ॥ म्हणे महाराजा

१ मान डोलावी. २ वचन. ३ हे सार्वभौम राजा. ४ क्रोधाग्नीमध्यें. ५ सूर्य. ६ पृथ्वीवर.

नृपाप्रती ॥ श्रुत केलें आहे मीं ॥ १४० ॥ केल्यावरी प्रत्युत्तर ॥ रायें दिधलें अनिवार ॥ कीं ताम्रधातूचें मिथुळानगर ॥ करूनि द्यावें आमुतें ॥ ४१ ॥ ग्राम झालिया ताम्रसदनी ॥ अर्पीन त्यातें [१]नंदिनी ॥ ऐसिया बोलप्रकरणीं ॥ बोलिला आहे नरेंद्र तो ॥ ४२ ॥ तरी ऐसिया बोला सरळा ॥ असेल कांहीं दावा कळा ॥ तुष्ट करोनि नरेंद्रपाळा ॥ सत्यवती वरावी ॥ ४३ ॥ त्यातें ताम्रवती देवोन ॥ ग्रहण करावें कन्यारत्न ॥ जैसें दानवां [२]सुरा देवोन ॥ [३]पीयूष घेतलें देवांनीं ॥ ४४ ॥ किंवा कष्टातें कचें ओपूनी ॥ हरोनि गेला संजीवनी ॥ तेवीं रायातें तुष्ट करोनी ॥ सत्यवती हरीं कां ॥ ४५ ॥ तरी कांच देवोनि पाच घेणें ॥ हें तों बुद्धिमंतलक्षण ॥ असेल कांहीं या प्रमाण ॥ करूनि दावीं महाराजा ॥ ४६ ॥ ऐशी कमठ बोलतां उक्ती ॥ हास्य करी गंधर्वपती ॥ म्हणे रायाची विशाळ मती ॥ नव्हे कमठा या प्रकरणीं ॥ ४७ ॥ अरे हेमतगटीं रत्नकोंदणीं ॥ जरी तो आराधिता वाणी ॥ तरी करोनि देतों येच क्षणीं ॥ अमरनगरीसमान कीं ॥ ४८ ॥ कीं सबळ [४]शैक्राची संपत्ती ॥ आणून देतों तयाप्रती ॥ तेथें मागणें ताम्रवती ॥ अदैवपणीं हें काय ॥ ४९ ॥ असें सकळ काननाब्धिसुरभिरत्न ॥ कल्पतरु आदि चौदा करूनी ॥ तैं ताम्रवती मागणें वाणीं ॥ अदैवपणीं हें काय ॥ १५० ॥ सुरभि अब्धिरत्न ॥ मागतां देतों आणून ॥ तेथें ताम्रवती नगर पूर्ण ॥ अदैववाणीं हें काय ॥ ५१ ॥ कीं रेवाकाननींचे पाषाण ॥ निधि चिंतामणि देतों करून ॥ तैं ताम्रवती नगर मागोन ॥ अदैवपणें हें काय ॥ ५२ ॥ तरी आतां असो कैसें ॥ जैसें ज्याचें संचित असे ॥ तैसी बुद्धी होय प्रकाश ॥ प्रारब्धबळें अनुक्रमें ॥ ५३ ॥ तरी कमठा अति निगुतीं ॥ जावोनि सांगावें रायाप्रती ॥ कीं मिथुळाग्राम ताम्रवती ॥ ग्रहण करीं नरेंद्रा ॥ ५४ ॥ अवश्य म्हणोनि कुलाळ ॥ जावोनि वंदिला मिथुळापाळ ॥ म्हणे महाराजा भूपा कुशळ ॥ बोलला तें ऐकावें ॥५५॥ म्हणे सिद्ध करोनि सत्यवती ॥ कृपें ओपिजे माझे हातीं ॥ आज रात्रीं ताम्रवती ॥ निजदृष्टीं पहाशील ॥ ५६ ॥ ऐसें पशूचें वाग्वचन ॥ कमठमुखें राव ऐकोन ॥ अवश्य कुलाळातें म्हणून ॥ सदनातें पाठवी ॥ ५७ ॥ कुलाळ येतांच स्वधामा ॥ म्हणे प्राज्ञिका गर्दभोत्तमा ॥ राया सांगतां ऐसा महिमा ॥ स्वीकारिलें रायानें ॥ ५८ ॥ प्रत्यक्ष होतांच स्वकर्मा ॥ म्हणे महाराजा गंधर्वोत्तमा ॥ म्हणे कवण कामिक काम तुम्हां ॥ वेधलासे महाराजा ॥ ५९ ॥ येरू म्हणे विराट्स्वरूपतनया ॥ मुख्य माझी तों [६]ब्रह्मकाया ॥ काम उदेला गुरुराया ॥ मिथुळा कीजे ताम्रवती ॥ १६० ॥ विश्वकर्मा तुझें नाम ॥ तरी जाणसी सकळ विश्वाचें कर्म ॥ कर्म ओपूनि जगद्रुम ॥ सुपंथ पंथा लाविलें ॥ ६१ ॥ तरी सकळकर्मनिर्माणकर्ता ॥ म्हणोनि विश्वकर्मा नाम शोभत ॥ आहेस म्हणोनि त्या अर्थें ॥ पाचारिलें तूतें मीं ॥ ६२ ॥ तरी जगद्गुरू तूं कर्मपाड ॥ निवारीं तूं माझें इतुकें [७]सांकडें ॥ ताम्रवती मिथुळाकोट ॥ करूनि द्यावी महाराजा ॥ ६३ ॥ ऐसी ऐकतां गंधर्ववाणी ॥

१ मुलगी. २ मद्य. ३ अमृत. ४ इंद्राची. ५ इच्छा. ६ ब्रह्मरूपी शरीर. ७ संकट.

मागिले प्रहरींची यामिनी[1] ॥ विश्वकर्मा ग्रामधामीं ॥ कृपा करोनि हांसतसे ॥ ६४ ॥ कृपादृष्टीं अविट करीतां ॥ ताम्रधातु ग्राम समस्त ॥ व्याप्त धामें सर्वथा ॥ ताम्रवर्णी लखलखती ॥ ६५ ॥ राजा अंत्यजादि सर्व सकळ ॥ कोणी न उरला धामीं दुर्बळ ॥ ताम्रवटिका सकळ स्थळ ॥ ग्राम मिथुळा मिरवलें ॥ ६६ ॥ ऐसें करोनि विश्वकर्मा ॥ अदृश्य गेला आपुले धामा[2] ॥ येरीकडे उदयोत्तमा ॥ होतां पाहती ग्रामजन ॥ ६७ ॥ तों ताम्रधातू अंगणासहित ॥ धामें विराजलीं सुशोभित ॥ ऐसें पाहतांचि अपरिमित ॥ ठेंक[3] पडलें जगासी ॥ ६८ ॥ म्हणती हें काय अपूर्व झालें ॥ न घडे तेंचि घडून आलें ॥ परी रायें पाहतांचि जाणवलें ॥ खूणपरीक्षा चित्तातें ॥ ६९ ॥ मग मनांत म्हणे सत्यवर्मा ॥ कन्या ओपितां सुकर्मा ॥ परी लौकिक अति जगदुर्गमा ॥ हेळणेतें पावेन मी ॥ १७० ॥ तरी हें जग दुर्गम नोहे भलें ॥ द्विमुख सावज होऊनि बैसलें ॥ पैशून्याचीं देखून पावलें ॥ दंशावया धांवती ॥ ७१ ॥ तरी आतां गुप्तगुप्तें ॥ कन्या ओपून कुलालातें ॥ स्वग्रामधामाकारणें विभक्त ॥ दूरदेशीं वसवावा ॥ ७२ ॥ ऐसा विचार योजून चित्तीं ॥ मग पाचारूनि कमठाप्रती ॥ लोकनिंदेच्या सकळार्थी ॥ सुचविलें तयातें ॥ ७३ ॥ म्हणे महाराजा कमठा ऐक ॥ कन्या गर्दभा ओपितां देख ॥ लोकनिंदा पतनशब्द चार्वाक ॥ प्रविष्ट होईल भुवनीं कीं ॥ ७४ ॥ तरी लावण्यचपळा सत्यवती ॥ घेऊन जावी सदनाप्रती ॥ परी या गांवीं न करून वस्ती ॥ दूरदेशीं वसावें ॥ ७५ ॥ ऐसें बोलतां राव स्पष्ट ॥ अवश्य म्हणे कुलाल कमठ ॥ मग सदनीं येऊन संसारथाट ॥ वस्त्रीं ग्रंथिका वाहिली ॥ ७६ ॥ अर्क[4] झाला अस्तमानीं ॥ पुन्हां प्रवेशे राजसदनीं ॥ म्हणे राया ग्रंथिका बांधूनी ॥ सिद्ध आहें जावया ॥ ७७ ॥ राव पाचारूनि कन्या युवती ॥ म्हणे पवित्र सत्यवती ॥ तूतें अर्पिली देवाप्रती ॥ स्वीकारावें तयातें ॥ ७८ ॥ म्हणशील परीक्षिलें कैसें ॥ तरी मिथुळा ताम्रवती लेशें ॥ क्षण न लोटतां केलें असे ॥ तस्मात् देव निश्चयें तो ॥ ७९ ॥ तरी तूं त्या स्वीकारून ॥ ओळखी आणिजे कोणाचा कोण ॥ मी तोचि परीक्षिला निश्चयेंकरून ॥ देवतारूपी गर्दभ तो ॥ १८० ॥ करिसी सहसा अनमान ॥ तरी कायावाचामनेंकरून ॥ शुचि होऊनि उत्तीर्ण ॥ उभयकुळां हेंचि करीं ॥ ८१ ॥ जरी गर्दभ म्हणून अपमानिसी ॥ तरी डाग लागेल मम कुळासी ॥ आणि तो कोपला विपर्यासीं ॥ पतनशापा ओपील कीं ॥ ८२ ॥ तरी ऐसें करीं नंदिनी ॥ युक्तिप्रयुक्तीं तयालागुनी ॥ गर्दभदेहाचा त्याग करूनी ॥ स्वस्वरूपीं मिरवीं कां ॥ ८३ ॥ तेणेंकरूनि उभयकुळपक्षीं ॥ उद्धारार्थ मिरवेल दक्षी ॥ तरी आतां शुद्धकांक्षी ॥ कमठसदना सेवीं कां ॥ ८४ ॥ ऐसें बोलतां तीतें सदनीं ॥ अवश्य म्हणूनि शुभाननी ॥ मग कुलाल गृहीं जात घेउनी ॥ निशीमाजी संचरली ॥ ८५ ॥ संचरली घरीं म्हणतां ॥ बोटा लावूनि दावीं भर्ता ॥ सत्यवती ऐसें बोलतां ॥ राव पुसे कमठातें ॥ ८६ ॥ राव पुसे कमठासही ॥ दावितांच

१ रात्र. २ गृहीं. ३ गूढ. ४ सूर्य.

राव लागे पायीं ॥ म्हणे महाराजा हे जांवई ॥ पाळण करीं कन्येचें ॥ ८७ ॥ ऐसें बोलतां तयापर ॥ गर्दभ बोलता झाला उत्तर ॥ राया तव भाग्य असे थोर ॥ मी जांवई तुज असें ॥ ८८ ॥ पाहें माझी कळा गर्दभदेही ॥ लोक यातें म्हणतील काई ॥ परी हे असो निंदाप्रवाहीं ॥ परी धन्य भाग्य तुझें कीं ॥ ८९ ॥ राया तरी ऐक मात ॥ शक्रशापें गर्दभदेहातें ॥ मी विचरतों कृत्रिममतें ॥ नातरी सुरोचन गंधर्व मी ॥ १९० ॥ मग मूळापासून समूळ कथा ॥ सांगून तोषविलें नृपनाथा ॥ ऐशी नृपें ऐकून वार्ता ॥ तुष्ट चित्तीं मिरवला ॥ ९१ ॥ मग देऊन लावण्यराशी ॥ राव गेला स्वसदनासी ॥ भर्ता देऊन सत्यवतीसी ॥ कुल्लाळातें प्रार्थूनियां ॥ ९२ ॥ राव जातां स्वसदनीं ॥ कमठ सत्यवतीस घेऊनी ॥ अवंतिकेचा मार्ग धरूनी ॥ गमन करी रात्रीं तो ॥ ९३ ॥ असो आतां पुढिले अध्यायीं ॥ सत्यवती करील काई ॥ तेचि कथा परिसावी ॥ अवधान देऊनियां ॥ ९४ ॥ धुंडीसुत नरहरिवंशीं ॥ मालू नटला संतसेवेसी ॥ सेवाप्रसाद तयापाशीं ॥ रात्रंदिन मागतसे ॥ ९५ ॥ इति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ पंचविंशति अध्याय गोड हा ॥ १९६ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ६ ॥

१ इंद्राच्या शापानें. २ लक्ष देऊन.

॥ नवनाथभक्तिसार पंचविंशाध्याय समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी कमलापती ॥ सर्वसाक्षी आदिमूर्ती ॥ पूर्णब्रह्मा सनातनज्योती ॥ रुक्मिणीपते जगदात्मया ॥१॥ हे दीननाथा दीनबंधू ॥ मुनिमानसरंजना कृपासिंधू ॥ तरी आतां कथासुबोधू ॥ रसज्ञ शब्दीं वदवीं कां ॥ २ ॥ मागिले अध्यायीं कथन ॥ गंधर्व नामीं सुरोचन ॥ शक्रशापें गर्दभ होऊन ॥ सत्यवती वरियेली ॥ ३ ॥ तरी हीं असो मागील कथा ॥ सिंहावलोकनीं पहा आतां ॥ कमठ कुलाळ काननपंथा ॥ अवंतिके जातसे ॥ ४ ॥ गंधर्वगर्दभीं संसार वाहोन ॥ स्वदारेसहित सत्यवतीरत्न ॥ मार्गीं चालतां मुक्कामोमुक्काम ॥ अवंतिके पातला ॥ ५ ॥ कुलाळगृहीं सदन पाहून ॥ राहते झाले समुच्चयेंकरून ॥ परी सत्यवतीतें सुढाळपणें ॥ कन्येसमान पाळीतसे ॥ ६ ॥ सकळ मोहाचें मायाफळ ॥ सत्यवतीतें अर्पी कुलाळ ॥ आसनवसनादि सकळ ॥ इच्छेसमान पाळीतसे ॥ ७ ॥ तों एके दिवशीं सत्यवती ॥ म्हणे ताता कमठमूर्ती ॥ मम लग्नातें करून पती ॥ माझा मज दावीं कां ॥ ८ ॥ येरी म्हणे वो अवश्य माय ॥ या बोलाचा फेडीन संशय ॥ मग रात्रीं अवसर पाहून समय ॥ गंधर्वापाशीं पातला ॥ ९ ॥ म्हणे महाराजा पशुपती ॥ कामना वेधली जे तव चित्तीं ॥ ती फळास येऊनि निगुती ॥ तुजलागीं पावती झाली ॥ १० ॥ तरी त्या अर्था सुलक्षण ॥ पुढें व्हावें मंगलकारण ॥ सत्यवती उत्तम रत्न ॥ वाट पाहे पतीची ॥ ११ ॥ तरी या प्रश्नाचें उत्तर देऊन ॥ उभयीं मिरवावें समाधान ॥ ऐसें ऐकतां संकटवचन ॥ गंधर्वराज वदतसे ॥ १२ ॥ तरी असो अन्य विधीतें ॥ प्रविष्ट न व्हावें हें लोकांत ॥ तरी योजून आसुरी लग्नांत ॥ सत्यवती स्वीकारूं ॥ १३ ॥ म्हणे महाराजा कमठा ऐक ॥ मंगलविधि नसे एक ॥ आसुरीविधिपूर्वक ॥ हा सोहळा मिरवीतसें ॥ १४ ॥ ऐसें बोलतां गंधर्वराव ॥ कमठ म्हणे आहे बरवें ॥ परी एक संधीं उदित भाव ॥ उदय पावला महाराजा ॥१५॥ म्हणे संदेह कवण कैसे ॥ परी आपण वर्ततां पशूऐसे ॥ तरी या मिषें संग मनुष्यें ॥ कैसी रीती घडेल कीं ॥ १६ ॥ तरी संदेह फेडून माझा ॥ प्रिय करावी आपुली भाजा ॥ ऐसें ऐकून कमठ चोजा ॥ उत्तरा उत्तर देतसे ॥ १७ ॥ तो म्हणे महाराजा कमठा ऐक ॥ रत्न सत्यवती अलोलिक ॥ ऋतुसमय सत्य दोंदिक ॥ श्रुत करावें आम्हांतें ॥ १८ ॥ तुवां श्रुत केलिया दृष्टी ॥ दावीन आपुली स्वरूपकोटी ॥ गंधर्ववेषें इच्छा पोटीं ॥ पूर्णपणीं आणीन कीं ॥ १९ ॥ सत्यवती उत्तम जाया ॥ चतुर्थदिनीं एकांत ठाया ॥ तुष्ट करीन गंधर्वी काया ॥ वरूनियां महाराजा ॥ २० ॥ ऐसी बोलतां गंधर्ववाणी ॥ तुष्ट झाला कमठ मनीं ॥ मग स्वधामांत संचरोनी ॥ वृत्तांत कन्येसी निवेदिला ॥ २१ ॥ म्हणे माये वो सत्यवती ॥ कामना जे आहे तव चित्तीं ॥ ते ऋतुकालीं कामाहुती ॥ गंधर्वराज ओपील गे ॥२२॥ आपुल्या स्वरूपा प्रगट करून ॥ करूं योजितो आसुरी लग्न ॥ तरी तेंचि वरून समाधान ॥ सुखालागीं पावशील ॥२३॥ ऐसें सांगून कमठ कुलाळ ॥ शयनीं पहुडला उतावेळ ॥

१ इंद्राच्या शापानें. २ आपल्या स्त्रीसह. ३ एकत्र. ४ मोठ्या प्रेमानें. ५ राक्षसविवाह किंवा गांधर्व. ६ स्त्री. ७ आपल्या घरीं. ८ स्वस्थ झोंपला.

ती निशा लोटून उदयकाळ ॥ गभस्तीचा पातला ॥ २४ ॥ तेही लोटल्या दिनोदिन ॥ समय पातला ऋतुकालमान ॥ चतुर्थ दिनीं कुलाळ जाऊन ॥ श्रुत करी गंधर्वातें ॥ २५ ॥ म्हणे महाराजा गंधर्वनाथा ॥ योजिला समय आला आतां ॥ तरी उभय काम पूर्ण होतां ॥ स्वीकारावें महाराजा ॥ २६ ॥ ऐसें बोलतां कमठ वाणीं ॥ वेष गर्दभी तत्क्षणीं ॥ सोडून स्वस्वरूपा प्रगट करूनी ॥ महीलागीं मिरवला ॥ २७ ॥ मिरवला परी जैसा गभस्ती ॥ वस्त्राभरणीं कनककांती ॥ कमठें पाहून चित्तसरितीं ॥ आनंदतोय हेलावे ॥ २८ ॥ चित्तीं म्हणे भाग्यवंत ॥ मजसमान नाहीं या महींत ॥ स्वर्गवासी गंधर्व दैवत ॥ मम गृहीं वर्ततसे ॥ २९ ॥ अहा ती धन्य सत्यवती ॥ बैसलीसे पुण्यपर्वतीं ॥ ऐसा स्वामी जियेतें पती ॥ निजदैवें लाधला ॥ ३० ॥ राहिला परी वर्णनासी मती ॥ नसे बोलावया अनुसंमती ॥ स्वर्गफळचि लागलें हातीं ॥ सत्यवतीकारणें ॥ ३१ ॥ जैसें अमरां पीयूषदान ॥ आतुडलें मंथनीं दैवें-करून ॥ कीं दानवांत नवनिधिधन ॥ कुबेर लाधला पुण्यानें ॥ ३२ ॥ कीं शिवमौळींचें दृढासन ॥ दैवें लाधला रोहिणीरमण ॥ तेवीं गंधर्व सुरोचन ॥ सत्यवती ही लाधली ॥ ३३ ॥ कीं प्रत्यक्ष सूर्यनारायण ॥ पाठीं वाहे श्यामकर्ण ॥ तन्यायें दैवेंकरून ॥ सत्यवती लाधली ॥ ३४ ॥ कीं अब्धिजा दारा कमळा नामें ॥ विष्णूस लाधली दैवेंकरून ॥ तेवीं गंधर्वस्वामी सुरोचन ॥ सत्यवती लाधली ॥ ३५ ॥ ऐसा विस्मय कमठ पोटीं ॥ करीत आहे हर्षे देठीं ॥ मग भाळ ठेवून चरणसंपुटीं ॥ विनवणी करीतसे ॥ ३६ ॥ म्हणे महाराजा स्वर्गधामका ॥ अहा मी अबुद्ध असें या लोका ॥ नेणून तव प्रतापआवांका ॥ कष्टविलें पापिष्ठें ॥ ३७ ॥ तव पृष्ठीतें ग्रंथिका वाहूनी ॥ गर्दभ भाविला आपुले मनीं ॥ अहंमूढ मी अबुद्धखाणी ॥ आरोहण केलें पापिष्ठें ॥ ३८ ॥ अहा स्वामिया ऐसी कोटी ॥ असून मृत्तिका वाहिली पाठी ॥ नेणून तूतें केलें कष्टी ॥ मीही दुरात्म्या पापिष्ठें ॥ ३९ ॥ अहा कर्म हें अनिवार ॥ आरोहतां तव पृष्ठीवर ॥ तैं दुरात्मा मुष्टिप्रहार ॥ करीत होतों पापिष्ठ ॥ ४० ॥ तरी ऐशिया अपराधांसी ॥ क्षमा करीं गा दयाराशी ॥ ऐसें म्हणोन पुन्हां चरणांसी ॥ निजँमौळी अर्पीतसे ॥ ४१ ॥ मग सुरोचन गंधर्व हात ॥ धरून कमठ सदनीं नेत ॥ म्हणे महाराजा स्वकांतेतें ॥ सांभाळावें सर्वस्वीं ॥ ४२ ॥ मग सुरोचन गंधर्वें एकांतासीं ॥ पाचारिलें सत्यवतीसी ॥ येरी येतांच षोडशोपचारेंसीं ॥ गंधर्वराज पूजियेला ॥ ४३ ॥ मग अति प्रीतीं संवादस्थितीं ॥ ऐक्यभावानें उभय रमती ॥ आसुरी विवाहकामार्थ रती ॥ तुष्ट चित्तीं मिरवला ॥ ४४ ॥ मिरवले परी त्याच रात्रीं ॥ गर्भ संभवला सत्ययुवती ॥ प्रारब्धयोगें पुत्रवंती ॥ जठरस्थानीं राहिला ॥ ४५ ॥ यापरी गंधर्वराज ॥ म्हणतसे सत्यवतीभाज ॥ पुत्रसुखातें पाहिलें चोज ॥ स्वर्गवास करीन मी ॥ ४६ ॥ शक्रशापापासून कथा ॥ सत्यवतीतें होय सांगता ॥ कथा सांगूनि म्हणे आतां ॥ सुखें क्षेमांत असावें ॥ ४७ ॥ तरी तुज आतां राजबाळी ॥ पुत्र उल्हासील

१ सूर्याचा. २ अमृताचें दान. ३ प्राप्त झालें. ४ चंद्र. ५ स्वर्गांत रहाणाऱ्या. ६ अज्ञानी. ७ आपलें मस्तक. ८ सत्यवती स्त्रीला. ९ समाधानांत.

येणें काळीं ॥ परी तो पुत्र महाबळी ॥ राज्यासनीं मिरवेल ॥ ४८ ॥ मिरवेल परी धर्मदाता ॥ विक्रम नामीं जगविख्यात ॥ धैर्य-राशि औदार्यवंत ॥ शककर्ता मिरवेल ॥ ४९ ॥ ऐसा पुत्र तूं चूडामणी ॥ लाधसील वो शुभाननी ॥ मी तव ऋणापासूनी ॥ मुक्त झालों सर्वस्वीं ॥ ५० ॥ आतां उरलें शापमोचन ॥ पाहतांचि गे पुत्रवदन ॥ अमूल्य स्वर्गसुखा पावेन ॥ स्वस्थानासी जाऊनी ॥ ५१ ॥ यावरी पुढें तूं गोरटी ॥ मम क्षेती[1] न करीं आपुले पोटीं ॥ विक्रमपुत्र पाळून शेवटीं ॥ सकळ सुखा भोगीं कां ॥ ५२ ॥ ऐसें सांगून सुरोचन ॥ पुन्हां गर्दभवेष धरून ॥ सवेंचि सेविलें आपुलें ठाण ॥ अंगणांत येऊनियां ॥ ५३ ॥ यापुढें दिवसानु-दिवस ॥ गर्भ लागला आहे वाढीस ॥ परी लोक पुसती कुंलालास[2] ॥ सत्यवती कोण ही ॥ ५४ ॥ येरू म्हणे मम कुमरी ॥ मोहें आणिली आहे माहेरीं ॥ गरोदरपण निवटल्यावरी ॥ पुन्हां जाईल स्वसदना ॥ ५५ ॥ ऐसें जगतातें करून भाषण ॥ तुष्ट मिरवे सकळांचें मन ॥ यापरी तीतें नवमास पूर्ण ॥ गर्भस्थानीं विराजले ॥ ५६ ॥ तो सुलक्ष समयो सुलक्ष तिथी ॥ नक्षत्र करण शुभ योगांतीं ॥ चंद्रबळ तारानीती ॥ प्रसूत झाली सुलक्षणी ॥ ५७ ॥ बाळ पाहतां शुभाननी ॥ तेजःपुंज लावण्यखाणी ॥ कीं सकळ तेज ओपून तरणी[3] ॥ पाहुणचारीं आराधिला ॥ ५८ ॥ पुढें होतां संस्कारासी ॥ बारसें केलें द्वादश दिवसीं ॥ पाळणां घालून बाळकासी ॥ विक्रम नाम ठेविलें ॥ ५९ ॥ नाम ठेविलें सुदिनासी ॥ तों अर्क प्रवर्तला अस्तप्रदेशीं ॥ सुरोचन गर्दभवेष ॥ सांडिता झाला तत्क्षणीं ॥ ६० ॥ मग संचरून सदनातें ॥ सत्यवतीतें म्हणे कांते ॥ शीघ्र आणीं पाहूं दे बाळकातें ॥ पुत्रमुख या काळीं ॥ ६१ ॥ बैसोनियां वस्त्रासनीं ॥ सत्यवती देत बाळ आणूनी ॥ अंकीं सुरोचन गंधर्व घेऊनी ॥ पुत्रमुख पाहिलें ॥ ६२ ॥ पुत्रमुख पाहतां दृष्टीं ॥ आटून गेल्या शापकोटी ॥ तों अमरीं[4] जाणवलें शक्रपोटीं ॥ मातलीतें[5] पाठविलें ॥ ६३ ॥ विमान रोहणा मातली घेवोनी ॥ येता झाला अवंतिकास्थानीं ॥ शीघ्र द्वारीं आसन ठेवोनी ॥ सदनामाजी संचरला ॥ ६४ ॥ तों सुरोचन गंधर्व बाळ घेऊन ॥ परम स्नेहानें घेत चुंबन ॥ तों मातली सन्निध उभा राहून ॥ बोलता झाला गंधर्वातें ॥ ६५ ॥ म्हणे महाराजा सुरोचना ॥ मज पाठविलें पाकशासनें[6] ॥ तरी आतां आरूढोनि विमाना ॥ अमरस्थानीं चलावें ॥ ६६ ॥ आतां सोडून पुत्रमोहातें ॥ चला वेगीं देवनाथ ॥ अहा वाट आपुली पाहत ॥ शापमोचन जाहलिया ॥ ६७ ॥ ऐसें बोलतां मातली वचन ॥ सत्यवतीतें बाळक ओपून ॥ म्हणे कांते समाधान ॥ ठेवीं आतां जातों आम्ही ॥ ६८ ॥ ऐसें बोलतां सत्यवती ॥ म्हणे महाराजा गंधर्वपती ॥ बाळ तान्हुलें टाकून क्षितीं ॥ कैसें जातां महाराजा ॥ ६९ ॥ तुम्ही गेलिया सोडून मातें ॥ कोण आहे मम देहातें ॥ निढळपणीं[7] परदेशातें ॥ सोडून कैसे जातां जी ॥ ७० ॥ ऐसें म्हणोन सत्यवती ॥ हंबरडा फोडिला वृत्तीं ॥ अश्रु भरूनि नेत्रपातीं ॥ दुःखसरिता लोटतसे

१ पर्वा, क्लेश. २ कुंभाराला. ३ सूर्य. ४ देवांनीं. ५ इंद्राच्या सारथ्याला. ६ इंद्रानें. ७ निष्ठुरपणें.

॥ ७१ ॥ म्हणे महाराजा तुजकारणें ॥ जनक माझा सत्यवर्मा जाण ॥ तुटला आहे निर्लोभ होऊन ॥ कैसें सोडून मज जातां ॥७२॥ अहा महाराजा तुम्हांसाठीं ॥ सर्व सोडून भांडारकोटी ॥ जनकजननींची पाडून तुटी ॥ जोड केली म्यां तुमची ॥ ७३ ॥ तरी आतां मज सोडून ॥ तुम्ही जातां निढळवाण ॥ मातें करोन दीनपण ॥ योग्य तुम्हां दिसेना ॥ ७४ ॥ ऐसें बोलतां सत्यवती ॥ हृदयीं धरी सुरोचन पती ॥ चुंबन घेऊन अश्रु वाहती ॥ पुसोनियां वदतसे ॥ ७५ ॥ ऐकें युवती शुभाननी ॥ तुज स्मरण होतां माझें मनीं ॥ त्याच वेळां उतरून अवनीं ॥ भेटी देईन तूतें गे ॥ ७६ ॥ ऐसें देऊन भाष्यउत्तर ॥ शांतविलें युवतीअंतर ॥ मग आरोहून विमानावर ॥ कमठास पुसोनि निघाला ॥ ७७ ॥ सत्यवतीचा धरून तें हस्त ॥ कमठा ओपून मोहित ॥ म्हणे तनयाचा मम सांप्रत ॥ सांभाळ करीं महाराजा ॥ ७८ ॥ ऐसें वदोनि सुरोचन ॥ पाहता झाला शक्रस्थान ॥ येरीकडे बाळ तान्हें ॥ वयवर्धन होतसे ॥ ७९ ॥ दिवसानुदिवस होतां थोर ॥ सप्तवर्षी झाला कुमार ॥ मग मुलांसीं खेळता झाला सत्वर ॥ राजचिन्हीं खेळतसे ॥ ८० ॥ ऐसें खेळतां मुलांत ॥ द्वादश वर्षें लोटलीं त्यांत ॥ ईर्षे पडोन बाळखेळांत ॥ विद्येलागीं लागला ॥ ८१ ॥ विद्या तरी सहजचिन्हीं ॥ शास्त्रआधार अश्वारोहणी ॥ सहज सेवकाश्रयेंकरूनी ॥ विद्येलागीं अभ्यासी ॥ ८२ ॥ सहज मग तो विद्येकारणीं ॥ ओळखी पडली राजांगणीं ॥ राजमंडळीं सर्व प्राणी ॥ विक्रमातें ओळखिती ॥ ८३ ॥ पुढें षोडश वर्षावरुतें ॥ इष्टलें भेटविला विक्रमरायातें ॥ पाइक चाकरी अर्पूनि यातें ॥ ग्रामरक्षणीं ठेविलें ॥ ८४ ॥ ग्रामरक्षण दरवाजावरती ॥ पहारा गाजवून गाजवी राती ॥ तों व्यवसाई बाजारक्षितीं ॥ तेथें येऊनि राहिले ॥ ८५ ॥ तयांमाजी भर्तरीनाथ ॥ वनचरसावजी भाषा जाणत ॥ कोल्हे भुंकतांच अकस्मात ॥ भाषा सांगे तयांची ॥ ८६ ॥ म्हणे उत्तरदिशेहून दानव ॥ निर्बळपणीं होऊनि मानव ॥ दक्षिणदिशेचा धरूनि गौरव ॥ जात आहे पांथिक तो ॥ ८७ ॥ तरी त्याच्या सामोरें जाऊन ॥ वधील कोणी तयाकारण ॥ वधिल्या ग्रामद्वारा पूर्ण ॥ रुधिरटिळा रेखावा ॥ ८८ ॥ आणि दुसरें आपुले भाळा ॥ तेच क्षणीं रेखिजे टिळा ॥ तो अवंतिका उत्तमस्थळा ॥ नृपत्वातें मिरवेल ॥ ८९ ॥ ऐसी ऐकतां भर्तरीवाणी ॥ विक्रम जातसे शस्त्र घेऊनी ॥ येथपर्यंत कथा रंजनी ॥ पूर्व अध्यायीं वदलीसे ॥ ९० ॥ तरी श्रोते बुद्धिवान ॥ पाहती सिंहावलोकन ॥ चित्रमा गंधर्व शापोन ॥ राक्षसदेहीं मिरवला ॥ ९१ ॥ मिरवला परी शापमोचन ॥ बोलला वरदें शाप संघन ॥ तों ती घडी निटावून ॥ रांगत फिरत ये वेळा ॥ ९२ ॥ तरी शापवचनीं शापमोचन ॥ शिववरदें शाप सघन ॥ बोलला असे त्रिनयन ॥ कीं शापें गंधर्व सुरोचन राहिला कीं ॥ ९३ ॥ तयाच्या वीर्येंकरोन ॥ निर्माण होईल विक्रमनंदन ॥ त्याच्या हस्तें पावोन मरण ॥ राक्षसशरीरा सांडसी तूं ॥ ९४ ॥ ऐसा उःशाप शिववरदेंसीं ॥ होतां चित्रमा गंधर्वासी ॥



१ पृथ्वीवर. २ वचन. ३ स्त्रीचें अंतःकरण. ४ व्यापारी. ५ बाजारांत. ६ मोठा. ७ शंकर.

तो समय भर्तरीवागुत्तरासी ॥ येवोनियां झगटला ॥ ९५ ॥ असो ही मागील कथा ॥ विक्रम भर्तरीचे शब्द ऐकतां ॥ शस्त्र सजोन सामोरा पंथा ॥ चित्रमा गंधर्वा होतसे ॥ ९६ ॥ तंव चित्रमा गंधर्व ॥ राक्षसापरी करोनि भाव ॥ मानवरूप धरूनि स्वभावें ॥ येत आहे पांथिक तो ॥ ९७ ॥ येत आहे परंतु चार ॥ अमूल्य रत्नें तेज अपार ॥ मुष्टीं घेऊन राक्षस थोर ॥ मानववेषें गमतसे ॥ ९८ ॥ तों विक्रम जाऊनि तया निकटीं ॥ शस्त्रविद्येतें विपुळ जेठी ॥ सामोरा होऊन मौळीं दृष्टीं ॥ असिलतेसी प्रेरीतसे ॥ ९९ ॥ सकळ प्रहार भेदितां घायीं ॥ राक्षस उलथोन पडला महीं ॥ प्राण कासावीस होऊन देहीं ॥ पडता झाला तत्काळ ॥ १०० ॥ महीं पडतां चित्रमा गंधर्व ॥ विक्रम प्रज्ञावान प्रसिद्ध ॥ वस्त्रें भिजवून रुधिरें शुद्ध ॥ भाळीं टिळा रेखिला ॥ १ ॥ तों राक्षस होऊन गतप्राण ॥ दिव्यदेहीं निघे तेथून ॥ गंधर्वरूपीं स्वपदा पावोन ॥ विक्रमातें वंदिलें ॥ २ ॥ मग गंधर्व करितां स्वयें दृष्टी ॥ विमान उतरलें महीतळवटीं ॥ त्यांत आरोहण करितां जेठी ॥ विक्रम पुसे तयातें ॥ ३ ॥ म्हणे महाराजा राक्षस पूर्ण ॥ स्वर्गा करूं जासी गमन ॥ ही तों कळा राक्षसांकारण ॥ दुर्लभपणीं वाटतसे ॥ ४ ॥ मग शिवफांसेखेळापासून ॥ विक्रमा सांगितलें शापकथन ॥ आपुलें चित्रमा गंधर्व नाम ॥ सांगून गेला स्वस्थाना ॥ ५ ॥ येरीकडे प्रेतशरीरीं ॥ चांचपून पाहे करीं ॥ तों चार रत्नें मुष्टीमाझारीं ॥ तेजःपुंज देखिलीं ॥ ६ ॥ तिघे चिंतामणी वैडूर्यवंत ॥ सकळ कामद चवथें अत्यद्भुत ॥ ऐशीं चारी रत्नें विख्यात ॥ सकळ कार्या चालती ॥ ७ ॥ विक्रम देखतां हर्षवंत ॥ मग तो भर्तरी धन्य म्हणत ॥ ऐसा पुरुष प्रज्ञावंत ॥ अवतारदक्ष म्हणावा ॥ ८ ॥ जैसा वृक्षांत कल्पतरू ॥ दैन्यहारी सुखपरू ॥ तन्न्यायें नगरांत हा नरू ॥ श्रेष्ठ जगीं भासतसे ॥ ९ ॥ कीं पशूंमाजी धेनुजाती ॥ त्यांत सुरभी कामना द्रवती ॥ तन्न्यायें हे मनुष्यजाती ॥ श्रेष्ठ जगीं भासतसे ॥ ११० ॥ कीं रत्नांमाजी वैडूर्यवंत ॥ निघती चिंतामणी उपकारस्थित ॥ तन्न्यायें मनुष्यांत ॥ श्रेष्ठ जगीं भासतसे ॥ ११ ॥ कीं पाषाणजाती उपकारस्थित ॥ परीसपणातें मिरवत ॥ तन्न्यायें मनुष्यांत ॥ श्रेष्ठ जगीं भासतसे ॥ १२ ॥ ऐसी भावना धरून चित्तीं ॥ आणिक कामना वरीतसे पुढती ॥ ऐसा पुरुष स्वसांगाती ॥ त्रैलोक्यांत मिरवेल ॥ १३ ॥ ऐसा विचार मार्गें करून ॥ पाहता झाला द्वारग्राम ॥ रुधिरटिळा द्वारास उत्तम ॥ चर्चूनियां निघाला ॥ १४ ॥ ऐसा निघून अतित्वरा ॥ आला व्यवसायिकशिबिरा ॥ तंव ते भर्तरीस घालून घेरा ॥ सकळ बैसले वेष्टुनी ॥ १५ ॥ त्यांत जाऊनि मध्यस्थानीं ॥ बैसला व्यवसायिकांत गुणी ॥ परी बैसल्या दिसे तरणी ॥ कीं नक्षत्रस्वामी नक्षत्रांत ॥ १६ ॥ त्याच रीतीं भर्तरीनाथ ॥ कीं चंद्रज्योती तेजवंत ॥ असो व्यवसायिक विक्रमातें ॥ पुसती कोण तुम्ही जी ॥ १७ ॥ येरी म्हणे व्यवसायिक ॥ आम्ही असों राजसेवक ॥ राजआज्ञे ग्रामरक्षक ॥ देशावरी नांदतसों ॥ १८ ॥ तरी सहजस्थितीं मनाची

१ पराक्रमी. २ तरवार. ३ रक्तानें. ४ कामधेनू. ५ व्यापाऱ्यांच्या छावणीमध्यें. ६ सूर्य. ७ चंद्र.

ओज ॥ तुम्हां भेटीस पातलों सहज ॥ उत्तम तुमच्या गोष्टी गुज ॥ ऐकूनियां हर्षलों ॥ १९ ॥ येरी म्हणे आमुच्या गोष्टी ॥ उत्तम कोणत्या ऐकिल्या जेठी ॥ विक्रम म्हणे तुम्हां दृष्टी ॥ सन्मुख पाहारा देतसें ॥ १२० ॥ तुम्ही खालीं मी कुशावर्तीं ॥ निकट पाहारा देतों रात्रीं ॥ तुम्ही बोलतां तितुकें निगुतीं ॥ श्रवण होतसे आम्हांतें ॥ २१ ॥ परी हें आतां असो कैसी ॥ तुम्हांवरी धाडी आली विशेषीं ॥ ते श्रुत झाली कैसी तुम्हांसी ॥ म्हणोन शोधा पातलों ॥ २२ ॥ तुम्हांवरी आली धाडी ॥ हे राया सकळ कळली प्रौढी ॥ परी तुमच्या मुखीं कळतां निवाडी ॥ रक्षण करूं तैसेंचि ॥ २३ ॥ तरी ते तुम्ही दृष्टिव्यक्ती ॥ तस्कर पाहिले किती जमाती ॥ येरी म्हणती एकशती ॥ दृष्टिगोचर झाले जी ॥ २४ ॥ विक्रम म्हणे तस्कर येतां ॥ कैशी कळली तुम्हां वार्ता ॥ येरी म्हणे कोल्हे भुंकतां ॥ वर्णन केलें या वाचें ॥ २५ ॥ स्वहस्तानें उठवून ॥ भर्तरीस दाखविती तयालागून ॥ येरी म्हणे नामीं कोण ॥ मिरवत आहे हा बावा ॥ २६ ॥ व्यवसायिक म्हणती त्यातें ॥ भर्तरी नाम आहे यातें ॥ मग दृष्टी पाहून प्रांजळवंत ॥ पूर्ण ओळखी जाहली ॥ २७ ॥ क्षणैक बैसवून नाना भाषण ॥ व्यवसायिकांचें तोषवी मन ॥ मग उठता झाला त्यांपासून ॥ चालतां ग्रामीं संचरला ॥ २८ ॥ तैसाच जाऊन आला एकांतीं ॥ भेट झाली जकात्याप्रती ॥ तंव मागिल्या घटकाराती ॥ सदनाबाहेर येतसे ॥ २९ ॥ उदकपात्र विराजलें हातीं ॥ जात होता दिशेप्रती ॥ तो हटकून बैसविला क्षितीं[1] ॥ वदे त्यातें रसज्ञ ॥ १३० ॥ म्हणे आपुले ग्रामीं कटक ॥ वृषभथाटी[2] व्यवसायिक ॥ तयांचें जकातीनाणें देख ॥ हिशेबातें घेतलें ॥ ३१ ॥ तरी त्या वर्तली नाणीं ॥ मी देईन त्रैअर्थगुणीं[3] ॥ तरी भर्तरी नामीं तया पैं रत्नीं ॥ मागून घ्यावें महाराजा ॥ ३२ ॥ म्हणाल भर्तरी नामें कोण ॥ तरी मम बंधू पाठीचें रत्न ॥ कार्यविभक्त आत्मा होऊन ॥ व्यवसायिकां हिंडतसे ॥ ३३ ॥ तरी तयाचें आमुचें संगोपन ॥ केलिया थोर वाढेल धर्म ॥ आणि पुण्याचा स्थावर संगम ॥ परलोकातें मिरवेल ॥ ३४ ॥ ऐशा बहुप्रकारयुक्ती ॥ सांगून जकातदाराप्रती ॥ हें ऐकून ग्लानितमती ॥ द्रव्यलोभें तोषला ॥ ३५ ॥ द्रव्यलाभ तरी कैसा ॥ त्रिगुणार्थ होता ऐसा ॥ मग मेलिया जेवीं जात ठसा ॥ संजीवनी होऊन आगळा ॥ ३६ ॥ तरी द्रव्य न म्हणावें अमृतवल्ली ॥ निर्जीव मनुष्यास संजीवनी ठेली ॥ आणि दुसरा मार्ग तयाजवळी ॥ मायीकपाणीं विराजे ॥ ३७ ॥ तरी धनाचे बहु भास ॥ वर्ते सुखदुःखा लेश ॥ धनकांता धैवळार[4] सुरस ॥ सर्वसुखा संपादी ॥ ३८ ॥ धनें मोक्षाची पाहील वाट ॥ धनें भोगील महीपाठ ॥ धनेंचि नरक भोगील अचाट ॥ यमपदा जाऊनी ॥ ३९ ॥ धनाचा अपार तमासा ॥ सुसंग कुसंग खेळे फांसा ॥ सर्व यशकर्ता सबळ पैसा ॥ इष्टा नष्टा वर्ततसे ॥ १४० ॥ असा जयास विक्रम बोलतां ॥ जकाती सहज आला होता ॥ म्हणे विक्रमा ते कामदुहिता[5] ॥ पूर्ण करीन मी तुझी कीं ॥ ४१ ॥ ऐसें बोलून करतळवचन ॥ देऊन

१ जमिनीवर. २ बैलांचे तांडे घेऊन. ३ तिप्पट. ४ वाडा. ५ इच्छा.

तोषविलें तयाचें मन ॥ मग विक्रमातें बोळवून ॥ शौचविधि सारिला ॥ ४२ ॥ सकळ झालें एकांतीं करणें ॥ सेविता झाला आपुलें आसन ॥ मग भृत्यांलागीं[1] बोलावून ॥ व्यवसायिकां पाचारिलें ॥ ४३ ॥ गोण्या माल टिपी लावून ॥ हिशेबापरी बोलून धन ॥ तंव तें व्यवसायिक आणून ॥ तयां करीं ओपीतसे ॥ ४४ ॥ यापरी बोले जकाती ॥ म्हणे व्यवसायिक ऐका युक्ती ॥ भर्तरी नामें कोण जमाती ॥ तुम्हांमाजी आहे रे ॥ ४५ ॥ येरी म्हणती उगलाचि पोसोनी ॥ आहे आमुचे मंडळांगणीं[2] ॥ जकाती म्हणे आमुच्या नयनीं ॥ कैसा आहे पाहूं द्या ॥ ४६ ॥ तंव त्यातें पाचारूनी ॥ दाविते झाले विमुटखाणी ॥ म्हणती हाच आमुच्या गणीं ॥ विराजित आहे महाराजा ॥ ४७ ॥ मग जकाती पाहून भर्तरीसी ॥ म्हणे हा प्रत्यक्ष महीचा शशी[3] ॥ कोणी तरी अवतारासी ॥ महीलागीं विराजला ॥ ४८ ॥ तरी आतां असो कैसें ॥ हा आपुल्या गांवांत असावा पुरुष ॥ व्यवसायिक रानमाणूस[4] ॥ या गणीं योग्य दिसेना ॥ ४९ ॥ ऐसा तर्क आणूनि मनीं ॥ बोलविलाहे पाहूं नयनीं ॥ मग व्यवसायिकांचा मुख्य स्वामी ॥ एकांतांत पैं नेला ॥ १५० ॥ एकांतीं नेतां म्हणे व्यवसायांतें ॥ तुमचें द्रव्य देऊं तुम्हांतें ॥ माफीचिठी करून जी त्वरित ॥ तुम्हांलागीं बोळवूं ॥ ५१ ॥ तरी पुन्हां परतोन ॥ माल आणा सबळ[5] भरून ॥ तोंवरी तुम्हांसवें ठेवून ॥ ग्रामवस्ती येथें असावें ॥ ५२ ॥ म्हणशील तरी निराश्रित ॥ पोतें ठेवून नाहीं जात ॥ बाकी साकी येणें आम्हांतें ॥ गांवामाजी उरली असे ॥ ५३ ॥ तरी सकळ हिशेबप्रकरण ॥ माहीत आहे जकात्याकारण ॥ तरी त्यापाशीं शेर घेऊन ॥ तयासंमतीं वर्तावें ॥ ५४ ॥ मग अवश्य म्हणे भर्तरीनाथ ॥ राहीन म्हणे सर्वांसंमतें ॥ देणें घेणें सकळार्थ ॥ उकळोन येईन माघारा ॥ ५५ ॥ ऐसें म्हणोन त्वरा करीत ॥ व्यवसायी घेवोन भर्तरीतें ॥ येऊन शीघ्र जकातगृहातें ॥ तयाहातीं बोळविलें ॥ ५६ ॥ ओपिलें परी कैसें बोलून ॥ कीं तुमचे गृहीं आमचा गडी जाण ॥ ग्रामावळीतें वसूल करून ॥ जकात तुमची सांवरील ॥ ५७ ॥ आम्ही येऊं पुन्हां परतोन ॥ तोंवरी करा याचें संगोपन ॥ आपुलें द्रव्य घ्या फेडून ॥ उरल्या हातीं या ओपा ॥ ५८ ॥ ऐसें बोलून तया देखती ॥ ओपिते झाले जकातीहातीं ॥ उत्तम भाषण पुसूनि तयाप्रती ॥ शिबिरातें पातले ॥ ५९ ॥ मालटाल उरला विकून ॥ निघते झाले मग तेथून ॥ येरीकडे विक्रमाकारण ॥ पाचारिलें जकात्यानें ॥ १६० ॥ नेऊन तया एकांतासी ॥ म्हणे केलें सांगितल्या व्रतासी ॥ मग हिशेब दाखवून बेरजेसी ॥ द्रव्य आणीं म्हणतसे ॥ ६१ ॥ ऐसें बोलतां जकाती वचन ॥ तों काढून देतसे एक रत्न ॥ म्हणे हें तुजपाशीं असूं दे गहाण ॥ संजायितपणासी[6] ॥ ६२ ॥ तुझें द्रव्य त्रैभाग्यार्थें ॥ देऊन घेऊं स्वरत्नातें ॥ ऐसें वदतां जकात्यातें ॥ अवश्यपणीं होतसे ॥ ६३ ॥ याउपरी भर्तरीनिमित्तें ॥ म्हणे बंधूचे ओळखीतें ॥ न बोलून कांहींच त्यातें ॥ भोजना पाठवा मम गृहीं ॥ ६४ ॥ नित्य नित्य भोजनीं गांठ[7] ॥

१ सेवकांना. २ मंडळींत. ३ चंद्र. ४ रानटी लोक. ५ पुष्कळ. ६ विश्वासाकरितां. ७ तिप्पट.

पडतां होईल ओळखी दाट ॥ मग सहज बोलण्याचा [1]मेहपाट ॥ [2]खुणाखुण मिळेल कीं ॥ ६५ ॥ बाहेर निघाले उभयतांतें ॥ ऐसें सांगून एकांतातें ॥ मग जकाती पाहून भर्तरीतें ॥ विक्रमातें बोलतसे ॥ ६६ ॥ म्हणे विक्रमा ऐक वचन ॥ आम्हांपासून शेर घेऊन जाणें ॥ तयाची पाकनिष्पत्ती करून जाण ॥ हा गडी आमुचा [3]संगोपा ॥ ६७ ॥ तुझ्या गृहीं तुझी माता ॥ आहे विक्रमा पाकनिष्पत्तीकरितां ॥ तरी या भर्तरीचें आतां ॥ संगोपन करावें ॥ ६८ ॥ ऐसें विक्रम ऐकतां वचन ॥ म्हणे स्वीकारीन तुमचें बोलणें ॥ मग भर्तरीचा हात धरून ॥ स्वसदनासी पैं नेला ॥ ६९ ॥ द्वारानिकटीं टाकून [4]बैसन ॥ त्यावरी बैसविला भर्तरीरत्न ॥ चार घटिका करून भाषण ॥ गृहामाजी संचरला ॥ १७० ॥ माता पाचारून सत्यवती ॥ निकट बैसवून एकांतीं ॥ तर्जनीखुणेनें दाखवून जती ॥ वृत्तांत सर्व सांगतसे ॥ ७१ ॥ [5]जंबुकबोलभाष्यापासून ॥ तीतें सांगितलें सकळ कथन ॥ स्वकरीं मिरवला लोभिक रत्न ॥ तोही धीट पैं केला ॥ ७२ ॥ ऐसियेपरी धीट होतां ॥ संतोष मानी सत्यवती माता ॥ उपरांत विक्रम झाला सांगता ॥ भर्तरीविषयीं वचनातें ॥ ७३ ॥ म्हणे माते मजहून अधिक ॥ भर्तरीचें मानीं स्नेह [6]दोंदिक ॥ पूर्ण अवतारीक पाठीरक्षक ॥ पुढें मातें होईल गे ॥ ७४ ॥ तरी आतां दुसरा सुत ॥ ज्येष्ठपणीं मिरवेल लोकांत ॥ अणुरेणूइतकें यांत ॥ भिन्न पडूं नेदीं कीं ॥ ७५ ॥ सकळ मोहाची करून गवसणी ॥ लेववीं भर्तरीशरीरालागूनी ॥ आणि तो वर्तेल स्वइच्छापणीं ॥ तैसें वर्तूं दे यास कीं ॥ ७६ ॥ ऐसें सांगून मातेप्रती ॥ पुन्हां बाहेर आला विक्रमनृपती ॥ तों पाकसिद्धि होतांचि त्याप्रती ॥ भोजनातें सारिलें ॥ ७७ ॥ भोजन झालिया सवें जाऊन ॥ पाहता झाला दुर्गस्थान ॥ मग चार घडी रात्री होऊन ॥ अनुवादिलें [7]रँजनीतें ॥ ७८ ॥ यापरी भर्तरी तेथून ॥ पाहता झाला जकातीस्थान ॥ जकातदार त्यातें देखून ॥ भर्तरीतें बोलतसे ॥ ७९ ॥ म्हणे भर्तरीराव ऐका वचन ॥ तुम्हीं असावें सदन धरून ॥ कार्यालागतां पाचारून ॥ घेत जाऊं तुम्हांसी ॥ १८० ॥ मग अवश्य म्हणोन भर्तरीनाथ ॥ विक्रमसदना पुन्हां येत ॥ मग दिवसानुदिवस ते वस्तींत ॥ मोहपूरीं लोटला ॥ ८१ ॥ आधींच माय ती सत्यवती ॥ त्यावरी पुत्राची ऐकोन युक्ती ॥ परम मोहातें भर्तरी जती ॥ गुंडाळूनि घेतला ॥ ८२ ॥ जैसा उदकावीण मत्स्य होत ॥ तळमळ करी होतां विभक्त ॥ कीं धेनूलागीं वत्स नितांत ॥ विसर कदा घडेना ॥ ८३ ॥ तन्न्यायें मग त्रिवर्ग जण ॥ मोहें वेष्टिले हरणीकारण ॥ मग एकमेकांच्या दृष्टीविण ॥ विरह होतां तळमळती ॥ ८४ ॥ असो ऐसी मोहस्थिती ॥ बंधूपणें जगीं मिरवती ॥ यावरी पुढें आतां श्रोतीं ॥ अवधान द्यावें कथेतें ॥ ८५ ॥ नरहरीवंशीं धुंडीनंदन ॥ पुढिले अध्यायीं सांगेल कथन ॥ कवि मालु नामाभिधान ॥ सेवक असे संतांचा ॥ ८६ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ षड्विंशति अध्याय गोड हा ॥ १८७ ॥

१ परिपाठ. २ परस्परांचा संकेत. ३ संरक्षण करा. ४ चवाळें, घोंगडी. ५ कोल्ह्यांची भाषा सांगितल्यापासून. ६ मोठें. ७ रात्रीला.

# अध्याय २७ वा












श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी जगदुद्धारा ॥ विश्वव्यापका विश्वंभरा ॥ जगसृजित्या करुणाकरा ॥ दिगंबरा आदिपुरुषा ॥ १ ॥ पूर्णब्रह्म सनातना ॥ पंढरीअधीशा रुक्मिणीरमणा ॥ पुढें ग्रंथरचनामहिमाना ॥ बोलवीं कां महाराजा ॥ २ ॥ मागिले अध्यायीं निरूपण ॥ भर्तरी आणि दुजा विक्रम ॥ प्रेमसागरीं भक्ति प्रेम ॥ उभय सरिता लोटल्या ॥ ३ ॥ मग ते उभयतां एक दुर्गीं ॥ ग्राम रक्षिती एक प्रसंगीं ॥ तों एके दिवशीं शुभमार्गीं ॥ दैव उदया पातलें ॥ ४ ॥ मोक्षपुऱ्या असती सप्तम ॥ तयांतील तें अवंतिका ग्राम ॥ तेथील नृपति नरेंद्रोत्तम ॥ शुभविक्रम विराजे ॥ ५ ॥ तया जठरीं ती सूक्ष्म वेली ॥ सकळ देहीं संचार पावली ॥ पावली परिभवें परतली ॥ संभव तो न ये सांगावया ॥ ६ ॥ ऐसी कन्या असे उदरीं ॥ तीही धाकुटी बरवंटावरी ॥ कीं लवणाब्धीची लहरी ॥ मदनबाळी शोभतसे ॥ ७ ॥ नाम जियेचें सुमेधावती ॥ तीक्ष्णबुद्धि असे युवती ॥ परी चंद्रकला नक्षत्रज्योती ॥ सांग स्वरूपीं मिरवीतसे ॥८॥ तंव कोणे एके दिवशीं ॥ बैसली होती रायापाशीं ॥ रायें परम लालनेंसीं ॥ अंकावरी घेतली ॥ ९ ॥ परम सौंदर्यें मुखमंडन ॥ रायें कवळून घेतलें चुंबन ॥ उपरी कल्पने वेधलें मन ॥ वराविषयीं रायाचें ॥ १० ॥ मग सुमति मंत्री पाचारूनी ॥ बोलता झाला शुभविक्रम वाणी ॥ म्हणे सुमेधावती मम नंदिनी ॥ उपवर ती दिसतसे ॥११॥ तरी इतकें स्वामित्वपण ॥ पुरुष योजावा दिव्यरत्न ॥ यावरी मंत्री बोले वचन ॥ राजउक्ती ऐकूनियां ॥ १२ ॥ म्हणे महाराजा सुरतयोग ॥ जराव्यापक सर्वांग ॥ ऐसिया काळीं विषयरंग ॥ सरसावला तुम्हांतें ॥ १३ ॥ उदरीं नाहीं वंशसंतती ॥ जरा व्यापिली शरीराप्रती ॥ तरी कामना एक वेधली चित्तीं ॥ सुमेधावतीकडूनियां ॥ १४ ॥ तरी स्वआत्मजा लावण्यराशी ॥ दावितों पहा जया वरासी ॥ त्यातें स्थापून राज्यासनासीं ॥ करावें सुरत वैभवातें ॥ १५ ॥ मग तो वर जामातसुत ॥ उभयपणीं या जगांत ॥ मिरवून जरेतें सकळ हित ॥ सँगोपील तुम्हांसी ॥ १६ ॥ तरी ऐसियें मम वचन ॥ सिद्धार्थ करा आपुलें मन ॥ तरी सुत घ्यावा कन्या देऊन ॥ पुढिलिया सुखातें ॥ १७ ॥ ऐसें मंत्री बोलतां वचन ॥ मान तुकावी शुभविक्रम ॥ म्हणे अवश्य असेंच करणें ॥ योजिलिया अर्थातें ॥ १८ ॥ तरी प्राज्ञिक एक यांत ॥ गोष्ट सुचली आहे मातें ॥ आधीं योजून अधिकारातें ॥ वरी जामात मानवावा ॥१९॥ तरी प्राज्ञिक करावें ऐसें ॥ समारंभीं गजशुंडेस ॥ माळ ओपून राज्यासनास ॥ स्वामित्वपणीं मिरवावें ॥ २० ॥ मग तो सहज ईश्वरीसत्तें ॥ लोकांत मिरवेल महीपती ॥ कन्या अर्पून उपरांतीं ॥ सर्वसुखा ओपावें ॥ २१ ॥ ऐसें बोलतां शुभविक्रम नृपती ॥ तेंचि मानलें मंत्रिकांप्रती ॥ मग शुभशाळा मंडपक्षितीं ॥ महोत्सव मांडिला ॥ २२ ॥ पाहून दिन सुदिन मास ॥ उभारिलें मंडपास ॥ गुढ्या तोरणें पताकांनीं ॥ राजसदन शोभलें ॥ २३ ॥ वस्त्राभरणीं कनककोंदणीं ॥ भूमीं मिरवला कुंजर रत्नीं ॥ दिव्यमाळा शुंडीं ओपून ॥ नगरामाझारी संचरला ॥ २४ ॥ मागें मंत्री मानव विप्रांसहित ॥ चक्षुदीक्षा करी नृपनाथ ॥ तों दिव्यकुंजर घेऊन माळेतें ॥ नगरामाजी

१ नद्या. २ अयोध्या, मथुरादि सात मोक्षपुऱ्या. ३ उज्जनी, उज्जैन. ४ राजाचें नांव. ५ बुद्धिमती, शाहाणी. ६ कन्या. ७ संरक्षण करील. ८ शहाणपणाची. ९ राजा. १० हत्ती.

संचरला ॥२५॥ आधीं सभामंडपींचे जन ॥ दिग्गजें सर्व विलोकून ॥ उपरी नगरामाजी गमन ॥ करिता झाला कुंजर तो ॥ २६ ॥ मग सकळ ग्रामींचे ग्रामजन ॥ पहाती ठाईं ठाईं उभे राहून ॥ तों ग्राम शोधीत दुर्गी येऊन ॥ विक्रमातें विलोकी ॥ २७॥ गज येऊन दुर्गानिकट ॥ उभा राहे न चाले वाट ॥ तों दुर्गी विक्रमासह हे अष्ट ॥ सेवाधारी असती ॥ २८ ॥ गज खुंटतां पाहे नृपती ॥ खालीं पाचारी अष्टांप्रती ॥ एकामागें एक उतरती ॥ दुर्गपायऱ्या विशाळ ॥ २९ ॥ तों सर्वांमागून उतरतां विक्रम ॥ गज आनंदोन धांवे सप्रेम ॥ कुसुममाळा ग्रीवेलागून ॥ शुंडादंडें ओपिली ॥ ३० ॥ माळा ग्रीवे ओपितां गज ॥ वाद्यें वाजती जाहलें चोज ॥ गजस्कंधीं वाहून राज ॥ शृंगारमंडपीं आणिला ॥ ३१ ॥ मग ओपूनियां कनकासन ॥ निकट रायें मंत्री बैसवून ॥ परी सहज चर्चा जातीलागून ॥ कुल्लाळशब्द निघाला ॥ ३२ ॥ तेणेंकरून राव चित्तीं ॥ कांहींसा झाला साशंकित ॥ मग मंत्रिका नेऊन एकांतीं ॥ कुल्लाळशब्द दर्शवी ॥ ३३ ॥ म्हणे योजिल्या अर्थाप्रती ॥ भिन्न अर्पाया सुमेधावती ॥ आम्हां क्षत्रियां कुल्लाळजाती ॥ वर्ण भिन्न दिसतो हा ॥ ३४ ॥ ऐसें बोलतां शुभविक्रमराव ॥ मंत्रीही व्यापिला संशयभावें ॥ परी तो सर्वज्ञ शोधार्णव ॥ राव घेऊन वहिवटला ॥ ३५ ॥ सर्वे येऊन मंडपग्रामाबाहेर ॥ त्या अष्ट सोबत्यां बोलावून बाहेर ॥ निकट बैसवून जातीविचार ॥ पुसता झाला तयांसी ॥ ३६ ॥ ते म्हणती नेणों कोण जाती ॥ कुल्लाळ म्हणती विक्रमाप्रती ॥ परी याचा शोध कुल्लाळजातीं ॥ कवणालागीं पुसावा ॥ ३७ ॥ मग तो मंत्री परस्परें ॥ कमठा पाचारून वाग्युत्तरें ॥ एकांतीं नेऊन परम आदरें ॥ जातिवृत्तांत पुसतसे ॥ ३८ ॥ मग तो कमठ मुळापासून ॥ सांगता झाला विक्रमकथन ॥ माता क्षत्रियकुळीं सत्यवर्म ॥ मिथुळापतीची दर्शवी ॥ ३९ ॥ याउपरी पिता सुरोचन ॥ दर्शवी स्वर्गीचें गंधर्वरत्न ॥ ऐसें ऐकतां वर्तमान ॥ मंत्री तोषमान होतसे ॥ ४० ॥ मग कमठास नेऊन रायासमोर ॥ तेथेंही वदविलें वाग्युत्तर ॥ रावही ऐकून तें उत्तर ॥ परम चित्तीं तोषला ॥ ४१ ॥ तोषून मंत्रिका पुन्हां बोलत ॥ मंत्री म्हणे कमठ घेऊन आंत ॥ मीच जातों महाराज्यांत ॥ तरी पाचारण पाठवा सत्यवर्म्यातें ॥४२॥ अवश्य म्हणे शुभविक्रमनृपती ॥ बोळविता झाला मंत्रिकाप्रती ॥ मग कमठ आणि मंत्री सुमती ॥ मिथुळेलागीं पातले ॥ ४३ ॥ रायें सत्यवर्मे ऐकून ॥ सदनीं नेलें गौरवून ॥ मग कमठ मंत्री सत्यवर्म ॥ एकांतासी बैसले ॥ ४४ ॥ ते एकांतीं कमठ विचार ॥ सांगता झाला सविस्तर ॥ कीं सत्यवतीचें उदेलें जठर ॥ विक्रमफळ मिरवलें ॥ ४५ ॥ तरी आतां दैवेंकरून ॥ पौत्रा लाभलें राजचिन्ह ॥ तरी संशयद्रुम आपण चालून ॥ मूळापासून खुडावा ॥ ४६ ॥ ऐसी सांगून सकळ कथा ॥ योगक्षेमाची सांगितली वार्ता ॥ स्वर्गवास गंधर्वजामाता ॥ झाल्यासह कथियेलें ॥ ४७ ॥ रायें ऐकून सकळ विस्तार ॥ चित्तसरितें आनंदपूर ॥ दाटोनि पृतनेसह संभार ॥ शुभविक्रमसंगमीं मिळाला ॥ ४८ ॥ भेटून सत्यवतीतें ॥ सकळ पुसून वृत्तांतातें ॥ मग शुभविक्रमरायाचे चित्तीं ॥ अंतीं पांग फिटला ॥४९॥

१ किल्ल्याजवळ. २ सेवक. ३ गळ्यांत. ४ कुंभाराच्या जातीचा असा शब्द. ५ नातवाला. ६ संशयरूपी वृक्ष. ७ सैन्यासह. ८ संशय.

याउपरी [1]सुघोषमेळीं ॥ विक्रम अभिषेकिला राज्यनव्हाळीं ॥ मग राज्यपदीं तये काळीं ॥ बैसविला महाराजा ॥ ५० ॥ छत्रचामरें माथां मिरवती ॥ ते राज्यासनीं विक्रम नृपती ॥ गर्हिवरोनि तोषविला प्रजापती ॥ याचकां धन वांटिलें ॥ ५१ ॥ ऐसा समारंभ झालियापाठीं ॥ मग सुमेधा अर्पिली गोरटी ॥ तोही आनंद महीपाठीं ॥ मंगलाचा मिरवला ॥ ५२ ॥ यापरी सत्यवर्म ॥ परम संस्काराचा आनंद घेऊन ॥ आपलें राज्य विक्रमा देऊन ॥ उचित आनंद संपादीत ॥ ५३ ॥ सत्यवतीउदरींचें रत्न ॥ राज्य ओपिलें तया आंदण ॥ उभयराज्यीं सार्वभौम ॥ विक्रमनृपति मिरवला ॥ ५४ ॥ असो ऐसा वहिवाट करून ॥ निघता झाला सत्यवर्म ॥ येरीकडे राव विक्रम ॥ भर्तरीतें ओपी युवराज्या ॥ ५५ ॥ मग उभय बंधू समाधानीं ॥ राज्य करिती अवंतिकास्थानीं ॥ तों सुमंत मंत्रिका एके दिनीं ॥ अर्थ एक सूचला ॥ ५६ ॥ कीं आपुली कन्या पिंगला ॥ देऊं राया भर्तरीला ॥ मग विक्रमा पुसून सोहळा ॥ शुद्धतिथि लग्नाची ॥ ५७ ॥ परी तेथें [2]विक्षेप आला अवचिता ॥ [3]कुंटाळ मिळाला रजक तत्त्वतां ॥ मंत्रिका [4]आराटूनि सांगे वार्ता ॥ शोध करा जातीचा ॥ ५८ ॥ ऐसें बोलतां रजक त्यातें ॥ पुन्हां बोलाविलें कमठकुलाळातें ॥ त्यातें पुसतां सविस्तर तें ॥ कुलाळ म्हणे [5]श्रुत नाहीं ॥ ५९ ॥ मग सत्यवतीतें विचारीत ॥ भर्तरी तुमचा कैसा सुत ॥ तीही म्हणे उदरव्यक्त ॥ भर्तरी नव्हे माझा कीं ॥ ६० ॥ ऐसी ऐकून तयाची उक्ती ॥ विक्रमा विचारी मंत्री सुमती ॥ तोही म्हणे नेणों जाती ॥ बंधु मानिला भावार्थें ॥ ६१ ॥ ऐसें बोलतां राव विक्रम ॥ संशयीं पडला मंत्री सुगम ॥ मग भर्तरीस पुसता झाला [6]वर्म ॥ प्रांजळ सांगे भर्तरी ॥ ६२ ॥ मित्रावरुणीरेतापासून ॥ वनांतरीं वाढलों हरिणीपासून ॥ भाटसंगतीं व्यवसायादि करून ॥ सकळ कथन निरूपिलें ॥ ६३ ॥ परी मंत्रिका न पडे विश्वास ॥ चित्तीं म्हणे स्वकार्यास ॥ ऐसें भाषण करीतसे विशेष ॥ सत्य केवीं मानावें ॥ ६४ ॥ तरी आतां असो कैसें ॥ हा म्हणवितो मित्रपिता आम्हांस ॥ तरी याचे हस्तें मित्रावरुणीस ॥ कार्यालागीं पाचारावें ॥ ६५ ॥ ऐसें मंत्री चित्तीं योजुनी ॥ म्हणे तुमचा पिता मित्रावरुणी ॥ तरी स्वमंगलातें बोलावूनी ॥ आम्हां दृष्टीं दाखवा ॥ ६६ ॥ भर्तरी असे तुमची माता ॥ तरी ती झाली [7]विगलिता ॥ परी लग्नविधीतें आपुला पिता ॥ सोहळा घेऊन पाचारा ॥ ६७ ॥ ऐसें बोलतां मंत्री त्यातें ॥ म्हणे अघटित काय यातें ॥ मग उभा राहून अंगणातें ॥ ऊर्ध्वदृष्टी करीतसे ॥ ६८ ॥ म्हणे मित्रावरुणी मम ताता ॥ हा देह असेल तव रेता ॥ तरी मज बाळाची धरूनि आस्था ॥ मंगलासी येईं कां ॥ ६९ ॥ ऐसें बोलून दीर्घवाणीं ॥ ध्यान करीतसे आपुले मनीं ॥ हें जाणवलें अंतःकरणीं ॥ मित्रावरुणीच्या तेधवां ॥ ७० ॥ मग [8]वातचक्रीं आगमन ॥ [9]अवंतीनगरीं स्वतां येऊन ॥ बोलता झाला मंत्रिकालागून ॥ शुभविक्रम रायाच्या ॥ ७१ ॥ म्हणे मंत्रिका सर्व सुमूर्ती ॥ सकळ संशयाची सांडीं भ्रांती ॥ मम सुता विवाहाप्रती ॥ कन्यादान ओपीं कां ॥ ७२ ॥ म्हणसील जरी मंगळा निक ॥ वराचा सिद्ध असावा जनक ॥ तरी पुष्पवृष्टि

१ जयजयकारामध्यें. २ अडथळा. ३ विघ्नकर्ता. ४ भेदून. ५ माहीत. ६ खराखुरा गूढ भाव. ७ जर्जर, नष्ट. ८ वायुमार्गांत. ९ उज्जैनींत.

मंगळघोष ॥ सुरवरां हातीं करवीन ॥ ७३ ॥ याउपरी राया विक्रमाच्या तातातें ॥ सुरोचन गंधर्वा पाठवीन येथें ॥ सकळ संशय सांडून त्वरितें ॥ सुखें द्यावी पिंगला ॥ ७४ ॥ म्यां जरी यावें मृत्युभूमीं ॥ तरी दोहतील बहुत प्राणी ॥ तस्मात् सकळ संशय सोडोनी ॥ पिंगला अर्पी मम सुता ॥ ७५ ॥ ऐसें तन्मुखींचें ऐकून वचन ॥ परितोषलें मंत्रिकाचें मन ॥ सकळ संशयातें सांडून ॥ लग्नसोहळा मांडिला ॥ ७६ ॥ मग नेमिल्या तिथीस सीमांतपूजन ॥ ते संधींत उतरला गंधर्व सुरोचन ॥ स्वकांता सत्यवतीस भेटून ॥ विक्रमातें पाचारी ॥ ७७ ॥ विक्रम येऊन त्वरितात्वरित ॥ तातचरणीं माथा ठेवीत ॥ मग बोलावून सुमंत्रिकातें ॥ सुरोचनातें भेटवी ॥ ७८ ॥ असो सुरोचन गंधर्वपती ॥ दिव्यतेजें पाहून क्षितीं ॥ अतिनम्र होऊनि चित्तीं ॥ निकट बसे गंधर्वी ॥ ७९ ॥ निकट बसतां सुरोचन ॥ म्हणे सुमति तूं दैववान ॥ प्रत्यक्ष धूमीनारायण ॥ सोयरा केला जामात ॥ ८० ॥ अरे भर्तरीपुत्र अवतारदक्ष ॥ मित्रावरुणीचा अवतार प्रत्यक्ष ॥ तुवां जामात केला प्रत्यक्ष ॥ सकळ दैवां मिरवला ॥ ८१ ॥ ऐसें बोलतां सुरोचन ॥ पुन्हां वंदिता झाला चरण ॥ म्हणे मम भाग्य खरें उत्तम ॥ सोयरे झाले देव कीं ॥ ८२ ॥ तरी मी एक अर्थाअर्थी ॥ दैववान असें त्रिजगतीं ॥ तरी चलावें मंडपाप्रती ॥ करूं सीमांतपूजना ॥ ८३ ॥ अवश्य म्हणोनि सुरोचन ॥ मानववेषीं मंडपीं येऊन ॥ समारंभें करिती सीमांतपूजन ॥ करूनि विधि उरकिला ॥ ८४ ॥ वधूवरांतें आशीर्वाद देतां ॥ कुसुमें वर्षती स्वर्गदेवता ॥ अष्टकें झालिया करतलहस्ता ॥ टाळी पिटिती आनंदें ॥ ८५ ॥ मग नाना वाद्यांचा गजर ॥ तेणें कोंदलें सकळ अंबर ॥ स्वर्गीं गर्जती जयजयकार ॥ सुरवर विमानीं बैसूनियां ॥ ८६ ॥ असो पांच दिवस उत्तम सोहळा ॥ नानारत्नरंगमाळा ॥ सकळ तोषवूनि वऱ्हाडपाळा ॥ बोळविलें सुमतीनें ॥ ८७ ॥ याचकांसी अपार धन ॥ रायें बोळविलें देऊन ॥ एक मास गंधर्व सुरोचन ॥ तया ठायीं राहिला ॥ ८८ ॥ वरपिता मिरवला सुरोचन ॥ वरमाय सत्यवतीरत्न ॥ असो सकळां पुत्रसोहळामान ॥ सुमतीनें ओपिला ॥ ८९ ॥ यापरी एक मासाची अरुती ॥ सुरोचन तोषविला सहसत्यवती ॥ मग विचारून शुभविक्रमरायाप्रती ॥ स्वस्थानासी पैं गेला ॥ ९० ॥ येरीकडे अवंतिकेंत ॥ दिवसेंदिवस लोटले बहुत ॥ पिंगला नामें स्वरूपवंत ॥ ऋतुकाळ पावली ॥ ९१ ॥ मग उभयतां एकपणें ॥ सदा विचरती संतोषमनें ॥ याउपरी भर्तरीनें ॥ लग्नें केलीं अमूप ॥ ९२ ॥ द्वादश शत कामिनी करोनी ॥ सदा विचरे भोगासनीं ॥ परी मुख्य दारा पिंगलानामीं ॥ पट्टराणी मिरवत ॥ ९३ ॥ जैसा नवलक्ष नक्षत्रांत ॥ तेजें मिरवे नक्षत्रनाथ ॥ तेवीं द्वादश शतांत ॥ पिंगला नामें मिरवतसे ॥ ९४ ॥ असो युवराज्याच्या मंडणीं ॥ भर्तरी राणा मिरवे भूषणीं ॥ परी तयासमीप हिरकणी ॥ पिंगला मिरवे वैडूर्या ॥ ९५ ॥ कीं अर्का शोभवी रश्मिकिरण ॥ कीं घृतीं शर्करा दावी गोडपण ॥ तेवीं भर्तरी पिंगलारत्न ॥ स्वस्वरूपीं मिरवतसे ॥ ९६ ॥ ऐसें उभयतांचें एक-

१ देवांच्या. २ होरपळतील. ३ पृथ्वीवर. ४ मंगळाष्टकें. ५ आकाश. ६ अवधि, महिनाभर. ७ आनंदयुक्त. ८ अनेक. ९ स्त्रिया. १० चंद्र. ११ सूर्याला.

चित्त ॥ कीं लोह मिळालें चुंबकांत ॥ कीं कर्दम उदकातें ॥ कदाकाळीं सांडीना ॥ ९७ ॥ सभामंडपीं राय असतां ॥ परी पिंगलेस वदे सदा चित्ता ॥ रायासही न गमे तीतें पाहतां ॥ घडोघडी पाहतसे ॥ ९८ ॥ पाहूनियां पिंगलेचें वदन ॥ मग राया सुचे कारभार पूर्ण ॥ जैसें अमलिया पूर्ण ॥ अमल सर्वदा पाहिजे ॥ ९९ ॥ तन्न्यायें उभयतांशीं ॥ ऐक्यप्रीति वर्ते प्रपंचासीं ॥ ऐसें लोटतां बहुत दिवसीं ॥ वय अर्धे पातलें ॥ १०० ॥ तों एके दिवशीं पारधीलागूनी ॥ राव जातसे घोर विपिनीं ॥ तों वरूनि पाहे मित्रावरुणी ॥ पुत्रचंद्र दृष्टीनें ॥ १ ॥ पाहतां विचारी मनांत ॥ कीं मम वीर्याचे उदेले सुत ॥ एक अगस्ती दुसरा भर्तरीनाथ ॥ मृत्युभूमीकारणें ॥ २ ॥ परी त्यांत अगस्तीनें हित केलें ॥ चपळपणानें स्वयंभ वरिलें ॥ परी भर्तरीचें मन गुंतलें ॥ राज्यवैभवाकारणें ॥ ३ ॥ तरी अहिताचा विषयप्याला ॥ राया भर्तरीस गोड वाटला ॥ हितालागीं सर्वस्वीं चुकला ॥ अचलपद तोचि राया ॥ ४ ॥ तरी हा विषयपदापासून ॥ कैसा सुटेल स्वबुद्धीनें ॥ याचें हित याजकारणें ॥ प्राप्त कैसें होईल कीं ॥ ५ ॥ नवनाथांतील अवतार ॥ धूमीनारायण महा थोर ॥ परी वेष्टिला विषयतिमिर ॥ सुटेल कैसा कळेना ॥ ६ ॥ ऐसा मोह उपजोन पोटीं ॥ उतरता झाला मेहीतळवटी ॥ अनुसूयात्मजाची घेऊन भेटी ॥ वर्तमान निवेदिलें ॥ ७ ॥ म्हणे महाराजा योगद्रुमा ॥ काम वेधला आहे आम्हां ॥ तरी त्या कामाची सत्य भावना ॥ ऐकून घेई महाराजा ॥ ८ ॥ तुम्ही विजयप्रतापध्वज ॥ मिरवलां महीं तेजःपुंज ॥ तरी मिरवला मम आत्मज ॥ मच्छिंद्रासम भर्तरी ॥ ९ ॥ तूं रायपंथ मिरवून ॥ सच्छिष्य मिरवलें जगांत रत्न ॥ तें चित्तीं मम नंदन ॥ प्रविष्ट करीं याचि जगीं ॥ ११० ॥ यावरी बोले अनसूयासुत ॥ चिंता न करीं भर्तरीनाथ ॥ माझे प्रसादें जाण सत्य ॥ जगामाजी मिरवेल ॥ ११ ॥ मिरवेल परी कैसे रीतीं ॥ चिरंजीव शोभे महीवरती ॥ यावत् मही तावत् जती ॥ भर्तरीनाथ मिरवेल ॥ १२ ॥ हें पूर्वींच भविष्योत्तर ॥ आहे समर्था मम गोचर ॥ दिधलें उत्तर केलें वाग्उत्तर ॥ मम वचनीं सर्वथा ॥ १३ ॥ तरी आतां संशयासीं न रहावें ॥ आतां स्वस्थचित्त असावें ॥ मी यत्न करून भर्तरीराय ॥ नाथपंथीं मिरवीन ॥ १४ ॥ ऐसें बोलून अत्रिनंदन ॥ बोळविलें मित्रावरुणा ॥ आपण तेच घडी कृपा करून ॥ भर्तरीपासीं जातसे ॥ १५ ॥ तों येरीकडे भर्तरी नृपती ॥ पारधीस्तव काननाप्रती ॥ मृगयेकरितां हिंडे निगुतीं ॥ नाना वनें उपवनादि ॥ १६ ॥ सर्वें सेना अपरिमित ॥ विपिनीं विस्तारली कृतांतवत ॥ चवदा लक्ष वाताकृत ॥ वाजी फिरती विपिनीं ते ॥ १७ ॥ हेमतगटीं शृंगारासहित ॥ पाँखरा झालरी शोभती मुक्त ॥ अलंकारें कोंदणयुक्त ॥ रत्नें मिरवीं नवविध ॥ १८ ॥ तरी ते शृंगार म्हणा वाचे ॥ कीं मोहर उजाळे नक्षत्रांचे ॥ तेवीं रत्नें चमकपणाचे ॥ भाव दाखविती नक्षत्रांचे पैं ॥ १९ ॥ अहो ते हय न म्हणूं वाचे ॥ रत्न उदेलें उदधिउदराचें ॥ तेणें इंदिरा हर्षोनि नाचे ॥ बंधू म्हणोनि शृंगारी ॥ १२० ॥ त्याच नीतीं एक लक्ष ॥ दिनसमान गज प्रत्यक्ष ॥ विशाळ शुंडादंड

१ चिखल. २ पृथ्वीवर. ३ पृथ्वी असेपर्यंत. ४ वागा वगैरे. ५ वायुगती समान. ६ घोडे. ७ मोत्यांच्या जाळ्यांचे घोड्यांचे पोषाक. ८ लक्ष्मी.

सुलक्ष ॥ चंद्रतेज मिरवलें ॥ २१ ॥ मिरवलें परी कैसे भावें ॥ इंदूस मानलें बंधुभावें ॥ म्हणोनि सर्व पूर्ण स्वभावें ॥ चमत्कार दावीतसे ॥ २२ ॥ त्याही दंती शुद्धकोंदणी ॥ चुडे मिरवती हाटकखाणी ॥ त्यांत हिरे नक्षत्रें आणोनी ॥ इंदुराज मिरवीतसे ॥ २३ ॥ आणि स्वतां तोचि मुक्तासंपत्ती ॥ वरदबाळ ओपिल्याप्रती ॥ झालरी अग्रगण्य निगुतीं ॥ एकसारा अर्चियेल्या ॥ २४ ॥ चांदवे अंबारी कोंदणयुक्त ॥ नवरत्नादि सगुण मुक्त ॥ कळसतेजीं लावूनि आदित्य ॥ म्हणती विसांबा घेईं कां ॥ २५ ॥ आणि रायासमान पंचशत ॥ राजविनवणी प्रज्ञावंत ॥ सरदारनामीं भूषणभरित ॥ मूर्ती जेवीं गभस्तीच्या ॥ २६ ॥ तयां माथां कनकचीर ॥ सहज तेज छत्र चंद्राकार ॥ तयांच्या कळसदीप्तीवर ॥ भानुतेज लाजतसे ॥ २७ ॥ रायामाथीं अर्धशत ॥ कनकअंबरीं हाटक व्यक्त ॥ पाच माणिकी मणियुक्त ॥ [२]हेमें गुंफिल्या झालरी ॥ २८ ॥ ऐसिया छत्रकळसउद्देशीं ॥ वैडूर्यरत्नें जडिल्या राशी ॥ पद्मरागें आदित्य मानसीं ॥ विरह करूं म्हणतसे ॥ २९ ॥ विरह तरी केउता तरणी ॥ व्यर्थ फिरतसे अंबरभ्रमणीं ॥ तरी वैडूर्यरत्नांच्या पंक्तींलागुनी ॥ येऊन सुख भोगी कां ॥ १३० ॥ वनें विरहें उदास चित्तीं ॥ अस्ताचळीं जातां गभस्ती ॥ चतुर्थप्रहरीं शिणली वृत्ती ॥ रत्नपंक्ती इच्छीतसे ॥ ३१ ॥ असो आतां विरहअर्क ॥ म्हणे संपत्ती मिरवला मम बाळक ॥ तेणें तो अर्क पावून सुख ॥ अस्ताचळा मावळतसे ॥ ३२ ॥ असो ऐशा भाषणस्थितीं ॥ अचाट [३]विपिनीं भर्तरी नृपती ॥ मृगया करितां वाताकृती ॥ काननांत हिंडूनियां ॥ ३३ ॥ परी समयास आला मास चैत्र ॥ पुत्रचंद्रा पहावया मित्र ॥ स्थिरावे तेणें [४]रश्मि उलटयंत्र ॥ काननांत लखलखी ॥ ३४ ॥ तैं रश्मीचें तीव्रपण ॥ चमू हळहळी तृषेंकरून ॥ मग राव भर्तरी मृगया सांडून ॥ उदक शोधूं धांवतसे ॥ ३५ ॥ परी पंचत्रैयचतुर्थींत ॥ काननविरहित योजनशत ॥ उदक न दिसे ऐसें भावीत ॥ कानन रूक्ष मिरवतसे ॥ ३६ ॥ फार व्यापिले तृषेंकरून ॥ कोणी सोडूं पाहती प्राण ॥ कोणी हिंडोन रानोरान ॥ [५]लवण जीवन पहाती ॥ ३७ ॥ कोणी त्रासून पाला भक्षिती ॥ कोणी लघुशंका सेविती ॥ कोणी तरूच्या सावलीं क्षिती ॥ धरूनियां पडियेले ॥ ३८ ॥ ऐसी [६]पृतना आहाळपणीं ॥ व्यापिली आहे तृषेंकरूनी ॥ रावही तैसाच क्लेशें काननीं ॥ पाणी पाणी म्हणतसे ॥ ३९ ॥ प्राण झाला कासावीस ॥ हृदयीं न सांठवे श्वासोच्छ्वास ॥ मुखीं कोरड पडली विशेष ॥ जिव्हा लोटूं लागलीसे ॥ १४० ॥ ऐसे क्लेशाचे प्रकरणीं ॥ श्रीदत्तात्रेय काननीं ॥ गुप्तवेषें असोनी ॥ रायामागें हिंडतसे ॥ ४१ ॥ तों विपिनीं मध्यें गोंगावत ॥ काय करी अत्रिसुत ॥ मावेचें सरोवर रचून तेथ ॥ छंदें व्यक्त दाखवी ॥ ४२ ॥ निर्मळपणीं गंगाजळ ॥ दाटोनि पात्र उचंबळे ॥ [७]कुमुदिनी विकासित घालून पाळे ॥ नांदताती सभोंवतीं ॥ ४३ ॥ आणि तया [८]सरसीकांठीं ॥ बहु फलित तरुदाटी ॥ अनेक पक्षी [९]मराळकोटी ॥ पंक्तिसरी दाटल्या ॥ ४४ ॥ शीतळ छाया शीतळ जीवन ॥

१ सूर्य. २ सोन्यानें. ३ अरण्यांत. ४ किरण. ५ खारें पाणी. ६ सेना. ७ कमलिनी. ८ सरोवराच्या कांठीं. ९ हंससमूह.

सरोवर मिरवलें गहिंवरपणें ॥ तये तटीं पर्णकुटी करून ॥ अत्रिआत्मज मिरवला ॥ ४५ ॥ तों येरीकडे नृपनाथ ॥ क्लेशें हिंडतां कानन नांत ॥ तों सरोवर ठायीं देखोनि अकस्मात ॥ एकटाचि पातला ॥ ४६ ॥ परम देखून गहिंवरें जीवन ॥ धांव घेतसे नृपचिद्रत्न ॥ सरसीकांठीं जाऊन ॥ जीवन स्पर्शू टेंकला ॥ ४७ ॥ आतां स्पर्शावें ओंजळांत ॥ तों तिकडून उठला अत्रिसुत ॥ प्रत्योदक करें कवळूनि हात ॥ रायावरी धांवला ॥ ४८ ॥ अरे अरे वाचे म्हणून ॥ म्हणे न स्वीकारीं माझें जीवन ॥ तूं कोणाचा आहेस कोण ॥ आधीं मातें सांग कीं ॥ ४९ ॥ येरी पावोन भय देहातें ॥ भयें दाटला नृपनाथ ॥ कांहीं न बोले क्षितींत ॥ टकमकां पहातसे ॥ १५० ॥ अवधूत म्हणतसे कां रे मौन ॥ धरून कांहीं न बोलसी वचन ॥ माता पिता गुरु कोण ॥ तव देहीं मिरवले ॥ ५१ ॥ माता पिता गुरूसहित ॥ सांगून करीं उदकपानातें ॥ नातरी सेवितां पावसी मृत्यु ॥ जीवन येथेंचि हें राया ॥ ५२ ॥ ऐसें ऐकून भर्तरीनाथ ॥ पदावरी लोटला त्वरित ॥ नमून जन्मकथेसहित ॥ अत्रिसुता सांगितलें ॥ ५३ ॥ भर्तरीमाता पात्रसांठवणीं ॥ पिता मिरविला मित्रावरुणी ॥ ऐसें प्रकरण दशालागुनी ॥ मूळापासोन सांगितलें ॥ ५४ ॥ येरी म्हणे गुरु कोण ॥ भर्तरी म्हणे नाहीं अजून ॥ ऐसें ऐकून अत्रिनंदन ॥ बोलता झाला तयासी ॥ ५५ ॥ म्हणे राया व्यवस्थित ॥ मिरवलासी या देहातें ॥ अद्यापि गुरु नाहीं तूतें ॥ भ्रष्टबुद्धि मिरविसी ॥ ५६ ॥ तरी तूं पूर्वींचा परम पापिष्ठ ॥ म्हणून गुरु न मिळाला वरिष्ठ ॥ तरी आतां क्रियानष्ट ॥ स्पर्श न करीं जळातें ॥ ५७ ॥ तुवां स्पर्श केलिया पाणी ॥ सकळ तोय जाईल आटोनी ॥ निर्गुरुत्वाचा विटाळ मानुनी ॥ तोय त्रासा पावेल ॥ ५८ ॥ मग तोय आटल्या निगुतीं ॥ मम कोपाची पावकशेखी ॥ आसडोनि तव देहाप्रती ॥ भस्म करील क्षणार्धें ॥५९॥ ऐसें बोलतां अत्रिनंदन ॥ भर्तरी करीतसे नमन ॥ म्हणे महाराजा तृषें प्राण ॥ जात आहे माझा कीं ॥ १६० ॥ तरी आतां अनुग्रह देऊन ॥ आपण वांचवा माझा प्राण ॥ दत्त म्हणे तव अनुग्रहास मम मन ॥ द्यावया योग्य दिसेना ॥ ६१ ॥ अरे मम अनुग्रहासाठीं ॥ शिव विरिंचि घालिती मिठी ॥ तरी अनुग्रहातें पूर्ण कोटी ॥ तुझे पदरीं दिसेना ॥ ६२ ॥ ऐसे भागले थोर नायक ॥ तरी नातुडे अनुग्रह दोंदिक ॥ तो तेथें तूं मशक ॥ अनुग्रह वांछिसी ॥ ६३ ॥ भर्तरी म्हणे हें तों निश्चित ॥ परी तृषेनें होतों प्राणरहित ॥ तुम्ही कृपाळु परम संत ॥ दयाक्षमा पाळितां ॥ ६४ ॥ जगाचें न साहे कीचकपण ॥ त्वरेंचि हरतां दैन्यांकारण ॥ तरी माझा वांचवून प्राण ॥ धर्मसाधन मिरवावें ॥६५॥ ऐसें ऐकतां तपोराशी ॥ म्हणे अनुग्रह देईन तुजसी ॥ परी पूर्ण तप द्वादशवर्षीं ॥ आचरावें या स्थळा ॥ ६६ ॥ त्या तपःपुण्यांशेंकरून ॥ योग्य होसील अनुग्रहाकारण ॥ राव म्हणे सध्यांच प्राण ॥ तृषेंकरोनि जातो कीं ॥ ६७ ॥ मग द्वादश वर्षें वांचल्यावरती ॥ कैसी घडेल कृपामूर्ती ॥ दत्तात्रेय म्हणे तपापुढती ॥ संकल्पातें करावें ॥ ६८ ॥ काया वाचा चित्त मन ॥ संकल्प झालिया पुण्य-

१ दत्तात्रेय. २ पाणी. ३ तें उदक. ४ खालीं जमिनीकडे. ५ गुरु न केल्याचा. ६ विस्तवाची ज्वाला. ७ तहानेनें. ८ मंत्रोपदेश.

वर्धन ॥ वर्धन झालिया पाजीन जीवन ॥ सकळ बाधा वो चुके ॥ ६९ ॥ येरी म्हणे महाराजा ॥ संकल्प करीन सांगितल्या चोजा ॥ परी आतां मातें उदक पाजा ॥ प्राण रक्षा माझा कीं ॥ १७० ॥ नाथ गुरु संकल्प करिसी ॥ कीं तपा आचरण द्वादश वरुषीं ॥ परी तैसें नोहे वैभवासी ॥ पुन्हां लिप्त न व्हावें ॥ ७१ ॥ वमनासमान पाळून सर्व ॥ विरक्तपणाची बरवी ठेव ॥ योगामाजी नित्य बसावें ॥ आयुष्यमर्यादापर्यंत ॥ ७२ ॥ ऐसें ऐकतां राव कुंठित ॥ विचारदरीं व्यापिलें चित्त ॥ म्हणे कैसी करावी रीत ॥ प्राण कासावीस होतसे ॥ ७३ ॥ परी तो पूर्ण प्रज्ञावंत ॥ म्हणे महाराजा हे नाथ ॥ मी प्रपंचरहणीरूप मुक्त ॥ झालों नाहीं अद्यापि ॥ ७४ ॥ परी पितृश्राद्ध पितृऋण ॥ मातेस केलिया गयावर्जन ॥ कांते पुत्र झालियाविण ॥ कांताऋण फिटेना ॥ ७५ ॥ पुत्रविवाह स्नुषामेळीं ॥ ऋणमुक्त होय शुद्धमौळी ॥ ऐसिया ऋणाची स्थावरकाजळी ॥ फिटली नाहीं महाराजा ॥ ७६ ॥ तरी द्वादश वरुषेंपर्यंत ॥ प्रपंच आचरूं द्यावा मातें ॥ उपरी योजून पूर्ण योगातें ॥ केलिया संकल्प समान कीं ॥ ७७ ॥ ऐसें बोलतां तई भूपाळ ॥ अवश्य म्हणे अनुसूयाबाळ ॥ मग कमंडलू भरून जळ ॥ तयापासीं पैं आला ॥ ७८ ॥ उदक ओपून करयुग्मीं ॥ संकल्प करवी मनोधर्मीं ॥ कीं द्वादशवरुषें संकल्पनामीं ॥ पुण्ययोग आचरेन ॥ ७९ ॥ यापरी तन मन धन ॥ काया वाचा जीवित्व पूर्ण ॥ गुरुसंकल्पीं सोडून जीवन ॥ अनुग्रह देतसे ॥ १८० ॥ मौळीं ठेवून वरदहस्त ॥ कर्णीं बीजमंत्र अर्पीत ॥ आपुला करोनि शरणागत ॥ नाम आपुलें सांगतसे ॥ ८१ ॥ म्हणे वत्सा ओळख मातें ॥ मी दत्तात्रेय अत्रिसुत ॥ परी तव दैव भाग्यवंत ॥ मम कर मौळीं विराजला ॥ ८२ ॥ परी अनुग्रह होतांचि प्राप्त ॥ माइक सरोवरासहित झाला गुप्त ॥ इतुकें केलें जया अर्थी ॥ व्यर्थ होऊं पहातसे ॥ ८३ ॥ ऐसी चिंता मानसीं बहुत ॥ करिता झाला भर्तरीनाथ ॥ म्हणे महाराजा गुरुनाथ ॥ प्राण जाऊं पाहे आतां ॥ ८४ ॥ ऐसें ऐकतां भर्तरीवचन ॥ भोगावती पाचारी अत्रिनंदन ॥ तरी ती सरिता अपार जीवन ॥ घेऊनियां धांवली ॥ ८५ ॥ सुरभीचें करून चिंतन ॥ मही दर्शविली दैदीप्यमान ॥ नेमक सहज उपजवोनि अन्न ॥ पर्वतासमान मिरविलें ॥ ८६ ॥ मग चमूसहित नृपनाथ ॥ भोगावतीचें स्नान करीत ॥ उत्तम अन्न स्वीकारून समस्त ॥ दर्शन करोनि चालिले ॥ ८७ ॥ पृतनेसहित तुष्टचित्तीं ॥ मृगया करून येत नृपती ॥ येरीकडे भोगावती ॥ तिचें स्थाना पाठविली ॥ ८८ ॥ कामधेनू स्वर्गस्थानीं ॥ पाठवोनि अदृश्य झाला मुनी ॥ येरीकडे मृगया करोनी ॥ भर्तरी गेला गांवांत ॥ ८९ ॥ तरी आतां पुढें श्रोतीं ॥ कथा स्वीकारावी सुधारससंपत्ती ॥ धुंडीसुत मालू वदेल उक्ती ॥ नरहरिप्रसादेंकरूनियां ॥ १९० ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ सप्तविंशतिअध्याय गोड हा ॥ १९१ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥ ॥

१ पाणी. २ रीतीनें. ३ मस्तकीं. ४ नदी. ५ कामधेनूचें. ६ सैन्यासह.

श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी जगदुद्धारा ॥ अखिला निरंजना निर्विकारा ॥ भक्तमानसचकोरचंद्रा ॥ प्रेमांबुधारा ओसरसी ॥ १ ॥ तरी तूं असतां कृपाळु आई ॥ माय माझे विठाबाई ॥ तरी आतां ग्रंथप्रवाहीं ॥ येऊनियां बैसें गे ॥ २ ॥ मागिले अध्यायीं प्रेमेंकरून ॥ वैभवीं मेळविला राव विक्रम ॥ भर्तरीसंगमीं पिंगलालग्न ॥ दत्तानुग्रह लाधला ॥ ३ ॥ उपरी मृगया करूनी ॥ अवंतिकास्थाना जाऊनी ॥ राजधामीं [1]कनकासनीं ॥ सभामंडपीं बैसला ॥ ४ ॥ क्षणैक बैसून त्वरितात्वरित ॥ पाकशाळे गेला नृपनाथ ॥ पक्वान्न सेवून अंतःपुरांत ॥ पिंगलागृहीं संचरला ॥ ५ ॥ कनकमंचकीं सुमनशेजीं ॥ राव बैसवी पिंगला अर्जी ॥ षोडशोपचारेंकरून पूजी ॥ श्रद्धापूर्वक पिंगला ॥ ६ ॥ परम प्रीतीं भावारूढ ॥ रायें दर्शविलें चित्तीं कोड ॥ मग करीं कवळून [2]स्नेहेंपाडें ॥ निकट घेत पिंगला ॥ ७ ॥ तीतें वामांकीं बैसवोन ॥ परम प्रीतीनें घेत चुंबन ॥ वाचेनें म्हणे तुजसमान ॥ अन्य दारा नावडती ॥ ८ ॥ अगे पिंगले माझें मन ॥ भावी मम देहींचें ऐक्यरत्न ॥ जैसे मित्र[3] आणि रश्मिचिन्ह ॥ ऐक्यदेहीं मिरवती ॥ ९ ॥ कीं राजमौळी तेजें आगळा ॥ द्वितीये शोभली त्याची कळा ॥ तेवीं मातें तूं पिंगला ॥ मम चित्तावर धांवें ॥ १० ॥ अगे हे पिंगले माझा भाव ॥ पिंगलाभर्तरी ऐक्यनांव ॥ एकाच देहीं मज वाढीव ॥ भासे भास शुभानने ॥ ११ ॥ जैशी शर्करा आणि गोडी ॥ नामें भिन्न परी ऐक्यप्रौढी ॥ तेवीं तूं पिंगला माझे पाठीं ॥ भासे भास शुभानने ॥ १२ ॥ जैसा उदधी आणि लहरी ॥ परी ऐक्यता सागरीं ॥ तेवीं मातें तूं सुंदरी ॥ भास भाससी शुभानने ॥ १३ ॥ ऐसें म्हणून परम प्रीतीं ॥ पुन्हां चुंबन घेत नृपती ॥ मग भोगून सकाम रीतीं ॥ संतुष्ट चित्तीं मिरवला ॥ १४ ॥ मग विचार सुचला एक गहन ॥ आनंदें बैसती प्रीतीकरून ॥ बैसल्या पिंगला बोलून वचन ॥ विडा त्रयोदशगुणी देतसे ॥ १५ ॥ म्हणे हे महाराजा नृपवरा ॥ मम देहींचे प्राणप्रियेश्वरा ॥ मम [4]मानसचकोरचंद्रा ॥ प्रेमांबु मिरवतसे ॥ १६ ॥ तरी तुम्हां आम्हां गांठी ॥ गांठीं गांठिल्या त्या परमेष्ठीं ॥ गांठिल्या परी चित्तदेठीं ॥ ऐक्यभास भासतसे ॥ १७ ॥ जैसें लवण उदकीं मिश्रित ॥ भिन्न न दावी दृष्टींत ॥ तन्न्यायें ऐक्यचित्त ॥ रावराणी शोभत ॥ १८ ॥ तरी ऐसा मिश्रित अर्थ ॥ उदया पावला असे ऐक्यचित्त ॥ परी नेणूनि निर्दय परम [5]कृतांत ॥ जगामाजी मिरवतसे ॥ १९ ॥ चित्तीं चित्तभय काया ॥ हरण करीत असे राया ॥ तरी नेणों आपण विषयचिंते या ॥ बुद्धि जरी संचरली ॥ २० ॥ संचरतां परी एक त्यातें ॥ मातें दिसत उचितार्थ ॥ तुम्हांआधीं मातें मृत्य ॥ सुगम चित्ता वाटतसे ॥ २१ ॥ तरी हें ऐसें इच्छिल्याप्रमाण ॥ ईश्वरसत्ते जरी आलें घडोन ॥ मग परम बरवें दैववान ॥ जगीं असें मी एक ॥ २२ ॥ ऐसें बोलतां शुभाननी ॥ राव ऐकून बोले वाणी ॥ नेणों सखे ईश्वरकरणी ॥ पुढील कांहीं वदवेना ॥ २३ ॥ मजआधीं तूं [6]कामिनी ॥ मृत्यु पावों इच्छिसी मनीं ॥ परंतु नेणों निर्दयपणीं ॥ [7]मित्रात्मज मिरवतसे ॥ २४ ॥ तो कदा न जाणे वेदविधी ॥ सदा वर्ततसे विघडबुद्धीं ॥ नेणों मज

१ सुवर्णखचित सिंहासनावर. २ स्नेहपूर्वक. ३ सूर्य. ४ मनोरूपी चकोराला चंद्रासारख्या. ५ यम. ६ हे स्त्रिये. ७ यमराज.

मृत्यु तुजआधीं ॥ आल्या काय करशील ॥ २५ ॥ ऐसें ऐकून वदे पिंगला ॥ नेणों कैसें असे जी भाळा ॥ रेखिली विधीनें अकळ कळा ॥ कळत नाहीं महाराजा ॥ २६ ॥ परी ऐशा घडल्या गोष्टी ॥ मी राहणार नाहीं महीपाठीं ॥ देह दाहूनियां हव्यवाटीं ॥ गमन करीन तुम्हांसह॥ २७ ॥ राव ऐकून बोले वचन ॥ पुरे आतां तुझें बोलणें ॥ प्राणांहून प्रिय कोण ॥ घात त्याचा करवेना ॥ २८ ॥ तरी हे बोल उगलेचि फोल ॥ माझिया तोषाचें करिसी मोल ॥ परी समय येतां तव पाऊल ॥ मागेंचि धांव घेणार ॥ २९ ॥ तरी अनुभव माझिये चित्ता ॥ सहज आहे मजला पाहतां ॥ अगे राज्यासनीं विपुल वार्ता ॥ सेवक श्रवण माझे करविती ॥ ३० ॥ करविती परी कैशा रीतीं ॥ समरंगणींचा भाव दाविती ॥ शत्रुअनलीं प्राणाहुती ॥ वेंचूं ऐसें म्हणताती ॥ ३१ ॥ तरी समय पडतां दृष्टीं ॥ जीवित्व रक्षिती बारा वाटीं ॥ मग कोण कोठील मोह पोटीं ॥ जीवित्वाचा वरती गे ॥ ३२ ॥ तरी हें तैसें तुझें बोलणें ॥ दावीत मातें चांगुलपण ॥ परी समय पडतां अर्थ भिन्न ॥ दुसराचि आहे गे ॥ ३३ ॥ कीं बहुरूपियाचे खेळमेळीं ॥ होऊन बैसती महाबळी ॥ परी ते शूरपणाची नव्हाळी ॥ समरभूमीं चालेना ॥ ३४ ॥ कीं श्वानपुच्छाची कैशी उग्रता ॥ परी हार तेचि पडे बळी देखतां ॥ जैसी पालीची दृष्टी देखतां ॥ वृश्चिक नांगी उतरीतसे ॥ ३५ ॥ तन्न्यायें तव बोलणें ॥ मातें दिसतें सहज स्थितीनें ॥ ऐसें बोलतां भर्तरीनंदनें ॥ पिंगला वदे स्वामीसी ॥ ३६ ॥ म्हणे महाराजा प्राणेश्वरा ॥ या बोलाचा वाग्दोरा ॥ कंठीं बांधिला आहे नरा ॥ काया वाचा मानसीं ॥ ३७ ॥ तरी आतां व्यर्थ बोलून ॥ नेणों घडेल अर्थ कोण ॥ ईश्वरसत्तेचें प्रमाण ॥ ब्रह्मादिकां कळेना ॥ ३८ ॥ परी माझिये भावनेऐसें ॥ येत आहे स्वचित्तास ॥ विधवा शब्द शरीरास ॥ लिप्त होणार नाहीं कीं ॥ ३९ ॥ जरी म्हणाल कशावरून ॥ तरी काया वाचा चित्त मन ॥ तुम्हांलागीं केलें अर्पण ॥ साक्ष असे ईश्वर तो ॥ ४० ॥ तरी ईश्वर तो सत्याश्रित ॥ आहे म्हणती सकल जगतीं ॥ तरी वैधव्य शब्द जगमुखांत ॥ मातें लिप्त होणार नाहीं कीं ॥ ४१ ॥ असो बीज पेरिलें तैसें फळ ॥ द्रुमकोमादि दावी सकळ ॥ तेवीं माझी चाली सरळ ॥ फल उमटेल तैसेंचि ॥ ४२ ॥ ऐसें बोलून निवांतपणीं ॥ स्तब्ध राहिली कामिनी ॥ परी रायाचे अंतःकरणीं ॥ शब्द सदृढ मिरवले ॥ ४३ ॥ मिरवले परी ठेविले मनांत ॥ चमत्कार पाहूं कोणे दिवसांत ॥ असो हे जल्प बहु दिनांत ॥ सारते झाले प्रीतीनें ॥ ४४ ॥ सहज कोणे एके दिवशीं ॥ राव जातसे पारधीसी ॥ मृगया खेळतां विपिनासी ॥ आठव झाला कांतेचा ॥ ४५ ॥ कीं आम्ही उभयतां दोघे जण ॥ बैसलों होतों सुखसंपन्न ॥ तयामाजी मृत्यु बोलोन ॥ निश्चयविलें कांतेनें ॥ ४६ ॥ तुम्ही झालिया गतप्राण ॥ तुम्हांसवें करीन गमन ॥ तरी त्या बोलाचें साचपण ॥ आज पाहूं निश्चयें ॥ ४७ ॥ ऐसी चित्तीं योजना करून ॥ मृगया करीत फिरे कानन ॥ तों अकस्मात देखिला नयनें ॥ मृग एक नेटका ॥ ४८ ॥ राव देखतां तयापाठीं ॥ लागून शीघ्र महीं आंऱ्हाटी ॥ शीणचि त्या जीवीं बहु मेळथाटीं ॥ मृग ॥१॥

१ अग्नींत जाळून घेऊन. २ विंचू. ३ वृक्ष, अंकुर इत्यादि. ४ अरण्यांत. ५ अग्नींत प्रवेश. ६ अरण्य. ७ पळत आहे.

जीवंत धरियेला ॥ ४९ ॥ धरियेला परि हस्तेंकरून ॥ तयाची ग्रीवा छेदून ॥ मुगुटासह काढून भूषणें ॥ रुधिरें वस्त्रें भिजविलीं ॥५०॥ भिजवोनियां सेवकाहातीं ॥ देता झाला शीघ्र नृपती ॥ अन्य भूषणें उंभवून कांती ॥ सुखासनीं बैसला ॥ ५१ ॥ उत्तम छाया पाहून ॥ तयाखालीं नृप जाऊन ॥ उत्तम चीर कैंनकवर्ण ॥ मृदु गालिचा आंथरला ॥५२॥ तयावरी बैसून नृपती ॥ मंडळी दुरावून बैसे एकांतीं ॥ परी रुधिरवस्त्रें जयाहातीं ॥ तयालागीं पाचारी ॥५३॥ म्हणे हीं रक्तवस्त्रें घेऊन ॥ सेवका पिंगलेचें गांठीं स्थान ॥ वस्त्रें तीतें गोचर करून ॥ राव निमाला म्हणावें ॥ ५४ ॥ निमाला परी कैसे रीतीं ॥ जरी पिंगला बोलेल उक्ती ॥ तरी व्याघ्र संधानीं जीवितआहुती ॥ घेऊनियां पळाला ॥ ५५ ॥ ऐसें वदोन राव भृत्यातें ॥ गुप्त पाठविला अवंतिकेतें ॥ राजसदना जाऊनि भृत्यें ॥ पिंगलेतें विलोकिलें ॥ ५६ ॥ मौळीचिंरासह सकळ ॥ रुधिरव्याप्त वस्त्रें सबळ ॥ पुढें ठेवून करकमळ ॥ जोडूनियां बोलतसे ॥५७॥ म्हणे जी महाराज महीस्वामिनी ॥ मृगया करीत राव काननीं ॥ अवचित व्याघ्र जाळींतुनी ॥ उठला राया न कळतां ॥ ५८ ॥ मागाहून साधून उड्डाण ॥ राव धरिला ग्रीवेकारण ॥ धरितांच हरून प्राण ॥ रुधिर पिऊन पळाला ॥ ५९ ॥ आतां त्याचें करून दहन ॥ चमू येईल सकळ परतोन ॥ ऐसें पिंगलेनें ऐकून ॥ हृदय पिटी आक्रोशें ॥ ६० ॥ हृदय पिटून महीवरती ॥ भावें आपटी निष्ठुरगती ॥ अहा म्हणून केश हातीं ॥ धरोनियां लुंचीतसे ॥ ६१ ॥ शब्द करून अट्टहास ॥ हंबरडा मारून उदास ॥ पुन्हां महीतें मस्तकास ॥ वारंवार आफळीतसे ॥ ६२ ॥ मृत्तिका घेऊन टाकी मुखांत ॥ म्हणे हा हा जी प्राणनाथ ॥ कैसे टाकून गेलांत मातें ॥ परत्रदेशभुवनासी ॥६३॥ अहा महाराजा प्राणेश्वरा ॥ कृपीं कापिला कैसा दोरा ॥ अहा तव प्रीतीचा मोहझरा ॥ आज कैसा आटला जी ॥ ६४ ॥ अहो मम प्राणनाथा ॥ मजवीण तुम्हां क्षण गमत नव्हता ॥ प्रीती सोडूनि कैसे आतां ॥ परत्र देशा गमलेती ॥६५ ॥ ऐसें म्हणोन आरंबळत ॥ तों अंतःपुरीं समजली मात ॥ स्त्रिया राजाच्या द्वादश शत ॥ आरंबळत पातल्या ॥ ६६ ॥ एक हृदय पिटिती आपुले हस्तीं ॥ एक धांवती महीं पडती ॥ एक ऐकतांचि झाली वरती ॥ महीलागीं मूर्च्छित ॥६७॥ एक हंबरडा फोडून ऊर्ध्व ॥ म्हणती आमुचा गेला निध ॥ आतां महीतें स्त्रीवृंद ॥ दीनवत झालों कीं ॥ ६८ ॥ ऐसें म्हणोन आरंबळती ॥ एकमेकींच्या गळां पडती ॥ हृदय पिटून आपटिती ॥ महीलागीं मस्तक तें ॥६९॥ ऐसा सकळ अंतःपुरांत ॥ कोल्हाळ झाला अद्भुत ॥ परी पिंगला दारा प्रीतीं बहुत ॥ शोक करी आक्रोशें ॥ ७० ॥ म्हणे महाराजा निढळवाणी ॥ मज कैसे गेलेत जी सांडोनी ॥ मोहाचा सकळ तरणी ॥ लोपोनियां महाराजा ॥ ७१ ॥ बाळाहून मोह अत्यंत ॥ मजविषयीं पाळीत होतेत ॥ तो मोह दवडून निष्ठुरवत ॥ सांडून कैसे गेलांत ॥ ७२ ॥ अहो तुम्ही राया सिंहासनीं ॥ बैसत असतां राजकारणीं ॥ परी मम स्मरण होतां मनीं ॥ या धांवून सदनांत ॥ ७३ ॥ ऐसें म्हणोन धरणीवर शरीर ॥

१ मान. २ काढून टाकून. ३ जरीचें वस्त्र. ४ दाखवून. ५ डोकीच्या वस्त्रासह. ६ तोडूं लागली. ७ दीनासमान.

पिंगला टाकी वारंवार ॥ आजि सकळ सांडोन राज्यभार ॥ कैसा गेलासी महाराजा ॥ ७४ ॥ पाहून माझें मुखमंडन ॥ पुन्हां सेविसी राज्यासन ॥ मोह आजि सकळ सांडोन ॥ कैसा गेलासी महाराजा ॥७५॥ अहा पिंगला अंडजखाणी ॥ कोठें गेलीसे मम पक्षिणी ॥ दाही दिशा ओस करोनी ॥ अचर रानीं चरावया ॥ ७६ ॥ मम पाडसाची हरिणी ॥ परत्र तृण गोड पाहुनी ॥ तिकडेचि गुंतली लोभेंकरूनी ॥ माझा लोभ सांडोनियां ॥ ७७ ॥ अहा मज आंधळ्याची काठी ॥ हिसकून नेली निर्दयें पोरटी ॥ कीं क्षुधिताची अन्नवाटी ॥ जिंतून नेली भणंगें ॥७८॥ अहा राया मजवांचून ॥ तूतें गमत नव्हतें एक क्षण ॥ आज निष्ठुर मन करून ॥ कैसा गेलासी महाराजा ॥७९॥ अहा राया उत्तम पदार्थ ॥ जो महीलागीं उत्पन्न होत ॥ तो ममआधीं नृपनाथें ॥ भक्षिला नाहीं कधीं कीं ॥८०॥ मातें बैसवोन निजअंकास ॥ मुखीं ओपीत होतां ग्रास ॥ ऐसेपरी सांडोन प्रीतीस ॥ परत्र[1] कैसे गेलांत ॥ ८१ ॥ ऐसेपरी नाना गुण ॥ आक्रंदतसे आठवून ॥ मग ते सेवकातें पाचारून ॥ शैय्यासाहित्य[2] करवीतसे ॥ ८२ ॥ रायमौळींचा चीरमुगुट ॥ परिधानी कबरीं अलोट ॥ स्फुरण दाटोनि मग बळकट ॥ उत्तम चीरीं[3] कवळिला ॥८३॥ स्वामीचें वस्त्र परिधान करून ॥ घेती झाली सतीचें वाण ॥ स्मशानवाटिकेचें साधन ॥ सिद्ध केलें तत्काळ ॥ ८४ ॥ मग सकळ समारंभासहित ॥ येती झाली स्मशानवाटिकेंत ॥ अग्निकुंडीं विधानेंकरून त्यांत ॥ सबळ अग्नि चेतविला ॥८५॥ अग्नि लावितां विधानशक्तीं ॥ दाहून वर्तला अंगारनीतीं ॥ धगधगोनि कुंडाप्रती ॥ पावक शक्ति दावीतसे ॥८६॥ ऐसिया प्रकरणीं पेटविला वैन्ही[4] ॥ होतां पातली सौदामिनी ॥ अग्निकुंडीं शिळा स्थापोनी ॥ निरोप मागे सर्वांतें ॥८७॥ सकळां जय देऊन आशीर्वचन ॥ जय जय भर्ता ऐसें म्हणोन ॥ तुझा देह तुज अर्पण ॥ शीघ्रकाळीं होऊ कां ॥ ८८ ॥ ऐसें म्हणोन अग्निकुंडांत ॥ सांडिती झाली स्वशरीरातें ॥ परी त्या पावकीं होतां स्थित ॥ गुंडाळोन गेली सर्वस्वीं ॥ ८९ ॥ मग ते याचक अपार जन ॥ धन्य म्हणती तियेकारण ॥ स्वहित केलें पिंगलेनें ॥ स्वामीसवें[5] गमूनियां ॥ ९० ॥ अहा पिंगला ऐसें म्हणती ॥ पवित्र जाया सत्यवती[6] ॥ उदार कर्ण स्वकुळाप्रती ॥ परकुळातें तारील ॥ ९१ ॥ भर्तरीपरी करितां परलोक ॥ विव्हळ चित्तीं करिती शोक ॥ म्हणती आम्हां प्रजेचें दोंदिक ॥ ईश्वरें कैसें नेलें हो ॥ ९२ ॥ ऐसें म्हणोन आक्रंदती ॥ भर्तरी म्हणोन आठविती ॥ असो पावकीं दाहोन सती ॥ लोक निघाले माघारे ॥९३॥ आपुलाल्या सदनीं जाऊन ॥ बैसले असती मुख वाळवोन ॥ अहा भर्तरी ऐसें म्हणोन ॥ श्वासोच्छ्वास सोडिती ॥९४॥ आणि राजसदनीं स्त्रियांचा मेळ ॥ शोक करीत अति तुंबळ ॥ तों येरीकडे विपिनीं नृपाळ ॥ मृगया करून येतसे ॥ ९५ ॥ तों अस्तास गेला चंडमंणी[7] ॥ रात्र दाटली परम विपिनीं ॥ म्हणोनि राजा उठोनी ॥ नगराप्रती चालिला ॥ ९६ ॥ पावकतेजीं दैदीप्यमान ॥ हिलाल मार्गीं प्रदीप्त करून ॥ जातां भृत्य पाठविला वस्त्रें देऊन ॥ आठव तयाचा पैं झाला ॥९७॥ राव

१ परलोकीं. २ चितेमध्यें सती जाण्याची सामुग्री. ३ उत्तम वस्त्रांनीं. ४ अग्नि. ५ भर्त्यासह. ६ सत्य भाषण करणारी. ७ सूर्य.

बैसून सुखासनीं ॥ येतां मार्गीं मशाली पेटवोनी ॥ त्यांत चंद्रज्योती शशिसमानी ॥ दिशेलागीं उजळती ॥ ९८ ॥ आठव होतांच म्हणे चित्तांत ॥ अबुद्धिपणें स्त्रियांची जात ॥ नेणों गृहीं कैसी मात ॥ घडोन आली असेल कीं ॥ ९९ ॥ म्यांही केलें मूढपण ॥ शोध केला नाहीं आणिका पाठवोन ॥ सकल भ्रांतींत चित्त गोंवोन ॥ पाठीं लागलों मृगाच्या ॥१००॥ परी मातें दिसतें अहित ॥ मूर्खपणा घेतला स्वपदरांत ॥ ऐसी चिंता करीत ॥ अवंतिके पातला ॥ १ ॥ परी यांत श्रोते कल्पना घेती ॥ पिंगला दाहिली पावकशक्तीं ॥ तेव्हां विक्रम नृपती ॥ शोधा कैसा अंतरला ॥२॥ आणि जो भृत्य आला वस्त्रें घेऊन ॥ तेणें कैसें पाहिलें निर्वाण ॥ तरी तो पिंगलेतें वस्त्रें देऊन ॥ आला होता अरण्यांत ॥ ३ ॥ परी रायाची न पडून गांठी ॥ कटक शोधितां महीपाठीं ॥ मग तो अस्तमान होतां शेवटीं ॥ कटकालागीं मिळाला ॥४॥ आणि त्या समयीं विक्रम नृपवरें ॥ सेविलें होतें मातुळघर ॥ मिथुळेस जाऊन समाचार ॥ सत्यवर्म्याचा घेतसे ॥५॥ मग सुमतिप्रधान चमूसहित ॥ शुभविक्रमरायादि प्रज्ञावंत ॥ सकळ मंडळीही ज्ञानभरित ॥ रायासवें गेली ती ॥६॥ गृहीं तितुकें स्त्रीमंडळ ॥ ग्रामजनादि रक्षपाळ ॥ सकळ अबुद्धि केवळ ॥ ज्यांतें शक्ति नातुडली ॥ ७ ॥ ऐसा समय आला घडून ॥ तों त्यांतही घडलें अपार विघ्न ॥ पिंगला अबुद्धिपणें रत्न ॥ देहांत पावली ॥ ८ ॥ असो पाहिली मार्गवाट ॥ राव भर्तरी चमूनेट ॥ येऊन अवंतिकेनिकट ॥ ग्रामद्वारीं संचरला ॥ ९ ॥ तंव ते उठोन द्वारपाळ ॥ रायासमोर झाले सकळ ॥ आश्चर्य मानून उतावेळ ॥ रायाप्रती वदताती ॥ ११० ॥ म्हणती परी कैसे रीतीं ॥ नम्रोत्तरें मंजुळ करिती ॥ मुजरे करून निवेदिती ॥ पिंगलेचा वृत्तांत ॥ ११ ॥ म्हणती महाराज दिनमणी ॥ भृत्य एक आला वनांतुनी ॥ तो दुश्चिन्ह वदोन वाणी ॥ ग्राम बुडविला शोकांत ॥ १२ ॥ परी त्या शोकाची ऊर्ध्वनळी ॥ सती पडली सुमति बाळी ॥ नरस्वामिनी पिंगला दवडिली ॥ परत्र देशीं गेलीसे ॥ १३ ॥ तरी तियेची करून बोळवण ॥ आतांचि गृहीं आले सकळ जन ॥ स्मशानवाटिका झाली भस्म ॥ एक प्रहर लोटला ॥ १४ ॥ ऐसें राव ऐकतां वचन ॥ परम घाबरलें अंतःकरण ॥ मग सुखासनांतून उडी टाकून ॥ स्मशानवाटिके पातला ॥१५॥ पातला परी आक्रंदत ॥ अट्टहास्यें शब्द करीत ॥ अति लगबगें धांवत ॥ स्मशानवाटिकेजवळी पैं ॥ १६ ॥ पातला परी चमू मागें ॥ करीत जातसे अति लाग ॥ सकळ कुळवृद्ध योग ॥ रायालागीं कवळिती ॥ १७ ॥ राव जातां स्मशानमहीसीं ॥ पहात पिंगलेचे चितेसी ॥ राव विरागी होऊन मानसीं ॥ उडी टाकूं म्हणतसे ॥१८॥ परी ते चमूमेळींचे गृहस्थ थोर ॥ रायास कवळून धरिती समग्र ॥ स्मशानकुंडींचा वैश्वानर ॥ वेष्टूनियां बैसले ॥१९॥ परी राव ते उद्देशीं ॥ प्राणघात इच्छी मानसीं ॥ परी वेष्टन पडतां शरीरासी ॥ उपाय कांहीं चालेना ॥१२०॥ मग बसल्या ठायीं आरंबळत ॥ महीं मस्तकातें आपटीत ॥ हृदय पिटून शोक करीत ॥ मूर्च्छनेलागीं पावतसे ॥ २१ ॥ मूर्च्छा गेलिया

१ उज्जयिनीला. २ अग्नीच्या योगेंकरून. ३ सूर्यसारखे तेजस्वी. ४ अग्नि. ५ आक्रोश करूं लागला.

पुन्हां उठत ॥ अग्नीं आहुती द्यावया पहात ॥ परी अपार जनांचें वेष्टन बहुत ॥ बळ कांहीं चालेना ॥ २२ ॥ ऊर्ध्व करून आपुला माथा ॥ घडीघडी पाहे पिंगलाचिता ॥ अहा म्हणोन भाळ तत्त्वतां ॥ महीलागीं आफळीतसे ॥ २३ ॥ आफळून आठवी पिंगलेचे गुण ॥ म्हणे कैसी वो गेलीस मज सांडून ॥ मातें मृत्युमहीं[1] ठेवून ॥ परत्र कैसी झालीस ॥ २४ ॥ हे पिंगले तुझें मन ॥ गमत नव्हतें मजवांचून ॥ आतां कैसी निष्ठुर होऊन ॥ परत्रदेशीं गेलीस तूं ॥२५॥ हे पिंगले तुझा मी पती ॥ नव्हतों शत्रु होतों या जगतीं ॥ कैसें जल्पून कुडेमती[2] ॥ भस्म तूतें म्यां केलें ॥ २६ ॥ अहा मी पतित दुष्ट दुर्जन ॥ मूढमतीनें घेतला प्राण ॥ तरी मी तुझा शत्रु पूर्ण ॥ पति न म्हणें पिंगले ॥ २७ ॥ ऐसें म्हणोन अंग धरणीं ॥ टाकी हा हा शब्द करोनी ॥ हृदय पिटी दणाणोनी ॥ महीं मस्तक आफळीतसे ॥ २८ ॥ अहा पिंगला म्हणोन ॥ हांक मारी अट्टहास्येंकरून ॥ अहा पिंगले एकदां तव वदन ॥ मज दृष्टी दावीं कां ॥ २९ ॥ अहा पिंगले परत्रभुवनीं ॥ गेलीस मातें तूं सांडोनी ॥ हृदय पिटी दणाणोनी ॥ महीं मस्तक आफळीतसे ॥ १३० ॥ हे पिंगले आसनीं शयनीं ॥ मज बसवीत होतीस अंतःकरणीं ॥ आतां माझा विसर धरोनी ॥ कैसी राहसी परत्र ॥३१॥ अहा पिंगले तुजवांचून ॥ सर्वत्र मातें दिशा शून्य ॥ अहा पिंगला माझा प्राण ॥ कुडी[3] टाकून गेलासे ॥ ३२ ॥ अहा पिंगले तुजवांचून ॥ सर्वत्र मातें दिशा शून्य ॥ शून्यमंदिरीं निद्राशयन ॥ कैसें येईल सांग पां ॥३३॥ अहा पिंगले माझी अधिक ॥ जाणत होतीस तृषाभूक ॥ आतां निष्ठुर मन केलें निकें[4] ॥ कैसी सांडून गेलीस तूं ॥ ३४ ॥ अहा पिंगले माझे शयनीं ॥ होतीस मृदुभाषणें करूनी ॥ पाहतां उर्वशी दिसे नयनीं ॥ संतोष माझा होतसे ॥ ३५ ॥ ऐसें पाहून सुगंधद्रव्य मी ॥ रुंजी घालीं षट्पदकामी ॥ ऐसें सुखसरितासंगमीं ॥ सुख कोठें पाहूं आतां ॥ ३६ ॥ यापरी पिंगले तव गुण ॥ दयेचें भांडार मुक्त करून ॥ कीं जगाचें करिसी पालन ॥ धर्मानुकूळें सर्वस्वीं ॥ ३७ ॥ ऐसिया प्रज्ञेचें पहुडपण ॥ पिंगले कोठें मी जाऊन ॥ ऐसें म्हणून धडाडून ॥ धरणीं[5] अंग सांडीतसे ॥ ३८ ॥ यापरी सर्व जाणोनि लोक ॥ रायाचा पाहूनि शोक ॥ गहिंवर येतसे आणीक ॥ शोकशब्देंकरूनियां ॥ ३९ ॥ कीं तरु मलयागरा ॥ गंधी मिरवती समग्रा ॥ तैसें रायाच्या शोकपारा ॥ शोकें व्याकुळित जाहले ॥ १४० ॥ असो हा ग्रामांत वृत्तांत सकळां ॥ कळला परी सुखवसा झाला ॥ जैसा प्राण जाऊनि आला ॥ शवशरीरा पुन्हां कीं ॥ ४१ ॥ मग गांवींचे ग्रामजन ॥ स्मशानाजवळ आले धांवोन ॥ परी रायाचा शोक पाहून ॥ तेही तैसेच होती पैं ॥ ४२ ॥ परी तो मायिक सहजस्थितीं ॥ दुःखरहित शोकावरती ॥ जैसे बहुरूपी खेळाप्रती ॥ शूरत्व मिरविती अपार ॥ ४३ ॥ कीं गुर्जरदेशीं चाल सघन[6] ॥ रुदन घेती मोल देऊन ॥ तैसे घरचे सर्व जन ॥ येती प्रेतसंस्कार करावया ॥ ४४ ॥ तन्न्यायें शोक करीत ॥ राव पडला शोकार्णवांत ॥ न वर्णवे तो आकांत ॥

१ मृत्युलोकांत. २ वाईट बुद्धि धरून. ३ शरीर. ४ खरोखर. ५ जमिनीवर. ६ मोठी.

अल्प येथें वर्णिला ॥ ४५ ॥ असो ऐसी रुदनस्थिती ॥ ज्याची त्याला माया चित्तीं ॥ परी ते लोक अभावनीतीं ॥ समजाविती रायातें ॥ ४६ ॥ तुम्ही सर्वज्ञ सकळराशी ॥ बोध करितां अन्य जनांसी ॥ होऊन गेलें होणारासी ॥ आश्चर्य याचें कायसें ॥ ४७ ॥ म्हणती महाराजा भविष्योत्तर ॥ होऊन गेलें तें होणार ॥ तयाचा शोक करणें चतुर ॥ योग्य आम्हां दिसेना ॥ ४८ ॥ अशाश्वताचा शोक करणें ॥ तरी काय शाश्वत आपुलें जिणें ॥ पिंगला गेली आपणही जाणें ॥ कदाकाळीं सुटेना ॥ ४९ ॥ पहा आपले पूर्वज अपार ॥ मृत्यु पावले समग्र ॥ एकामागें एक सर्वत्र ॥ गेले न राहिले मेदिनीं ॥ १५० ॥ कीं आजा गेला नातू उरला ॥ ऐसा कोणी पाहिला ॥ तरी अशाश्वताचा घट भरला ॥ रिता होय क्षणमात्रें ॥ ५१ ॥ तरी हें सकळ अंशाश्वतपण ॥ पूर्ण मानिती ज्ञानवान ॥ तरी तयाचा शोक करून ॥ व्यर्थ जीवा कष्टवितां ॥ ५२ ॥ अहा पाहती जपी तपी ॥ सिद्ध साधक नानारूपी ॥ कोण वांचले देहसंकल्पीं ॥ मृत्युभुवनीं महाराजा ॥ ५३ ॥ तरी जी जी जाईल घडी ॥ ती सुखाचीच मानावी प्रौढीं ॥ ईश्वरनामीं ठेवून गोडी ॥ चित्त स्थिर असावें ॥ ५४ ॥ ऐसें बोधितां सर्वही जग ॥ युक्तिप्रयुक्तीं नानाबोध ॥ परी रायाचें हृदय चांग ॥ शोककाजळी उजळेना ॥ ५५ ॥ मग ते ग्रामींचे सकळ जन ॥ थकित झाले बोध करून ॥ एकामागें एक उठोन ॥ आपुल्या सदना सेविती ॥ ५६ ॥ असो तीही लोटली रात्री ॥ उदया आला गभस्ती[2] ॥ पिंगलाचितेची पाहून शांती ॥ पावक[3] झाला अदृश्य ॥ ५७ ॥ मग तो मानून दुसरा दिन ॥ पुन्हां पातले आप्तजन ॥ उत्तरक्रिया संपादोन ॥ अस्थिमिलन केलें तैं ॥ ५८ ॥ तें भर्तरीरावें पाहून ॥ चित्तीं विचार करितां पूर्ण ॥ घेऊं देईना अस्थिसंचयन ॥ स्पर्श कोणा न करवी ॥ ५९ ॥ आपण बैसून चिता रक्षीत ॥ कोणा लावूं देईना हात ॥ मग ते आप्त जन समस्त ॥ पुन्हां गेले माघारे ॥ १६० ॥ परी तो राव तैसाचि चितेंत ॥ बैसता झाला दिवसरात ॥ अन्नपाणी त्यजून समस्त ॥ पिंगला पिंगला म्हणतसे ॥ ६१ ॥ मग हें निर्वाणींचें वर्तमान ॥ मिथुळेसी दूत सांगती जाऊन ॥ राव विक्रम करितां श्रवण ॥ निघता झाला तेथोनी ॥ ६२ ॥ सत्यवर्मादि शुभविक्रम ॥ विक्रमादि सुमति प्रधान ॥ परम शोकार्णव रचून ॥ अवंतिके पातले ॥ ६३ ॥ मग येतांचि स्मशानवाटीं ॥ पिंगला आणून चित्तदृष्टी ॥ परम शोकें जाहला कष्टी ॥ शोकसिंधूंत निमग्न ॥ ६४ ॥ आठवी सर्व कन्येचे गुण ॥ म्हणे मम हातींचें गेलें निधान[4] ॥ विक्रम म्हणे मम गृहींचें रत्न ॥ काळतस्करें[5] नेलें कीं ॥ ६५ ॥ अहा माउली उभयकुळांत ॥ तारक झाली भवसरितेंत ॥ पुन्हां दीपाची लावी वात ॥ अदृश्य कैसी झाली वो ॥ ६६ ॥ अहा स्त्रीकटकीं अंतःपुरीं ॥ मुख्य मिरवीत होती सज्ञानलहरी ॥ जैसा हस्ती चमूभीतरी ॥ चांगुलपण दावीतसे ॥ ६७ ॥ रूपवंत गुणवंत ॥ सर्व लक्षणीं ज्ञानवंत ॥ सूचक सदा सर्वकाळ संगोपीत ॥ चित्त सकळांचें लक्षी कीं ॥ ६८ ॥ ऐसे आठवोन नाना गुण ॥ शोक करी अति दारुण ॥

१ अशाश्वतता. २ सूर्य. ३ अग्नि. ४ ठेवा. ५ काळरूपी चोरानें.

मग विक्रम नृपति पुढें होऊन ॥ भर्तरीलागीं समजावी ॥६९॥ नाना युक्ति नाना वचन ॥ भर्तरीचें बोधी मन ॥ परी तो नायके
पिसाटपण ॥ पिंगला पिंगला वदतसे ॥१७०॥ परी राव बोध करितां उत्तम ॥ लोटून गेला दिन दशम ॥ मग विक्रमें उत्तरक्रिया
करून ॥ शुचिर्भूत जाहला ॥७१॥ यापरी पुढें तेरावे दिवशीं ॥ जातिभोजन दानमानेंसीं ॥ सर्व उरकोन राज्यासनासीं ॥ घेऊन राव
बैसला ॥७२॥ भर्तरी न सोडी स्मशानवाटिका ॥ धरून बैसला अचळ निका ॥ जैसा वृंदे धरूनि हेका ॥ विष्णु बैसला स्मशानीं ॥७३॥
ऐसेपरी अचलपण ॥ मिरवता झाला [1]मित्रनंदन ॥ परी नित्यनित्य विक्रम येऊन ॥ बोध त्यातें करीतसे ॥७४॥ ऐसा बोध करितां
नित्य ॥ द्वादश वर्षें लोटलीं सत्य ॥ पर्णतृण भक्षूनि जीवित ॥ उदकआहारें राखिलें ॥७५॥ अहा देवा अनाथनाथा ॥ कैसें केलें त्वां
अनंता ॥ पिंगला माझी सगुण कांता ॥ तूतें कैसी आवडली ॥७६॥ ऐसें म्हणोन नामोचार ॥ शोक करीतसे वारंवार ॥ रात्रंदिवस
चित्तीं विसर ॥ पिंगलेचा पडेना ॥७७॥ कृश शरीर झालें तेणें ॥ कंठीं उरलासे प्राण ॥ मुखीं आणून हरीचें नाम ॥ शोकें पिंगला
वदतसे ॥७८॥ ऐसीं लोटलीं द्वादश वर्षें ॥ शुचिष्मंत झालें शरीर कृश ॥ तें पाहूनियां अति क्लेश ॥ मित्रावरुणी द्रवलासे ॥७९॥
पुत्रमोहाचें अपार भरतें ॥ लोट लोटले चित्तसरिते ॥ मग मित्रावरुणी तुष्टोन मनांत ॥ अत्रिजानिकटीं पातला ॥१८०॥ तंव तो
प्राज्ञिक अत्रिनंदन ॥ मित्रावरुणीस सन्मान देऊन ॥ म्हणे महाराजा [2]कामना कोण ॥ धरून येथें आलासी ॥८१॥ येरी म्हणे जी द्विजो-
त्तमा ॥ ज्ञानलतिकेच्या फलद्रुमा ॥ जाणत असूनि पुससी आम्हां ॥ अज्ञानत्व घेऊनी ॥८२॥ तरी तव शिष्य जो भर्तरी ॥ त्याची
कैसी झाली परी ॥ तें हृदयीं आणून हितातें वरीं ॥ विलोकीं कां महाराजा ॥८३॥ मग तो महाराज ज्ञानवान ॥ हृदयीं पाहे विचा-
रून ॥ तों विपत्काळीं शोकेंकरून ॥ भर्तरीनाथ मिरवला ॥८४॥ अति क्लेश तयाचे पाहून ॥ परम द्रवला मोहेंकरून ॥ मग मित्रावरुणीतें
बोले वचन ॥ चिंता न करीं महाराजा ॥८५॥ तुम्हीं जावें स्वस्थानासी ॥ मी भर्तरीचे आहें उद्देशीं ॥ स्वहित करीन चिंता मानसीं ॥
पाळूं नका महाराजा ॥८६॥ माझा शिष्य जो मच्छिंद्रनाथ ॥ तयाचा गोरक्ष प्रज्ञावंत ॥ तो महीं भ्रमतो करीत तीर्थ ॥ येथें येईल महा-
राजा ॥८७॥ तो परम आहे प्रज्ञावान ॥ तयाला तेथें पाठवीन ॥ तो नाना [3]प्रयुक्ती करून ॥ शुद्धपंथा आणील कीं ॥८८॥ ऐसें बोलतां
मित्रावरुणीसी ॥ संतोषें मिरवला तो चित्तासीं ॥ मग पुसून [4]अनुसूयात्मजासी ॥ स्वस्थानासी पैं गेला ॥८९॥ यावरी पुढील अध्यायीं
कथा सुंदर ॥ अध्यात्मदीपिका मनोहर ॥ मालू सांगे धुंडीकुमर ॥ नरहरिकृपेंकरोनियां ॥१९०॥ दत्त सांगेल गोरक्षनाथा ॥ गोरक्ष
येऊनि विरहसरिता ॥ शोषण करील तत्त्वतां ॥ घटोद्भवाचे कृपेनें ॥९१॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागार ॥
सदा परिसोत भाविक चतुर ॥ अष्टाविंशति अध्याय गोड हा ॥१९२॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अध्याय ॥२८॥ ओंव्या ॥१९२॥

१ भर्तरी. २ वासना, इच्छा. ३ उपाय योजून. ४ दत्तात्रेयाला.

## अध्याय २९वा






श्रीगणेशाय नमः ॥ रुक्मिणीवरा कमलाकांता ॥ चाणूरमर्दना[1] वसुदेवसुता ॥ कंसारी तूं जगत्राता ॥ वासुदेवा जगदीशा ॥ १ ॥ शेषशायी हलधरभ्राता[2] ॥ भावप्रिया सुदर्शनदर्शिता ॥ द्रौपदीलज्जारक्षणकर्ता ॥ पाठिराखा मिरवसी ॥ २ ॥ जैसा पांडवांचा पाठिराखा ॥ तैसा मिरवसी मम दोंदिका ॥ भक्तिसारग्रंथकौतुका ॥ वाग्वरदा म्हणविसी ॥ ३ ॥ मागिले अध्यायीं विरहस्थिती ॥ लाधली गाढत्वें भर्तरीप्रती ॥ पिंगलेकरितां स्मशानक्षितीं ॥ पूर्ण तप आचरला ॥ ४ ॥ तया क्लेशाचे उद्देशीं ॥ मित्रावरुणी दत्तापाशीं ॥ श्रुत करून स्वस्थानासी ॥ येऊनियां पोहोंचला ॥ ५ ॥ इतकी कथा सिंहावलोकनीं ॥ चित्तीं धरावी श्रोतेजनीं ॥ यापरी पुढें ग्रंथमांडणीं ॥ सिद्ध अवधानीं असावें ॥ ६ ॥ असो गर्भाद्रींत मच्छिंद्रनाथ ॥ ठेवून गोरक्ष करावया तीर्थ ॥ महीलागीं भ्रमत ॥ गिरनाराप्रती पातला ॥ ७ ॥ तेथें भेटोन दत्तात्रेयासी ॥ भावें नमिलें प्रेमराशीं ॥ श्रीदत्तें धरोन हृदयासी ॥ आनंदानें उचंबळला ॥ ८ ॥ श्रीकरपद्में[3] मुखमंडन ॥ गोरक्षाचें कुरवाळून वदन ॥ निकट बैसविला हस्त धरोन ॥ अलाई बलाई घेतसे ॥ ९ ॥ मोहितवाणीं[4] पुसतसे त्यातें ॥ म्हणे कोठें रे मच्छिंद्रनाथ ॥ तूं सोडूनि निरपेक्ष त्यातें ॥ महीलागीं भ्रमतोसी ॥ १० ॥ येरू सांगे पुन्हां नमोन ॥ गर्भाद्रिपर्वतीं मच्छिंद्रनंदन ॥ राहिलासे स्वसुखेंकरून ॥ जपजाप्यातें योजूनियां ॥ ११ ॥ मुहूर्तपूर्ण स्वसुखासीं ॥ लाविलें असे तीर्थस्नानासी ॥ मग मी नानातीर्थउद्देशीं ॥ करीत आलों परियेसा ॥ १२ ॥ ऐसा वदोनि वृत्तांत ॥ याउपरी बोले अत्रिसुत ॥ वत्सा कार्य लागलें मातें ॥ त्या कार्यातें संपादीं ॥ १३ ॥ तरी म्हणसी कार्य कवण ॥ भर्तरी मम अनुग्रही नंदन[5] ॥ तो स्वकांतेकरितां स्मशान ॥ द्वादश संवत्सर सेवीतसे ॥ १४ ॥ अन्नोदकाचा त्याग करून ॥ सेवोनि आहे तृणपर्ण ॥ कांता कांता चिंतन करून ॥ द्वादश वर्षें बैसला ॥ १५ ॥ तरी तुवां जावोनि तेथें ॥ सावध करीं युक्तिप्रयुक्तीं ॥ सकळ दावीं अशाश्वत ॥ आपुले पंथीं मिरवावें ॥ १६ ॥ त्यास मीं अनुग्रह जेव्हां दिधला ॥ तेव्हांच गुंतविला संकल्पाला ॥ कीं सोडून वैभवपंथाला ॥ नाथपंथीं मिरवेन मी ॥ १७ ॥ तरी तया बोलासी जाण ॥ दिवस लोटून गेले पूर्ण ॥ मग जन्मापासून सकळ कथन ॥ भर्तरीच्या सांगीतलें ॥ १८ ॥ समुच्चयगोष्ट[6] ऐकून कथन ॥ मान तुकावी गोरक्षनंदन ॥ म्हणे महाराजा तव कृपेनें ॥ कार्य सत्य करीन हें ॥ १९ ॥ तव आज्ञा यापरी मातें असतां ॥ मग भर्तरीलोहातें आणीन कनकता ॥ ही अशक्य नसे मातें वार्ता ॥ अर्थ घडला सहजचि ॥ २० ॥ हे महाराजा तूं कृपाघन ॥ वर्षलासी मम देहकारण ॥ तैं भर्तरीतरूतें ज्ञानकण ॥ अनायासें कणसेंचि ॥ २१ ॥ तव कृपा जवळी असतां ॥ मग भर्तरीक्षुधेची कामवार्ता ॥ ही अशक्य नसे मातें करितां ॥ तृप्त सिद्धीतें भिनवाया ॥ २२ ॥ कीं तव कामकल्पतरू ॥ मम चित्तांगणीं पावला विस्तारू ॥ तेथें भर्तरीहीनत्वविचारू ॥ दरिद्रातें उरेना ॥ २३ ॥ तरी आतां बोलतों प्रमाण ॥ कार्य आपुलें करून देईन ॥ ऐसें म्हणोनि वंदोनि चरण ॥ शीघ्रगती निघाला

१ चाणूर दैत्याचा नाश करणाऱ्या. २ बळरामाच्या वंधो. ३ हस्तकमलानें. ४ गोड भाषण करून. ५ पुत्र. ६ तात्पर्यकथा.

॥ २४ ॥ [1]व्यानअस्त्र जपोनि होटीं ॥ भाळीं चर्चिली भस्मचिमुटी ॥ मग व्यानमंत्रें महीपाठीं ॥ गमन करूं निघाला ॥ २५ ॥ लवतां डोळ्याचें पातें ॥ क्षणें आला अवंतिकेप्रत ॥ पन्नास योजनें निमिषांत क्षितींत ॥ लंघोनियां पातला ॥ २६ ॥ तों गोरक्ष येतां स्मशाननिकट ॥ दुरोनि पाहे भर्तरी नेट ॥ तों सर्वांग दिसे अति कृशवट ॥ अस्थिगत प्राण देखिला ॥ २७ ॥ मुखीं तितुकीच सहज-ध्वनी ॥ म्हणे हे राम बरवी केली करणी ॥ आम्हां उभयतांची तुटी करोनी ॥ पिंगला नेली जवळिके ॥ २८ ॥ ऐसी सहजध्वनि ऐकोन ॥ पाहून तयाचें कृशपण ॥ परम चित्तीं हळहळोन ॥ चकचकाव मानीतसे ॥ २९ ॥ चित्तीं म्हणे अहा कठिण ॥ राव आचरे परम निर्वाण ॥ अस्थिमय राहिला प्राण ॥ त्वचा व्यक्त होऊनियां ॥ ३० ॥ तरी ऐसा विरह जयासी ॥ बाणलाहे पूर्ण मानसीं ॥ तो वरपंगीं वाग्वरासी ॥ कदाकाळीं मानीना ॥ ३१ ॥ तरी यातें आम्ही जें बोलूं ॥ तें तें सकळ होय फोलू ॥ जैसा क्षुधेला वेळू ॥ पळवा तेथें मिरवेना ॥ ३२ ॥ जैसा खापरासी परीस भेटे ॥ व्यर्थ होय यत्नपाठ ॥ तेवीं बोधितां बोध अचाट ॥ व्यर्थपणीं मिरवेल ॥ ३३ ॥ कीं हिंगतरू अपार विपिनीं ॥ त्यांत मैलागरू स्थापिला वनीं ॥ तया सुगंध लिप्तदुर्गंध वनीं ॥ कदाकाळीं तुटेना ॥ ३४ ॥ कीं शर्करेचे आळीपाळीं ॥ [2]क्रावणाच्या वेष्टिल्या वेली ॥ परी त्या कटुत्वपणा सकळीं ॥ मधुरपणा मिरवेना ॥ ३५ ॥ कीं [3]चतुराननाचे हस्तकमळीं ॥ जन्मभर स्थापिलें दरिद्र भाळीं ॥ तें व्यवसायेंकरून नव्हाळी ॥ कदाकाळीं चालेना ॥ ३६ ॥ तरी आतां विचार येतां ॥ योजावा कांहीं बोधरहिता ॥ ज्यातें जैसी कामना स्थिता ॥ तैसी स्थिति वर्तावी ॥ ३७ ॥ कीं [4]श्वपुच्छा चक्रवेढा ॥ नीट होण्या यत्न पाडा ॥ तेवीं राव झाला वेडा ॥ शब्दबोध चालेना ॥ ३८ ॥ जैसा जो तैसाच होतां स्थित ॥ मग संतोष मिरवे चित्त ॥ संतोष मिरवल्या कार्य प्राप्त ॥ घडोन येतें सकळिकां ॥ ३९ ॥ पहा राम शत्रु दानवां ॥ परी बिभीषण मिरवला भिन्नभावा ॥ तेणेंकरून स्ववैभवा ॥ भंगूं दिलें नाहींच कीं ॥ ४० ॥ कीं बळिया रायाचें जिणें ॥ त्यास मिरवला तो वामन ॥ मातृशत्रू [5]फरशधर होऊन ॥ तातासमान वहिवटला ॥ ४१ ॥ तन्न्यायेंकरून येथें ॥ रायास ओपावें सर्व हित ॥ संतोष मिरवोन अत्रिसुता ॥ कीर्तिध्वज लावावा ॥ ४२ ॥ मग जाऊन अवंतिकेंत ॥ कुलालगृहीं संचार करीत ॥ एक गाडगें आणूनि त्यातें ॥ बाटली नाम ठेविलें ॥ ४३ ॥ उपरी रंग चित्रविचित्र ॥ देऊन रोगणीं केलें पवित्र ॥ मग तें चमकपणीं पात्र ॥ तेजालागीं दर्शवी ॥ ४४ ॥ परी अंतरीं पात्र कच्चेपणीं ॥ वरी रंग दावी लखलखोनी ॥ जेवीं [6]वाढीव ब्रह्मज्ञानीं ॥ परी अंतरीं [7]हिंगो ॥ ४५ ॥ बोलतां ज्ञानी विशेष ॥ कीं प्रत्यक्ष मिळाला स्वरूपास ॥ ऐसें भासलें तरी ओंफस ॥ परी अंतरीं हिंगो ॥ ४६ ॥ नव तें मडकें कच्चेपणीं ॥ वरी [8]सुढाळ दिसे रंगप्रकरणीं ॥ असो गोरक्षनाथ तें घेउनी ॥ स्मशानवाटिके पोहोंचला ॥ ४७ ॥ भर्तरीजवळ येतां ॥ दृष्टीसन्मुख तत्त्वतां ॥ ठेंचेचें निमित्त करून नाथ ॥

१ व्यान वायूचें अस्त्र. २ कवंडळाच्या. ३ ब्रह्मदेवाचे. ४ कुत्र्याचे शेंपटाला. ५ परशुराम. ६ मोठेपणा. ७ शून्य, पूज्य. ८ तेजस्वी.

भूमीलागीं पडतसे ॥ ४८ ॥ अंग धरणीं देत टाकून ॥ सोंग दावी मूर्च्छापणें ॥ त्या संधींत बाटली कवळून ॥ बाटलीलागीं न्याहाळी ॥ ४९ ॥ असो बाटली गेली फुटोन ॥ मग सोंग मूर्च्छेचें सांवरोन ॥ भंवतें पाहे विलोकून ॥ बाटली झाली शतचूर्ण ॥ ५० ॥ तंव ती देखिली शतचूर्ण ॥ मग उठता झाला अहा म्हणोन ॥ म्हणे माझी माय बहिण ॥ बाटले कैसी फुटलीस तूं ॥ ५१ ॥ सकळ मेळवून तिचें खापर ॥ शोक करीतसे वारंवार ॥ ऊर्ध्वशब्दें गहिंवर ॥ लोकांमाजी दाखवी ॥ ५२ ॥ म्हणे अहा माझी बाटली ॥ दैवें कैसी फुटोन गेली ॥ आतां ती माझी परम माउली ॥ कोणे रानीं धुंडाळूं ॥ ५३ ॥ अहा माय गेलीस सोडोन ॥ आतां तुजसाठीं वेंचीन प्राण ॥ अहा विधात्या कैसें घडोन ॥ आणिलें तुवां या ठायीं ॥ ५४ ॥ अहा माझी माय बहिणी ॥ कैसी गेलीस सोडोनी ॥ दाही दिशा मजलागोनी ॥ ओस करोनि गेलीस ॥ ५५ ॥ माय गे माय या ठायीं ॥ तूं वांचली असतीस आपुले देहीं ॥ मी पावलों असतों मृत्युप्रवाहीं ॥ त्यांत कल्याण मानितों ॥ ५६ ॥ ऐसे शब्द रायें ऐकोन ॥ हास्य करी गदगदोन ॥ चित्तीं म्हणे पावलिया मरण ॥ मडक्यास काय मग करितां ॥ ५७ ॥ ऐसी अंदेशा आणोनि चित्तीं ॥ हास्य वारंवार करी नृपती ॥ येरीकडे गोरक्ष क्षितीं[1] ॥ आरंबळे अट्टाहास्यें ॥ ५८ ॥ धरणीं टाकोनि शरीर ॥ हृदय पिटी उभय करीं ॥ अहा बाटली वागुत्तरीं ॥ ऐसें म्हणोनि आरंबळे ॥ ५९ ॥ म्हणे तूं गेलीस माय बहिणी ॥ परी माझें आटलें सुदैवपाणी ॥ अहा माझा वासरमणी[2] ॥ अस्ताचळा गेलासे ॥ ६० ॥ अहा बाटली माझें धन ॥ कोणें दुर्जनें नेलें हिरावोन ॥ अहा बाटले तुझें वदन ॥ एकदां दावीं मजलागीं ॥ ६१ ॥ अहा बाटली परम धूर्जटी ॥ कोणीं हिरावली मम अंधाची काठी ॥ ऐसें म्हणोन वाग्वटीं ॥ माय वदन दावीं गे ॥ ६२ ॥ ऐसें म्हणोन दीर्घरुदन ॥ करीत आहे अट्टहास्येंकरोन ॥ परी राव भर्तरी तें पाहून ॥ चित्तामाजी चोकाटे[3] ॥ ६३ ॥ अहा पिंगला हा पिंगला ॥ ऐसा घोष करीत बैसला ॥ परी तें पाहून विसरला ॥ मनीं आश्चर्य बहु मानी ॥ ६४ ॥ म्हणे वेंचितां दमडी अडका ॥ तयासाठीं धरून आवांका ॥ नाशवंत जाणे सर्व निका ॥ शोक केवीं करीतसे ॥ ६५ ॥ ऐसें जल्पून चित्तीं ॥ निवांत बैसला तये क्षितीं ॥ परी हुडहुडी तरुफलाप्रती ॥ शांतपणें राहीना ॥ ६६ ॥ सुशब्दवाक्या अमृतपर[4] ॥ सिंचिता झाला वागुत्तर ॥ म्हणे योगिया कां चिंतातुर ॥ शोक करिसी हें सांग ॥ ६७ ॥ अरे वेंचितां सापिका कवडी ॥ मडकें येईल पुन्हां आवडीं ॥ तयासाठीं शोकपरवडी[5] ॥ करिसी काय हे मूर्खा ॥ ६८ ॥ ऐसें उत्तरद्रुमाचें[6] फळ ॥ अर्थी ओपितां नृपाळ ॥ यावरी गोरक्षबाळ ॥ बोलता झाला तयातें ॥ ६९ ॥ म्हणे महाराजा नृपाळा ॥ तूं शोक करिसी कवण मेळा ॥ तरी दुःखाब्धिशोकजाळा ॥ प्रचीति[7] पाहें आपुली ॥ ७० ॥ तरी अहा पांथस्थ तूं प्रकाम ॥ कंठीं लागला जगाचा उगम ॥ तरी त्या उभवोन अनर्थधाम ॥ सुख कैसें

[1] जमिनीवर. [2] सूर्य. [3] आश्चर्य करी. [4] अमृताहून गोड. [5] शोकाचा प्रकार. [6] उत्तररुपी वृक्षाचें. [7] अनुभव.

नांदेल ॥ ७१ ॥ तरी आपणावरून नृपती ॥ घ्यावी जगाची अर्थप्रचीती ॥ माझी बाटली फुटल्या क्षितीं ॥ दुःख जाणें मी एक ॥ ७२ ॥ राव ऐकून वाग्युत्तरा ॥ पुन्हां म्हणतसे ऐकिंजे नरा ॥ मम दुःखाचा दृष्टांत खरा ॥ प्रचीतिरूपीं धरिला त्वां ॥ ७३ ॥ परी माझी पिंगला राणी ॥ मान पावली जेवीं सौदामिनी ॥ हारपली जैसी सौदामिनी[1] ॥ परतोनि कैसी प्राप्त होय ॥ ७४ ॥ शतानुशत मडकीं मिळत ॥ प्राप्त करून देईन क्षणांत ॥ पिंगलासमान स्त्रीरत्न ॥ कैंचें दुसरें मिळेल ॥ ७५ ॥ यावरी गोरक्ष बोले वचन ॥ तुझ्या पिंगला लक्षावधि जाण ॥ प्राप्त करीन एक क्षण ॥ परी ऐसी बाटली मिळेना ॥ ७६ ॥ ऐसें ऐकून नराधिप ॥ म्हणे पिंगलेचें स्वरूप ॥ गुणवती गंभीर दीप ॥ लक्षावधि दाविसी ॥ ७७ ॥ तरी लक्षावधि पिंगला मातें ॥ आतांच दाखवीं सद्गुरुभरितें ॥ तूतें बाटल्या शतानुशतें ॥ सिद्ध करितों या ठाया ॥ ७८ ॥ तरी तुझा चमत्कारू ॥ दावीं मातें कल्पतरू ॥ जैसा भूषण कृपापरू ॥ गुरुसुत तो गहिंवरला ॥ ७९ ॥ तरी बा समान करणी ॥ मातें मिरवेल अंतःकरणीं ॥ नातरी ढिसाळ बाटल्यावाणी ॥ परी अर्थ हिंगूचें[2] दिसतसे ॥ ८० ॥ जैसें मृगजळाचें पाणी ॥ परी अब्धिसमान वाटे खाणी ॥ परी तृषाकोडाचा वैसरमणी[3] ॥ अस्ताचळीं पावेना ॥ ८१ ॥ कीं शुद्ध ऑडंबरी[4] घन ॥ स्वर्गीहून करी गर्जन ॥ परी तोय लेशमान ॥ महीलागीं आतळेना ॥ ८२ ॥ कीं काजवा जो तो दिढंवा[5] दावी ॥ तरी कां तिमिरास तो आटवी ॥ तेवीं बोल फोलप्रवाहीं ॥ मिरवूं नको योगेंद्रा ॥ ८३ ॥ ऐसें ऐकतां तयाचें वचन ॥ म्हणे राया नरेंद्रोत्तमा ॥ पिंगलाउदय लक्षावधीन ॥ केलिया मज देसील काय ॥ ८४ ॥ येरू म्हणे पिंगला नयना ॥ दाविलिया पुरवीन इच्छिली कामना ॥ राज्यवैभव सुखसेवना ॥ संकल्पीन तुजलागीं ॥ ८५ ॥ ऐसें बोलतां नरेंद्रपाळ ॥ साक्ष कोण म्हणे गोरक्षबाळ ॥ येरू म्हणे पंचमंडळ ॥ साक्षभूत असती बा ॥ ८६ ॥ आणि अनलादि स्वर्गसविता ॥ जळपाताळ जळमही मान्यता ॥ हे साक्ष असती बा देखतां ॥ पशुपक्षी मृगादिक ॥ ८७ ॥ जरी मज न घडे बोलासमान ॥ तरी पूर्वज सर्व पावती हीन ॥ स्वर्गवासी पावती पतन ॥ नरकवास भोगिती ॥ ८८ ॥ आणि शतजन्म रौरवकार[6] ॥ महीं भोगीन वारंवार ॥ जरी मी ओपीं राज्यसंभार ॥ तुजलागीं महाराजा ॥ ८९ ॥ ऐसें बोलून शपथपूर्वक ॥ पुन्हां बोले शपथदायक ॥ म्हणे महाराजा हे तपपाळक ॥ बोलासमान दावीं कीं ॥ ९० ॥ जरी या बोलासमान रहाणी ॥ तूं न दाखविसी मातें नयनीं ॥ तरी नरक पावसील सहस्र जन्मीं ॥ विहित वाचे अनृतत्वें[7] ॥ ९१ ॥ ऐसी राजेंद्र बोले वाणी ॥ सत्यार्थ म्हणतसे योगतरणी ॥ मग कामिनीअस्त्र पिंगलानेमीं ॥ प्रयोगातें उच्चारी ॥ ९२ ॥ मग सहज करून ऊर्ध्व दृष्टी ॥ फेंकिता झाला भस्मचिमुटी ॥ तंव ते कामिनीअस्त्रपोटीं ॥ स्त्रिया कोटी उतरल्या ॥ ९३ ॥ मुख्य पिंगला जी भस्म झाली ॥ तीच अनंत मूर्ति धरून उतरली ॥ ॥२॥

१ वीज. २ व्यर्थ. ३ सूर्य. ४ आकाशांत. ५ प्रकाश. ६ रौरव नरक प्राप्त करून देणारे. ७ खोटेपणानें.

पाठीं पोटीं व्यापिली ॥ सन्मुख उभी राहिली रायाच्या ॥ ९४ ॥ राव पाहून पिंगलास्वरूप ॥ मोह कामाचा उजळला दीप ॥ सकळांस बैसवोन आपणासमीप ॥ संसारखुणा पुसतसे ॥ ९५ ॥ परी त्या पिंगला सगुणसरिता ॥ सर्व सांगती अचुक वार्ता ॥ सांगून उपरी बोधअर्था ॥ रायाप्रती बोलती ॥ ९६ ॥ म्हणती महाराजा प्राणेश्वरा ॥ मम विरहाचें शल्य बैसलें अंतरा ॥ परी अशाश्वताचा माथां भारा ॥ फुकटपणीं वाहिला ॥ ९७ ॥ म्यां चित्तीं करून तुमची प्रीती ॥ दाहून घेतलें देहाप्रती ॥ पुन्हां उदय गोरक्षजतीं ॥ अनंत दृश्य पैं केलें ॥ ९८ ॥ केलें तरी तुम्हांभावनीं ॥ मिरवणें मज पुन्हां अवनीं ॥ परी शेवटीं मृत्युपणाची काचणी ॥ तुम्हां आम्हां असेचि ॥ ९९ ॥ तरी राया महीभोजा ॥ आतां संग सोडून माझा ॥ मोक्षमहीतळीं ध्वजा ॥ लावोनियां उभारीं ॥ १०० ॥ यापरी माझा काम चित्तीं ॥ वरून आचरलां संसारनीती ॥ परी मुक्तिमोक्षाची मांदुस हातीं ॥ चढणार नाहीं महाराजा ॥ १ ॥ मी पिंगला तुमची कांता ॥ आचार आचरलें पतिव्रता ॥ तेणें डौरवोन श्रीवरें माथा ॥ दिधलें हिता मजलागीं ॥ २ ॥ आतां तुमचें सर्व हित ॥ तुम्ही विलोका प्रज्ञावंत ॥ मी तुमची दासी तुम्हां संमत ॥ चालूं शकें महाराजा ॥ ३ ॥ ऐसें वदोन निवांतपणीं ॥ पिंगला बैसली राव वेष्टोनी ॥ परी तो चमत्कार पाहोनी ॥ विस्मय त्यासी वाटला ॥ ४ ॥ मग धांवून गोरक्षचरणीं ॥ लोटूं पाहे दंडवत अवनीं ॥ परी सर्वज्ञ गोरक्ष धरून पाणी ॥ रायाप्रती बोलतसे ॥ ५ ॥ हे महाराज महीपाळ ॥ माझा गुरु जो मच्छिंद्रबाळ ॥ मच्छिंद्रनामें प्रतापशीळ ॥ शिष्य आहे दत्ताचा ॥ ६ ॥ तरी यापूर्वीं तुझिया देहीं ॥ दत्तानुग्रह लाधला पाहीं ॥ तरी तूं मच्छिंद्रसहोदर महीं ॥ गुरु माझा अससी कीं ॥ ७ ॥ तरी तूं वंद्य आहेस मातें ॥ म्हणोन नमना अनुचित ॥ तरी माझा साष्टांग प्रणिपात ॥ तव चरणीं असो कीं ॥ ८ ॥ तरी राया सद्गुरुभ्राता ॥ सांग कीं कामना केवीं उद्भवली चित्ता ॥ राज्यवैभव संसारदुहिता ॥ पिंगला भोगूं इच्छीतसे ॥ ९ ॥ किंवा सोडून सकळ संपत्ती ॥ कामनाविरह वैराग्य चित्तीं ॥ आचरूं ऐसी बोधमती ॥ तरी स्थिति सांग कीं ॥ ११० ॥ जैसी कामना असे चित्ता ॥ तैसीच लाभेल तेजभरिता ॥ ऐसें बोलतां गोरक्षनाथा ॥ राव बोले उत्तर ॥ ११ ॥ म्हणे महाराजा द्वादश वरुषां ॥ बैसलों पिंगलाउद्देशा ॥ परी पिंगला स्वरूपास ॥ प्राप्त झाली नाहीं कीं ॥ १२ ॥ तरी येऊन त्वरितात्वरित ॥ पिंगला दाविल्या शतानुशत ॥ तरी ऐसें सबळ सामर्थ्य ॥ राज्यपदीं दिसेना ॥ १३ ॥ मी पूर्वींच भ्रांतीं वेष्टिलों ॥ श्रीगुरूचे हातापासून निसटलों ॥ निसटलों परी कष्टलों ॥ संसारतापामाझारीं ॥ १४ ॥ तरी आतां कृपाघन ॥ दत्तदर्शनाचें अपार जीवन ॥ मज चातका करीं पान ॥ कृपाघना महाराजा ॥ १५ ॥ आतां मातें संसारराहणी ॥ राज्यवैभव सुखावणीं ॥ तुच्छ लागे योगधर्मीं ॥ प्रतापानें हीन ॥ १६ ॥ धन्य तूं एक प्रेत्ययास ॥ पिंगला दाविली चमत्कारास ॥ जेवीं आवडीं कुरुपाळास ॥ कौरवदर्शना दाविलें ॥ १७ ॥ तैसें

१ तुमच्याकरितां. २ पृथ्वीपालका. ३ हालवून. ४ बारा वर्षेपर्यंत. ५ अनुभवास. ६ धृतराष्ट्राला.

पूर्ण कथेंत ॥ दर्शन करविलें मातें येथ ॥ तरी मी न राहें भवभ्रांतींत ॥ वेष्टोनियां महाराजा ॥ १८ ॥ आतां आचरेन पूर्ण योगा ॥ साधीन सकल कलांसीं प्रयोगा ॥ माझा स्वामी अनुसूयाकुशिगा ॥ रत्न मातें दावीं कां ॥ १९ ॥ गोरक्ष म्हणे विरहें नृपाळा ॥ मनीं वरिली आहे पिंगला ॥ तरी लक्षावधी प्राप्त या वेळा ॥ तूतें झाल्या महाराजा ॥ १२० ॥ तरी तितुक्या भोगून आतां ॥ संतुष्ट करीं आपुल्या चित्ता ॥ येरू म्हणे एकीकरितां ॥ दुःख इतुकें भोगिलें ॥ २१ ॥ मग लक्षावधी भोगून ॥ तयांचें दुःख अवर्णन ॥ कोणीं भोगावें चंद्रार्कमान ॥ अवधीतें सांडोनियां ॥ २२ ॥ एक वृश्चिक दंशिल्या अंगा ॥ वेदना होती भोगा ॥ त्यांत लक्षानुलक्ष सुयोगा ॥ दंशिल्या काय सांगावें ॥ २३ ॥ तरी आतां असो कैसें ॥ पुन्हां अदृश्य करीं पिंगलेस ॥ आणि तूं राज्यवैभवास ॥ सांभाळ करीं महाराजा ॥ २४ ॥ तरी माझिया स्वामींचे चरण ॥ आतां दावीं मजकारण ॥ इतका उपकार करून ॥ कीर्तिध्वजा मिरवीं कां ॥ २५ ॥ मग अवश्य म्हणे गोरक्षसुत ॥ पुन्हां अदृश्य पिंगला समस्त ॥ मग धरोनि भर्तरीनाथाचा हस्त ॥ मग नगरामाजी आणिला ॥ २६ ॥ आणिला तेव्हां हर्ष-समस्तां ॥ लोटती झाली आनंदसरिता ॥ विक्रमरायानें माथा ॥ गोरक्षचरणीं ठेविला ॥ २७ ॥ रायें बैसवोन कैनकासनीं ॥ षोडशोपचारें पूजिला मुनी ॥ मग जोडोनियां पाणी ॥ गोरक्षकातें पुसतसे ॥ २८ ॥ म्हणे महाराजा मम भ्राता ॥ पिंगलाविरहें पेटल्या चित्ता ॥ कैसा आणिला देहावरता ॥ तरी ती कथा सांगावी ॥ २९ ॥ मग रायातें सांगून सकळ कथन ॥ तुष्ट केला मनोधर्म ॥ उपरी वैराग्यसंकेत पावून ॥ पुढील कार्य सांगीतलें ॥ १३० ॥ परी विक्रम तो सर्व मर्मज्ञ ॥ तुष्टतांचि मिरवी मनोधर्म ॥ यावरी बोलता झाला वचन ॥ गोरक्षकातें तेधवां ॥ ३१ ॥ हे महाराजा कृपामूर्ती ॥ आपण बरीच योजिली युक्ती ॥ परी आपण येथ षण्मास वस्ती ॥ भ्रात्या-समवेत करावी ॥ ३२ ॥ म्हणाल तरी काय कारण ॥ तरी द्वादश वर्षें सोडिलें अन्न ॥ तेणें कृश शरीर होऊन ॥ प्राण डोळां उर-लासे ॥ ३३ ॥ म्हणोन आपणा विनंतिपत्र ॥ पुढें वाढितों पवित्र ॥ तरी तें स्वाद्वन्न सेवोनि चित्र ॥ मम मानसा पोसावें ॥ ३४ ॥ यावरी बोले गोरक्ष जती ॥ जाणत आहे माझे चित्तीं ॥ परी नेणों यावरी पुढें मती ॥ कैसी होईल रायाची ॥ ३५ ॥ त्याकरितां तप्तातप्त ॥ देईन रायाचे हातीं हित ॥ आतां राहणें योग्य मातें ॥ दिसत नाहीं महाराजा ॥ ३६ ॥ ऐसें विक्रमा गोरक्ष बोलोन ॥ प्रविष्ट झालें सकळांकारण ॥ द्वादशशत राण्या आदिकरोन ॥ वृत्तांत त्यांतें समजला ॥ ३७ ॥ मग तें असुख मानून चित्तीं ॥ शोकें युवती विव्हळ होती ॥ गोरक्षातें शिव्या देती ॥ मेला मेला म्हणूनियां ॥ ३८ ॥ नाना वल्गना बोलती ऐसी ॥ म्हणती होता दृष्टीसरसीं ॥ मेल्यानें येऊन घातलें फांशीं ॥ दूरदेशा न्यावया ॥ ३९ ॥ तरी याचें जळो वदन ॥ नेतो आमुचें सौभाग्यरत्न ॥ ऐसें म्हणोन म्लानवदन ॥ रुदनातें दाविती ॥ १४० ॥ असो यापरी विक्रमाकरितां ॥ त्रिरात्र झाला राहता ॥ मग भर्तरी गोरक्ष



१ दत्तमहाराज. २ सुवर्णसिंहासनावर. ३ हात. ४ मधुर अन्न. ५ बाराशें. ६ मंडळींत.

उभयतां ॥ निघते झाले तेथोनी ॥ ४१ ॥ राव विक्रमा आनंद चित्तीं ॥ उभयतांचे येऊन संगतीं ॥ बोळवीतसे अति प्रीतीं ॥ गोरक्षातें वंदूनियां ॥ ४२ ॥ परी स्त्रियांचे कटकांत ॥ थोर ओढवला आकांत ॥ शरीर टाकून भूमीवरतें ॥ आरंबळती अट्टहास्यें ॥ ४३ ॥ आठवोन रायाचे निपुण गुण ॥ स्त्रिया करिती अट्टहास्यें रुदन ॥ म्हणती आमुचा गेला प्राण ॥ रावशरीरीं मिरवला ॥ ४४ ॥ येरीकडे गोरक्षनाथ ॥ भर्तरी आणि विक्रमासहित ॥ अपार मंडळ प्रज्ञावंत ॥ गांवाबाहेर पातले ॥ ४५ ॥ तों गोरक्ष पुसे भर्तरीतें ॥ कीं राज्यवैभव अत्यद्भुत ॥ यांत मानस जरी गुंडाळत ॥ असेल तरी मज सांग ॥ ४६ ॥ ऐसी ऐकोन गोरक्षवार्ता ॥ भर्तरी बोले प्रांजळ अर्था ॥ हे महाराजा वैभव नलगे चित्ता ॥ योग आचरूं वाटतसे ॥ ४७ ॥ राज्यवैभव कनककामिनी ॥ वाटलें मातें नीच[१] वमनाहुनी ॥ लक्ष लावोनि श्रीगुरुचरणीं ॥ प्रचीत[२] घेऊन वहिवाटला ॥ ४८ ॥ मग आपली शैली शिंगी कंथा ॥ झाला देता राया यशवंता ॥ भिक्षा झोळी घेऊन हाता ॥ कुबडी फावडी ओपीतसे ॥ ४९ ॥ ऐसिया सरंजामेंकरून ॥ रायास बोलता झाला वचन ॥ वैभव मानिसी वमनासमान ॥ तरी प्रचीत दावीं कां ॥ १५० ॥ तरी संचरोनि[३] अंतःपुरांत ॥ कामिनी तुझ्या द्वादश शत ॥ त्या परक्या मानून चित्तांत ॥ भिक्षा मागून येईं मम दृष्टी ॥ ५१ ॥ ऐसें ऐकून भर्तरीनाथ ॥ अवश्य म्हणे काय आहे यांत ॥ मग तैसाच उठून कृतांतवत[४] ॥ अंतःपुरांत संचरला ॥ ५२ ॥ आदेश अलक्ष निरंजन ॥ शब्द गाजवी सवालपण ॥ शिंगी सारंगी वाजवोन ॥ स्त्रियांचे सदनीं फिरतसे ॥ ५३ ॥ तों तें आधींच स्त्रीकटक[५] ॥ बैसलें होतें करीत शोक ॥ त्याउपरी पाहून रायाचें मुख ॥ आक्रंदती अट्टहास्यें ॥ ५४ ॥ एक धरणीवरी लोळती ॥ एक कबरीकेश तोडिती ॥ एक मृत्तिका मुखीं घालिती ॥ मस्तक आपटिती धरणीये ॥ ५५ ॥ महीं आपटूनि कपाळ ॥ रुधिरें व्यक्त करिती बंबाळ ॥ एक उभयहस्तें वक्षःस्थळ ॥ धबधबां पिटिती ॥ ५६ ॥ एक रडती एक पडती ॥ एक शोकें मूर्च्छित होती ॥ परिचारिका[६] धांवोन हस्तीं ॥ सावध करिती तयांतें ॥ ५७ ॥ एक म्हणे ह्या रायासमान ॥ उपरी न देखों शतजन्म ॥ अहा रायाचें मायिक धन ॥ मायेहून आगळिक ॥ ५८ ॥ एक म्हणती अहा राव ॥ कैसा मिटला आमुचा भाव ॥ अहा विधात्या आमुचें दैव ॥ कैसें रेखिलें निजभाळा ॥ ५९ ॥ जैं वत्सालागीं गाय ॥ एक घडी न टाकून जाय ॥ त्याच नीतीं तो पतिराय ॥ होय माय आमुचा ॥ १६० ॥ अगे स्नेहेंकरून एकशयनीं ॥ परमस्नेहाचे चांगुलपणीं ॥ किंचित कोमाइलें पहात वदनीं ॥ अर्थ पुसे तयाचा ॥ ६१ ॥ पुसे परी इष्टार्थासमान ॥ राव पूर्ण करी स्नेहेंकरून ॥ जैसी माय करी कन्येकारण ॥ तैसा लळा पाळीतसे ॥ ६२ ॥ ऐसी माया जयाचे चित्तीं ॥ तो आतां होऊन निष्ठुरमती ॥ कैसा जातसे अदृश्य क्षितीं ॥ आम्हां

१ ओकारीहून कमी योग्यतेचें. २ अनुभव. ३ जाऊन. ४ यमासारखा. ५ स्त्रियांची मंडळी. ६ दासी.

शव करूनियां ॥ ६३ ॥ तरी आतां अर्थहीन ॥ राया जातात आमुचे प्राण ॥ आम्हां निढळवाणी करून ॥ अघोर रानीं सोडिसी ॥ ६४ ॥ ऐसें म्हणोन आरंबळती ॥ उलथोन महीवरती[1] पडती ॥ पुन्हां उठोन रायास पाहती ॥ दैन्यवाणीं शरीरें ॥ ६५ ॥ मग म्हणती अहा जी राव ॥ मिरवत होतासी कैसा भाव ॥ कीं महीलागीं कामदेव ॥ अवतार दुसरा दिसतसे ॥ ६६ ॥ अहा राजाचें वैभववर्णन ॥ ठेंगणा वाटतसे सहस्रनयन[2] ॥ तो कृशशरीर दैन्यवाणा ॥ भिक्षा मागे घरोघरीं ॥ ६७ ॥ ऐसें बोलून पहात त्यातें ॥ पुन्हां सांडिती शरीरातें ॥ मग सकळ उठोन रायातें ॥ वेष्टण घातलें स्त्रियांनीं ॥ ६८ ॥ म्हणती राया आम्हां सांडून ॥ दूर देशीं नको करूं गमन ॥ येथेंचि पाहून चंद्रवदन ॥ तुष्ट होतों आम्हीं कीं ॥ ६९ ॥ तरी आतां निस्पृह निराश ॥ दाही दिशा पडल्या राया उदास ॥ तरी मुक्त करून आमुच्या प्राणांस ॥ पाऊल मग पुढें ठेवावें ॥ १७० ॥ ऐसें बोलतां राया मनीं ॥ संचरला क्रोधद्विमूर्धनी[3] ॥ मग कुबडी उगारोनी ॥ निघता झाला माघारा ॥ ७१ ॥ परी तो गोरक्ष गुप्तहेर ॥ पाहात होता चमत्कार ॥ राव निघतां त्यजून स्त्रिया सत्वर ॥ मान तुकावी गोरक्ष ॥ ७२ ॥ असो भर्तरी सहजस्थितीं ॥ निघतां मागें त्या युवती[4] ॥ आरंबळोनि पाठीं येती ॥ नको जाऊं म्हणोनियां ॥ ७३ ॥ आज द्वादश वर्षपर्यंत ॥ बैसला होतास स्मशानांत ॥ आतां जोग आचरण करून वनांत ॥ तैसाचि येथें राहें कां ॥ ७४ ॥ परी तो राव सकळ सांडोन ॥ गांवाबाहेर आला परतोन ॥ येरीकडे विक्रमउज्जयिनीं ॥ स्त्रिया गेल्या स्वस्थाना ॥ ७५ ॥ यापरी गोरक्ष भर्तरीनाथ ॥ पुसोनि निघाले विक्रमातें ॥ मग पदीं पदीं दुरवा होत ॥ अर्ध कोस पैं गेले ॥ ७६ ॥ येरीकडे विक्रम नृपती ॥ परतोनि आला स्थानाप्रती ॥ परी अट्टहास्य पाहून अंतःपुराप्रती[5] ॥ संचार करिता पैं झाला ॥ ७७ ॥ मग माय वहिणी कन्यासमान ॥ सकळां तोषवी बोध करून ॥ येरीकडे उभय जन ॥ मार्गाप्रती गमताती ॥ ७८ ॥ परी कृशशरीरी भर्तरीनाथ ॥ अशक्त पद ठेवी कंठेना पंथ ॥ मग व्यानअस्त्र[6] भस्मचिमुटींत ॥ स्थापिता झाला गोरक्ष ॥ ७९ ॥ मग तें भस्म चर्चितां भाळीं ॥ झडून गेली अशक्त काजळी ॥ मग क्षण पातीं लागतां डोळीं ॥ गिरनारपर्वतीं पोंचला ॥ १८० ॥ तों जातां देखे अत्रिनंदन ॥ पायीं लोटले उभय जन ॥ मग मायें उभयतां कवळून ॥ वदनइंदु कुरवाळी ॥ ८१ ॥ म्हणे वत्सा गोरक्षनाथा ॥ भर्तरीकरितां शिणविलें तूतें ॥ ऐसें म्हणोन कुर्वाळीत ॥ वारंवार मुखातें ॥ ८२ ॥ त्याच प्रकरणीं मोहस्थिती ॥ राया भर्तरीतें संपादिती ॥ म्हणे वत्सा श्रम बहुतीं ॥ आणिलें येथें मम वत्सें ॥ ८३ ॥ असो स्थिति वृत्ति धृति सकळा ॥ एकमेकांतें घोंटाळा ॥ निवेदनीं चित्तीं संचियेला ॥ तोषाप्रती तरी वरितील ॥ ८४ ॥ असो आतां तुष्टलक्षण ॥ पुढील अध्यायीं सांगेल धुंडीनंदन ॥ मालु नरहरिकृपेंकरून ॥ संतगणीं मिरवला ॥ १८५ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ नवविंशतिअध्याय गोड हा ॥ १८६ ॥ ॥ ७ ॥

१ पृथ्वीवर. २ इंद्र. ३ क्रोधाग्नि. ४ स्त्रिया. ५ जनानखान्यांत. ६ व्यानवाय्वस्त्र.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी जगदुद्धारा ॥ पंढरीअधीशा रुक्मिणीवरा ॥ सर्वसाक्षी दिगंबरा ॥ पुढें ग्रंथ बोलवीं कां ॥ १ ॥ मागिले अध्यायीं अनुसंधान ॥ भर्तरीस आलें विरक्तपण ॥ गोरक्षजतीचे समागमेंकरून ॥ गिरनार अचळा पोंचला ॥ २ ॥ पोंचला परी रात्रंदिन ॥ लेऊन स्नेहाचें अपार रत्न ॥ तेणेंकरून उभयतां जाण ॥ सुशोभित पैं झाले ॥ ३ ॥ यावरी गोरक्ष तीन रात्री ॥ राहता झाला गिरनारपर्वतीं ॥ मग पुसून श्रीदत्ताप्रती ॥ मच्छिंद्राकडे चालिला ॥ ४ ॥ चालिला परी अत्रिसुत ॥ म्हणे बाळा गोरक्षनाथा ॥ मच्छिंद्रवत्स मम देहातें ॥ भेटला नाहीं बहुत दिवस ॥ ५ ॥ तरी तयाचे भेटी माझे चक्षु ॥ परम भुकेले योगदक्षु ॥ तरी त्या आणून मज प्रत्यक्षु ॥ भेटवीं कां जिवलगा ॥ ६ ॥ ऐसी ऐकतां दत्तात्रेयवाणी ॥ भेटवीन म्हणे गोरक्षमुनी ॥ मग श्रीदत्तात्रेयचरणां नमूनी ॥ निघता झाला गोरक्ष ॥ ७ ॥ श्रीमच्छिंद्रमार्ग धरून ॥ चालता झाला गोरक्षनंदन ॥ येरीकडे रायाकारण ॥ काय करी महाराजा ॥ ८ ॥ नाथदीक्षा देऊन त्यासी ॥ मौळीं स्थापी वरदहस्तासी ॥ चिरंजीवपद देऊन त्यासी ॥ अक्षय केला महाराजा ॥ ९ ॥ जोंवरी कल्याण असे धरित्री[3] ॥ चिरंजीव केला राव भर्तरी ॥ ऐसें वचन वाग्वुत्तरीं ॥ प्रसादातें ओपिलें ॥ १० ॥ याउपरी अभ्यासास ॥ प्रारंभीं नेमिला भर्तरीदास ॥ ब्रह्मज्ञान रसायनास ॥ कविता वेद सांगितला ॥ ११ ॥ ज्योतिष व्याकरण धनुर्धर ॥ जलतरणादि संगीतोत्तर ॥ वैद्य अवश्य रोहिणी अपार ॥ गाढ आधींच होता तो ॥ १२ ॥ कोकशास्त्रादि नारककळा ॥ चातुर्यभाष्य बोल रसाळा ॥ मीमांसादि पातंजला ॥ प्रवीण केला महाराजा ॥ १३ ॥ यापरी वैद्यशास्त्र गहन ॥ सांगता झाला अत्रिनंदन ॥ वातास्त्रादिक जलद पूर्ण ॥ अग्निअस्त्र सांगितलें ॥ १४ ॥ कामास्त्र धर्मास्त्र वाताकर्षण ॥ वज्रास्त्र पर्वतास्त्र वासवशक्ति दारुण ॥ नागास्त्र खगेंद्रास्त्र अस्त्रजीवनीं जीवन ॥ ब्रह्मास्त्रादि उपदेशी ॥ १५ ॥ देवास्त्र काळास्त्र आणि मोहन ॥ रुद्रास्त्र विरक्तास्त्र अति निपुण ॥ निर्वाणअस्त्रादि दानवप्रवीण ॥ स्तवनास्त्रादि सांगितलीं ॥ १६ ॥ कार्तिकास्त्र आणि स्पर्शास्त्र ॥ विभक्तास्त्रादि मानवअस्त्र ॥ विहंगम[5] प्लवंगम कामिनीअस्त्र ॥ सकळ अस्त्रादि उपदेशी ॥ १७ ॥ यावर शस्त्रविद्या सघन ॥ पूर्वीं होता राव निपुण ॥ त्रिशूळ फरश अंकुश मान ॥ धनुष्य तोमर असिलता[7] ॥ १८ ॥ परज मुद्गर बरसी ॥ मांडूक चक्रें गदा-उद्देशीं ॥ दारुकयंत्रें शस्त्रेंसीं बरसी ॥ कुठारादिकीं प्रवीण ॥ १९ ॥ ऐसा शस्त्रविद्येकारण ॥ पूर्वींच होता राव प्रवीण ॥ त्यावर अस्त्रविद्यारत्न ॥ गुरुमुखें लाधला ॥ २० ॥ मग ते विद्येस अर्थ शेवटीं ॥ कीं कोंदण विराजे रत्नतगटीं ॥ मग त्या तेजा हेमावटी ॥ मोल काय बोलावें ॥ २१ ॥ कीं सुगंधित मलयागर ॥ त्या मिश्रित झालें मृगमदकेशर ॥ मग त्या गंधातें वाग्वुत्तर ॥ कवण अर्थी बोलावें ॥ २२ ॥ असो ऐसा विद्यासंपन्न ॥ भर्तरीतें करून अत्रिनंदन ॥ उपरी साबरीव्यक्त करून ॥ सदनातें पाठवी ॥ २३ ॥

१ श्रीदत्तात्रेय. २ मस्तकावर. ३ पृथ्वी. ४ इंद्रास्त्र. ५ पक्षी. ६ मोठी. ७ तलवार.

नाग पन्नग उभय ठायीं ॥ सकळ दैवतें तया प्रवाहीं ॥ मित्रकुंडासनीं वेढून मही ॥ पाठवीत महाराजा ॥ २४ ॥ मग तेथें जाऊन भर्तरीनाथ ॥ साधिलें सकळ बावन्न वीरांतें ॥ जैसा मच्छिंद्र झाला क्लेशवंत ॥ त्याचि क्लेशा वरियेलें ॥ २५ ॥ मग सकळ देव करून प्रसन्न ॥ पाहती श्रीगुरूचे चरण ॥ मग सर्वे घेऊन अत्रिनंदन ॥ बद्रिकाश्रमीं पातला ॥ २६ ॥ तेथें बैसवून पूर्ण तपासी ॥ मग येऊन गिरनारपर्वतासी ॥ राहते झाले सुखवस्तीसी ॥ मच्छिंद्रमार्ग विलोकीत ॥ २७ ॥ तों येरीकडे गोरक्षनाथ ॥ पाहता झाला गर्भगिरी पर्वत ॥ परम आवडीं आनंदभरित ॥ मच्छिंद्रातें भेटला ॥ २८ ॥ उपरी चरणीं ठेवून माथा ॥ म्हणे महाराजा आनंदभरिता ॥ तुमच्या भेटीची क्षुधा [१]नितांत ॥ कामानळू दाटला ॥ २९ ॥ तरी तयाची घेऊं भेटी ॥ आनंदें होड दाटला पोटीं ॥ जैसी इंदूची [२]अर्णवा गांठी ॥ प्रेमें लहरी उचंबळे ॥ ३० ॥ कीं सोमातें कुमुदपातीं ॥ भेटी चुंबक काम वांच्छिती ॥ तन्यायें त्रिविधं[३]मूर्ती ॥ [४]कामिनली भेटीसी ॥ ३१ ॥ ऐसी गोरक्षकाची ऐकतां वाणी ॥ तोही पडला कामवेष्टणीं ॥ म्हणे वत्सा माझा स्वामी ॥ पाहूं ऐसें वाटतसे ॥ ३२ ॥ मग कांहीं दिवस तेथें राहून ॥ करिते झाले उभय गमन ॥ वैदर्भदेशींचा मार्ग धरून ॥ गमत असती उभयतां ॥ ३३ ॥ तों कौंडण्यपुरीं सहज ग्रामांत ॥ करूं गेले उभय भिक्षेतें ॥ तों तेथींचा शशांगर नृपनाथ ॥ कोपलासे [५]स्वसुता ॥ ३४ ॥ कोपला परी चौहटाआंत ॥ दूतांहातीं ओपून सुत ॥ खंडित करूनि पदहस्त ॥ चौहटातें टाकिला ॥ ३५ ॥ यावरी श्रोते कल्पना घेती ॥ राव कोपला सुतावरती ॥ तो कोप तया कवण अर्थीं ॥ सुतावरी पेटला ॥ ३६ ॥ तरी हे कविज्ञ महाराजा ॥ दावा सकळ निर्णयचोजा ॥ गूढत्व ठेवून ग्रंथीं भोजा ॥ प्रांजळपणीं असावा ॥ ३७ ॥ ऐसें ऐकतां श्रोत्यांचें वचन ॥ कवी म्हणे घ्या अनुसंधान ॥ तेथींचा राव शशांगर नाम ॥ प्रज्ञावंत धार्मिक ॥ ३८ ॥ धैर्य औदार्य बळसंपत्ती ॥ सत्वस्थ यश करी कीर्ती ॥ ऐसा असून शशांगर नृपती ॥ परी संतति नसे त्या ॥ ३९ ॥ संतति नसे तेणेंकरून ॥ राव पेटला चित्तीं उद्विग्न ॥ न आवडे वैभव राज्यकारण ॥ छत्रसिंहासन नावडे ॥ ४० ॥ नावडे आसन [६]वसन शयन ॥ नावडे अन्नोदकादि पान ॥ नावडे चातुर्यभोगादि गायन ॥ कळाकुशळ [७]गुणस्वी ॥ ४१ ॥ सदा विराजून एकांतस्थानीं ॥ वंशलतेची करी घोकणी ॥ तों एके दिवशीं मंदाकिनी ॥ कांता बोले रायातें ॥ ४२ ॥ म्हणे महाराजा नरेंद्रोत्तमा ॥ धाक धरितां संततिकामा ॥ परी [८]ल्लाटरेषेच्या [९]विधिउगमा ॥ नसल्या व्यर्थ कां धाक ॥ ४३ ॥ तरी सर्वज्ञा सहजस्थितीं ॥ चित्त मिरवा प्रांजळवृत्तीं ॥ व्यर्थ कांचणी शरीराप्रती ॥ न भंगूं द्यावें अनलातें ॥ ४४ ॥ राया वडवानल चिंताक्लेश ॥ शरीरा साहून हरी प्रज्ञेस ॥ प्रज्ञेवीण संसार ओस ॥ होत आहे महाराजा ॥ ४५ ॥ ऐसें बोलतां मंदाकिनी ॥ परी राया बोध न वाटे मनीं ॥ चित्तदरीं व्यग्र कांचणी ॥ संसारवल्ली सोडीना ॥ ४६ ॥ दिवसानुदिवस

१ मोठी भूक (इच्छा) होऊन. २ समुद्राला. ३ दत्त. ४ उत्कंठित झाली. ५ आपल्या पुत्रावर. ६ वस्त्र. ७ सद्गुणी. ८ ललाटावर ब्रह्मदेवानें लिहिलेल्या लेखांत. ९ चिंता.

अति थोर ॥ नावरे [1]चिंतावैश्वानर ॥ मग एके दिवशीं अति निष्ठुर ॥ शिव आराधूं[2] बैसला ॥ ४७ ॥ मंत्रिकांतें पाचारून ॥ वैभव केलें त्यांस्वाधीन ॥ सवें स्वल्प दूत घेऊन ॥ दक्षिण दिशे चालिला ॥ ४८ ॥ रामेश्वरा काम वेरून ॥ जात शिवातें[3] करूं प्रसन्न ॥ तों मार्गीं चालतां कृष्णासंगम ॥ तुंगभद्रीं भेटला ॥ ४९ ॥ तेथें राहतां मुक्कामासी ॥ शयन करितां निशीसी ॥ दशकर पंचानन स्वप्नासी ॥ येऊनियां बोलतसे ॥ ५० ॥ म्हणे राया संसारवल्ली ॥ तव चित्तदरीं चिंता व्यापिली ॥ तरी याच ठायीं संतानवल्ली ॥ प्राप्त होईल तुज राया ॥ ५१ ॥ परी कृष्णातुंगभद्रा उभयसरितीं ॥ संगमचिमव्यांत तैंटक्षितीं[4] ॥ अपर्णेसहित[5] माझी मूर्ती ॥ नित्य अर्चीं त्या लिंगीं ॥ ५२ ॥ लिंग अर्चितां सकाम कामा ॥ स्वार्थ पावशी नरेंद्रोत्तमा ॥ याविण खंती जावया तुम्हां ॥ अन्य उपाय नसेचि ॥ ५३ ॥ ऐसा स्वप्नीं दृष्टांत होतां ॥ तेंच आवडे नरेशचित्ता ॥ मग मित्रडोहसंगमसरिता ॥ जाऊनियां विलोकी ॥ ५४ ॥ तों जुनाट लिंग दिसलें तेथ ॥ होतें तटीं प्रतिष्ठेरहित ॥ रावें पाहून सप्रेमभरित ॥ प्रतिष्ठेंत मिरविलें ॥ ५५ ॥ मेळवून पंचोपचारक ॥ तया उभवून प्रेम दोंदिकें[6] ॥ प्राणप्रतिष्ठा करून अँारचक[7] ॥ तया ठायीं मिरवला ॥ ५६ ॥ तयालागीं उत्साह थोर ॥ भावने रक्षी रामेश्वर ॥ परी कीर्तिध्वजें संस्कार ॥ अपार लोक मग येती ॥ ५७ ॥ करून हराचे जयजयकार ॥ अखंड होतां नामीं गजर ॥ जय जय शिव संगमेश्वर ॥ ऐसें लोक बोभाती ॥ ५८ ॥ परी तयानिकट मध्यक्षिती ॥ भद्रसंगम ग्रामवस्ती ॥ तयामाजी भूदेव[8] जाती ॥ एक असे प्राज्ञिक[9] ॥ ५९ ॥ मित्राचार्य तयाचें नाम ॥ वेदपाठकी उत्तमोत्तम ॥ तयाची दारा शरयू नाम ॥ पतिव्रता आगळी ॥ ६० ॥ आगळी परी संततीविण ॥ दोघें होती अति क्षीण ॥ मग ते उभयतां सुलक्षण ॥ त्याच शिवा अर्चिती ॥ ६१ ॥ ऐसे लोटतां कांहीं दिवस ॥ तों स्वर्गीं वर्तलें काय कथेस ॥ सर्व गण मिळून सभेस ॥ शिवा बैसले वेष्टुनी ॥ ६२ ॥ सुधाम अति मनोहारक ॥ रत्नजडित तें हाटक ॥ तरी धाम नोहे वैडूर्यविकासिक ॥ शिवसभा मिरवतसे ॥ ६३ ॥ ऐसिये सभे ते काळीं ॥ बैसली असतां गणमंडळी ॥ सुरोचना अप्सरा चंद्रमौळी ॥ पाचारिता पैं झाला ॥ ६४ ॥ तंव ती सुरोचना देवांगना ॥ वेगीं येऊन सिद्धांगणा ॥ मैदनांतकाच्या लागून चरणा ॥ नाट्यपरी वहिवटली ॥ ६५ ॥ नाट्यें करितां चातुर्यगायन ॥ चतुर्थ स्वरीं परम संपूर्ण ॥ तान-मानीं संकेत दावून ॥ नृत्य करी आगळी ॥ ६६ ॥ परी नृत्य करितां भावनेंत ॥ भावना कल्पी स्वचित्तांत ॥ कीं सैरारीतें होऊन रत ॥ कामभावने निवटावें ॥ ६७ ॥ ऐसिये कामनीं पेटून कामा ॥ परी काम दाटला शरीरउगमा ॥ तेणेंकरून नाट्यें उत्तम ॥ नृत्य करितां चांचरली ॥ ६८ ॥ चाचर्णा पाहून अपर्णाकांत ॥ तियेची भावना आणून चित्तांत ॥ म्हणे कामीण कामानलातें ॥ पेटली ही अप्सरा ॥ ६९ ॥ तरी अहंकार विलक्षण ॥ योग्य नव्हे ही कामीन ॥ तरी ईतें सुलभ जन्म ॥ देऊनियां रत व्हावें ॥ ७० ॥

---

१ चिंतारूपी अग्नि. २ इच्छा धरून. ३ श्रीशंकर. ४ किनाऱ्यावर. ५ पार्वतीसह. ६ मोठें. ७ अर्चा. ८ ब्राह्मण. ९ ज्ञानी. १० स्त्री.

ऐसी कल्पना आणून चित्तीं ॥ बोलता झाला पशुपती ॥ म्हणे सुरोचने काम चित्तीं ॥ तुझा मातें समजला ॥ ७१ ॥ तरी तूं ऐसी भ्रष्टपणीं ॥ शीघ्र पावशी मृत्यु अवनीं ॥ भद्रसंगमीं जन्म घेऊनी ॥ विप्रकुशीं मिरवसी ॥ ७२ ॥ मित्राचार्य पिता तया नाम ॥ माता शरयू परम सुगम ॥ तियेचे कुशीं तुज जन्म ॥ मानवदेहीं मिरवीं कां ॥ ७३ ॥ ऐसें वदतां झाला अंत ॥ सुरोचना भयभीत ॥ चित्तीं म्हणे स्वर्गच्युत ॥ हीनदैवें झालें मी ॥ ७४ ॥ अहा चित्तीं उदेलें दैवमांदुस ॥ तेथें उदेला दैवें खईस ॥ तेवीं इच्छिल्या शिवरतीस ॥ अलाभातें मिरवलें ॥ ७५ ॥ अहा जी करूं जातां एक ॥ प्रारब्ध घडवी अनेक ॥ करीं कवळितां रत्नमाणिक ॥ काचमणि निवडिला ॥ ७६ ॥ ऐसी सुरोचना चित्तीं चिंतून ॥ करिती झाली म्लानवदन ॥ उपरी तिनें स्तुतिस्तवन ॥ शिवालागीं आरंभिलें ॥ ७७ ॥ म्हणे महाराजा कैलासपती ॥ नंदीवहना चक्रवर्ती ॥ त्रिशूळपाणी सर्वांगीं विभूती ॥ व्यक्ताव्यक्त अससी तूं ॥ ७८ ॥ फरशांकुश गदा तोमर ॥ डमरू चक्र कपालपात्र ॥ इंहीं शोभती दशकर ॥ रुंडमुंडभूषणिका ॥ ७९ ॥ भाळीं [2]इंदु [3]कैबरीं गंगा ॥ श्वेतवर्णा करिसी योगा ॥ वस्ती सुलक्षें आवडे नगा ॥ पूर्ण जोगा साधावया ॥ ८० ॥ तरी हे उमामायाधवा ॥ देवा श्रेष्ठा महाभावा ॥ विज्ञानधारणीं अनुभवा ॥ महादेव तुज म्हणती ॥ ८१ ॥ तरी आतां प्रज्ञावंता ॥ चुकुर माझी वारीं व्यथा ॥ भोळेपणीं मानून चित्ता ॥ उःशापातें वदावें ॥ ८२ ॥ ऐसी ऐकून तियेची वाणी ॥ तोषला [1]मृडानीवर मनीं ॥ म्हणे सुरोचने तूतें अवनीं ॥ प्राप्त होईन निश्चयें ॥ ८३ ॥ परी मातें तूं अर्चितां ॥ प्रत्यक्ष होऊन तुझिया अर्था ॥ मग सहज माझा स्पर्श होतां ॥ स्वस्थानातें तूं येशी ॥ ८४ ॥ हाच माझा वरउःशाप ॥ तरी खेदातें करीं लोप ॥ ऐसें बोलतां गणार्णवभूप ॥ चालती झाली उर्वशी ॥ ८५ ॥ भद्रसंगमीं विप्रोत्तम ॥ मित्राचार्य पवित्र नाम ॥ शरयू कांते वरितां काम ॥ दृश्य झाली जठरातें ॥ ८६ ॥ पुढें लोटतां दिवसानुदिवस ॥ पूर्ण होतां नव मास ॥ कन्यारत्नपंकजास ॥ उदय झाला वेल्हाळ ॥ ८७ ॥ परी ती ठायींची उर्वशी ॥ कवणा न वर्णवे स्वरूपासी ॥ बालार्ककिरणीं सतेजराशी ॥ [4]कनकपंकजा मिरवतसे ॥ ८८ ॥ चंद्राननी आकर्ण नयन ॥ खंजरीटकलिका दैदीप्यमान ॥ जिचें पाहतां मुखमंडन ॥ मदन मूर्च्छा वरीतसे ॥ ८९ ॥ जिचे दंत माणिकवर्णी ॥ अधर विकासत सुहास्यवदनी ॥ दंततेजें पाषाणतरणी ॥ रत्नपंकजा मिरवतसे ॥ ९० ॥ पवळदेठी अधरभार ॥ सरळ नासिक पवनस्थिर ॥ परमतेजवंत वक्त्र ॥ पाहून चंद्र लाजतसे ॥ ९१ ॥ चंपकमालतीसुवासमाला ॥ कीं मलयागरें दिधली कळा ॥ ऐसे गंधीं [5]षट्पदमेळा ॥ रुंजावया धांवतसे ॥ ९२ ॥ एक कोश वनांत ॥ तरु होती तैं सुगंधित ॥ मृत्तिका वरून [6]मृगमदास ॥ सर सर परतें म्हणविती ॥ ९३ ॥ ऐसियेपरी गजगामिनी ॥ दिवसेंदिवस वृद्धि होउनी ॥ द्वादश वरुषें पवित्रपणीं ॥ कदंबा ऐसें मिरवतसे ॥ ९४ ॥ परी ती कदंबा शुभाननी ॥

१ श्रीशंकर. २ चंद्र. ३ मस्तकांतील केंसांत. ४ जणूं काय सुवर्णकमळच अशी. ५ भ्रमरसमूह. ६ कस्तूरीला.

द्वादश वरुषें इंद्रियदमनीं ॥ पिता पतीतें पडतां यत्नीं ॥ परी ती न वरी भर्त्यातें ॥ ९५ ॥ सदा विरक्त शिवस्मरणीं ॥ शिवध्यान
आसनीं शयनीं ॥ काया वाचा अंतःकरणीं ॥ शिववेधें वेधली ॥ ९६ ॥ शिवार्चनीं तात माता ॥ जाती नित्य उभयतां ॥ तयांसंगें
लावण्यलता ॥ कदंबाही जातसे ॥ ९७ ॥ बाळपणीं नित्यनित्य ॥ शिवदर्शन तियेस होत ॥ पुढें होतां वयस्थित ॥ शिव स्वतः
अर्चीतसे ॥ ९८ ॥ ऐशीं लोटतां द्वादश वरुषें ॥ तों कोणे एके सुदिन दिनास ॥ गृहीं सांडून तातमातेस ॥ शिवालयीं गेली ते
॥ ९९ ॥ तंव ते समयीं देवळांत ॥ कोणीच नसे एकांतांत ॥ कदंबा तेथें संचार करीत ॥ एकटपणीं शुभांगी ॥ १०० ॥ जय जय
हर म्हणूनि वाणी ॥ मस्तक ठेवी महीलागुनी ॥ ते समयीं [1]मृडानीवर तीलागुनी ॥ अदृश्य होता त्या ठायीं ॥ १ ॥ गुप्त तेथ शिव पंचा-
नन ॥ पाहता झाला तियेकारण ॥ परी ती [2]दारा सुलक्षण ॥ मुखमंडणीं देखिली ॥ २ ॥ जैसी चपळा तेजभरित ॥ शिवधामीं
लखलखित ॥ तीतें पाहतां [1]अपर्णानाथ ॥ कामवेष्टणीं पडियेला ॥३॥ मग हास्ययुक्त होऊनि कुमारतात ॥ मनीं इच्छी व्हावें रत ॥
ऐसें योजून चपळवंत ॥ धरूं पाहे ती चपळा ॥ ४ ॥ परी तो शिव तेजखाणी ॥ धांवतां देखिला जैसा [3]तरणी ॥ तेणेंकरून
भयभीत होऊनी ॥ पळूं लागे कदंबा ॥ ५ ॥ शिवालयातें सोडून बाहेरी ॥ येती झाली विप्रकुमरी ॥ परी तो शिव कामातुर ॥
तियेमागें धांविन्नला ॥ ६ ॥ पुढें कदंबा मागें [1]भव ॥ उभयतां महीतें घेती धांव ॥ धांव घेतां सदाशिवें ॥ जाऊनियां स्पर्शिली
॥ ७ ॥ परी शिवस्पर्श होतां तीतें ॥ सांडी मानवतनूतें ॥ सुरोचना अप्सरा होऊनि त्वरित ॥ स्वर्गाप्रती चालिली ॥ ८ ॥
चालिली परी एकीकडे ॥ शिवकामाचा उजळिला पाड ॥ ठाव सांडून इंद्रियपाड ॥ द्रव द्रवला महीतें ॥ ९ ॥ द्रवतां महीपाठीं ॥
पाहता झाला कृष्णातटीं ॥ उदक मिळतां एकवटीं ॥ सकळ मासे संचरले ॥ ११० ॥ संचरले परी पूर्वींपासून ॥ तये समयीं पर्वत-
घन ॥ तेणें प्रवाहीं कृष्णासंगमनीं ॥ रेतपात मिरवला ॥११॥ पर्जन्यकाळीं तो अचाट ॥ जात होता [4]कृष्णपात्रांत ॥ तये संधींत राव
सुभट ॥ स्नानालागीं मिरवला ॥ १२ ॥ स्नान करूनि शशांगर ॥ तटीं बैसला होऊनि स्थिर ॥ स्नानसंध्या सारोनि समग्र ॥ अर्घ्य-
प्रदानीं प्रवर्तला ॥ १३ ॥ करीं घेतां कृष्णाजीवन ॥ तों रेत दाटलें अंजुळींत येऊन ॥ मानवदेहाचा स्पर्श होऊन ॥ रेतीं पुतळा
रचियेला ॥ १४ ॥ रचिला परी न लागतां क्षण ॥ सकळ अवयव दैदीप्यमान ॥ रायें पाहतां प्रत्यक्ष वदन ॥ बाळतनूतें देखिलें
॥ १५ ॥ पाहतांच राजा हर्षयुक्त ॥ म्हणे मज पावला [1]उमाकांत ॥ अयोनिसंभव सुत ॥ प्रतापदक्ष मज झाला ॥ १६ ॥ तरी हा
कोणी महीअवतार ॥ असेल [5]विरंचि हरि हर ॥ [6]वाचस्पति [7]सहस्रनेत्र ॥ अवनीवरी उतरला ॥ १७ ॥ ऐसा आनंद मानोनि
चित्तीं ॥ उठता झाला तो नृपती ॥ बाळक कवळोनि हृदयाप्रती ॥ शिबिरा प्रविष्ट पैं झाला ॥ १८ ॥ मंदाकिनी सुंदर कांता ॥

१ श्रीशंकर. २ मुलगी. ३ सूर्य. ४ कृष्णेचा प्रवाह. ५ ब्रह्मदेव. ६ बृहस्पति. ७ इंद्र. ८ राहत्या आश्रमांत.

 

परम सत्वस्थ पतिव्रता ॥ तिये करीं बाळ ओपितां ॥ पाहोनि तेही आनंदे ॥ १९ ॥ रायास म्हणे मंदाकिनी ॥ बाळ कोणाचा आणिला स्वामी ॥ राव म्हणे अर्घ्यजीवनीं ॥ उदय पावला करपात्रीं ॥ १२० ॥ तरी हा ईश्वरें पुत्र तूतें ॥ दिधला आहे उमाकांतें[1] ॥ तरी पालन करून महीतें ॥ पुत्रवती मिरवें कां ॥ २१ ॥ ऐसी ऐकून नरेंद्रवाणी ॥ परम हर्षली मंदाकिनी ॥ मग अति स्नेहाचें भरतें आणुनी ॥ बाळ हृदयीं कवळिला ॥ २२ ॥ लावितांचि स्तन मुखासी ॥ पान्हा आला स्तनासी ॥ संस्कारोनि कृष्णागर नामासी ॥ द्वादशावे दिनीं स्थापिलें ॥ २३ ॥ यावरी राव शिवापासून ॥ निघता झाला मग तेथून ॥ कौंडण्यग्राम अपूर्व स्थान ॥ येऊनियां पोंचला ॥ २४ ॥ यावरी दिवसानुदिवस ॥ कृष्णागर पावला दश वर्षें ॥ मग विवाहचिंता शशांगरास ॥ स्नुषा रूपी दाटली ॥ २५ ॥ मग कर्दममंत्री पुरोहित ॥ ऐक्य करूनि नृपनाथ ॥ देशावरी पाठवीत ॥ सुलक्षण कुमारी योजावया ॥ २६ ॥ परी राव सांगे मंत्रिकांकारण ॥ कीं कुमारी पहावी सुलक्षण ॥ रूपवती गुणानें समान ॥ कृष्णागरासारखी ॥ २७ ॥ अवश्य म्हणोनि मंत्रिकवृंद[2] ॥ जात देशातें समुच्चयवृंद[3] ॥ पुरोहितादि पाहती संबंध ॥ कृष्णागर रायाचा ॥ २८ ॥ नाना क्षेत्र राज्य पाहुनी ॥ कुमारी पाहे मंत्री नयनीं ॥ परी कृष्णागराच्या रूपमांडणीं ॥ एकही कन्या आढळेना ॥ २९ ॥ सकळ मंत्री देशोदेश ॥ पाहूं श्रमले कुमारीस ॥ परी सर्वसंपन्न तयांस ॥ कोणी एक आढळेना ॥ १३० ॥ रूप पाहती तों गुण हीन ॥ गुण पाहती तों स्वरूप हीन ॥ रूप गुण असतां घटित समान ॥ उभयतांचें येईना ॥ ३१ ॥ ऐसियेपरी सांगोपांग ॥ कोठेंही दिसेना शुभमार्ग ॥ अति श्रमोनि लागवेग ॥ स्वस्थानासी पावले ॥ ३२ ॥ रायास भेटून सांगती वृत्तांत ॥ कीं कन्यारत्नें अपरिमित ॥ परी गुणरूपघटितार्थ ॥ कोणी एक दिसेना ॥ ३३ ॥ आजवरी महाराजा ॥ द्विसंवत्सर[4] लोटले काजा ॥ परी कन्यारत्न चोजा ॥ नातळे ऐसें झालेंसे ॥ ३४ ॥ ऐसें रायातें मंत्री सांगून ॥ पाहते झाले आपुलीं स्थानें ॥ याउपरी क्षण मास दिन ॥ लोटून गेले तयापाशीं ॥ ३५ ॥ याउपरी कोणे एके दिवशीं ॥ कृतांतभृत्य[5] येऊन महीशीं ॥ घेऊन गेले मंदाकिनीसी ॥ परत्रदेशाकारणें ॥ ३६ ॥ मग सुशरीर मंदाकिनी ॥ रायें शशांगरें पाहूनी ॥ परम विव्हळ झाला वियोगेंकरूनी ॥ शोकार्णवीं दाटला ॥ ३७ ॥ परी कैसाही असला मायिक देही ॥ मेल्यामागें मरत नाहीं ॥ असो उचंबळोनि शोकप्रवाहीं ॥ ढुंदकिया संपादी ॥ ३८ ॥ उपरी उत्तरक्रिया करून ॥ राव सेवी सिंहासन ॥ त्यासही लोटल्या संवत्सर पूर्ण ॥ श्राद्धदशा उरकली ॥ ३९ ॥ उरकली परी कामिनीवीण ॥ राया चित्तीं न वाटे कल्याण ॥ कामानळीं पंचप्राण ॥ व्याकुळ बहु होताती ॥ १४० ॥ परी राव तो इंद्रियदमनीं ॥ कदा न पाहे व्यभिचार मनीं ॥ मग मंत्रिकास बोलावुनी ॥ निकट बैसवी आपुल्या ॥ ४१ ॥ म्हणे मकरंदा सुलक्षणा ॥ तूं करूं गेलासी देशभ्रमणा ॥ परी कुमारी रूपवंत

१ शंकरानें. २ मंत्रिमंडळी. ३ एकत्र होऊन. ४ दोन वर्षें. ५ यमदूत.

आणि सगुणा ॥ कोणी तरी आढळली कां ॥ ४२ ॥ मंत्री म्हणे जी नृपनाथ ॥ कुमारी आहे स्वरूपवंत ॥ आणि गुणही उत्तम दिसत ॥ परी घटित दिसेना ॥ ४३ ॥ उपरी मंत्रिका बोलत ॥ जरी सुतालागीं न उतरे घटित ॥ तरी आमुचे नामीं घटितार्थ ॥ शोध शोधून पहावा ॥ ४४ ॥ मंत्री म्हणे जी पुरोहितें ॥ टिप्पणें आणिलीं आहेत लिखितें ॥ तरी त्यातें पाचारून संबंधातें ॥ विलोकूनि पाहिंजे ॥ ४५ ॥ मग पाचारून पुरोहितास ॥ सकळ कुमारींचीं टिप्पणें पहात ॥ तों चित्रकूटींचा नृपनाथ ॥ घटितार्थ आवडला ॥ ४६ ॥ नाम जया भुजध्वज ॥ धार्मिक प्राज्ञिक महाराज ॥ तयाची कन्या तेजःपुंज ॥ भुजावंती मिरवली ॥ ४७ ॥ रूपवंत गुणवंत ॥ तया नामीं आलें घटित ॥ मग पाचारून मंत्रिकातें ॥ तया स्थानीं पाठविलें ॥ ४८ ॥ मंत्री जाऊन चित्रकूटासी ॥ पुन्हां भेटून भुजध्वजासी ॥ वृत्तांत सांगून सकळ रायासी ॥ लग्नपत्रिका काढिली ॥४९॥ लग्नपत्रिका आणि भृत्य[२] ॥ लिहून पाठविले अर्जदास्त ॥ रायापाशीं येतांच दूत ॥ वर्तमान निवेदिती ॥ १५० ॥ लग्नपत्रिका आणि दूत ॥ पाहूनि राव संतोषत ॥ मग सरंजामीं जाऊन तेथ ॥ लग्नसोहळा उरकला ॥ ५१ ॥ मग ती कांता घेवोनि राव ॥ पाहता झाला आपुला ठाव ॥ उपरी दिवसेंदिवस थोरीव ॥ भुजावंती झालीसे ॥ ५२ ॥ त्रयोदश वर्षें व्यवस्थित ॥ भुजावंती महीं मिरवत ॥ येरीकडे सप्तदश वर्षांत ॥ कृष्णागरू मिरवला ॥ ५३ ॥ परी भुजावंती अंतःपुरांत ॥ धाम उभविलें एकांत ॥ अगम्य जितुकें रायातें ॥ तितुकें ती मिरवत ॥ ५४ ॥ असो एकांतीं भुजावंती ॥ परी सापत्नसुताची ऐकींव उक्ती ॥ होती परी दृष्टिव्यक्तीं ॥ एकमेकांतें पाहती तीं ॥ ५५ ॥ तों कोणे एके सुदिनाशीं ॥ राव गेला मृगयेसी ॥ कृष्णागरू धामासीं[३] ॥ वेधोनियां पहातसे ॥ ५६ ॥ सहज वावडी घेवोनि हातीं ॥ चित्त रंजवी खेळा निगुतीं ॥ तों येरीकडे भुजावंती ॥ धामावरी आलीसे ॥ ५७ ॥ राजकिशोर[४] पाहूनि नयनीं ॥ दृष्टी वेधली[५] सुतालागूनी ॥ तेणें वेष्टून पंचबाणीं ॥ परिचारिके बोलत ॥ ५८ ॥ म्हणे पैल धामाप्रती ॥ वावडी उडवी वाताकृती ॥ त्यातें पाचारूनि उत्तमगतीं ॥ स्वधामातें आण वेगें ॥ ५९ ॥ ऐसें ऐकून दासी वचन ॥ पाहती झाली राजनंदन ॥ रायास म्हणे तव मातेनें ॥ चित्तीं हेतू वरियेला ॥ १६० ॥ तरी महाराजा उत्तम जेठी ॥ शीघ्र चलावें तियेचे भेटी ॥ राव ऐकोनि कर्णपुटीं ॥ अवश्य म्हणे येतों कीं ॥ ६१ ॥ भवंडीदोर देत सेवकाहातीं ॥ आपण निघे सर्वज्ञमूर्ती ॥ सहज चाले सदनाप्रती ॥ जात आनंदेंकरोनियां ॥ ६२ ॥ रायें करूनि आणिलें लग्न ॥ तेव्हां गेला होता दर्शना ॥ तयासी लोटले बहुत दिन ॥ म्हणे आजि सुदिन उगवला ॥ ६३ ॥ मज आज वत्सातें माउली ॥ कोणीकडून पान्हावली ॥ तरी आज भाग्यसाउली ॥ सफळ पूर्ण झालीसे ॥ ६४ ॥ ऐसा आनंदोत्साह चित्तीं ॥ मानून जातसे नृपती ॥ सहज चालीं सदनाप्रती ॥ जावोनियां पोंचला ॥ ६५ ॥ तंव ती दारा उपरीवरी[६] ॥ येतां पाहिलें कृष्णागरीं ॥ खालीं

१ प्रधानाला. २ सेवक. ३ घरामध्यें. ४ राजपुत्र. ५ वेधली. ६ माडीवर.

उतरून शयनगुहारीं ॥ पाहती झाली वेल्हाळी ॥ ६६ ॥ शयनसदनाचें धरून द्वार ॥ उभी राहिली ती सुकुमार ॥ तों परिचारिका कृष्णागर ॥ घेऊनियां पोंचली ॥ ६७ ॥ पोंचली परी हस्तसंकेतें ॥ रायाप्रती दावी सदनातें ॥ आपुल्या घरीं दासी जात ॥ भेट करून उभयतां ॥ ६८ ॥ येरीकडे कृष्णागर ॥ चालीं चालतां गेला समोर ॥ जातांच करी नमस्कार ॥ सापत्नमाता म्हणोनि ॥ ६९ ॥ परी ती बाळा मदनबाळी ॥ वेष्टिली होती कामानळीं ॥ तेणें चित्तदरीं काजळी ॥ अज्ञानपणीं मिरवतसे ॥ १७० ॥ सुतें केला नमस्कार ॥ परी ती न वदे यावर ॥ तें पाहूनियां कृष्णागर ॥ मनामाजी चाकाटला ॥ ७१ ॥ परी निकट झालिया त्या वास ॥ येरी जाऊन धरी हस्तास ॥ म्हणे माझें तुष्ट मानस ॥ कामानळें विझवीं कां ॥ ७२ ॥ राया तव स्वरूप अर्ककांत ॥ द्रवतें झालें कामानळांत ॥ तरी चितेवीण जाळूं पहात ॥ शांत करीं महाराजा ॥ ७३ ॥ ऐसें ऐकतां तियेचें वचन ॥ राव कोपे क्रोधेंकरून ॥ म्हणे सेवून राहसी कानन ॥ सावजापरी काय वो ॥ ७४ ॥ तूं प्रत्यक्ष माझी सापत्नमाता[1] ॥ कुडी बुद्धि वरिसी चित्ता ॥ तरी या कृत्या कोण त्राता ॥ तूतें होईल पुढारा ॥ ७५ ॥ अहा स्त्रीजाती अमंगळा ॥ दुर्गमसरिता परम चांडाळा ॥ नेणें अनर्थासह बंडाळा ॥ जगामाजी वाढविती ॥ ७६ ॥ ऐसें म्हणून कृष्णागर ॥ आसडून चालिला आपुला पदर ॥ सदना येऊन खेळावर ॥ तसाच पुन्हां वहिवाटला ॥ ७७ ॥ [2]येरीकडे भुजावंती ॥ सुत ऐसें समजतां चित्तीं ॥ परम भैयाचे[3] व्याप्तीं ॥ दासीलागीं पाचारी ॥ ७८ ॥ म्हणे बाई वो झालें विघ्न ॥ प्रेम भयानक घेईल प्राण ॥ तो परपुरुष नव्हता सापत्ननंदन ॥ अर्थ ओंगळ झाला गे ॥ ७९ ॥ तरी हा झाला वृत्तांत ॥ आतां रायास करील श्रुत ॥ श्रुत झालिया प्राणघात ॥ मिरवेल सखे मम देहीं ॥ १८० ॥ तरी आतां विष घेऊन ॥ द्यावा वाटतो आपुला प्राण ॥ प्राण हरल्या सकळ कल्याण ॥ मजप्रती वाटतसे ॥ ८१ ॥ विपरीतास विपरीत करणी ॥ गुप्त राहील सकळ जनीं ॥ नातरी वांचल्या विटंबनीं ॥ नाना क्लेशां भोगावें ॥ ८२ ॥ तरी यांतच सारगोष्टी ॥ हेत मिरवावे मृत्युवाटीं ॥ नातरी वांचल्या राव शेवटीं ॥ विटंबोनि मारील गे ॥ ८३ ॥ मारिल्यास सर्व लोकांत ॥ बाई गे होईल अपकीर्त ॥ म्हणतील रांड परम कुजात ॥ भ्रष्टबुद्धि पापिणी ॥ ८४ ॥ असो ऐसा दुर्घट विचार ॥ ओढवला तरी सारांत सार ॥ गुप्तप्रकरणीं प्राणावर ॥ उदार व्हावें आपणचि ॥ ८५ ॥ ऐसी तीतें बोलतां युवती[4] ॥ सखी देईल उत्तराप्रती ॥ तें पुढिले अध्यायीं भक्तिसारग्रंथीं ॥ श्रवण करा श्रोते हो ॥ ८६ ॥ तरी हा ग्रंथ भक्तिसार ॥ तुम्हीच वदवितां मनोहर ॥ निमित्त मात्र धुंडीकुमर ॥ मालू नरहरीचा मिरवतसे ॥ ८७ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ त्रिंशतिअध्याय गोड हा ॥ १८८ ॥ अध्याय ॥ ३० ॥ ओंव्या ॥ १८८ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

१ सावत्र आई. २ इकडे. ३ भीति पावून. ४ स्त्री.

श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी जगत्पाळका ॥ जगत्पते वैकुंठनायका ॥ जगत्सृजका यदुकुळटिळका ॥ भक्तसखा तूं होसी ॥ १ ॥ [1]निखिलजीवन निर्विकारा ॥ विवेकरत्नवैरागरा ॥ शुद्धसत्वगुणगंभीरा ॥ रुक्मिणीवरदा दीनबंधो ॥ २ ॥ हे कृपार्णवा पंढरीनाथा ॥ पुढें बोलवीं भक्तिसारग्रंथा ॥ मागिले अध्यायीं अनाथनाथा ॥ जन्म चौरंगीचा करविला ॥ ३ ॥ करविला परी त्याचें कथन ॥ राहिलें तें ग्रंथीं लेखन ॥ आतां करवीं जगज्जीवन ॥ पुढें [2]वैखरीं बैसूनियां ॥ ४ ॥ तरी गताध्यायीं सापत्नमाता ॥ लोटली तीतें कामसरिता ॥ परी कृष्णागर प्राज्ञिक सुता ॥ बळेंच नेलें पाचारूनी ॥ ५ ॥ करूनि जननीचा धिक्कारू ॥ सदना गेला होता कृष्णागरू ॥ येरी सखी जीवापारू ॥ पाचारिली होती कीं ॥ ६ ॥ तिये सांगून सकल वृत्तांत ॥ प्राणघातास झाली होती [3]उदित ॥ परी ती सखी प्रज्ञावंत ॥ देत मसलत तियेसी ॥ ७ ॥ म्हणे बाई वो भुजावंती ॥ ईश्वरकरणी प्रारब्धगती ॥ जैसी असेल तैसी पुढतीं ॥ घडून येईल भिऊं नको ॥ ८ ॥ परी तूतें सांगेन हित कांहीं ॥ तैसेंचि करीं धरून जीवीं ॥ नको कष्ट मानूं आपुले देहीं ॥ शयन शयनीं करीं आतां ॥ ९ ॥ शयन शयनीं केलिया पूर्ण ॥ राव येईल पारधीहून ॥ आल्या सेवील तुझें सदन ॥ परी तूं उठूं नको कीं ॥ १० ॥ मग तो राव पुसेल तूतें ॥ तंव तूं सोंग दावीं शोकाकुलते ॥ रुदन करूनि वदें रायातें ॥ प्राणरहित होय मी ॥ ११ ॥ आतां काय ठेवून प्राण ॥ झाली नाहीं अब्रूरक्षण ॥ ऐसें बोलतां राव वचन ॥ पुढें पुसेल तुजशीं ॥ १२ ॥ पुसतां वदें कीं प्रांजळवंत ॥ कृष्णागर तुमचा सुत ॥ कामुक होऊनि मम सदनांत ॥ स्पर्शावया धांवला ॥ १३ ॥ धांवला परी यत्नेंकरून ॥ बळें दिधला मागें लोटून ॥ ऐसें होतां अनुचित प्राण ॥ कैसा ठेवूं महाराजा ॥ १४ ॥ ऐशापरी आराधून युक्तीं ॥ क्रोध उपजवीं रायचित्तीं ॥ क्रोधवश झालिया राय नृपती ॥ कलहें मुला सोडील कीं ॥ १५ ॥ मग तो कदा ना म्हणे सुत ॥ त्वरें करील प्राणरहित ॥ मग तूं सदनीं आनंदभरित ॥ सुखलाभातें सेवीं कां ॥ १६ ॥ अंगीं [4]विषतरूचा कोंब चांग ॥ खुडून टाकिल्यानें मार्ग ॥ मग तया विषाचा शरीरीं लाग ॥ कोठून होईल जननीये ॥ १७ ॥ आधीं ठेंचिल्या उरगमुख ॥ मग कैंचें मिरवेल विषदुःख ॥ कंटकीं धरिल्या [5]वृश्चिक ॥ वेदनेतें मिरवेना ॥ १८ ॥ कीं वन्हि असतां धूम्राकार ॥ वरी सांडावें लगबगें [6]नीर ॥ मग धांव सदनापार ॥ घेत नाहीं जननीये ॥ १९ ॥ तरी कृष्णागराचा [7]वसवसा ॥ तव हृदयीं मिरवे स्वबाळफांसा ॥ तरी राया सांगून ऐशिया लेशा ॥ दुःखसरिता लोटवीं ॥ २० ॥ तरी त्या उदकाचें आधीं वळण ॥ दुःखसरिते बांधावें बंधन ॥ बंधन बांधिल्या सजीवपणें ॥ सुखें पुढें मिरवीं कां ॥ २१ ॥ ऐसी सांगून ती युवती ॥ गेली आपुल्या सदनाप्रती ॥ येरीकडे भुजावंती ॥ कनकमंचकीं पहुडली ॥ २२ ॥ त्यजून अन्नोदक स्नान ॥ कैंचें शृंगार कुंकुमलेण ॥ सर्व उपचारांतें त्यजून ॥

---

१ सर्वांना आधारभूत. २ वाणीचे ठिकाणीं. ३ तयार. ४ विषारी वृक्षाचा. ५ विंचू. ६ पाणी. ७ हुरहुर. ८ आपला पुत्र म्हणून.

विन्मुख तईं पहुडली ॥ २३ ॥ तों येरीकडे शशांगर ॥ पारधी खेळून काननभर ॥ चिंताब्धीची फोडून लहर ॥ सदना तदा जातसे ॥ २४ ॥ नाना गजरें यंत्रस्थित ॥ चमूअब्धीचा लोट लोटीत ॥ क्षेत्रपातीं पूर्ण भरित ॥ चमूतोयें तेधवां ॥ २५ ॥ यावरी राव तो पूर्ण ज्ञानी ॥ संचार करी आपुले सदनीं ॥ दृष्टीसमोर न देखतां राणी ॥ परिचारिके विचारीतसे ॥ २६ ॥ म्हणे कोठें आहे भुजावंती ॥ सन्मुख कां न आली पारधीप्रती ॥ आजि चुकुर होऊनि चित्तीं ॥ निंबलोणा नातळली ते ॥ २७ ॥ रायातें बोलती परिचारिका ॥ हे महाराजा सद्विवेका ॥ आजि राणी कवण दुःखा ॥ दुखावली कळेना ॥ २८ ॥ तेणेंकरून शयनपाटीं ॥ निजली आहे होऊन कष्टी ॥ होतांच शब्द कर्णपुटीं ॥ सदनामाजीं संचरला ॥ २९ ॥ तों ती मंचकीं भुजावंती ॥ राव देखून बोले युक्तीं ॥ म्हणे कां हो कवण अर्थी ॥ शयन केलें जिवलगे ॥ ३० ॥ परी तईं उत्तरा न दे ती ॥ कांहींच न बोले रायाप्रती ॥ जीवन आणून नेत्रपातीं ॥ अश्रु ढाळी ढळढळां ॥ ३१ ॥ तें पाहूनियां राव दयाळ ॥ चित्तीं दाटला मोहें केवळ ॥ मंचकीं बैसे उतावेळ ॥ हृदयीं धरी कांतेतें ॥ ३२ ॥ अश्रुधारा नेत्रपातीं ॥ राव पुसी स्वयें हस्तीं ॥ चुंबन घेऊन लालननीतीं ॥ अंकावरी बैसवीतसे ॥ ३३ ॥ अंकीं बैसवोनि स्वदारारत्न ॥ हेम जडावया करी यत्न ॥ राव कोंदणीं हाटकप्रयत्न ॥ अर्थरत्ना जोडीतसे ॥ ३४ ॥ म्हणे सखये सुखसरिते ॥ कोठून भेदलें गढोळ चित्तीं ॥ दुःखघनाचा वर्षाव अमित ॥ कोणें केला तो सांग ॥ ३५ ॥ मी राव महीचा भूप ॥ मी बोलणारा दर्पसर्प ॥ ऐशा व्याघ्राचा करोनि लोप ॥ दिधलें माप दुःखाचें ॥ ३६ ॥ तरी ती कवण पुरुष नारी ॥ तूतें अन्य झाली भारी ॥ तरी मातें बोलून वैखरीं ॥ निमित्तमात्र दावीं कां ॥ ३७ ॥ अगे सहज दिटवा होतें ॥ दावीन त्यातें अर्कसुत ॥ या बोलाची सहज भ्रांत ॥ मानूं नको जिवलगे ॥ ३८ ॥ अगे प्रिय तूं मातें असससी ॥ कोण गांजील उद्देशीं ॥ हरिबाळातें जंबुकलेशीं ॥ दुःखदरी मिरवेना ॥ ३९ ॥ अगे मशकाचेनि पाडा ॥ धडकें उतरे गिरीचा कडा ॥ कीं रामरक्षे भूतवडा ॥ रक्षणिया बैसतसे ॥ ४० ॥ तेवीं तूं माझी पट्टराणी ॥ कोण घालूं शके काचणी ॥ नाम दर्शवीं प्रांजळपणीं ॥ मग ऊर्वी न ठेवीं तयातें ॥ ४१ ॥ ऐसें ऐकतां राववचन ॥ हृदयीं तोषली अर्थार्थी सघन ॥ म्हणे महाराजा तव नंदन ॥ भ्रष्टबुद्धि व्यापिला ॥ ४२ ॥ आपण गेलिया पारधीसीं ॥ एकांत पाहून मम उद्देशीं ॥ येथें येऊन स्मरलेशीं ॥ हस्त माझा धरियेला ॥ ४३ ॥ धरिला परी निर्दयवंतें ॥ कामें ओढिता झाला हस्त ॥ म्हणे चलावें एकांतांत ॥ सुखसंवाद भोगावा ॥ ४४ ॥ मग म्यां पाहून कामिकवृत्ती ॥ हात आंसडून घेतला निगुतीं ॥ भयार्थ मानून आपुले चित्तीं ॥ सदनामाजी पावलें ॥ ४५ ॥ पळतां कोण झाली अवस्था ॥ उलथून पडलें महीवरती ॥ परी म्यां धरून तैशीच शक्ती ॥ आड कवाड पैं ॥१॥

१ पलंगावर. २ पाणी. ३ हाटक=सोनें. ४ वाणीनें. ५ दृष्टीनें पाहिलें असतां. ६ मोती. ७ कामातुर होऊन. ८ विषयातुरता.

केलें ॥ ४६ ॥ मग तो छलबलत्वहीन ॥ होऊन पाहे आपुलें सदन ॥ तस्मात् आतां आपुला प्राण ॥ ठेवीत नाहीं महाराजा ॥ ४७ ॥ भलतैसिया गरळांत ॥ घेऊन करीन प्राण मुक्त ॥ परी धैर्य वरिलें तुम्हांकरितां ॥ तुमचा मुखेंदु पहावा ॥ ४८ ॥ मज वाटलें पारधीचें कानन ॥ अति तीव्र कर्कश भयाण ॥ त्यांतून तुम्ही जीवंतपणें ॥ कैसे याल वाटलें ॥ ४९ ॥ ऐसेपरी धुसधुशीत ॥ संचार होतां हृदयांत ॥ म्हणोनि महाराजा येथपर्यंत ॥ प्राण देहीं रक्षियेले ॥ ५० ॥ आतां याचि बोलापाठीं ॥ मी चकोर देहीं चंचुपुटीं ॥ तव आननेंदूचें जीवन शेवटीं ॥ लक्षून तुष्ट झालें असें ॥ ५१ ॥ ऐसें बोलतां भुजावंती ॥ परम क्रोधावला नृपती ॥ परी क्रोध नव्हे क्षितीं[2] ॥ वडवानलचि पेटला ॥ ५२ ॥ वडवानल तरी कैसा ॥ शिखा मिरवी अंबरलेशा ॥ सुतरत्नालागीं कैसा ॥ ग्रासूं पाहे क्षणांत ॥ ५३ ॥ मग तैसाच येऊन सदनाबाह्ये[3] ॥ आरक्त नेत्रीं भंवता पाहे ॥ म्हणे कोणी तरी येथें आहे ॥ पुढें यावें माझिया ॥ ५४ ॥ तंव ते भृत्य धांवत येती ॥ भृत्य नव्हे ते कृतांत दिसती ॥ राव वरूनि क्रोधरीती ॥ स्वतां त्यांतें लोटीतसे ॥ ५५ ॥ म्हणे भृत्य हो याच पावलीं ॥ जाऊनि मम सुताची करा होळी ॥ अथवा बंधन करूनि हस्तवेली ॥ खंडोनियां टाकाव्या ॥ ५६ ॥ ऐसें बोले नृपनाथ ॥ दूत धांवती वाताक्रत ॥ सदन वेढून राजसुत ॥ मृत्युमहीं नेलासे ॥ ५७ ॥ परी ते सेवक ज्ञानखाणी ॥ पुनः जाती राजांगणीं ॥ म्हणती महाराजा मृत्युभुवनीं ॥ कृष्णागरू पैं नेला ॥ ५८ ॥ राव क्रोधें तयां पहात ॥ म्हणे हस्तपादांतें करा खंडित ॥ पुनः येवोन सांगत ॥ धांवधांवोनि रायातें ॥ ५९ ॥ तरी रायाचा कोपानळ[4] ॥ कदा न होय शीतळ ॥ पुनः पाहोन दूतमेळ ॥ तीच आज्ञा आज्ञापी ॥ ६० ॥ परी ते भृत्य देहस्थितीं ॥ म्हणती हा स्वामी राजसुत ॥ यासी वधितां काय अनर्थ ॥ कैसा होईल कळेना ॥ ६१ ॥ ऐसे संदेहें भयस्थित ॥ पुनः जाती राजांगणांत ॥ परी तो राव अति संतप्त ॥ तीच आज्ञा आज्ञापी ॥ ६२ ॥ मग ते दूत निष्ठुरपणीं ॥ चौरंग आणिती कनककोंदणीं ॥ तयालागीं बैसवोनी ॥ कार्यावर्ती वहिवटले ॥ ६३ ॥ शुद्ध चव्हाटें बांधोन हस्त ॥ तदा नेत कृष्णागरातें ॥ म्हणती बंधनसिद्ध केले हस्त ॥ खंडविखंड करावया ॥ ६४ ॥ परी कृष्णागर चव्हाटां नेला ॥ हा वृत्तांत सकळ ग्रामांत कळला ॥ मग चुंगारचुंगार मेळा ॥ विलोकावया धांवती ॥ ६५ ॥ येरीकडे राजांगणीं ॥ मिळाले थोर प्राज्ञी ॥ परी नृपतीचा क्रोधाग्नी पाहुनी ॥ बोलों न शकती कदाचित ॥ ६६ ॥ तरी वृत्तीचा क्रोधानल ॥ लोकबोलाचें सुभद्रजल ॥ प्राशनें भेणें उतावेळ ॥ धांव मार्गे घेतसे ॥ ६७ ॥ येरीकडे चव्हाटेंशीं ॥ कनकचौरंगीं राजसुतासी ॥ दूतीं बैसवोन हस्तपादांसी ॥ योजिते झाले छेदावया ॥ ६८ ॥ शस्त्र करूनियां नग्न त्वरित ॥ एकें घायाळ केले हस्त ॥ तैसेच झाले चरण व्यक्त ॥ भग्न होऊनि पडियेला ॥ ६९ ॥ एकचि आकांत वर्तला तेथें ॥ कोणी कोणा न विचारी जेथें ॥ पाहून सकळ संग्रामातें[5] ॥ भयभीत संपूर्ण ॥ ७० ॥ उपरी

१ विषांत. २ पृथ्वीवर. ३ घराबाहेर. ४ क्रोधाग्नि. ५ अनेक जनांचे थवे.

योजून पद निगुतीं ॥ तीक्ष्णधारा शस्त्रें हाणिती ॥ तींही एका घायें क्षितीं ॥ पदकमलीं पडियेलीं ॥ ७१ ॥ मग रुधिराचा[1] भडभडाट ॥ महीं लोटला अपार लोट ॥ जेवीं युवतिकुंकुममळवट ॥ तेवीं धारा शोभली ॥ ७२ ॥ परी राव तो कृष्णागर ॥ मूर्च्छेनें व्यापूनि तीव्र ॥ कनकासनीं चौरंगावर ॥ उलथोनियां पडियेला ॥ ७३ ॥ प्राण होऊनि कासावीस ॥ मुखावरी दाटला फेंस ॥ उपरी कोरड पडली मुखास ॥ श्वेतनयन पैं केले ॥ ७४ ॥ मग तें दुःख पाहूनि लोक ॥ दुःखानें करिती महाशोक ॥ अहा कृष्णागरा-सारिखें माणिक ॥ व्यर्थ रायें भंगिलें ॥ ७५ ॥ एक म्हणती म्हातारपणीं ॥ राव चळला आहे प्राज्ञी ॥ ऐसा पुत्र लावण्यखाणी ॥ नष्ट केला पदवीचा ॥ ७६ ॥ तरी राजा परम भ्रष्ट ॥ झाला आहे निर्दय नष्ट ॥ आतां येथें राहतां उत्कृष्ट ॥ योग्य कांहीं दिसेना ॥ ७७ ॥ सहज प्रपंचाचे पाउलीं ॥ पडतसे आड पाउली ॥ परी रायें हृदयीं क्षमा न केली ॥ घात करील कधीं तो ॥ ७८ ॥ अहा एकुलता एक बाळ ॥ त्यावरी पाखडिला क्रोधानळ ॥ मग प्रजान्याया कैसा शीतळ ॥ वृद्ध राव राहील हा ॥ ७९ ॥ एक म्हणे राजनीती ॥ तैशीच आहे सर्व क्षितीं[2] ॥ गृहीं दाविली क्रोधसंपत्ती ॥ धाक पडेल प्रजेतें ॥ ८० ॥ एक म्हणे भ्रष्ट कृष्णागर ॥ कुबुद्धि धरिली मातेवर ॥ तैं शिक्षा पावला साक्षात्कार ॥ राया दोष न लागेचि ॥ ८१ ॥ गौपीडक[3] व्याघ्र असला ॥ तरी कां मारूं नये त्याला ॥ तरी रायानें धर्म पाळिला ॥ लोभ धरिला नाहीं कीं ॥ ८२ ॥ वृश्चिक होतां दृष्टिव्यक्त[4] ॥ तरी कां करूं नये प्राणांत ॥ दुष्ट आहे कीं धुसधुसीत ॥ मारूं नये कीं त्याला ॥ ८३ ॥ ऐशा नानापरी युक्तीं ॥ तर्कवितर्क जग बोलती ॥ अपार मेळा चवाट्याप्रती ॥ मिळाला असे लोकांचा ॥ ८४ ॥ त्यांत सहजासहज गमन ॥ गोरक्ष मच्छिंद्र उभय जाण ॥ करीत आले चव्हाटेकारणें ॥ तों अपार मेळा देखिला ॥ ८५ ॥ सोडूनि गर्भाद्रिपर्वतातें ॥ न्यावें भेटीस मच्छिंद्रातें ॥ घेऊन जातां गोरक्षनाथ ॥ आले होते त्या ठायीं ॥ ८६ ॥ आले परी सहजचालीं ॥ नगरदीक्षेची कामना फिरली ॥ म्हणोन पाहतां व्यवहारपाउलीं ॥ येवोन तेथें धडकले ॥ ८७ ॥ धडकले परी अपार मेळ ॥ पाहून त्यांत संचरले गोरबाळ ॥ तों कृष्णागर होऊनि विकळ ॥ कनकचौरंगीं पडियेला ॥ ८८ ॥ मग मच्छिंद्रातें पाचारून ॥ दाविता झाला गोरनंदन ॥ जळचरसुतें पाहून ॥ परम चित्तीं द्रवलासे ॥ ८९ ॥ परी त्याचा अन्याय काय ॥ लोकांपाशीं पुसों जाय ॥ क्षण स्थिर करूनि हृदय ॥ करणी विलोकी बाळाची ॥ ९० ॥ तों सहज अंतरीं दृष्टी करितां ॥ त्या समजली तयाची माता ॥ आणि कृष्णागरासी वरता ॥ अवतारदक्ष आढळला ॥ ९१ ॥ ऐसा शोध शोधिल्या चित्तीं ॥ मग क्रोधें दाटले तपोगभस्ती ॥ म्हणे अहो हे रांड शक्ती ॥ प्रविष्ट झाली ॥२॥
लोकांत ॥ ९२ ॥ परी तो आहे मूर्ख राय ॥ चित्तीं योजितां न ये न्याय ॥ बाळावरी तिनें घाय ॥ कोपशस्त्रीं योजिला ॥ ९३ ॥

१ रक्ताचा. २ पृथ्वीवर. ३ गाईंना पीडा देणारा. ४ नजरेस पडला असतां.

तरी ऐसा बुद्धिभ्रष्ट ॥ विषयलोभी अति वरिष्ठ ॥ महीं नसावा महाभ्रष्ट ॥ महीभार आगळा ॥ ९४ ॥ लागून कांतेच्या बुद्धिसंगतीं ॥ बाळालागीं केली आर्ती ॥ तस्मात् राव विषयभक्ती ॥ ठेवूं नये महीशीं ॥ ९५ ॥ ऐसें चित्तीं धरून तेथून ॥ उभय निघाले मंडळांतून ॥ मग गोरक्षा सकळ खूण ॥ निवेदिली रायाची ॥ ९६ ॥ सकळ गोरक्षा निवेदन होतां ॥ तोही आपुले हृदयीं पाहतां ॥ पाहून म्हणे गुरुनाथा ॥ याचें नांव रंगातें आणावें ॥ ९७ ॥ कृष्णागर तो चौरंगीं व्यक्त ॥ म्हणोनि चौरंगी बोलला नितांत ॥ कृष्णागर हें नाम महींत ॥ नाहीं म्हणोन वदलासे ॥ ९८ ॥ आणि हस्तपादादि सकळ ॥ एका चौरंगीं झाले सकळ ॥ म्हणोनि चौरंगी गोरबाळ ॥ सहजस्थितीं वदलासे ॥ ९९ ॥ असो गोरक्ष मच्छिंद्रातें ॥ म्हणे राजसदना जाऊं त्वरितें ॥ मागून घ्यावें चौरंगातें ॥ नाथपंथीं मिरवावया ॥ १०० ॥ मच्छिंद्र म्हणे कर्मशासन ॥ रावराणींतें दुःख दाऊन ॥ मग न्यावा शिवनंदन ॥ नाथपंथीं मिरवावया ॥ १ ॥ गोरक्ष म्हणे हो नोहे ऐसें ॥ नेऊं आधीं चौरंगास ॥ पूर्णपणीं नाथपंथास ॥ विद्यार्णव करावा ॥ २ ॥ मग तयाचेचि हातीं ॥ रायास दावावी प्रतापशक्ती ॥ आणि त्या रांडे चासुंडेप्रती ॥ ओपणें तें ओपावें ॥ ३ ॥ तरी आतां सौम्य उपचार ॥ राया करूं वाग्युत्तर ॥ मागून घ्या स्नेहपरिवार ॥ चौरंगीतें महाराजा ॥ ४ ॥ ऐसी गोरक्ष बोलतां वाणी ॥ अवश्य म्हणे मच्छिंद्रमुनी ॥ मग उभयतां राजसदनीं ॥ प्रविष्ट जाहले महाराजा ॥ ५ ॥ पुढें धाडून द्वाररक्षक ॥ श्रुत करविलें नांव दोंदिक ॥ कीं मच्छिंद्र गोरक्षक तैंपोनायक ॥ भेटीस येती महाराजा ॥ ६ ॥ रायें ऐकोन ऐसें नाम ॥ मनीं उचंबळे भावार्थप्रेम ॥ मनांत म्हणे योगद्रुम ॥ वंद्य असती हरिहरां ॥ ७ ॥ परी मम दैवार्णवा सुफळबोध ॥ मच्छिंद्रकृपेचा वोळला मेघ ॥ ऐसें म्हणून लागवेग ॥ कनकासन सांडिलें ॥ ८ ॥ सम्यक सामोरा होऊन नृपती ॥ दृष्टीं देखतां मच्छिंद्रजती ॥ भाळ ठेवूनि चरणावरती ॥ आलिंगीतसे प्रेमानें ॥ ९ ॥ म्हणे महाराजा अज्ञानभंगा ॥ अज्ञानपतिता बोधली गंगा ॥ वळून धीर पावल्या संगा ॥ कुशब्दपाप नाशील ॥ ११० ॥ ऐसें म्हणोन राव पुढतीं ॥ नमिता झाला गोरक्षाप्रती ॥ भाळ ठेवून चरणांवरती ॥ सभेस्थानीं आणिलें ॥ ११ ॥ बैसवून कनकासनीं ॥ षोडशोपचारें पूजिले मुनी ॥ उपरी उभय जोडूनि पाणी ॥ उभा राहिला सन्मुख ॥ १२ ॥ म्हणे महाराजा योगद्रुमा ॥ तुमचे चरणीं असे मम प्रेमा ॥ दर्शन दिधलें भक्तिउगमा ॥ मम अभक्ताकारणें ॥ १३ ॥ तरी आतां कामशक्तीं ॥ वेध कोणता सांगा जती ॥ जेवीं ऋतुकालद्रुमाप्रती ॥ फळें येतील तैशींच ॥ १४ ॥ तरी चिच्छक्तिउल्हासपणें ॥ अर्थ दावा मजकारण ॥ ते त्यावरी कामना पावन ॥ तुष्ट होईल महाराजा ॥ १५ ॥ ऐसें बोलतां नरेंद्रपाळ ॥ मच्छिंद्रचित्तद्रुमाचें फळ ॥ शब्दचातुर्यलापिका रसाळ ॥ चौरंगभावीं निघालें ॥ १६ ॥ म्हणे महाराजा नरेंद्रोत्तमा ॥ एक काम वेधला आम्हां ॥ आज

१ पृथ्वीवर. २ मोठा. ३ तपस्वी. ४ प्राप्त झाला. ५ मस्तक. ६ हात. ७ राजा. ८ इच्छा.

तुमच्या कौंडण्यग्रामा ॥ शासनीं बाळ विलोकिला ॥ १७ ॥ राया तिष्ठतां तव कोपाग्न ॥ तयाचे हस्तपाद केले भग्न ॥ तो तरी तुमचा अन्यायी उत्तम ॥ आम्हांलागीं ओपावा ॥ १८ ॥ राव ऐशी ऐकून मात ॥ हृदयीं गदगदोनि हांसत ॥ म्हणे महाराजा योगी समर्थ ॥ काय त्या कराल नेवोनी ॥ १९ ॥ म्हणाल करील सेवाभक्ती ॥ तरी भग्न झाला पदहस्तीं ॥ तरी त्या पंथ गमाया शक्ती ॥ कांहींएक दिसेना ॥ १२० ॥ तुम्हीच वाहोनियां आपुल्या स्कंधीं ॥ वागवाल कीं कृपानिधी ॥ तो स्वामी तुम्ही सेवकबुद्धी ॥ आचराल कीं महाराजा ॥ २१ ॥ यावर बोले मच्छिंद्रनाथ ॥ तो सत्यपणें शक्त कीं अशक्त ॥ इतुकें वद कीं आमुचे अर्थ ॥ कासया तूं पहाशी ॥ २२ ॥ ऐसें बोलतां मच्छिंद्रजती ॥ अवश्य म्हणे शशांगरनृपती ॥ घेऊन जावें आवडल्या चित्तीं ॥ सिद्धसंकल्प महाराजा ॥ २३ ॥ ऐसें बोलतां धरापाळ ॥ उठोनि आले तत्काळ ॥ परोपकारी अति कनवाळ ॥ चौरंगापाशीं पातले ॥ २४ ॥ कनकचौरंगीं सधीर युक्त ॥ तैसाच उचलिला महीभुवसुत ॥ नेऊनि आपुले शिबिरांत[2] ॥ हस्तपाद तळविले ॥ २५ ॥ येथें श्रोते कल्पना घेती ॥ निर्जीवास सजीव करितो जती ॥ तेणें चौरंगीहस्तपादांप्रती ॥ स्नेहकढयीं कां तळविलें ॥ २६ ॥ निर्जीव पुतळा नृत्य करीत ॥ तेथें मिरवले गहिनीनाथ ॥ मग हस्तपादनिमित्त ॥ काय अशक्य झालें तें ॥ २७ ॥ तरी कवि म्हणे पुढील कारण ॥ होतें म्हणोनि मच्छिंद्रानें ॥ लोहकढयीं द्विमूर्धानें[3] ॥ स्नेहीं तळले पदहस्त ॥ २८ ॥ तूतें करोनि दुःखाचें शमन ॥ पुढें पहा म्हणती नेमानेम ॥ समान उत्तमोत्तम ॥ फळा मिरवूं ययासी ॥ २९ ॥ ऐसा विचार करून चित्तीं ॥ तळों लागले पदहस्ती ॥ मग तेथें राहोनि एक राती ॥ पुढें गमती महाराजा ॥ १३० ॥ चौरंगी स्कंधीं वाहून ॥ मार्गे गमीतसे गौरनंदन ॥ मग ग्राम पाहूनि निघून ॥ बद्रिकाश्रमीं पातले ॥ ३१ ॥ शीघ्र जावोनि शिवालयांत ॥ भावें वंदिला उमाकांत[4] ॥ उपरी चौरंगी ठेवून तेथ ॥ काननांत संचरले ॥ ३२ ॥ काननीं हिंडतां तेथ पाहीं ॥ तों एक गव्हर देखिलें महीं ॥ देखतां विसरती तयाठायीं ॥ गुहागृहामाझारी ॥ ३३ ॥ तंव तें गव्हर परम गोमट ॥ पाहूं बोलती प्रताप सुभट ॥ म्हणती चौरंगीनिश्चयतुळवट ॥ येथें कसून पहावा ॥ ३४ ॥ पाहावें तरी कैसे रीतीं ॥ मग काय करिते झाले जती ॥ एक शिळा विस्तीर्णशक्ती ॥ गोरक्षनाथें आणिली ॥ ३५ ॥ आणिली परी गुहागृहांत ॥ उचलून वरल्या जमिनींत ॥ शस्त्र अस्त्र जल्पून तेथें ॥ अंधारव्यक्त केलेंसे ॥ ३६ ॥ ऐसें कृत्य करून तेथें ॥ पुन्हां परतोनि आले नाथ ॥ स्कंधीं वाहून चौरंगीतें ॥ पुन्हां परतून गेले त्या ठायीं ॥ ३७ ॥ तेव्हां गृहद्वारासमीप ॥ तरू एक होता विशाळरूप ॥ तयाखालीं प्रतापदीप ॥ सावलींत बैसले ॥ ३८ ॥ बैसले परी गोरक्षासी ॥ मच्छिंद्र म्हणे भावउद्देशीं ॥ त्वां अनुग्रह चौरंगासी ॥ याच ठायीं ओपावा ॥ ३९ ॥ ऐसें बोलतां मच्छिंद्रनाथ ॥ गोरक्ष वदतसे



१ राजा. २ छावणीमध्यें. ३ अग्नीच्या योगेंकरून. ४ श्रीशंकर.

उत्तरातें ॥ मम अनुग्रह तपाश्रित ॥ लाभ होतसे महाराजा ॥ १४० ॥ तरी चौरंगीचें अनुष्ठान ॥ पूर्णस्वरूपी मी पाहीन ॥ मग प्रसन्न-चित्तें देईन ॥ अनुग्रह महाराजा ॥ ४१ ॥ ऐसें बोलतां वरदउक्ती ॥ मच्छिंद्र म्हणे बरवी नीती ॥ तरी याच ठायीं चौरंगीप्रती ॥ तपालागीं स्थापावा ॥ ४२ ॥ ऐसें म्हणून गोरक्षासी ॥ पुसता झाला चौरंगासी ॥ हे बाळा तूं पूर्ण तपासी ॥ बसतोस कीं या ठाया ॥ ४३ ॥ यावरी बोले चौरंगनाथ ॥ मी मान्य तुमचे कर्तव्यांत ॥ जेथें ठेवाल राहीन तेथ ॥ सांगाल करीन तैसेंचि ॥ ४४ ॥ परी एक मागणें आहे येथें ॥ तुम्हीं जावें कोण्या देशातें ॥ परी प्रतिदिनीं माझा हेत ॥ कूर्मदृष्टीं रक्षावा ॥ ४५ ॥ इतुकें मातें दिधल्यास दान ॥ सकळांत माझें कल्याण ॥ दिवसानुदिवस माझें स्मरण ॥ तव धवळारीं पाळावें ॥ ४६ ॥ तुम्हांस होतां माझें स्मरण ॥ त्या कृपें होईल माझें पोषण ॥ जैसें कूर्म दृष्टीकरून ॥ बाळालागीं पोषीतसे ॥ ४७ ॥ ऐसें बोलतां चौरंगनाथ ॥ उभय झाले [१]तोषवंत ॥ मग उचलोन गुहागृहांत ॥ चौरंगीतें ठेविलें ॥ ४८ ॥ ठेविलें परी त्यास सांगती ॥ बा रे ऊर्ध्व करीं कां दृष्टीप्रती ॥ शिळा सुटक दिसे [२]क्षितीं ॥ पडेल वरती तुज राया ॥ ४९ ॥ परी आपुले प्रसादेंकरून ॥ तूतें देतों एक वरदान ॥ दृष्टी याज-वरून ॥ काढूं नको कदापि ॥ १५० ॥ जरी दृष्टी किंचित चुकुर ॥ होतां पडेल अंगावर ॥ मग प्राण सोडून जाईल शरीर ॥ चूर्ण होशील रांगोळी ॥ ५१ ॥ मग पुढील कार्य साधेपर्यंत ॥ सकळ राहिले नरदेहांत ॥ तरी जतन करून शरीरांत ॥ हित आपुलें जोडीं कां ॥ ५२ ॥ मग एक मंत्र सांगून कानीं ॥ म्हणे करीं याची सदा घोकणी ॥ येणेंचि सर्व तपालागुनी ॥ प्राप्त होसील पाडसा ॥ ५३ ॥ मग गोरक्ष जाऊन उत्तम फळातें ॥ तया सामोरें आणून ठेवीत ॥ म्हणे हें फळ भक्षून निश्चितें ॥ पूर्ण तपा आचरीं कां ॥ ५४ ॥ परी आणिक राया तूतें ॥ दृष्टी रक्षावी जीवित्वनिमित्तें ॥ मंत्र जपावा तपोअर्थे ॥ फळें भक्षावीं [३]क्षुधेसी ॥ ५५ ॥ ऐसी [४]त्रिविधा गोष्टी तूतें ॥ सांगितली परी रक्षीं जीवातें ॥ तों आम्ही लवकर करून तीर्थातें ॥ तुजपासीं येऊं कीं ॥ ५६ ॥ ऐसें सांगून चौरंगासी ॥ बाहेर निघे गोरक्षेंसीं ॥ शिळा लावून गुहाद्वारासीं ॥ बंधन केलें दृष्टोत्तर ॥ ५७ ॥ याउपरांतीं तपाचार-शक्ती ॥ चामुंडा स्मरला आपुले चित्तीं ॥ तंव त्या स्मरतां येऊन क्षितीं ॥ गोरक्षातें भेटल्या ॥ ५८ ॥ म्हणती महाराजा योगोत्तमा ॥ कामना उदेली कोण तुम्हां ॥ तैसाच अर्थ सांगून आम्हां ॥ स्वार्थालागीं मिरविजे ॥ ५९ ॥ येरी म्हणे हो शुभाननी ॥ मम प्राण आहे या स्थानीं ॥ तरी तयाच्या क्षुधेलागुनी ॥ नित्य फळें ओपावीं ॥ १६० ॥ आणावीं परी गुप्तार्थ ॥ फळें ठेवावीं त्या नकळत ॥ शिळे उचलून जावें त्वरित ॥ नित्य फळें [५]ओपावीं ॥ ६१ ॥ ऐसें सांगून चामुंडेसी ॥ चालते झाले तीर्थवासी ॥ सहज चालीं चालतां महीसीं ॥ गिरनारपर्वतीं पोंचले ॥ ६२ ॥ येरीकडे चामुंडा सकळ ॥ उत्तम आणून देती फळ ॥ शिळा उचलून उतावेळ ॥ कान-

---

१ संतुष्ट. २ जमिनीवर. ३ भुकेकरितां. ४ तीन प्रकारांनीं. ५ द्यावीं.

नांत सांडिती ॥ ६३ ॥ सांडिती परी कैसे रीतीं ॥ गुप्त सेवा करून जाती ॥ परी चौरंगी महाजती ॥ शिळाभयें दाटला ॥ ६४ ॥ मनांत म्हणे गुरुवचन ॥ कीं शिळा घेईल तुझा प्राण ॥ म्हणोन दृष्टीं याकारण ॥ अखंडित रक्षावें ॥ ६५ ॥ ऐसी भावना आणून चित्तीं ॥ दृष्टी ठेवी शिळेप्रती ॥ मुखीं नाम मंत्रउक्ती ॥ आराधीत सर्वदा ॥ ६६ ॥ परी त्या शिळेच्या भयेंकरून ॥ खाऊं विसरला फळाकारण ॥ किंचित वायूचें होतां गमन ॥ तोचि आहार करीतसे ॥ ६७ ॥ शिळेवरती सदा दृष्टी ॥ परी ऊर्ध्वभागीं ओपिली दृष्टी ॥ अंग हालवेना महीपाठीं ॥ अर्थ कांहीं चालेना ॥ ६८ ॥ जरी करावें चलनवलन ॥ नेणों दृष्टीसी चुकुरपण ॥ झालिया शिळा घेईल प्राण ॥ म्हणोन न हाले ठायातें ॥ ६९ ॥ फळ ज़री चांचपून घ्यावें हातीं ॥ नेणों तिकडे जाय अवचितीं ॥ चित्त गेलिया इंद्रियें समस्तीं ॥ तयामागें धांवती ॥ १७० ॥ मग चित्त बुद्धि अंतःकरण ॥ हे तों ऐक्य असती तिघे जण ॥ फळ स्पर्शितां भावनेकरून ॥ भ्रष्ट होतील सर्वस्वें ॥ ७१ ॥ मग मंत्ररूपें स्मरणशक्ती ॥ आबुद्ध वरील माझी मती ॥ म्हणोन सांडिलें फलप्राप्ती ॥ योगाहूनि लक्षीतसे ॥ ७२ ॥ ऐशी उभयतां कांचणी करून ॥ आटत चालिले रुधिरप्राण ॥ परी तें रुधिर मांस लक्षून ॥ आटत आहे तंव सत्य ॥ ७३ ॥ रुधिर मांसालागूनि भक्षीत ॥ भक्षून उदकमय करीत ॥ शेवटीं चित्तास हरीत ॥ भक्षण करीतसे निरंशः ॥ ७४ ॥ चित्ता आटिलें सकळ रुधिर ॥ पैं शरीर उरलें अस्थिपंजर ॥ वरी उगवली त्वचा त्यावर ॥ गत्रसगीपरी विराजे ॥ ७५ ॥ जोंवरी शरीरीं असे प्राण ॥ तोंवरी अस्थि त्वचा प्राण ॥ प्राण भंगल्या भंग जाण ॥ सर्वत्रांसी माहिती ॥ ७६ ॥ नाडी त्वचा अस्थी ॥ चौरंगीं उतरल्या देहाप्रती ॥ सूक्ष्म शरीरीं आपण भूतीं ॥ त्रासूनियां पळाले ॥ ७७ ॥ मग तो देह काष्ठासमान ॥ बोलारहित चलनवलनहीन ॥ ऐसें पाहून बाळ तान्हें ॥ वारुळ वरी रचियेलें ॥ ७८ ॥ मग तितुक्या दृष्टी हरल्याप्रती ॥ मुखीं ध्वनी मंत्रशक्ती ॥ तितुकें उरे मग निश्चितीं ॥ जिकडे तिकडे झालीसे ॥ ७९ ॥ ऐसेपरी चौरंगीतें ॥ झालें आहे निज-देहातें ॥ यावरी पुढील स्वार्थें ॥ पुढील अध्यायीं ऐका तें ॥ १८० ॥ तरी हा ग्रंथ नवरत्नहार ॥ आणि वैडूर्य स्वतेजापर ॥ तुम्हां श्रोतियां शृंगार ॥ धुंडीसुत अर्पीतसे ॥ ८१ ॥ नरहरिवंश मालूतें ॥ मालू नरहरीचा शरणागत ॥ तो हा भक्तिपूर्वक ग्रंथ ॥ श्रोतियांतें संकल्पिला ॥ ८२ ॥ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागार ॥ सदा परिसोत श्रोते चतुर ॥ एकत्रिंशाध्याय गोड हा ॥ १८३ ॥ ॥ अध्याय ॥ ३१ ॥ ॥ ओंव्या ॥ १८३ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ छ ॥

१ अकस्मात्. २ रक्त. ३ हाडें.



## ॥ नवनाथभक्तिसार एकत्रिंशाध्याय समाप्त ॥

# अध्याय ३२वा












श्रीगणेशाय नमः ॥ जयजय जगदुद्धारा ॥ जगदाश्रिता रुक्मिणीवरा ॥ दीनबंधो दयासागरा ॥ वीरा सुरवर तूं एक ॥ १ ॥ तरी ऐसा प्रभु समर्थ सर्वां ॥ सुरवरांप्रती जैसा मघवा[1] ॥ तरी आतां कृपार्णवा ॥ ग्रंथादरीं येईं कां ॥ २ ॥ मागिले अध्यायीं कथन ॥ चौरंगी बैसे तपाकारण ॥ उपरी गोरक्ष मच्छिंद्रनंदन ॥ गिरनारगिरीं पोंचले ॥ ३ ॥ पोंचले परी आनंदभरित ॥ प्रेमें वंदिला मच्छिंद्रनाथ ॥ पुढें पाहतांच अत्रिसुत ॥ आनंदडोहीं बुडाला ॥ ४ ॥ मच्छिंद्रातें कवळून हृदयीं ॥ म्हणे माझी आलीस गे आई ॥ चक्षु मीनले[2] तुझे ठायीं ॥ मार्ग पाहें पाडसापरी ॥ ५ ॥ जैसें इंदूचें[3] आगमन ॥ तिकडेच हेलावे[4] समुद्रजीवन ॥ तेवीं तुझे मार्गेंकरून ॥ चक्षू वेधले माझे बा ॥ ६ ॥ तरी आतां असो कैसें ॥ माझें मला भेटलें पाडसें ॥ तरी वत्सा सांडूनि आम्हांस ॥ जाऊं नको पुढारां ॥ ७ ॥ ऐसी धृति वृत्ति मती ॥ ऐक्य झाली उभयव्यक्ती ॥ जैसें जळ जळाप्रती ॥ ऐक्य होय मेळवितां ॥ ८ ॥ मग नाना गोष्टी विचारप्रसंग ॥ तीर्थगमनादि योग-संयोग ॥ दुःखसुखादि सकळ प्रयोग ॥ एकमेकां निवेदिले ॥ ९ ॥ आसन वैसन[5] भोजन शयनीं ॥ सदा सन्निध मच्छिंद्रमुनी ॥ जैसे अर्भका तान्हुले मनीं ॥ माय नातळती होईना ॥ १० ॥ ऐसे मोहाचिये परी ॥ षण्मास लोटले तैं गिरीं ॥ यापरी गोरक्ष सदनांतरीं ॥ तीर्थस्थानीं जल्पतसे ॥ ११ ॥ मग तो श्रीदत्ताकारण ॥ म्हणे महाराजा अत्रिनंदन ॥ तीर्थ केलें साधुदर्शन ॥ करावया महाराजा ॥ १२ ॥ तरी आम्हां आज्ञा द्यावी ॥ आतां लंघून येतों मही ॥ मही धुंडाळिल्या संगमप्रवाहीं ॥ साधु मिरवती महाराजा ॥ १३ ॥ तरी याच निमित्ताकारणें ॥ आम्हीं घेतला आहे जन्म ॥ सकळ जगाचें अज्ञानपण ॥ निवटावया[6] महाराजा ॥ १४ ॥ ऐसें बोलतां गौर-सुत ॥ दत्त ग्रीवा तुँकावित[7] ॥ आणि पुढील जाणून भविष्यार्थ ॥ अवश्य म्हणे पाडसा ॥ १५ ॥ मग परमप्रीतीं स्नेहेंकरून ॥ बोळविता झाला उभयांकारण ॥ येरीं उभयें करून नमन ॥ पर्वताखालीं उतरले ॥ १६ ॥ मार्गीं चालती उभय जण ॥ परी त्या पर्वता क्षणोक्षण ॥ पाहे मच्छिंद्रनंदन ॥ म्हणे प्राण अंतरला ॥ १७ ॥ प्रेमाश्रु ढाळी नयनीं ॥ पुढें ठेवी पदालागुनी ॥ ऐसें चालतां तया अवनीं[8] ॥ दुर-दुरावा पडला असे ॥ १८ ॥ मग मार्ग धरूनि काशीपुरी ॥ चालते झाले ते अवसरीं ॥ मुक्कामोमुक्काम लंघितां धरित्री ॥ प्रयागस्थानीं पातले ॥ १९ ॥ तों त्या गांवीं मूर्तिमंत ॥ औदार्यराशि प्रतापादित्य ॥ त्रिविक्रम नामें नृपनाथ ॥ धर्मप्राज्ञी नांदतसे ॥ २० ॥ गज वाजी[9] रथ संगतीं ॥ जयाची सेना अपरिमिती ॥ तरी अधर्मनाशार्थ निगुतीं ॥ सैन्यसिंधू मिरवला ॥ २१ ॥ भद्रासनीं तो राजेश्वर ॥ जयाची संपत्ति औडंबर[10] ॥ पाहून लाजती अमर[11] ॥ हा एक प्रभू म्हणती ते ॥ २२ ॥ ऐसियेपरी राजसंपत्ती ॥ परी उदरीं नाहीं संतती ॥ तशांत देहीं जरा निगुती ॥ प्राप्त झाली बळत्वें ॥ २३ ॥ परी तो राजा सुगम प्राज्ञ ॥ परोपकारी अपार ज्ञान ॥ मूर्तिमंत जयाचें संधान ॥ पाळीत असे नेटका ॥ २४ ॥ तयाचे राज्यांत बावन्न वर्ण ॥ कोणी न देखों अकिंचन[12] ॥ संत आलिया करिती पूजन ॥ सकळ जगीं मिर-

१ इंद्र. २ टक लागली. ३ चंद्राचें. ४ उचंबळूं लागतें. ५ वस्त्र. ६ नाश करण्याकरितां. ७ मान डोलवूं लागला. ८ पृथ्वी. ९ घोडे. १० अलोट. ११ देव. १२ दरिद्री.

वतसे ॥ २५ ॥ चौदा विद्यांमाजी कुशल ॥ जैसा दुसरा मूषकपाळ ॥ हीनदीनांची माय कनवाळ ॥ आणि काळ तत्काळ शत्रूचा ॥ २६ ॥
सकळ गृहीं देशावर ॥ त्या राजाचा परोपकार ॥ त्यामुळें मिरवती सकळ नर ॥ चिंताविरहित सुखानें ॥ २७ ॥ असो ऐसे तेजस्थिती ॥
तया देशीं पावले निगुतीं ॥ तेथें सकळ नारीनर क्षितीं ॥ [1]विजयवचनीं गहिंवरले ॥ २८ ॥ यापरी तयाची गृहस्वामिणी ॥ जिये मिर-
वती ज्ञानखाणी ॥ पतिव्रता [2]सौदामिनी ॥ षडर्णवगुणी [3]गुणस्वी ॥ २९ ॥ कीं राव तो उत्तम धवळार ॥ तें दिसती ती स्तंभाकार ॥ कीं
संसारमहीचा हांकणार ॥ अनंतरूपीं नटलासे ॥ ३० ॥ ऐसेपरी राजयुवती ॥ परी [4]जरा पाहून रायाप्रती ॥ तेणें भयार्त होऊनि चित्तीं ॥
चिंतेमाजी पडली असे ॥ ३१ ॥ म्हणे रायाचें सकळ अवसान ॥ जिंकूनि नेलें आहे जरेनें ॥ नेणों दिवस येईल कोण ॥ संगतीसी सोडा-
वया ॥ ३२ ॥ ऐसी चिंता व्यापिली चित्तीं ॥ तों रायास भरली आयुष्यभरती ॥ तप्त शरीरीं पाहून वृत्ती ॥ गमन करी परत्र ॥ ३३ ॥
प्राण सांडून शरीरातें ॥ गेला असे [5]निराळपंथें ॥ महीं उरलें असे प्रेत ॥ झाला आकांत राज्यांत ॥ ३४ ॥ पवित्रनामी रेवती [6]ललना ॥
अट्टहास करी शोकरुदना ॥ तेचि रीतीं इतर जनां ॥ दुःखप्रवाह लोटला असे ॥ ३५ ॥ आठवूनि त्रिविक्रमरायाचे गुण ॥ प्ररम
विलापें आक्रंदती जन ॥ म्हणती पुनः या रायासमान ॥ होणार नाहीं दूसरा ॥ ३६ ॥ ऐसे अट्टहासें घरोघरीं जन ॥ नारीनरादि दुःखसंपन्न ॥
तये संधींत गांवीं येऊन ॥ नाथ तेथें पातले ॥ ३७ ॥ तें क्षेत्र महान प्रयागस्थान ॥ उभय संचरती त्याकारण ॥ तों गृहोगृहीं दुःखप्रवाहीं ॥
शोकाकुलित मिरवले ॥ ३८ ॥ कोणी शरीर टाकीत [7]अवनीं ॥ कोणी पडले मूर्च्छा येउनी ॥ कोणी योजून हृदयीं पाणी ॥ धबधबां पिटिती
ते ॥ ३९ ॥ कोणी येऊन पिशाचवत ॥ इकडून तिकडे धांव घेत ॥ अहा म्हणून शरीरातें ॥ धरणीवरी [8]ओसंडिती ॥ ४० ॥ कोणी धरणीवरी
आपटिती [9]भाळ ॥ रुधिरव्यक्त करूनि बंबाळ ॥ अहा त्रिविक्रमराव भूपाळ ॥ सोडून गेला म्हणताती ॥ ४१ ॥ ऐसियेपरी एकचि आकांत ॥
नारीनरादि बोलती समस्त ॥ तें पाहून मच्छिंद्रनाथ ॥ परमचित्तीं कळवळला ॥ ४२ ॥ सहज चालतां तेथ पंथ ॥ ठायीं ठायीं उभा राहत ॥
त्या रायाचे गुण समस्त ॥ आठवून रडताती ॥ ४३ ॥ धर्मज्ञानिक रायाचे गुण ॥ मोहकपणीं होतां श्रवण ॥ तंव ते वेळीं तो मच्छिंद्र-
नंदन ॥ मोहदरींत रिघतसे ॥ ४४ ॥ मनांत म्हणे धन्य पुरुष ॥ जयासाठीं जग पिसें ॥ जाहलें आहे तस्मात् यास ॥ राव उपकारी वहिवटला
॥ ४५ ॥ तरी हा ऐसा भलेपणीं ॥ राव मिरवला आहे अवनीं ॥ तरी यातें पुनः आणोनी ॥ [10]देहंगत करावा ॥ ४६ ॥ ऐसें योजून
स्वचित्तांत ॥ पाहे रायाचें आयुष्य भरत ॥ तंव तो राव तितुकियांत ॥ निरामयीं पोंचला ॥ ४७ ॥ राव नुरलासे जीवितपणीं ॥ मिळाला
ऐक्यें ब्रह्मचैतन्यीं ॥ ऐसें देखतां अजीवितपणीं ॥ मग उपाय ते हरले ॥ ४८ ॥ कीं मुळींच बीजा नाहीं ठाव ॥ मग [11]रुखपत्रीं केवीं हेलाव ॥
तेवीं जीवितपणीं राणीव ॥ नातुडपणीं उतरलीसे ॥ ४९ ॥ मग स्तब्ध होऊन मच्छिंद्रनंदन ॥ परतता झाला ग्रामांतून ॥ परी मच्छिंद्रा-

१ जयजयकारशब्दानें. २ विजेप्रमाणें तेजस्वी. ३ सद्गुणी. ४ वृद्धापकाळ. ५ आकाशमार्गानें. ६ स्त्री. ७ जमिनीवर. ८ लोळतात. ९ मस्तक. १० जिवंत. ११ वृक्ष.

हून गौरनंदन ॥ कळवळला स्वचित्तांत ॥ ५० ॥ राज्यभागीं जगाचें बोलणें ॥ ऐकूनियां गौरनंदनानें ॥ मोहें चित्तस्फोट होऊन ॥ अश्रु ढाळी नयनातें ॥५१॥ ऐसे स्थितीं ग्रामांतून ॥ निघते झाले उभय जण ॥ तों ग्रामाबाहेर निवांत काननीं ॥ शिवालय देखिलें ॥ ५२ ॥ तें पाहून एकांतस्थान ॥ जाते झाले तयाकारण ॥ तों पलीकडे मोहक जन ॥ प्रेतसंस्कार मांडिला ॥ ५३ ॥ प्रेत स्कंधीं वाहून चतुर्थ ॥ येते झाले शिवालयांत ॥ सवें अपार जन वेष्टित ॥ शोकसिंधू उपासिती ॥ ५४ ॥ परी आकळीकपणें वंचना ॥ शोकसिंधूची दावी भावना ॥ परम आटून आपल्या प्राणा ॥ प्रेतालागीं कंवटाळिती ॥ ५५ ॥ यापरी गांवोगांवींचे जन ॥ तेही ऐकून वर्तमान ॥ धांव घेती आक्रोशपणें ॥ आप्तजनांसारिखे ॥ ५६ ॥ तें पाहूनियां गोरक्षनाथ ॥ परम कळवळूनियां चित्तांत ॥ बोलता झाला मच्छिंद्रातें ॥ ऐशा पुरुषा उठवावें ॥५७॥ मच्छिंद्र ऐकून तयाची वाणी ॥ उगाचि बैस म्हणे तयालागुनी ॥ परी स्थिर नोहे गोरक्षमुनी ॥ पुन्हां वाग्ुत्तर देतसे ॥ ५८ ॥ म्हणे जरी तुम्ही न उठवाल यातें ॥ तरी मी उठवीन स्वसामर्थ्यें ॥ मच्छिंद्र म्हणे तुझें सामर्थ्य ॥ त्यास उठवाया नसे कीं ॥५९॥ ऐसें ऐकून गोरक्ष वदत ॥ म्हणे याच्यासाठीं वेंचीन जीवित ॥ परी सुखी करीन सकळ जनांतें ॥ निश्चयेंसीं महाराजा ॥ ६० ॥ जरी न उठवे माझेनि राजा ॥ तरी अग्नींत[3] ओपीन शरीर[4] ओजा ॥ हाचि सिद्धार्थ पण माझा ॥ निश्चयेंसीं वरिला असे ॥ ६१ ॥ जरी ऐसिया बोला संमत ॥ जरी मातें न घडे नाथ ॥ तरी रौरव भोगीन कोटि वर्षांत ॥ कुंभीपाक महाराजा ॥ ६२ ॥ ऐसें बोलतां दृढोत्तरवचन ॥ मग बोलता झाला मच्छिंद्रनंदन ॥ अहा वत्सा शोधावीण ॥ व्यर्थ काय वदलासी ॥६३॥ सारोखपणें केलासी पण ॥ राव उतरला जीवित्वें-करून ॥ ब्रह्मरूपीं सनातन ॥ ऐक्यरूपीं मेळ झालासे ॥ ६४ ॥ ऐसें बोलतां वसुआत्मज ॥ मग तो गोरक्षमहाराज ॥ हृदयीं शोधितां तेंच ओज ॥ लक्षापरी भासलें ॥६५॥ मग म्लान करून आपुलें वदन ॥ म्हणे आतां अग्नि घेईन ॥ मग प्रत्योदक तेथून उठून ॥ काष्ठांलागीं मेळविलें ॥ ६६ ॥ तें पाहून मच्छिंद्रनाथ ॥ परम झाला भयभीत ॥ चित्तीं म्हणे हा प्राणातें ॥ चुकणार नाहीं द्यावया ॥ ६७ ॥ जेणें वडे आणायाकरितां ॥ चक्षु काढून आपुले हाता ॥ तोषविली विप्रँदुहिता ॥ निबरगट्ट हा असे ॥६८॥ मग पाचारूनि गोरक्षातें ॥ बोलता झाला प्रांजळवत ॥ म्हणे बा रे सुखी करावें जनातें ॥ यालागीं वदलासी ॥ ६९ ॥ तरी जनांचे उपकारास ॥ उदार झालास प्राणास ॥ चित्तीं तुझे समाधानास ॥ विचार एक ऐकावा ॥७०॥ मी याचे देहस्थित ॥ होतों रक्षाया तुझा हेत ॥ परी बा माझिया शरीरास ॥ द्वादश वर्षें सांभाळीं ॥७१॥ द्वादश वर्षें जाहलिया पूर्ण ॥ पुन्हां देहांतर्गत होऊन ॥ सकळ जगाचें करूं कल्याण ॥ उपकारीं मिरवेन बा ॥ ७२ ॥ ऐसें बोलतां मच्छिंद्रनाथ ॥ अवश्य गोरक्षक म्हणत ॥ मग शीघ्र सांडूनि शरीरातें ॥ रायशरीरीं संचरला ॥७३॥ संचरला परी स्मशानमहीं ॥ उठोनि बैसला राजदेहीं ॥ तें पाहोनियां लोक सर्वेही ॥ आनंदसरिते मिरवले ॥ ७४ ॥

१ वरून अत्यंत कळवळा दाखविणें. २ फसवणूक. ३ अर्पण करीन. ४ आनंदानें. ५ या नांवाचा नरक. ६ जिवावर उदार होऊन. ७ ब्राह्मणकन्या.

जैसा पक्षियें मांडिला ठाव ॥ मिरवे वृक्षा अन्य वाव ॥ तेवीं देहातें सांडून बरवें ॥ रावदेहीं संचरला ॥ ७५ ॥ लोक म्हणती आम्हां प्रजे-कारण ॥ मोहें वेष्टिलें हरिहरांचें मन ॥ म्हणोनि होऊन सुप्रसन्न ॥ रायालागीं जीवविलें ॥ ७६ ॥ एक म्हणती आयुष्य होतें ॥ काळें हरण केलें जीवंत ॥ चुकारपणीं समजूनि मागुतें ॥ जीवविलें रायातें ॥७७॥ असो ऐशा बहुधा प्रकरणीं ॥ आनंद वदतसे जगाची वाणी ॥ मग ते परम हर्षेंकरूनी ॥ स्वस्थानातें पावले ॥७८॥ विधिवत् कनकाचा पुतळा करून ॥ स्मशानक्रिया संपादून ॥ पाहते झाले आपुलें स्थान ॥ आप्तजनांसमवेत ॥७९॥ येरीकडे शिवालयांत ॥ सच्छिष्य महाराज गोरक्षनाथ ॥ रक्षावया गुरूचें प्रेत ॥ स्थानालागीं विचारी ॥ ८० ॥ तों तितक्यांत आली पूंजारणी ॥ होती शैवगुरविणी ॥ तियेलागीं पाचारुनी ॥ वृत्तांतातें निवेदी ॥ ८१ ॥ म्हणे माये राया-करितां ॥ आणि प्रजेची धरून ममता ॥ मम गुरु मच्छिंद्र केला सैरता ॥ राजदेहाकारणें ॥ ८२ ॥ तरी आतां श्रीगुरूचें प्रेत ॥ कवणा ठायीं रक्षूं यातें ॥ जरी तुजला आहे माहीत ॥ ठाव मातें सांग कीं ॥ ८३ ॥ ठाव तरी म्हणसील कैसा ॥ गुप्त जगांत न कळे लेशा ॥ पूर्ण झालीं द्वादश वर्षें ॥ पुनः श्रीगुरु उठेल वो ॥ ८४ ॥ तरी तूं ठाव ऐसा मनांत ॥ सांगून दृढ रक्षीं प्रेत ॥ आणि स्वचित्तीं रक्षूनियां मात ॥ गुप्त जगीं वर्तें वो ॥८५॥ तरी या कर्मास साक्षभूत ॥ तुझें माझें उभय चित्त ॥ ही गोष्ट कळतां जनांत ॥ परम विक्षेप वाटेल गे ॥ ८६ ॥ तरी आतां चिंतार्णवीं ॥ झालें कर्म वडवानलदेहीं ॥ धैर्यजळाचे प्रवाहडोहीं ॥ गुप्त यातें रक्षावें ॥ ८७ ॥ ऐसें बोलतां तपः-प्राज्ञी ॥ अवश्य म्हणत शैवराणी ॥ मग त्या शिवालयामध्यें नेउनी ॥ गुप्त गुहार दावीतसे ॥८८॥ तेंही गुप्त गुहार जगांत ॥ माहीत नव्हतें किंचितार्थ ॥ तें दाऊनि गोरक्षनाथ ॥ तुष्ट केला स्वदेहीं ॥ ८९ ॥ मग तें गुहाश्रामींचें मुख ॥ मही विदारूनि पाहे देख ॥ उत्तम ठाव लक्षून तेथ ॥ प्रेत त्यांत ठेवीतसे ॥ ९० ॥ प्रेत ठेवोनि गुहागृहांत ॥ मुख आच्छादिलें त्वरितात्वरित ॥ गृह लक्षूनि पुन्हां आल-यांत ॥ येवोनियां बैसला ॥ ९१ ॥ बैसे परी शैवकांता ॥ म्हणे महाराजा गोरक्षनाथा ॥ द्वादश वर्षें रक्षीन प्रेता ॥ निश्चय त्वां केला असे ॥ ९२ ॥ केला परी बोलें शरीर ॥ कैसें राहील साचोकार ॥ एकदिन नव्हे संवत्सर ॥ द्वादश निश्चय केला असे ॥ ९३ ॥ ऐशी ऐकूनि तियेची वाणी ॥ गोरक्ष म्हणे वो शुभाननी ॥ चिरंजीवपद देहालागूनी ॥ मच्छिंद्रनाथ मिरवितसे ॥९४॥ तरी हा देह नाशरहित ॥ आहे मायाप्रळयवंत ॥ परी ऐसी जगांत मात ॥ प्रविष्ट न करीं जननीये ॥ ९५ ॥ ऐसें उत्तर सांगून तीतें ॥ उभय चित्तीं मिरवले शांत ॥ तों इकडे नृपनाथ ॥ अंतःपुरीं पातला ॥ ९६ ॥ परी तो त्रिकाळज्ञानी ॥ चांचरा न घे प्रज्ञेलागुनी ॥ जेवीं माहितगार पूर्वींचे सदनीं ॥ राज्यभुवनीं वर्ततसे ॥ ९७ ॥ असो गेलिया अंतःपुरांत ॥ रेवती कांता प्रज्ञावंत ॥ मंचकीं नेवोनि आपुला नाथ ॥ प्रीतीं आदरें आद-रिला ॥ ९८ ॥ स्नान भोजन झालियाउपरी ॥ राव बैसला मंचकावरी ॥ अंकीं बैसवोनि सद्गुणलहरी ॥ अनंत वल्गने वदतसे ॥ ९९ ॥

१ सोन्याचा. २ पुजाऱ्याची स्त्री. ३ नाहींसा. ४ अडथळा. ५ चिंतासमुद्रांत. ६ खरोखर.

परी जें कांता पुसे त्यातें ॥ तेंही प्राज्ञिक प्रांजळ सांगत ॥ गुप्त प्रगटला वृत्तांत ॥ उत्तरा उत्तर देतसे ॥ १०० ॥ व्यंगरहित बोले वचन ॥ करी कांतेचें समाधान ॥ यावरी द्वितीय दिनीं मंगलस्नान ॥ करून सभे बैसला ॥ १ ॥ तेथेंही राजवैभवाकारणें ॥ अचुक वर्ते सकळ प्रकरणीं ॥ मंत्री आणि सकळ जन ॥ भिन्न कांहीं दिसेना ॥ २ ॥ न्यायनीतीं झाला वहिवाट ॥ माहितासमान वर्तती पाठ ॥ स्नेह क्रूरता समान लोट ॥ रायासमान वर्तती ॥ ३ ॥ यापरी नित्य चतुर्थ प्रहरीं ॥ सकळ वैभवें वना करी स्वारी ॥ शिवदर्शना ग्रामाबाहेरी ॥ त्याच देवालया येतसे ॥ ४ ॥ प्रथम दिवशीं येतां राव ॥ शिवालयीं उमाधव[1] ॥ वंदितां देखोनि गोरक्ष प्राज्ञ अतीव ॥ संपादणी पुसतसे ॥ ५ ॥ म्हणे नाथ जी आदेशवंत ॥ किती दिवस आलां येथ ॥ कवण स्थळीं वास्तव्य करीत ॥ कवण नाम मिरवतसे ॥ ६ ॥ उभा राहोनि ऐसे नीतीं ॥ गोरक्षातें पुसे नृपती ॥ संपादणी ती जगाप्रती ॥ दृढा दावीं महाराजा ॥ ७ ॥ परी तो चाणाक्ष गोरक्षनाथ ॥ संपादणीचें उत्तर देत ॥ मग उत्तराउत्तर करून महीतें ॥ शिवालयीं संचरले ॥ ८ ॥ संचरले परी गोरक्षकातें ॥ घेवोनि गेला स्वसांगातें ॥ शिवालयीं नेमिला एकांत ॥ राव पुसे गोरक्षनाथा ॥ ९ ॥ हस्तसंकेतें खुणेंकरून ॥ म्हणे देहातें बंधनसाधन ॥ कैसे रीतीं केलें रक्षण ॥ ठाव लक्षोनि नेटका ॥ ११० ॥ मग तो प्राज्ञिक[2] गोरक्षनाथ ॥ बरबरभाषा सांगत ॥ सर्वे घेवोनि खूण दावीत ॥ गुहागृहा रायातें ॥ ११ ॥ असो ऐसें केलियापाठीं ॥ गोरक्षें केलिया खूणदृष्टी ॥ मग क्षणें बैसोन तळवटीं ॥ राव स्थाना पैं गेला ॥ १२ ॥ गेला परी प्रतिदिनीं ॥ राव येतसे शिवभुवनीं ॥ आपुला शरीरठाव लक्षोनी ॥ शिवा नमोनि जातसे ॥ १३ ॥ क्षण एक बैसोनि गोरक्षाजवळी ॥ दावीत भक्ती प्रेमनव्हाळीं[3] ॥ आणि चित्ताची संशयकाजळी ॥ फेडून जात स्वस्थाना ॥ १४ ॥ ऐसियेपरी वहिवाटतां ॥ तीन मास लोटले पंथा ॥ यापरी एके दिवशीं बैसतां ॥ गोरक्षक पुसे रायातें ॥ १५ ॥ आम्हीं जातों तीर्थाटनासी[4] ॥ आपण असावें योगक्षेमेंसीं ॥ दृष्टी ठेवोनि स्वहितासीं ॥ स्वशरीरासी रक्षावें ॥ १६ ॥ अवश्य त्यातें भूप म्हणत ॥ स्वधर्में ठेवूं स्वशरीरातें ॥ आपण जावें स्वस्थचित्तें ॥ तीर्थाटनीं गमावें ॥ १७ ॥ ऐसें वदोनि गोरक्षकातें ॥ भूप पातला स्वस्थानांत ॥ येरीकडे गोरक्षनाथ ॥ तीर्थस्नाना वहिवाटला ॥ १८ ॥ साही लोटले षण्मास ॥ रेवती कांता रतिसुखास ॥ ऋतुसंधीं रेतगर्भास ॥ गरोदर पैं ते झाली ॥ १९ ॥ दिवसेंदिवस नव मास ॥ लोटोनि गेले गर्भास ॥ सुदिनदिनीं प्रसूतीस ॥ रेवती कांता होतसे ॥ १२० ॥ प्रसूत झाल्या मंदनाकृती[5] ॥ बाळ पाहे माय रेवती ॥ बाळककर्णीं तेजोत्पत्ती ॥ बाळ दृष्टीं देखिला ॥ २१ ॥ त्यास लोटले द्वादश दिवस ॥ आनंदउत्सव पालखास ॥ बाळ पहुडोनि नाम त्यास ॥ धर्मनाथ ठेविलें ॥ २२ ॥ त्यासही लोटलीं पांच वरुषें ॥ तों एके दिवशीं शिवालयास ॥ घेवोनि पूजेचे तबकास ॥ राजा राणी पातलीं ॥ २३ ॥ सर्वे परिचारिका[6] पंचशत ॥ लावण्यलतिका चपळवंत ॥ कीं राजार्णवींच्या लहरी

१ पार्वतीपति शंकर. २ बुद्धिमंत. ३ अत्यंत प्रेमपूर्वक. ४ तीर्थयात्रेला. ५ मदनाप्रमाणें सुंदर. ६ दासी.

अद्भुत ॥ रेवतीसवें मिरवल्या ॥ २४ ॥ असो रेवती दासींसहित ॥ संचरोनि शिवालयांत ॥ प्रेमें पूजीतसे उमाकांत ॥ शुद्धभावेंकरूनियां ॥ २५ ॥ पूजा सांग जाहलियावरी ॥ शिवा प्रार्थीतसे वाग्युत्तरीं ॥ हे महाराज त्रिपुरारी ॥ उमापति महानुभावा ॥ २६ ॥ तरी ऐसें करावें कृपानिधी ॥ श्रीराया त्रिविक्रमाआधीं ॥ मातें मरण देऊनि साधीं ॥ सुवासिनीत्व[1] माझें हें ॥ २७ ॥ ऐसें वदतां वाक्सुगरिणी[2] ॥ गदगदां हांसे शैवराणी ॥ तें रेवतीनें पाहोनी ॥ तियेलागीं पुसतसे ॥ २८ ॥ म्हणे माय वो शैवदारा ॥ तुज हांसूं कां आलें वाग्युत्तरा[3] ॥ म्हणे हास्य तव उत्तरा ॥ सहज आननीं आलें वो ॥ २९ ॥ रेवती म्हणे आश्चर्येंविण ॥ न यावें विकासीपणा मन ॥ तरी तूं माये प्रांजळ वचन ॥ सांग संशय सोडोनी ॥ १३० ॥ तंव ती बोले शैवराणी ॥ म्हणे माय वो हास्यचिन्हीं ॥ तूतें वदतां कहाणी ॥ [4]विपर्यास होईल गे ॥ ३१ ॥ तरी माये माझें चित्त ॥ वदावया होतें भयभीत ॥ नेणों कैसी पुढील मात ॥ घडोन येईल कर्मातें ॥ ३२ ॥ आम्ही दुर्बळ तुम्ही समर्थ ॥ सहज कोपल्या होईल घात ॥ पतंग स्पर्शतां प्रळयानळांत ॥ जीवितातें उरेना ॥ ३३ ॥ कीं केसरीगृहीं[5] अन्याय ॥ केलिया जंबुक[6] जीवे जाय ॥ कीं नगर पेटतां कोणें वांचावें ॥ जीवितातें हे माते ॥ ३४ ॥ ऐसें बोलतां शैवराणी ॥ रेवती म्हणे माय बहिणी ॥ निर्भय होवोनि तुवां मनीं ॥ रहस्यार्थ निरोपीं ॥ ३५ ॥ राव आणि माझें कांहीं ॥ भय असेल तुझे देहीं ॥ तरी आम्हीं सहसा कोपप्रवाहीं ॥ तुजवरी न करूं ॥ ३६ ॥ ऐसें बोलोनि करतळभावास[7] ॥ रेवती देत शैवकांतेस ॥ सकळ हरूनि संशयास ॥ म्हणे वार्ता वद आतां ॥ ३७ ॥ तरी ती प्रांजळ बोले वाणी ॥ मग परिचारिका बाहेर काढूनी ॥ म्हणे सांगेन वो एकांतभुवनीं ॥ एकांतस्थानीं पैं गेल्या ॥ ३८ ॥ एकांतालया गेलियावरी ॥ बोलती झाली शैवनारी ॥ म्हणे माये तूं सुवासीण स्वदेहीं ॥ कांहीं नाहींस जाण पां ॥ ३९ ॥ राव त्रिविक्रम मृत्यु पावला ॥ तयाचे देहीं मच्छिंद्र संचरला ॥ आपुला देह येथें सांडिला ॥ शिवालयामाझारीं ॥ १४० ॥ मग तयाचा शिष्य गोरक्षनाथ ॥ गुहागृहा ठेवोनि गेला प्रेत ॥ द्वादश वर्षें नेमस्त ॥ नेम केला उभयतांनीं ॥ ४१ ॥ द्वादश वर्षें सरल्या शेवटीं ॥ मच्छिंद्र वर्तेल स्वदेहराहाटी ॥ ऐसिये कथा माझिये दृष्टीं ॥ झाली असे जननीये ॥ ४२ ॥ तरी तुज वैधव्यपण ॥ असोन बोलसी सुवासिण ॥ म्हणोनि हास्य आलें मजलागुन ॥ जाण जननी निश्चयें ॥ ४३ ॥ ऐसें ऐकून रेवती सती ॥ म्हणे दावीं कां मच्छिंद्रप्रेताप्रती ॥ येरी अवश्य म्हणोनि उक्ती[8] ॥ गुहेमध्यें नेतसे ॥ ४४ ॥ म्हणे माय वो येच ठायीं ॥ आच्छादिला मच्छिंद्र देहीं ॥ तरी मही विदारून गुहागृहीं ॥ निजदृष्टीनें पाहें कां ॥ ४५ ॥ ऐसें बोलोन दावोन तीतें ॥ शिवालयीं गेली त्वरित ॥ येरीकडे संशयवंत ॥ रेवती स्थाना गेलीसे ॥ ४६ ॥ गेलीसे परी एकांतासीं ॥ विचार करी आपुले मानसीं ॥ चित्तीं म्हणे पतिव्रतानेमासीं ॥ दैवेंकरूनि नाडिलें ॥ ४७ ॥ नाडिलें परी संचितार्थ ॥ घडणार घडून आलें निश्चित ॥ ॥३॥

१ सौभाग्य. २ पुजारीण. ३ हंसण्याचें खरें कारण. ४ भलताच अनर्थ. ५ सिंहाच्या गुहेंत. ६ कोल्हा. ७ हातावर हात देऊन शपथ घेणें. ८ भाषण.

परी पुढतीं आपुलें हित ॥ विलोकावें आपणचि ॥ ४८ ॥ पति निवर्तल्यापाठीं ॥ लाधली मच्छिंद्रवीर्यकोटी ॥ परी पाहतां पातकदृष्टीं ॥ वंशवेली दिसेना ॥ ४९ ॥ पूर्वीं भरतवंश काढून ॥ व्यासवीर्यें केला उत्पन्न ॥ त्याही पुढें कुंतीरत्न ॥ त्याच नीतीं आचरली ॥ १५० ॥ पंचदेवांचें वीर्य घेवोन ॥ निर्माण केले पांचही जण ॥ तस्मात् वंशवेलीकारणें ॥ शिष्टदेह अर्पावा ॥ ५१ ॥ तरी हा विचार पातकरहित ॥ घडोन आला यत्नातीत ॥ परी द्वादश वर्षें होतां भरित ॥ पुन्हां अनर्थ होईल हा ॥ ५२ ॥ मच्छिंद्र जाईल स्वदेहाकारणें ॥ सुत धर्मनाथ अति सान[1] ॥ राज्यवैभवीं आसरा धरोन ॥ कवण रीतीं राहील कीं ॥ ५३ ॥ त्रिविक्रमदेहीं तपोबल ॥ आहे म्हणुनी [2]विवर्ते बाळ ॥ तो गेलिया सावली शीतळ ॥ मजलागीं मिळेना ॥ ५४ ॥ तरी आतां करावें कैसें ॥ दृष्टीं पाहें मच्छिंद्रदेहास ॥ दृष्टीं पाहिल्यावरी विनाश ॥ करोनियां सांडावा ॥ ५५ ॥ देह झालिया छिन्नभिन्न ॥ मग कैसा संचरेल मच्छिंद्रनंदन ॥ मुळींच बीज केलिया भस्म ॥ बाहेर कांहीं उगवेना ॥ ५६ ॥ ऐसा विचार करून चित्तीं ॥ एक परिचारिका घेवोन सांगातीं ॥ गांवाबाहेर मध्यरात्रीं ॥ येवोनियां पोंचली ॥ ५७ ॥ आणिक एक गुप्तराहाटी ॥ दोन सबळ घेतले होते कामाठी ॥ त्वरें येऊन शिवालयापाठीं ॥ गुहाद्वार विदारिलें ॥ ५८ ॥ मोकळें केलें गुहाद्वार ॥ करिते झाले आंत संचार ॥ जातांच तें [3]कलेवर ॥ मच्छिंद्रावें देखिलें ॥ ५९ ॥ परी तें कलेवर तेजःपुंज ॥ कीं सजीवपणीं दिसे सहज ॥ माणिकवर्णी सविताराज ॥ तियेलागीं भासलें ॥ १६० ॥ असो ऐसिये तेजोराशी ॥ मग शस्त्र घेवोनि अस्थिमांसासी ॥ रती रती छेदोनियां तयासी ॥ बाहेर तईं काढिलें ॥ ६१ ॥ मग भाग टाकोन काननांत ॥ विखरून दिधले पृथक् पृथक् तेथ ॥ तरी समान रज समस्त ॥ ठाईं ठाईं टाकिले ॥ ६२ ॥ टाकिले परी पातळपणीं ॥ रजरजाची होय मिळवणी ॥ ऐशापरी त्यास करूनी ॥ स्वस्थानीं गेली ते ॥ ६३ ॥ गुहागृहाचें मुख आच्छादून ॥ जैसें होतें तैसें करून ॥ येरी घडल्या कारण ॥ उ[4]मा जागृत झालीसे ॥ ६४ ॥ मग प्रत्यक्ष होऊनि बोलत ॥ म्हणे महाराजा कैलासनाथा ॥ जागृत व्हावें विपरीतपंथा ॥ अघटित झालें महाराजा ॥ ६५ ॥ तुमचा मच्छिंद्रनंदन ॥ गेला आहे स्वदेह सांडून ॥ परी रेवतीदारा येऊन ॥ विध्वंसिलें शरीरासी ॥ ६६ ॥ ऐसी ऐकतां उमेची मात ॥ खडबडून उठला कैलासनाथ ॥ हृदयीं पाहे तों विपरीत ॥ मच्छिंद्रदेहीं वर्तलें ॥ ६७ ॥ मग अंबेस बोलता झाला शिव वचन ॥ म्हणे माझा आज गेला प्राण ॥ परी उमे यक्षिणी बोलावून ॥ सकळ शरीर वेंचीं कां ॥ ६८ ॥ अस्थि त्वचा मांसासहित ॥ रती रती भाग वेंचून समस्त ॥ एकत्र करून कैलासांत ॥ यक्षिणीहस्तीं पाठवीं ॥ ६९ ॥ अवश्य म्हणून न[5]गात्मजा ॥ यक्षिणी पाचारी विजयध्वजा ॥ कोटी चामुंडा विभागकाजा ॥ महीलागीं उतरल्या ॥ १७० ॥ त्यांतें पाहून माय भवानी ॥ येतांच सांगे कार्यालागुनी ॥ मच्छिंद्रशरीर समस्त

१ लहान. २ हिंडत असतो. ३ मृत शरीर. ४ पार्वती. ५ श्रीशंकरा. ६ हिमालयकन्या पार्वती.

वेंचोनी ॥ स्वर्गा न्यावें म्हणतसे ॥ ७१ ॥ कैलासगिरीं शिवगण बहुत ॥ त्यांत वीरभद्र मम सुत ॥ तयाहातीं ओपोन समस्त प्रेत ॥ रक्षण दृढ सांगावें ॥ ७२ ॥ ऐसें सांगून क्षणिक वार्ता ॥ महीं संचरल्या मांसशोधार्था ॥ सकळ शरीर वेंचून तत्त्वतां ॥ कैलासभुवनीं चालिल्या ॥ ७३ ॥ कोटी चामुंडा प्रतापवंत ॥ यक्षिणीसह झाल्या स्वर्गस्थित ॥ कैलासगिरीं मग जात ॥ वीरभद्रातें निवेदिलें ॥ ७४ ॥ म्हणती परम हर्षेंकरूनी ॥ हे महाराज शिवगणीं ॥ राजेश्वर भद्रासनीं ॥ वृत्तांतातें ऐकावें ॥ ७५ ॥ आमचा तुमचा शत्रु पूर्ण ॥ अवचट पावला आहे मरण ॥ रती रती देहाचे भाग जमवून ॥ आम्हीं आणिले महाराजा ॥ ७६ ॥ तरी तो शत्रु म्हणशील कोण ॥ या भूमंडळा मच्छिंद्रनंदन ॥ त्यानें आम्हांस नग्न करून ॥ परम लज्जें विटंबिलें ॥ ७७ ॥ अष्टभैरव पाहोन धरणीं[1] ॥ विटंबिलें दशा करूनी ॥ रुधिरपूर[3] लोटूनि अवनीं ॥ विगतकळा[4] वरियेली ॥ ७८ ॥ आणि तुम्हांसवें घेतलें कटक ॥ मौळीं पर्वत देऊनि देख ॥ वायुसुत[5] करूनि आदिक ॥ विटंबिले महाराजा ॥ ७९ ॥ सकळ देवांचा शत्रु कुजात ॥ बरा दैवें पावला घात ॥ तरी आतां प्रतापवंत ॥ दृढोत्तरीं[6] शरीर रक्षावें ॥ १८० ॥ या मच्छिंद्राचा शिष्य गोरक्ष ॥ तो परम प्रतापवंत दक्ष ॥ तो जिंकून नेईल शरीर प्रत्यक्ष ॥ तरी सावध राहावें ॥ ८१ ॥ सहजस्थितीतें दैवेंकरून ॥ शत्रू पावला आहे मरण ॥ हलावांचून फेडविलें हर्षेंकरून ॥ तुम्हां आम्हां देवानें ॥ ८२ ॥ ऐसें सांगून हर्षयुक्त ॥ परी वीरभद्र तोषला आपुले चित्तांत ॥ मग भैरवादि समस्त ॥ अहा अहा म्हणताती ॥ ८३ ॥ मग चौऱ्यायशीं कोटी बहात्तर लक्ष ॥ शिवगण प्रतापी महादक्ष ॥ मच्छिंद्रशरीर वेष्टून प्रत्यक्ष ॥ रक्षणार्थ बैसविले ॥ ८४ ॥ कोटि यक्षिणी चामुंडांसहित ॥ डंखिनी शंखिनी पातल्या समस्त ॥ अस्त्रशस्त्रादि होऊन उदित ॥ रक्षण करिती शरीराचें ॥ ८५ ॥ येरीकडे त्रिविक्रमदेहांत ॥ प्रतापशीळ जो मच्छिंद्रनाथ ॥ नित्य येऊन शिवालयांत ॥ गुहागृहीं लक्षीतसे ॥ ८६ ॥ परी तो ठाव जैसा तैसा ॥ दिसून येत दृष्टिभासा ॥ मग स्वस्थ भोगी संपत्तिविलासा ॥ राज्यासनीं बैसूनियां ॥ ८७ ॥ परी शरीरा झाला जो प्रयास ॥ हें माहीत नव्हतें कांहीं देहास ॥ सदा भोगी संपत्तिविलास ॥ राजभुवना जातसे ॥ ८८ ॥ ऐसे नित्य राजविलास ॥ लोटून गेलीं वर्षें द्वादश ॥ तों येरीकडे तीर्थाटनास ॥ गोरक्ष सावध झाला असे ॥ ८९ ॥ तरी तो गोरक्ष पुढील अध्यायीं ॥ काय करील तो प्रतापप्रवाहीं ॥ तरी श्रोते अवधान देहीं ॥ सिद्ध करा पुढारां ॥ १९० ॥ अवधान पाहून अर्थ बहुत ॥ कथा वदेल धुंडीसुत ॥ मालू नरहरीचा शरणागत ॥ दास संतांचा असे कीं ॥ ९१ ॥ ॥ स्वस्ति श्रीग्रंथभक्तिसार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ द्वात्रिंशतिअध्याय गोड हा ॥ १९२ ॥ अध्याय ॥ ३२ ॥ ॥ ओंव्या ॥ १९२ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥ ॥

१ एकाएकीं. २ पृथ्वीवर. ३ रक्ताचा पूर. ४ निस्तेजपणा. ५ मारुती. ६ मोठ्या बंदोबस्तानें.

# अध्याय ३३वा









श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी जगदुद्धारा ॥ कनकवर्णा नरहरि चतुरा ॥ ऐक्यत्वकारणें हरिहरां ॥ शक्य एक तुझेंचि ॥ १ ॥ तरी आतां कृपा करूनी ॥ ग्रंथ सुचवीं सुढाळ रत्नीं ॥ शुभ योगीं श्राव्य भाषणीं ॥ स्वीकार करीं महाराजा ॥ २ ॥ मागिले अध्यायीं मच्छिंद्रनंदन ॥ त्रिविक्रमदेहीं संचरून ॥ गोरक्ष तीर्थस्नानाकारणें ॥ धाडिलासे मच्छिंद्रें ॥ ३ ॥ यापरी गोरक्षनाथ ॥ महीं भ्रमतां नाना तीर्थ ॥ तो गोदातटीं अकस्मात ॥ येऊनियां पोहोंचला ॥ ४ ॥ तों गोदातटीं भामानगर ॥ तया अरण्यांत गौरकुमर ॥ परम झाला क्षुधातुर ॥ जठरानलेंकरूनियां ॥ ५ ॥ ग्राम पाहतां तो अरण्यांत ॥ उदक एक योजन न मिळे तेथ ॥ तया स्थानीं क्षुधाक्रांत ॥ अनल जैसा पेटला ॥ ६ ॥ मार्गीं चालतां दिशा लक्षीत ॥ तों शेत देखिलें अकस्मात ॥ कृषिकर्म प्रांजळवंत ॥ पाहूनि सुमार धरियेला ॥ ७ ॥ तंव तो कृषीवल माणीकनामी ॥ वय दश वर्षें देहधर्मीं ॥ मध्यान्हसमय साधूनी ॥ भोजनातें बैसला ॥ ८ ॥ पात्र घेतलें पुढें वाढून ॥ कवळ करावा जों मुखीं अर्पण ॥ तों अकस्मात गौरनंदन ॥ आदेश शब्द गाजवी ॥ ९ ॥ तंव तो माणीक कृषि शेतीं ॥ ऐकून आदेशशब्दाप्रती ॥ योजिला कवळ ठेवूनि हातीं ॥ प्रेमें नमीत तयातें ॥ १० ॥ म्हणे महाराजा तुम्ही कोण ॥ किमर्थ घेतलें आडरान ॥ येरू म्हणे मी तपोधन ॥ क्षुधानळीं पेटलों ॥ ११ ॥ परम झालों तृषाक्रांत ॥ म्हणोन होऊन आलों अतीत ॥ तरी सन्निध अन्न असेल तूतें ॥ भिक्षा आम्हां ओपावी ॥ १२ ॥ ऐशी ऐकतां तयाची वाणी ॥ म्हणे महाराजा योगेंद्रमुनी ॥ निधान आहे मनोधर्मीं ॥ पात्र वाढलें भक्षावें ॥ १३ ॥ मग तो उठोन त्याच वेळीं ॥ शीघ्र ओपी पत्रावळी ॥ आणि मृत्कुंभ भरोनि जवळी ॥ शीघ्र करी पुढारां ॥ १४ ॥ मग तो गोरक्ष तपोधन ॥ हस्तपाद प्रक्षाळून ॥ अन्नपात्र पुढें घेऊन ॥ जठराहुती घेतसे ॥ १५ ॥ पूर्ण झाल्या जठराहुती ॥ मग सहजचि तुष्ट झाला चित्तीं ॥ कीं रुखा होतां जलप्राप्ती ॥ लवणाकार पावतसे ॥ १६ ॥ कीं दरिद्र्याप्रती देतां धन ॥ मग कां न पावे तुष्ट मन ॥ कीं यथेच्छ मेळविता झाल्याकारण ॥ तोष शरीरीं मिरवेना ॥ १७ ॥ तन्न्याय कृषिनरेंद्रोत्तमा ॥ घडून आलें तुष्टमहिमा ॥ मग प्रसन्न होऊन चित्तद्रुमा ॥ वरदफळा दावी तो ॥ १८ ॥ म्हणे कृषिका कवण काम ॥ मिरवला हो देहधर्मीं ॥ येरू ऐकून म्हणे स्वामी ॥ आतां कासया पुसतां हो ॥ १९ ॥ तरी महाराजा आटाआटी ॥ करावी प्रथम कार्यासाठीं ॥ कार्य झालिया व्यर्थ चावटी ॥ अन्यास कासया शिणवावें ॥ २० ॥ तरी आतां कार्य झालें ॥ पुढें योजीं शीघ्र पाउलें ॥ गोरक्ष म्हणे बोलशी बोल ॥ सत्य असती तुझे बा ॥ २१ ॥ परी तुवां मातें दिधलें अन्न ॥ तेणें मम चित्त झालें प्रसन्न ॥ तरी तव देहीं किंचित पण ॥ सत्य असेल वद मातें ॥ २२ ॥ जे जे कामना असेल तूतें ॥ ती पूर्ण पावशी फळसहितें ॥ येरी ऐकून कृषी त्यातें ॥ ऐसें उत्तर देतसे ॥ २३ ॥ म्हणे महाराजा महीपाठीं ॥ तुम्हीच हिंडतां भिकेसाठीं ॥ ते

१ विष्णु व शंकर यांना. २ गोरक्षनाथ. ३ अग्नि. ४ शेतकरी. ५ घांस. ६ मातीची घागर. ७ झाडाला. ८ मागण्याचा हेतु. ९ इच्छा.

तुम्ही मोह धरून पोटीं ॥ मातें काय द्याल जी ॥ २४ ॥ भणंगापाशीं भणंग गेला ॥ तो काय देऊन तृप्त झाला ॥ खडका उदक-
पान्हा वोला ॥ कदाकाळीं दिसेना ॥ २५ ॥ तुम्हीं तेवीं हिंडतां अन्नासाठीं ॥ आम्हां काय देणार जेठी ॥ नाथ म्हणे इच्छातुष्टी ॥ आतां
तुझी करीन बा ॥ २६ ॥ येरी म्हणे पुरे बोलणें ॥ काय आहे तुम्हांस्वाधीन ॥ तरी आणिक तुजकारण ॥ लागत असेल तें माग
॥ २७ ॥ नाथ म्हणे रे एक दान ॥ तुवां दिधल्या झालों प्रसन्न ॥ तरी कांहींतरी मजपासून ॥ मागून घेईं कृषिराया ॥ २८ ॥ येरू
म्हणे उगला[१] ऐस ॥ तुवां काय द्यावें आम्हांस ॥ तरी कांहीं न मागूं सुरस ॥ पंथ आपुला क्रमीं कां ॥ २९ ॥ ऐसें बोलतां माणीक-
नामीं ॥ गोरक्ष विचारी आपुले मनीं ॥ आडवंग[२] असती कृषिधर्मीं ॥ सदा विपिनीं बैसूनियां ॥ ३० ॥ तरी हा मातें म्हणतो माग ॥
परी त्याच्याच हितार्थ करावा लाग ॥ ऐसें विचारोनि मनोवेगें ॥ तयालागीं बोलतसे ॥ ३१ ॥ म्हणे कृषिराया ऐक वचन ॥ तूं आम्हांसी
म्हणशील देऊं देणें ॥ तरी मागें सरस वचन ॥ निश्चयेंकरूनियां बोलावें ॥ ३२ ॥ येरू म्हणे तापसा ऐक ॥ मातें दिससी महामूर्ख ॥
जो देणार आपुलें आत्मसुख ॥ तो मागें सरणार नाहीं कीं ॥ ३३ ॥ अरे चंद्र असे शीतळपणीं ॥ तरी तो वर्षेल दाहकपणीं ॥
परी तो ढळणार नाहीं प्राणी ॥ मागें पाऊल कासया ॥ ३४ ॥ सविताराज तेजोदीप्ती ॥ तोही अंधकारीं करील वस्ती ॥ परी उदार
तो औदार्याप्रती ॥ मागें पाऊल सारीना ॥ ३५ ॥ मही गेलिया रसातळीं ॥ परी औदार्यप्राप्ती महाबळी ॥ त्या कृपणत्व कदा-
काळीं ॥ अंगालागीं स्पर्शेना ॥ ३६ ॥ तरी कोणतें मागणें तूतें ॥ मागून घेइंजे त्वरितें ॥ मी बोलतों निश्चयातें ॥ निश्चय माझा पाहीं
कां ॥ ३७ ॥ ऐशी बोलतां विपुल वार्ता ॥ गोरक्ष म्हणे आपुल्या चित्ता ॥ तरी मनाचें करणें मागूं आतां ॥ कैसा सांभाळील पाहूं
तो ॥ ३८ ॥ ऐसा विचार करून चित्तीं ॥ म्हणे मज दावीं कां विपिनपती ॥ जें जें आवडेल तुझे चित्तीं ॥ तें तूं न करीं महाराजा
॥ ३९ ॥ कांहीं एक इच्छील तुझें मन ॥ तें तूं न करणें हेंचि मागणें ॥ इतुकें देऊन तुष्टपण ॥ बोळवीं कां कृषिराजा ॥ ४० ॥
ऐशी वदतां तयाची वाणी ॥ अवश्य म्हणे कृषिकर्मी[३] ॥ हा धर्म आतां आपुले धर्मीं ॥ अर्कअवधी रक्षीन गा ॥ ४१ ॥ ऐशी तैशी
देऊन भाक[४] ॥ तुष्ट केलें शरीरास ॥ असो गोरक्ष त्या विपिनास ॥ सांडूनियां चालिला ॥ ४२ ॥ माणिकनामी कृषी शेतांत ॥ मुक्त
करिता झाला औत ॥ येठणें बांधून समस्त ॥ भार सकळ वाहातसे ॥ ४३ ॥ वृषभा मागें दिधलें लावून ॥ मौळीं घेत येठण उच-
लून ॥ मनांत म्हणे ग्रामास जाऊन ॥ क्षुधाबल घालवावें ॥ ४४ ॥ इतुकी मनीं योजना होतां ॥ स्मरण झालें गोरक्षनाथा ॥ पुत्र
कल्याण आणितां चित्ता ॥ मनाचें करणें उलंघावें ॥ ४५ ॥ मन इच्छीत असे घरीं जावया ॥ तरी आपण न जावें तया ठाया ॥ ॥१॥
मग तेथेंचि उभा राहूनियां ॥ गाढ निद्रा करीतसे ॥ ४६ ॥ मौळीं[५] येठणाचा भार ॥ घेऊन उभा महीवर ॥ नेत्र झांकून चिंतापर ॥

१ स्वस्थ बस, चूप राहा. २ रानटी. ३ शेतकरी. ४ शपथ. ५ मस्तकावर.

हरिनामीं योजीतसे ॥ ४७ ॥ मन इच्छी हालवूं अंग ॥ परी न हाले धडभाग ॥ स्थिर होऊन संचरले ओघ ॥ वचनार्थ संपादी ॥ ४८ ॥ तरुपर्ण जे येती उडोन ॥ तेच करीतसे भक्षण ॥ मनीं येतां सांठवण ॥ तेही त्याग पर्णींचें करीतसे ॥ ४९ ॥ मग सहजस्थितीं वायुलहर ॥ अकस्मात येतसे मुखावर ॥ तितकेच प्राशन आहारपर ॥ अमल मन होतसे ॥ ५० ॥ तेणें कृश झालें शरीर ॥ सकळ आटून गेलें रुधिर ॥ मांस म्हणाया तिळभर ॥ स्वप्नामाजी दिसेना ॥ ५१ ॥ त्वचा अस्थि झाल्या एक ॥ उभा राहिला कष्टदायक ॥ येरीकडे तपोबाळक ॥ बद्रिकाश्रमीं पातला ॥ ५२ ॥ बद्रिकेदारा नमूनि त्वरित ॥ पाहूं चालिला चौरंगीनाथ ॥ तंव गुहागृहीं शरीरावरतीं ॥ वाळवीवारुळ विराजलें ॥ ५३ ॥ मुखीं तितुकी नामावळी ॥ आणि नेत्रचंद्रीं असे शिळाभारीं ॥ असे स्थित तया स्थळीं ॥ गोरक्षनाथ प्रगटला ॥ ५४ ॥ त्वरित द्वाराची शिळा काढून ॥ पाहे तयाचे शरीराकारणें ॥ तों वारूळ गेलें वेष्टून ॥ सर्व अंगीं तयाच्या ॥ ५५ ॥ शिळाचंद्रीं न हाले पाती ॥ रामशब्दें वलगे उक्ती ॥ तें पाहूनियां गोरक्षजती ॥ परम चित्तीं हळहळला ॥ ५६ ॥ मग शरीराचें वारुळ काढून ॥ पाहे तयाचे शरीराकारणें ॥ तों हस्तपाद लवेंकरून ॥ तपोबळें आले ते ॥ ५७ ॥ मग सावध करून तयातें ॥ म्हणे पाहें मी आलों गोरक्षनाथ ॥ शीघ्र कवळून तयाचा हस्त ॥ बाह्यात्कारीं आणिलें ॥ ५८ ॥ मग कृपें करितां अवलोकन ॥ शरीरशक्ति आली दारुण ॥ मग उठून वंदी गोरक्षचरण ॥ म्हणे सनाथ झालों असें मी ॥ ५९ ॥ यापरी तयास आलिंगुनी नाथ ॥ म्हणे बा कैसा झाला चरितार्थ ॥ येरी म्हणे मज माहीत ॥ नाहीं चामुंडे विचारीं ॥ ६० ॥ मग विचारून चामुंडेसी ॥ वृत्तांत पुसे चरितार्थासी ॥ येरू म्हणे आम्ही फळांसी ॥ देत होतों महाराजा ॥ ६१ ॥ परी चौरंगी न करून भक्षण ॥ बैसला होता शिळा लक्षून ॥ मग फळेंचि पर्वताप्रमाणें ॥ गोरक्षातें दाविलीं ॥ ६२ ॥ फळनगा[३] पाहोन तपोजेठी ॥ विस्मय करी आपुल्या पोटीं ॥ म्हणे धन्य याची तपोराहाटी ॥ ब्रह्मादिकां अतर्क्य ॥ ६३ ॥ परम चित्तीं कृपा वेष्टुनी ॥ मौळीं ठेविला वरदपाणी[४] ॥ अनुग्रहचोज पुन्हां दाउनी ॥ ब्रह्मसनातन केला असे ॥ ६४ ॥ पुढें चौरंगीस घेऊन ॥ बद्रिकेदारालया आणून ॥ जागृत करून उमारमण[५] ॥ चौरंगीतें भेटविला ॥ ६५ ॥ मग तेथें राहून षण्मास ॥ सकळ करविला विद्याभ्यास ॥ अस्त्र शस्त्र बहुवस[६] ॥ प्रवीण झाला महाराजा ॥ ६६ ॥ मग सकळ देवांतें पाचारून ॥ तपोबळें केलें सघन ॥ मग सकळ दैवतें तुष्ट करून ॥ वरदप्रज्ञा आराधिलें ॥ ६७ ॥ सकळ देव वर देऊन ॥ पहाते झाले आपुलें स्थान ॥ येरीकडे बद्रिकेदार नमून ॥ चौरंगीसह निघाला ॥ ६८ ॥ त्वरें येऊन वैदर्भ देशांत ॥ चौरंगीतें कौंडिण्यपुर दावीत ॥ म्हणे बा रे तव माता तात ॥ भेट घेईं तयांची ॥ ६९ ॥ भेटशी तरी कैसा त्यांतें ॥ जगीं जाऊन अति ख्यात[७] ॥ हस्तपादांचें मुंडणखंडणनिमित्त

१ रक्त. २ भाषण. ३ फळांचा पर्वत. ४ वरदहस्त. ५ शंकर. ६ मोठा. ७ कीर्ति.

उत्तरा सूड घेइंजे ॥ ७० ॥ रायें छेदिलें तव हस्तपादांसी ॥ परी धुसधुसी आहे मम मानसीं ॥ तरी आपुला प्रतापसंगम रायासी ॥ निजदृष्टीं दावीं कां ॥ ७१ ॥ अवश्य म्हणे चौरंगीनाथ ॥ भस्मचिमुटी कवळून हस्त ॥ रायाचें लक्षून बागाईत ॥ वातास्त्रास सोडीतसे ॥ ७२ ॥ तंव तेथींचे वनकर ॥ सहा शत एक सहस्र ॥ वातचक्रें उडवून अंबर[1] ॥ दाविता झाला तयांसी ॥७३॥ पुन्हां वातअस्त्र घेत काढून ॥ तंव ते उतरती महीकारण ॥ किती पडले मूर्च्छना वेष्टून ॥ कितीएक ग्रामीं पळाले ॥ ७४ ॥ ते येऊन राजांगणीं ॥ सांगते झाले विपरीत करणी ॥ कोणीं केली न दिसे नयनीं ॥ आश्चर्य बहु होतसे ॥ ७५ ॥ मग भृत्यांतें[2] पाचारून ॥ पुसून त्यांतें वर्तमान ॥ कोणीं केलें आला कोण ॥ शोधालागीं धाडीतसे ॥ ७६ ॥ तों येरीकडे चौरंगीसहित ॥ पाणवथीं बैसला गोरक्षनाथ ॥ हेर पाहून त्वरित ॥ रायापाशीं पातले ॥ ७७ ॥ म्हणती महाराजा पाणवथ्यासीं ॥ बैसले आहेत दोन तापसी ॥ तीव्रतेजी कानफाटवेषी ॥ विद्यार्णव[3] दिसताती ॥ ७८ ॥ ऐसें ऐकून राजेश्वर ॥ स्वमनीं आपुला करी विचार ॥ आले असती गोरख मच्छिंद्र ॥ पुत्रदुःखें द्वेषानें ॥ ७९ ॥ तरी आतां त्वरेंकरून ॥ तयांसी जावें शरण ॥ नातरी ग्रामास पालथें करून ॥ प्राणांप्रती हरतील ॥ ८० ॥ ऐसा विचार करून मानसीं ॥ राव सामोरा ये समारंभेसीं ॥ गज वाजी[4] शिबिका रथांसीं ॥ कटकासह येतसे ॥ ८१ ॥ ग्रामाबाहेर कटक येतां ॥ गोरक्ष म्हणे चौरंगीनाथा ॥ आपुला प्रताप आतां ॥ निजदृष्टीं दावीं कां ॥ ८२ ॥ ऐशी ऐकतां गोरक्षगोष्टी ॥ पुन्हां कवळी भस्मचिमुटी ॥ वातास्त्र जल्पून पोटीं ॥ चमूवरी प्रेरीतसे ॥ ८३ ॥ मग तें वातास्त्र अति तीक्ष्ण ॥ चमूसह राया दाविलें गगन ॥ रथ गज वाजी शिबिकासन ॥ वातास्त्रें पाडिलीं ॥८४॥ तेणेंकरून चमू[5] समस्त ॥ गगनपंथें आरंबळत ॥ म्हणती हे महाराजा नाथ ॥ शरणागता तारावें ॥ ८५ ॥ सकळ स्तविती दीनवाणीं ॥ ते शब्द ऐकोन तपोज्ञानी ॥ चौरंगीस म्हणे घे उतरोनी ॥ चमूसहित रायातें ॥ ८६ ॥ मग तो कुशल प्रज्ञावंत ॥ पर्वतास्त्र असे आड करीत ॥ मग सकळ आटून गेला वात ॥ चमू मिरवली नगमौळीं[6] ॥ ८७ ॥ मग उभा करोन आपुला कर ॥ म्हणे उतरून यावें चमू समग्र ॥ मग रायासह कटकभार ॥ उतरले तळवटीं ॥ ८८॥ मग समीप येतां शशांगर ॥ चौरंगीस बोलिला गोरकुमर ॥ पितयासी करून नमस्कार ॥ तुष्ट चित्तीं मिरवीं कां ॥ ८९ ॥ ऐसें ऐकतां गुरुनंदन ॥ धांवून धरिले तातचरण ॥ म्हणे महाराजा मी तव नंदन[7] ॥ निजदृष्टीं देखें मज ॥ ९० ॥ ऐसें बोलतां चौरंगनाथ ॥ रावें धांवून धरिलें हृदयांत ॥ मग परम प्रीतीं गोरक्षातें ॥ चरणीं भाळ अर्पीतसे ॥ ९१ ॥ मग गोरक्षही धरून हृदयीं ॥ म्हणे राया याचा प्रताप पाहीं ॥ येरी म्हणे तुजसमान आई ॥ भेटल्या न्यून कायसें ॥ ९२ ॥ याउपरी तैसें चौरंगीनाथ ॥ वज्रास्त्र निर्माण करीत ॥ चूर्ण करून महापर्वत ॥ अदृश्यपंथीं मिरवीतसे ॥ ९३ ॥

१ आकाश. २ सेवकांला. ३ विद्येचे समुद्रच. ४ घोडे. ५ सैन्य. ६ पर्वताचे मस्तकीं. ७ पुत्र.

याउपरी शशांगर ॥ गोरक्षासी म्हणे चतुर ॥ आरोहण करून शिबिकेवर ॥ राजसदनीं चला जी ॥ ९४ ॥ याउपरी बोले चौरंगी-
नाथ ॥ आम्ही न येऊं तव गृहांत ॥ सापत्न मातुश्रीचे कुडें मनांत ॥ हस्तपाद छेदिले ॥ ९५ ॥ मग मूळापासून सकळ वृत्तांत ॥
रायालागीं केला श्रुत ॥ राव कोपोदधींत ॥ उचंबळला आगळा ॥ ९६ ॥ सेवकालागीं आज्ञा करीत ॥ ताडीत आणा राणी येथ ॥
तें ऐकून चौरंगीनाथ ॥ काय परी वदतसे ॥ ९७ ॥ म्हणे ताता आपुलें वचन ॥ हेचि शिक्षा आली घडून ॥ यापरी ताता आपले
कीर्तीनें ॥ ब्रह्मांड भरेल महाराजा ॥ ९८ ॥ तरी ऐसें न करीं ताता ॥ सदनींच शिक्षा करावी प्रीता ॥ मग शिबिकासनीं बैस-
वून तत्त्वतां ॥ राजसदना पातले ॥ ९९ ॥ राव जातां मंदिरांत ॥ पादत्राण घेऊन हातांत ॥ ताडन करून पत्नीतें ॥ म्हणे जाईं
येथूनी ॥ १०० ॥ द्वादश संवत्सरपर्यंत ॥ त्वां तप केलें शुचिष्मंत ॥ तयाचें फळ कुडें मत ॥ भ्रष्ट केलें राज्यासी ॥ १ ॥ तें पाहून
गोरक्षनाथें ॥ राया संबोधून केला शांत ॥ एक मास राहिला तेथ ॥ शशांगरभक्तीनें ॥ २ ॥ यापरी गोरक्ष जातेसमयीं ॥ वंश
वेष्टी मोहप्रवाहीं ॥ प्रसाद देऊन राजदेहीं ॥ वीर्यवान पैं केला ॥ ३ ॥ म्हणे कामिनी करून दुसरी ॥ भोगीं वंशलतेची लहरी ॥
ऐसें सांगून शशांगरा ॥ चौरंगीसह चालिला ॥ ४ ॥ मार्गीं चालतां मुक्काम ॥ पाहते झाले प्रयागस्थान ॥ स्नान करून उत्तमो-
त्तम ॥ शिवालयीं पातले ॥ ५ ॥ येतांच करून शिवदर्शन ॥ मग शिवदारे बोलून वचन ॥ गुरुकलेवराचें वर्तमान ॥ तियेलागीं
पुसतसे ॥ ६ ॥ तंव ती होऊन भयभीत ॥ बोलती झाली चाचरे घेत ॥ शरीरेंकरून थरथरां कंपित ॥ पायांवरी लोटली ॥ ७ ॥ म्हणे
महाराजा गुरुनाथा ॥ रजभाजा रेवतीकांता ॥ तिनें मातें भ्रष्टवून चित्ता ॥ पुसून घेतलें होतें कीं ॥ ८ ॥ याउपरी दुसऱ्या-
लागुनी ॥ वदलें नाहीं कलेवरकहाणी ॥ परी नेणों भय वाटे मनीं ॥ कलेवर पहा निजदृष्टीं ॥ ९ ॥ स्त्रीजाती बोलती एक ॥ परी
करणी करिती आणिक ॥ मज वाटतसे ती चाळक ॥ समक्ष दृष्टीं पहावें ॥ ११० ॥ ऐसी ऐकून तियेची वाणी ॥ परम घाबरला
गोरक्षमुनी ॥ मग एकांत गुहासदनीं ॥ विदारून पाहतसे ॥ ११ ॥ तंव तें मोकळें गुहागार ॥ आंत नाहीं कलेवर ॥ मग नेत्रीं
दाटून मोहाचा पूर ॥ शोकसिंधू उचंबळे ॥ १२ ॥ तंव तो म्हणे महाराजा प्रज्ञावंता ॥ सोडून दिधली माझी ममता ॥ आतां येथें
गुरुनाथा ॥ कवणे ठायीं पाहूं मी ॥ १३ ॥ ऐसें म्हणून आरंबळत ॥ धरणीप्रती शरीर टाकीत ॥ तंव ती शैवदारा मोहस्थित ॥
होऊन त्यातें बोलतसे ॥ १४ ॥ म्हणे महाराजा धैर्य धरीं ॥ मीं राजांगने जाऊन सत्वरीं ॥ पुसून येतें मच्छिंद्रशरीरीं ॥ वृत्तांत कैसा
झाला तो ॥ १५ ॥ ऐसें बोलून गोरक्षातें ॥ शैवदारा अंतःपुरांत ॥ शीघ्र जाऊन रेवतीतें ॥ राजनेमानें नमियेलें ॥ १६ ॥ तंव
ती पाहून शैवकामिनी ॥ म्हणे कां आलीस वो माय बहिणी ॥ येरी म्हणे अंतःकरणीं ॥ आठव मातें झालासे ॥ १७ ॥ म्हणाल

१ पालखींत. २ सावत्र आईच्या. ३ क्रोधसमुद्रांत. ४ पायांतील जोडा. ५ गुरविणीला. ६ राजस्त्री. ७ शव.

तरी आठव कोण ॥ तरीं द्वादश वर्षें आलीं भरून ॥ तुम्हांलागीं सांगितली खूण ॥ राजभागीं विचारा ॥ १८ ॥ ऐसी ऐकतां तियेची वाणी ॥ एकांता ने ते राजपत्नी ॥ म्हणे माया वो अंतःकरणीं ॥ चिंता सोडीं सकळ ती ॥ १९ ॥ अगे तुजविरहित त्याच दिवशीं ॥ कलेवर काढून शस्त्रउद्देशीं ॥ वाटलें गे रेतिरती मांसीं ॥ सकळ विपिनामाझारी ॥ १२० ॥ त्यासही लोटले बहुत दिवस ॥ अस्थिमांसांचा झाला नाश ॥ जीवजंतू खाऊन त्यास ॥ विष्ठा मृत्तिका झाली असे ॥ २१ ॥ तरी या कार्याचा सकळ तरू ॥ समूळीं उपटिला बीजांकुरू ॥ आतां चिंतेचें फळ अपारू ॥ कोठून दृष्टी पडेल ॥ २२ ॥ ऐसें बोलतां राजांगना ॥ परम चित्तें व्यापिली मना ॥ म्हणे नेणों पुढिल्या कर्मा ॥ कैसें घडोन येईल ॥ २३ ॥ परी आतां असो कैसें ॥ श्रुत करावें गोरक्षास ॥ जें जें असेल प्रारब्धास ॥ भोग भोगणें लागेल ॥ २४ ॥ ऐसा विचार करून चित्तीं ॥ पुनश्च आली शिवालयाप्रती ॥ जे वदली रेवती युक्ती ॥ प्रांजळ तैसें सांगितलें ॥ २५ ॥ सांगतां ऐकिलें नाथें ॥ परम पेटला क्रोधानळातें ॥ म्हणे शिक्षा करावी राजभाजेतें ॥ दुःखार्णवीं बुडवूनियां ॥ २६ ॥ ऐसा विचार घटित मनीं ॥ परी पुनः करीत विवेकबंधन ॥ रेवती माता मजकारण ॥ मच्छिंद्रनाथें लागतसे ॥ २७ ॥ जरी अवज्ञा करून ॥ जंतूंचें झालें भक्षण ॥ तरी आतां शोधार्थ मन ॥ मच्छिंद्रशरीरीं ठेवावें ॥ २८ ॥ न द्यावें तिसी शिक्षेकारणें ॥ तें नाश न पावे निश्चय पूर्ण ॥ कोणे तरी ठायालागून ॥ मच्छिंद्रदेह असेल ॥ २९ ॥ मग बोलावून चौरंगीतें ॥ म्हणे बा रक्षीं शरीरातें ॥ मी देहास सांडून त्रिभुवनातें ॥ कलेवरशोधार्थ जातों कीं ॥ १३० ॥ परी रेवती येथील राजकांता ॥ प्रवर्तली आहे मच्छिंद्रघाता ॥ तशीच वहिवटेल माझिया अर्था ॥ म्हणून सावध असावें ॥ ३१ ॥ ऐसें सांगून चौरंगीतें ॥ प्रवेश करी गुहागृहातें ॥ प्राण सान शरीरातें ॥ भ्रमण करी दश दिशा ॥ ३२ ॥ सकल शोधिला जंबू द्वीप ॥ सरितार्णवीं सकल आप ॥ ग्राम कानन सप्तद्वीप ॥ रतीरती शोधिलें ॥ ३३ ॥ परी जीवजंतूची देहस्थिती होऊन ॥ शोधितां गुरूचें कलेवर पूर्ण ॥ कोणेतरी ठायालागून ॥ मच्छिंद्रदेह असेल ॥ ३४ ॥ अतळ वितळ सुतळ पाताळ ॥ सप्तहि पाताळस्थळ ॥ पिंडब्रह्मांड शोधून सकळ ॥ स्वर्गावरी चालिले ॥ ३५ ॥ सुवर्लोक भुवर्लोक तपोलोक ॥ अर्यमा यक्षादि सत्यलोक ॥ कुबेर तारागणादि अनेक ॥ शोधूनियां पाहिले ॥ ३६ ॥ एक मेरु स्वर्गपाठार ॥ गणगंधर्वादि अन्य सुरवर ॥ सकल शरीरा करून संचार ॥ गुरुशरीर शोधिलें ॥ ३७ ॥ उपरी पाहून वैकुंठ समस्त ॥ त्वरें पातला कैलासाप्रत ॥ तों होतांच प्रवेश शिवगणांत ॥ धुंडाळून पाहतसे ॥ ३८ ॥ तों शिवगणीं चामुंडा-समुदायांत ॥ अस्थि त्वचा मांस देखे समस्त ॥ यापरी वीरभद्र सर्व गणांत ॥ गर्जोनियां सांगतसे ॥ ३९ ॥ म्हणे द्वादश वर्षांचा सरला नेम ॥ मच्छिंद्रशवातें करा रक्षण ॥ तयाचा शिष्य गौरनंदन ॥ कोणे रूपें येईल कीं ॥ १४० ॥ ऐसी ऐकून तयाची वार्ता ॥

१ किंचित् किंचित्. २ अरण्यांत. ३ राजस्त्री. ४ क्रोधाग्नीनें. ५ उदक.

गोरक्ष तेथून झाला निघता ॥ तों येरीकडे चौरंगीनाथा ॥ काय सुचलें होतें कीं ॥ ४१ ॥ गोरक्षशवाजवळ बैसून ॥ आणीक सकळ अस्त्र व्यापून ॥ जेथें लाग न लागे देवांकारण ॥ [1]ब्रह्मादिकांकरूनियां ॥ ४२ ॥ ऐसें अस्त्र व्याप्त ॥ तशांतून निघून गौरसुत ॥ गुप्तवेषें शरीरांत ॥ येऊनियां प्रवेशला ॥ ४३ ॥ प्रवेशतांच अकस्मात ॥ उठून बैसला गौरसुत ॥ मार्ग सोडून गुहागृहांत ॥ बाहेर आले उभयतां ॥ ४४ ॥ मग सिद्ध करून भस्मझोळी ॥ उभे राहिले दोन्ही बळी ॥ पर्वतास्त्र तेणें काळीं ॥ [2]अर्कावरी सोडिलें ॥ ४५ ॥ गोरक्षमुखींचें पर्वतास्त्र ॥ प्रविष्ट होतां अति स्वतंत्र ॥ माथा उंचलितां अंबरपात्र ॥ भरोनियां निघाले ॥ ४६ ॥ सवालक्ष योजनमिती ॥ स्वर्गीं उंच झाले गेभस्ती ॥ त्याहून माथा द्विगुण पर्वतीं ॥ अंबरातें मिरवला ॥ ४७ ॥ [3]मित्रमार्गींचा धरून रोक ॥ आकाशस्तंभ झाला एक ॥ तेणेंकरून स्यंदनीं अर्क ॥ मार्गावरी अडखळला ॥ ४८ ॥ चक्रपदा चालावया वाट ॥ न मिळे पाहून सुभट ॥ मग सज्ज करून गांडीवचिमुटी ॥ योजिता झाला महाराजा ॥ ४९ ॥ तीव्रशरीरीं वज्रास्त्र ॥ योजून सोडी प्रविष्ट [6]मित्र ॥ तेणेंकरून पर्वतास्त्र ॥ भंगिता झाला ते क्षणीं ॥ १५० ॥ परी पर्वतास्त्र भंगित होतां ॥ आदित्य विचारी आपुले चित्ता ॥ हें अस्त्र कोणाची प्रतापदुहिता ॥ आडमार्गीं झालें असे ॥ ५१ ॥ ऐसें पाहतां अर्क [4]अंतरीं ॥ तो समजला नर गोरक्षकेसरी ॥ मग स्यंदनासह महीवरी ॥ येऊनियां प्रगटला ॥ ५२ ॥ येतां देखती अर्कराज ॥ काय करिती हो विजयध्वज ॥ चंद्रास्त्राचें पेरूनि बीज ॥ कोटी चंद्र निर्मिले ॥ ५३ ॥ तेणेंकरून शीतळ प्रवाहीं ॥ मिरवती झाली मही ॥ मग तो सकळ दाह स्वभावीं ॥ बाधूं न शके अर्काचा ॥ ५४ ॥ ऐसी समाधानस्थिती होतां ॥ परी समीप पावला प्रविष्ट सविता ॥ मग चौरंगी आणि गोरक्षनाथ ॥ अर्कचरणीं लागती ॥ ५५ ॥ यापरी भाविकस्थिति सांगून ॥ बोलता झाला जगलोचन ॥ बा रे तुज सुखसंबंध कोण ॥ दर्शवीं कां वाचेशीं ॥ ५६ ॥ येरू म्हणती महाराजा ॥ आम्ही उदेलों एक काजा ॥ मच्छिंद्रदेह तेजःपुंजा ॥ शिवगणें हरियेला ॥ ५७ ॥ तरी आपण जाऊन तेथें ॥ सुनीति सांगावी वीरभद्रातें ॥ कीं मच्छिंद्रदेह [5]महीतें ॥ पाठवून द्यावा कीं ॥ ५८ ॥ परी या कार्या बहुधा नीतीं ॥ सांगून जरी ना ऐकती ॥ मग मागून बोलावून घेऊं या क्षितीं ॥ युद्धालागीं मिसळाया ॥ ५९ ॥ ऐसें पर्वी महापर्वीं ॥ आमुची जाऊन करावी शिष्टाई ॥ इतुका उपकार मच्छिंद्रदेहीं ॥ आम्हांस साह्य मिरवावें ॥ १६० ॥ ऐसें बोलतां गोरक्षनाथ ॥ आदित्य अवश्य त्यांतें म्हणत ॥ मग त्या क्षणीं कैलासा जात ॥ त्वरित जाऊन पोंचला ॥ ६१ ॥ गणें पाहून अर्क येतां सहज ॥ पायांलागीं विजयध्वज ॥ म्हणती येणें महाराज ॥ कवण्या अर्था झालें असे ॥ ६२ ॥ आदित्य म्हणे ऐका वचन ॥ गोरक्षशिष्टाईसाधन ॥ करूं पातलों तुम्हांकारण ॥ मच्छिंद्रदेहाकारणें ॥ ६३ ॥ तरी मम बोलणें आतां ॥ चित्त द्यावें परम हिता ॥ महीस पाठवा मच्छिंद्र-

---

१ ब्रह्मदेव वगैरे देवांना. २ सूर्यावर. ३ सूर्यमार्गांचा. ४ अंतःकरणांत. ५ पृथ्वीवर. ६ सूर्य.

देह आतां ॥ तुष्ट करीं गोरक्षा ॥ ६४ ॥ तुम्हीं तुष्ट केलिया त्यास ॥ नाथपंथें वाढेल प्रीत ॥ ऐसें उत्तर बोलतां आदित्य ॥ वीरभद्र बोलतसे ॥ ६५ ॥ हे महाराजा ऐक वचन ॥ आम्हांस दुःख दिधलें मच्छिंद्रानें ॥ तरी आतां गेलिया प्राण ॥ मही न दाऊं शवातें ॥ ६६ ॥ जरी गोरक्ष झुंजेल आम्हातें ॥ तरी सिद्ध होऊं युद्धांतें ॥ गोरक्ष जिंकून समरंगणातें ॥ मच्छिंद्रासम करून ठेऊं ॥ ६७ ॥ उपरी बोले नारायण ॥ मच्छिंद्रें दुःख दिलें तुम्हांकारण ॥ तेव्हां तुमचा प्रताप पळून ॥ कवण ठाया गेलासे ॥ ६८ ॥ आतां अवचट घडलें ऐसें ॥ म्हणून प्रौढ झालां मानसें ॥ परी मच्छिंद्र जैसा तैसाच गोरक्ष ॥ प्रतापबळी असे कीं ॥ ६९ ॥ तेव्हां मच्छिंद्र होता एक ॥ आतां दोघे असती प्रतापअर्क[1] ॥ ते कोपल्या सकळ धाक ॥ कृतांतासम[2] योजिती ॥ १७० ॥ येरू म्हणती असो कैसें ॥ परी कदा न देऊं मच्छिंद्रास ॥ यापरी बोलतां राजस ॥ आवडेल तैसें करावें ॥ ७१ ॥ परी एक आणिक वचन ॥ तुम्ही उतरा महीकारण ॥ स्वर्गीं करितां कंदन[3] ॥ शिवलोकांत पावेल तें ॥ ७२ ॥ म्हणती कीं यासी काय कारण ॥ तरी ते प्रतापी असती तीक्ष्ण ॥ कैलासगिरि पिष्ट होऊन ॥ खंड करितील क्षणार्धें ॥ ७३ ॥ परी ते पाहून येथील वस्ती ॥ विनाश होईल स्वर्गाप्रती ॥ मग त्या कोपें पशुपती ॥ शासन करील तुम्हांतें ॥ ७४ ॥ भवभवानी अति प्रीती ॥ करिती गोरक्ष मच्छिंद्राप्रती ॥ पहा शरीररज सर्वें चामुंडाहातीं ॥ कैलासातें पाठविलें ॥ ७५ ॥ तरी आतां शिवा न कळतां ॥ मानेल तैसें करावें चित्ता ॥ ऐशी गोष्ट आदित्य बोलतां ॥ सर्वां परी मानलें ॥ ७६ ॥ मग वीरभद्र म्हणे सर्व गणांसी ॥ तुम्ही युद्धा जावें सर्व महीसीं ॥ दुःख लागतां कांहीं रणासी ॥ मीही येतों मागून ॥ ७७ ॥ मग अष्टभैरवगण ॥ अवश्य म्हणून करिती गमन ॥ विमानें प्रत्यक्ष घेऊन ॥ शस्त्रअस्त्रादिकीं उतरले ॥ ७८ ॥ बहात्तर कोटी चौऱ्यायशीं लक्ष ॥ येतांच देखे नाथ गोरक्ष ॥ मग चौरंगीतें बोले प्रत्यक्ष ॥ सावध होईं मम वत्सा ॥ ७९ ॥ असो शिवगण येतांच महीं ॥ लोटते झाले शस्त्रप्रवाहीं ॥ तें गोरक्ष पाहून त्या समयीं ॥ वज्रास्त्र निर्मियेलें ॥ १८० ॥ वज्रास्त्र पातलें लव न लागतां ॥ सहस्र वेळां भंवतें फिरतां ॥ तेणें शिवगणांचे शर समस्त ॥ अंगीं लिप्त न होती ॥ ८१ ॥ तें पाहूनियां सकळ शिवगण ॥ योजिती अपार अस्त्रांकारण ॥ तितुक्याही अस्त्रां उभय जन ॥ लक्ष्य धरून उडविती ॥ ८२ ॥ अग्निअस्त्र धूमास्त्र ॥ तयावरी प्रेरिती वातास्त्र ॥ वातास्त्रावरी उरगास्त्र ॥ प्रेरिते झाले शिवगण ॥ ८३ ॥ कालास्त्र आणि वज्रास्त्र ॥ महाकठिण स्पर्शास्त्र[4] ॥ तयामाजी दानवास्त्र ॥ प्रळय करीत आगळा ॥ ८४ ॥ तें पाहून गोरक्षनाथ ॥ प्रेरिता झाला जलदास्त्र[5] ॥ तयामागें पर्वतास्त्र ॥ लागोपाठ करीतसे ॥ ८५ ॥ तयामागें खगेंद्रास्त्र[6] ॥ तयामागें संजीवनी अस्त्र ॥ मग प्रेरी इंद्रास्त्र ॥ तें जाऊनियां झगटे ॥ ८६ ॥ विभक्तास्त्र देवास्त्र कठिण ॥ तींही झगटती त्वरेंकरून ॥ ऐसें अस्त्र परिपूर्ण ॥ गणास्त्र तें

१ प्रतापानें सूर्यासारखे. २ यमाप्रमाणें. ३ युद्ध. ४ विशेष. ५ मेघास्त्र. ६ गरुडास्त्र.

भंगिती ॥ ८७ ॥ त्यांत काय करी चौरंगीनाथ ॥ हळूच मोहनास्त्र प्रेरित ॥ तें संचरून गणहृदयांत ॥ मग पिसाटपणें मिरवत ॥ ८८ ॥ सर्वांस नाहीं देहभान ॥ तेणें न कळे आलों कोणकार्यालागून ॥ पिशाचवृत्तीं भ्रमत रानोरान ॥ व्यर्थ फिरते जाहले ॥ ८९ ॥ त्यांत आणिक चौरंगीनाथ ॥ प्रेरी प्रळयकाळींचा वात ॥ तेणें गण समस्त ॥ वायुचक्रीं पडियेले ॥ १९० ॥ तों वीरभद्र मागून चामुंडेसहित ॥ युद्धालागीं आला त्वरित ॥ परी शिवगण पाहून अव्यवस्थित ॥ परम चित्तीं क्षोभला ॥ ९१ ॥ मग गांडीवातें टणत्कारोनी ॥ बाण योजिले अपार गुणीं ॥ कामास्त्र ब्रह्मास्त्र कार्तिक तीन्ही ॥ विविध बाणीं पाडीतसे ॥ ९२ ॥ जैसा प्रळयकाळींचा वडवानळ ॥ तो यत्नें न पावे कदा शीतळ ॥ तन्यायें शिवबाळ ॥ कोपानळीं वेष्टिला ॥ ९३ ॥ तें पाहून चौरंगीनाथ ॥ रतिअस्त्र प्रेरीत त्वरित ॥ तेणें कामास्त्र त्वरें निश्चित ॥ मूर्च्छित होऊन पडियेलें ॥ ९४ ॥ यावरी दुसरें चौरंगीनाथ ॥ दशासुरी अस्त्र प्रेरित ॥ तें पाहूनियां नाभीसुत ॥ झडझडोनि पळतसे ॥ ९५ ॥ चित्तीं म्हणे नोहे बरवें ॥ वेद हरतील आतां सर्व ॥ शंखासुर प्रतापार्णव ॥ पुनः उदय झाला असे ॥ ९६ ॥ ऐसा विचार करून मनीं ॥ ब्रह्मास्त्र दडविलें अदृश्यपणीं ॥ पुढें कामिनीअस्त्र चौरंगीमुनी ॥ प्रेरिता झाला लवलाहें ॥ ९७ ॥ तें पाहून कार्तिकास्त्र ॥ पळून लपवी मुखपात्र ॥ परी चौरंगीचें पांचजन्यास्त्र ॥ प्रळयालागीं मिरवलें ॥ ९८ ॥ तें पाहूनियां भद्रजाती ॥ मत्स्यास्त्र योजिलें परम निगुतीं ॥ तेणें करून तदस्त्रशांती ॥ अदृश्य तें मिरवलें ॥ ९९ ॥ परी परम कोपोन तपोबळ ॥ तीव्रास्त्र योजिलें तत्काळ ॥ संजीवन योजून सबळ ॥ सकळ दानवां उठविलें ॥ २०० ॥ ते दानव म्हणाल कोण कोण ॥ त्रिपुरसुंदराक्ष मलमृदु मान्य ॥ म्हैसासुर जालंधर प्राज्ञ ॥ काळयवन अघ बक ॥ १ ॥ हिरण्याक्ष हिरण्यकश्यपसहित ॥ मुचकुंद बळी वक्रदंत ॥ रावण इंद्रजित कुंभकर्ण त्यांत ॥ सिंहनाद भरिताती ॥ २ ॥ ऐसे सबळ राक्षस उठतां ॥ विमानयानीं सुरवर असतां ॥ अति भय मानून चित्ता ॥ विमानातें पळविती ॥ ३ ॥ कैंचें युद्ध कैंचें पाहणें ॥ पळती सुर भयभीत होऊन ॥ तेहतीस कोटी देवतांकारण ॥ चिंता अपार व्यापिली ॥ ४ ॥ म्हणे रावणें बंदीं घातलें ॥ दैवें दाशरथी रामें सोडिलें ॥ आतां दैन्य भोगून आलें ॥ दुःख अपार येधवां ॥ ५ ॥ ऐसे होऊन भयभीत ॥ कंपें व्यापिले ते समस्त ॥ असो सुरवर जाऊन वैकुंठांत ॥ निवेदिती श्रीरंगा ॥ ६ ॥ मग तो दयाळ चक्रपाणी ॥ ऐसी ऐकून सुरवरवाणी ॥ म्हणे भोग आला परतुनी ॥ अवतारदीक्षेकारणें ॥ ७ ॥ मग तो परम दचकून चित्तीं ॥ शिव पाचारिला सुरवरांहातीं ॥ बैसवून स्वसंगतीं ॥ विचित्र करणी निरोपिली ॥ ८ ॥ म्हणे गोरक्षें केलें अनुचित ॥ पुनः उठविले दानव समस्त ॥ आतां दानव तरी रसातळाप्रत ॥ मही सकळ नेतील कीं ॥ ९ ॥ एक एक दानवासाठीं ॥ आपण माराया झालों कष्टी ॥ कल्पवरी अवतार जेठी ॥ धरूनियां भिडलों ॥ २१० ॥



१ दोरीला. २ त्वरित. ३ देव. ४ श्रीविष्णूला. ५ प्रळयकालापर्यंत.

तरी आतां कैसें करावें ॥ [1]निवटतील कैलासा सकळ दानव ॥ अहा मूर्ख तो वीरभद्र राव ॥ व्यर्थ द्वेषीं मिरवला ॥ ११ ॥ मग सोडून वैकुंठासी ॥ येते झाले गोरक्षापासीं ॥ म्हणती बा विपरीत महीसीं ॥ पुत्रा हें काय मांडिलें ॥ १२ ॥ अरे एकएका राक्षसालागीं ॥ आम्ही श्रमलों बहु प्रसंगीं ॥ अवतार घेऊन नाना रंगीं ॥ हनन केलें तयांचें ॥ १३ ॥ तरी आतां कृपा करून ॥ अदृश्य करीं दानवांकारण ॥ येरी म्हणे गुरुशवा आणून ॥ द्यावें आधीं मजलागीं ॥ १४ ॥ मग शिवें बोलावून चामुंडेसी ॥ मच्छिंद्रशवातें आणविलें महीसीं ॥ म्हणे बा घेई आणि राक्षसांसी ॥ शांतदृष्टी दावीं कां ॥ १५ ॥ यापरी गोरक्ष म्हणे त्यांतें ॥ दानव नोहेत अस्त्रव्यक्त ॥ संजीवनी प्रयोग देहस्थित ॥ दानव उदया पावले ॥ १६ ॥ तरी अवतार घेऊन ॥ पुनः योजा रणकंदन ॥ नातरी वीरभद्राची आस्था सोडून ॥ द्यावी लागेल तुम्हांतें ॥ १७ ॥ यावरी बोले [2]भालदृष्टी ॥ येर पोर नाहीं म्हणे पोटीं ॥ परी नाथा राक्षस जेठी ॥ दुःख देतील आम्हांतें ॥ १८ ॥ एक मधुदैत्य माजला ॥ तेणें पळविलें रानोरानीं आम्हांला ॥ शेवटीं एकादशीनें त्याला ॥ मृत्युमुखा पाठविलें ॥ १९ ॥ ऐसें दुःख सांगावें किती ॥ तरी आतां कृपामूर्ती ॥ वेगीं निवटीं राक्षसांप्रती ॥ पुत्रमोह सांडिला ॥ २२० ॥ ऐसें शिव विष्णु बोलत ॥ येरीकडे राक्षस समस्त ॥ वीरभद्र पाहून झुंजत ॥ धनुष्यबाण कवळूनियां ॥ २१ ॥ परी तो प्रतापी भद्रजाती ॥ एकटा झुंजतो सर्वांप्रती ॥ नानाशस्त्रअस्त्राकृती ॥ निवारीत बलिष्ठ ॥ २२ ॥ तुष्ट होतां गोरक्ष जती ॥ वाताकर्षण अल्पयुक्तीं ॥ भस्मचिमुटी रणकंदनाप्रती ॥ फेंकूनियां देतसे ॥ २३ ॥ ऐसे वीरभद्र आणि राक्षस संपूर्ण ॥ एकमेळीं माजलें [3]कंदन ॥ येरीकडे शिवविष्णूंनीं ॥ स्तुतीं तुष्टविला गोरक्ष ॥ २४ ॥ तेणें दानव वीरभद्रासहित ॥ महीं पाडिले निचेष्टित ॥ श्वासोच्छ्वास कोंडून समस्त ॥ प्राणरहित झाले ते ॥ २५ ॥ सबळ अस्त्रें वाताकर्षण ॥ ठाऊक नव्हतीं देवदानवांकारण ॥ परी नाथपंथीं तीं येऊन ॥ प्रसन्न झाला कृपेनें ॥ २६ ॥ असो वीरभद्र आणि दानव समस्त ॥ रणीं निमाले प्रतापवंत ॥ त्यावरी गोरक्षें जल्पून अग्निअस्त्र ॥ सकल केलें भस्म तेणें ॥ २७ ॥ यावरी पुढें पंचानन ॥ वेष्टिले अति मोहानें ॥ तें पुढिले अध्यायीं सकळ कथन ॥ श्रोतियांनीं ऐकावें ॥ २८ ॥ परम साधन योजून चित्तीं ॥ पाठ थापटून वक्त्याप्रती ॥ भला भला म्हणवून उक्ती ॥ श्रोते करिती तत्कृपें ॥ २९ ॥ परम अवधाना योजून चित्त ॥ वक्ता जाहला धुंडीसुत ॥ नरहरि मालु नाम ज्यांत ॥ संतसेवे अनुसरला ॥ २३० ॥ स्वस्ति श्रीग्रंथ श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ त्रयस्त्रिंशति अध्याय गोड हा ॥ २३१ ॥ ॥ अध्याय ॥ ३३ ॥ ॥ ओंव्या ॥ २३१ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥

१ नाहींसे करतील. २ श्रीशंकर. ३ युद्ध.

अध्याय ३४ वा.






श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी रघूत्तमा ॥ आराध्य होसी प्लवंगमां ॥ जटायूनामी [1]विहंगमा ॥ मुक्तिदाता रक्षक तूं ॥ १ ॥ तरी आतां [2]कथाप्रसंगा ॥ पुढें बोलवीं नवरसप्रसंगा ॥ जेणें ऐकून श्रोतये अंगा ॥ अनुभवतील महाराजा ॥ २ ॥ मागिले अध्यायीं करविलें बोलणें ॥ मच्छिंद्राचें भूमंडळीं शरीर आणून ॥ वीरभद्र मारून केला भस्म ॥ दानवांसह रणांगणीं ॥ ३ ॥ तरी आतां पुढें कथा ॥ वीरभद्र निमाल्या [3]उमाकांता ॥ सहज गुण आठवोन चित्ता ॥ पुत्रमोहें वेष्टिला ॥ ४ ॥ मुख वाळून झालें म्लान ॥ अश्रू लोटले दोन्ही नयनीं ॥ परी न बोले कांहीं जटा वेष्टून ॥ पुत्रमोहें स्फुंदतसे ॥ ५ ॥ मनांत म्हणे हा हा पुत्रा ॥ परता धैर्या लावण्यगात्रा ॥ विद्यासंपन्न सर्वअस्त्रा ॥ जाणता एक होतास कीं ॥ ६ ॥ अहा कैसा दैवहीन ॥ हातींचें गेलें पुत्रनिधान ॥ काय असोन अपार गण ॥ तया [4]सरसी न पवती ॥ ७ ॥ एक [5]इंदु स्वर्गीं नसतां ॥ अपार [6]उडुगण असोन वृथा ॥ तेवीं वीरभद्रावीण सर्वथा ॥ हीन तेजें वाटती ॥ ८ ॥ कीं मयूरा सर्वांगीं डोळे ॥ परी देखण्याचे मंदावले बुबुळे ॥ तेवीं वीरभद्रावीण गण [7]विकळे ॥ सर्व मातें भासती पैं ॥ ९ ॥ कीं गात्रें सकळ चांगुलपणीं ॥ अंगीं मिरविला लावण्यखाणी ॥ परी एक घ्राण गेलें सांडोनी ॥ सकळ विकळ तीं होती ॥ १० ॥ तैसें माझ्या वीरभद्राविण ॥ सकळ विकळ दिसती गण ॥ अहा वीरभद्र माझा प्राण ॥ परत्र कैसा गेला सोडोनी ॥ ११ ॥ ऐसें म्हणून मनींच्या मनांत ॥ [3]पंचानन आरंबळत ॥ तीं चिन्हें जाणून गोरक्षनाथ ॥ चित्तामाजी कळवळला ॥ १२ ॥ मनांत म्हणे बद्रिकाश्रमातें ॥ मातें बैसविलें तया गुरुनाथें ॥ तैं रात्रंदिवस उमाकांत ॥ मजसाठीं श्रम पावे ॥ १३ ॥ मायेसमान पाळून लळा ॥ माता रक्षी जेवीं बाळा ॥ तरी ऐसा स्वामी चित्तकोंवळा ॥ पुत्रमोहें वेष्टिला असे ॥ १४ ॥ अहा तरी म्यां उपकार ॥ काय हो केला अनिवार ॥ ऐसा स्वामी शिणविला हर ॥ दुःख तुंबळ देऊनियां ॥ १५ ॥ ऐसें म्हणून स्वचित्तांत ॥ पायां लागे गोरक्षनाथ ॥ म्हणे पुत्रदुःखावरी मोहवेष्टित ॥ चित्त तुमचें झालें कीं ॥ १६ ॥ तरी वीरभद्रातें आतां उठवीन ॥ परी अस्थि आणाव्या ओळखून ॥ येथें राक्षसांचें झालें कंदन ॥ राक्षसअस्थी मिरवती ॥ १७ ॥ त्यांत वीरभद्राच्या अस्थी ॥ मिसळल्या कृपामूर्ती ॥ म्हणून संशय वाटे चित्तीं ॥ वीरभद्रातें उठवावया ॥ १८ ॥ जरी ऐसिया मिसळल्या नाथा ॥ संजीवनीप्रयोग जपतां ॥ सकळ राक्षस उठतील मागुतां ॥ म्हणोन चिंता व्यापिली ॥ १९ ॥ ऐसें बोलतां गोरक्षजती ॥ [3]नीलग्रीव म्हणे कृपामूर्ती ॥ वीरभद्राच्या सकळ अस्थी ॥ ओळखून काढीन मी ॥ २० ॥ माझे गण आहेत जितुले ॥ ते आसनीं शयनीं भोजनीं भले ॥ मम नामीं रत झाले ॥ कायावाचाबुद्धीनें ॥ २१ ॥ तरी चित्तबुद्धिअंतःकरणीं ॥ वीरभद्र नामीं गेला वेष्टोनी ॥ जागृत सुषुप्त स्वप्नीं ॥ वेष्टिला असे मम नामीं ॥ २२ ॥ ऐसें बोलून शंकर ॥ [8]रणभूमींत करी संचार ॥ मग तेथें अस्थि उचलून

---

१ पक्ष्याला. २ कथाप्रसंगानें. ३ शंकराला. ४ बरोबरी. ५ चंद्र. ६ नक्षत्रसमूह. ७ तेजोहीन. ८ लढाईचे ठिकाणीं.

सत्वर ॥ कर्णीं आपुल्या लावीतसे ॥ २३ ॥ ऐशियेपरी शोध करितां ॥ वीरभद्र जेथें पडला होता ॥ तेथें जाऊन अवचट हस्ता ॥ अस्थी उचली तयाच्या ॥ २४ ॥ अस्थी उचलोन कर्णीं लावीत ॥ तंव त्या अस्थी मंद शब्द करीत ॥ शिव शिव म्हणोन शब्द येत ॥ शिवकर्णीं तत्त्वतां ॥ २५ ॥ मग त्या अस्थी [1]पंचाननें ॥ गोळा केल्या परीक्षेनें ॥ जेथें होता गोरक्षनंदन ॥ तेथें आणून ठेविल्या ॥ २६ ॥ मग तो [2]विद्यार्णवकेसरी ॥ भस्मचिमुटी कवळून करीं ॥ वीरभद्रनामीं साचोकारीं ॥ संजीवनी स्मरला असे ॥ २७ ॥ होतां संजीवनीचा प्रयोग पूर्ण ॥ वीरभद्र उठला देह धरून ॥ म्हणे माझें धनुष्यबाण ॥ कोठें आहे सांगा कीं ॥ २८ ॥ व्यापले अपार राक्षस कोटी ॥ तितुके मारीन आतां [3]जेठी ॥ उपरी गोरक्षा यमपुरी शेवटीं ॥ प्रतापानें दावीन कीं ॥ २९ ॥ ऐसें वीर-भद्र बोले वचन ॥ करीं धरी पंचानन ॥ म्हणे बापा आतां शीण ॥ व्यर्थ बोलाचा न करीं ॥ ३० ॥ मग हृदयीं कवळून त्यातें ॥ सांगितला सकळ वृत्तांत ॥ उपरी म्हणे उमाकांत ॥ स्नेह नाथीं धरावा ॥ ३१ ॥ मग गोरक्ष आणि वीरभद्रजेठी ॥ उभयतांची करविली भेटी ॥ उपरी म्हणे स्नेह पोटीं ॥ उभयतांनीं रक्षावा ॥ ३२ ॥ उपरी बाहात्तर कोटी चौऱ्यायशीं लक्ष ॥ शिवगण प्रतापी महादक्ष ॥ ते वायुचक्रीं असतां प्रत्यक्ष ॥ उतरी गोरक्षक तयांसी ॥ ३३ ॥ मग सकळ समुदाय एक करून ॥ जाते झाले गोरक्ष नमून ॥ येरी-कडे राव त्रिविक्रम ॥ राज्यवैभवीं गुंतला ॥ ३४ ॥ गोरक्ष सकल शवमांदुस ॥ रक्षण करी शिवालयास ॥ तों त्रिविक्रमराव दर्श-नास ॥ अकस्मात पातला ॥ ३५ ॥ राव देखतां गोरक्षासी ॥ प्रेमें मिठी घाली ग्रीवेसी ॥ निकट बैसवोन त्यासी ॥ सर्व वृत्तांत विचारी ॥ ३६ ॥ मग शवाचा जो झाला वृत्तांत ॥ तो सकळ त्यातें केला श्रुत ॥ होतांच तळमळ चित्तांत ॥ मच्छिंद्राच्या लागली ॥ ३७ ॥ मग गोरक्षास बोले वचन ॥ धैर्य धरावें कांहीं दिन ॥ धर्मनाथातें राज्यासन ॥ देऊन येतों लगबगें ॥ ३८ ॥ ऐसें बोलून प्रजा-नाथ ॥ स्वगृहीं आला त्वरितात्वरित ॥ बोलावोन मंत्रिकांतें ॥ विचारातें घडविलें ॥ ३९ ॥ मग पाहून उत्तम दिन ॥ महीचे राव घेतले बोलावून ॥ राज्यपदीं स्वहस्तें अभिषेक करवून ॥ धर्मराज स्थापिला ॥ ४० ॥ याचकांस देऊन अपार धनें ॥ आणि भूपांलागीं दिधलीं भूषणें ॥ परम स्नेहें बोळवून ॥ [4]बंदीजन सोडविले ॥ ४१ ॥ यासही लोटला एक मास ॥ राव त्रिविक्रम आपुल्या मंदिरीं खास ॥ देह सांडून शिवालयास ॥ तत्क्षणीं पातला ॥ ४२ ॥ येरीकडे रेवती सती ॥ सहज गेली राजसदनाप्रती ॥ म्हणे महाराजा हे नृपती ॥ अजून कां हो निजलांत ॥ ४३ ॥ परी तीतें न बोले कांहीं ॥ मग हालवोन पाहे स्वहस्तप्रवाहीं ॥ तंव तें प्रेत मिरवलें देहीं ॥ पाहोन शोका वहिव्रटे ॥ ४४ ॥ रेवती शोक करितां तुंबळ ॥ ऐकून धांवला धर्मनाथ बाळ ॥ मंत्री प्रजा सेवक सकळ ॥ हंबरडा बहु ऊठला ॥ ४५ ॥ तो वृत्तांत [5]शिवालयासीं ॥ जनमुखें आला गोरक्षापाशीं ॥ मग सिद्ध करून भस्मचिमुटीसी ॥ संजी-



१ शंकरानें. २ विद्येचा मोठा सागरच असा. ३ मोठे पराक्रमी. ४ कैदी. ५ शंकराच्या देवळांत.

वनी प्रयोजी ॥ ४६ ॥ अस्थी मांस प्रयोजितां ॥ देह संगीन झाला त्वरित ॥ संगीन होतां मच्छिंद्रनाथा ॥ समय पावला रिघा-
वया ॥ ४७ ॥ मच्छिंद्र देहीं संचार होतां ॥ उठून बैसला क्षण न लागतां ॥ येरीकडे रावप्रेत ॥ स्मशानवाटिके आणिलें ॥ ४८ ॥
प्रेत आणिलें स्मशानीं ॥ त्रिवर्ग पहावया निघाले मुनी ॥ तों रेवतीनें दृष्टीं पाहोनी ॥ शोध आणविला तयाचा ॥ ४९ ॥ करून
रायाचें दहन ॥ स्नाना गेले सकळ जन ॥ परी धर्मराज दारुण ॥ शोक करी अद्भुत पैं ॥ ५० ॥ शोक करी तरी कैसा ॥ सोडून
प्राणाचा भरंवसा ॥ लोक बोधितां न ये भासा ॥ आरंबळत असे आक्रोशें ॥ ५१ ॥ उत्तरक्रिया झालियाउपरी ॥ न राहे रुदन
तयाचें परी ॥ अन्नपाणी वर्जून शरीरीं ॥ प्राण देऊं म्हणतसे ॥ ५२ ॥ मग मायेचा मोह अत्यंत ॥ त्यातें नेऊन परम एकांतांत ॥
म्हणे बाळा शोक कां व्यर्थ ॥ पितयाकरितां करितोसी ॥ ५३ ॥ तरी आतां बाळा तुझा पिता ॥ चिरंजीव आहे महीवरुता ॥
प्रत्यक्ष जाऊन शिवालयीं आतां ॥ निजदृष्टीं विलोकीं ॥ ५४ ॥ तव पित्याचें मच्छिंद्र नाम ॥ चिरंजीव आहे उत्तमोत्तम ॥ ऐसें
ऐकतां राजोत्तम ॥ पिता कैसा म्हणतसे ॥ ५५ ॥ मग प्रवेशादि सकळ वार्ता ॥ सांगती झाली निजसुता ॥ धर्मराय ऐकून तत्त्वतां ॥
तुष्ट झाला शरीरातें ॥ ५६ ॥ मग शीघ्र घेऊन कटकभार[1] ॥ शिवालयीं आला अति सत्वर ॥ भावें नमून नाथ मच्छिंद्र ॥ शिबि-
कासनीं[2] वाहिला ॥ ५७ ॥ नेऊन आपुले राजभवनीं[3] ॥ सेवा करीतसे प्रीतीकरूनी ॥ मग तो एक संवत्सर तेथें राहुनी ॥ पुढें तीर्था
चालिला ॥ ५८ ॥ चालिला परी धर्मनाथ ॥ परम झाला शोकाकुलित ॥ म्हणे ताता तव सांगातें ॥ मीही तीर्था येतों कीं ॥ ५९ ॥
याउपरी बोले मच्छिंद्रनाथ ॥ बाळा द्वादश वर्षीं येऊं येथें ॥ मग जोग देऊं गोरक्षहातें ॥ तूतें सवें नेईन मी ॥ ६० ॥ आतां रेव-
तीची सेवा करून ॥ भोगीं आपुलें राज्यासन ॥ जेथें रेवती तेथें प्राण ॥ माझा असे हो बाळका ॥ ६१ ॥ तिची सेवा केलि-
यानें ॥ संतुष्ट आहे माझें मन ॥ ऐसें करून समाधान ॥ त्रिवर्ग तेथून निघाले ॥ ६२ ॥ मग तीर्थाटणीं भ्रमण करिती ॥ येऊन
पोहोंचले गोदातटीं ॥ धामनगर काननपुटीं ॥ येऊनियां पोहोंचले ॥ ६३ ॥ ग्रामनाम ऐकून कानीं ॥ गोरक्षाचे अंतःकरणीं ॥
स्मरण झालें कृषीधर्मी ॥ माणिकनामी कृषीचें[4] ॥ ६४ ॥ मग मच्छिंद्रातें सांगे समस्त ॥ अडबंग भेटला एक तेथें ॥ मी प्रसन्न
होतां आपुल्या चित्तें ॥ कांहीं वर न घे तो ॥ ६५ ॥ मग मुळापासून तयाचें कथन ॥ मच्छिंद्रा केलें निवेदन ॥ मच्छिंद्रें ऐकून
वर्तमान ॥ म्हणे पुनः आतां पाहावा ॥ ६६ ॥ मग शेतसुमार धरून चाली ॥ चालत आले त्रिवर्ग पाउलीं ॥ तो माणीकनामें
निश्चयबळी ॥ काष्ठासमान देखिला ॥ ६७ ॥ मौळीं[5] विराजे वेष्टन ॥ बाबऱ्या रुळती महीकारण ॥ नखें जुळमट गेलीं होऊन ॥
मांस दिसेना तिळभरी ॥ ६८ ॥ अस्थी त्वचा झालीं एक ॥ पोट झालें पृष्ठीं स्थायिक ॥ दृष्टी लावूनियां देख ॥ मंत्रजप करीतसे

१ सैन्यसमुदाय. २ पालखींतून. ३ राजवाड्यांत. ४ शेतकऱ्याचें. ५ मस्तकाचे ठिकाणीं.

॥ ६९ ॥ ऐसी पाहतां तपाकृती ॥ गोरक्ष धन्य म्हणे चित्तीं ॥ मग नमून मच्छिंद्राप्रती ॥ अडबंग हाचि म्हणतसे ॥ ७० ॥ मग निकट येऊन त्रिवर्ग जण ॥ बोलते झाले तयाकारण ॥ म्हणती आतां तपोधन ॥ पूर्ण तप करीं कां रे ॥ ७१ ॥ येरू वचन त्यां देत ॥ तुमचें यांत काय जात ॥ धरून आपला शुद्ध पंथ ॥ गमन करावें येथूनियां ॥ ७२ ॥ जें जें बोले मच्छिंद्रनाथ ॥ तया वांकडेपणें उत्तर देत ॥ मग गोरक्ष म्हणे मच्छिंद्रातें ॥ हा अडबंग असे महाराजा ॥ ७३ ॥ तरी याचें आतां हित ॥ युक्तीनें करितों बैसा स्वस्थ ॥ मग तरुच्छायेनिकट तेथें ॥ मच्छिंद्र जाऊन बैसला ॥ ७४ ॥ चौरंगी आणि मच्छिंद्रनाथ ॥ गोरक्षाची मौज पाहत ॥ गोरक्ष जाऊन पैं तेथ ॥ अहा अहा म्हणतसे ॥ ७५ ॥ अहा म्हणून वाणी ॥ म्हणे ऐसा महीतें दुजा स्वामी ॥ आम्हीं देखिला नाहीं नयनीं ॥ तपोनिधि[1] आगळा हो ॥ ७६ ॥ समुद्रवलयांकित ॥ पृथिवी पाहिली आहे समस्त ॥ परी ऐसा तपोनाथ ॥ देखिला नाहीं निजदृष्टीं ॥ ७७ ॥ तरी ऐसा स्वामी योगमुनी ॥ याचा अनुग्रह घ्यावा कोणीं ॥ गुरु झालिया ऐसा प्राणी ॥ दैव अपार मिरवतसे ॥ ७८ ॥ तरी आतां असो कैसें ॥ गुरु करावा आपणास ॥ ऐसें बोले त्यास ॥ प्रज्ञावंत महाराजा ॥ ७९ ॥ म्हणे स्वामी कृपा करून ॥ मज अनुग्रहीं गुरु होऊन ॥ येरू बोलणें ऐकोन ॥ अडबंग म्हणे तयासी ॥ ८० ॥ बेटा येवढा थोर झाला ॥ अद्यापि अक्कल नाहीं त्याला ॥ गुरु करूं म्हणतो आम्हांला ॥ मूर्खपणीं आगळा हा ॥ ८१ ॥ मग मजला गुरु करूं पाहशी ॥ तरी तूंच कां बेव्या होईनासी मजसीं ॥ ऐसें म्हणून स्वमुखासी ॥ तया कर्णीं लावीतसे ॥ ८२ ॥ कर्ण लागतां गोरक्षाननीं ॥ सज्ञानमंत्र ब्रह्मखाणी ॥ परम कृपें कर्णीं फुंकूनी ॥ सनाथ केला क्षणार्धें ॥ ८३ ॥ मंत्र पडतां कर्णपुटीं ॥ त्रैलोक्याची आली दृष्टी ॥ स्थावरजंगम[3] एकथाटीं ॥ ब्रह्मरूप भासलें ॥ ८४ ॥ मग अर्थाअर्थीं सकल ज्ञान ॥ झाला बृहस्पतिसमान ॥ मग सांडून आपुलें तपःसाधन ॥ गोरक्षचरणीं लागला ॥ ८५ ॥ मग गोरक्ष भस्मशक्तिप्रयोग ॥ प्रयोगून भाळीं चर्ची सांग ॥ तेणेंकरून सर्वांग ॥ शक्तिवान मिरवलें ॥ ८६ ॥ मग धरून शीघ्र तयाचा हस्त ॥ वृक्षाखालीं आणी नाथ ॥ म्हणे महाराजा कृपावंत ॥ अडबंग हाचि ओळखावा ॥ ८७ ॥ हंसून बोले मच्छिंद्रमुनी ॥ या अडबंगातें अडभंग नामीं ॥ पाचारावें सर्व येथोनी ॥ साजूकपणीं या वाटतसे ॥ ८८ ॥ मग अवश्य म्हणे गोरक्ष त्यास ॥ नाथदीक्षा दिधली खास ॥ मग शीघ्र घेऊन व्यासंगास ॥ तीर्थालागीं जातसे ॥ ८९ ॥ मार्गीं जातां सद्विद्येसी ॥ सकळ तेव्हां पूर्ण अभ्यासी ॥ आपुल्यासमान शस्त्रअस्त्रेंसीं ॥ अडभंग तो मिरवला ॥ ९० ॥ असो ऐसे चारी जण ॥ द्वादश वर्षें तीर्थाटन ॥ करून पुनः प्रयागाकारण ॥ चारी सूर्य पातले ॥ ९१ ॥ येरीकडे धर्मरायासी ॥ पुत्र झाला सतेजराशी ॥ वडिलाचें नांव ठेविलें त्यासी ॥ त्रिविक्रम म्हणोनियां ॥ ९२ ॥ चौघे प्राज्ञिक ग्रामीं येतां ॥ श्रुत झालें धर्मनाथा ॥

१ तपस्वी. २ मोठा. ३ चराचर सर्व वस्तू.

मग कटकभारेंसीं [1]शिबिके तत्त्वतां ॥ बैसवोनि आणिलें सदनासी ॥९३॥ मग धृति वृत्ति भक्ति सघन ॥ करून तोषविलें मच्छिंद्र-
मन ॥ मग त्रिविक्रमसुता राज्यीं स्थापून ॥ दीक्षा घेतली योगाची ॥ ९४ ॥ माघमासीं पुण्यतिथी ॥ द्वितीयेस धर्मराजाची बीज
म्हणती ॥ ते दिवशीं गोरक्ष जती ॥ अनुग्रह देत तयातें ॥९५॥ याउपरी देव मिळवून स्वर्गींचे ॥ आणि प्रजालोक त्या ग्रामींचे ॥
मेळवून चोज अनुग्रहाचें ॥ मोहळें रचिलीं अपार ॥ ९६ ॥ अनुग्रह झाल्यावरती ॥ सकळ बैसोन एकपंक्ती ॥ गोरक्ष कवळ घेऊन
हातीं ॥ सर्वांमुखीं ओपीतसे ॥ ९७ ॥ मग तो आनंद परम जेठी ॥ पाहून धांवले सुरवर थाटीं ॥ तेही प्रसाद पावोन शेवटीं ॥
तुष्ट चित्तीं मिरवले ॥ ९८ ॥ मिरवले परी करिती भाषण ॥ ऐसाच प्रसाद जन्मोजन्म ॥ प्रतिसंवत्सरीं असावा पूर्ण ॥ इच्छे-
लागीं वाटतसे ॥ ९९ ॥ ऐसें बोलतां सुरवर सकळ ॥ ऐकून बोले तपोबळ ॥ माझें नाम घेऊन केवळ ॥ अर्पा जगा प्रतिवर्षीं
॥ १०० ॥ धर्मराजाची बीज म्हणवून ॥ उत्सव करावा तुम्हीं [2]सघन ॥ याच नीतीं कुमारा सांगोन ॥ कवळीं पाहे जगासी ॥ १ ॥
मंत्र स्फुरला म्हणून स्फुरमाण ॥ सकळ तुम्ही बोला वचन ॥ अंबीलपणें शक्तिसमान ॥ सदैव करा उत्सावो ॥२॥ ऐसें महाराजा
गोरक्ष बोलतां ॥ मानवलें सुरवरांच्या चित्ता ॥ मग प्रतिवर्षीं आनंदभरिता ॥ महाउत्सव करीत ॥ ३ ॥ तैंपासून सहजासहज ॥
जगीं मिरवतसे धर्मनाथाची बीज ॥ हें वृत्त आचरल्या महाराज ॥ तुष्ट होतसे गोरक्ष ॥ ४ ॥ पूर्वीं किमयागार ग्रंथांत ॥ स्वयें
बोलिला गोरक्षनाथ ॥ कीं बीजेचें जो आचरील व्रत ॥ शक्तीसमान आपुल्या ॥ ५ ॥ तयाचे गृहीं दोषदरिद्र ॥ रोगभोगादि
विघ्नद्वंद्व ॥ स्वप्नामाजी संसार अभद्र ॥ पाहणार नाहीं निजदृष्टीं ॥ ६ ॥ प्रत्यक्ष रमा सुखें सुरगणीं ॥ त्या गृहीं होईल गृहवासिनी ॥
मग दोषदरिद्र तया अवनीं ॥ स्पर्शावया येईना ॥ ७ ॥ असो माहात्म्य वदावें किती ॥ ते प्राज्ञिक पावले सुखसंपत्ती ॥
जैसी कामना वेधेल चित्तीं ॥ तोचि अर्थ पावेल ॥ ८ ॥ ऐसा गोरक्ष तयाकारण ॥ बोलिला आहे मूळग्रंथीं वचन ॥ तैसें येथें
केलें लेखन ॥ विश्वासातें वरा कीं ॥ ९ ॥ असो तेथें महोत्साह करून ॥ धर्मनाथा नाथदीक्षा देऊन ॥ तेथोन निघाले पांच जण ॥
नरशार्दूळ ते ऐका ॥ ११० ॥ नाना तीर्थें करितां महीसीं ॥ अभ्यासिलें सद्विद्येसी ॥ शाबरीं सहस्र अस्त्रांसीं ॥ प्रवीण केला महा-
राजा ॥ ११ ॥ मग शेवटीं बद्रिकाश्रमीं जाऊन ॥ दृश्य केला उमारमण ॥ धर्मराज तया स्वाधीन ॥ तपालागीं बैसविला ॥ १२ ॥
द्वादश वर्षांचा केला नेम ॥ तपा बैसला नाथ धर्म ॥ येरू तेथून चौघे जण ॥ तीर्थालागीं चालिले ॥ १३ ॥ द्वादश संवत्सर
तीर्थें करून ॥ पुनः पाहिला बद्रिकाश्रम ॥ मग तेथें मावदें अति दुर्गम ॥ बद्रिकाश्रमीं मांडिलें ॥ १४ ॥ सकळ देव सुरवरां-
सहित ॥ पाचारून घेतले तेथ ॥ मावदें झाल्या पूर्ण वरातें ॥ देऊन देव गेले पैं ॥ १५ ॥ मग तो धर्मराज सवें घेऊन ॥ फेरी करिती

१ सर्व सैन्य घेऊन. २ पालखीमध्यें. ३ एकत्र होऊन. ४ मोठा. ५ मोठें विघ्न. ६ लक्ष्मी. ७ नरश्रेष्ठ. ८ श्रीशंकर.

तीर्थाटन ॥ आतां पुढें ऐका कथन ॥ रेवणसिद्धनाथाचें ॥ १६ ॥ पूर्वीं अध्यायशीं सहस्र ऋषी ॥ झाले आहेत [1]विधिवीर्यासीं ॥
त्याच समयीं रेत महीसीं ॥ रेवातीरीं पडियेलें ॥ १७ ॥ रेवातीरीं तेंही रेवेंत ॥ रेत पडिलें अकस्मात ॥ चमसनारायण संचार
करून त्यांत ॥ देहधारीं मिरवला ॥ १८ ॥ बाळतनू अति सुकुमार ॥ बालार्ककिरणीं मनोहर ॥ उकरडां लोळे महीवर ॥ ठेहेंठेहें
म्हणोनियां ॥ १९ ॥ तों त्या काननीं [2]कृषी एक ॥ उत्तम नाम सहनसारूक ॥ तो घट घेऊन न्यावया उदक ॥ रेवातीरा पातला
॥ १२० ॥ पातला परी अकस्मात ॥ येता झाला बाळ जेथ ॥ सहज चालीं पुढें चालत ॥ बाळ दृष्टीं देखिलें ॥ २१ ॥ बाळ परम
अति सुकुमार ॥ कांती कर्दळीगाभाभर ॥ पाहून तयाचें अंतर ॥ विव्हळ मोहें झाला असे ॥ २२ ॥ मग घट ठेवून महीलागीं ॥
धांवोन तांतडीं उचली वेगीं ॥ मोहें कवळून हृदयभागीं ॥ अति स्नेहें धरिलेंसे ॥ २३ ॥ आधींच सहनसारूक नामानें ॥ तेथें दयेसी
काय उणें ॥ आवडीनें करून मुखचुंबन ॥ कुर्वाळीत प्रीतीनें ॥ २४ ॥ मग [3]रिक्तघट भरून आडीं ॥ ग्रामांत आला हरुषापाडीं ॥
सदनीं प्रवेशून आवडीं ॥ कांतेलागीं बोलतसे ॥ २५ ॥ म्हणे जिवलगे आजिचा दिन ॥ मातें झाला धातुहेम ॥ तरी शिवलते-
लागीं द्रुम ॥ कुंभापरी मिरवला ॥ २६ ॥ सहज गेलों उदकातें ॥ रेवातीरीं वाळवंटींत ॥ आपणा ईश्वरें दिधला सुत ॥ वंशावळी
मिरवावया ॥ २७ ॥ ऐसी ऐकतां कांता गोष्टी ॥ म्हणे कोठें मज दावा दृष्टीं ॥ तंव तो काढून वस्त्रपुटीं ॥ करसंपुटीं देतसे ॥ २८ ॥
तंव ती कांता उत्तमनामी ॥ धार्मिकबुद्धी संसारधार्मीं ॥ बाळ देखतां देहधर्मीं ॥ हर्षसिंधू लोटला ॥ २९ ॥ जैसा पूर्ण चंद्र दृष्टीं ॥
दृश्य होतां उदधिपोटीं ॥ आनंद भरून तोयदाटीं ॥ उचंबळा दाटतसे ॥ १३० ॥ कीं दरिद्रियास [4]मांदुस होय दर्शन ॥
मग तयाचा आनंद वर्णील कोण ॥ तेवीं उत्तम मनोधर्म ॥ आनंददरीं मिरवतसे ॥ ३१ ॥ बाळ धरून हृदयसंपुटीं ॥ चुंबन घेत
स्नेहाचे पोटीं ॥ मग तैलउदकीं न्हाणून शेवटीं ॥ पालखातें घातलें ॥ ३२ ॥ तियेचें तान्हुलें होतें घरीं ॥ निजविला योगी तया-
शेजारीं ॥ स्तनपान केलियाउपरी ॥ बाळ निजे पालखीं ॥ ३३ ॥ असो ऐसें नित्यानित्य ॥ बाळ संगोपी ममतें ॥ रेवण नाम ठेवोन
त्यातें ॥ मोहेंकरून सांभाळी ॥ ३४ ॥ रेवातीरीं बाळ रेवेंत ॥ सांपडलें म्हणून त्यातें ॥ रेवणनाम साजूकवंत ॥ सहनसारूक ठेवो-
नियां ॥ ३५ ॥ असो रेवणनामियाचें संगोपन ॥ करिती उभयतां पालन ॥ ऐसे लोटतां बहुत दिन ॥ प्रपंचराहटी करीतसे ॥ ३६ ॥
द्वादशसंवत्सर प्रपंचराहटी ॥ [5]कृषिकर्मविद्यापाठीं ॥ पूर्ण झाला आवुता जेठी ॥ पितयाहून आगळा ॥ ३७ ॥ नांगर वरवरपाली पेरण ॥
काकपक्ष्यादि करी रक्षण ॥ ऐसा कृषिकर्मीं निपुण ॥ रेवणनाथ झाला असे ॥ ३८ ॥ तो कोणे एके दिवशीं ॥ उठून मागिले प्रहर-
निशीं ॥ [6]वृषभ सोडून काननासीं ॥ चारावयासी चालिला ॥ ३९ ॥ चांदणें पडलें असे सुदृढ ॥ दृश्य होतसे महीची वाट ॥ सदृढ-

१ ब्रह्मदेवाच्या वीर्येंकरून. २ शेतकरी. ३ रिकामी घागर. ४ मोठा ठेवा भरलेली पेटी. ५ शेतकीच्या कामांत. ६ बैल.

पणें गोचर वाट ॥ निजचक्षूतें होतसे ॥ १४० ॥ दादा म्हणून वृषभापाठीं ॥ हांकीत चालिला आहे जेठी ॥ तों अनुसूयाशुक्तिकारत्न वाटीं ॥ पुढें झाले अकस्मात ॥ ४१ ॥ परी तो महाराज अत्रिनंदन ॥ पवनवेगें तयाचें गमन ॥ नेमिले ठायीं करून स्नान ॥ गिरनार पर्वतीं जातसे ॥ ४२ ॥ पायीं खडावा सुशोभित ॥ एक अंचल अंगीं शोभत ॥ शुभ्र कौपीन विराजित ॥ कंठतटा वेष्टुनी ॥ ४३ ॥ मौळीं वेष्टिल्या असती जटा ॥ दाढी मिशा रंग पिंगटा ॥ सकळ ज्ञानियांचा वरिष्ठा ॥ कनककांति शोभतसे ॥ ४४ ॥ ऐसा महाराज अत्रिनंदन ॥ जो त्रितयदेवांचा अवतार पूर्ण ॥ अति लगबगें करीत गमन ॥ पुढील नेम मानूनियां ॥ ४५ ॥ तों मार्गावरी अकस्मात वृषभगमन देखत ॥ वृषभाआड रेवणनाथ ॥ दृष्टीं नाहीं आतळला ॥ ४६ ॥ मानवगती तेणें देखोन ॥ पुढें आला अत्रिनंदन ॥ सहजस्थिती वृषभामागून ॥ पाउलें ठेवी चालावया ॥ ४७ ॥ तों सर्वांमागील वृषभ पूर्ण ॥ शरीरीं मिरवे शैल्यपण ॥ तयाआड नाथ रेवण ॥ बाळतनू चालतसे ॥ ४८ ॥ तों वृषभामागें येत दत्त ॥ वृषभ बुजोन पुढें पळत ॥ मागें अंतरतां रेवणनाथ ॥ त्यावरी दत्त आदळला ॥ ४९ ॥ उभयदेहीं कामपणीं ॥ ऐक्य झाली देहधरणी ॥ परी स्पर्श होतां अंतःकरणीं ॥ ज्ञानदीप उजळला ॥ १५० ॥ विमूढपणीं कृषिकर्मांत ॥ अज्ञान सर्वांपरी वर्तत ॥ सदा बसणें अरण्यांत ॥ अबुद्धिपणें वर्ततसे ॥ ५१ ॥ परी दत्तात्रेयाचा स्पर्श होतां ॥ पूर्वजन्मातें झाला देखता ॥ चित्तीं म्हणे मी महीवर असतां ॥ कवण स्थिती पावलों ॥ ५२ ॥ आहें मी पूर्वींचा नारायण प्रकाम ॥ परम प्राज्ञिक चमसनाम ॥ ऐसें असून कृषिकर्म ॥ येथें करीत बैसलों ॥ ५३ ॥ वंद्य असतां तिहीं लोकांत ॥ आतां कोणी ओळखीना मातें ॥ सदा काननीं झालों रत ॥ अहितकामीं प्रपंचा ॥ ५४ ॥ ऐसें देहीं झालिया ज्ञान ॥ मग स्तब्ध धरून राहे मौन ॥ परी धडक बैसतां अत्रिनंदन ॥ कोण तूं ऐसा पुसतसे ॥ ५५ ॥ कोण तूं ऐसें पुसतां दत्त ॥ करिता झाला प्रणिपात ॥ म्हणे महाराजा या देहांत ॥ अंश असे तुझा कीं ॥ ५६ ॥ तुमचे देहीं त्रिदेवांचे अंश ॥ परी सत्वगुणी जो महापुरुष ॥ तो मी येथें प्रपंचदेहास ॥ परम कष्टें कष्टलों ॥ ५७ ॥ तरी आतां क्षेमोदयास ॥ उदित करा जी महापुरुष ॥ सनाथ करूनियां या देहास ॥ महीलागीं मिरवावें ॥ ५८ ॥ ऐसें म्हणून दृढोत्तर चरणीं ॥ मौळी अर्पी प्रेमेंकरोनी ॥ म्हणे मज सनाथ केल्यावांचुनी ॥ कदा न सोडीं तुम्हांतें ॥ ५९ ॥ ऐसें वदून वाग्वटीं ॥ सदृढपणीं देत मिठी ॥ परी आदरें प्रेमपोटीं ॥ दत्तजेठी मिरवला ॥ १६० ॥ तयाचा पाहून भक्तिआदर ॥ सदृढपणीं निश्चयपर ॥ मग कमंडलु ठेवून महीवर ॥ मौळीं कर स्थापीतसे ॥ ६१ ॥ भाळाखालीं घालून हात ॥ उठविला रेवणनाथ ॥ मनांत म्हणे हा सनाथ ॥ पूर्वींचाचि असे कीं ॥ ६२ ॥ हा नवांमाजी असे एक ॥ नाथपंथी अवतार दोंदिक ॥ चमसनारायण प्रतापार्क ॥ महीवर विराजला ॥ ६३ ॥ तरी आतां यातें सनाथ ॥

१ दत्तात्रय. २ कल्याण व्हावें म्हणून. ३ वाणीनें. ४ मोठा. ५ प्रतापसूर्य.

करून वाढवावा नाथपंथ ॥ कृपें ठेवोन मौळीं हस्त ॥ केला अंकित आपुला ॥ ६४ ॥ कृपें मौळीं ठेविला कर ॥ परी अनुग्रहाचें केलें अंतर ॥ म्हणाल कासयासाठीं उदार ॥ झाला नाहीं अनुग्रहा ॥ ६५ ॥ तरी चित्तीं योजिता झाला दत्त ॥ भक्तिश्रम यास घडले नाहींत ॥ तरी कांहीं देहीं प्रायश्चित्त ॥ घडोन यावें ययातें ॥ ६६ ॥ तरी भक्तिश्रम घडतां सांग ॥ उपदेश मग द्यावा अव्यंग ॥ मग ज्ञानवैराग्याचा मार्ग ॥ ब्रह्मस्थितीं मिरवेल हा ॥ ६७ ॥ ऐसें म्हणून अनुग्रहारहित ॥ कृपा मौळीं ठेविला हस्त ॥ परी भक्तीलागीं रेवणनाथ ॥ काय करी महाराजा ॥ ६८ ॥ एक सिद्धीची कळा त्यातें ॥ सांगता झाला कृपावंत ॥ असतां बीज रोपून किंचित ॥ दृष्टी ठेवील पुढारां ॥ ६९ ॥ जैसें अर्भका देऊन धन ॥ पिता मिरवी व्यवसायाकारण ॥ मग तयाचे पुढें चांगुलपण ॥ निजदृष्टीं पाहतसे ॥ १७० ॥ किंवा महींत मेळवण ॥ घालून पाहती दुग्धाकारण ॥ कीं पत पहातसे देऊन धन ॥ सावकार कुळातें ॥ ७१ ॥ तेवीं सहस्रांशेंकरून ॥ महिमान सिद्धीचें सांगून ॥ तुष्ट केलें तयाचें मन ॥ प्रज्ञावंतें महाराजें ॥ ७२ ॥ परी ती कळा होतांच प्राप्त ॥ रेवण झाला आनंदभरित ॥ मग प्रेमें नमून अनुसूयासुत ॥ बोळविले तत्क्षणीं ॥ ७३ ॥ परी विरह मानून चित्तीं ॥ चालता झाला काननाप्रती ॥ परी अंतरला आपुल्या हितीं ॥ निजपदातें पहावया ॥ ७४ ॥ जैसें कोंडवळ्या कांजी ॥ देतां भूत होतसे राजी ॥ तैसा अल्पसिद्धीमाजी ॥ तुष्ट झाला तो पुरुष ॥ ७५ ॥ परम लाधली होती धणी ॥ परंतु दवडिली अज्ञानपणीं ॥ खापरासाठीं चिंतामणी ॥ सोडून दिधला हातींचा ॥ ७६ ॥ कीं सुरा[2] लागून परम गोड ॥ सोडिली अमृतरसाची चाड ॥ कीं निर्मळपणीं पाहून दगड ॥ परिस हातींचा सोडिला ॥ ७७ ॥ तेवीं प्रत्यक्ष नाथ रेवण ॥ भुलला सिद्धिप्रकरणेंकरून ॥ सिद्धिबुद्धि अत्रिनंदन ॥ हातींचा सोडिला नायकें ॥ ७८ ॥ असो ऐशी संप्रदाययुक्ती ॥ निस्पृह पातला आपुल्या शेतीं ॥ तेथील कथा होईल श्रोतीं ॥ पुढिले अध्यायीं ऐकावी ॥ ७९ ॥ धुंडीसुत नरहरिवंशीं ॥ सांगेल तुम्हां श्रोतियांसी ॥ संतकृपें नाम देहासी ॥ मालू ऐसें म्हणती तया ॥ १८० ॥ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागार ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ चतुस्त्रिंशति अध्याय गोड हा ॥ ८१ ॥ ॥ अध्याय ॥ ३४ ॥ ओंव्या ॥ १८१ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

१ पूर्ण. २ मद्य.



## ॥ नवनाथभक्तिसार चतुस्त्रिंशति अध्याय समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ जयजयाजी करुणाकरा ॥ पंढरीशा रुक्मिणीवरा ॥ दीनबंधो दयासागरा ॥ पुढें ग्रंथ बोलवीं ॥ १ ॥ तूं दयाळ विश्वंभर ॥ बहुधा अर्थी हें चराचर ॥ भरण करिसी जन्म दिल्यावर ॥ कामनेतें[1] लक्षुनी ॥ २ ॥ तरी मम कामनेचा अर्थ ॥ कीं ग्रंथाक्षरें व्हावीं रसभरित ॥ तरी ग्रंथांतरीं भराभर उदित ॥ विश्वंभरा होईं कां ॥ ३ ॥ मागिले अध्यायीं उत्तम कथन ॥ रेवणनाथाचा झाला जन्म ॥ सहनसारुकें कृषिकर्म[2] ॥ बोलूनियां दाविलें ॥ ४ ॥ दाविलें परी दैवेंकरून ॥ अवचट देखिला अत्रिनंदन[3] ॥ जो शंकरसेवक तयालागून ॥ तेंच प्राप्त होतसे ॥ ५ ॥ हिरातेज गूढ स्थानालागुनी ॥ दडे तरी तया काढी हिरकणी ॥ भेटीलागीं येत धांवोनी ॥ लोहालागीं चुंबक ॥ ६ ॥ कां हंसपक्षी भक्षणांत ॥ कदा न भक्षी मुक्ताविरहित ॥ जरी गुंतला पिंजऱ्यांत ॥ परी तेंच भक्ष्य भक्षीतसे ॥ ७ ॥ तेवीं रेवण योगमूर्ती ॥ मार्गींच भेटला अवचटगती ॥ दुग्धालागीं शर्करा निश्चितीं ॥ लवण[4] कांहीं मिरवेना ॥ ८ ॥ असो ऐसा अवसर त्यांत ॥ घडला परी अबुद्धिवंत ॥ सिद्धिकळा घेऊन चित्तांत ॥ अत्रिसुत दवडिला ॥ ९ ॥ दत्तें केलें शहाणपण ॥ किंचित कळा त्या दाखवून ॥ रक्षून आपुलें सकळ भूषण ॥ गेला निघूनि महाराजा ॥ १० ॥ जेवीं मर्कटा चणे देउनी ॥ मार्गीं हिंडविती बुद्धिमंत प्राणी ॥ तेवीं अत्रिआत्मज करणी ॥ करूनि गेला महाराजा ॥ ११ ॥ येरीकडे रेवणनाथ ॥ वृषभ ठेवूनि स्वशेतांत ॥ येऊनियां सिद्ध आउत ॥ करिता झाला महाराजा ॥ १२ ॥ सकळ शेत झाल्यापाठीं ॥ नागदोर कवळून करसंपुटीं ॥ आउतमार्गीं फिरत जेठी ॥ गायनातें आरंभिलें ॥ १३ ॥ आरंभिलें परी दत्तवचन ॥ मंत्रप्रयोगें गाय गायन ॥ दत्तमहिमा ऐसें म्हणून ॥ वृषाभातें बोलतसे ॥ १४ ॥ येरी महिमा ऐसें वचन ॥ सहज बोले प्रयोगानें ॥ परी महिमासिद्धि प्रत्यक्षपणें ॥ प्रगट झाली ते ठायीं ॥ १५ ॥ सिद्धि येऊनि आउतापाशीं ॥ म्हणे कामना कोण तुजसी ॥ येरू म्हणे तव नामासी ॥ श्रुत मातें करीं कां ॥ १६ ॥ येरी म्हणे मी सिद्धि पूर्ण ॥ देहधारी महिमान ॥ ऐसें ऐकतां उत्तमोत्तम ॥ दत्तबोल आठवला ॥ १७ ॥ जेव्हां सिद्धि दत्त देता ॥ ते सिद्धीची सकळ वार्ता ॥ सांगोनियां रेवणनाथा ॥ गेला होता महाराजा ॥ १८ ॥ कीं हा प्रयोगितां मंत्र ॥ महिमा नामें सिद्धि पवित्र ॥ प्रत्यक्ष होईल तुजपुढें पवित्र ॥ कामनेतें पुरवावया ॥ १९ ॥ मागणें जे अर्थिक कामना मनीं ॥ तूं तीस दाखवीं बोलूनी ॥ मग तितुके कार्यालागुनी ॥ सकळ कामना पुरवील ॥ २० ॥ म्हणसील काय आहे प्रताप तिचा ॥ तरी वदतां न ये आपुले वाचा ॥ सकळ भोग जो महीचा ॥ प्राप्त करील क्षणार्धें ॥ २१ ॥ कानन तरु पाषाणपर ॥ जितुके असतील महीवर ॥ तितुके कल्पतरु साचार ॥ करून देईल क्षणार्धें ॥ २२ ॥ आणि तुळवट जेथ पाषाणखाणी ॥ तपाची दावी अपार करणी ॥ कीं परीस तेवीं चिंतामणी ॥ करूनि दावी क्षणार्धें ॥ २३ ॥ वसन[5] भूषण धनकनकराशी ॥ अपार दावी नगाऐशी[6] ॥ जें जें वर्तेल स्वकामनेसीं ॥

१ इच्छेला. २ शेतकी. ३ श्रीदत्तात्रेय. ४ मीठ. ५ वस्त्र. ६ पर्वतासमान.

तो तो अर्थ पुरवील बा ॥ २४ ॥ ऐसें सांगून अत्रिआत्मजें ॥ ओपिलें होतें मंत्रबीज ॥ ऐसें श्रुत होतां सहजें ॥ दाटला होता गर्वानें ॥ २५ ॥ परंतु निःस्पृह होतां आनंदभरित ॥ हांकीत होता शेतांत आउत ॥ मंत्रप्रयोगीं विचारीत ॥ सहजस्थिति केलीसे ॥ २६ ॥ परी महिमासिद्धि भेटतां त्यातें ॥ अधिक झाला आनंदभरित ॥ म्हणे सत्पंथ सांगोनि दत्त ॥ गेला असे महाराजा ॥ २७ ॥ मग हातींचा सोडूनि आउतदोर ॥ तीतें बोलता होय उत्तर ॥ म्हणे शेतीं पैल असे तरुवर[1] ॥ छायेंकरून वेष्टिला ॥ २८ ॥ तरी त्या शीतळ छायेतें ॥ कणाच्या राशी अपरिमित ॥ कनक करीं एक क्षणांत ॥ चमत्कार दावीं कां ॥ २९ ॥ दृष्टी पडतां कनकराशी ॥ मग मी म्हणेन सिद्धि तुजसी ॥ मग जे कामना होईल देहासी ॥ ते मी तुजला सांगेन ॥ ३० ॥ तरी हें ऐसें परीक्षावचन ॥ आधीं दावीं मजकारण ॥ जैसा मोहोरा सूत गुंडोन ॥ अग्नि रक्षी परीक्षे ॥ ३१ ॥ कीं पक्षिकुळांतें हंसदृष्टी ॥ परीक्षे ओपी[2] पयतोयवाटी ॥ कीं परिसा[3] पारखपाषाणथाटीं ॥ लोह मिरवी कनकातें ॥ ३२ ॥ तेवीं आतां परीक्षापण ॥ दावीं मिरवून अपार सुवर्ण ॥ तेणें मग संशय-विरहित होवोन ॥ गोड होईल चित्तातें ॥ ३३ ॥ ऐसें बोलतां रेवणनाथ ॥ सिद्धि आश्चर्यें हास्य करीत ॥ म्हणे महाराजा एक क्षणांत ॥ कनकधनें भरीन मही[4] सकळ ॥ ३४ ॥ मग सहज आणून कृपादृष्टी ॥ विलोकीतसे महीपाठीं ॥ तों नगासमान[5] कनकधनथाटी ॥ अपार राशी मिरवल्या ॥ ३५ ॥ तें पाहूनि रेवणनाथ ॥ म्हणे माते तूं आहेस सत्य ॥ तरी आतां सन्निध मातें ॥ येथूनियां रक्षीं कां ॥ ३६ ॥ तूं सन्निध असतां सर्व काळ ॥ पुरविसी सकळ इच्छाफळ ॥ ऐसें बोलतां ती वेल्हाळ ॥ बोलती झाली तयातें ॥ ३७ ॥ म्हणे सन्निध राहीन आतां ॥ परी गुप्त वर्तेन जगाकरितां ॥ तुवां न धरावी दर्शनस्पृहता ॥ कार्य तुझें करीन मी ॥ ३८ ॥ मग अवश्य म्हणे रेवणनाथ ॥ कार्यसंबंधीं असावें उदित ॥ मग कनकधनराशी गुप्त ॥ अदृश्य सिद्धि मिरवली ॥ ३९ ॥ त्यावरी सायंकाळपर्यंत ॥ शेतीं प्रेरिलें समग्र आउत ॥ मग गुरांसवें येऊनि गोठंगणांत ॥ वृषभातें बांधिलें ॥ ४० ॥ रात्रीं करूनि शयनीं शयन ॥ तों उदय झाला द्वितीय दिन ॥ मग मनांत म्हणे ब्रह्मनंदन ॥ व्यर्थ कां कष्टें कष्टावें ॥ ४१ ॥ शेतीं सायंकाळपर्यंत ॥ संवत्सर हांकावें आउत ॥ तरी आतां कष्ट केंउते[6] ॥ व्यर्थ शरीरा शिणवावें ॥ ४२ ॥ निधान[7] असतां आपुले हातीं ॥ दैन्य भोगावें कवणे अर्थीं ॥ परीस लाधला धन-प्राप्ती ॥ मेळवूं कां जावें देशांतरा ॥ ४३ ॥ सुरसुरभी[8] असतां घरीं ॥ तक्र मागावें घरोघरीं ॥ चिंतामणि ग्रीवेमाझारीं ॥ असतां चिंता कां भोगावी ॥ ४४ ॥ ऐशा कल्पना आणून चित्तीं ॥ सोडोनि दिधलें जाणें शेतीं ॥ तों दिन येत प्रहरमिती[9] ॥ सहनसारू बोलतसे ॥ ४५ ॥ म्हणे वत्सा सोडून आउत ॥ गृहीं बैसलासी कवणें अर्थें ॥ येरू म्हणे जाऊन शेतांत ॥ काय ताता करावें ॥ ४६ ॥ कष्ट करितां रात्रं-दिवस ॥ काय मिरवलें फळास ॥ येरू म्हणे धान्य खावयास ॥ पिकवावें पाडसा ॥ ४७ ॥ शेत पिकलिया अपार कणीं ॥ मग सुख

१ उत्तम वृक्ष. २ देतो. ३ परिस मण्याला. ४ पृथ्वी. ५ पर्वतप्रमाणें. ६ कसे. ७ ठेवा. ८ कामधेनु. ९ प्रहरपर्यंत.

भोगून अवनीं[1] ॥ नातरी भ्रांती खावयालागुनी ॥ पुढें होईल बाळका ॥ ४८ ॥ ऐसें ऐकून तातवचन ॥ म्हणे कष्टें पिकवावें शेतीं अन्न ॥ तरी आपुले गृहीं काय न्यून ॥ म्हणोनि आतां कष्ट करावे ॥ ४९ ॥ येरू म्हणे बा आपुल्या गृहासीं ॥ काय आहे न कळे मजसी ॥ नित्य स्थापून येरयेरा करब्यासी ॥ दिवसपरी लोटीतसें ॥ ५० ॥ येरू म्हणे बोलसी खोटें ॥ सदन[2] भरलेंसे कनकवटें ॥ जाऊन पहा खरें खोटें ॥ बोल माझे महाराजा ॥ ५१ ॥ तंव तो हांसून सहजस्थितीं ॥ गमन करीतसे धवळाराप्रती[3] ॥ तों कनकराशी धन अपरिमिती ॥ गृहामाजी मिरवती ॥ ५२ ॥ तें पाहूनियां सहनसारुक ॥ चित्तीं आश्चर्य मानी दोंदिक[4] ॥ म्हणे कैसें झालें कौतुक ॥ बाळबोलेंकरूनियां ॥ ५३ ॥ मग परम होवोनि हर्षयुक्त ॥ म्हणे वरदवाणी आहे सत्य ॥ कोणी अवतारी प्रतापवंत ॥ सिद्धमुनि हा असे ॥ ५४ ॥ मग तो सहनसारुक ऋषी ॥ कदा न सांगे कवण्या कार्यासी ॥ प्रमाण मानून त्याचे बोलासी ॥ तदनुसारें वर्तत ॥ ५५ ॥ मग तो रेवण ब्रह्मसुत ॥ काय करीतसे नित्यानित्य ॥ बुंधल ग्राम तो थोर अत्यंत ॥ मार्गावरी नांदतसे ॥ ५६ ॥ तें पांथस्थ येतां मुकामासी ॥ पाचारूनि नेतसे सदनासी ॥ कामनेसमान आहारासी ॥ अन्न देतसे नित्यशा ॥ ५७ ॥ मग गांवांत पडली एक हांक ॥ कीं रेवण देत अन्न उदक ॥ मग चुंगावरचुंगा[5] लोक ॥ पांथिक सत्वर धांवती ॥ ५८ ॥ मग जैसी ज्याची इच्छा गहन ॥ तैसी पुरवी नाथ रेवण ॥ वस्त्रपात्र अपार धन ॥ देवोनियां बोळवी ॥ ५९ ॥ रोगभोगादि मनुष्यें येती ॥ तीं सर्व दुःखांची पावून शांती ॥ धन्य म्हणून गृहासी जाती ॥ यशकीर्ति वर्णीत पैं ॥ ६० ॥ मग जगांत होऊन प्रसिद्ध ॥ सर्वत्र म्हणती धन्य हा सिद्ध ॥ देशविदेशीं जगाचें वृंद ॥ रेवणसिद्ध म्हणताती ॥ ६१ ॥ तों कोणे एके दिवशीं मच्छिंद्रनाथ ॥ महीं करीत नानातीर्थ ॥ बुंधलग्रामीं अकस्मात ॥ मुकामातें पातला ॥ ६२ ॥ वस्तीसी धर्मशाळेंत राहून ॥ करीत बैसला श्रीगुरुचिंतन ॥ तों त्या गांवींचे कांहीं जण ॥ धर्मशाळेंत पातले ॥ ६३ ॥ येतांच त्यांनीं देखिला नाथ ॥ म्हणती बाबा उतरलासी येथ ॥ तरी सारावया आपुला भक्त ॥ रेवणसिद्ध पाहावा ॥ ६४ ॥ येरू पुसे त्यातें वचन ॥ रेवणसिद्ध आहे कोण ॥ मग ते सांगती मुळापासून ॥ कृषिकर्मी[6] शोध हा ॥ ६५ ॥ ऐसें ऐकतां मच्छिंद्रनाथ ॥ जाऊनि पाहे अंतरीं गुप्त ॥ तों दृष्टीं देखतां म्हणे चित्तांत ॥ अवतार असे हा एक ॥ ६६ ॥ आमचा सांगाती[7] पूर्णांश ॥ हा नारायण प्राज्ञ चमस ॥ तरी प्रसन्न कोण झाला यास ॥ शोध करूं तयाचा ॥ ६७ ॥ पुनः येवोनि धर्मशाळेंत ॥ लोकांस म्हणे गुरु कोण यातें ॥ कोण मिरवला जगातें ॥ निजदेहाचें नाम सांगा ॥ ६८ ॥ तंव ते म्हणती बाबा नाथ ॥ आम्हां नाहीं माहीत ॥ मग स्तब्ध राहून मच्छिंद्रनाथ ॥ काय करी महाराजा ॥ ६९ ॥ पक्षिकुळांतें पाचारून ॥ घालिता झाला इच्छाभोजन ॥ एका करीं बैसवोन ॥ तुष्ट करून बोळवी ॥ ७० ॥ शिरीं स्कंधीं पक्षिमेळा ॥ मच्छिंद्र बैसोन वेष्टी सकळां ॥ जाय म्हणतां उतावेळा ॥ अंबरातें[8] जाती पैं ॥ ७१ ॥ मग पाचारून वनचरांसी ॥ त्यांसही देत

१ पृथ्वीवर. २ घर. ३ वाड्यामध्यें. ४ मोठें. ५ झुंडीच्या झुंडी. ६ शेतकरी. ७ सोबती. ८ आकाशांत.

आहारासी ॥ आपुले हस्तें व्याघ्रसिंहांसी ॥ ग्रास देत महाराजा ॥ ७२ ॥ ऐसें होतां कांहींएक दिवस ॥ लोक म्हणती महापुरुष ॥ हा ईश्वरच म्हणून यास ॥ श्वापद [1]विहंगम स्पर्शिती ॥ ७३ ॥ मग धन्य धन्य म्हणूनि ख्याती ॥ रेवणसिद्धासी सांगती ॥ म्हणती आला आहे एक जती ॥ सर्वांपरी अद्भुत ॥ ७४ ॥ विहंगमादि श्वापदगण ॥ सहज घेतसे पाचारून ॥ तेही येती संशय सोडून ॥ भेटीलागीं तयाच्या ॥ ७५ ॥ करीं स्कंधीं करूनि आरोहण ॥ अन्नोदकातें सेववून ॥ जा म्हणतां करिती गमन ॥ तृप्त मना मिरवोनी ॥ ७६ ॥ म्हणाल बोलणें व्यर्थ चावटी ॥ तरी आपण पहावें तया दृष्टीं ॥ पक्षी श्वापदें कोट्यनुकोटी ॥ तयापाशीं येताती ॥ ७७ ॥ ऐसें ऐकून रेवणसिद्ध ॥ पाहूं चालिला प्रतापसिद्ध ॥ तों येतां देखिलें पक्षियांचें [2]वृंद ॥ करीं शिरीं मिरवले ॥ ७८ ॥ तें पाहून आश्चर्यवंत ॥ म्हणे वनचरीं कैसें सांडिलें द्वैत ॥ तरी फेडूं या संशयातें ॥ प्रत्यक्ष सिद्ध कोण हा ॥ ७९ ॥ मग शीघ्र येवोनि आपुले सदनीं ॥ जाऊन बैसले एकांतस्थानीं ॥ दत्तमंत्र प्रयोगूनी ॥ प्रत्यक्ष करूं सिद्धीतें ॥ ८० ॥ मग होतां प्रत्यक्ष सिद्धी ॥ म्हणे महाराजा विशाळबुद्धी ॥ कवण कामनें काय सिद्धी ॥ प्रत्यक्ष केलें तुवां मातें ॥ ८१ ॥ येरू म्हणे वो कृपासरिते ॥ तुष्ट करिसी सर्व जगातें ॥ तेचि रीतीं पक्षिकुळांतें ॥ तुष्ट करीं श्वापदें कीं ॥ ८२ ॥ तुष्ट करिसी तरी कैसें ॥ हरून त्यांच्या देहबुद्धीस ॥ मम सन्निध स्वअंगास ॥ संगोपावें जननीये ॥ ८३ ॥ येरी ऐकोन वागुत्तर ॥ म्हणे महाराजा पक्षी आणि वनचर ॥ होणार नाहींत अद्वैतपर ॥ ब्रह्मवेत्त्यावांचोनी ॥ ८४ ॥ जो स्थावर आणि जंगमांत ॥ सर्वांचे नांदे हृदयांत ॥ तयाचिया गोष्टी ह्या निश्चित ॥ जो अद्वैतपणें वसतसे ॥ ८५ ॥ हे महाराजा ऐक बोला ॥ जो जळरूपीच होऊन ठेला ॥ तो जळामाजी मिळावयाला ॥ अशक्य काय उरेल जी ॥ ८६ ॥ तेवीं ब्रह्मपरायण होतां ॥ मग चराचरीं नुरे द्वैतवार्ता ॥ अद्वेष्टा झाला सर्वभूतां ॥ [3]चराचरीं महाराजा ॥ ८७ ॥ मग तो प्राणी सर्वभूत ॥ जगाला मानी आप्त ॥ आणि मग तेही मानिती त्यातें ॥ सखा सोइरा कीं आमुचा ॥ ८८ ॥ तरी आतां [4]श्लाघ्यवंत ॥ आधीं व्हावें ब्रह्मव्यक्त ॥ त्यावरी बोले रेवणनाथ ॥ ब्रह्मवेत्ता करीं मातें ॥ ८९ ॥ येरी म्हणे चातुर्यखाणी ॥ अत्रिनंदन तुझा स्वामी ॥ त्यातें स्तवोनि उगमीं ॥ साध्य करून घेईं कां ॥ ९० ॥ तुज तो साह्य झाल्या जाण ॥ मग पक्षिश्वापदीं अद्वैतपण ॥ काय असे तेवढें कठिण ॥ देवादिक येतील कीं ॥ ९१ ॥ स्वर्लोक भूर्लोक तपोलोक ॥ स्वर्गवासी सुरवर अनेक ॥ चरणसेवा [5]दोंदिक ॥ वांछितील मग तुझी ॥ ९२ ॥ ऐसें सिद्धी बोलतां वचन ॥ चित्तीं म्हणे हेंचि करीन ॥ मग सर्व त्याग करून ॥ काननांत प्रवेशे ॥ ९३ ॥ जयाठायीं भेटला दत्त ॥ तेथें जाऊन बैसला नाथ ॥ दत्तस्मरणीं ठेवून चित्त ॥ वाट पाहे भेटीची ॥ ९४ ॥ मनीं दाटला भेटीचा योग ॥ तेणें अन्नोदकाचा झाला त्याग ॥ मग दिवसेंदिवस शरीरभोग ॥ शुष्ककाष्ठ दाहीतसे ॥ ९५ ॥ चाललें तरूचें पर्णभक्षण ॥ येतसे काय जें उडून ॥ दत्तवियोगें भेटीकारणें ॥ काये वाचे वेधला ॥ ९६ ॥ मग तें पाहून मच्छिंद्रनाथ ॥

१ पक्षी. २ समूह. ३ सर्व स्थावरजंगमात्मक सृष्टींत. ४ स्तुत्य. ५ मोठी.

म्हणे हा लागला प्रयत्नांत ॥ परी कोण गुरु आहे त्यातें ॥ समजला नाहीं अद्यापि ॥ ९७ ॥ अहा गुरु तो ऐसा कैसा ॥ काळरता दृढोत्तर घालून फांसा ॥ गेला आहे अभ्यासभासा ॥ निष्ठुर मन करूनियां ॥ ९८ ॥ मग रेवणसिद्धाचा प्रताप ॥ पुसून घेतला जनमुखें माप ॥ ते म्हणती तो आहे जगबाप ॥ परोपकारी हा असे ॥ ९९ ॥ कितीएकां घातलें इच्छिलें अन्न ॥ कितीएकां दिधलें अपार धन ॥ अपार जगाचें अकिंचनपण ॥ अर्थाअर्थीं हरीतसे ॥ १०० ॥ ऐसी ऐकून जगाची गोष्टी ॥ चित्तीं म्हणे हा प्रतापकोटी ॥ सिद्धि सकळ साधला जेठी ॥ कोठें-तरी गुरुकृपें ॥ १ ॥ तरी आतां सिद्धि कोण ॥ झाली आहे यास्वाधीन ॥ त्या सिद्धीतें पाचारून ॥ वृत्तांत श्रुत व्हावा कीं ॥२॥ मग अणिमा गरिमा लघिमा महिमा ॥ ईशित्व वशित्व प्राप्ति प्रकामा ॥ ऐशा अष्टसिद्धि नामा ॥ पाचारिल्या प्रत्यक्ष ॥ ३ ॥ प्रत्यक्ष होतां त्या शुभा-ननी ॥ श्रीनाथाच्या लागल्या चरणीं ॥ नाथ म्हणे त्यांतें पाहूनी ॥ उत्तर माझें ऐकावें ॥ ४ ॥ रेवणसिद्ध हा महापुरुष ॥ त्याचे सिद्धि दास-त्वास ॥ कोणती सांगा आहे आम्हांस ॥ गुरुवाक्येंकरूनियां ॥ ५ ॥ तंव ती बोलती झाली महिमा ॥ मातें ओपिलें दास्यनेमा ॥ श्रीदत्ता-त्रेययोगद्रुमें ॥ मंत्रसिद्धीकरूनियां ॥ ६ ॥ मग दत्तात्रेय हा ऐकून गुरु ॥ म्हणे हा बंधूचि साचारू ॥ आहे तरी सर्वांपारू ॥ हित इच्छिणें तयाचें ॥ ७ ॥ जैसा अर्धपिंडीं भाग ॥ मारुतिदेहीं उद्भवला योग ॥ परी सीताहरणीं भोगिला भोग ॥ साह्य होऊन तयासी ॥ ८ ॥ किंवा मागील संगेंकरून ॥ गोपाळ[१] झाले वानरगण ॥ सर्व साह्य होऊन ॥ माहात्म्यीं कृष्ण वाढविला ॥ ९ ॥ तेवीं आपुली ऐसी मती ॥ चमसनारा-यण स्वसंगतीं ॥ तरी या रेवणसिद्धाप्रती ॥ साह्य आपण व्हावें सर्वस्वीं ॥ ११० ॥ मग तेथून निघे अतिवेग ॥ गिरनारपर्वतीं आला चांग ॥ भेटून अत्रिआत्मजयोग ॥ रेवणसिद्धाचें वृत्त कथियेलें ॥ ११ ॥ सलीलपणीं चरणीं माथा ॥ ठेवून म्हणे अनाथनाथा ॥ हे गुरुराजा दया-वंता ॥ साधकहिता भास्करू[३] ॥१२॥ तरी अवनीं अवतारपूर्ण ॥ प्राप्तिक चमसनारायण ॥ तो तुम्हांकरितां क्लेश दारुण ॥ महीलागीं भोगी-तसे ॥ १३ ॥ निर्वाण धरून चित्तीं ॥ बैसला आहे काननाप्रती[४] ॥ तरी कृपाबोध मारुतगतीं ॥ तयावरी सिंचावा ॥ १४॥ अहा एक सिद्धी आणून त्या भास ॥ घालून गळां दृढोत्तर फांस ॥ तरी तो फांस झाला क्लेश ॥ मरणवाट त्या दावी ॥ १५ ॥ जेथें झाली तुमची भेटी ॥ तेथेंच बैसला काननपुटीं ॥ आहार त्यजून प्राण कंठीं ॥ आणूनियां ठेविला तो ॥ १६ ॥ त्वचा झाली अस्थिव्यक्त ॥ देहींचें रुधिर[५] आटलें समस्त ॥ प्राण कासावीस चक्षु श्वेत ॥ कार्पाससम[६] दिसताती ॥ १७ ॥ सर्वांगींच्या शिरा दृश्य ॥ ढळढळीत दिसती महापुरुष ॥ पोटपाठ ऐक्यलेश ॥ हरिकटीसम[७] मिरवत ॥ १८ ॥ तरी महाराजा सदैव माउलें ॥ वत्सा करावें काय इतुलें ॥ अवकृपा करणें नव्हे भलें ॥ मही-लागीं मिरवावें ॥ १९ ॥ लोहाचें कनक करी परिस ॥ तेणें सांडिला पाकरस ॥ तरी परिस ऐसें कोण त्यास ॥ म्हणेल दगड मिरवेल ॥ १२० ॥ कीं एक तमाचा अरि पूर्ण ॥ तेणें सोडिलें चांगुलपण ॥ मग सविताराज तया कोण ॥ महीलागीं बोलेल कीं ॥ २१ ॥ आमुचा वरदपाणी ॥

१ खरोखर. २ गवळी. ३ सूर्य. ४ अरण्यांत. ५ रक्त. ६ कापसाप्रमाणें. ७ सिंहाच्या कमरेप्रमाणें.

स्पर्शिता जाय मौळीलागुनी ॥ मग तो सर्वांलागुनी अवनीं ॥ ठेंगणेपणीं मानीतसे ॥ २२ ॥ ऐशी चाल सहजस्थित ॥ गुरूची असे कृपा मूर्त ॥ तरी रेवणनाथदेहआहुत ॥ कष्टानळीं न सांडावी ॥ २३ ॥ पहा जीवनें केली लावणी ॥ सुखा आणिलें थोरपणीं ॥ ते शुष्क केलिया मोहेंकरूनी ॥ बुडवूं न शके जीवन तें ॥ २४ ॥ त्याचि नीतीं पीयूषाभास ॥ सेविल्या ओपी संजीवनपणास ॥ तें पुढें कोपल्या मृत्युपदास ॥ पाठवील कीं महाराजा ॥ २५ ॥ तरी त्या पीयूषरसाच्या गांवीं ॥ स्वप्नामाजी मृत्यु नाहीं ॥ तैसें तुमच्या हृदयीं ॥ औदार्य बहु वसतसे ॥ २६ ॥ ऐसे बोल त्या युक्तिवानाचे ॥ ऐकून दत्तहृदयीं प्रेम नाचे ॥ डोलवून ग्रीवा साचें ॥ हास्य करी आनंदें ॥ २७ ॥ मग तो उदार शांत दाता ॥ सवें घेऊनि मच्छिंद्रनाथा ॥ व्यानअस्त्र जल्पुनी चित्ता ॥ त्या ठायीं पातले ॥ २८ ॥ परी त्या उभय भव्यमूर्ती ॥ जैसे उतरले दोन गभस्ती ॥ कीं इंद्र वाचस्पती ॥ प्राज्ञिकपणीं मिरवले ॥ २९ ॥ कीं एक हरि एक हर ॥ कीं द्रोणमंदराचल किमयागार ॥ प्रेममारुता होऊन स्वार ॥ तया ठायीं पातले ॥ १३० ॥ तों येतांच देखिला रेवणनाथ ॥ कृश शरीर काष्ठवत ॥ अस्थिमय प्राण व्यक्त ॥ वाट पाहे दत्ताची ॥ ३१ ॥ अतिक्लेशी कंठीं प्राण ॥ पाहून श्रमला अत्रिनंदन ॥ प्रेमें कवळिला सदयपणें ॥ माय जैसी बाळकातें ॥ ३२ ॥ कीं वत्सालागीं जैसी गाय ॥ हंबरडा फोडी अति मोहें ॥ तेवीं अत्रिनंदनें प्रेमहृदयें ॥ प्रियभावें आलिंगिला ॥ ३३ ॥ तेणेंही चरणीं ठेवून माथा ॥ होय प्रेमाश्रु ढाळिता ॥ म्हणे आजी भेटली माझी माता ॥ निढळवाणी वत्सातें ॥ ३४ ॥ मग तो महाराज तपोराज ॥ हृदयीं धरी अत्रिआत्मज ॥ मग साधकहिताचें चोज ॥ उल्हासें ओपीतसे ॥ ३५ ॥ जैसें सुतालागीं तात ॥ हिता ओपून परत्र होत ॥ तेवीं दुर्वाससहोदर माहित ॥ होऊनि हिता मोहीतसे ॥ ३६ ॥ परम आराधून कृपें न्याहाळी ॥ कर्णीं ओपिली मंत्रावळी ॥ तेणें तद्धटी अज्ञानकाजळी ॥ निघून गेली सर्वस्वीं ॥ ३७ ॥ मग तो ज्ञानी हृदयीं दिवटा ॥ नृत्य करीतसे तत्त्वचोहटा ॥ तेणेंकरून द्वैतकांटा ॥ अंकुरातें खुडियेला ॥ ३८ ॥ मग कृपें आराधून वज्रशक्ती ॥ भाळीं चर्चिली दिव्य विभूती ॥ तेणेंकरून देहस्थिती ॥ शक्तिवान मिरवली ॥ ३९ ॥ मग सवें घेऊनि रेवणनाथ ॥ गिरनारपर्वतीं गेला दत्त ॥ तेथें बैसून दिवस अमित ॥ विद्यावसन नेसविलें ॥ १४० ॥ ब्रह्मज्ञानरसायन ॥ विपुलपणीं केलें पान ॥ तेणेंकरून ऐक्यपण ॥ चराचरीं मिरवलें ॥ ४१ ॥ ऐसा झाला तयातें आभास ॥ कीं मीच स्वामीचा भास ॥ मीच व्यास चराचरीं असें ॥ एकदेहीं मिरवलों ॥ ४२ ॥ मग पक्षिकुळा वनचरांसहित ॥ अचलपणीं पाषाणलता ॥ समीप येत पाचारितां ॥ रेवणनाथा वंदावया ॥ ४३ ॥ ऐशी अद्वैत दृष्टी होतां ॥ मग रसायणादि शीघ्र कविता ॥ वेदपाठी ज्योतिषअर्था ॥ प्रवीण कळा व्याकरणीं ॥ ४४ ॥ धनुर्धर जळतरणी ॥ वैद्य नाटकें चातुर्यगीत गायनी ॥ कोकशास्त्रादि अश्वारोहणी ॥ चतुर्दशविद्या निरोपिल्या ॥ ४५ ॥ उपरी नानाशास्त्रप्रवीण ॥ अस्त्रें सांगितलीं मच्छिंद्रासमान ॥ वज्रअस्त्रादि वाताकर्षण ॥ संजीवनी सांगीतली ॥ ४६ ॥ वातास्त्र धूम्रास्त्र अग्निअस्त्र ॥ नागास्त्र कामास्त्र पर्वतास्त्र ॥ जलदअस्त्रादि खगेंद्रास्त्र ॥

१ मस्तकाला. २ मान. ३ दुर्वासबंधु दत्तात्रेय. ४ मस्तकीं. ५ विद्यावस्त्र.

ब्रह्मास्त्रादि निरोपिलीं ॥ ४७ ॥ निर्वाण रुद्रास्त्र वासवशक्ती ॥ देवास्त्र मोहनास्त्र दानवास्त्रगती ॥ असो ऐसें वर्णितां किती ॥ अपार अस्त्रीं मिरवला ॥ ४८ ॥ मग नाथपंथीं दीक्षा देऊन ॥ उन्मनी मुद्रा फाडिले कान ॥ तत्त्वामाजीं दिव्यज्ञान ॥ गळां कंथा ओपिली ॥४९॥ देववितीशुद्ध सारंगी ॥ अनुहत वाजे नाना अंगीं ॥ कुबडी फावडी देहप्रसंगीं ॥ देह विदेही मिरवला ॥ १५० ॥ ऐसा होऊन पूर्ण स्थित ॥ मग सर्वे देऊन मच्छिंद्रनाथ ॥ मार्तंडपर्वतीं गेले त्वरित ॥ नागेश्वरस्थाना वंदिलें ॥ ५१ ॥ तेथें करून देवदर्शन ॥ वरद घेतला विद्येकारणें ॥ मग साबरीविद्या कवित्वरचन ॥ महीवरी मिरवतसे ॥ ५२ ॥ असो सर्व साध्य झाल्यावरी ॥ मावदें मांडिलें बहुतां गजरीं ॥ हरिहरादि साह्यकारी ॥ गिरिनारपर्वतीं आणिले॥५३॥सुवर्लोक भूर्लोक तपोलोक ॥ स्वर्गवासी पुण्यश्लोक ॥ गणगंधर्व सुरवर अनेक ॥ मावद्यास आणिले ॥५४॥ब्रह्मा इंद्र वरुण कुबेर ॥ अश्विनीकुमार चंद्र भास्कर ॥ सकळ समुच्चय पर्वताकार ॥ मावद्यातें पातले ॥ ५५ ॥ चार दिवस यथायुक्त ॥ सोहळा भोगिला अपरिमिंत ॥ मग प्रसन्न होऊनि सकळ दैवतें ॥ पूर्ण वरा ओपिलें ॥ ५६ ॥ वर देऊनि सकळ विद्येसी ॥ जाते झाले स्वस्थानासी ॥ रेवणसिद्धही तीर्थाटनासी ॥ अत्रिआत्मजें पाठविला ॥ ५७॥ तीर्थें हिंडतां अपार महीसीं ॥ तों विटग्राम मानदेशीं ॥ तेथें येऊन मुक्कामासी ॥ सहजस्थितीं राहिला ॥ ५८ ॥ तों तेथें सरस्वती ब्राह्मण ॥ जान्हविका स्त्री तयालागून ॥ लावण्यलतिका स्वरूपवान ॥ चंद्रास वदनें लाजवीतसे ॥ ५९ ॥ उभय स्त्रीपुरुष एकचित्ती ॥ जेवीं ते लोहचुंबकरीती ॥ किंवा जग प्रिय गभस्ती ॥ अवियोगप्रीतीं वाहिलें ॥१६०॥ कीं मीनतोयाची संगती ॥ कीं विवरस्थाची एकनीती ॥ कीं भावाअंगीं सिद्धभक्ती ॥ सदा धेवळारीं नांदतसे ॥ ६१ ॥ तन्यायें उभयतां जाण ॥ प्रपंच वहिवाटिती एकप्रमाण ॥ परी इतुकें असोनि जठरीं संतान ॥ शून्यपणें मिरवत ॥ ६२ ॥ सप्त पुत्र झाले तयासी ॥ परी तें बाळपणीं पंचत्व देहासी ॥ सातवे आठवे दिवशीं ॥ दहावे दिवशीं पंचत्व होय ॥ ६३ ॥ असो षट्पुत्र देहांत पावले ॥ यावरी सातवें उदय पावलें ॥ तें द्वादश दिन वांचलें ॥ तेणें हर्षलें विप्रमन ॥६४॥ कांतेस म्हणे परम वेल्हाळे ॥ पंचम षष्ठ भक्षिले काळें ॥ हें द्वादश दिन वाचलें केवळ ॥ काळवेळ लोटली येणें ॥ ६५ ॥ एक आणि चुकल्यापरीस ॥ तों दश वर्षांचा होय आयुषी ॥ तरी आतां या पुत्रासी ॥ भय नसे सर्वथा गे ॥ ६६ ॥ ऐसें कांतेस बोलून वचन ॥ बारसें मांडिलें परम आवडीनें ॥ गृहीं करून पंचपक्वान्नें ॥ घाली भोजन विप्रांसी ॥ ६७ ॥ तों ते दिवशीं रेवणनाथ ॥ भिक्षा करीत आला तेथ ॥ अलक्ष गाजवून त्या द्वारातें ॥ पुढें पाऊल ठेवीतसे ॥ ६८ ॥ तंव त्या विप्रें देखिलें दुरोनी ॥ वाढतें पात्र ठेविलें धरणीं ॥ तैसाच बाहेर येउनी ॥ नाथानिकट लगबगें ॥६९॥ तंव तेजःपुंज हाटककांती ॥ देखतां विप्र म्हणे चित्तीं ॥ हा पूर्वतापसी अवतार क्षितीं ॥ कोणी तरी आहे कीं ॥ १७० ॥ तैसाच सोहळा लगबगेंकरून ॥ नाथचरणीं मस्तक ठेवोन ॥ म्हणे महाराजा प्रयोजन ॥ माझे घरीं आहे कीं॥७१॥ऐसें असोनि मज दरिद्रियाचे मनोरथ ॥ डांवलूनि जातां किमर्थ ॥ तरी हें तुम्हां नव्हे यथार्थ ॥ अनाथा

१ मंडळी. २ वाद्यामध्यें. ३ मृत्यु. ४ आयुष्याचा. ५ जमिनीवर. ६ सुवर्णासारखी कांति. ७ टाकून.

सनाथ करावें ॥ ७२ ॥ मी हीन दीन जाति ब्राह्मण ॥ काय करावा उत्तम वर्ण ॥ सेवाचोर अतिथिकारणें ॥ व्यर्थ संसारीं मिरवतों ॥ ७३ ॥ ऐसें बोलोनि म्लान वाणीं ॥ माथा वारंवार ठेवी चरणीं ॥ आपुला वर्णाश्रम टाकोनी ॥ विव्हळ झाला भावार्थें ॥ ७४ ॥ त्यावरी नाथ बोले त्याशीं ॥ आम्ही शूद्र तूं विप्र मिरविशी ॥ मज नमस्कारावया तुजशीं ॥ अर्थ नाहीं जाणिजे ॥ ७५ ॥ येरू ऐकूनि बोले वचन ॥ शुद्ध जातीचा ब्राह्मण ॥ तो मातंगा करील नमन ॥ अन्य वर्ण चुकेल कैसा ॥ ७६ ॥ कडू भक्षितां काय होय गोड ॥ होणार नाहीं धडफुढा ॥ प्राज्ञिक मानिला जेणें वेडा ॥ तरी त्या पंडिता धिक्कार ॥ ७७ ॥ तरी ऐसें वर्म निपुण ॥ मज कैसें येईल घडून ॥ परी देखावें श्रेष्ठ वचन ॥ ऐसी विनंती करीतसे ॥ ७८ ॥ ऐसें बोलतां विप्र त्यातें ॥ मनांत म्हणे रेवणनाथ ॥ हा विप्र आहे प्रज्ञावंत ॥ बोलापरी चालतसे ॥७९॥ नातरी बोल बोलतां सोपे ॥ आचार दावितां टीर कांपे ॥ तरी आतां असो यातें स्वल्प ॥ सिद्धार्थीतें मेळवूं ॥ १८० ॥ मग विप्राचा धरून हात ॥ संचार करी त्याचे गृहांत ॥ विप्रें नेवोनि स्वसदनांत ॥ महाराज बैसविला ॥ ८१ ॥ पात्र लगबगें आणी वाढून ॥ सर्व पदार्थ भरी प्रेमेंकरून ॥ पात्रानिकट बैसोन ॥ भोजन सारी नाथाचें ॥८२॥ अन्य विप्रां विप्र नेमून ॥ सकळांचें करी संगोपन ॥ परी आपण न उठे नाथापासून ॥ परमभक्तीसी गुंतला ॥८३॥ जैसी शर्करेसी पिपीलिका[1] ॥ काढूं जातां दडपी मुखा ॥ तेवीं भक्तीचा धरूनि आवांका ॥ विप्र गुंतला नाथभक्ती ॥८४॥ असो ऐसे परम भक्तीं ॥ नाथाची झाली जठरतृप्ती ॥ येरीकडे विप्रपंगती[2] ॥ गेले भोजन सारूनियां ॥८५॥ विप्र गेले आपुले सदनीं ॥ येरीकडे नाथालागुनी ॥ भोजन झाल्या नम्रवचनीं ॥ बोलता झाला विप्र तो ॥ ८६ ॥ म्हणे महाराजा आजिचा दिन ॥ वस्तीसी सेवावें माझें सदन ॥ उदयिक प्रातःकाळीं उठून ॥ जाणें असेल तरी जावें ॥ ८७ ॥ पाहून तयाचा परम आदर ॥ अवश्य म्हणे विधिकुमर[3] ॥ एकांतस्थानीं शयनावर ॥ नाथा नेऊन पहुडविलें ॥८८॥ नाथ शयनीं होतां निद्रित ॥ आपण भोजन सारूनि त्वरित ॥ वारासार करून येत ॥ नाथापाशीं त्वरेनें ॥ ८९ ॥ तों सूर्य गेला अस्तासी ॥ मग उठून बैसला तापसी ॥ पुनः वंदून नाथचरणांसी ॥ उपाहार करावा म्हणतसे ॥ १९० ॥ तंव नाथ म्हणे आतां भोजन ॥ झालें आहे न इच्छी मन ॥ मग आपुला नित्यनेम सारून ॥ पुन्हां शयनीं पहुडला ॥ ९१ ॥ सरस्वती ब्राह्मण निकट बैसून ॥ नाथाचे चुरीतसे चरण ॥ तों मध्यरात्री झाली पूर्ण ॥ तेव्हां विपर्यास वर्तला ॥ ९२ ॥ बाळ जें होतें मातेपाशीं ॥ सटवीनें झडपिलें त्यासी ॥ परम तें झालें कासाविशी ॥ शोकसिंधु[4] उचंबळला ॥ ९३ ॥ हांक मारी स्वभर्त्यातें ॥ म्हणे बाळ कासाविसी बहु होतें ॥ विप्र म्हणे त्या कांतेतें ॥ होईल तैसें होऊं दे ॥ ९४ ॥ तूं न करीं आतां कांहीं अनुमान ॥ निद्राभंग होईल नाथाकारण ॥ आपुलें प्रारब्ध मुळींच हीन ॥ बरवें कैसें होईल गे ॥ ९५ ॥ मागें आचरलों कांहीं पाप ॥ तें भोगितों अमूप[5] ॥ आतांही मोडतां स्वामीची झोंप ॥ सुलभ पुढें दिसेना ॥ ९६ ॥ ऐसें बोलून

१ मुंगी. २ ब्राह्मणसमुदाय. ३ रेवणनाथ ( ब्रह्मदेवाचा पुत्र ). ४ शोकसमुद्र. ५ पुष्कळ.

कांतेतें ॥ श्रीनाथाचे चरण चुरीत ॥ तों सवितासुताचे येऊन दूत ॥ बाळ पाशीं आकर्षिला ॥ ९७ ॥ काढून चैतन्य जीवदशा-रूप ॥ घेऊन गेले यमासमीप ॥ येरीकडे शवस्वरूप ॥ बाळदेहीं मिरवलें ॥ ९८ ॥ मग तो मायेचा मोह दारुण ॥ हृदयीं पेटला विरहअग्न ॥ मग मंद रुदनें भरतां नयन ॥ जान्हवी तेव्हां करीतसे ॥ ९९ ॥ तों प्रातःकाळसमय झाला ॥ शयनीं नाथ जागृत झाला ॥ तों मंद रुदनार्थ आकर्णिला ॥ एकाएकीं तयानें ॥ २०० ॥ नाथें ऐकून मंद रुदन ॥ विप्रास म्हणे रडतें कोण ॥ येरू म्हणे बाळकाचा प्राण ॥ कासावीस होतसे ॥ १ ॥ म्हणोन मोहस्थित नाथा ॥ अज्ञानपणीं रडते कांता ॥ ऐसी ऐकून तयाची वार्ता ॥ बाळा आणीं म्हणतसे ॥ २ ॥ मग तो विप्र स्वकांतेपाशीं ॥ येऊन पाहे स्वपुत्रासी ॥ तंव तें मिरवलें प्रेतदशेसी ॥ हांका मारून तेधवां ॥ ३ ॥ म्हणे महाराजा प्राणरहित ॥ बाळ झालें जी निश्चित ॥ ऐसें ऐकून रेवणनाथ ॥ परम चित्तीं क्षोभला ॥ ४ ॥ म्हणे मी या स्थळीं असतां ॥ कैसा डाव लाधला कृतांता ॥ तरी तो कृतांत पाहीन आतां ॥ पाहून नाहींसा करीन मी ॥ ५ ॥ ऐसे दुर्घट शब्द वदोन ॥ ब्राह्मणासी म्हणे बाळ आण ॥ तंव तें शरीर उचलोन ॥ नाथालागीं अर्पीतसे ॥ ६ ॥ तंव तें बाळ परम गोमटें ॥ नाथ पाहे आपुले दृष्टीं ॥ चित्तीं हळहळून म्हणे नष्ट ॥ कर्म काय उदेलें ॥ ७ ॥ विप्रास म्हणे बाळ तूतें ॥ इतुकेंच झालें काय नितांत ॥ येरी म्हणे कृपावंत ॥ बाळ सातवें हें असे ॥ ८ ॥ बाळ होतां बाळंतपणीं ॥ मृत्यु पावले पंचसप्तदिनीं ॥ द्वादशदिन तपोप्राप्ती ॥ बाळ सातवें हें असे ॥ ९ ॥ तरी आतां असो कैसें ॥ हीन प्रारब्ध आहे आम्हांस ॥ तें सुफळपणीं कर्मलेश ॥ फळा कैसें येईल कीं ॥ २१० ॥ परी असो होणार तें झालें ॥ आमुचें सेवेसी चित्त रंगलें ॥ तें पुण्यांश हेंच इतुलें ॥ वारंवार लाधो कीं ॥ ११ ॥ ऐसी बोलतां विप्रवाणी ॥ अंतर जाणितलें प्रांजळपणीं ॥ मग सरस्वतीविप्रा पाचारूनी ॥ बोलता झाला महाराजा ॥ १२ ॥ म्हणे वत्सा तीन दिवस ॥ जतन करीं बाळतनूस ॥ मी स्वतां जाऊन यमपुरीस ॥ साती बाळें आणितों कीं ॥ १३ ॥ मग अमर-मंत्र मंत्रून विभूती ॥ चर्चिली बाळशवाप्रती ॥ म्हणे विप्रा बाळ हें क्षितीं ॥ येणें नासणार नाहीं रे ॥ १४ ॥ ऐसें सांगून त्वरिता-त्वरित ॥ तेथून निघता झाला नाथ ॥ व्यानअस्त्र जल्पून सनाथ ॥ अतिवेगेंसीं चालिला ॥ १५ ॥ भोंवतें अस्त्रांचें करी भ्रमण ॥ तेणें हिमालयाचे अंबुकण ॥ शीतळ करूनियां जाण ॥ यथास्थित मिरवले ॥ १६ ॥ जैसे शीताचे झुळकेआंत ॥ समीप पावक निश्चित ॥ तेणेंकरून शरीरांत ॥ बाधा न करी अंगातें ॥ १७ ॥ तेवीं आदिनामास्त्र ॥ सव्य मेळवून योगपात्र ॥ व्यानास्त्र मुखीं स्तोत्र ॥ जल्पून गिरि वेधला ॥ १८ ॥ सहज चालिला यमपुरीं ॥ संचार करी यक्षधवळारीं ॥ तों धर्मराज पाहून नेत्रीं ॥ आसनाहूनि उठलासे ॥ १९ ॥ बैसवूनि आपुले कनकासनीं ॥ षोडशोपचारें पूजिला मुनी ॥ सहज करपुटीं नम्र वाणीं ॥ धर्मराजें आराधिला

१ यमाचे. २ गंगा ( नेत्रांतून दुःखाश्रू आले ). ३ यमाला. ४ भस्म. ५ पाण्याचे तुषार. ६ अग्नि. ७ सुवर्णसिंहासनावर.

॥ २२० ॥ म्हणे महाराजा योगदक्ष ॥ किमर्थ कामीं योजिला पक्ष ॥ तरी तें वदून सुढळ पक्ष ॥ मज यक्षातें तुष्टवीं ॥ २१ ॥ येरू म्हणे यमपुरनाथा ॥ मी सरस्वतीविप्राचे घरीं असतां ॥ तुवां येऊन तयाच्या सुता ॥ हरण केलें कैसें रे ॥ २२ ॥ तरी जें घडूं नये तें घडलें ॥ परी आतां मागुती देइजे वहिलें ॥ आणि षट्पुत्र त्याचे कोठें ठेविले ॥ तेही आतां देईं आणोनी ॥ २३ ॥ तरी या बोलास वर्तन ॥ तूतें न ये जरी घडून ॥ मग मम कोपाचा प्रळयाग्न ॥ उरों न देईं तुजलागीं ॥ २४ ॥ ऐसें बोलतां रेवणनाथ ॥ विचार करी तेजोब्धिसुत ॥ म्हणे चांगलें बोलून यातें ॥ शिवधरेतें धाडावा ॥ २५ ॥ आपुल्या सर्वस्वीं निमित्याकडून ॥ अधिकारी करावा उमारमण ॥ हा सिद्ध तेथें गेल्यानें ॥ दृष्टी पडेल प्रतापू ॥ २६ ॥ ऐसा विचार करून मानसीं ॥ बोलता झाला योगियासी ॥ म्हणे महाराजा मम बोलासी ॥ चित्त द्यावें यथार्थ ॥ २७ ॥ हे महाराजा हरिहर ॥ आणि तिजा तो नाभिकुमर ॥ हे मुख्य यांचा कारभार ॥ सकळ करणें तयांचें ॥ २८ ॥ जरी म्हणाल कैसे रीतीं ॥ त्रिवर्ग त्रिकामीं असती ॥ शिव क्षयीं विधि उत्पत्तीं ॥ रक्षणशक्ति विष्णूची ॥ २९ ॥ तरी क्षयपति तो तमोगुणविहारी ॥ आम्ही त्याची करितों चाकरी ॥ मारणें तारणें आमुच्या करीं ॥ कांहींएक नसे जी ॥ २३० ॥ तरी आतां प्रतापराशी ॥ गमन करावें कैलासासी ॥ आराधून शिवचित्तासी ॥ सप्तपुत्र न्यावे जी ॥ ३१ ॥ आणीक खूण सांगतों उत्तर ॥ तेथेंचि आहेत सप्तकुमर ॥ तरी दाउनी आपुला बुद्धिसंचार ॥ कार्य आपुलें करणें जी ॥ ३२ ॥ मजवरी जरी आलां आपण कोपोन ॥ तरी मी काय हीनदीन ॥ क्षयकर्ता उमारमण ॥ प्रसिद्धपणीं मिरवतसे ॥ ३३ ॥ क्षयकर्ता आहे भव चराचरीं ॥ शास्त्रादि बोलती साचार ॥ आपणही आहांत जाणिव सर्व ॥ अंतरंग सर्वांचें ॥ ३४ ॥ ऐसें असोन महाराज ॥ कां कोपानळीं योजितां मज ॥ सोज्वळतेजीं अर्कराज ॥ तमधवळारा नांदवितां ॥ ३५ ॥ तुम्ही सर्वांचे ज्ञानदिवटे ॥ कूपीं पडतां अज्ञानवाटे ॥ हें योग्य नव्हे तुम्हां हळवटे ॥ धोपटपंथीं मिळाना कां ॥ ३६ ॥ ऐसें बोलतां धर्मराज ॥ मान तुकावी तेजःपुंज ॥ म्हणे हें पंचाननाचें काज ॥ तें सत्यार्थ बोलसी तूं ॥ ३७ ॥ तरी आतां कैलासीं जाईन ॥ कैसा आहे पंचानन ॥ तो सत्वर दृष्टीं पाहीन ॥ अमित्रपण त्यासुद्धां ॥ ३८ ॥ ऐसें बोलून योगधारणी ॥ उठता झाला मग तेथुनी ॥ व्यानअस्त्र मुखीं स्तवोनी ॥ कैलासातें पातला ॥ ३९ ॥ आतां तेथें कथासार ॥ होईल तितुकी धुंडीकुमर ॥ मूळकाव्य ग्रंथापर ॥ नरहरिकृपें वर्णीत ॥ २४० ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागार ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ पंचत्रिंशाध्याय गोड हा ॥ २४१ ॥ ॥ अध्याय ॥ ३५ ॥ ॥ ओंव्या ॥ २४१ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

१ त्वरित. २ सूर्यपुत्र यम. ३ कैलासाला. ४ शंकर. ५ ब्रह्मदेव. ६ सर्वज्ञ.

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी भक्ततारका ॥ मम पूर्वजा ज्ञानार्का ॥ नरहरिनामें पुण्यश्लोका ॥ पुढें ग्रंथ बोलवीं ॥ १ ॥ मागिले अध्यायीं कथन ॥ रेवणनाथातें अत्रिनंदन ॥ वरदचित्तें प्रसन्न होऊन ॥ सनाथ चित्तें केला असे ॥ २ ॥ केला तरी प्रतापवंत ॥ परी सरस्वतीविप्राचा अभिप्रायहेत ॥ चित्तेंकरून केला शांत ॥ रेवणनाथ गेलाअसे ॥ ३ ॥ तरी आतां पुढें श्रोतीं ॥ परिसावें आवाहना ग्रंथअर्थीं ॥ रेवणनाथ कैलासाप्रती ॥ कैलासद्वारीं प्रगटला ॥ ४ ॥ दिसे जैसा भास्कर ॥ कीं उदय पावला रोहिणीवर ॥ कीं सहस्र चंपलांचा एकभार ॥ अंगकांती मिरवतसे ॥ ५ ॥ ऐसा महाराजा तेजःपुंज ॥ ग्रामद्वारीं येतां भोज ॥ तंव ते शिवगण विजयध्वज ॥ रक्षणा असती द्वारांत ॥ ६ ॥ त्यांनीं पाहून योगमूर्ती ॥ हटकोनि उभा केला क्षितीं ॥ म्हणती तुम्ही कोणती नूतन गणती ॥ जातां कोठें महाराजा ॥ ७ ॥ येरू म्हणे रेवणनाथ ॥ नाम असे या देहातें ॥ विजयकरणीं भवभेटीतें ॥ आम्हां जाणें आहे कीं ॥ ८ ॥ येरू म्हणती कवण कार्यें ॥ आम्हांलागीं शीघ्र सांगावें ॥ नाथ म्हणे विप्रतनय ॥ सत्य चोरिला शिवानें ॥ ९ ॥ तरी तयास शिक्षा करून ॥ घेऊन जाईन विप्रनंदन ॥ ऐसें ऐकतां शिवगण ॥ परम चित्तीं क्षोभले ॥ १० ॥ म्हणती बाबा बोलसी वचन ॥ यांत आम्हांस आलें समजोन ॥ तुमचा गुरु गंधर्व जाण ॥ आम्हांलागीं वाटतो ॥ ११ ॥ परी गंधर्वांचा संस्कार ॥ पाहूं आला प्रहार ॥ तरी तो तेथेंच करावा आदर ॥ फीर माघारा येथोनी ॥ १२ ॥ ऐसें बोलती शिवगण त्यासी ॥ परम कोप चढला त्याचे मानसीं ॥ म्हणे गुरु गंधर्ववंशीं ॥ तरी तुज दावितों ॥ १३ ॥ अरे तुम्ही गंधर्वासमान ॥ फिरों नका रानोरान ॥ ऐसें म्हणोन करें भक्तिबंधन ॥ भस्मचिमुटी कवळिली ॥ १४ ॥ स्पर्शअस्त्र जपोनि होटीं ॥ फेंकिता झाला भस्मचिमुटी ॥ तेणें द्वारपाळ महीपाठीं ॥ खिळोनियां राहिले ॥ १५ ॥ एक सहस्र तीन शत ॥ गण महीतें केले व्यक्त ॥ उचलूं जातां स्वपदातें ॥ मही पदातें सोडीना ॥ १६ ॥ पद महीपासून कदा न सुटती ॥ म्हणोन हस्त धरून काढूं जाती ॥ तेणें महीतें व्यक्त होती ॥ उभय हस्त गणांचे ॥ १७ ॥ ऐसे एक सहस्र तीन शत ॥ ओणवे केले महीं व्यक्त ॥ मग सर्वांलागीं बोले नाथ ॥ कोण गंधर्व सांगा रे ॥ १८ ॥ ऐसी विपरीत करणी ॥ प्रविष्ट होतां त्या शिवगणीं ॥ हा वृत्तांत सकळ शिव-भुवनीं ॥ शिवालागीं समजला ॥ १९ ॥ कैलासवासी शिवाचे गण ॥ त्यांनीं विपर्यास पाहून ॥ परम भयभीत चित्तीं होऊन ॥ शिवा-लागीं दर्शविती ॥ २० ॥ उभे राहोनि शिवानिकटा ॥ म्हणती महाराजा नीळकंठा ॥ एक मानव सुभट ॥ ग्रामद्वारीं पातलाहे ॥ २१ ॥ तेणें एक सहस्र तीन शत ॥ द्वारगण केले महीव्यक्त ॥ करचरण दोन्ही ओणवे समस्त ॥ आरंबळती महाराजा ॥ २२ ॥ ऐसी ऐकोनि शिवें मात ॥ कल्पांतभैरवां आज्ञापीत ॥ म्हणे कोण आला येथें ॥ शिक्षा त्यातें करा रे ॥ २३ ॥ ऐसें ऐकतां शिववचन ॥ अष्टही भैरव प्रळयाग्र ॥ सर्वें घेऊनि शतकोटी गण ॥ ग्रामद्वारीं पातले ॥ २४ ॥ तंव ते एक सहस्र तीन शत ॥ भैरवीं पाहिले महीव्यक्त ॥

१ ज्ञानसूर्या. २ श्रीदत्तात्रेय. ३ चंद्र. ४ विजांचा. ५ जमिनीपासून. ६ शिवाजवळ. ७ वेशीजवळ.

मग परम कोपोनि पिनाकहात ॥ शरभया योजीतसे ॥ २५ ॥ तें नाथें चपळपणीं पाहून ॥ पुनः शस्त्रअस्त्राचें संधान ॥ तीव्र कल्पूनि शतकोटिगण ॥ तयांस तेथ खिळियेलें ॥ २६ ॥ अष्टभैरव प्रतापदर्प ॥ कदा न गणिती अस्त्रप्रताप ॥ टणत्कारूनि शरचाप ॥ तीव्र अस्त्र योजिती ॥ २७ ॥ एक योजिती वातास्त्र प्रबळ ॥ एक योजिती प्रळयानळ ॥ एकीं नागास्त्र परम विशाळ ॥ विषधारा योजिलें ॥ २८ ॥ एकीं धूम्रास्त्र योजिलें कठिण ॥ एकीं [१]वासवशक्ति केली निर्माण ॥ एकीं ब्रह्मास्त्र शापवचन ॥ शापादपि योजिलें तें ॥ २९ ॥ एकें वज्रास्त्र योजिलें सबळ ॥ जें सकळ अस्त्रां असे अतुळ ॥ वीरभैरव तो साधनीं चपळ ॥ विभक्त अस्त्र निर्मीतसे ॥ ३० ॥ ऐसी योजून [२]सायकमुष्टी ॥ शर सोडिते झाले जेठी ॥ मग अष्टास्त्रांतें प्रतापकोटी ॥ अंबरातें मिरवलें ॥ ३१ ॥ तें पाहोनियां रेवणनाथें ॥ भस्मचिमुटी कवळूनि हातें ॥ एकदांच उत्तीर्ण अष्ट अस्त्रांतें ॥ मुखेंकरोनि जपिन्नला ॥ ३२ ॥ वातास्त्रावरी पर्वतास्त्र ॥ अग्निअस्त्रावरी [३]जलदास्त्र ॥ नागास्त्रावरी [४]खगेशास्त्र ॥ यापरी तो जल्पतसे ॥ ३३ ॥ धूम्रास्त्रावरी आदित्यनामी ॥ वासवशक्तीतें कालिका निर्मी ॥ शापादपि ब्रह्मास्त्रखाणी ॥ स्तवनअस्त्र त्या ओपी ॥ ३४ ॥ वज्रास्त्रातें [५]शक्रास्त्र जपोन ॥ विभक्तास्त्र केलें निर्माण ॥ मोहन अष्टअस्त्रांचें निवारण ॥ एकाच वचनें केलें तें ॥ ३५ ॥ असो अष्टास्त्रीं अष्ट अस्त्रें जाऊन ॥ नाहींसें केलें अंबरांत जाण ॥ परी तीं अष्ट अस्त्रें उकलोन ॥ भैरवांवरी पडियेलीं ॥ ३६ ॥ तेणें अष्टभैरव झाले जर्जर ॥ शिवालागीं सांगती हेर ॥ हे महाराज [६]उमावर ॥ भैरव क्षीण झालेती ॥ ३७ ॥ तें ऐकोनि शिव चित्तीं ॥ सिद्ध गोसुत केला निगुतीं ॥ आव्हानोनि रोहिणीपती ॥ त्रिशूळ हातीं मिरवला ॥ ३८ ॥ चक्र खड्ग शर सायक ॥ अंकुश आणि डमरु देख ॥ शंख नरकपाळ हस्तीं एक ॥ नंदी वाग्दोर मिरवतसे ॥ ३९ ॥ ऐशियेपरी भूषण ॥ कामांतक तो शस्त्र संजोन ॥ परम संतापें उभा राहोन ॥ बहु त्वरें धांवला ॥ ४० ॥ तें पाहून रेवणनाथ ॥ चित्तीं म्हणे युद्ध कासया बहुत ॥ एकाच अस्त्रें प्रतापवंत ॥ शिवालागीं करावें ॥ ४१ ॥ जल्पूनि अस्त्र वाताकर्षण ॥ फुंकूनि देत भस्म जल्पून ॥ तें प्रविष्ट होतां तीव्रपण ॥ शिवश्वास आकर्षिला ॥ ४२ ॥ तेणेंकरोन [६]उमास्वामी ॥ विकळ झाला नंदीवरोनी ॥ धीर न धरवे महीलागुनी ॥ उलथोनियां पडियेला ॥ ४३ ॥ परम झाला गात्रीं विकळ ॥ शस्त्रें मुठीचीं सुटलीं सकळ ॥ मुखीं [७]रुधिर लोटलें तुंबळ ॥ सरितापाठीं मिरवलें ॥ ४४ ॥ अष्टभैरव अष्टशस्त्रेंकरून ॥ तेही पडले जर्जर होऊन ॥ तीव्र प्रहारें मूर्च्छा येऊन ॥ महीवरती मिरवती ॥ ४५ ॥ सकळ पडले शुद्धिरहित ॥ अष्टअस्त्रें तीं झालीं गुप्त ॥ परी गंधर्वा हा सकळ वृत्तांत ॥ युद्ध पाहतां समजला ॥ ४६ ॥ मग ते परम तांतडीकरोन ॥ विष्णूस ही जाणविती खूण ॥ परम अवस्थेसी ऐकून ॥ [८]कमलापति धांविन्नला ॥ ४७ ॥ मनोवेगातें मार्गें टाकून ॥ शीघ्र पातला [८]रमारमण ॥ नाथासन्मुख निकट येऊन ॥ हृदयीं प्रीतीनें कवळीतसे ॥ ४८ ॥ हृदयीं कवळून योगेमूर्ती ॥ म्हणे महाराजा

१ इंद्रशक्ति. २ बाणांची मूठ. ३ मेघास्त्र. ४ गरुडास्त्र. ५ इंद्रास्त्र. ६ शंकर. ७ रक्त. ८ विष्णु. ९ रेवणनाथ.

तपःपती ॥ कवण कारणें विक्षेप चित्तीं ॥ कोपानळ पेटला ॥ ४९ ॥ येरी म्हणे पंकजाक्ष ॥ मी सरस्वतीविप्राच्या गृहीं प्रत्यक्ष ॥ असतां शिवें धाडूनि यक्ष ॥ पुत्र त्याचा मारिला ॥ ५० ॥ तरी त्या अभिप्रायेंकरून ॥ आतां घेईन शिवाचा प्राण ॥ उपरी संजीवनीअस्त्रें-करून ॥ बाळ उठवीन तयाचें ॥ ५१ ॥ नातरी रक्षिणें असेल प्राण ॥ तरी सप्तबाळें द्या आणोन ॥ ऐसें नाथ बोले वचन ॥ विष्णु त्यातें बोलतसे ॥ ५२ ॥ म्हणे महाराजा बाळें सप्त ॥ आहेत मजपाशीं जीवदशाव्यक्त ॥ तरी सप्तही जीव तुम्हांतें ॥ हस्तगत करितों मी ॥ ५३ ॥ जीवदशा तुम्हां करितां अर्पण ॥ पुढें देह तुम्ही करा निर्माण ॥ ऐसें नाथें ऐकून वचन ॥ अवश्य म्हणे तयातें ॥ ५४ ॥ मग वातप्रेरक अस्त्र जपूनी ॥ सावध केला शूळपाणी ॥ उपरी विभक्तअस्त्र जपूनी ॥ गण सोडविले सकळिक ॥ ५५ ॥ स्थितिमंत्र सुखवास सघन ॥ अष्टभैरवां लाविलें भस्म ॥ तेही झाले सुखरूप पूर्ण ॥ अस्त्रप्रहारांवेगळे ॥ ५६ ॥ मग सकळ सावध होऊनि प्रीतीं ॥ नमिते झाले योगपती ॥ मग सप्तजीवदशा देऊनि हातीं ॥ बोळविला महाराजा ॥ ५७ ॥ व्यानास्त्र मुखीं जपून ॥ महीं उतरला तपोधन ॥ शीघ्र विप्रग्रामीं येऊन ॥ सरस्वतीविप्रा सांगतसे ॥ ५८ ॥ म्हणे बा रे पुत्रकलेवर ॥ कुटीं मेणासम समग्र ॥ ऐसें ऐकतां सरस्वतीविप्र ॥ उखळीं पुत्र वाहिला ॥ ५९ ॥ कुटूनि केला मेणासमान ॥ मग समग्र भाग दिला आणून ॥ मग तयाचे यथाविभाग करून ॥ सप्त पुतळे बनविले ॥ ६० ॥ सिद्ध पुतळे झालियावर ॥ संजीवनीप्रयोगीं वाग्गुत्तर ॥ तेणें सजीव झाले समग्र ॥ जीवदशा प्रगटुनी ॥ ६१ ॥ प्रगटती अट्टहास्य करून ॥ रुदन करिती सप्तही नंदन ॥ मग सरस्वती कांतेस ओपून ॥ म्हणे पाळण करीं यांचें ॥ ६२ ॥ मग द्वादश दिवसां पाळखीं[२] घालून ॥ सप्त पुत्रांचें ठेविलें नाम ॥ सारंगीनाथ द्वितीयाकारण ॥ जोगीबा नाम ठेविलें ॥ ६३ ॥ तृतीय बाळक निजानंद दिनानाथ ॥ नयननाथ मिरवला चतुर्थ ॥ यदुनाथनामीं पंचम समर्थ ॥ षष्ठ निरंजननामीं मिरवला ॥ ६४ ॥ सातवा महापुरुष गहिनीनाथ ॥ असे सप्त पुरुष जगविख्यात ॥ पुढें द्वादश वरुषें रेवणनाथें ॥ अनुगृहीत केले ते ॥ ६५ ॥ मग त्या सप्त शिष्यां-कारण ॥ सिद्ध केलें विद्या ओपून ॥ जगीं मिरवले सिद्ध म्हणून ॥ चौऱ्यायशीं सिद्धांत पैं ॥ ६६ ॥ मग तेथेंच राहून योगपती ॥ सेवा घेतसे सातांहातीं ॥ असो रेवणनाथ विटें प्रांतीं ॥ अद्यापपर्यंत नांदतसे ॥ ६७ ॥ असो ऐसें कथेचें चांगुलपण ॥ जो नित्य करी श्रवण पठण ॥ बाळमृतीचा दोष जाऊन ॥ पुत्रवान होईल कीं ॥ ६८ ॥ बाळें होऊनि दोषें मरती ॥ तिनें सुस्नात होऊनि कथेप्रती ॥ मग बाळें तियेचीं चेवलीं नै[३] जाती ॥ हें गोरक्ष बोलिला जाण पां ॥ ६९ ॥ तरी ऐशी दोषनिवारण ॥ कथा ऐकावी कामिकानें[४] ॥ याउपरी वटसिद्धनाथाचें कथन ॥ स्वीकारावें श्रोत्यांनीं ॥ ७० ॥ पूर्वीं सरस्वतीचे उद्देशेंकरून ॥ ब्रह्मवीर्य गृहातें पडलें खचोन ॥ सर्पिणी-मस्तकीं अकस्मात येवोन ॥ आदळलें ते समयीं ॥ ७१ ॥ मौळदंडीं पडलें रेत ॥ तंव ती पाहे अकस्मात ॥ चित्तीं म्हणे भक्ष महीतें ॥

---

१ शंकर. २ पाळण्यांत. ३ नाश पावणार नाहींत. ४ इच्छा करणाऱ्यानें.

पडला आहे सुढाळ ॥ ७२ ॥ मग तें उचलोन आननपुटीं ॥ सांठविती झाली आपुले पोटीं ॥ परी सांठवल्या रेत शेवटीं ॥ गर्भ वाढी लागला ॥ ७३ ॥ राहिला परी आस्तिकासी ॥ समजून आलें अंतरासीं ॥ कीं ब्रह्मवीर्य तक्षकात्मजेसी ॥ प्राप्त झालें तये वेळीं ॥ ७४ ॥ झालें परी महासिद्ध ॥ उदरा येईल अवतार प्रसिद्ध ॥ जो नवांतील नारायण शुद्ध ॥ सिद्धनाथ म्हणतील जो ॥ ७५ ॥ ऐसें जाणूनि आस्तिकमुनी ॥ पाहता झाला तक्षकनंदिनी ॥ समीप तीतें पाचारुनी ॥ बोलता झाला महाराजा ॥ ७६ ॥ म्हणे माय वो ऐक वचन ॥ तव तो भोग नव्हे दुर्बळवान ॥ तुज उदरीं नारायण ॥ आविर्होत्र येतो गे ॥ ७७ ॥ परी हें तूतें सांगावया कारण ॥ पुढें आहे दुर्घट विघ्न ॥ जनमेजय राजयानें ॥ सर्पसत्र मांडिलेंसे ॥ ७८ ॥ सकळ ऋषींचा घेवोनि मेळ ॥ मखकुंडीं ठेविला प्रळयानळ ॥ सर्पसमिधा योजूनि सबळ ॥ ऋषि मंत्र आव्हानिती ॥ ७९ ॥ तरी माय वो सांगों किती ॥ बहु फण्यांची होईल आहुती ॥ तें अवगमोनि माझिये चित्तीं ॥ तुजपाशीं पातलों ॥ ८० ॥ तरी आतां गर्भभरणीं ॥ स्वदेहातें बैसा आच्छादुनी ॥ येरी म्हणे कवणा स्थानीं ॥ राहूं लपोनि महाराजा ॥ ८१ ॥ ऐसें बोलतां वागुत्तर ॥ तों समीप देखतां वटतरुवर ॥ तोही जुनाट काष्ठपोखर ॥ महीवरी मिरवतसे ॥ ८२ ॥ तें पाहूनियां आस्तिकमुनी ॥ म्हणे माय वो तक्षकनंदिनी ॥ या वटपोखरांत संचरोनी ॥ प्राण आपुला रक्षीं पैं ॥ ८३ ॥ मग तक्षकात्मजबाळा ॥ रिघती झाली वटस्थळा ॥ काष्ठपोखरीं तपोवेल्हाळा ॥ गरोदरपण भोगीतसे ॥ ८४ ॥ परी आस्तिकें अचळ वज्रप्रयोगीं ॥ सिंचिला तरु अंबुभागीं ॥ अचळ करूनि तरु वेगीं ॥ हस्तनापुरीं चालिला ॥ ८५ ॥ जाऊनि मखमंडपांत ॥ भेटूनि सकळ ऋषींतें गुप्त ॥ तक्षकसुतेचा सकळ वृत्तांत ॥ निवेदिला तयांसी ॥ ८६ ॥ म्हणे ब्रह्मवीर्य सनाथवंत ॥ तें उदरीं आहे नेमस्त ॥ तरी तो वटसिद्धनागनाथ ॥ प्रगट होईल महाराजा ॥ ८७ ॥ ऐसें सांगतसे वर्तमान ॥ जो नवांतील आविर्होत्र नारायण ॥ सर्पसत्रीं आपण ॥ योजूं नये तयासी पैं ॥ ८८ ॥ ऐसें सांकल्य वर्तमान ॥ ऐकूनि ऋषी तुकाविती मान ॥ आपुले हृदयीं शोध करून ॥ अवश्य म्हणती तयातें ॥ ८९ ॥ मग तक्षकात्मजा नाम पद्मिणी ॥ मंत्रप्रयोगीं देती सोडूनी ॥ येरीकडे उरगी गर्भिणी ॥ नवमासांतें पुरलीसे ॥ ९० ॥ तिकडे सर्पसत्र झालें समाप्त ॥ इकडे दिवस भरले नेमस्त ॥ मग प्रकृतिअंड होऊनि उदित ॥ प्रसूत झाली पद्मिणी ॥ ९१ ॥ असो वटवृक्षपोखरांत ॥ अंड राहिलें दिवस बहुत ॥ आविर्होत्र नारायण त्यांत ॥ ईश्वरसत्ते संचरला ॥ ९२ ॥ दिवसेंदिवस अंडांत ॥ वाढी लागलेंसे जीववंत ॥ देह होतां सामर्थ्यवंत ॥ भग्न झालें अंड तें ॥ ९३ ॥ मग ते तळवटपोखरांत ॥ बाळ रुदन करी अत्यंत ॥ निढळवाणी कोणी त्यातें ॥ रक्षणांतें नसेचि ॥ ९४ ॥ जैसी जळांतील जळमासोळी ॥ उड्डाण घेतां पडे वेगळी ॥ मग ती अत्यंत चित्तीं तळमळी ॥ तैसें झालें बाळका ॥ ९५ ॥ अट्टाहास्यें करीतसे रुदन ॥ तैं पातला शुचि ब्राह्मण ॥ गौडजाती अथर्वण ॥ वेदभूषणीं मिरवतसे ॥ ९६ ॥ कोशधर्म तयाचें नाम ॥ आचार-

१ तोंडांत. २ मनांत. ३ यज्ञकुंडामध्यें. ४ समग्र. ५ सर्पीण. ६ अनाथ अशा.

शील विद्यावान ॥ सहा शास्त्रीं पारंगत पूर्ण ॥ चतुर्विध जाणता तो ॥ ९७ ॥ अपर सूर्य तो सर्वज्ञानमूर्ती ॥ परी दरिद्र प्रारब्धगतीं ॥ तेणेंकरून संसारक्षितीं ॥ परम चित्तीं विटला ॥ ९८ ॥ विटला परी पत्रावळीकारण ॥ पाहता झाला वटस्थान ॥ पत्रें तोडावीं हें मनीं इच्छून ॥ तयानिकटीं पातला ॥ ९९ ॥ निकट येतां तया तरुतळवटीं ॥ बाळ रडे तें कर्णपुटीं ॥ ऐकूनि चहूंकडे फिरवी दृष्टी ॥ तों कांहीं दिसेना ॥ १०० ॥ मनांत होय साशंकित ॥ म्हणे बाळरुदन कोठें होत ॥ स्वर्गींचे सुरवर त्यातें पाहात ॥ बोलते झाले तयातें ॥ १ ॥ म्हणती कोशधर्मा सुशीळा ऐक ॥ या वटतरूंत आहे बाळक ॥ तरी त्या मांदुसा तूं पाईक ॥ दृष्टिगोचर नव्हेसि ॥२॥ तरी प्रज्ञावंता ऐक वचन ॥ तूं ते मांदुस काढून ॥ आपल्या गृहास तें नेऊन ॥ संगोपन करीं त्याचें ॥ ३ ॥ तव घरीं येतां तें बाळक ॥ सुदैवदशेचा उगवेल अर्क¹ ॥ मग दरिद्रता सकळिक ॥ जाईल नासून महाराजा ॥ ४ ॥ जैसें परिसअंगसंगेंकरून ॥ लोहजाती होय सुवर्ण ॥ मग षड्गुणैश्वर्य तयाकारण ॥ दृष्टी पडेना काळिमा ॥ ५ ॥ तेवीं तूं बाळ गृहीं नेतां ॥ सकळ हरेल व्यथा दरिद्रता ॥ बाळ नव्हे प्रत्यक्ष सविता ॥ आविर्होत्र नारायण तो ॥ ६ ॥ ऐसें बोलोनि साचोकार² ॥ सुरवरीं पाठविला एक शर ॥ तेणें तरु तो महीवर ॥ खंडूनियां पडियेला ॥ ७ ॥ तरू खंड होतां त्वरित ॥ तो कोशधर्म बाळ देखत ॥ बालार्ककिरणीं तेज अद्भुत ॥ नक्षत्रपतीतें³ लाजविता ॥ ८ ॥ बाळ तेजस्वी मनोहर ॥ अंबरीं पाहते झाले सुरवर ॥ मग सकळीं घेवोन कुसुमभार ॥ वर्षाव करिती भावार्थें ॥ ९ ॥ देखतांचि पदपद्मा ॥ सकळीं जोडोनि करयुग्मा⁴ ॥ नमोनियां योगसद्मा ॥ कोशधर्मा बोलती ते ॥ ११० ॥ म्हणती महाराजा सभाग्यवंत ॥ तूं एक आहेस भूमंडळांत ॥ वटसिद्ध नागेशनाथ ॥ तूतें प्राप्त झाला असे ॥ ११ ॥ तरी हा पद्मिणी नागिणीपोटीं ॥ रक्षिला गेला तरूच्या तळवटीं ॥ आणि सिद्धता पावूनि त्या नागवटीं ॥ नाथ मिरवेल योग्यांचा ॥ १२ ॥ ऐशी करणी झाली येथ ॥ म्हणोन नाम वटसिद्धनागनाथ ॥ तरी तुम्ही आतां महीतें ॥ हेंचि नांव पाचारा ॥ १३ ॥ ऐसें ऐकोनि कोशधर्में ॥ बाळ उचलिलें अति प्रेमें ॥ परम आनंदें आपुलें धाम⁵ ॥ सेवोनि कांतेप्रती बोलतसे ॥ १४ ॥ तंव ती कांता सुरादेवी ॥ परम प्राज्ञिक सुशील महीं ॥ धैर्य औदार्य सत्वपदवी ॥ लोकांमाजी दावीतसे ॥ १५ ॥ बाळ सत्यवतीनें देखतां ॥ म्हणे मजकडे द्या लावण्यवंता ॥ तंव तें दृष्टिगोचर करितां ॥ बाळ अर्कासम दिसतसे ॥ १६ ॥ मग हांसोनि बोले कोशधर्मा ॥ म्हणे महाराजा नरेंद्रोत्तमा ॥ बाळ कोणाचें उगमा ॥ आणिलें तें मज सांगा ॥ १७ ॥ मज वाटतें कीं बाळ नव्हे ॥ सानरूपी⁶ यमपिता झाला आहे ॥ कीं ईश्वरें सृष्टीं पाहें ॥ दुजा चंद्र निर्मिला कीं ॥ १८ ॥ कीं विद्युलता सकळ लाजिरवाण ॥ कीं मेघा परती लपवो स्वरूपानन ॥ म्हणोन ईश्वरें तेज हरून ॥ तुम्हांहातीं दीधलें ॥ १९ ॥ कीं नक्षत्रांचा अपार मेळा ॥ नावडे ईश्वरा पृथक्पाळा ॥ म्हणोनि हें समुच्चयेंकरूनि गोळा ॥ तुम्हांलागीं ओपिलें ॥ १२० ॥

१ सूर्य. २ खरेपणानें. ३ चंद्राला. ४ दोन्ही हात. ५ घर. ६ लहान रूप घेणारा.

ऐसें म्हणोनि स्नेहभरित ॥ बाळ उचलोनि हृदयीं लावीत ॥ मग कोशधर्में सकळ वृत्तांत ॥ निवेदिला कांतेतें ॥ २१ ॥ सुरादेवीनें सकळ कथन ॥ सुरवरवाक्यास ऐकोन ॥ परम पावोनि समाधान ॥ पाळखां घालोनि हालवीत ॥ २२ ॥ हृदयीं कवटाळितां बाळ ॥ पयानें दाटलें कुचमंडळ ॥ पान्हावोनि बाळमुखकमळ ॥ पयोधराग्रीं प्रेरीतसे ॥ २३ ॥ मग तें बाळ घोंटीत क्षीर ॥ जठराग्नीचा दाहक उबार ॥ शांतवोनि शांतिपर ॥ बाळ मिरवे देहस्थ ॥ २४ ॥ अति लालनें स्नेहभरित ॥ मार्जन न्हाणोनि घातला पालखांत ॥ नाम ठेविलें वट-सिद्धनाथ ॥ ओंव्या मंगळें गातसे ॥ २५ ॥ मग दिवसेंदिवस रहणीं घन ॥ सिंचन करी मोहसंजीवन ॥ सुरादेवीचे पंच प्राण ॥ निजांकुरीं लवलवती ॥ २६ ॥ मग ती पल्लवाकार ॥ फळ दावी भक्तिपर ॥ परी तीक्ष्ण कटु व्यवहार ॥ स्वप्नामाजी दिसेना ॥ २७ ॥ जैसें तमा-रीचे गांवीं ॥ नांदू न शके तमाची पदवी ॥ कीं कामधेनूचे कांसेठाईं ॥ क्षुधानळें पीडियेला ॥ २८ ॥ तेवीं सुरादेवीचें अंतःकरण ॥ कदा न दर्शवी भिन्नदर्शन ॥ परम मोहें गेली वेष्टोन ॥ पाषाण जेवीं शेवाळीं ॥ २९ ॥ असो ऐसे सुखस्थित ॥ बाळा लोटले दिवस बहुत ॥ सप्तवरुषी कोशसुत ॥ मौंजीबंधना मिरवला ॥ १३० ॥ याउपरांतिक एके दिवशीं ॥ सोडोनियां क्षेत्र काशी ॥ नागनाथ सहज खेळावयासी ॥ भागीरथीतें पातला ॥ ३१ ॥ टळटळीत भरले दोन प्रहर ॥ काशीविश्वेश्वराचे समोर ॥ बाळ क्रीडतसे मनोहर ॥ अर्क जेवीं दूसरा ॥ ३२ ॥ तों तेच समयीं अकस्मात ॥ येता झाला अत्रिसुत ॥ येतांच दृष्टी यथास्थित ॥ बाळावरी गेलीसे ॥ ३३ ॥ तो बाळ तेजस्वी अर्कनीतीं ॥ खेळताहे स्वस्थगतीं ॥ बहु मुलें बैसवोनि पंगतीं ॥ लटकेंच अन्न वांटीतसे ॥ ३४ ॥ मुलें गव्या गव्या म्हणोन ॥ धालों म्हणती सेवोनि अन्न ॥ आतां पुढें वाढणें ॥ वाढूं नको आम्हांसी ॥ ३५ ॥ परी तो तयांसी आग्रह करीत ॥ घ्या घ्या म्हणोनि वाचे वदत ॥ न घे त्याची विनंति करीत ॥ रसाळवाणीकरूनियां ॥ ३६ ॥ तें पाहोनियां अनुसूयासुत ॥ पाहोनि मनीं हास्य करीत ॥ चित्तीं म्हणे लटक्या अन्नातें ॥ मुलें धालों म्हणताती ॥ ३७ ॥ तरी आतां आपण संचरोन ॥ मुलांलागीं द्यावें अन्न ॥ मग प्रत्यक्ष बाळतनु धरोन ॥ तयांमाजी संचरला ॥ ३८ ॥ बाळ अंगणीं उभा राहोन ॥ म्हणे अतीत आला तुम्हांकारणें ॥ अन्न मागतो उदरा-कारणें ॥ तृप्त त्यातें करावें ॥ ३९ ॥ तंव तीं मुलें तीव्रपणें ॥ पाठीं लागती वसवसोन ॥ म्हणती आमचे मंडळांत कोण ॥ आलाअसे आतां खेळावया ॥ १४० ॥ कोणी दाटूनि पुढें येती ॥ कोणी शेला उगारिती ॥ कोणी पाषाण घेती हातीं ॥ जातोस कीं मारूं तुज ॥ ४१ ॥ ऐशीं मुलें दाविती चिन्ह ॥ तें श्रीनागनाथें पाहोन ॥ सकळ मुलांची इच्छा पाहून ॥ वारिता झाला स्वहस्तें ॥ ४२ ॥ म्हणे गंडे हो ऐका वचन ॥ आपण बैसलों सेवूं अन्न ॥ त्यांत अतीत आला जाण ॥ त्यासी दवडूं नये कीं ॥ ४३ ॥ पहा आपुले घरीं सांगे पिता ॥ विन्मुख कोणी न व्हा अतीता ॥ तैसाच आपण भिक्षुक मागता ॥ आला आहे समयासी ॥ ४४ ॥ काढोनि अंगा-



१ पाळण्यांत. २ दूध. ३ सूर्याचे. ४ श्रीदत्तात्रेय.

वरील चीर ॥ अंग पुसीतसे आपुले करीं ॥ गंध लावी भाळावरी ॥ शुष्कपूजा करीतसे ॥ ४५ ॥ तरी अतीताचें करून पूजन ॥ पोटभरी घालावें अन्न ॥ प्रत्यक्ष नाथ करीं धरोन ॥ बाळें अंगणीं बैसविला ॥ ४६ ॥ लटकेंच कल्पनेचें करून जीवन ॥ तया अतीता घालितां स्नान ॥ हस्तपादावरी फिरवून ॥ करिती क्षालन अंगाचें ॥ ४७ ॥ लटकें मनाचें करून सुमन ॥ हार गुंफिला कल्पनेकरून ॥ तो अतीताचे गळां घालोन ॥ लटका धूप दाविती ॥ ४८ ॥ भावपूर्वक लावोनि नयन ॥ ऐक्य करिती पंच प्राण ॥ परी सहज-दृष्टीतें ज्ञानपण ॥ आरती करिती अतीताची ॥ ४९ ॥ मग लटकेंचि पात्र पुढें ठेवून ॥ कल्पूनि लटकें आणून वाढिती अन्न ॥ मग उभय हस्त जोडून ॥ प्रार्थना करिती अतीताची ॥ १५० ॥ नम्र वाचा रसाळ वचन ॥ म्हणती स्वामी सेवा अन्न ॥ वारंवार नमस्कार करोन ॥ आणीक वाढूं म्हणताती ॥ ५१ ॥ ऐसें आदराचें चांगुलपण ॥ पाहूनियां अत्रिनंदन ॥ चित्तीं म्हणे प्रज्ञावान ॥ बाळ सुशीळ आहे हा ॥ ५२ ॥ उदारबुद्धीं तृप्ती करून ॥ वर्तताहे दातृत्वपणें ॥ हे तों पूर्वींची योगसृष्टीकरोन ॥ योग्यावांचोन घडेना ॥ ५३ ॥ सुशब्द आणि विवेकशांती ॥ विचरे जयाचे देहाप्रती ॥ जरी पूर्वींचा योगभ्रष्टगती ॥ योग्यावांचून घडेना ॥ ५४ ॥ स्नान आणि हरणी स्थिती ॥ याचक आर्तवान बहुत युक्तीं ॥ तरी पूर्वींची योगश्रेष्ठ गती ॥ योग्यावांचून घडेना ॥ ५५ ॥ उदारबुद्धि धार्मिक-स्थिती ॥ विचार रसाळ सर्वांप्रती ॥ दुःख न देणें परांप्रती ॥ हें योग्यावांचून घडेना ॥ ५६ ॥ ऐसें चित्तीं अवगमून ॥ शोधी तयाचा पूर्वजन्म ॥ तों आविर्होत्र नारायण ॥ निजमानसीं भासला ॥ ५७ ॥ मग कृपासिद्धि वरूनि युक्तीं ॥ देता झाला तयाचे हातीं ॥ जे जे वदे वाणी निश्चितीं ॥ ते ते पदार्थ मिरवावे ॥ ५८ ॥ मग परम होऊन हर्षयुक्त ॥ म्हणती हा एक उदेला महीनाथ ॥ समीप बोलावोनि त्यातें ॥ हस्त धरी तयाचा ॥ ५९ ॥ उपरी कर्णीं सांगे मात ॥ भोजन घालीं सकळ मुलांतें ॥ परी तूं न सेवीं सिद्धिअन्नातें ॥ कदाकाळीं बाळका रे ॥ १६० ॥ नाथ आग्रहें त्या वाढीत ॥ तरी तें पात्र मिरवे अति अद्भुत ॥ ज्या पदार्थाचें नाम वदत ॥ तो पदार्थ मिरवे पात्रावरी ॥ ६१ ॥ मग तीं बाळें अज्ञानपणें ॥ साचोकारीं करिती भोजन ॥ ऐसे लोटले बहुत दिन ॥ नित्य खेळ खेळ-ताती ॥ ६२ ॥ स्वनाम सांगून अत्रिनंदन ॥ चालता झाला पुसोनि नाम ॥ येरीकडे पंक्तीं बैसवोन ॥ भोजन खेळीं खेळती ॥ ६३ ॥ आपुलाले गृहीं जाऊन ॥ सेविती कांहीं किंचित अन्न ॥ तें चाटीबोटीकरून ॥ अन्न नासिती विखुरती ते ॥ ६४ ॥ येथें यथेष्ट इच्छे-समान ॥ सर्व पदार्थ षड्रसान्न ॥ मग तें गृहींचें कदन्न ॥ तुच्छपणीं वाटलें त्यां ॥ ६५ ॥ जे ब्रह्मरूप रसातें धाले ॥ आपपर सकळ विसरले ॥ ते मायाद्वैतकांचीस बैसले ॥ लाळ घोंटीत सेवावया ॥ ६६ ॥ कीं हाटकतगट जडावासी ॥ नवरत्नकोंदण त्या भूषणासी ॥ ते काय करून काचमण्यासी ॥ स्पर्शित होतील चित्तांत ॥ ६७ ॥ कीं सुरंगरंगी धाममंचकीं ॥ कुसुमगंधागरु सेवितां थोर कीं ॥ तो

१ वस्त्र. २ पाणी. ३ फूल. ४ पीडलेला. ५ आणून, समजूत. ६ वाईट अन्न. ७ सेवून तृप्त झाले.

त्यजूनि दुर्गंध लोकीं ॥ गल्लीमाजी पडेल कीं ॥ ६८ ॥ तन्न्याय मुलें सकळ ॥ सेविती षड्रसान्नातें अमळ ॥ तयां गृहींचें कदन्न केवळ ॥ मिष्ट कांहीं लागेना ॥ ६९ ॥ मग ते तयाचे तात मात ॥ गृहीं मुलांस पुसती यथार्थ ॥ तेही वदती प्रांजळवंत ॥ षड्रस खेळ अन्नाचा ॥ १७० ॥ म्हणती तुम्ही दरिद्रपणीं ॥ सेवितां कदन्न कांजीपाणी ॥ आम्ही नित्य सुरनदीवर जाऊनी ॥ षड्रस अन्न सेवितों ॥ ७१ ॥ तंव ते असत्य मानूनि चित्तीं ॥ गुप्तवेषें दुरूनि पाहती ॥ सरितातीरीं बैसवोन पंक्तीं ॥ नागनाथ वाढीतसे ॥ ७२ ॥ मग ती चर्चा सर्वांगृहीं ॥ प्रगट झाली सर्वदेहीं ॥ मग कोशधर्मास सर्वही ॥ सुचविती अर्थातें ॥ ७३ ॥ म्हणती विप्रा तव नंदन ॥ स्वर्गसरिते नित्य जाऊन ॥ अपार पंक्ती बैसवून ॥ षड्रसान्न वाढीतसे ॥ ७४ ॥ आम्ही प्रत्यक्ष पाहूनि दृष्टीं ॥ बोलतों तूतें वाग्वटीं ॥ पात्रेंवीण उभय करपुटीं ॥ इच्छान्न वाढीतसे ॥ ७५ ॥ नेणों कैशी करितो गती ॥ उगला हात ठेवितो क्षितीं ॥ पदार्थविवरणा वाचेप्रती ॥ होतां पदार्थ मिरवत ॥ ७६ ॥ ऐसें ऐकोनि कोशधर्म ॥ आठवीं केलें सुरवरांचें वचन ॥ कीं पुढें पावोनि सिद्धकर्म ॥ सिद्धनामें मिरवेल हा ॥ ७७ ॥ ऐसी खूण जाणून चित्तीं ॥ म्हणे आश्चर्य दावी लोकांप्रती ॥ ऐसें कोणासही या क्षितीं ॥ घडून येत नसे कीं ॥ ७८ ॥ धिक्कार करूनि म्हणे तयांचा ॥ बाळ विकारी असत्य वाचा ॥ एके दिवशीं हस्त सुताचा ॥ धरूनि बैसवी अंकासनीं ॥ ७९ ॥ घेऊनियां मुखचुंबन ॥ आणि कुरवाळी हस्तें वदन ॥ म्हणे बा रे मुलांकारणें ॥ भोजन घालिसी कैसें तूं ॥ १८० ॥ ऐसें पुसतां कोडेंकरून ॥ तोही दाटला स्नेहेंकरून ॥ तातास म्हणे तुज भोजन ॥ तैसेंच घालितों आतां मी ॥ ८१ ॥ अंकींहूनि तत्काळ उठोन ॥ क्षितीं हस्त ठेवी पात्र म्हणोन ॥ तंव ते प्रत्यक्ष पात्रीं दिसे अन्न ॥ कोशधर्म पहातसे ॥ ८२ ॥ उपरी बहुधा प्रत्यक्षपणीं ॥ तंव ते पदार्थ दिसती नयनीं ॥ खाद्यें उपजलीं हें पाहोनी ॥ मनीं आश्चर्य मानिलें ॥ ८३ ॥ मग मान तुकावूनि कोशधर्म ॥ म्हणे बाळा होतें कैसें कर्म ॥ प्रसन्न झालें त्याचें नाम ॥ मजलागीं सांगावें ॥ ८४ ॥ यावरी म्हणे ताता ऐक ॥ आमुचे खेळीं आलें बालक ॥ तेणें सांगितलें कौतुक ॥ तें तुजप्रती सांगतों ॥ ८५ ॥ तेणें माझा हस्त धरोन ॥ उगाच कान फुंकोन ॥ मौळीं हस्त ठेवोन ॥ वाढावया लाविलें ॥ ८६ ॥ परी तें पोर आमुचे मेळीं ॥ सहज रीतीं आलें खेळीं ॥ परी त्या पोरीं करोनि रळी ॥ वारिलें म्यां सकळांतें ॥ ८७ ॥ उपरी मीं त्या मुलाकारणें ॥ तोषविलें मोठ्या गौरवानें ॥ जैसें तुम्हीं अतीताकारणें ॥ गौरवीतसां महाराजा ॥ ८८ ॥ लटकमटक स्नानभोजन ॥ सारूनि तयाचे पूजिले चरण ॥ नमस्कारून ते देखोन ॥ बोळविला महाराजा ॥ ८९ ॥ ऐसें ऐकोनि कोशधर्म ॥ आल्या अतीता धरोन नेम ॥ बाळाहातीं अतीतपूजा करोन ॥ तुष्टचित्तें बोळवी ॥ १९० ॥ ऐसा पाहोनि विप्रनेम ॥ परम संतोषला दत्तात्रेयनाम ॥ चित्तीं म्हणे मार्ग सुगम ॥ बाळालागीं लाधला ॥ ९१ ॥ तेणेंकरूनि सकळ क्षेत्रांत ॥ कीर्ति वाढली असंभावित ॥ महासिद्ध

१ त्याच रीतीनें. २ गंगेवर. ३ वाणीनें. ४ पृथ्वीवर. ५ मांडीवर. ६ प्रीतीनें. ७ मस्तकीं. ८ भांडण. ९ खोटें.

नारायणनाथ ॥ कितीकांनीं आराधिला ॥ ९२ ॥ मग शतानुशत सहस्र पंक्ती ॥ षड्रस अन्नें सेवोनि जाती ॥ बहुतांचीं कार्यें होती ॥ कनक धन वसना पावती ते ॥ ९३ ॥ मग जिकडे तिकडे नागेशसिद्ध ॥ कीर्ति वानिती जन प्रसिद्ध ॥ पंचविषयां संतोषोन सिद्ध ॥ इच्छिले कामा फळतसे ॥ ९४ ॥ मग अंगीं आलें शहाणपण ॥ देहाचें गेलें अज्ञानपण ॥ एके दिवशीं ब्रह्मनंदन ॥ ताताजवळी बैसला ॥ ९५ ॥ तातास म्हणे महाराज ॥ मम हातें पुरे जगाची चोज ॥ तरी कवणे अर्थीं जगाचें काज ॥ कवण्या अर्थें फळतसे ॥ ९६ ॥ दत्तात्रेय नामें बाळवेष ॥ बाळपणीं भेटला आम्हांस ॥ तरी कोण महापुरुष ॥ प्रतापी बळें आगळा ॥ ९७ ॥ तात म्हणे तो दत्तात्रेयमुनी ॥ त्रयदेवांचा अवतार भुवनीं ॥ सुफळ प्रारब्धें गेला भेटोनी ॥ तुजलागीं पाडसा ॥ ९८ ॥ नागेश म्हणे आतां परतोन ॥ कैसा भेटेल अत्रिनंदन ॥ हें सांगें मजलागून ॥ निवेदन करीं महाराजा ॥ ९९ ॥ याउपरी बोले कोशधर्म ॥ बाळा तयाची भेटी दुर्गम ॥ तो एके ठाईं नसे नेम ॥ अनेक क्षेत्रीं हिंडतसे ॥ २०० ॥ कोल्हापुर पांचाळेश्वर ॥ काशीक्षेत्र मातापुर ॥ ऐसीं हिंडतां अनेक क्षेत्रें ॥ कोठें पहासी पाडसा ॥ १ ॥ परी प्रारब्धयोगेंकरोनी ॥ भेटतसे दत्तात्रेय मुनी ॥ यत्न केल्या भेटीलागुनी ॥ आतुडेना बाळका ॥ २ ॥ जैसा कल्पतरू चिंतामणी ॥ निधीपरीस लावण्यखाणी ॥ बा रे नातुडे यत्नेंकरोनी ॥ अवचटपणीं मिळती ते ॥ ३ ॥ तेचि रीतीं अत्रिनंदन ॥ प्राप्त नव्हे यत्नेंकरून ॥ ऐसें सांगून कोशधर्म ॥ बाहेर गेला कार्यासी ॥ ४ ॥ येरीकडे नागनाथ ॥ हृदयीं आपुले विचारीत ॥ कीं ऐसा रवि सनाथवंत ॥ निजदृष्टीनें पहावा ॥ ५ ॥ परी पांचाळेश्वरीं मातापुरीं ॥ जाऊनि शोधावें कोल्हापुरीं ॥ जेथें जेथें वास धरित्रीं ॥ तेथें तेथें शोधावें ॥ ६ ॥ मग पुसोनि मातेसी ॥ निघता झाला मुनिशोधासी ॥ मातापुरादि पांचाळेश्वरासीं ॥ पाहूं पातला कोल्हापुरीं ॥ ७ ॥ क्षेत्र कोल्हापुरीं संचरोन ॥ पुसता होय जगाकारणें ॥ कीं येथें तो अत्रिनंदन ॥ कोणे ठायीं राहातसे ॥ ८ ॥ ऐसें ऐकोनि लोक हांसती ॥ वेड लागलें तूतें म्हणती ॥ अवधूत येतसे क्षेत्राप्रती ॥ तो कोणा प्रगट नव्हे रे ॥ ९ ॥ कोण्या स्वरूपीं येथें येऊन ॥ जात आहे भिक्षा मागोन ॥ ऐसे जगाचे बोल ऐकोन ॥ प्रत्युत्तर त्यां देतसे ॥ २१० ॥ म्हणे येथें भिक्षेकारणें ॥ येत आहे अत्रिनंदन ॥ तरी अन्य क्षेत्रीं भिक्षा मागणें ॥ तया घडत नाहीं कीं ॥ ११ ॥ येरें म्हणती त्यास ॥ भिक्षा मागावी कोल्हापुरास ॥ याव्यतिरिक्त अन्य क्षेत्रास ॥ अन्न न सेवी मागोनी ॥ १२ ॥ अन्य क्षेत्रीं तया अन्न ॥ चित्तीं न वाटे सुढाळपण ॥ यासम कैसें ग्राम आन ॥ पुण्यक्षेत्र हें असे ॥ १३ ॥ ऐसें क्षेत्र पुण्यपावन ॥ जरी या गांवीं न मिळे अन्न ॥ तरी उपवास करी अत्रिनंदन ॥ परी अन्य क्षेत्रीं सेवीना ॥ १४ ॥ अरे या गांवींचें शाकपत्र ॥ मानीत आहे परम पवित्र ॥ परी अन्य गांवींचें पक्वान्न स्वतंत्र ॥ विटाळापरी मानीतसे ॥ १५ ॥ जैसें एकपत्नी नरा ॥ कुरूप असेल जरी दारा ॥ तरी तीच भोगी व्यभिचारा ॥

१ वस्त्रें. २ मोठा. ३ दत्तात्रेयमुनि. ४ पृथ्वीवर. ५ इतर मंडळी. ६ भाजीचें पान. ७ स्त्री.

लावण्यलतिका आकळीना ॥ १६ ॥ कीं विप्रकरींचें कदन्न ॥ सोडून शूद्राचें षड्रस अन्न ॥ सेवील काय प्रसिद्ध ब्राह्मण ॥ मनें देवता न वरीच ॥ १७ ॥ तेवीं दत्त क्षेत्र हें सोडून ॥ कदा न पाहे अन्य ग्राम ॥ ऐसे त्या जगाचे बोल ऐकोन ॥ विचार करी मग नाथ ॥ १८ ॥ चित्तीं म्हणे करोनि पाकाग्नी ॥ ग्रामांत पेटूं न द्यावा अग्नी ॥ सकळ क्षेत्रा भोजन घालोनी ॥ पाठवावें गृहींगृहीं ॥ १९ ॥ मग तो स्वामी येतां भिक्षेस ॥ कोठोन अन्न वाढिती त्यास ॥ मग सहजचि स्वकीर्तीस ॥ आपणापासीं येईल कीं ॥ २२० ॥ येईल परी सिद्ध अन्न ॥ घेणार नाहीं भिक्षेलागून ॥ हेचि ओळखी जाणोनि खूण ॥ पाय वंदावे तयाचे ॥ २१ ॥ आणिक माझें विचारूनि नाम ॥ गेला आहे योगद्रुम ॥ तरी तोही भेटेल कृपेंकरोन ॥ नामाभिधान ऐकोनी ॥ २२ ॥ आणि मजही गेला सांगोन जाण ॥ कीं सेवूं नको सिद्धान्न ॥ आणिकांतें घालीं भोजन ॥ तुष्ट करीं क्षुधार्थी ॥ २३ ॥ ऐसी सांगून गेला मात ॥ तो सेविणार नाहीं सिद्धान्नातें ॥ ऐसा उपाय योजून चित्तांत ॥ लक्ष्मीदेउळीं संचरला ॥ २४ ॥ भेटूनि पुजारियासी ॥ ओवरी[1] एक रहावयासी ॥ मागूनि घेत अति प्रीतीशीं ॥ बंदोबस्तीं नेटकी ॥ २५ ॥ परी तो पुजारी भक्तिवान ॥ अतीतपूजा करोन ॥ नित्य पंक्तीस घेवोन ॥ भोजनातें सारीतसे ॥ २६ ॥ ऐसे लोटतां कांहीं दिवस ॥ पाचारूनि पुजाऱ्यास ॥ म्हणे माझें आहे मनास ॥ ग्रामभोजन[2] घालावें ॥ २७ ॥ परी तुम्ही साह्य होवोनि मातें ॥ खटपटीसह सारावें कृत्य ॥ तंव ते हांसून बोलती त्यातें ॥ फार बरें आहे जी ॥ २८ ॥ आम्ही खटपट करूं सघन[3] ॥ परी तुम्हापासीं कोठें अन्न ॥ उगेंच कैसें ग्रामभोजन ॥ सबळ सामर्थ्य असावें ॥ २९ ॥ नाथ म्हणे ऐका वचन ॥ सर्व सामग्री ठेविली करोन ॥ परी खटपटीची आंगवण ॥ करा कार्य सिद्ध हें ॥ २३० ॥ मग तो अवश्य म्हणोन त्यातें ॥ बोले आमुचें काय जातें ॥ पुण्यासाठीं धर्मकृत्य ॥ घडोनि येतें आम्हांसी ॥ ३१ ॥ ऐसें बोलोनि नाथातें ॥ पुजारी गेला स्वकार्यातें ॥ येरीकडे ओवरींत ॥ काय करी महाराजा ॥ ३२ ॥ कोरडे अन्नाचें घेवोनि नाम ॥ क्षितीसीं[4] ठेवी करपद्म ॥ तों कनकराशी पर्वतासमान ॥ तया ठाईं बैसल्या ॥ ३३ ॥ ऐशापरी अपार राशी ॥ निर्मिता झाला स्वकरेंसीं ॥ घृतस्नेहादि[5] सांठवणासी ॥ ओवरीमाजी विराजवीत ॥ ३४ ॥ मग येवोनि पुजाऱ्याचे सदनीं ॥ आणिला करीं कवळोनी ॥ ओवरीमाजी शीघ्रगती नेवोनी ॥ सिद्धाश्रम दाविला ॥ ३५ ॥ यावरी आतां पुढें कथन ॥ अन्नछत्रीं इच्छेसमान ॥ श्रीनागेंद्र सिद्ध करोन ॥ भेट घेईल दत्ताची ॥ ३६ ॥ तरी ती कथा सुधाकर ॥ पुढें सेवा श्रवणद्वारें ॥ धुंडीसुत मालू सुरस ॥ हरिकृपें सांगेल कीं ॥ ३७ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागार ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ षट्‌त्रिंशतितमोऽध्याय गोड हा ॥ २३८ ॥ अध्याय ॥ ३६ ॥ ॥ ओंव्या ॥ २३८ ॥ ॥ श्रीगोपालकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ शुभं भवतु ॥ ॥ ७ ॥ ॥ ७ ॥

१ खोली. २ गांवजेवण. ३ मोठी. ४ जमिनीवर. ५ तूप, तेल वगैरे.

श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी पंकजाक्षा ॥ आदिपुरुषा सर्वसाक्षा ॥ अव्यक्तव्यक्ता सर्वपरीक्षा ॥ महादक्षा रमावरा ॥ १ ॥ मागिले अध्यायीं कथन ॥ करविलें वटसिद्धनागनाथजन्म ॥ उपरी सिद्धकळा पावून ॥ कोल्हापुरीं पातला ॥ २ ॥ तेथें राहुनी लक्ष्मीआलयांत[1] ॥ पुजारी करूनि हस्तगत ॥ सर्व सामग्री ओवरींत ॥ नेऊनियां दाखविली ॥ ३ ॥ दाखवून म्हणे पुजाऱ्यांसी ॥ सबळ पडल्या कनकराशी ॥ तरी द्या सरतील ज्या दिवशीं ॥ तंववरी संतर्पण योजावें ॥ ४ ॥ योजावें तरी अन्यवर्ण[2] ॥ कांहींच धरूं नये भिन्न ॥ सकळांलागीं करूनि पक्वान्न ॥ पंक्तीतें वाढावें ॥ ५ ॥ गांवामाजी सकळांकारणें ॥ पेटूं न द्यावा पाकीं अग्न ॥ द्विवेळा त्रिवेळा घालून भोजन ॥ तुष्ट करावें सकळांतें ॥ ६ ॥ शेट सावकार राजा रंक ॥ सकळांस आणून ओपावा पाक ॥ अंत्य[3]-जादि भूदेव[4] लोक ॥ तुष्ट करावें सर्वांसी ॥ ७ ॥ ऐसें सांगून पुजाऱ्यांतें ॥ शीघ्र कामाठी आणवित ॥ कार्ययोगें अपरिमित ॥ सकाम कामीं योजिले ॥ ८ ॥ उत्तम तिथी नेम करून ॥ मांडव मंडप उभारून ॥ पाकालागीं सज्ज करून ॥ सर्व काम चालविलें ॥ ९ ॥ मग शिष्टाशिष्ट गृहीं धाडून ॥ तयां दिधलें आमंत्रण ॥ येरीकडे पाक निर्माण ॥ करावया लाविलें ॥ १० ॥ आणि ग्रामद्वारीं टिळा लावून ॥ भोजनदंवडी ग्रामीं पिटून ॥ सर्व सामग्री सज्ज करून ॥ काम चालीं चालविलें ॥ ११ ॥ शैव श्रावक आणि ब्राह्मण ॥ भेद चौऱ्यायशीं देशांसमान ॥ देवाग्नी विप्र ऋषि ब्राह्मण ॥ पाक भिन्नभिन्न निर्मिती ॥ १२ ॥ पंच द्राविड देश मुलतानी ॥ मारवाडी गुर्जर हिंदुस्तानी ॥ हुसेनी पौंड्र मिळोनी ॥ देशजाती मिळाल्या ॥ १३ ॥ असो भेदाभेद अन्यजाती ॥ षड्मार्गांनीं पाकविती ॥ खाज्या करंज्या कचुर मालती ॥ शिरा बुंदी करिताती ॥ १४ ॥ पुरी पोळी क्षिप्रा[5] बहुत ॥ चमचमीत भाज्या वरण-भात ॥ पंचमधु त्यांत अपार घृत ॥ इच्छेसमान मिरवलें ॥ १५ ॥ असो पाकाग्नी सिद्ध करून ॥ चालते पंक्तीं सेविती अन्न ॥ पुन्हां क्षुधा लागल्या परतून ॥ येऊन अन्न सेविती ॥ १६ ॥ प्रथम पाक जातजाती ॥ तेथें नसे कांहीं अरुती ॥ कितीक वाढून गृहास नेती ॥ भोजन करूनि मन माने ॥ १७ ॥ कोणी कोरडेंच उपटून नेती अन्न ॥ नेऊन भरिती आपुलें सदन ॥ मग जिकडे तिकडे सिद्ध अन्न ॥ सर्व झालें गांवांत ॥ १८ ॥ राव रंक कुटुंबांसहित ॥ अन्न सेवूनि होती तृप्त ॥ मग वन्ही इतुका दीपा-निमित्त ॥ गृहोगृहीं मिरवला ॥ १९ ॥ असो यापरी एक मास ॥ ग्राम सेवी सिद्धअन्नास ॥ यावरी कथा अत्रिसुतास ॥ कैशी वर्तली ती ऐका ॥ २० ॥ प्रथम दिनीं भिक्षेकारण ॥ गांवांत संचरे अत्रिनंदन ॥ कुश्चितरूपी विरूपवान ॥ भिक्षा मागे गृहोगृहीं ॥ २१ ॥ तंव ते घरोघरींचे जन ॥ म्हणती गांवांत प्रयोजन ॥ होतें तेथें आम्हां जाणें ॥ कुटुंबादि भोजना[6] ॥ २२ ॥ तरी तूं सत्वरगतीं जाऊन सारीं कां आपुली भुक्ती ॥ व्यर्थ शीण कासयाप्रती ॥ वाईट कदन्न इच्छुनी ॥ २३ ॥ उत्तम पक्व अन्न टाकून ॥ व्यर्थ

१ लक्ष्मीच्या देवळांत. २ पाहिजे त्या वर्णाला, सर्व वर्णांना. ३ महार वगैरे. ४ ब्राह्मण. ५ खीर. ६ भोजन.

कां शिणसी दरिद्रवान ॥ कामधेनूचे कासे आनन ॥ कांडणकोंडा कां भक्षावा ॥ २४ ॥ कीं कल्पतरु बैसल्या ठायीं ॥ इच्छेसमान पदार्थ देई ॥ मग कां शिणावें धांवून पायीं ॥ मेळवावया भुक्तीतें ॥ २५ ॥ परीस असतां गृहालागून ॥ मग चाकरी कासया करावी हेमाकारण ॥ रागें आतुडतां पीयूषपान ॥ मग वल्लीरसायण कां इच्छावें ॥ २६ ॥ तेवीं तूं प्रकरण करिसी येथें ॥ सोडून सुधारसअन्नातें ॥ कदन्नाकरितां या गांवांत ॥ हिंडतोस मतिमंदा ॥ २७ ॥ येपरी असों आम्ही गृहासी ॥ भोजना जातों आम्ही कुटुंबेंसीं ॥ पाक करावा कवणें अर्थेसीं ॥ तुजलागीं ओपावया ॥ २८ ॥ ऐसीं घरोघरीं भाषणें ॥ होती दत्तात्रेयाकारणें ॥ मग मनांत म्हणे प्रयोजन ॥ जाऊनि पाहूं निजदृष्टीं ॥ २९ ॥ ऐसें योजून स्वचित्तांत ॥ तेथें पातला तपोनाथ ॥ उभा राहून पाकशाळेंत ॥ पाक लक्षांत आणितसे ॥ ३० ॥ तंव तो महाराज योगकारण ॥ देखतां ओळखी सिद्धिअन्न ॥ थोडें करितां नगसमान ॥ होय अपार न पचवितां ॥ ३१ ॥ एक पोळी पडतांच लागली ॥ परी सहस्रही वाढियेली ॥ ऐशा चिन्हें ओळखिली ॥ सिद्धिकळा महाराजें ॥ ३२ ॥ मग तेथींच्या जनालागीं पुसत ॥ हें प्रयोजन एवढें कोण करित ॥ येरू म्हणती महा समर्थ ॥ वटसिद्धनागनाथ करितो कीं ॥ ३३ ॥ ऐसें ऐकूनि अत्रिसुत ॥ खूण जाणली स्वचित्तांत ॥ कीं म्यां मुलास सिद्ध पदार्थ ॥ काशीक्षेत्रीं ओपिले ॥ ३४ ॥ तरी त्याचें नांव होतें यथार्थ ॥ वटसिद्धनागेशनागनाथ ॥ तरी तोच काय आहे येथें ॥ मोठेपणा मिरवावया ॥ ३५ ॥ त्यास वर्षें लोटलीं वीस ॥ तरी झाला असेल स्थूळ देहास ॥ तरुणपणीं महंतीस ॥ वाढवावया टेंकला ॥ ३६ ॥ टेंकला परी मजकारणीं ॥ गोचर व्हावें ही इच्छा मनीं ॥ या गांवींचें संधान धरूनी ॥ संतर्पण मांडिलें ॥ ३७ ॥ हें गांवींचें भिक्षास्थान ॥ भ्रष्ट करावें सिद्धिअन्न ॥ सकळ गांवींचा पाक वर्जून ॥ केला अर्थ मजकरितां ॥ ३८ ॥ तरी आतां असो कैसें ॥ आजिचा दिन करूं उपवास ॥ ऐसें योजून स्वचित्तास ॥ स्वामी तेथून चालिला ॥ ३९ ॥ चालिला परी आणिक जन ॥ पाचारिती बाळाकारण ॥ आपण जावें भोजन करून ॥ तूं ऐसा कां जातोसी ॥ ४० ॥ ऐसें म्हणोनि हातीं धरिती ॥ पुन्हा पाकशाळे आणिती ॥ परी तो नायके योगपती ॥ गांवामाजी संचरे ॥ ४१ ॥ मग कणधान्याची भिक्षा करीत ॥ लोक पुसतां त्यांतें वदत ॥ कीं आमुचा नेम भिक्षारहित ॥ अन्न सेवित नाहीं जी ॥ ४२ ॥ ऐसें वदून सकळ लोकांत ॥ शुष्क अन्न मागून घेत ॥ काशीक्षेत्रीं जाऊन त्वरित ॥ भोजनातें सारीतसे ॥ ४३ ॥ ऐसे रीतीं एक मास ॥ लोटून गेला सहजस्थितीस ॥ परी नागनाथ स्वचित्तास ॥ विचार करिता पैं झाला ॥ ४४ ॥ म्हणे लोटला एक मास ॥ स्वामी न दिसे आम्हांस ॥ मग बोलावून ग्रामस्थांस ॥ पुसता झाला महाराज ॥ ४५ ॥ म्हणे गांवांत कोणी येत ॥ अतीत आहे भिक्षावंत ॥ तंव ते म्हणती सिद्धनाथ ॥ एक अतीत येतो कीं ॥ ४६ ॥ तो येथींचें तुमचें अन्न ॥ न सेवी मागतो



१ तोंड. २ सांपडलें असतां. ३ अमृताचें पेय. ४ अमृत. ५ पर्वताप्रमाणें.

भिक्षाकदन्न ॥ आम्ही पुसतां म्हणतो नेम ॥ माझा ऐसा आहे कीं ॥ ४७ ॥ आम्ही सारितों येथें भोजन ॥ म्हणोन न मिळे त्या पकान्न ॥ यास्तव कोरडें मागून धान्य ॥ नेत आहे महाराजा ॥ ४८ ॥ ऐसें बोलतां सकळ ग्रामस्थ ॥ त्यांसी म्हणे नागनाथ ॥ मागूं येतील जे गांवांत ॥ करा श्रुत मजलागीं ॥ ४९ ॥ त्यांस कांहीं न टाकून ॥ श्रुत करावें मजकारण ॥ मग मी जाऊन ग्लानित वचनें ॥ भोजन घालीन तयासी ॥ ५० ॥ परी आणीक एक अर्थ ॥ कोरडें अन्न न्या गृहांत ॥ येरू येईल जंव भिक्षेतें ॥ तेंचि अन्न वाढावें ॥ ५१ ॥ त्याणें हें अन्न घेतल्या पदरीं ॥ मग प्रयोजन आहे सांगा यापरी ॥ न घेई मग तुम्ही येऊन झडकरी ॥ श्रुत करा मजलागीं ॥ ५२ ॥ ऐसें पांच पन्नासांसी ॥ नाथें सांगितलें भाविकांसी ॥ जे कदाकाळीं कार्यासी ॥ ढळणार नाहींत निश्चयें ॥ ५३ ॥ ऐसें सांगून सिद्धिअन्न ॥ त्यांतें दिधलें वस्त्रीं बांधून ॥ मग आपुल्या गृहीं जाऊन ॥ वाट पहात बैसले ॥ ५४ ॥ तों श्रीदत्तात्रेय अत्रिसुत ॥ भिक्षेस आले अकस्मात ॥ तंव ते सिद्धिअन्न घेऊन हातांत ॥ सन्मुख येती घालावया ॥ ५५ ॥ म्हणती महाराजा आम्ही दीन ॥ आमुचे गृहीं कैंचें अन्न ॥ परी नागनाथ कृपा करून ॥ देतो अन्न आम्हांसी ॥ ५६ ॥ तरी त्या भिक्षेंत भिक्षा चोज ॥ तुम्हां वाढावें धर्मकाज ॥ ऐसें बोलती ते सहज ॥ श्रुत कराया दत्तासी ॥ ५७ ॥ परम चतुर [1]विचक्षण ॥ परीक्षा घेती श्रुत करून ॥ परी तो त्रैदेवांचा अंश हें ऐकून ॥ भिक्षेतें [2]आकळेना ॥ ५८ ॥ मागें पाऊल तत्काळ ठेवून ॥ जाता होय अत्रिनंदन ॥ मग ते आपुलें गृहींचें अन्न ॥ घेऊनियां धांवती ॥ ५९ ॥ म्हणती महाराजा नागनाथाचें अन्न ॥ आपणां न वाटे चित्तीं प्रसन्न ॥ तरी आमुचे कष्टा चित्त देऊन ॥ विन्मुख होऊं नका जी ॥ ६० ॥ ऐसें सांगून भिक्षा देती ॥ तो घेत नाहीं प्रांजळ चित्तीं ॥ मग लगबगें हेर जाती ॥ श्रुत करिती नाथासी ॥ ६१ ॥ नाथासी होतां श्रुत मात ॥ शीघ्र चपळत्वें येत धांवत ॥ निकट येतां [3]हस्तसंकेतें ॥ हेर दाविती तयासी ॥ ६२ ॥ तोही हस्तसंकेतखुणें ॥ अत्रिसुताच्या निकट जाऊन ॥ प्रथम करें कर कवळून ॥ चरणीं माथा ठेवितसे ॥ ६३ ॥ म्हणे महाराजा योगपती ॥ माय तूं माउली दयाळ [4]क्षितीं ॥ तरी डावलून पाडसाप्रती ॥ गुप्त कैसा विचरसी ॥ ६४ ॥ मज करूनियां निढळवान ॥ दैन्यवंत बहुत काननीं ॥ तेथें सांडून निष्ठुरपणीं ॥ जासी कैसा वो माये ॥ ६५ ॥ मज बाळपणीं आपुलें चोज ॥ दाऊनियां तपोभोज ॥ गेलासी टाकून महाराज ॥ मागें दृष्टी न करितां ॥ ६६ ॥ तरी मी सखया तुजवांचुनी ॥ पडलों आहें घोर वनीं ॥ मार्ग लक्षितां सूक्ष्मनयनीं ॥ प्राण कंठीं उरला असे ॥ ६७ ॥ जैसा चातक दृष्टीकरून ॥ वाट पाहे अंबुद सघन ॥ कीं उखरीं हरिणीलागून ॥ वाट पाहे पाडस ॥ ६८ ॥ वीस संवत्सर गेला काळ ॥ परी [6]चिंतावन्ही दाही तळमळ ॥ तें शांत करावया जळ ॥ तुझें कांहीं दिसेना ॥ ६९ ॥ [7]आपावेगळी [8]आपमासोळी ॥ तेवीं तव भेटी जीव तळमळी ॥ परी माये त्वां हृदयगतकमळीं ॥ निष्ठुर कैसें सांठविलें ॥ ७० ॥

१ विद्वान्. २ तयार होईना. ३ हातानें खूण करून. ४ पृथ्वीवर. ५ दीन. ६ चिंतारूप अग्नि. ७ पाण्याहून निराळा. ८ पाण्यांतील मासा.

ऐसें म्हणोनि आरंबळत ॥ नेत्रअश्रूंनीं पाद क्षालित ॥ म्हणे अंतर देऊन मातें ॥ गेलास कैसा महाराजा ॥ ७१ ॥ ऐसी वदूनि ग्लानित वाणी ॥ पूर लोटवी नेत्रजीवनीं ॥ मग त्रयदेव परीक्षा नयनीं ॥ अंतरातें ओळखी ॥ ७२ ॥ चित्तीं म्हणे प्रांजळवंत ॥ तापें तापला आहे नाथ ॥ मग मस्तकाखालीं घालून हस्त ॥ उठविलें महाराजें ॥ ७३ ॥ प्रेमस्नेहें कवळून पाणी ॥ हृदयीं कवळिला प्रेमेंकरूनी ॥ वामहस्तें कवळूनि मूर्ध्नी[1] ॥ नेत्रअश्रु पुसितसे ॥ ७४ ॥ मग धरूनि शीघ्र हस्त ॥ नेत स्वामी एकांतांत ॥ कृपें मौळीं ठेवूनि हस्त ॥ कर्णीं मंत्र ओपिला ॥ ७५ ॥ देऊन स्वमुखें आत्मखूण ॥ केला ब्रह्मपरायण ॥ अपरंपार अज्ञानपण ॥ मुळाहूनी नाशिलें ॥ ७६ ॥ ऐशी होतां ब्रह्मस्थितकोटी ॥ तत्काळ गुरुकृपें पडली दृष्टी ॥ जैसें अभ्र वितुळतां शेवटीं ॥ सुढाळ अर्क दिसतसे ॥ ७७ ॥ तेवीं पाहतां दत्तस्वरूप ॥ मग उचंबळला आनंदकूप ॥ अहा म्हणोनि बाप बाप ॥ पदीं मौळी अर्पीतसे ॥ ७८ ॥ मग परम प्रिय अत्रिनंदन ॥ कीं घेतला स्नेहेंकरून ॥ करें मुख कुरवाळून ॥ मागील कथा निवेदी ॥ ७९ ॥ आविर्होत्र नारायण ॥ आहेस बा तूं महीकारण ॥ उरगीकुशीं विधिवीर्यवान ॥ जन्म तुझा होय बा ॥ ८० ॥ तरी ही ऐशी मूळकथा ॥ मज आतुडली[2] हृदयीं शोधितां ॥ म्हणून बाळा तुझ्या हाता ॥ सिद्धिकळा ओपिली ॥ ८१ ॥ तरी तुज भेटी द्यावयाकारण ॥ इच्छित होतें माझें मन ॥ परी प्रारब्धयोगेंकरून ॥ आज घडून आलें बा ॥ ८२ ॥ जें प्रकरण समयोचित ॥ लोहचुंबकां भेटी होत ॥ कीं समुद्रक्षारऐक्यवंत ॥ नगआवळीं होतसे ॥ ८३ ॥ तेवीं बापा तुज मज भेटी ॥ झाली प्रारब्धयोगकांठीं ॥ ऐसें म्हणोन हृदयपुटीं ॥ नाथालागीं धरीतसे ॥ ८४ ॥ मग उभय प्रतापवंत ॥ निघतां सांडून ते एकांत ॥ ग्रामाबाहेर निघोनि त्वरित ॥ काशीक्षेत्रीं चालिले ॥ ८५ ॥ चालिले परी ऐसे रीतीं ॥ यानमंत्र प्रयोगी विभूतीं ॥ नाथभाळीं चर्चून निगुतीं ॥ गमन दोघे करिताती ॥ ८६ ॥ मग पवनवेगाचें गमन थकिता ॥ वाटे ऐसे गमती उभयतां ॥ लवतां नेत्रपातियें पातां ॥ काशीक्षेत्रीं पातले ॥ ८७ ॥ तेथें कांहींसें टेंकून क्षण ॥ सारिला आपुला नित्यनेम ॥ मग बद्रिकेदार चित्तीं धरून ॥ गमन करिती त्या मार्गें ॥ ८८ ॥ भाळीं प्रयोग दिव्य विभूती ॥ यानरूपाची महाशक्ती ॥ क्षणें बद्रिकाश्रमाप्रती ॥ जाऊनियां पोंचले ॥ ८९ ॥ संचार करिती शिवालयांत ॥ प्रत्यक्ष झाला उमाकांत[4] ॥ मग प्रेमआवडीं उभवून पर्वत ॥ एकमेकां भेटती ॥ ९० ॥ यापरी तो उमाकांत ॥ श्रीदत्तातें विचारीत ॥ दुसरा कोण आहे भृत्य[5] ॥ मेळविला सेवेसी ॥ ९१ ॥ ऐसें बोलतां अनुसूयासुत ॥ म्हणे महाराजा नाम या नागनाथ ॥ आविर्होत्र प्रतापवंत ॥ नारायणअवतार ॥ ९२ ॥ ऐसें बोलतां उमारमण[6] ॥ दत्तास म्हणे ऐक वचन ॥ यातें सद्विद्या अभ्यासून ॥ नाथपंथीं मिळवावा कीं ॥ ९३ ॥ मग अवश्य म्हणोनि अत्रिसुत ॥ राहता झाला षण्मास तेथ[3] ॥ सांगूनि सकळ अस्त्रविद्येप्रत ॥ चवदा कळा चौसष्टी ॥ ९४ ॥ उपरी नागपत्रीं अश्वत्थीं नेऊन ॥ केलें सकल सिद्धार्थ साधन ॥ उपरी बद्रिकाश्रमीं जाऊन ॥

१ मस्तक. २ समजली. ३ खरोखर. ४ श्रीशंकर. ५ सेवक. ६ शंकर.

तपालागीं बैसविलें ॥ ९५ ॥ नाथदीक्षा तत्काळ देउनी ॥ उन्मनी मुद्रा लेववी कानीं ॥ शिंगी शैली सिद्ध करूनी ॥ नाथालागीं ओपिली ॥ ९६ ॥ असो ऐशा दीक्षारूपें ॥ द्वादश वर्षे केलें तप ॥ मग स्वर्गदेव मेळवून अमूप ॥ वरालागीं दिधलें ॥ ९७ ॥ मावदें करून दैदीप्यमान ॥ तुष्ट करूनि स्वर्गींचे जन ॥ बोळविले स्थानोस्थान ॥ नाथा वर देऊनियां ॥ ९८ ॥ यावरी पुढें तो अत्रिसुत ॥ नागनाथा बोळवीत ॥ म्हणे बा रे महीचें तीर्थ ॥ सांगोपांग करीं कां ॥ ९९ ॥ तीर्थें अति मळीण ॥ तयांचा मळ सांडिती संतजन ॥ तस्मात् बा रे तीर्थाटन ॥ संतमेळीं करीं कां ॥ १०० ॥ मग अवश्य म्हणून नाथ प्रेमळ ॥ वंदूनि श्रीगुरूचें पदकमळ ॥ तीर्थें कराया उतावेळ ॥ महीवरी संचरला ॥ १ ॥ अत्रिसुत गेला गिरिनारपर्वतीं ॥ येरीकडे नागनाथ जती ॥ तीर्थें करीत नाना क्षितीं ॥ बालेघाटीं पातला ॥ २ ॥ तेथें पाहून शुद्ध कानन ॥ वस्तीस राहिला मनोधर्म ॥ परी तो प्रतापी तपी सघन ॥ गांवोगांवीं समजला ॥ ३ ॥ मग अपार लोक येती दर्शना ॥ दिवसानुदिवस वाढे महिमा ॥ मग भक्तिपुरस्करांची वाढली महिमा ॥ तुम्हीं येथेंच वस्ती करावी ॥ ४ ॥ मग अपार धर्म करून ॥ वस्तीसीं राहिले अपार जन ॥ वडवाळ ऐसें ग्राम नाम ॥ नागनाथें ठेविलें ॥ ५ ॥ यापरी कोणे एके दिवशीं ॥ मच्छिंद्र आला त्या ठायासी ॥ सहज राहता झाला वडवाळासीं ॥ नाथकीर्ती ऐकिली ॥ ६ ॥ म्हणोन मच्छिंद्र दर्शना जात ॥ तो मठद्वारीं येऊन त्वरित ॥ सद्दढ चालतां द्वाराआंत ॥ स्वशिष्यांनीं हटकिलें ॥ ७ ॥ म्हणती नाथबोवा ऐका वचन ॥ पुढें नका करूं गमन ॥ श्रीनागनाथातें सांगून ॥ तुम्हां नेऊं दर्शना ॥ ८ ॥ तयाच्या परवानगीवांचून ॥ होत नाहीं कोणाचें गमन ॥ तस्मात् थांबावें एक क्षण ॥ आम्ही विचारून येतों कीं ॥ ९ ॥ ऐसें मच्छिंद्रें ऐकतां वचन ॥ कोपानळीं[३] चढलें मन ॥ चित्तीं म्हणे हा संतजन ॥ कैंचा रौववत[४] दिसतसे ॥ ११० ॥ देवद्वार साधुद्वार ॥ मुक्त असावें निरंतर ॥ तरी कपटपणींचा संत वेव्हार ॥ संग्रहातें न ठेविती ॥ ११ ॥ तरी येथें आहे बंड ॥ जग भोंदावयाचें केलें प्रचंड ॥ तरी शिक्षा आतां उदंड[५] ॥ दाखवावी या नरा ॥ १२ ॥ ऐसें क्रोधें चित्तीं आणून ॥ त्या शिष्यांसी केलें ताडण ॥ ताडण करितां बहुत जन ॥ सप्तशत शिष्य धांवले ॥ १३ ॥ तें पाहूनियां मच्छिंद्रनाथ ॥ स्पर्शकळा त्वरें प्रेरित ॥ तेणें झाले महीव्यक्त ॥ सातशें शिष्य सकळिक ॥ १४ ॥ महीव्यक्त सकळ होतां ॥ नाथमुखवटा ताडण करितां ॥ तंव ते आरंबळती आक्रोशवंत ॥ एक आरडा ऊठला ॥ १५ ॥ तों येरीकडे मठांत ॥ सदा ध्यानीं भरून नागनाथ ॥ कोल्हाळ आरडा ऐकून प्रांजळवंत ॥ देहावरी पातला ॥ १६ ॥ ध्यान भंगिलें कोल्हाळेंकरून ॥ तेणें कोपानळीं पेटलें मन ॥ मग उपरीवरी[६] शीघ्र जाऊन ॥ निजदृष्टीं पहातसे ॥ १७ ॥ तैं सातशें शिष्य महीव्यक्त ॥ झाले ते चलनवलनरहित ॥ एकटा तया गणीं नाथ- ॥ मुखावरी भेदीतसे ॥ १८ ॥ ऐसें नागनाथें

१ पुष्कळ. २ मोठा. ३ क्रोधाग्नींत. ४ श्रीमंताप्रमाणें. ५ दांडगी, मोठी. ६ माडीवर.

पाहून ॥ अत्यंत कोपला कोपानळानें ॥ म्हणे हा नाथ दीक्षेस येतो दिसोन ॥ परी भ्रष्टबुद्धी आहे कीं ॥ १९ ॥ शांति क्षमा दया पूर्ण ॥ पाळिजे साधूचें हेंचि लक्षण ॥ स्वग्रामाजी तीव्रपण ॥ ठेवूं नये निजवृत्तीं ॥ १२० ॥ तरी हा यातें नाहीं योग्य नाथ ॥ नाथपंथा लाविला डाग ॥ कोणता साधू होता मांग ॥ उपदेशिलें ऐशासी ॥ २१ ॥ तरी यातें शिक्षा करून ॥ दीक्षा घ्यावी हिरोन ॥ ऐसें कोपेंचि जल्पून ॥ धुनीभस्म कवळिलें ॥ २२ ॥ प्रथम गरुडबंधनविद्या जल्पून[1] ॥ स्वर्गीं गरुडाचें केलें बंधन ॥ सकळ तुरे चलनवलन ॥ स्वर्गीं व्यक्त केला असे ॥ २३ ॥ मग विभक्तअस्त्र जल्पून ॥ शिष्य मुक्त केले महीकारण ॥ मुक्त होतांच सकळ जन ॥ नाथपृष्ठीं दडाले ॥ २४ ॥ तें पाहूनियां मच्छिंद्रनाथ ॥ म्हणे चूर्ण करावे हे समस्त ॥ मग जल्पून अस्त्रपर्वत ॥ महानग निर्मिला ॥ २५ ॥ तो पर्वत विशाळपणीं ॥ येता झाला पंथगगनीं ॥ तें नाथें पाहून नयनीं ॥ शत्रुवज्र जल्पिलें ॥ २६ ॥ मग तो शीघ्र पाकशासन[2] ॥ अंतराळीं[3] वज्र देत सोडून ॥ तेणें पर्वत झाला चूर्ण ॥ मच्छिंद्रनाथ पाहुनी कोपला ॥ २७ ॥ मग जल्पून वाताकर्षण ॥ शक्र[2] पाडिला महीकारण ॥ वज्रकाळीविद्या जल्पून ॥ वज्रालागीं निवटिलें ॥ २८ ॥ तें पाहूनियां नागनाथ ॥ मनीं क्षोभला अति अद्भुत ॥ मग वातप्रेरक विद्या त्वरित ॥ मेघास्त्रावरी टाकिली ॥ २९ ॥ तेणें शक्र सावध होऊन ॥ पळूं लागला भयेंकरून ॥ म्हणे हे प्रतापी गहन दोघे जण ॥ आपुलें काम नसे येथें ॥ १३० ॥ ऐसें म्हणोन भयस्थित ॥ शक्र स्थाना पळून जात ॥ येरीकडे मच्छिंद्रनाथ ॥ काय करिता पैं झाला ॥ ३१ ॥ मग वासवशक्ती अति दारुण ॥ जल्पून मंत्रप्रयोगानें ॥ सिद्ध करून दैदीप्यमान ॥ नागेशभागा पाठविली ॥ ३२ ॥ परी ती शक्ती महादारुण ॥ सहस्रमित्रतेजेंकरून[4] ॥ प्रलयकाळींचा जैसा अग्न ॥ शब्द करीत येतसे ॥ ३३ ॥ शब्द करितां कडकडाट ॥ खचून पडती गिरिकपाट ॥ धरा कांपे जळजळाट ॥ द्विभाग होऊं पाहातसे ॥ ३४ ॥ श्वापदें पळती रानोरान ॥ दिग्गजां न मिळे कोठें ठिकाण ॥ पाताळभुवनीं शेष दचकून ॥ मूर्धनीतें[5] सरसावी ॥ ३५ ॥ एकचि झाला हलकल्लोळ ॥ महींचे जीव चराचर सकळ ॥ घाबरोनि झाली हडवळ ॥ क्षमेंत स्थळ पाहती ॥ ३६ ॥ ऐसा पाहून महा आकांत ॥ काय करी नागनाथ ॥ सकळ दैवतें बंधनविद्येंत ॥ जल्पता झाला महाराजा ॥ ३७ ॥ तेणें दैवतांचें बंधन समस्त ॥ मग न धांवती स्फुरल्या विद्येंत ॥ ऐसी केली गती कुंठित ॥ सकळ अस्त्रशस्त्रांची ॥ ३८ ॥ मग हेमाद्रि-पर्वत दारुण ॥ अस्त्र योजिलें महादारुण ॥ हेमाद्री अस्त्र पावोन ॥ नाथें वासवी शक्ती टाकिली ॥ ३९ ॥ तें पाहोनियां मच्छिंद्रनाथ ॥ शक्रवज्रालागीं[6] स्तवित ॥ वरी बंधन झालें सकळ दैवत ॥ अस्त्रविद्या फळेना ॥ १४० ॥ मग नाना अस्त्रांचे प्रयोगयुक्तीं ॥ जाते परी ते सकळ व्यर्थ जाती ॥ मग निःशक्त मच्छिंद्र होवोनि जगतीं ॥ स्तब्धदृष्टीं पाहतसे ॥ ४१ ॥ तों येरीकडे नागनाथ ॥ नाना अस्त्रें



१ उच्चारून. २ इंद्र. ३ आकाशांत. ४ सहस्रसूर्यांचीं तेजें एकवटून. ५ मस्तक. ६ इंद्राच्या वज्राला.

जल्पोनि त्वरित ॥ पर्वतासमान तक्षक तेथें ॥ अस्त्रविद्येसीं धांवले ॥ ४२ ॥ मग मच्छिंद्रातें दंशूं धांवती ॥ शतानुशत नाहीं गणती ॥ तें पाहोन मच्छिंद्रजती ॥ गरुडास्त्र तेव्हां जपतसे ॥ ४३ ॥ परी नागनाथें पूर्वप्रकरणीं ॥ केलें होतें गरुडबंधन ॥ तेथें मच्छिंद्राचा योग पूर्ण ॥ व्यर्थ झाला गरुडास्त्रीं ॥ ४४ ॥ मग ते सर्प उन्मत्त ॥ येवोनि डंखिती ठायीं नाथ ॥ तेणें मच्छिंद्र हडबडीत ॥ प्राण सोडूं पाहतसे ॥ ४५ ॥ मग अंतकाळींचा समय जाणून ॥ चित्त बुद्धी अंतःकरण ॥ काया वाचा तन मन ॥ गुरूचे चरण स्तवीतसे ॥ ४६ ॥ स्तवीतसे परी कैशा रीतीं ॥ ऊर्ध्वशब्द उद्धटगतीं ॥ म्हणे महाराजा कृपामूर्ती ॥ अत्रिसुता धांव रे ॥ ४७ ॥ मी बाळक लडिवाळ जाण ॥ वेष्टलों असें सर्पबंधनें ॥ तरी माये तुजवांचून ॥ कोण सोडवील मज आतां ॥ ४८ ॥ हे त्रयदेवअवतारखाणी ॥ मज पाडसाची तूं हरिणी ॥ व्याघ्र बैसला मम प्राणहरणीं ॥ ये धांवोनि लगबगें ॥ ४९ ॥ परम संकटीं पडलों येथें ॥ कैशी निद्रा लागली तूतें ॥ सर्वसाक्षी असोनि जगातें ॥ नेत्र झांकिले मजविषयीं ॥ १५० ॥ दत्त दत्त ऐसें म्हणोन ॥ शब्द फोडिला अट्टहास्यें‍करून ॥ नेत्र झाले श्वेतवर्ण ॥ मुखीं हुंदका येतसे ॥ ५१ ॥ परी दत्तात्रेयनामेंकरून ॥ बाहे अट्टहास्यें वचन ॥ ते नागनाथें शब्द ऐकून ॥ साशंकित होतसे ॥ ५२ ॥ चित्तीं म्हणे मम गुरूचें ॥ स्मरण हा करितो किमर्थ वाचे ॥ तरी हा कोणाचा शिष्य याचें ॥ नाम विचारूं जावोनी ॥ ५३ ॥ मग निकट येवोनि वटसिद्धनाथ ॥ पुसता झाला स्नेहभरित ॥ म्हणे कोण तुम्ही हो दीक्षावंत ॥ गुरु कोण तुमचा ॥ ५४ ॥ येरू म्हणे आदेश नाथा ॥ नाम मच्छिंद्र तत्त्वतां ॥ प्रसन्न करोनि अत्रिसुता ॥ अनुग्रह घेतला ॥ ५५ ॥ तरी यास नाथपंथ मूळ ॥ मी प्रथमभागीं दत्ताचें बाळ ॥ मजमागें जालिंदर सबळ ॥ दत्तानुग्रहीं मिरवला ॥ ५६ ॥ तयामागें भर्तरीनाथ ॥ दत्तशिष्य झाला जगविख्यात ॥ जोंवरी अवनी[1] तोंपर्यंत ॥ चिरंजीव मिरवला ॥ ५७ ॥ तयामागें रेवणनाथ ॥ दत्तानुग्रहीं प्रतापवंत ॥ जेणें जिंकोनी देव समस्त ॥ विप्रबाळें उठविलीं ॥ ५८ ॥ तरी महाराजा नाथपंथांत ॥ मी दत्तात्रेयाचा ज्येष्ठ सुत ॥ ऐसें ऐकोनि वटसिद्धनाथ ॥ मनामाजी कळवळला ॥ ५९ ॥ मग सुपर्णाचें[2] सोडून बंधन ॥ गरुडअस्त्र जपे वाचेकारण ॥ ऐसें होतां तत्काळ सुपर्ण ॥ महीवरी उतरले ॥ १६० ॥ उतरोन नागकुळ समस्त ॥ होवोनियां भयभीत ॥ तत्काळ विष शोषून त्वरित ॥ अदृश्यते पावले ॥ ६१ ॥ असो नागकुळ विष शोषून ॥ अदृश्य झालिया भयेंकरून ॥ गरुडही उभयतां नमून ॥ स्वर्गाप्रती तो गेला ॥ ६२ ॥ येरीकडे नागनाथ ॥ मच्छिंद्रचरणीं माथा ठेवित ॥ म्हणे तातासमान वडिल भ्रात[3] ॥ गुरु माझा तूं होसी ॥ ६३ ॥ मग नेवोनियां स्वस्थानासी ॥ बैसविला आपणापाशीं ॥ गौरवोनि उदार मानसीं ॥ एक मास ठेविला ॥ ६४ ॥ यावरी मच्छिंद्र एके दिवशीं ॥ बोलता झाला नागनाथासी ॥ तुवां बंधन द्वारापाशीं ॥ ठेविलें काय म्हणोनियां ॥ ६५ ॥ भाविक येती

१ पृथ्वी. २ गरुडाचें. ३ बंधु.

दर्शनातें ॥ तव शिष्य येवों न देती त्यांतें ॥ तुज मज कळी याच निमित्तें ॥ झाली असे महाराजा ॥ ६६ ॥ यावरी बोले नागनाथ ॥ मी असतों सदा ध्यानस्थ ॥ जन हे येवोनि अपरिमित ॥ ध्यान माझें भंगिती ॥ ६७ ॥ म्हणोनि द्वारीं ठेवितों रक्षण ॥ उपरी बोले मच्छिंद्रनंदन ॥ नाथा हें नव्हे चांगुलपण ॥ भूषणिक आपणासी ॥ ६८ ॥ कोणी जन ते हीनदीन ॥ व्हावया येती पवित्र पावन ॥ तरी ते द्वार अटक पाहोन ॥ विन्मुख मागें जाताती ॥ ६९ ॥ तरी मुक्तद्वार आतां येथून ॥ ठेवीं जगाचे अकिंचनपणें ॥ हरोनियां मनोधर्म ॥ रूढिमार्गा वाढवीं ॥ १७० ॥ ऐसें सांगोनि नागनाथासी ॥ मच्छिंद्र जाती तीर्थासी ॥ येरीकडे वडवाळगांवासी ॥ काय करी नाथ तो ॥ ७१ ॥ मुक्तद्वार अगार टाकोन ॥ मग दर्शना येती अपार जन ॥ नाना जगाचें अकिंचनपण ॥ फिटोनि मागें जाताती ॥ ७२ ॥ ऐसें असतां कोणे एके दिवशीं ॥ चांगुणा संतशिष्य होता त्यासी ॥ तयाची स्त्री पुण्यराशी ॥ मृत्यु पावली मठांत ॥ ७३ ॥ तें पाहोनि वटसिद्धनाथ ॥ उठविती तयाचे कांतेतें ॥ तेणें बोभाट वडवाळ्यांत ॥ घरोघरीं संचरला ॥ ७४ ॥ मग जयाचे घरीं होत मृत ॥ आणून टाकिती मठा प्रेत ॥ उठवूनि नागनाथ ॥ सदना धाडी तयाच्या ॥ ७५ ॥ ऐसें होतां बहुत दिवस ॥ संकट पडलें यमधर्मास ॥ मग तो जाऊन सत्यलोकास ॥ [2]विधिलागीं निवेदी ॥ ७६ ॥ मग तो मूर्तिमंत चतुरानन ॥ वडवाळांत शीघ्र येवोन ॥ श्रीनाथाचा स्तव करोन ॥ राहविलें त्या कर्मा ॥ ७७ ॥ यापरी सहा शिष्य त्यातें ॥ सिद्धकळा लाधली नवांतें ॥ ते जगामाजी प्रसिद्धवंत ॥ सिद्धनामीं मिरवले ॥ ७८ ॥ चांगुलसिद्ध धर्मसिद्ध ॥ देवसिद्ध भोमसिद्ध ॥ देवनसिद्ध भोमनसिद्ध ॥ कोकिळ सुंदरचक्षू तो ॥ ७९ ॥ ऐशा नवसिद्धांमाझारीं ॥ विद्या ओपिली कवित्व साबरी ॥ देव जिंकोनि सत्वरीं ॥ विद्यावरू मिरवले ॥ १८० ॥ बावन वीरांचें करोनि बंधन ॥ केल्या साबरी विद्या स्वाधीन ॥ ते साबरी विद्या कवित्वरत्न ॥ नवसिद्धांत मिरवती ॥ ८१ ॥ एक कोटी एक लक्ष ॥ नागनाथाची विद्या प्रत्यक्ष ॥ परोपकारी सौम्य दक्ष ॥ पीडाकारक नव्हती ॥ ८२ ॥ धांवरें खांडुक उसण ॥ टिके किरळ अहिरानैम ॥ वृंश्चिक सर्पविषहरण ॥ ऐशी विद्या परोपकारी ॥ ८३ ॥ असो ऐशी विद्या साबरी कवित ॥ नवांनीं प्रगट केली जगांत ॥ यापरी दिवस लोटले बहुत ॥ कथा वर्तली विप्राची ॥ ८४ ॥ समाधियोग सरला शेवट ॥ तैं उद्धरिला बहिरंभट ॥ आणि रामाजी भक्त सुभट ॥ हेमकारक उद्धरिला ॥ ८५ ॥ तरी त्या कथा पूर्ण भागांत ॥ वदलों भक्तिकथामृतग्रंथांत ॥ याउपरी चरपटीनाथ ॥ श्रवण करावें श्रोते हो ॥ ८६ ॥ धुंडीसुत नरहरिवंशीं ॥ मालू तो संतकृपेसीं ॥ [4]अवधान विद्ये सावकाशीं ॥ श्रोते तुम्ही अवधारा ॥ ८७ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागार ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ सप्तत्रिंशत्तमाध्याय गोड हा ॥ १८८ ॥ अध्याय ॥ ३७ ॥ ओंव्या ॥ १८८ ॥ ॥ श्रीपांडुरंगार्पणमस्तु ॥ ॥

१ स्त्रीला. २ ब्रह्मदेवाजवळ. ३ विंचू. ४ लक्ष.

## अध्याय ३८वा.






श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी व्यंकटरमणा ॥ दयासागरा परिपूर्णा ॥ भक्तदुःखभंजना ॥ पुढें ग्रंथ बोलवीं ॥ १ ॥ मागिले अध्यायीं कथन ॥ नागनाथा भेटला अत्रिनंदन ॥ विद्याभ्यासें दीक्षाकारण ॥ नाथपंथीं मिरवला ॥ २ ॥ उपरी मच्छिंद्राशीं खेळून रेंळी ॥ जिंकिला मच्छिंद्र तपोबळी ॥ तंव सिद्ध उत्पन्न करून मंडळी ॥ शाबरी विद्या ओपिली ॥ ३ ॥ यावरी श्रोतीं पुढें कथन ॥ पूर्वीं दक्षगृहीं वार्ता जाण ॥ निघालें विवाहयोजनालक्षण ॥ मंगळकार्याचें तेधवां ॥ ४ ॥ हिमालयाची आत्मजा ॥ ती योजिली मंगलकाजा ॥ तेव्हां देवदानवमानवां भोजा ॥ पाचारण पाठविलें ॥ ५ ॥ तेणेंकरून दक्षागार ॥ भरोनि निघाला सुरवर ॥ मानवी दक्ष हरि हर ॥ सभास्थानीं बैसले ॥ ६ ॥ मंडळी ऐसी सर्वांसहित ॥ बैसली असे पार्वती त्यांत ॥ मंगलकला करून मंडपांत ॥ मिरवत असे नोवरी ॥ ७ ॥ परी ते नोवरी स्वरूपखाणी ॥ कीं चंद्रकला नक्षत्रगणीं ॥ तेजाला जैसी सौदामिनी ॥ उजळपणा कराया ॥ ८ ॥ कीं सहस्र विद्युल्लतांचा पोळा ॥ ऐक्यपणें झाला गोळा ॥ सुरवरीं घनमंडळा ॥ चमकपणीं शोभवी ॥ ९ ॥ कीं अर्क प्रत्यक्ष दीक्षाबाळ ॥ सभासद मिरवे केवळ ॥ तयाचें प्रतिबिंब व्योमीं जळ ॥ ब्रह्मांडकुंडीं अर्क हा ॥ १० ॥ ऐसिया परी लावण्यलता ॥ सभेंत मिरवे जगन्माता ॥ तें स्वरूप देखून नाभिसुता ॥ कामानळ दाटला ॥ ११ ॥ कामविरह चपळवंत ॥ नेणे विचार समयोचित ॥ स्थान सोडोनि इंद्रियांत ॥ लिंगामाजी पातला ॥ १२ ॥ तैं विधीचा विरहकाम ॥ अधीरपणीं द्रवला उत्तम ॥ महीं प्राप्त होतां मनोधर्में ॥ संकोचला विधि तो ॥ १३ ॥ बैसल्याठाईंच करून ॥ रेत रगडियेलें महीकारण ॥ तैं आगळे साठसहस्र पूर्ण ॥ भाग झाले रेताचे ॥ १४ ॥ तैं सांठवली जीवदशा ॥ रेतीं झाल्या अपार प्रवेशा ॥ साठसहस्र ऋषी वेषें ॥ वालखिल्य भागीं मिरवले ॥ १५ ॥ परी एक आगळा होता भाग ॥ तैसाचि राहिला तेथें चांग ॥ सेवक झाडी महीअंग ॥ केरसमानीं मिसळला ॥ १६ ॥ उपरी सरतां मंगळनेम ॥ केला होता लज्जाहोम ॥ केर आणि तयाचें भस्म ॥ सेवक सांडिती सरितेंत ॥ १७ ॥ सरितेंत पडतां सकळ मेळ ॥ सर्व रेताचा सांडून मळ ॥ केर मग उगवोनि तळ ॥ निर्मळपणीं वर्तला ॥ १८ ॥ मग तो जळीं ढळढळीत ॥ तरून प्रवाहीं वाहत जात ॥ तो वाहतां अकस्मात ॥ कुशवेष्टनीं आतुडला ॥ १९ ॥ तैं जललहरीचे नेटेंकरून ॥ कुशवेष्टींत पडे जाऊन ॥ तेथें लोटतां बहुत दिन ॥ कुशमुळ्यांनीं वेष्टिला ॥ २० ॥ यापरी बहुतां दिवशीं ॥ ईश्वरआज्ञा अवतारक्रमासी ॥ पिप्पलायन त्या रेतासीं ॥ नारायण संचरला ॥ २१ ॥ संचरला परी कैसे रीतीं ॥ रोहिसावजें विपिनीं असती ॥ तो मेळ त्या कुशवेष्टीप्रती ॥ उदकपाना पातला ॥ २२ ॥ त्यांत रोहिणी ऋतुवंत ॥ मूत्र स्रवली प्रत्यक्ष रक्त ॥ तें भेदूनि वीर्यव्यक्त ॥ रेत वाढी लागलें ॥ २३ ॥ कुशबेट गरम भुवन ॥ तयामाजी हे सघन ॥ वाढी लागतां स्वेदजविधान ॥ कीटकन्यायेंकरूनियां ॥ २४ ॥

१ भक्तांचीं दुःखें नाहींशीं करणाऱ्या. २ भांडण. ३ मुलगी. ४ लग्नाला. ५ वीज. ६ समुदाय. ७ आकाशांत. ८ घामापासून उत्पन्न होणें.

अंडज जारज स्वेदज प्रकरण ॥ ऐसीं जीवां उत्पत्तिस्थानें ॥ असो या विधानेंकरून ॥ मूर्ति रचिली नवमास ॥ २५ ॥ देह वाढतां सबळवंत ॥ कुशमूळ झालें त्रुटित ॥ मग ढाळपणीं महीवरतीं ॥ बाळ दृष्टीसी तें आलें ॥ २६ ॥ तों त्या ठाईं अकस्मात ॥ सत्यश्रवा विप्र भागीरथींत ॥ येवोनियां दर्भानिमित्त ॥ कुशवेष्टी विलोकी ॥ २७ ॥ तो विप्र असे परम सुशीळ ॥ पुनीतग्रामीं तयाचें स्थळ ॥ तेथें येतां दृष्टीं बाळ ॥ पाहिलेंसे तेधवां ॥ २८ ॥ देखिलें परी देदीप्यमान ॥ [1]अर्कतेजें परम सगुण ॥ कीं प्रत्यक्ष चंद्रकळा जिंकोन ॥ आणिता झाला त्या ठायीं ॥ २९ ॥ कीं [2]अनंत मस्तकींचा मणी ॥ विसरून गेला ते स्थानीं ॥ ऐसें भासलें विप्रा मनीं ॥ अति तेजस्वी चकचकाटें ॥ ३० ॥ चित्तीं म्हणे हें बाळ ॥ कोणाचें आहे तेजःपुंजाळ ॥ कीं उर्वशी उदरकमळ ॥ टाकूनियां गेली असे ॥ ३१ ॥ कीं राजबीज मनमोहन ॥ जळदेवतीं दृष्टीं पाहून ॥ आणिलें मातेच्या शेजेहून ॥ आपुले स्थानीं न्यावया ॥ ३२ ॥ तरी याची पुनः माता ॥ येऊन भेटेल कधीं आतां ॥ परी प्रेमरहित लोभ ममता ॥ टाकून ती गेलीसे ॥ ३३ ॥ ऐसा तर्कवितर्क करीत ॥ परी तो बाळा न लावी हस्त ॥ कैसें न्यावें म्हणोनि मनांत ॥ पुढील अर्थ दिसेना ॥ ३४ ॥ अति वितर्कें भेदलें मन ॥ परी मोहें वेष्टिले पंच प्राण ॥ चित्तीं म्हणे कैसें सोडून ॥ बाळालागीं जावें हो ॥ ३५ ॥ अरण्य [3]कर्कश तीर भागीरथी ॥ सावजें येती उदकाप्रती ॥ दृष्टि पडतां तयाच क्षितीं ॥ घात करितील बाळकाचा ॥ ३६ ॥ ऐसें मोहें चित्तीं जल्पून ॥ परी स्पर्श न करी भयेंकरून ॥ चित्तीं म्हणे नेणों संधान ॥ कैसें आहे कळेना ॥ ३७ ॥ ऐसें प्रकरणीं शंकित मानस ॥ बाळानिकट उभा असे ॥ परी स्वर्गींचे देव असती डोळस ॥ देखते झाले तयासी ॥ ३८ ॥ बाळक करीतसे रुदन ॥ हस्तपादांतें नाचवून ॥ तें स्वर्गीं सुरवर पाहून ॥ नमन करिती भावानें ॥ ३९ ॥ म्हणती हा पिप्पलायननारायण ॥ आजि देखियले तयाचे चरण ॥ तरी आजिचा दिन परम सुदिन ॥ [4]कृतकृत्य झालों कीं ॥ ४० ॥ मग सर्वत्र करून जयजयकार ॥ वर्षिते झाले कुसुमभार ॥ कुशवेष्टींत कुसुमें अपार ॥ खचूनियां पाडियेलीं ॥ ४१ ॥ विप्र बाळाच्या अंगावरूनी ॥ कुसुमें अपरिमित काढुनी ॥ टाकी परी कुसुमांलागोनी ॥ परी न सरे म्हणोनी दचकला ॥ ४२ ॥ चित्तीं म्हणे कैंचें बाळप्रकरण ॥ पिशाचकरणी येते दिसोन ॥ अकस्मात येऊन [6]कुसुमघन ॥ कोणीकडून वर्षती ॥ ४३ ॥ ऐसा भयस्थित होउनी चित्तीं ॥ पळूं लागला नगरवाटीं ॥ कैंचे दर्भ चरणसंपुटीं ॥ अति कवळून पळतसे ॥ ४४ ॥ तें पाहून सुर समस्तीं ॥ गदगदां हास्य करिती ॥ सत्यश्रव्यास पळतो म्हणती ॥ उभा उभा पळूं नको ॥ ४५ ॥ ते सत्यश्रवें शब्द ऐकोन ॥ परम घाबरला पडे उलथून ॥ चित्तीं म्हणे पिशाच येऊन ॥ भक्षावया धांवले ॥ ४६ ॥ ढळढळीत भरले दोन प्रहर ॥ खेळों निघाले महीवर ॥ कैंचें बाळक तें प्राणहर ॥ पिशाचकृत्यें मिरवला ॥ ४७ ॥ ऐशा वितर्ककल्पना आणुनी ॥ पळत आहे

१ सूर्यासारख्या तेजानें. २ वासुकीच्या डोक्यांतील. ३ भयंकर. ४ धन्य. ५ फुलांची वृष्टि. ६ पुष्परूपी मेघ.

प्राण सोडुनी ॥ पडतां महीतें उलथुनी ॥ पुनः उठोनि पळतसे ॥ ४८ ॥ सुरवर उभा उभा म्हणती ॥ तों त्यातें न दिसे [१]क्षिति ॥ परी शब्द सुस्वर होती ॥ पिशाच सत्य हें आहे ॥ ४९ ॥ मग स्वर्गस्थ सुरवर शब्द सोडुनी ॥ नारदातें बोलती वचनीं ॥ स्वामी तुम्हीं जाउनी ॥ सत्यश्रव्यातें सुचवावें ॥ ५० ॥ हा परम [२]भ्याड ब्राह्मण ॥ सत्यवादी परी करी पलायन ॥ तरी त्याचा संशय छेदून ॥ टाकुनी बाळ त्या देइजे ॥ ५१ ॥ ऐसें सुरवर [३]कमलोद्भवसुता ॥ बोलतांच महाराज होय निघता ॥ ब्रह्मवीणा घेऊनि हाता ॥ महीवरती उतरला ॥ ५२ ॥ आपुले स्वरूपाचा लोप करून ॥ मानववेषी दिव्य ब्राह्मण ॥ सत्यश्रव्याचे पुढें जाऊन ॥ उभा राहे मार्गांत तो ॥ ५३ ॥ सत्यश्रवा भयभीत ॥ मार्गीं पळतां श्वास सांडित ॥ पडत झडत मुनी जेथ ॥ येवोनि तेथें पोहोंचला ॥ ५४ ॥ प्राण झाला कासावीस ॥ मुखीं न निघे श्वासोच्छ्वास ॥ तें पाहूनि नारद त्यास ॥ बोलता झाला महाराजा ॥ ५५ ॥ म्हणे महाराजा किमर्थीं ॥ घाबरलास काय पंथीं ॥ येरु म्हणे [४]प्राणाहुती ॥ आजि झाली होती कीं ॥ ५६ ॥ दर्भांनिमित्त गेलों [५]सरितेतीरा ॥ पिशाचकळा तेथें पाहिली चतुरा ॥ बाळवेषें मी मोहिलों विप्रा ॥ मीच म्हणोनि टिकलों ॥ ५७ ॥ टिकलों परी अकस्मात ॥ अपार कुसुमें तेथें पडत ॥ तें पाहूनियां भयभीत ॥ होऊनियां पळालों ॥ ५८ ॥ पळालों परी मागांहून ॥ अपार शब्दें पिशाचगण येऊन ॥ उभा रहा ऐसें म्हणोन ॥ वारंवार ऐकितों मी ॥ ५९ ॥ परी मी न पाहें मागें ॥ पडत झडत आलों लगबगें ॥ ऐसी कथा सांगोपांगें ॥ झाली असे मज विप्रा ॥ ६० ॥ मग नारदें धरूनि त्याचा हात ॥ [६]तरूखालतें नेऊन त्वरित ॥ बैसवून त्या स्वस्थचित्त ॥ वृत्तांतातें सांगतसे ॥ ६१ ॥ म्हणे विप्रा ऐक वचन ॥ तूं होतास कुशबेटाकारण ॥ तेव्हां तुज म्यां विलोकून ॥ ऊर्ध्व-दृष्टीं पाहिलें ॥ ६२ ॥ पाहिलें परी [७]अंबरांत ॥ मज दृष्टीं पडले सुरवरदैवतें ॥ त्यांणीं कुसुमें घेऊनि हातांत ॥ तुजवरी झोंकिलीं ॥ ६३ ॥ झोंकिलीं याचें कारण ॥ तुज बोलाविलें नामाभिधानें ॥ येरी म्हणे माझेंच नाम ॥ सत्यश्रवा म्हणताती ॥ ६४ ॥ नारद म्हणे असो कैसें ॥ सत्यश्रवा नाम तुला वसे ॥ म्हणोनि पुकारित होते देव तैसें ॥ भूतचेष्टा नसे बा ॥ ६५ ॥ तरी सत्यश्रवा तुझें नाम ॥ कोठें आहे तुझें [८]धाम ॥ नाहीं ठाऊक आम्हां ग्राम ॥ कोण आहे सांग पां ॥ ६६ ॥ असो इतुकें त्यास विचारून ॥ पुढें बोलला एक वचन ॥ बाळालागीं सदनीं नेऊन ॥ करीं पाळण प्रीतीनें ॥ ६७ ॥ ऐसें बोलून आणीक बोलले ॥ कीं हें बाळक ब्रह्म ठेलें ॥ पिप्पलायननारायण जन्मले ॥ अवतार प्रगट जाहला ॥ ६८ ॥ तरी सकळ संशय सांडून ॥ बाळ नेईं सदनालागून ॥ याचें करितां संगोपन ॥ सकळ सिद्धी साधती ॥ ६९ ॥ ऐसें सुरवरांचें बोलणें ॥ विप्रा म्यां येथून ऐकिलें कानें ॥ असत्य मानूं नको जाणें ॥ देव सर्वही बोलती ॥ ७० ॥ सत्यश्रवा विचारी मानसीं ॥ स्वर्गांत मम नाम काय माहितीसी ॥ हाच संशय धरूनि चित्तासी ॥

१ पृथ्वी. २ भित्रा. ३ ब्रह्मदेवपुत्र नारदाला. ४ प्राण जाण्याचा प्रसंग. ५ नदीतीरावर. ६ वृक्षाखालीं. ७ आकाशांत. ८ घर.

क्षण एक तिष्ठतसे ॥ ७१ ॥ करूनि पाहे ऊर्ध्व दृष्टी ॥ तों देखिली अपार देवथाटी[1] ॥ परी नारदकृपेची सर्व हातवटी ॥ देव दृष्टीं पडियेले ॥ ७२ ॥ मग नारदबोलें तुकावी मान ॥ म्हणे विप्रा बोलसी सत्य वचन ॥ माझे दृष्टी सुरवरगण ॥ येथोनियां दिसती ॥ ७३ ॥ तरी विप्रा ऐक सत्य वचन ॥ येईं माझ्या समागमें ॥ कुशवेष्टींतील बाळ उचलोन ॥ मम करीं ओपीं कां ॥ ७४ ॥ ऐसे बोल ऐकतां ॥ अवश्य म्हणे संवत्सरपिता[2] ॥ मग नेऊन सत्यश्रव्याचे हाता ॥ बाळकाकारणें ओपिलें ॥ ७५ ॥ सत्यश्रव्यातें नारदें ओपुनी बाळ ॥ तेणें योगें मन सुढाळ ॥ पोटीं आनंद भरोनि सबळ ॥ बाळ हृदयीं कवळीतसे ॥ ७६ ॥ बाळ ओपुनी नारदमुनी ॥ बोलता झाला तयालागुनी ॥ सत्यश्रव्या बाळनामीं ॥ चरपट ऐसें पाचारीं ॥ ७७ ॥ चरपटनामी बाळ गुणी ॥ सुरवर बोलले आहेत वाणी ॥ ती ऐकिली निजश्रवणीं ॥ तरी हेंचि नाम ठेवीं कां ॥ ७८ ॥ अवश्य म्हणोनि सत्यश्रवा ॥ येता झाला निकट आपुल्या गांवा ॥ येरीकडे नारद देवां ॥ स्वर्गीं जाऊन संचरला ॥ ७९ ॥ सांगतां सकळ देवां वृत्तांत ॥ स्थाना गेले देव समस्त ॥ येरूकडे स्वसदनांत ॥ सत्यश्रवा संचरला ॥ ८० ॥ गृहीं कांता चंद्रानामी ॥ अति लावण्य धार्मिक लक्ष्मी ॥ पतिव्रता ती अपारनेमी ॥ कीं ती अनसूया दूसरी ॥ ८१ ॥ तिचे निकट सत्यश्रवा ॥ उभा राहून बोले बरवा ॥ म्हणे कामिनी[3] दर्भ मिळावा ॥ गेलों होतों काननीं ॥ ८२ ॥ तेथें अवचट लाभ झाला ॥ सुत तूतें दैवें दिधला ॥ तरी पालन करून नाम याला ॥ चरपट ऐसें पाचारीं ॥ ८३ ॥ तयाच्या योगेंकरून ॥ सुरवरांचे पाहिले चरण ॥ मग मुळापासून सकळ कथन ॥ कांतेपाशीं वदला तो ॥ ८४ ॥ कांता ऐकून वर्तमान ॥ तुकावीतसे आनंदें मान ॥ म्हणे दर्भभावें[4] सेवितां विपिन[5] ॥ वंशलता सांपडली ॥ ८५ ॥ कीं खापर वेंचूं जातां अवनीं ॥ तों सांपडला चिंतामणी ॥ तेवीं तुम्हां दैवेंकरूनी ॥ बाळ लाभलें महाराजा ॥ ८६ ॥ कीं भूत पूजावया मसणवटीं ॥ जातां लक्ष्मी भेटे वाटीं ॥ तेवीं तुम्हां काननपुटीं ॥ बाळलाभ झाला असे ॥ ८७ ॥ कीं दगड उलथायाचे मिषें ॥ दैवें लाभला चोख परीस ॥ तेवीं तुम्हां लाभ सुरस ॥ बाळलाभ झाला असे ॥ ८८ ॥ कीं सहज मर्कट धरूं जातां ॥ गांठ पडली हनुमंता ॥ तेवीं तुम्हां दर्भभावार्था ॥ बाळलाभ झाला असे ॥ ८९ ॥ ऐसें म्हणोन चंद्रा नारी ॥ बाळ हृदयीं कवळी करीं ॥ परी अति स्नेहचित्तसमुद्रीं ॥ आनंदलहरी उठवीत ॥ ९० ॥ जैसा दरिद्री पिशुन वनांत ॥ निजे परी मांदुस[6] सांपडे त्यांत ॥ मग आनंद तयाचे हृदयांत ॥ कवण अर्थी वर्णिला ॥ ९१ ॥ तेवीं वाढोनि आनंदलहरी ॥ बाळा आलिंगी चंद्रा नारी ॥ मग स्नान पान पयोधरीं[7] ॥ करून पालखातें हालवीतसे ॥ ९२ ॥ चरपट ऐसें बोलून नाम ॥ गीत गातसे साधूसम ॥ ऐसें सलील दाऊन प्रेम ॥ अपार दिवस लोटले ॥ ९३ ॥ सप्त वर्षेंपर्यंत ॥ पालन केलें कालस्थित ॥ उपरी मौंजीबंधन त्यांत ॥ अति गजरें केलें असे ॥ ९४ ॥ मग करवून वेदाध्ययन ॥ शास्त्र-

१ देवसमुदाय. २ नारद प्रसंगानें नारदी झाला असतां यापासून साठ वर्षें जन्मलीं. ३ हे स्त्रिये. ४ दर्भाकरितां. ५ अरण्यामध्यें. ६ ठेवा. ७ स्तनांनीं.

विद्येंत केलें निपुण ॥ मीमांसादि सकळ व्याकरण ॥ न्यायशास्त्र पढविलें ॥ ९५ ॥ यापरी कोणे एके दिवशीं ॥ गमन करितां देवऋषी[1] ॥ सहज येत पुनीतग्रामासी ॥ स्मरण झालें नाथाचें ॥ ९६ ॥ मग आगंतुकाचा वेष धरून ॥ पाहे सत्यश्रव्याचा आश्रम ॥ तों द्वादश वर्षांचा चरपट नाम ॥ महातेजस्वी दिसतसे ॥ ९७ ॥ मग विप्रवेषें ते गृहभक्ती ॥ सारूनि पाहिली चरपटमूर्ती ॥ तों सुगम विद्येची दैदीप्यशक्ती ॥ तया देहीं देखिली ॥ ९८ ॥ ब्रह्मरेतोदयप्राणी[2] ॥ म्हणोन बंधुत्व नारदमुनी ॥ त्या मोहानें सकळ करणी ॥ चरपटाची देखिली ॥ ९९ ॥ परम तोष मानून चित्तीं ॥ जात बद्रिकाश्रमाप्रती ॥ तों आत्रेय आणि मच्छिंद्रजती ॥ निजदृष्टीं देखिले ॥ १०० ॥ मग भावेंकरून तये वेळां ॥ उभयतांस जाऊन भेटला ॥ त्यांतें पाहून लोट लोटला ॥ चित्तसरितीं प्रेमाचा ॥ १ ॥ निकट बैसून तयाचे पंगतीं ॥ परी एकाग्रीं मिळाल्या चतुर्थशक्ती ॥ मच्छिंद्रनाथ अपर्णापती[3] ॥ दत्तात्रेय चतुर्थ तो ॥ २ ॥ परी हे चौघेही एकाभ्यासी ॥ दीक्षावंत पूर्ण संन्यासी ॥ वैष्णवनामीं भागवतदेशीं ॥ प्रतापार्क तयांचा ॥ ३ ॥ कीं निधी परीस चिंतामणी ॥ कीं चौथा कौस्तुभ वैडूर्यखाणी ॥ ऐसे चौघेही एकासनीं ॥ विराजले एकदां ते ॥ ४ ॥ वार्तालता अपरिमित ॥ तों चरपटवार्ता विधिसुत ॥ मूळापासूनि पूर्ण कथित ॥ त्रिवर्गांत सांगितली ॥ ५ ॥ वार्ता ऐकतां आदिनाथ ॥ श्रीदत्तात्रेय बोलत ॥ कीं तुम्हीं नवनारायणांत ॥ सनाथ करूं इच्छिलें ॥ ६ ॥ तो पिप्पलायन नारायण ॥ अवतार मिरवला चरपटनाम ॥ तया आतां सनाथ करून ॥ कल्याणरूपीं मिरवाल ॥ ७ ॥ ऐसें बोलतां उमारमण[3] ॥ बोलता झाला अत्रिनंदन[4] ॥ कीं महाराजा पश्चात्तापाविण ॥ हितप्राप्ती मिळेना ॥ ८ ॥ तरी चरपटातें पश्चात्तापें ॥ मानला नाहीं जंववरी बापें ॥ त्यावरी अनुग्रहलोपें ॥ माझ्यावरी मिरवतसे ॥ ९ ॥ यापरी बोले नारदमुनी ॥ हे अवधूता बोलसी वाणी ॥ तरी चरपटाचे अंतःकरणीं ॥ पश्चात्ताप मिरवे तो ॥ ११० ॥ परी तुम्ही जीवासम भावें ॥ चरपटभार्गीं मिरवा सदय ॥ तों पश्चात्तापउदय ॥ चरपटदेहीं करितों मी ॥ ११ ॥ ऐसें बोलून अवधूताप्रती ॥ पाहिली शीघ्र लुप्तग्रामक्षिती ॥ पवित्र होऊन विद्यार्थी ॥ सत्यश्रव्यातें भेटला ॥ १२ ॥ म्हणे महाराजा गुरुवर्या ॥ मी विद्यार्थी विद्याकार्या ॥ तरी मजवरी करूनि दया ॥ विद्यारत्न ओपावें ॥ १३ ॥ मग अवश्य म्हणोन तो ब्राह्मण ॥ अभ्यासविद्येकारणें ॥ कुलंब ऐसें स्वदेहा नामानें ॥ सत्यश्रव्या वदलासे ॥ १४ ॥ कुलंब नामें नारदमुनी ॥ आणि चरपट नामेंकरोनी ॥ उभयतां बैसून एकासनीं ॥ अभ्यास करिती सद्विद्या ॥ १५ ॥ परी कोठेंही न लागे ठिकाण ॥ तों अवसर आला दैवेंकरून ॥ तया ग्रामीं एक यजमान ॥ पाचारावया पातला ॥ १६ ॥ तयाचे गृहीं प्रयोजन ॥ करणें होतें ओंटीभरण ॥ तो ग्रामजोशी म्हणोन ॥ पाचारावया पातला ॥ १७ ॥ पातला परी सत्यश्रवा ॥ बैसला होता अर्चून देवा ॥ मग चरपटा सांगून मनोभावा ॥ नारदासह पाठविला

१ नारद. २ ब्रह्मदेवाच्या वीर्यापासून झालेला. ३ श्रीशंकर. ४ दत्तात्रेय.

 

॥१८॥ चरपट जाऊन तयाचे धामीं ॥ विधी उरकला मनोधर्मी ॥ उपरी यजमान दक्षिणापाणी ॥ येता झाला महाराजा ॥१९॥ नारदें पाहूनियां संधी ॥ स्मरण झालें पूर्वविधी ॥ चरपटमनीं कलह नव्हता कधीं ॥ परी नारदें योजिला ॥ १२० ॥ बैसले होते कार्यालागुनी ॥ तों नारद बोले चरपटास वाणी ॥ दक्षिणा न घेतां तूं गुणी ॥ योगपुरुषा योगज्ञाना ॥२१॥ जरी तूं दक्षिणा हातीं घेसी ॥ तरी योग्य न वाटे आम्हांसी ॥ आपण उभयतां अज्ञान विद्यार्थी ॥ भागाभाग समजेना ॥ २२ ॥ तरी उगलाच चाल चरपटा उठोनी ॥ सत्यश्रवा येईल तव दक्षिणा घेउनी ॥ चरपट म्हणे रिक्तहस्तेंकरोनी ॥ कैसें जावें सदनासी ॥२३॥ नारद म्हणे तूं दक्षिणा घेसी ॥ परी अमान्य होईल तव पित्यासी ॥ येरू म्हणे कसरतेसी ॥ करून दक्षिणा घेईन मी ॥२४॥ कसरत करूनि सवाई पाडें ॥ द्रव्य ठेवितां तातापुढें ॥ मग तो काय बोलेल वांकडें ॥ भलेपणा दावील कीं ॥२५॥ तों ती दक्षिणा अति सान ॥ नव्हती उभयतांच्या स्वरूपाप्रमाण ॥ तेणेंकरूनि चरपट मनें ॥ खिन्न झाला धार्मिक तो ॥ २६ ॥ ऐसें उभयांचें झालें भाषण ॥ तों यजमान आला दक्षिणा घेऊन ॥ चरपटाहातीं देत भिजवून ॥ अल्प दक्षिणा पहातसे ॥२७॥ आधींच नारदें कळ लावूनी ॥ ठेविली होती अंतःकरणीं ॥ त्यावरी लघु दक्षिणा पाहूनी ॥ कोप अत्यंत पावला ॥ २८ ॥ नारदें भाषणापूर्वींच बीज ॥ पेरून ठेविलें होतें सहज ॥ कोपतरू फळविराज ॥ कलह उत्पन्न झाला पैं ॥२९॥ मग बोलता झाला यजमानासी ॥ म्हणे तुम्हीं ओळखिलें नाहीं आम्हांसी ॥ कवण कार्य कवण याचकासी ॥ द्यावें कैसें कळेना ॥ १३० ॥ यजमान म्हणे ऐक भटा ॥ याचका पैका द्यावा मोठा ॥ परी दाता असेल करंटा ॥ मग याचकें काय करणें ॥ ३१ ॥ येरी म्हणे सामर्थ्य असतां ॥ तरी प्रवर्तावें कार्यार्था ॥ ऐसेपरी बोलतां ॥ उभयतां कलह अपार वाढे ॥३२॥ नारद तेथोनि निघोनी ॥ सत्यश्रवा विप्राजवळी येऊनी ॥ म्हणे दुखविला यजमान गुणी ॥ धडगत मज दिसेना ॥ ३३ ॥ असंतुष्ट द्विज नष्ट ॥ ऐसें बोलती सर्व वरिष्ठ ॥ तरी चरपटानें केलें भ्रष्ट ॥ यजमानकृत्य सर्वस्वीं ॥ ३४ ॥ आपण याचक संतुष्टवृत्ती ॥ सदा असावें गौरवयुक्तीं ॥ आर्जव केलिया कार्यें घडती ॥ न घडे तेंचि महाराजा ॥ ३५ ॥ ऐसें बोलतां नारदमुनी ॥ कोप चढला सत्यश्रव्यालागुनी ॥ तत्काळ देवार्चन सोडोनी ॥ यजमानगृहीं पातला ॥ ३६ ॥ तों यजमान आणि सुत ॥ बोलबोली ऐकिली समस्त ॥ तेंहीं पाहूनि साक्षवंत ॥ अति कोप वाढला ॥३७॥ जैसा आधींच वैश्वानर ॥ त्यावरी सिंचिलें स्नेह अपार ॥ कीं उन्मत्त झालिया पान मदिर ॥ त्यावरी संचार भूताचा ॥ ३८ ॥ त्याच न्यायें सत्यश्रवा ॥ कोपानळीं चढला बरवा ॥ येतांच चरपटमुखीं रवा ॥ करपुटानें काढीतसे ॥३९॥ ताडन होतां मुखावरती ॥ चरपटही पडला क्रोधाहुतीं ॥ आधींच बोलतां यजमानाप्रती ॥ क्रोधोदकें भिजलासे ॥ १४० ॥ त्यावरी चरपटनेत्रीं ॥ क्रोधाचे पूर लोटती ॥ मग सर्व त्यागून ॥३॥

१ घरीं. २ मनःपूर्वक. ३ दक्षिणा हातांत घेऊन. ४ थोडी. ५ देवपूजन. ६ अग्नि. ७ तेल. ८ मद्य.

क्रोधें जल्पती ॥ गांवाबाहेर निघाला ॥ ४१ ॥ गांवाबाहेर भगवतीदुर्ग[1] ॥ जाऊन बैसला गुप्तमार्ग ॥ पश्चात्तापें झाला योग ॥ मना-
माजी दाटेना ॥ ४२ ॥ येरीकडे नारदमुनी ॥ अंतरसाक्षी सर्व जाणुनी ॥ दिव्यभव्य विप्र प्राज्ञी ॥ वेष द्वितीय नटलासे ॥ ४३ ॥
होऊनि दिव्य ब्राह्मण ॥ दुर्गालयीं आला दर्शना म्हणोन ॥ भगवतीतें नमस्कारून ॥ चरपटासमीप बैसला ॥ ४४ ॥ म्हणे कोण जी
कां हो येथ ॥ बैसले आहां चिंतास्थित ॥ येरू ऐकून सकळ वृत्तांत ॥ तयापाशीं निवेदी ॥ ४५ ॥ ऐकून चरपटाचें वचन ॥ म्हणे
पिसाट झाला ब्राह्मण ॥ ऐशा क्रोधें पुत्रालागुन ॥ दुखविलें वृद्धानें ॥ ४६ ॥ आपुले चरणींचे चरणसंपुट ॥ पुत्रापाईं येतां नीट ॥
मग पुत्रमर्यादा रक्षुनी चोखट ॥ माहात्म्य आपुलें रक्षावें ॥ ४७ ॥ ऐशी चाल जगतांत ॥ प्रसिद्धपणीं आहे वर्तत ॥ तरी मतिमंद
तो वृद्ध निश्चित ॥ बुद्धिभ्रष्ट म्हणावा ॥ ४८ ॥ तरी ऐशियाचा संग त्यजून ॥ तूं सेवावें महाकानन ॥ परतोन त्याच्या वदना वदन ॥
दाऊं नये पुत्रानें ॥ ४९ ॥ ऐसें बोलतां नारदमुनी ॥ चरपटा क्रोध अधिक मनीं ॥ दाटला पश्चात्तापेंकरुनी ॥ अधिकोत्तर नेटका
॥ १५० ॥ मग त्या विप्रालागीं बोलत ॥ म्हणे मम गृहीं जाऊनि गुप्त ॥ कुलंब नाम विप्र यथार्थ ॥ पाचारून आणावा ॥ ५१ ॥
त्यातें घेऊन स्वसंगतीं ॥ आम्ही जाऊं विदेशाप्रती ॥ पाहून सबळ सद्गुणमूर्ती ॥ विद्या सकळ अभ्यासूं ॥ ५२ ॥ अवश्य म्हणोनि
तो ब्राह्मण ॥ भगवतीदुर्गाबाहेर येऊन ॥ त्या स्वरूपा लोप करून ॥ कुलंबवेष नटलासे ॥ ५३ ॥ पुन्हां त्यापाशीं शीघ्र येऊन ॥
केली चरपटालागीं देखण ॥ म्हणे पिसाट झाला तो ब्राह्मण ॥ हिताहित कळेना ॥ ५४ ॥ तरी ऐसिया क्रोधापासीं ॥ आम्ही न
राहूं निश्चयेंसीं ॥ तरी आणिक गुरू पाहून महीसीं ॥ विद्येलागीं अभ्यासूं ॥ ५५ ॥ ऐसें बोलतां कुलंब वचन ॥ अधिकोत्तर चरपट-
मन ॥ पश्चात्ताप दाटून ॥ कुलंबचित्तीं मिरवला ॥ ५६ ॥ म्हणे सख्या अन्य क्षेत्रासी ॥ आपण राहून उभयतांसी ॥ दोघें एकचि
मार्गासी ॥ वर्तणुकीं राहूंया ॥ ५७ ॥ करूं एकचित्तें आपणास ॥ पडणार नाहीं दुःखलेश ॥ गुरु संपादूनि निःशेष ॥ विद्येलागीं
अभ्यासूं ॥ ५८ ॥ ऐसें बोलतां चरपटासी ॥ अवश्य म्हणे विधिसुत[2] त्यासी ॥ तत्काळ सांडूनियां नगरासी ॥ मुनिराज ऊठला ॥ ५९ ॥
मग चरपट आणि नारदमुनी ॥ उभयतां चालले मार्ग लक्षूनी ॥ पांच कोश लंघितां अवनी[3] ॥ नारद बोले तयातें ॥ १६० ॥ म्हणे
सखया ऐक वचन ॥ आपण पाहूं बद्रिकाश्रम ॥ श्रीबद्रिकेदारा नमून ॥ काशीक्षेत्रीं मग जाऊं ॥ ६१ ॥ तये क्षेत्रीं विद्यावंत ॥
विप्र आहेत अपरिमित ॥ कोणी आवडेल जो चित्तांत ॥ विद्या त्यापाशीं अभ्यासूं ॥ ६२ ॥ ऐसें बोलतां कुलंब चरपटाप्रत ॥ अवश्य
म्हणे विप्रपुत्र ॥ मार्ग धरून बद्रिकाश्रमातें ॥ पाहावया चालिले ॥ ६३ ॥ मार्गीं करून भिक्षाटन ॥ पाहते झाले बद्रिकाश्रम ॥ केदा-
रेश्वर देवालयांत जाऊन ॥ बद्रिकेदार नमियेला ॥ ६४ ॥ नमितां उभयें श्रीकेदार समर्थ ॥ तों प्रगट झाले मच्छिंद्रदत्त ॥ तें पाहूनि

१ भगवतीचें देऊळ. २ नारद. ३ पृथ्वी.

विधिसुत ॥ तयांपासीं पातले ॥ ६५ ॥ दत्तचरणीं ठेवून माथा ॥ आणिक नमी मच्छिंद्रनाथा ॥ तें पाहूनि चरपटी तत्त्वतां ॥ तोही वंदी उभयतांसी ॥ ६६ ॥ चरपटें उभयतां करूनि नमन ॥ पुसतसे तो कुलंबाकारण ॥ म्हणे महाराजा हे कोण ॥ उभयतां असती ॥ ६७ ॥ नारद म्हणे ओळखीं नयनीं ॥ अत्रिसुत हा दत्तात्रेय मुनी ॥ आणि मच्छिंद्र जती ऐकसी कानीं ॥ तोच असे हा ब्राह्मणा ॥ ६८ ॥ यानंतर मी देवऋषी ॥ नारद म्हणती या देहासी ॥ तव कार्यार्थ कुलंबवेशीं ॥ मानवदेहीं नटलों मी ॥ ६९ ॥ ऐसें ऐकतां चरपटवचन ॥ कुलंबचरणीं माथा ठेवून ॥ म्हणे महाराजा स्वरूप दाऊन ॥ सनाथ करीं मज आतां ॥ १७० ॥ नारद म्हणे ऐक वचन ॥ आम्ही स्वरूप दावूं त्रिवर्ग जाण ॥ परी बा गुरुप्रसादाविण ॥ न देखवे गा तुजलागीं ॥ ७१ ॥ तरी गुरुप्रसादमंत्र कानीं ॥ रिघावा होतांच ध्यानीं ॥ मग आम्हीच काय दिसती त्रिभुवनीं ॥ ब्रह्मस्वरूप होशील तूं ॥ ७२ ॥ यावरी बोले चरपटनाथ ॥ कोणता पाहूं गुरु येथ ॥ तुम्हांपेक्षां प्रतिष्ठावंत ॥ भुवनत्रयीं असेना ॥ ७३ ॥ तरी मज अनुग्रह द्यावा येथें ॥ करावें स्वस्वरूपीं सनाथ मातें ॥ नारद म्हणे दत्तात्रेयातें ॥ कारण आपुलें संपादा ॥ ७४ ॥ ऐसें बोलतां नारदमुनी ॥ श्रीदत्तात्रेय कृपा करूनी ॥ ठेविता झाला वरदपाणी ॥ चरपटमौळीं तेधवां ॥ ७५ ॥ संकल्पित स्थित तनु मन ॥ कायावाचा जीवित्वप्राण ॥ चित्त बुद्धि अंतःकरण ॥ घेतलें गोऊन संकल्पीं ॥ ७६ ॥ मग वरदहस्त ठेवूनि मौळीं ॥ कर्णीं ओपिली मंत्रावळी ॥ ओपितांच अज्ञानकाजळी ॥ फिटून गेली तत्काळ ॥ ७७ ॥ ब्रह्मदर्शन खुणाव्यक्त ॥ होतांच देखिलें सत्तत्त्व तेथ ॥ लखलखीत तेज अद्भुत ॥ [3]मित्रापरी भासलें ॥ ७८ ॥ कीं औदुंबरींचा ठाव सांडून ॥ मिरवती पृथ्वीवरून ॥ तेवीं विधिपुत्र वसुनंदन ॥ तेजेंकरूनि गहिंवरले ॥ ७९ ॥ तें चरपटें पाहून तेजोसविता ॥ त्रिवर्गा चरणीं ठेविला माथा ॥ तो अवसर पाहूनि तत्त्वतां ॥ उमाकांत प्रगटला ॥ १८० ॥ प्रगट होतां [4]अपर्णापती ॥ चरपटा सांगे मच्छिंद्रजती ॥ दशकर नमीं कां कृपामूर्ती ॥ भेटावया आलासे ॥ ८१ ॥ ऐसें ऐकतां चरपटनाथ ॥ शिवा नमीतसे आनंदभरित ॥ मग दशकर कवळून हृदयांत ॥ मुखालागीं कुरवाळी ॥ ८२ ॥ कुरवाळून म्हणे अत्रिसुता ॥ विद्या सांगावी चरपटनाथा ॥ नवांच्या गणीं करून सरता ॥ नाथपंथीं मिरवीं कां ॥ ८३ ॥ अवश्य म्हणोनि अत्रिसुत ॥ चरपटासि विद्या अभ्यासित ॥ सकळ शास्त्रीं झाला ज्ञात ॥ उपरी तपा बैसविला ॥ ८४ ॥ मग नागपत्रीं अश्वत्थीं जाऊन ॥ द्वादश वर्षें वीरसाधन ॥ नऊ कोटी सात लक्ष रत्न ॥ शाबरी कवित्व पैं केलें ॥ ८५ ॥ यापरी मंत्रविद्या करून ॥ मेळविले सुरवर मंडण ॥ स्वर्गदेवता तोषवून ॥ विद्यावरू घेतला ॥ ८६ ॥ मग श्रीगुरु अत्रिसुत ॥ सेविता झाला गिरनारपर्वत ॥ येरीकडे चरपटनाथ ॥ तीर्थावळी चालिला ॥ ८७ ॥ श्रीरामेश्वर गोकर्ण महाबळेश्वर ॥ जगन्नाथ हरिहरेश्वर ॥ काशी मनकर्णिका विश्वेश्वर ॥ तीर्थें सेवीत चालिला ॥ ८८ ॥ तीर्थें करितां



१ खरोखर. २ काम करून घ्या. ३ सूर्यासारखें. ४ पार्वतीपति शंकर. ५ श्रेष्ठ.

अपरिमित ॥ सच्छिष्य नव झाले त्यांत ॥ ते नवशिष्य प्रख्यातवंत ॥ सिद्धकळा जाणती ॥ ८९ ॥ राघवसिद्ध बाळसिद्ध ॥ गोकाटसिद्ध जाबुसिद्ध ॥ नैमित्यक सारेंद्रक हुक्ष प्रसिद्ध ॥ द्वारभैरव रणसिद्ध तो ॥ १९० ॥ ऐसे चरपटाचे नवसिद्ध वर्ण ॥ शाबरी विद्येंत असती पूर्ण ॥ चौऱ्याशीं सिद्ध नवांपासून ॥ उदयवंत पावले ॥ ९१ ॥ जोगी शारंगी निजानंद ॥ नैननिरंजन यदु प्रसिद्ध ॥ गैवनक्षुद्र कास्त सिद्ध ॥ रेवणनाथाचे असती ॥ ९२ ॥ उरेश सुरेश धुरेश कुहर ॥ केशमर्दन सुद्धकपूर ॥ भटेंद्र आणि कटभ्रवा साबर ॥ हे नव सिद्ध भर्तरिनाथाचे ॥ ९३ ॥ दक्षेंद्र आणि अनिर्वा अपरोक्ष ॥ कामुकार्णव सहनसिद्ध प्रसिद्ध ॥ दक्षलायन देवसिद्ध ॥ पार्क्षेंद्र साक्ष मच्छिंद्राचे सिद्ध हे ॥ ९४ ॥ निर्णयार्णवहरदंतान ॥ भोमानहुक्षे कृष्णपलायन ॥ हेमा क्षेत्रांत रत्नागर नाम ॥ गोरक्षाचे हे असती ॥ ९५ ॥ विनयभास्कर दत्तधात ॥ पवनभार्गव सुक्षार्णव यथार्थ ॥ कविटशर्वा वधम प्रोक्षित ॥ नव जालिंदराचे हे असती ॥ ९६ ॥ शारुक वालुक शरभ सहन ॥ प्रोक्षितशैर्भ कोकिल नाम ॥ कास्मितवाच संपति नवही पूर्ण ॥ कान्हिपाचे हे असती ॥ ९७ ॥ यापरी चौरंगीचे सहा सिद्ध ॥ लोम भ्रातरक चिरकालवृंद ॥ नारायण कालिका सात्रजी प्रसिद्ध ॥ चौरंगीचे असती ॥ ९८ ॥ मीननाथ अडबंगीनाथ ॥ यांचे सहा सिद्ध सिद्धिवंत ॥ सुलक्षा लुक्ष मोक्षार्णव समर्थ ॥ द्वार भद्राक्ष सहावा ॥ ९९ ॥ एकूण चव्ऱ्यायशीं सिद्धांचा झाडा पूर्ण ॥ ग्रंथीं वदला धुंडीनंदन ॥ माल्लू नरहरीचा वंशिक पूर्ण ॥ सेवक असे संतांचा ॥ २०० ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ अष्टत्रिंशतितमोऽध्याय गोड हा ॥ २०१ ॥ ॥ शुभं भवतु ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

## ॥ नवनाथभक्तिसार अष्टत्रिंशति अध्याय समाप्त ॥

श्रीगणेशाय नमः ॥ जयजयाजी आदिनाथा ॥ कर्पूरवर्णा उरगभूषिता ॥ बोलवीं पुढें ग्रंथार्था ॥ नवरसादि कृपेनें ॥ १ ॥ मागिले अध्यायीं केलें कथन ॥ चरपटीचा होऊन जन्म ॥ दत्तदीक्षा पुढें घेऊन ॥ नाथपंथीं मिरवला ॥ २ ॥ उपरी एकादश नाथांपासून ॥ चौऱ्यायशीं सिद्ध झाले पूर्ण ॥ तयांचें सांगितलें नाम ॥ यथाविधीकरूनियां ॥ ३ ॥ एक गहनी वेगळा करून ॥ बहात्तर आठांनीं केले निर्माण ॥ उपरी मीननाथ चौरंगी आडबंगण ॥ बारा सिद्ध निर्मिले ॥ ४ ॥ एकून चौऱ्यायशीं सिद्ध पूर्ण ॥ पुढें आतां ऐका कथन ॥ चरपटी करी तीर्थाटण ॥ कथा कैसी वर्तली ॥ ५ ॥ गया प्रयाग काशीहून ॥ जगन्नाथ मल्लिकार्जुन ॥ फणिपर्वत रामेश्वर करून ॥ [1]कुमारीदैवत पाहिलें ॥ ६ ॥ बारा मल्हार हिंगलाज ॥ बारा लिंगें तेजःपुंज ॥ सप्त मोक्षपुऱ्या पाहोन सहज ॥ महीप्रदक्षिणा घातली ॥ ७ ॥ सकळ महीचें झालें तीर्थ ॥ गुप्त प्रगटे अत्यद्भुत ॥ परी एक राहिलें इच्छिलें तीर्थ ॥ स्वर्गपाताळ तीर्थांत ॥ ८ ॥ करून मणिकर्णिकेचें स्नान ॥ सकळ स्वर्ग यावें पाहून ॥ उपरी पाताळभुवनीं जाण ॥ [2]भोगावती वंदावया ॥ ९ ॥ ऐसा विचार करूनि चित्तीं ॥ गेला बद्रिकाश्रमाप्रती ॥ तेथें नमून [3]उमापती ॥ पुढें चालिला महाराजा ॥ १० ॥ ध्यानप्रयोगीं भस्मचिमुटी ॥ चर्चूनियां निजललाटीं ॥ तेणेंकरून वातगतीं ॥ गमनातें दावीतसे ॥ ११ ॥ मग आदित्यनामी मंत्र जपून ॥ प्रत्यक्ष केला नारायण ॥ तो मार्गे पुढें सिद्ध होऊन ॥ मार्गोपरी गमतसे ॥ १२ ॥ कीं मनयोगाचा धीर धरून करीं ॥ चरपट लंघी महेंद्रगिरी ॥ शैल्यबर्फलहरी ॥ अंगीं झगट करीतसे ॥ १३ ॥ सवितातेज अति अद्भुत ॥ परम तीव्र दाहातें करीत ॥ तेणेंकरून बर्फगणांत ॥ वितळपणीं मिरवत ॥ १४ ॥ जैसें पर्जन्यकाळीं मही ॥ वितळे [4]मित्रतेजप्रवाहीं ॥ त्याच न्यायें ते समयीं ॥ हिमाचलकण वहिवटले ॥ १५ ॥ ऐसी करून गमनस्थिती ॥ लंघून गेला स्वर्गाप्रती ॥ तो प्रथम शृंगमारुती ॥ सत्यलोका पाहिलें ॥ १६ ॥ जातांच गेला विधिसभेंत ॥ चतुराननाचे चरण वंदीत ॥ वंदूनियां जोडून हस्त ॥ सन्मुख उभा राहिला ॥ १७ ॥ [5]विधि पाहून चरपटासी ॥ म्हणे कोण आला योगाभ्यासी ॥ ऐसें बोलतां घडीसीं ॥ नारद उभा तैं होता ॥ १८ ॥ तो तयाच्या सन्मुख होऊन ॥ म्हणे महाराजा चतुरानन ॥ मग मूळापासून जन्मकथन ॥ तयापासीं वदला तो ॥ १९ ॥ ऐकूनि विधि सर्व वृत्तांत ॥ आनंदला अति अद्भुत ॥ मग चरपटाचा धरूनि हस्त ॥ अंकावरी घेतला ॥ २० ॥ हस्तें मुख कुरवाळून ॥ क्षणोक्षणीं घेत चुंबन ॥ म्हणे बाळा तुझें येणें ॥ कैसें झालें स्वर्गासी ॥ २१ ॥ येरी म्हणे जी ताता ॥ नारदें ओपिलें दत्तहस्ता ॥ तेणें वरदपाणी माथां ॥ ठाऊक केला बाळासी ॥ २२ ॥ मग सकळ चरपटीतें [6]विद्यार्णव ॥ वैखरीपत्रें आणूनि ठेव ॥ त्यावर मोदानें [5]कमलोद्भवें ॥ [7]श्रवणपात्रीं भरलासे ॥ २३ ॥ तो कुशल विद्यारत्न ॥ श्रवणशक्तीं कीं सांठवण ॥ परम आल्हादें आनंदून ॥ पुन्हां चुंबन घेतसे ॥ २४ ॥ यावरी बोले चतुरानन ॥ बाळा [8]कामना वेधली

१ कन्याकुमारी. २ पाताळगंगा. ३ शंकर. ४ सूर्याच्या तेजांत. ५ ब्रह्मदेव. ६ विद्यासागर. ७ कानांत. ८ इच्छा.

कोण ॥ येरू म्हणे तव दर्शन ॥ मनीं वाटलें हो तात ॥ २५ ॥ यापरी होतां कामना चित्तीं ॥ तेथेंचि वेधली कृपामूर्ती ॥ कीं मनकर्णिका स्नाना निगुतीं ॥ भोगावती पहावी ॥ २६ ॥ यावरी बोले कमलोद्भव ॥ बा रे एक संवत्सर येथें असावें ॥ त्यांत पर्वणी आल्यास अपूर्व ॥ स्नानास जाऊं सकळिक ॥ २७ ॥ ऐसें बोलतां कमलोद्भवतात ॥ अवश्य म्हणे चरपटीनाथ ॥ यापरी राहतां सत्यलोकांत ॥ बहुत दिन लोटले ॥ २८ ॥ परी चरपट आणि नारदमुनी ॥ वर्तती एकचित्तें खेळणीं ॥ चैन न पडे एकावांचुनी ॥ एकमेकां क्षणार्ध ॥ २९ ॥ यापरी कथा पूर्वापारेंसीं ॥ नारद जातसे अमरपुरीसी ॥ तों सहस्रचक्षु देखतां त्यासी ॥ विनोदउक्तीं पाचारा ॥ ३० ॥ देखतांच हा तपोवृंद ॥ म्हणे यावें कळीनारद ॥ ऐसे [2]शक्राचे ऐकून शब्द ॥ मुनि क्षोभ पावला ॥ ३१ ॥ चित्तीं पेटतां कोपाग्नी ॥ अंतरीं जल्पे नारदमुनी ॥ म्हणे तोही समय तुजलागुनी ॥ एक वेळां दाखवीन ॥ ३२ ॥ ऐसें म्हणून स्वचित्तांत ॥ नारद जातां आपुल्या स्थानाप्रत ॥ यासही लोटले दिन बहुत ॥ परी शब्द चित्तांत रक्षीतसे ॥ ३३ ॥ तों सांप्रतकाळीं चरपटमुनी ॥ विद्यापात्र प्रळयाग्नी ॥ तें पाहून जल्पे नारदमुनी ॥ इंद्र आहुतीं योजावा ॥ ३४ ॥ ऐसे कामरतीं इच्छाधामीं ॥ रक्षित असतां देवस्वामी ॥ तों एके दिवशीं श्रवणउगमीं ॥ शृंगारिला चरपट तो ॥ ३५ ॥ म्हणे बांधवा ऐक वचन ॥ कामें वेधलें माझें मन ॥ कीं अमरकुसुमवाटिकाश्रम ॥ पाहूं क्रीडेकारणें ॥ ३६ ॥ चरपट म्हणे अवश्य मुनी ॥ चला जाऊं येच क्षणीं ॥ ऐसा विचार करोनि मनीं ॥ अमरपुरीं चालिले ॥ ३७ ॥ मार्गीं चालतां चरपटनाथ ॥ शांतपणें महीं पाऊल पडत ॥ तें पाहून कमलोद्भवसुत ॥ चरपटातें बोलतसे ॥ ३८ ॥ म्हणे सखया जाणें येणें ॥ आहे परम [3]लंबितवाणें ॥ तरी गमन ऐसे चालीनें ॥ घडोन कैसें येईल ॥ ३९ ॥ चरपट म्हणे आम्ही मानव ॥ आमुची हीच चाली काय करावें ॥ तुम्हांपाशीं असे चपल उपाव ॥ तरी तेणेंकरून मज न्यावें कीं ॥ ४० ॥ नारदें ऐसे शब्द ऐकून ॥ कार्यकामनीं मोहित मन ॥ मग मार्गालागीं स्थिर होऊन ॥ गमनकळा अर्पिली ॥ ४१ ॥ जो महाद्भुत [4]कमलापती ॥ तेणें दिधली होती नारदाप्रती ॥ ती प्रारब्धबळें चरपटाप्रती ॥ लाधली असे अवचितीं ॥ ४२ ॥ ती गमनकळा कैसी स्थित ॥ इच्छिल्या ठाया ती नेत ॥ आणि त्रिभुवनांतील सकळ वृत्तांत ॥ दृष्टीपुढें बैसतो ॥ ४३ ॥ आयुष्यभावी वर्तमान ॥ गुप्तकृत्यें झालीं होऊन ॥ कोण्या ठायीं वसे कोण ॥ सकळ दृष्टीं पडतसे ॥ ४४ ॥ ऐसी कळा ती गमनस्थिती ॥ चरपटातें होतां प्राप्ती ॥ मग हृदयीं सरिताभरतीं ॥ तोय आनंदाचें लोटलें ॥ ४५ ॥ मग उभय एके कलेंकरून ॥ मार्गीं करिते झाले गमन ॥ एकासारखा एक [5]चंडकिरण ॥ स्वर्गालागीं मिरवले ॥ ४६ ॥ मग लवतां डोळियाचें पातें ॥ मनोवेगीं अपूर्व असत ॥ गगनचुंबित मार्गें [6]अमरक्षितींत ॥ कुसुमवाटिकेंत पातले ॥ ४७ ॥ तंव तेथें नाना तरू विस्तीर्ण ॥ गगनचुंबित विशाळ वन ॥ ज्यांच्या कुसुमसुगंधेंकरून ॥ अमोघ पाषाण मिरवती ॥ ४८ ॥ सहस्र

१ नारद. २ इंद्राचे. ३ लांब. ४ विष्णु. ५ सूर्य. ६ देवलोकांत. ७ फुलांच्या बागेंत.

योजन कानन समस्त ॥ झालें आहे गंधव्यक्त ॥ तें पाहूनियां चरपटनाथ ॥ परम चित्तीं आल्हादे ॥ ४९ ॥ मग कुसुमवाटीं करितां गमन ॥ खेळती नाना क्रीडावचनें ॥ खेळतां खेळतां येत दिसून ॥ पीयूषफळें त्या ठाया ॥ ५० ॥ नारदास म्हणे चरपटनाथ ॥ फळें भक्षावीं कामना होत ॥ नारद म्हणे कोणीं हस्त ॥ धरिला आहे तुमचा ॥ ५१ ॥ मग मन मानेल तैसें फळ ॥ तोडूनियां तपोबाळ ॥ भक्षण करिती एकमेळ ॥ उभय सुत [1]विधीचे पैं ॥ ५२ ॥ तयांच्या बीजसाली सांडून ॥ पीयूषरसास करिती सेवन ॥ उपरी सांडून तें स्थान ॥ अनेक स्थानें सेविती ॥ ५३ ॥ फळें तोडितां पक्वशाखा ॥ महीं पडती [2]विभक्त रुखा ॥ ऐसी ठाईं ठाईं कुसुमवाटिका ॥ महीतें दर्शवी ॥ ५४ ॥ यापरी उभय ते समयीं ॥ कुसुमें तोडिती गंधप्रवाहीं ॥ आणि भूषणमिषें सर्व देहीं ॥ घेऊन कांहीं जातात ॥ ५५ ॥ तों ब्रह्मदेव [3]देवतार्चनीं ॥ बैसतां ठेविती पुढें नेउनी ॥ म्हणती ताता हिंडतां काननीं ॥ अपूर्व पुष्पें आणिलीं ॥ ५६ ॥ ऐसे धैर्यें ते नित्य ॥ उभय पाहती बागाइत ॥ परी रक्षक येतां मार्गीं तेथ ॥ निजदृष्टीनें न दिसती ॥ ५७ ॥ मनांत होऊन साशंकित ॥ म्हणती कोण येतो न कळे येथ ॥ सकळ नासूनि बागाइत ॥ जात आहे येथुनी ॥ ५८ ॥ मग ते रक्षक पाळतीवरती ॥ गुप्त बैसती अन्यक्षेत्रीं ॥ तों एके दिनीं उभय ते ॥ कुसुमवाटिके संचरले ॥ ५९ ॥ संचरतांचि विभक्त ठाया ॥ चरपट गेला फळें तोडावया ॥ तों रक्षक येऊन [4]पृष्ठीमाया ॥ चरपटातें धरियेलें ॥ ६० ॥ तें नारदानें पाहून ॥ त्वरेंकरून केलें पलायन ॥ स्वस्थानासी जाऊन ॥ स्थिर होऊन राहिला ॥ ६१ ॥ येरीकडे [5]लतिकापाळ ॥ धरूनियां चरपटबाळ ॥ येतांच भेदिलें मुखकमळ ॥ हस्तप्रहारेंकरूनियां ॥ ६२ ॥ तेणें कोपोन तपोकेसरी ॥ कीं अपूर्व भासे वैश्वानरी ॥ मग तीव्रशिखा आहुतीं बनकरी ॥ चावावया धांवतसे ॥ ६३ ॥ करीं कवळून भस्मचिमुटी ॥ वाताकर्षण जल्पे होटीं ॥ तेणेंकरून बनकर थाटीं ॥ व्याप्त झाले सकळिक ॥ ६४ ॥ परम अस्त्र तें कठिण ॥ सकळांचें भेदलें हृदयस्थान ॥ तेणें देहींचा सकळ पवन ॥ कुंठित झाला ते समयीं ॥ ६५ ॥ कुंठित होतां श्वासोच्छ्वास ॥ तेणें प्राण झाला कासाविस ॥ सकळ उलथोन महीस ॥ डोळां विकास दाटला ॥ ६६ ॥ गात्रें कांपती थरथराट ॥ मुखीं रुधिराचा पूरलोट ॥ नेत्र वटारून स्थूळवट ॥ बुबुळांतें दावीतसे ॥ ६७ ॥ ऐसा होतां विपर्यास ॥ तों आणिक बनकर त्या ठायास ॥ मागून येतां सहज स्थितीस ॥ तेणें पाहिलें सकळिकां ॥ ६८ ॥ तों अव्यवस्थित सकळ बनकर ॥ पडले आहेत महीवर ॥ ऐसें पाहून करिती विचार ॥ तों सिद्ध बालक पाहिला ॥ ६९ ॥ परम तीव्र अति कठिण ॥ दैदीप्यरूप तेज गहन ॥ त्यातें दृष्टीं पाहून ॥ मागचे मागें ते सरले ॥ ७० ॥ त्वरें येऊन [6]नगरक्षितीं ॥ म्हणती महाराजा हे नृपती ॥ एक जोगी [7]अर्कस्थिती ॥ आला असे महाराजा ॥ ७१ ॥ बाळरूपी अति सान ॥ तेणें बनकरांचे घेतले प्राण ॥ हृदयीं पेटला प्रळयानळासमान ॥ दशा मिरवूं म्हणतसे ॥ ७२ ॥ आणीक वल्ली तरू पाहात ॥

---

१ ब्रह्मदेवाचे पुत्र. २ वृक्षाहून सुटून निराळीं. ३ देवपूजेंत. ४ पाठीकडून. ५ माळी. ६ शहरांत. ७ सूर्यासारखा.

फिरत आहे बागाइत ॥ न चले आमुचें माहात्म्य तेथ ॥ म्हणोन आलों या ठाया ॥ ७३ ॥ मग पाचारून सुरवरमेळ ॥ इंद्र म्हणे तुम्ही जाऊन सकळ ॥ शासन करूनियां बाळ ॥ धरून आणा मजपुढें ॥ ७४ ॥ नावरे तरी करा बंधन ॥ शस्त्रास्त्रीं करावें कंदन ॥ युक्तिप्रयुक्तींकरून ॥ अरिष्टातें दवडा कां ॥ ७५ ॥ ऐसें बोलतां देवपाळ ॥ सकळ देव उठले सबळ ॥ चरपटप्रतापसमुद्रजळ ॥ प्राशन करूं पाहती ॥ ७६ ॥ कीं तें सैन्य नोहे वडवानळ ॥ अति क्षोभून शिखाजाळ ॥ शस्त्रास्त्रीं महादळ ॥ घेऊनियां चालिले ॥ ७७ ॥ येतांचि कुसुमवाटीनिकटीं ॥ चरपट पाहता झाला दृष्टीं ॥ मग सावध राहून कोपार्णव पोटीं ॥ लहरा सोडूं म्हणतसे ॥ ७८ ॥ भस्मचिमुटी करीं कवळून ॥ सावध उभा ब्रह्मनंदन ॥ तों देवसैन्य अपार घन ॥ निकट येऊन बोलती ॥ ७९ ॥ पाहून तयाचें तीव्रपण ॥ मनीं म्हणे ब्रह्मनंदन ॥ व्यर्थ विद्या अपार शीण ॥ कासयासी करावा ॥ ८० ॥ सकळ अस्त्रप्रतापतरणी ॥ त्यांत अस्त्र मुकुटमणी ॥ तेंचि द्वंद्वासी पाठवुनी ॥ वाताकर्षण रुझवावा ॥ ८१ ॥ मग हातीं भस्मचिमुटी ॥ वाताकर्षण झालें होटीं ॥ पाहून देवचमूथाटी ॥ सव्य अपसव्य फेंकीतसे ॥ ८२ ॥ मग ते अस्त्रप्रयोग कठिण ॥ सकळ चमू घाली वेष्टून ॥ सर्वां हृदयीं संचरून ॥ आकर्षिला वात तो ॥ ८३ ॥ सर्वांतें वात होतां लिप्त ॥ श्वासोच्छ्वास झाले कुंठित ॥ मग ते शस्त्रअस्त्र हस्त ॥ मोकलोनि देताती ॥ ८४ ॥ प्राण होऊन कासाविस ॥ देह सांडिती स्वर्गमहीस ॥ रुधिर येऊनि आननास ॥ पूर वाहे भडभडां ॥ ८५ ॥ नेत्रद्वारें वटारून ॥ सकळ सांडूं पाहती प्राण ॥ गात्रें विकळ शवसमान ॥ सकळ काननीं मिरवले ॥ ८६ ॥ ऐशा दशेंत देव सघन ॥ होतां येरीकडे पाकशासन ॥ हेर भृत्य पाठवून ॥ समाचार आणवी ॥ ८७ ॥ येऊन हेर पाहून तेथें ॥ सांगते झाले अमरपाळातें ॥ म्हणती महाराजा अत्यद्भुत ॥ देव सर्वस्वीं निमाले ॥ ८८ ॥ निमाले परी पुढें आतां ॥ येथें येऊन अमरनाथा ॥ तुमचे सकळ जीविता ॥ ओस नगरी करील कीं ॥ ८९ ॥ बाळरूप दिसतो सान ॥ परी कृतांताचा घेईल प्राण ॥ प्रळयरुद्र तो आकर्षण ॥ करील मही वाटतसे ॥ ९० ॥ कीं महाप्रळय आजीच आला ॥ ऐसे परी भासे आम्हांला ॥ ऐसें ऐकून बहु बोलां ॥ पाकशासन दचकतसे ॥ ९१ ॥ यावरी धैर्य धरोनि बोलत ॥ सिद्ध करा ऐरावत ॥ महाप्रळय वज्रघातें ॥ भग्न करणें तयासी ॥ ९२ ॥ ऐसें ऐकून बोलती हेर ॥ म्हणती न्यून काय झुंजणार ॥ परी तो धनुष्यालागीं शर ॥ न लावी अजून महाराजा ॥ ९३ ॥ पाहतां पाहतां रणांगणीं ॥ विपरीत करतो करणी ॥ उगीच श्वासोच्छ्वास कोंडुनी ॥ प्राण सोडितां झुंजार ॥ ९४ ॥ तेथें तुमचें वज्रअस्त्र ॥ काय करील सहस्रनेत्र ॥ तयाची विद्या गुप्तक्षेत्र ॥ कांहीं करूं नेदीच ॥ ९५ ॥ नातरी उगलाच जाईल प्राण ॥ मग सकळ राहील मुखभंजन ॥ तरी दशकरातें साह्य करून ॥ येथें आणावा महाराजा ॥ ९६ ॥ त्याची होतांचि दृष्टी ॥ याची होय श्वासकुंठी ॥ तरी महाराजा हे दयाजेठी ॥ शिव साह्य करावा ॥ ९७ ॥ तरीच देव उठती



१ प्रमुख देवसमूह. २ क्रोधसमुद्र. ३ सैन्य. ४ इंद्र. ५ यमाचा. ६ वीर. ७ शंकराला.

पुढतीं ॥ नातरी सकळांची होऊन शांती ॥ तस्मात् आतां युद्धाप्रती ॥ जाऊं नये महाराजा ॥ ९८ ॥ ऐसें ऐकतां हेरभाषण ॥ उठता झाला पाकशासन ॥ वाहनारूढ प्रत्यक्ष होऊन ॥ कैलासासी पातला ॥ ९९ ॥ तैं शिवगणवेष्टित सदाशिव ॥ बैसला होता महादेव ॥ तों अकस्मात देवराव ॥ जाऊनियां पोहोंचला ॥ १०० ॥ चरणावरी ठेऊन माथा ॥ म्हणे महाराजा आदिनाथा ॥ तुम्हीं अमरपुरीं मज पतिता[1] ॥ अमर करोनि बैसविलें ॥ १ ॥ बैसविल्यावरी दानवें थोर ॥ गांजिल्यावरी वारंवार ॥ संकट निरसूनि सत्वर ॥ पदस्थापना मज केली[2] ॥ २ ॥ परी आतां निर्वाण आलें ॥ देव सकळ प्राणा मुकले ॥ सांगावया तुम्हांस वहिलें ॥ उरलों आहें इतुका मी ॥ ३ ॥ शिव म्हणे ऐसा कोण ॥ आला आहे स्वर्ग चढून ॥ शक्र म्हणे स्वदृष्टीनें ॥ पाहिला नाहीं महाराजा ॥ ४ ॥ कुसुमलतिकेचा केला नाश ॥ म्हणून पाठविलें सर्व देवांस ॥ त्यांचा समूळ होतां प्राणनाश ॥ पळून आलों येथें मी ॥ ५ ॥ ऐसें ऐकतां शिवशंकर ॥ गणांस आज्ञा देत सत्वर ॥ सिद्ध होऊन चला समग्र ॥ समागमें माझिया ॥ ६ ॥ आणि विष्णूतें करा श्रुत ॥ तो होवो अनायासें सहित ॥ ऐसें ऐकतां दूत ॥ विष्णूसमीप धांवती ॥ ७ ॥ मग गणांसहित अष्ट भैरव ॥ अष्ट पुत्र घेऊनि शिव ॥ शतकोटिसमुदाव ॥ अमरपुरीं पातला ॥ ८ ॥ चढाओढी रणांत ॥ देव मिळाले समस्त ॥ चरपटीनें दृष्टी देखत ॥ भस्मचिमुटी कवळिली ॥ ९ ॥ चित्तीं म्हणे कासया उशीर ॥ उगाचि शीण करावा थोर ॥ निवृत्ती करून थोर व्यवहार ॥ बोलवावें सर्वांसी ॥ ११० ॥ ऐसें सिद्ध करून वचन ॥ प्रयोगीं अस्त्र वाताकर्षण ॥ अस्त्रदेवता सिद्ध करून ॥ श्वास बंद शिवासहित ॥ ११ ॥ श्वास झाले कुंठित ॥ शिवासहित देव झाले विगलित ॥ मूर्च्छना येऊन भूमीवरी पडत ॥ प्राण सर्वांचे निघूं पाहती ॥ १२ ॥ असो शतकोटी गण ॥ शिवासह पाकशासन ॥ एकदांच महीकारण[3] ॥ ढांसळून पाडिले ॥ १३ ॥ जैं तरु पल्लवशाखीं ॥ मूळ खंडतां पडती शेखीं ॥ तेवीं अवस्था झाली निकी[3] ॥ महीवरी पडतसे ॥ १४ ॥ त्यापरी शिवादि शतकोटी गण ॥ मुख आच्छादी पाकशासन ॥ पुष्पवाटिके विकल प्राण ॥ मूर्च्छागत झाले ते ॥ १५ ॥ अवघे पडले निचेष्टित ॥ परी नारद दुरोनि विलोकित ॥ हस्तपाद खुडितां हंसत ॥ अमरनाथा[4] पाहुनी ॥ १६ ॥ मनीं म्हणे बरें झालें ॥ अहंकारीं सर्व गळाले ॥ देवांमाजी कित्येक मेले ॥ शव झालें शरीराचें ॥ १७ ॥ कुसुमलतापाळक वनकर[5] ॥ तैं सकळ सांडिले देहअवसर ॥ प्रेत होऊनि महीवर ॥ भयेंकरून पडियेले ॥ १८ ॥ कोणा रुधिराचा भडभडाट ॥ मुखीं अपार पूर लोटत ॥ श्वेतवर्ण चक्षुपाट ॥ वटारून दाविती ॥ १९ ॥ येरीकडे शिवदूत ॥ गेले होते वैकुंठांत ॥ विष्णु लक्षून महाद्भुत ॥ वृत्तांत सर्व सांगती ॥ १२० ॥ म्हणती महाराजा कमलाक्षा ॥ महीदक्षा सर्वसाक्षा ॥ राक्षसारी मोक्षमोक्षा ॥ निजदासां कैवारी ॥ २१ ॥ नेणों अमरवनीं कोण ॥ आला आहे बलिष्ठ जाण ॥ तेणें सकळ देव केले तृण ॥ गतप्राण झाले ते ॥ २२ ॥ एकटा उरला

१ पाप्याला. २ पृथ्वीवर. ३ बरोबर. ४ इंद्राला. ५ माळी.

अमरनाथ ॥ तोही शीघ्र येऊन कैलासास ॥ स्तवूनियां उमानाथास ॥ युद्धालागीं गेलासे ॥ २३ ॥ शतकोटी गणांसहित ॥ वीरभद्रासह देव समस्त ॥ सर्वे घेऊन उमानाथ ॥ युद्धालागीं गेलासे ॥ २४ ॥ भेव जातां अमरपुरासी ॥ आम्हां पाठविलें तुम्हांपासीं ॥ आपण चलावें त्या कटकासी ॥ म्हणोनि आम्हीं धांवलों ॥ २५ ॥ ऐसें ऐकतां मधुसूदन ॥ विचार न पाहतां विष्णुगण ॥ छप्पन्न कोटी मेळवून ॥ गरुडारूढ झालासे ॥ २६ ॥ टाळ ढोल दुंदुभिनाद ॥ समारंभें श्रीगोविंद ॥ अमरपुरींत झाला नाद ॥ ऐसे येऊन पातले ॥ २७ ॥ समस्त बैसले घालून पाळा ॥ आऱ्हाटिती विष्णुमंडळा ॥ धरा मारा शब्दकोल्हाळा ॥ एकदांचि करिताती ॥ २८ ॥ शिवगण जे शिवासहित ॥ देवांसह अमरनाथ ॥ परम पाहून अवस्थित ॥ विष्णु मनीं क्षोभला ॥ २९ ॥ सकळ दूतां आज्ञापित ॥ म्हणे तुमचा होय तात ॥ धरा मारा आलंबित ॥ शस्त्रेंअस्त्रेंकरूनियां ॥ १३० ॥ आपण घेऊन सुदर्शन ॥ गांडीव सजविलें लवोन ॥ इतकें चरपटनाथें लक्षून ॥ भस्मचिमुटी कवळीतसे ॥ ३१ ॥ मनांत म्हणे विष्णुकुमार ॥ सुदर्शन हें आहे अनिवार ॥ तरी आपण आधींच वारासार ॥ करूनियां बैसावें ॥ ३२ ॥ मग मोहनास्त्र जल्पून होटीं ॥ सुदर्शननामीं फेंकिली भस्मचिमुटी ॥ तें मोहनास्त्र सुदर्शनपोटीं ॥ जाऊनियां संचरलें ॥ ३३ ॥ तेणेंकरून सुदर्शन ॥ अचळ जड झालें मोहून ॥ तैसेंच गांडीव आणि सकळ गण ॥ उठावले नेटकीं ॥ ३४ ॥ तें पाहून चरणस्थित ॥ काय करिता झाला नाथ ॥ विष्णुगण करून समस्त ॥ वाताकर्षण योजिलें ॥ ३५ ॥ वाताकर्षणप्रयोग नेटीं ॥ गणीं फेंकितां भस्मचिमुटी ॥ तेणें विष्णुकटक सुभट ॥ श्वासोच्छ्वासें दाटलें ॥ ३६ ॥ कोंडतांच श्वासोच्छ्वास ॥ धैर्य न उरे मग समस्तांस ॥ मग देह सांडून सकळ धरणीस[3] ॥ धुळीमाजी लोळती ॥ ३७ ॥ खरसायकें मोकळे हस्त ॥ शस्त्रविकार झाला बहुत ॥ मुखीं रुधिर विचकून दांत ॥ नेत्र श्वेत करिताती ॥ ३८ ॥ सकळ सांडूं पाहती प्राण ॥ हस्तपाद आपटिती दुःखी होऊन ॥ तें पाहून मधुसूदन ॥ सुदर्शन प्रेरीतसे ॥ ३९ ॥ सुदर्शनातें वैडूर्यखाणी ॥ कीं येऊन राहिले सहस्र तरणी[4] ॥ ऐसें अति चंचळाहुनी ॥ चपळ महाअस्त्र तें ॥ १४० ॥ जैसा अश्वांत श्यामकर्ण ॥ कीं धेनुगणीं सुरभिरत्न ॥ तेवीं अस्त्र सुदर्शन ॥ जाज्वल्यपणीं मिरवे तें ॥ ४१ ॥ तें सुदर्शन कोपेंकरून ॥ प्रेरिता झाला रमारमण[5] ॥ परी तें नाथापाशीं येऊन ॥ मोहेंकरून वेष्टलें ॥ ४२ ॥ चित्तीं म्हणे पिप्पलायन ॥ हा प्रत्यक्ष विष्णुनारायण ॥ स्वामी आपुला वांचवा प्राण ॥ घोट घेतला दिसेना ॥ ४३ ॥ तरी हें युद्ध पूर्ण नाहीं ॥ माझी परीक्षा पाही ॥ निमित्तें सहज करूनियां कांहीं ॥ खेळ मज दावीतसे ॥ ४४ ॥ ऐसा विचार करून चित्तीं ॥ नमन केलें नाथाप्रती ॥ नमूनियां दक्षिण हस्तीं ॥ जाऊनियां विराजले ॥ ४५ ॥ चरपटाहातीं सुदर्शन ॥ कुस्ती करितां मनोधर्म ॥ मग तो चरपट चांगुलपणें ॥ प्रत्यक्ष विष्णु भासतसे ॥ ४६ ॥ येरीकडे वैकुंठनाथ ॥ आश्चर्य करी स्वचित्तांत ॥ म्हणे मोहून सुदर्शनातें ॥ घेतलें कैसें अरिष्टानें ॥ ४७ ॥



१ शंकर. २ वेढा. ३ पृथ्वीवर. ४ हजारों सूर्य. ५ विष्णु.

मग हातीं गदा परताळून ॥ येता झाला रमारमण ॥ तें चरपट तेथें दृष्टीं पाहून ॥ भस्मचिमुटी कवळीतसे ॥ ४८ ॥ वाताकर्षणप्रयोगमंत्र ॥ सिद्ध करोनि तपपात्र ॥ समोर लक्षोनि कंजगात्र ॥ प्रेरी अस्त्र दुर्घट तें ॥ ४९ ॥ मग तें अस्त्र पवनगतीं ॥ संचरतें झालें हृदयाप्रती ॥ तेणें झालें अरिष्ट अती ॥ धडाडून पडियेलें ॥ १५० ॥ हस्तविभक्त होऊनि गदा ॥ पडती झाली क्षितीं आल्हादा ॥ पांचजन्य प्रियप्रद गोविंदा ॥ सोडूनियां मिरवत ॥ ५१ ॥ ऐसा होतां अव्यवस्थित ॥ तें पाहूनियां चरपटनाथ ॥ मग विष्णूजवळी येऊन त्वरित ॥ निजदृष्टीं विलोकी ॥ ५२ ॥ विलोकितां विष्णूलागुनी ॥ तों दृष्टी पडला कौस्तुभमणी ॥ मग मनांत म्हणे आपणालागुनी ॥ भूषणातें घ्यावा हा ॥ ५३ ॥ ऐसें म्हणून स्वचित्तांत ॥ वैजयंतीस काढून घेत ॥ गळां ओपून मौळीं ठेवीत ॥ रत्नमुगुट विष्णूचा ॥ ५४ ॥ शंख चक्र आदिकरून ॥ हातीं घेतसे ब्रह्मनंदन ॥ गदा कक्षेमाजी घालून ॥ शिवापासीं पातला ॥ ५५ ॥ शिव पाहून निजदृष्टीं ॥ तों कपालपात्र आणिलें पोटीं ॥ तें घेऊन झोळीं त्रिपुटी ॥ सोडूनियां चालिला ॥ ५६ ॥ चित्तीं गमनागमनध्यान ॥ त्वरें पातला सत्यग्राम ॥ पितयापुढें शीघ्र येऊन ॥ उभा राहिला चरपट तो ॥ ५७ ॥ पांचजन्य सुदर्शन ॥ सव्य अपसव्य कराकारण ॥ कक्षे गदा हृदयस्थान ॥ कौस्तुभ गळां शोभवी ॥ ५८ ॥ तें पाहूनि [१]नाभिसुत ॥ विष्णुचिन्हें भूषणस्थित ॥ मौळीं मुगुट विराजित ॥ अर्कतेजीं चमकूनियां ॥ ५९ ॥ ऐसे चिन्हीं पाहतां विधी ॥ मनीं दचकला विशाळबुद्धी ॥ म्हणे मुला काय [२]त्रिशुद्धी ॥ केलें आहे कळेना ॥ १६० ॥ मग चरपटाचा धरून हात ॥ आपुल्या अंकावरी घेत ॥ गोंजारून पुसत ॥ चिन्हें कोठून आणिलीं हीं ॥ ६१ ॥ येरी म्हणे ऐक तात ॥ सहज [६]शक्राच्या कुसुमलतांत ॥ खेळत होतों पहात अर्थ ॥ मातें बनकरें ताडिलें ॥ ६२ ॥ मग म्यां कोपें बनकर ॥ मारून टाकिले महीवर ॥ तया कैवारें हरिहर ॥ झुंजावया पातले ॥ ६३ ॥ मग मी चित्तीं शांत होऊन ॥ विकळ केले भवविभुप्राण ॥ तयां अंगींचीं भूषणें घेऊन ॥ आलों आहें महाराजा ॥ ६४ ॥ ऐसी ऐकतां चरपटगोष्टी ॥ परम दचकला परमेष्ठी ॥ मग हृदयीं धरून नाथ चरपटी ॥ गौरवीत बाळातें ॥ ६५ ॥ म्हणे वत्सा माझा तात ॥ आजा तुझा विष्णु निश्चित ॥ महादेव तो आराध्यदैवत ॥ मजसह जगाचा ॥ ६६ ॥ तरी तें होतील गतप्राण ॥ मग मही त्यांवांचून ॥ आश्रयरहित होऊन ॥ जीवित्व आपुलें न चाले ॥ ६७ ॥ तरी बाळा ऊठ वेगीं ॥ क्लेश हरोनि करीं निरोगी ॥ नातरी मज जीवित्वभागीं ॥ अंत्येष्टी करून जाईं कां ॥ ६८ ॥ ऐसें बोलतां चतुरानन ॥ चित्तीं वेष्टला कृपेंकरून ॥ म्हणे ताता उठवीन ॥ सकळिकां चाल कीं ॥ ६९ ॥ मग विधि आणि चरपटनाथ ॥ त्वरें पातले अमरपुरींत ॥ तों हरिहर अव्यवस्थित ॥ चतुराननें देखिले ॥ १७० ॥ मग प्रेमाश्रु आणून डोळां ॥ म्हणे वेगीं उठवीं बाळा ॥ वाताकर्षण चरपटें कळा ॥ काढूनियां घेतलें ॥ ७१ ॥ वाताकर्षणमंत्र जपून ॥ सावध केले सकळ देवजन ॥ उपरी

१ विष्णु. २ शंख. ३ मस्तकीं. ४ ब्रह्मदेव. ५ खरोखर. ६ इंद्राच्या. ७ शंकर व विष्णु यांचे प्राण. ८ ब्रह्मदेव.

जे कां गतप्राण ॥ संजीवनीनें उठविले ॥ ७२ ॥ सकळ सावध झाल्यापाठीं ॥ ब्रह्मा करीं धरून चरपटी ॥ विष्णुभवांच्या पदपुटीं ॥ निजहस्तें लोटिला ॥ ७३ ॥ परी विष्णुचिन्ह भूषणस्थित ॥ पाहूनियां रमानाथ ॥ कोण हा विधीतें पुसत ॥ तोही प्रांजळ सांगतसे ॥ ७४ ॥ मग जन्मापासून अवतारलक्षण ॥ विधि सांगे देवांकारण ॥ विष्णु सकळ वृत्तांत ऐकून ॥ श्रीवेलागीं तुकावी ॥ ७५ ॥ मग म्हणे मम भूषणें ॥ वर्तलें नाहीं विभक्तपण ॥ माझाच अवतार जाण ॥ चरपटनाथ आहे हा ॥ ७६ ॥ मग परमेष्ठी हस्तेंकरून ॥ चरपटआंगींचें काढून भूषण ॥ विष्णुलागीं देऊन ॥ चरणीं माथा ठेवीतसे ॥ ७७ ॥ असो सकळांचें समाधान ॥ पावून पावले स्वस्थान ॥ चरपटअवतार पिप्पलायन ॥ सर्व देवांलागीं समजला ॥ ७८ ॥ कपालपात्र शिवें घेऊन ॥ गणांसह पावला स्वस्थान ॥ अमरपुरीं सहस्रनयन ॥ देवांसहित गेला असे ॥ ७९ ॥ मग विधीनें चरपट करीं वाहून ॥ पाहता झाला ब्रह्मस्थान ॥ येरीकडे नारद गायन ॥ करीत आला शक्रापासीं ॥ १८० ॥ इंद्रालागीं नमस्कारून ॥ म्हणे तुम्हां झालें थोर विघ्न ॥ येथें कोणता नारद येऊन ॥ कळी करून गेला असे ॥ ८१ ॥ आम्ही तुमच्या दर्शना येतां ॥ कळीचे नारद आम्हां म्हणतां ॥ तरी आजचि कैसी बळव्यथा ॥ कोणें दाखविली तुम्हांसी ॥ ८२ ॥ ऐसें नारद बोलतां वचन ॥ मनीं खोंचला सहस्रनयन ॥ चित्तीं म्हणे हेंचि कारण ॥ नारद आम्हां भंवलासे ॥ ८३ ॥ ऐसें समजून स्वचित्तांत ॥ कळीचे नारद कदा न म्हणत ॥ अल्प पूजनें गौरवित ॥ मग बोळविलें तयासी ॥ ८४ ॥ येरीकडे चतुरानन ॥ गेला स्वस्थाना चरपटीस घेऊन ॥ तयामागें नारद येऊन ॥ सत्यलोकीं देखिला ॥ ८५ ॥ यापरी पुढें खेळीमेळीं ॥ पर्वणी उत्तम पावली बळी ॥ मणिकर्णिकेस सर्व मंडळी ॥ स्नानालागीं जातसे ॥ ८६ ॥ एकवीस स्वर्गींचे लोक समस्त ॥ मणिकर्णिकेस आले बहुत ॥ तयांमाजी चरपटीनाथ ॥ विधी घेऊनि आलासे ॥ ८७ ॥ मग तात पुत्र करून स्नाना ॥ परतोनि आले स्वस्थाना ॥ याउपरी सहजस्थित होऊन ॥ संवत्सर भरला असे ॥ ८८ ॥ नारदविद्या पूर्ण गमन ॥ मनीं चिंतितां पावे स्थान ॥ तया मार्गें गौरवून ॥ भोगावतीस पातला ॥ ८९ ॥ विधिसुत चरपटनाथ ॥ गमन करीत महीं येत ॥ तेथेंही करून अन्य तीर्थ ॥ भोगावतीस जातसे ॥ १९० ॥ करून भोगावतीचें स्नान ॥ सप्त पाताळ दृष्टीं पाहून ॥ बळिरायाच्या गृहीं जाऊन ॥ वामनातें वंदिलें ॥ ९१ ॥ बळीनें करून परम आतिथ्य ॥ बोळविला चरपटीनाथ ॥ यापरी इच्छापूर्ण नाथ ॥ भ्रमण करी महीसीं ॥ ९२ ॥ ऐसी कथा ही सुरस ॥ कुसुममाळा ओपी त्यास ॥ कवि माल्लू श्रोतियांस ॥ भावेंकरून अर्पीतसे ॥ ९३ ॥ नरहरिवंशीं धुंडीसुत ॥ अनन्यभावें संतां शरणागत ॥ माल्लू ऐसें नाम देहाप्रत ॥ ज्ञानकृपें मिरवीतसे ॥ ९४ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागर ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ एकोनत्रिंशतितमोध्याय गोड हा ॥ १९५ ॥ अध्याय ॥ ३९ ॥ ओं० ॥ १९५ ॥

१ मान डोलवूं लागला. २ इंद्र. ३ धरून. ४ वरमला. ५ ब्रह्मदेव. ६ पाताळगंगेस.

# अध्याय ४० वा.






श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जयजयाजी पंढरीनाथा ॥ पुंडलीकवरदा रुक्मिणीकांता ॥ दीनबंधो अनाथनाथा ॥ पुढें ग्रंथ बोलवीं ॥ १ ॥ मागिले अध्यायीं रसाळ वचन ॥ तुवां बोलविलें कृपेंकरून ॥ स्वर्गीं चरपटीनाथें जाऊन ॥ इंद्राचा गर्व हरिलासे ॥ २ ॥ हरिहरांची जिंकून कोटी ॥ पुढें लोभाची केली भेटी ॥ गमनकळा नारदहोटीं ॥ प्राप्त झाली महाराजा ॥ ३ ॥ उपरी मनिकर्णिकेचें करून स्नान ॥ पुढें पातले पाताळभुवन ॥ घेऊन बळीचा गौरव मान ॥ वामनातें भेटला ॥ ४ ॥ भोगावतीची करून आंघोळी ॥ पुनः पातला भूमंडळीं ॥ यावरी कथा पुढें कल्होळीं ॥ नवरसांतें वाढीं कां ॥ ५ ॥ असो आतां रमारमण ॥ ग्रंथाक्षरीं बैसला येऊन ॥ तरी पुढें श्रोतीं सावधान ॥ कथारस घ्यावा कीं ॥ ६ ॥ इंद्र चरपटीनें जिंकिला ॥ वैभवें मशकातुल्य केला ॥ तरी तो विस्मयवान खोंचला ॥ खडतरपणीं हृदयांत ॥ ७ ॥ मग जो गुरु वाचस्पती ॥ परम ज्ञाता सर्वज्ञमूर्ती ॥ सहस्रनयन तयाप्रती ॥ घेऊनियां बैसलासे ॥ ८ ॥ देवमंडळांत सहस्रनयन ॥ घेऊन बैसलासे कनकासन ॥ जैसा नक्षत्रीं रोहिणीरमण ॥ अति तेजें मिरवला ॥ ९ ॥ ऐशा रीतीं पाकशासन ॥ बैसला सेवून सभास्थान ॥ मग बृहस्पतीसी विस्मयरत्न ॥ चरपटप्रताप सांगतसे ॥ १० ॥ अहा वय धाकुटें सान स्वरूप ॥ परी अर्कसमान थोर प्रताप ॥ हरिहरादि करून लोप ॥ स्थापून गेला आपुलेंचि ॥ ११ ॥ तरी वाताकर्षणविद्या सबळ ॥ देवदानव झाले निर्बळ ॥ नाथपंथीं हें महाबळ ॥ आतळलें कैसें कळेना ॥ १२ ॥ तरी यातें करून उपाव ॥ साध्य करावी इतकी ठेव ॥ या कर्माला कोण लाघव ॥ स्वीकारावें महाराजा ॥ १३ ॥ कीं तयाच्या गृहाप्रती जाऊन ॥ दास्य करावें मनोधर्में ॥ तोषवूनि सर्व कर्म ॥ महीवरी मिरवावें ॥ १४ ॥ असो यापरी यत्न करून ॥ भेट घ्यावी त्या गंवसून ॥ परी ते जोगी तीव्रपणें ॥ वर्तताती सर्वदा ॥ १५ ॥ तरी उगलीच घेऊन सदृढ भेट ॥ अर्थ वदावा तयास निकट ॥ परी काय चाड आमुची अलोट ॥ कार्यार्थी भीड कोणती ॥ १६ ॥ तरी भिडेचें उपजेपण ॥ उजेड पडेल दासत्वेंकरून ॥ तयामागें रानोरान ॥ अपार मही हिंडावी ॥ १७ ॥ तरी हिंडल्यानें कोणे काळीं ॥ उदय पावेल कृपानव्हाळी ॥ अमरपुरीची देवमंडळी ॥ तेजोयुक्त होईल ॥ १८ ॥ म्हणाल ऐसें कासयान ॥ हा विपर्यास येईल घडोन ॥ तरी महीं होतो पुण्यपावन ॥ आसन माझें घेतसे ॥ १९ ॥ तरी मी येथें सावधान ॥ करून रक्षितों आपुलें आसन ॥ तस्मात् अमरावती सोडून ॥ जाणें नाहीं मजलागीं ॥ २० ॥ ऐसें बोलतां अमरपती ॥ बोलता झाला वाचस्पती ॥ म्हणे महाराजा नाथाप्रती ॥ येथेंचि आणावें महायत्नें ॥ २१ ॥ तरी तो यत्न म्हणसील कैसा ॥ यज्ञ करावा सोमभासा ॥ त्या निमित्तें नाथ राजसा ॥ घेऊन यावें स्वर्गासी ॥ २२ ॥ मग तो येथें आल्यापाठीं ॥ दावून भक्तीची अपार कोटी ॥ मोह उपजवोन नाथापोटीं ॥ कार्य साधून घेइंजे

१ जोरानें. २ विष्णु. ३ इंद्र. ४ चंद्र. ५ सूर्याप्रमाणें. ६ युक्ति. ७ तेजस्वीपणानें. ८ बलसंपन्न. ९ बृहस्पति.

॥ २३ ॥ ऐसें बोलतां तपोद्विज ॥ परम तोषला अमरराज[1] ॥ उपरी म्हणे महाराज ॥ कोणा पाठवूं पाचाराया ॥ २४ ॥ यावरी बोले केंचतात[2] ॥ हे महाराज अमरनाथ ॥ मच्छिंद्रपिता अष्टवसूंत ॥ उपरिचर नामें मिरवतसे ॥ २५ ॥ उपरिचर जातां महीतळवटीं ॥ मच्छिंद्राची घेईल भेटी ॥ सांगून त्यातें कार्य शेवटीं ॥ मग मच्छिंद्र आम्हां बोधील ॥ २६ ॥ तरी त्यातें पाचारून ॥ कार्ययज्ञाचा वदूनि कैाम[3] ॥ विमानयानीं रूढ करून ॥ पाठवावा महाराजा ॥ २७ ॥ यापरी मच्छिंद्रनाथ ॥ आला असतां अमरपुरींत ॥ गौरवोन तुवां त्यातें ॥ तुष्टचित्तीं मिरवावा ॥ २८ ॥ तरी शक्ति तव सरितालोट ॥ मच्छिंद्र उदधिपोट ॥ संगमितां पात्र अलोट ॥ प्रेमतोय भरलें असे ॥ २९ ॥ तरी सुमुखाचें पडतां जळ ॥ कार्यशुक्तिकामुक्ताफळ ॥ तूतें ओपील तपोबळ ॥ नवनाथ आणोनियां ॥ ३० ॥ मग तो मुक्त अविंधविधी ॥ लावी भक्तीच्या शस्त्रास्त्रसंधीं ॥ मग तें रत्न कर्णविधीं ॥ स्वीकारीं कां महाराजा ॥ ३१ ॥ ऐसें ऐकून गुरुवचन ॥ परम तोषला सहस्रनयन[1] ॥ मग रथीं मातली[4] पाठवोन ॥ उपरिचरा पाचारी ॥ ३२ ॥ उपरिचर येतां वदे त्यातें ॥ म्हणे महाराजा कामना मनांत ॥ उदेली करूं सोममखातें ॥ पूर्ण करीं आतां तूं ॥ ३३ ॥ तरी विमानयानीं करोनि आरोहण ॥ जाऊनियां पाहीं मच्छिंद्रनंदन ॥ उपरी त्यातें सवें घेऊन ॥ जावें नवनाथमेळीं ॥ ३४ ॥ मग ते आर्या भावार्थित ॥ मेळवोनि आणीं अमरपुरींत ॥ सोममखाचें सकळ कृत्य ॥ तया हस्तें संपादूं ॥ ३५ ॥ अवश्य म्हणे वसुनाथ ॥ तत्काळ विमानयानीं बैसत ॥ बद्रिकाश्रमीं मच्छिंद्रनाथ ॥ लक्षूनियां पातला ॥ ३६ ॥ तों गोरक्ष धर्मनाथ ॥ चौरंगी कानिफा गोपीचंद राजसुत ॥ जालंधर अडबंगीनाथ ॥ तीर्थस्थानीं ऐक्यमेळा झाला असे ॥ ३७ ॥ ऐशा समुदायांत मच्छिंद्रनाथें ॥ अवचटपणीं देखिला तात ॥ मग उठोनि मौळी चरणांतें ॥ समर्पीत महाराजा ॥ ३८ ॥ मग नाथ वसू भेटून ॥ बैसला सकळांमध्यें वेष्टून ॥ म्लानवाणीं कार्यरत्न ॥ अमरांचें सांगतसे ॥ ३९ ॥ म्हणे महाराज हो शक्रापोटीं ॥ अर्थ उदेला मखकोटीं ॥ तरी आपण नवही जेठी ॥ साह्य व्हावें कार्यार्थी ॥ ४० ॥ बहुतांपरी करून भाषण ॥ सर्वांचें तुष्ट केलें मन ॥ उपरी मच्छिंद्रातें बोधून ॥ अवश्यपणीं वदविलें ॥ ४१ ॥ मग जालंदर कानिफा चौरंगी ॥ मच्छिंद्र गोरक्ष अडबंगी ॥ गोपीचंद रायादि अन्य जोगी ॥ आरूढ झाले विमानीं ॥ ४२ ॥ गौडबंगालीं हेलापट्टण ॥ प्रविष्ट झालें तें विमान ॥ रावगोपीचंद मातेस भेटून ॥ समागमें घेतली ॥ ४३ ॥ उपरी विमानयानी[6] होऊन ॥ पहाते झाले वडवालग्राम तेथून ॥ तेथें वटसिद्धनागनाथ पाहून ॥ आरूढ केला विमानीं ॥ ४४ ॥ तेथून भर्तरीचें करून काम ॥ विमान चालविती इच्छिल्या व्योमें[7] ॥ तों गौतमीतीरीं नाथ उत्तम ॥ जती भर्तरी अवतरला असे ॥ ४५ ॥ यापरी तीर्थ करितां महीपाठीं ॥ महासिद्ध जो नाथ चरपटी ॥ अवंतीसी होता ताम्रपर्णीकांठीं ॥ सवें घेतला महाराजा ॥ ४६ ॥ तेणें पुण्यमान

१ इंद्र. २ बृहस्पति. ३ उद्देश. ४ इंद्रसारथी. ५ मस्तक. ६ विमानांत वसून. ७ आकाशमार्गानें.

देशीं वीटग्राम नामानें ॥ पहाते झाले विमानयानें ॥ तेथें रेवणसिद्ध बोधून ॥ आरूढ केला विमानीं ॥ ४७ ॥ असो नवनाथ परिवारासहित ॥ ते विमानयानीं झाले स्थित ॥ चौऱ्यायशीं सिद्धांसमवेत ॥ अमरपुरीं पातले ॥ ४८ ॥ विमान येतां ग्रामद्वारीं ॥ सामोरा आला वृत्रारी ॥ परम गौरवोन वागुत्तरीं ॥ चरणांवरी लोटला ॥ ४९ ॥ सकळां करोनि नमनानमन ॥ नेत सदना सहस्रनयन ॥ आपल्या आसनीं बैसवोन ॥ षोडशोपचारें पूजिले ॥ ५० ॥ नवनाथां पाहोनि सकळ अमर ॥ मनीं संतोषले अपार ॥ तेज पाहोनियां गंभीर ॥ उभे तेथें ठाकले ॥ ५१ ॥ मग हवनकृत्य मनकामना ॥ वदता झाला सकळ जनां ॥ म्हणे महाराजा कवणे स्थाना ॥ सिद्धअर्थ अर्थावा ॥ ५२ ॥ मग वाचस्पति आणि मच्छिंद्रनाथ ॥ म्हणती सुरवरपाळा ऐक मात ॥ सिंहलद्वीपीं स्थान अद्भुत ॥ यज्ञ तेथें करावा ॥ ५३ ॥ अटव्य कानन आहे तुमचें ॥ शीतळ छायाभरित जळाचें ॥ तेथें न्यून साहित्याचें ॥ पडणार नाहीं कांहींच ॥ ५४ ॥ उपरिचर वसु गंधर्व घेऊन ॥ पहाते झाले अटव्यवन ॥ तेथें यज्ञसाहित्य आहुती करून ॥ यज्ञआरंभ मांडिला ॥ ५५ ॥ दंपत्य बसोन सहस्रनयन ॥ मंत्रप्रयोगीं बृहस्पति आपण ॥ यज्ञआहुती नवही जण ॥ स्वाहा म्हणोनि कुंडीं टाकिती ॥ ५६ ॥ परी किलोतळेचे सीमेआंत ॥ अटव्यवन होतें अद्भुत ॥ यज्ञ होतां मीननाथ ॥ मच्छिंद्रातें आठवला ॥ ५७ ॥ मग पाचारोनि उपरिचर तात ॥ मच्छिंद्र म्हणे जी वसु समर्थ ॥ सिंहलद्वीपीं मीननाथ ॥ कवण ग्रामीं ठेविला ॥ ५८ ॥ येरू म्हणे त्याच्या ग्रामसीमेंत ॥ अटव्यवन हें विख्यात विराजित ॥ तरी किलोतळेसहित मीननाथ ॥ पाचारितों आतांचि ॥ ५९ ॥ मग उपरिचर वसु प्रत्यक्ष जाऊन ॥ मीननाथासह किलोतळारत्न ॥ पाचारून एक क्षण ॥ भेटी केली उभयतां ॥ ६० ॥ परम स्नेहानें क्षणएक कांहीं ॥ वाहवले मोहप्रवाहीं ॥ उपरी दारा सुत तया ठायीं ॥ मच्छिंद्रानें ठेविले ॥ ६१ ॥ चौरंगी आणि अडबंगीनाथ ॥ मिरवीत बैसविले समुदायांत ॥ यज्ञआहुती तयांचे हस्तें ॥ स्वीकारीत महाराजा ॥ ६२ ॥ दहा नाथ यज्ञआहुती ॥ प्रवाहीं चाले मच्छिंद्रजती ॥ पुत्रमोह धरोनि चित्तीं ॥ अभ्यासातें बैसविला ॥ ६३ ॥ अभ्यास करितां मीननाथ ॥ वाचस्पती शक्रासी बोलत ॥ म्हणे महाराजा यज्ञार्थ ॥ तुम्ही बैसतां सैरेना ॥ ६४ ॥ तरी दंपत्यार्थ उपरिचरवसु ॥ बैसवोनि पाहावा अर्थ सुरसु ॥ ऐसें बोलतां प्राज्ञ विशेषु ॥ अमरपाळ समजला ॥ ६५ ॥ मग हातींचें सोडून यज्ञकंकण ॥ वसुहातीं केलें स्थापन ॥ मग न्यूनपणें बहुतां प्रार्थून ॥ निजदृष्टीं विलोकी ॥ ६६ ॥ सर्व पदार्थ आणवोनि आपण ॥ अंगें झिजवी शचीनंदन ॥ उदकपात्र मागतां जाण ॥ सिद्ध होय पुढारा ॥ ६७ ॥ स्वाद्य भोज्य षड्रस अन्न ॥ करें आणीतसे पात्रीं वाढून ॥ शेवटीं शिणले तयाचे चरण ॥ निजहस्तीं चुरीतसे ॥ ६८ ॥ ऐसी सेवा करितां संपन्न ॥ तुष्ट होतसे जतीचें मन ॥ हृदयीं

१ इंद्र. २ देव. ३ बृहस्पति. ४ साधणार नाहीं. ५ इंद्रपुत्र जयंत. ६ मधुर.

भाविती यावरून ॥ प्राणसांडीं करावी ॥ ६९ ॥ येरीकडे मीननाथ ॥ सुतासी विद्या अभ्यासीत ॥ तो समय जाणोनि सापेक्ष ॥ इंद्र मयूरवेषें नटलासे ॥ ७० ॥ निकटतरुशाखेवरती ॥ विद्या अभ्यासींत गुप्तपंथीं ॥ तों अकस्मात् वातास्त्र जपती ॥ वाताकर्षण लाधलें ॥ ७१ ॥ दैवें सर्व तपराहाटी ॥ सकळ लाधली हातवटी ॥ उपरी वाताकर्षणविद्या पाठीं ॥ वातप्रेरक अस्त्र लाधलें ॥ ७२ ॥ ऐसी विद्या होतां सघन ॥ परम हरुषला सहस्रनयन ॥ परी एक संवत्सर होतां यज्ञ ॥ अभ्यासीत तंववरी ॥ ७३ ॥ असो हवनअर्पणआहुती ॥ मेख पावून पूर्ण समाप्ती ॥ मग मच्छिंद्रनाथ प्राज्ञिक जती ॥ अग्रपूजे बैसला ॥ ७४ ॥ मग पूजा करोनि सांगोपांग ॥ उपरी दशमनाथें पूजिलें अंग ॥ वस्त्रभूषणें चांग ॥ देऊनियां गौरविलें ॥ ७५ ॥ सकळां बैसवोनि कैंनकासनीं ॥ उभा राहिला जोडोनि पाणी ॥ सर्वांस वदे म्लानवदनीं ॥ नाथ वचन माझें परिसा ॥ ७६ ॥ मातें घडला एक अन्याय ॥ परी आपण सहन करा समुदाय ॥ म्यां मयूरवेष धरूनि मायें ॥ अभ्यासिलें विद्येतें ॥ ७७ ॥ मीनजतीचा प्रताप गहन ॥ मज सांपडलें विद्यारत्न ॥ तरी आपला वर त्यातें देऊन ॥ सनाथपणीं मिरवावें ॥ ७८ ॥ ऐसें बोलतां अमरनाथ ॥ सर्वांस समजलें तस्करीकृत्य ॥ मग ते कोपोनि परम चित्तांत ॥ शापवचन बोलताती ॥ ७९ ॥ म्हणती इंद्रा तूं कृत्रिम ॥ आणिलें ठकवावया कारण ॥ तरी चोरून घेतलें विद्यारत्न ॥ निर्फळ होईल तुजलागीं ॥ ८० ॥ ऐसें बोलतां सकळ जती ॥ मग उपरिचर वसु वाचस्पती ॥ गौरवोनि अपार युक्तीं ॥ तुष्ट केलें चित्तांत ॥ ८१ ॥ म्हणती महाराजा शापमोचन ॥ पुढें बोला कांहीं वचन ॥ मग ते बोलती तयाकारण ॥ तप आचरावें इंद्रानें ॥ ८२ ॥ द्वादश वर्षें तप आचरितां ॥ विद्या फळेल तत्त्वतां ॥ परी नाथपंथीं छळ न होतां ॥ पदरावरी पडेल ॥ ८३ ॥ ऐसें बोलून सकळ जती ॥ विमानारूढ झाले समस्ती ॥ खालीं उतरून महीवरती ॥ नाना तीर्थें भ्रमताती ॥ ८४ ॥ ऐसें भ्रमण करितां जती ॥ तीर्थें झालीं अपरिमिती ॥ याउपरी किलोतळेतें मच्छिंद्रजती ॥ पुसोनियां चालिला ॥ ८५ ॥ मग तें किलोतळेचें नमन ॥ अवर्ण्य आहे अनुष्ठान ॥ नेत्रीं प्रेमबिंदु आणोन ॥ बोळविलें नाथासी ॥ ८६ ॥ सवें घेऊन मीननाथ ॥ विमानयानीं झाले समस्त ॥ खालीं उतरून मृत्युमहींत ॥ नाना तीर्थें पाहिलीं ॥ ८७ ॥ हेलापट्टणीं मैनावती ॥ पोहोंचवोनि तीर्थें हिंडती ॥ तेव्हां मीननाथें तीर्थक्षितीं ॥ सिद्ध तीन निर्मिले ॥ ८८ ॥ तयांचें सांगितलें पूर्वीं नाम ॥ आतां सांगावया नाहीं काम ॥ असो सिद्धकटकासह उत्तम ॥ तीर्थें करीत भ्रमताती ॥ ८९ ॥ येरीकडे अमरनाथ ॥ लक्षूनियां सह्याद्रिपर्वत ॥ द्वादश वरुषें तप निश्चित ॥ तीव्रपणीं आचरला ॥ ९० ॥ परी तें आचरितां तीव्रपणीं ॥ मंत्रप्रयोगें सोडी पाणी ॥ तेणें सरितालोट लोटोनी ॥ भीमरथीतें भेटली ॥ ९१ ॥ तें मणिकर्णिकेचें

१ इंद्र. २ यज्ञ. ३ मोठा बुद्धिवान. ४ सुवर्णासनावर. ५ हात. ६ चोरून मंत्र शिकणें.

जीवन ॥ आणिलें होतें कमंडलू भरोन ॥ परी इंद्रहस्तीं प्रवाही होऊन ॥ इंद्रायणीं पडियेलें ॥ ९२ ॥ ऐसें तप करोन ॥ स्वस्थानासी इंद्र जाऊन ॥ उपरी नवनाथ करितां तीर्थाटन ॥ बहुत दिवस लोटले ॥ ९३ ॥ शके सत्राशें दहापर्यंत ॥ प्रगटरूपें मिरवले नाथ ॥ मग येऊन आपुले स्थानांत ॥ गुप्तरूपें राहिले ॥ ९४ ॥ मठींत राहिला कानिफा जती ॥ उपरी मच्छिंद्रास मायबाप म्हणती ॥ जानपीर जो जालंदर जती ॥ गर्भगिरीं नांदतसे ॥ ९५ ॥ त्याहून खालता गैबीपीर ॥ तो गहनीनाथ परम सुंदर ॥ वडवानळग्रामीं समाधिपर ॥ नागनाथ असे कीं ॥ ९६ ॥ वीटग्रामीं मानवदेशांत ॥ तेथें राहिले रेवणनाथ ॥ चरपट चौरंगी अडबंगी तीर्थ ॥ गुप्त अद्यापि करिताती ॥ ९७ ॥ भर्तरी राहिला पाताळभुवनीं ॥ मीननाथ गेला स्वर्गालागोनी ॥ गिरिनारपर्वतीं गोरक्षमुनी ॥ दत्ताश्रमीं राहिला ॥ ९८ ॥ गोपीचंद आणि धर्मनाथ ॥ ते स्वसामर्थ्यें गेले वैकुंठांत ॥ विमान पाठवोनि मैनावतीतें ॥ घेऊन विष्णु गेलासे ॥ ९९ ॥ पुढें चौऱ्यायशीं सिद्धांपासून ॥ नाथपंथ मिरवला अति सामर्थ्यानें ॥ येथून चरित्र झालें संपूर्ण ॥ सर्व नाथांचें महाराजा ॥ १०० ॥ तरी आतां सांगतों मुळापासून ॥ कथा वर्तली कवण ॥ प्रथमाध्यायीं गणपतिस्तवन ॥ सुंदरपणीं मिरवलें ॥ १ ॥ उपरी सांगून रेतक्षिती ॥ आणि मच्छिंद्राची जन्मस्थिती ॥ तो बद्रिकाश्रमाप्रती ॥ तपालागीं बैसला ॥ २ ॥ या प्रसंगाचें श्रवण पठण ॥ नित्य करितां भावेंकरून ॥ तरी समंधबाधा घरांतून ॥ जाईल त्रासून महाराजा ॥ ३ ॥ द्वितीय अध्यायीं अत्रिनंदन ॥ विद्यार्णव केला अनुग्रह देऊन ॥ उपरी नागपत्रीं अश्वत्थीं जाऊन ॥ सिद्धचर्यकळा साधिली ॥ ४ ॥ तो अध्याय करितां नित्य पठण ॥ अपार धन लाभेल संसारीं जाण ॥ विजयलक्ष्मी पाठीं बैसून ॥ करील हरण दरिद्र ॥ ५ ॥ तृतीय अध्यायीं मच्छिंद्र मारुती ॥ युद्धा प्रवर्तले श्वेतक्षितीं ॥ युद्ध करून उपरांतीं ॥ ऐक्यचित्त झालें असे ॥ ६ ॥ याचें झालिया पठण ॥ शत्रु होतील क्षीण ॥ मुष्टिविद्यासाधन ॥ तया होत सर्वथा ॥ ७ ॥ मुष्टिबाधा झाली असोन ॥ अपकार होईल तियेनें ॥ मूर्तिमंत मारुती करोनि रक्षण ॥ राहे तया घरीं सर्वदा ॥ ८ ॥ चतुर्थ अध्यायीं वदली कथा ॥ अष्टभैरव चामुंडा समस्ता ॥ रणीं जिंकून वसुसुता ॥ ज्वालामुखी भेटली ॥ ९ ॥ तो अध्याय नित्य पठण करितां ॥ चुकेल कपटाची बंधनव्यथा ॥ शत्रु पराभवोनि सर्वथा ॥ निरंतर शांति मिरवेल ॥ ११० ॥ पांचवे अध्यायींचें कथन ॥ भूतें घेतलीं प्रसन्न करून ॥ अष्टपती जिंकून ॥ विजयी झाला मच्छिंद्र ॥ ११ ॥ ती कथा नित्य करितां पठण ॥ भूतसंचार नोहे त्या घराकारण ॥ आले असतां जाती सोडोन ॥ परम त्रासेंकरोनियां ॥ १२ ॥ सहाव्या अध्यायांत ॥ शिवअस्त्र कालिका मच्छिंद्रनाथ ॥ युद्ध करून प्रसन्नचित्त ॥ वश्य झालीं अस्त्रें तीं ॥ १३ ॥ तो अध्याय नित्य करितां पठण ॥ शत्रूलागीं पडेल मोहन ॥ निष्कपट तो करून मन ॥ किंकर

१ पाणी. २ वैभवानें. ३ विद्यासागर. ४ अष्टभैरव. ५ सेवक.

होईल द्वारींचा ॥ १४ ॥ सातव्या अध्यायीं अपूर्व कथा ॥ जिंकून वीरभद्र केली ऐक्यता ॥ उपरी स्वर्गापासाव मच्छिंद्रनाथा ॥ इच्छेसमान झालीसे ॥ १५ ॥ ती कथा नित्य गातां ऐकतां ॥ लिप्त नोहे चौऱ्यायशींची व्यथा ॥ झाली असेल मिटेल सर्वथा ॥ चिंता व्यथा हरतील ॥ १६ ॥ जखीणभयापासुनी ॥ त्वरित मुक्त होईल जनीं ॥ एक मंडळ त्रिकालीं अभ्यासूनी ॥ फलप्राप्ति घेइंजे ॥१७॥ आठवे अध्यायीं सकळ कथन ॥ पाशुपतरायासी रामदर्शन ॥ रणीं मित्रराज जिंकोन ॥ केला प्रसन्न विद्येसी ॥ १८ ॥ तो अध्याय नित्य गातां ऐकतां ॥ आपुला सखा देशावरता ॥ तो गृहास येऊन भेटेल तत्त्वतां ॥ चिंताव्यथा हरेल कीं ॥ १९ ॥ नववे अध्यायीं कथन ॥ गोरक्षाचा होऊन जन्म ॥ उपरी सेवून बद्रिकाश्रम ॥ विद्यार्णव झालासे ॥ १२० ॥ तो अध्याय नित्य गातां ऐकतां ॥ साधेल विद्या इच्छिल्या अर्था ॥ ब्रह्मज्ञान रसायण कविता ॥ चवदा विद्या करोनि राहे ॥ २१ ॥ दशम अध्यायींचें कथन ॥ स्त्रीदेशीं मच्छिंद्रनंदन ॥ अंजनीसुतअर्थी पाठवोन ॥ अर्थ किलोतळेचे पुरविले ॥ २२ ॥ एकांतीं बसून अनुष्ठान ॥ संजीवनी पाठ करी गौरनंदन ॥ गहिनीनाथाचा झाला जन्म ॥ कर्दमपुतळा करितां तो ॥ २३ ॥ तो अध्याय करितां पठण ॥ स्त्रियांचे दोष जातील कपटपण ॥ फळें वाचतील होतां जाण ॥ जगीं संतती मिरवेल ॥ २४ ॥ उपरी गृहद्रव्याच्या यज्ञांत ॥ उदय पावला जालिंदरनाथ ॥ तो एकादश अध्याय पठण करितां नित्य ॥ अग्निपीडा होईना ॥ २५ ॥ आणि जयाचे धवळारांत ॥ पूर्वींचा कांहीं दोष असत ॥ तो जाऊन संपत्तिविशेषातें ॥ संततीसह भोगील कीं ॥ २६ ॥ बाराव्यांत हें कथन ॥ जालिंदरें गुरु केला अत्रिनंदन ॥ उपरि कानिफाचा होऊन जन्म ॥ विटंबिलें देवांसी ॥ २७ ॥ तो अध्याय करितां पठण ॥ क्षोभ न पात्रे कोणी देवता जाण ॥ क्षोभित असल्या होतील शमन ॥ सुख सर्व त्याचि देती ॥ २८ ॥ तेराव्या अध्यायांत ॥ मैनावतीतें प्रसन्न नाथ ॥ होऊन केलें अचल सनाथ ॥ ब्रह्मरूपीं आगळी ॥ २९ ॥ तरी तो अध्याय करितां पठण ॥ स्त्रीहत्येचे दोष सघन ॥ त्यांचें होऊनि सकळ निरसन ॥ उद्धरील पूर्वजां ॥ १३० ॥ चतुर्दश अध्यायीं कथन ॥ गर्तेंत जालिंदर गोपीचंदानें ॥ स्त्रीबोलें घातलें नेऊन ॥ गुप्त निशीमाझारी ॥ ३१ ॥ तो अध्याय पठण करितां ॥ असेल बंध कारागृहीं व्यथा ॥ तरी त्याची होईल मुक्तता ॥ निर्दोष जनीं वर्तेल ॥ ३२ ॥ पंचदशांत सुढाळ कथन ॥ कानिफामारुतींचें युद्धकंदन ॥ उपरी स्त्रीराज्यांत जाऊन ॥ आतिथ्य पूर्ण भोगिलें ॥ ३३ ॥ तो अध्याय गातां ऐकतां नित्य ॥ घरचे दारचे कलह नित्यकृत्य ॥ शांति पावोन सर्व सुखांत ॥ निर्भयपणें नांदेल ॥ ३४ ॥ सोळावे अध्यायांत ॥ कानिफा भेटला गोपीचंदातें ॥ तरी तो अध्याय वाचितां नित्यानित्य ॥ दुःस्वप्नांतें नाशील ॥ ३५ ॥ सप्तदश अध्यायीं कथन ॥ जालंदर काढिला गर्तेंतून ॥ उपरी नाथाची दीक्षा घेऊन ॥ गोपीचंदें अर्चिला ॥ ३६ ॥ तोचि अध्याय पठण करितां ॥ योग साधेल योग आचरतां ॥ दुष्टबुद्धि जाईल सर्वथा ॥ सुपंथपंथा

१ सूर्य. २ उद्देश, मनोरथ. ३ गृहामध्यें. ४ मोठी. ५ खड्ड्यांत. ६ रात्रींत.

लागेल तो ॥ ३७ ॥ अष्टादश अध्यायीं कथन ॥ बद्रिकाश्रमीं गोपीचंद जाऊन ॥ तपःपूर्ण भगिनी उठवोन ॥ तीव्रपणीं आचरला ॥ ३८॥ तो अध्याय नित्य पठण करितां ॥ ब्रह्महत्या नासेल सर्वथा ॥ पूर्वज कुंभीपाकीं असतां ॥ सुटका होईल तयांची ॥ ३९ ॥ एकोणिसाव्यांत गोरक्षाकारण ॥ भेटला मारुति श्रीरामप्रीतीनें ॥ तरी तो अध्याय करितां पठण ॥ तया मोक्षार्थ साधेल कीं ॥ १४० ॥ विसाव्यांत अद्भुत कथन ॥ श्रीमच्छिंद्रा भेटीचें कारण ॥ गोरक्ष स्त्रीराज्यांत जाऊन ॥ स्नेहसंपन्न जाहला ॥ ४१ ॥ तो अध्याय पठण करितां गोड ॥ लागलें असेल अत्यंत वेड ॥ तरी ती चेष्टा जाऊनि धड ॥ होऊनि प्रपंच आचरेल ॥ ४२ ॥ एकविसाव्यांत स्त्रीराज्यांतून ॥ मच्छिंद्रास काढिलें गोरक्षनंदनें ॥ नानापरी बोधूनि मन ॥ दुष्टकर्मांतें[२] निवटिलें ॥ ४३ ॥ तो अध्याय नित्य पठण करितां ॥ नासेल बहुजन्मांची गोहत्या ॥ निष्कलंक होऊनि चित्ता ॥ तपोलोकीं मिरवेल ॥ ४४ ॥ बाविसाव्यांत सोरटीग्रामीं ॥ गोरक्षें मीननाथा मारोनी ॥ पुन्हां उठविला मंत्रेंकरोनी ॥ मच्छिंद्रमोहेंकरोनियां ॥ ४५ ॥ तरी तो अध्याय नित्य पठण करितां ॥ पुत्रार्थिया पुत्र तत्त्वतां ॥ तो होईल विद्यावंत ॥ विद्वज्जना मान्य कीं ॥ ४६ ॥ तेविसाव्यांत रसाळ कथन ॥ मच्छिंद्र गोरक्ष गर्भाद्रीं जाऊन ॥ सुवर्णविटेकरितां सुवर्ण- ॥ गर्भगिरी केला असे ॥ ४७ ॥ आणिक केला तेथें उत्सव ॥ तरी तो अध्याय पठण नित्य भावें ॥ करितां घरीं सुवर्ण नव ॥ अखंड राहे भरोनी ॥ ४८ ॥ चोविसाव्यांत भर्तरीनाथ ॥ जन्मोनि आला अवंतिकेंत ॥ तरी तो अध्याय पठण करितां नित्य ॥ बाळहत्या नासेल ॥ ४९ ॥ बाळहत्या जन्मांतरीं ॥ तेणें समस्त वांझ होती नारी ॥ तरी ते नासेल संसारीं ॥ सुखी होऊन बाळ वांचे ॥ १५० ॥ पंचविसाव्यांत गंधर्व सुरोचन ॥ रासभ[३] झाला शापेंकरून ॥ तरी तो अध्याय केलिया पठण ॥ शापवचन बाधेना ॥ ५१ ॥ आणि मानवाविण दुसरा जन्म ॥ होणार नाहीं तयाकारण ॥ आरोग्य काया पतिव्रता कामिन ॥ पुत्र गुणी होईल ॥ ५२ ॥ सव्विसावे अध्यायांत ॥ गणगंधर्व झाला विक्रमसुत ॥ आणि विक्रम भर्तरीसुत एकचित्त ॥ भेटी होऊनि राहील ॥ ५३ ॥ तो अध्याय करितां पठण ॥ गोत्रहत्या जाती नासून ॥ पोटीं पाठीं शत्रुसंतान ॥ न राहे होऊनियां ॥ ५४ ॥ सत्ताविसाव्यांत अद्भुत कथन ॥ राज्यपदीं बैसला राव विक्रम ॥ भर्तरी पिंगलेचें होऊन लग्न ॥ दत्तानुग्रह लाधला ॥ ५५ ॥ तरी तो अध्याय करितां पठण ॥ पदच्युत पावेल पूर्वस्थान ॥ गेली वस्तु पुनः परतोन ॥ सांपडेल तयाची ॥ ५६ ॥ अठ्ठाविसाव्या अध्यायांत ॥ पिंगलेकरितां स्मशानांत ॥ विरक्त होऊनि भर्तरीनाथ ॥ पूर्ण तप आचरला ॥ ५७ ॥ तो अध्याय करितां श्रवण पठण ॥ त्या भाविकाचें होईल लग्न ॥ कांता लाभेल गुणवान ॥ सदा रत[४] सेवेसीं ॥ ५८ ॥ एकुणतिसावे अध्यायींचें चरित्र ॥ भर्तरी होऊनि विरक्त पवित्र ॥ गोरक्षा सांगती अत्रिपुत्र ॥ गुरु नाथ पैं केला ॥ ५९ ॥ तो अध्याय नित्य

१ या नांवाच्या नरकांत. २ नाहींसें केलें. ३ गाढव. ४ आसक्त.

करितां पठण ॥ सुटेल क्षयरोगापासून ॥ आणि त्रितापांची वार्ता जाण ॥ कालत्रयीं घडेना ॥ १६० ॥ तिसाव्या अध्यायांत ॥ जन्मला चौरंगीनाथ ॥ परी तें चरित्र पठण करितां ॥ तस्करी दृष्टी बंधन होय ॥ ६१ ॥ एकतिसाव्यांत चौरंगीनाथ ॥ तपा बैसला हिमालयांत ॥ तरी तो अध्याय पढतां नित्य ॥ कपटमंत्र न चालती ॥ ६२ ॥ बत्तिसाव्यांत सुगम कथन ॥ मच्छिंद्र त्रिविक्रमदेहीं संचरोन ॥ द्वादश वर्षे राज्य करोन ॥ रेवतीस पुत्र दिधला ॥ ६३ ॥ त्या अध्यायाचें करितां पठण ॥ आयुष्य असतां देहाकारण ॥ गंडांतरें करूं येतील विघ्नें ॥ आपोआप टळतील कीं ॥ ६४ ॥ तेतिसाव्यांत गौरनंदन ॥ वीरभद्राचा घेऊन प्राण ॥ मच्छिंद्रशव स्वर्गाहून ॥ महीवरती उतरिलें ॥ ६५ ॥ तरी ती कथा करितां पठण ॥ धनुर्वाताचें [1]निरसे विघ्न ॥ झालेल्यातें होतां श्रवण ॥ पीडा हरेल तयाची ॥ ६६ ॥ चौतिसाव्यांत रेवणजन्म ॥ होऊन भेटला अत्रिनंदन ॥ सहज सिद्धिकळा दावून ॥ गेला असे महाराजा ॥ ६७ ॥ तरी ती कथा करितां पठण ॥ जाणें कोणत्याही कार्याकारण ॥ तो सिद्धार्थ साधेल कार्यसाधन ॥ यश घेऊन येईल तो ॥ ६८ ॥ पस्तिसाव्यांत पूर्ण कथन ॥ रेवण झाला विद्यावान ॥ [2]दत्तकृपें स्वर्गीं जाऊन ॥ बाळें आणिलीं विप्राचीं ॥ ६९ ॥ तरी ती कथा करितां पठण ॥ महासिद्ध येईल उदराकारण ॥ बेचाळिसांचें करूनि उद्धारण ॥ गातील आख्यान लोक परी ॥ १७० ॥ छत्तिसाव्यांत अपूर्व कथा ॥ जन्म झाला वटसिद्धनाथा ॥ आस्तिक ऋषि झाला ताता ॥ तयाचिये मातेसी ॥ ७१ ॥ ती कथा करितां श्रवण पठण ॥ [3]सर्पवृश्चिकदंश जयाकारण ॥ झालिया विषाचें उत्तीर्ण ॥ श्रवण केलिया अध्याय तो ॥ ७२ ॥ सदतिसाव्या अध्यायांत ॥ नागनाथास गुरु झाला अत्रिसुत ॥ उपरी विद्याबळें मच्छिंद्रनाथ ॥ जिंकियेले भिडोनी ॥ ७३ ॥ ती कथा करितां श्रवण पठण ॥ सदना न लागे कुशीलपण ॥ लागल्या त्याचें होईल बंधन ॥ विद्यावंत होऊनियां ॥ ७४ ॥ अडतिसाव्यांत चरपटीचा जन्म ॥ होऊन दत्तात्रेयें दीक्षा देऊन ॥ विद्येमाजी करून संपन्न ॥ तीर्थावलीं धाडिला ॥ ७५ ॥ तरी ती कथा सुरस ॥ श्रवण पठण होतां त्यास ॥ हिंवताप मधुरा नवज्वरास ॥ शांति होईल सर्वस्वीं ॥ ७६ ॥ एकुणचाळिसाव्यांत कथा ॥ चरपटीनें जिंकिलें [4]अमरनाथा ॥ हरिहरादि देवां समस्तां ॥ स्वर्गीं ख्याती लाविली ॥ ७७ ॥ तरी तो अध्याय करितां पठण ॥ तो युद्धा जातां तपोधन ॥ शस्त्रबाण पावोन ॥ जय घेऊन येईल कीं ॥ ७८ ॥ यावरी चाळिसाव्यांत कथन ॥ सर्व नाथांतें पाकशासन ॥ स्वर्गीं नेऊन करी हवन ॥ विद्यार्थिरूपें अर्थ पुरविला ॥ ७९ ॥ तरी चाळिसावा नित्य पठण करितां ॥ लाभेल सर्व इच्छिल्या अर्था ॥ यश श्री ऐश्वर्य योग्यता ॥ पुत्रपौत्रीं नांदेल ॥ १८० ॥ एकुणचाळिसांचा फलार्थ ॥ तोचि प्राप्त तदर्थ ॥ कीं चाळिसावा एक परिस ॥ कीं कामधेनु कल्पतरु ॥ ८१ ॥ गोरक्ष बोलतो वाचेंकरून ॥ त्यातें असत्य मानील जन ॥ जो निंदक यातें दावील

१ नाश पावतें. २ दत्तात्रय. ३ सर्पाचा किंवा विंचवाचा दंश. ४ इंद्राला.

निंदून ॥ तो अधिकारी विघ्नांचा ॥ ८२ ॥ इहलोकीं परलोकीं ॥ राहणार नाहीं परम सुखी ॥ निर्वंश पावोन शेवटीं वंशीं ॥ पचेल ग्रंथ निंदितां हा ॥ ८३ ॥ अगा हा ग्रंथ नोहे भक्तिसार ॥ आहे गोरक्षाचा [1]किमयागार ॥ परी पालटोन भाषांतर ॥ महाराष्ट्र अक्षरीं रेखिला ॥ ८४ ॥ म्हणोन श्रोते हो भाविक जन ॥ सोडोन द्या कीं निंदावचन ॥ विश्वासपर स्वार होऊन ॥ मोक्षमुक्काम करा कीं ॥ ८५ ॥ तरी हा ग्रंथ संग्रह करून ॥ चमत्कार पहावा पठण करून ॥ हे चाळीस प्रसंग मंत्रनिर्वाण ॥ महासिद्धीचे असती ॥ ८६ ॥ हे चाळीस मंत्र परोपकारी ॥ आहेत दुःखाची करतील बोहेरी [2] ॥ तरी संग्रह करून उंगलेच [3] घरीं ॥ ठेवा विश्वास धरूनियां ॥ ८७ ॥ ह्या चाळीस अध्यायांत मंत्रयंत्र ॥ सुखकारक असती अति पवित्र ॥ दुःख दरिद्र हरण सर्वत्र ॥ गोरक्षकानें निर्मिलें ॥ ८८ ॥ पठण करितां षण्मासमिती ॥ जो अध्याय ज्या कार्याप्रती ॥ तें कार्य होईल निःसंशय चित्तीं ॥ पठण करून पहावें ॥ ८९ ॥ याउपरी वाचितां न ये जरी ॥ तरी संग्रह करून ठेवावा घरीं ॥ नित्य वंदितां नमस्कारीं ॥ कार्य त्यांतचि घडेल ॥ १९० ॥ एक कुसुम [4] झोंकून वरती ॥ चला म्हणावें मम कार्याप्रती ॥ नवनाथ वंदूनि उक्तीं ॥ नमस्कार करावा ॥ ९१ ॥ ऐसा याचा आहे मार्ग ॥ करून पहावा चमत्कार चांग ॥ नवनाथ ओडवोन अंग ॥ कार्य तुमचें करितील कीं ॥ ९२ ॥ तरी असो विजय संपत्ती ॥ नांदो श्रोत्याच्या गृहाप्रती ॥ धुंडीसुत हेंचि प्रार्थी ॥ मालू नरहरी देवातें ॥ ९३ ॥ शके सत्राशें एकेचाळिस ॥ प्रमाथीनाम ज्येष्ठ मास ॥ शुक्लपक्ष प्रतिपदेस ॥ ग्रंथ समाप्त जाहला ॥ ९४ ॥ तरी ओंव्या सर्व नेमस्त ॥ सप्तसहस्र सहाशत ॥ उपरी ऐसे दैदीप्यवंत ॥ ओव्या मंत्र असती ह्या ॥ ९५ ॥ अध्याय वाचावया न बनेल ज्यासी ॥ तरी अध्यायांतील एक ओवीसी ॥ पठण करून नाथनामासी ॥ कार्यकाज करावें ॥ ९६ ॥ असो आतां बहु भाव ॥ श्रोते असोत चिरंजीव ॥ इहलोकीं परलोकीं ठेव ॥ आनंदाची होतसे ॥ ९७ ॥ तरी समस्त नाथांतें धुंडीसुत ॥ मालु नरहरी हेंचि विनवीत ॥ कीं श्रोते असोत सुखरूपवंत ॥ सर्व अर्थीं सर्वदा ॥ ९८ ॥ स्वस्ति श्रीभक्तिकथासार ॥ संमत गोरक्षकाव्य किमयागार ॥ सदा परिसोत भाविक चतुर ॥ चत्वारिंशतितमाध्याय गोड हा ॥ ९९ ॥ ॥ अध्याय ॥ ४० ॥ ॥ ओंव्या ॥ १९९ ॥ ॥ छ ॥

॥ नवनाथांचा श्लोक ॥

॥ गोरक्षजालंदरचर्पटाश्च अड्बंगकानीफमछिंदराद्याः ॥ चौरंगिरेवाणकभर्त्रिसंज्ञा भूम्यां बभूवुर्नवनाथसिद्धाः ॥

॥ श्रीगुरुदत्तात्रेयार्पणमस्तु ॥

---

१ क्रिया करण्याचें घरच. २ नाश. ३ प्रेमानें. ४ फूल.

# ॥ आरत्या ॥

## आरत्या विठ्ठलाच्या. ( १ )

युगें अठ्ठावीस विटेवरी उभा ॥ वामांगीं रखुमाई दिसे दिव्य शोभा ॥ पुंडलिकाचे भेटी परब्रह्म आलें गा ॥ चरणीं वाहे भीमा उद्धरी जगा ॥ १ ॥ जय देव जय देव जय पांडुरंगा ॥ रखुमाईवल्लभा राईच्या वल्लभा पावें जिवलगा ॥ जय० ॥ ध्रु० ॥ तुळसीमाळा गळां कर ठेवुनि कटीं ॥ कांसे पीतांबर कस्तुरि लल्लाटीं ॥ देव सुरवर नित्य येती भेटी ॥ गरुड हनूमंत पुढें उभे रहाती ॥ जय० ॥ २ ॥ धन्य वेणूनाद अनुक्षेत्रपाळा ॥ सुवर्णाचीं कमळें वनमाळा गळां ॥ राई रखुमाबाई राणीया सकळा ॥ ओंवाळीती राजा विठोबा सांवळा ॥ जय० ॥ ३ ॥ ओंवाळूं आरत्या कुर्वंड्या येती ॥ चंद्रभागेमाजी सोडुनियां देती ॥ दिंड्या पताका वैष्णव नाचती ॥ पंढरीचा महिमा वर्णावा किती ॥ जय० ॥ ४ ॥ आषाढी कार्तिकी भक्तजन येती ॥ चंद्रभागेतीरीं स्नानें जे करिती ॥ दर्शनहेळामात्रें तयां होय मुक्ती ॥ केशवासी नामदेव भावें ओंवाळिती ॥ जय० ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

## ( २ )

येई हो विठ्ठले माझे माऊलीये ॥ निढळावरी कर ठेवुनि वाट मी पाहें ॥ ध्रु० ॥ आलिया गेलिया हातीं धाडीं निरोप ॥ पंढरपुरीं आहे माझा मायबाप ॥ येई० ॥ ॥ १ ॥ पिंवळा पीतांबर कैसा गगनीं झळकला ॥ गरुडावरि बैसून माझा कैवारी आला ॥ येई० ॥ २ ॥ विठोबाचें राज्य आह्मां नित्य दिपवाळी ॥ विष्णुदास नामा जीवेंभावें ओंवाळी ॥ येई हो० ॥ ३ ॥

## प्रार्थना.

घालीन लोटांगण वंदीन चरण ॥ डोळ्यांनिं पाहिन रूप तुझें ॥ प्रेमें आलिंगिन आनंदें पूजिन ॥ भावें ओंवाळिन म्हणे नामा ॥ १ ॥ त्वमेव माता च पिता त्वमेव, त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव ॥ त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव, त्वमेव सर्वं मम देवदेव ॥ २ ॥ कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा, बुद्ध्यात्मना वा प्रकृतिस्वभावात् ॥ करोमि यद्यत् सकलं परस्मै, नारायणायेति समर्पयामि ॥ ३ ॥ अच्युतं केशवं रामनारायणं कृष्णदामोदरं वासुदेवं हरिं ॥ श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचंद्रं भजे ॥ ४ ॥ हरेराम हरेराम रामराम हरेहरे ॥ हरेकृष्ण हरेकृष्ण कृष्णकृष्ण हरेहरे ॥ ५ ॥ ॥ ॥ ॥ ॥

हा ग्रंथ मुंबईंत **पांडुरंग जावजी** यांनीं आपल्या "निर्णयसागर" छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला. शके १८५६, सन १९३४.

प्रिंटरः—रामचंद्र येसू शेडगे, पब्लिशरः—पांडुरंग जावजी, } निर्णयसागर प्रेस, घर नंबर २६।२८ कोलभाट लेन, मुंबई.

